॥ श्रीगणेशाय नमः ॥

( महर्षिव्यासप्रणीत )

# श्रीहरिवंशपुराण.

## भविष्यपर्व.

### भाग २ रा.

मूळ व भाषांतर.




भाषांतरकार

वे० शा० सं० रा० विष्णुशास्त्री बापट.


पुराणप्रकाशक मंडळीचे व्य० दामोदर लक्ष्मण लेले यांनीं

वाई येथें आपल्या मोदवृत्त छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केलें.

सन १९११ इ०

किंमत ३ रुपये.

॥ श्री. ॥

महर्षिव्यासप्रणीत

# ॥ श्रीहरिवंशपुराण ॥

## भविष्यपर्व

श्रीगोपालकृष्णाय नमः ॥ शौनक उवाच ॥ जनमेजयस्य के पुत्राः पठ्यन्ते लोमहर्षणे। कस्मिन्प्रतिष्ठितो वंशः पांडवानां महात्मनाम् १ एतदिच्छाम्यहं श्रोतुं परं कौतूहलं हि मे। त्वत्तः कथयतः सर्वं वेद्म्यहं तत्परिस्फुटम् २ सौतिरुवाच ॥ पारीक्षितस्य काश्यायां द्वौ पुत्रौ संबभूवतुः। चन्द्रापीडश्च नृपतिः सूर्यापीडश्च मोक्षवित् ३ चन्द्रापीडस्य पुत्राणां शतमुत्तमधन्विनाम्। जानमेजय इत्येवं क्षात्रं भुवि परिश्रुतम् ४ तेषां श्रेष्ठस्तु राजासीत्पुरे वाराणसाह्वये। सत्यकर्णो महाबाहुर्यज्वा विपुलदक्षिणः ५ सत्यकर्णस्य दायादः श्वेतकर्णः प्रतापवान्। अपुत्रः स तु धर्मात्मा प्रविवेश तपोवनम् ६ तस्माद्वनगताद्गर्भं यादवी प्रत्यपद्यत। सुचारोर्दुहिता सुभ्रूर्मालिनी भ्रातृमालिनी ७ स तु जन्मनि गर्भस्य श्वेतकर्णः प्रजेश्वरः। अन्वगच्छद्गतं पूर्वैर्महाप्रस्थानमच्युत ८ सा दृष्ट्वा संप्रयातं तं मानिनी पृष्ठतोऽन्वियात्।

---

श्रीगणेशाय नमः ॥ शौनकः– हे लोमहर्षणपुत्रा, जनमेजयाचे कोण कोण पुत्र सांगितले आहेत व महात्म्या पांडवांचा वंश कोणत्या पुत्रामध्यें प्रतिष्ठा पावला ? ( ह्म. पांडवांचा वंशधर कोण झाला ? ) १. हें ऐकण्याची मला इच्छा आहे. कारण त्याविषयीं मला मोठें कौतुक वाटतें. तो सर्व वृत्तांत सांगणाऱ्या तुझ्यापासून मला तें सर्व अगदीं स्पष्टपणें समजेल २. सौतिः– परीक्षित्पुत्र जनमेजयाच्या काश्या नामक भार्येच्या ठायीं दोन पुत्र झाले. एक राजा चंद्रापीड व दुसरा मोक्षवेत्ता सूर्यापीड ३. चंद्रापीडाला उत्तम धनुर्धर शंभर पुत्र होते. तो क्षत्रियांचा संघ भूलोकीं जानमेजय या नांवानें प्रख्यात होता ४. त्यांतील श्रेष्ठ पुत्र वाराणससंज्ञक नगरांत राजा झाला. त्या महापराक्रमी राजाचें नांव सत्यकर्ण असें असून पुष्कळ दक्षिणा देणाऱ्या त्यानें यथाशास्त्र यज्ञ केला ५. सत्यकर्णाचा दायाद ( पुत्र ) प्रतापवान् श्वेतकर्ण; पण तो धर्मात्मा अपुत्र असल्यामुळें तपोवनांत गेला ६. वनांत गेलेल्या त्याच्यापासून भ्रातृमालिनी या नांवाची यादवी गर्भधारण करती झाली. ती मानिनी सुभ्रु सुचारु यादवाची कन्या होय ७. पण गर्भाचा उद्भव होतांच श्वेतकर्ण प्रजेश्वर, हे धर्मापासून च्युत न होणाऱ्या शौनका, पूर्वज पांडव

पथि सा सुषुवे सुभ्रूर्वने राजीवलोचनम् ९ कुमारं तं परित्यज्य भर्तारं चान्वगच्छत । पति-
व्रता महाभागा द्रौपदीव पुरा पतीन् १० स तु राजकुमारोऽसौ गिरिकुंजे रुरोद ह। छायार्थं
तस्य मेघास्तु प्रादुरासन्समंततः ११ श्रविष्ठायाश्च पुत्रौ द्वौ पिप्पलादश्च कौशिकः । दृष्ट्वा
कृपान्वितौ गृह्य तं प्रक्षालयतां जलैः । निघृष्टौ तस्य तौ पार्श्वौ शिलायां रुधिरप्लुतौ १२
अजश्यामौ तु पार्श्वौ तावुभावपि समाहितौ । तथैव तु समारूढौ अजपार्श्वस्ततोऽभवत् १३
ततोऽजपार्श्व इति तौ चक्राते तस्य नाम ह । स तु वेमकशालायां द्विजाभ्यामभिवर्धितः १४
वेमकस्य तु भार्या तमुद्वहत्पुत्रकारणात् । वेमक्याः स तु पुत्रोऽभूद्ब्राह्मणौ सचिवौ च तौ १५
तेषां पुत्राश्च पौत्राश्च युगपत्तुल्यजीविनः । स एष पौरवो वंशः पाण्डवानां प्रतिष्ठितः १६
श्लोकोऽपि चात्र गीतोऽयं नाहुषेण ययातिना । जरासंक्रमणे पूर्वं भृशं प्रीतेन धीमता १७
आचन्द्रार्कग्रहा भूमिर्भवेदपि न संशयः । अपौरवा न तु मही भविष्यति कदाचन १८
[१८] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

शौनक उवाच ॥ उक्तायं हरिवंशस्ते पर्वाणि निखिलानि च । यथा पुरोक्तानि तथा व्यास-शिष्येण धीमता १ तत्कथ्यमानमितिहाससमन्वितम् । प्रीणात्यस्मानमृतवत्सर्वपापविनाश-

---

गेले होते त्या महाप्रस्थानास गेला ८. तेव्हां तो जात आहे असें पाहून ती मानिनीही त्याच्या मागून गेली. मार्गांत त्या साध्वीला कमलनेत्रयुक्त पुत्र झाला. पण पूर्वी पतींच्या मागून जाणाऱ्या महाभागा पतिव्रता द्रौपदीप्रमाणें त्या कुमाराला वनांत टाकून ती पतीच्या मागून चालली ९, १०. तेव्हां तो राजपुत्र पर्वतावरील वृक्षसमूहांत पडून रडूं लागला. पण त्याच्यावर छाया करण्याकरितां चोहोंकडून मेघ प्रादुर्भूत झाले ११. श्रविष्ठानामक चंद्राच्या भार्येचे पिप्पलाद व कौशिक या नांवाचे दोन पुत्र त्या बालकाला पाहून कृपायुक्त झाले. व त्याला उचलून घेऊन त्यांनीं जलानें धुतलें. रक्तानें भरलेल्या त्याच्या दोन्ही कुशी त्यांनीं शिळेवर घांसल्या. त्यामुळें त्या दोन्ही कुशी बकऱ्याप्रमाणें काळ्या झाल्या. व त्या तशाच वृद्धि पावत गेल्यामुळें तो बकऱ्यासारख्या पार्श्वभागांनीं युक्त झाला १२, १३. ह्मणून त्यांनीं त्याचें अजपार्श्व असें नांव ठेविलें. वेमक नांवाच्या स्वर्गस्थ ऋषीच्या शालागृहांत त्या दोघां ब्राह्मणांनीं त्याचें संवर्धन केलें १४. वेमकाच्या भार्येनें पुत्ररूपानें त्याचें ग्रहण केलें. त्यामुळें तो वेमकीचा पुत्र झाला. व तेच दोघे ब्राह्मण त्याचें सचिव झाले १५. त्याचे पुत्र व पौत्र एकाच वेळीं तुल्यकाल जिवंत रहात असत. ( ह्मणजे अजपार्श्व राजा होता तोंपर्यंत पिप्पलाद व कौशिक त्याचे सचिव होते. पुढें अजपार्श्वाचा पुत्र राजा झाला व त्या दोघां ब्राह्मणांचे पुत्र सचिव झाले. याप्रमाणेंच ही परंपरा पुष्कळ दिवस चालली. ) अशारीतीनें हा पांडवांचा वंश प्रतिष्ठित झाला आहे. आपल्या वृद्धावस्थेचें संक्रमण करीत असतांना पुरूवर अतिशय प्रसन्न झालेल्या बुद्धिमान् नहुषपुत्र ययातीनें याविषयीं हा असा श्लोकही ह्मटला आहे १६, १७ " चंद्र, सूर्य व ग्रह असत तोंपर्यंत ही भूमिसुद्धां असणार यांत संशय नाहीं. पण ती पौरव राजावांचून कधींही असणार नाहीं. " १८. इति श्री महाभारताच्या खिलपर्वांतील हरिवंशाच्या भविष्यपर्वांपैकीं पहिला अध्याय समाप्त झाला. ॥ १ ॥

शौनकः— पूर्वी बुद्धिमान् व्याসशिष्यानें जशीं सांगितलीं होतीं त्याप्रमाणें तूं हीं सर्व पर्वें व हरिवंश सांगितला आहेस १. इतिहासांसह हें तूं सांगूं लागलास ह्मणजे अमृतासा-

मम २ सुखश्राव्यतया धीर मनो ह्लादयतीव नः । जनमेजयस्तु नृपतिः श्रुत्वा चाख्यानमुत्तमम् । सौते किमकरोत्पश्चात्सर्पसत्रादनन्तरम् ३ सौतिरुवाच ॥ जनमेजयस्तु स नृपः श्रुत्वा चाख्यानमुत्तमम् । यदारभत्तदाख्यास्ये सर्पसत्रादनन्तरम् ४ तस्मिन्सत्रे समाप्तेऽथ राजा पारीक्षितस्तदा । यष्टुं स वाजिमेधेन संभारानुपचक्रमे ५ ऋत्विक्पुरोहिताचार्याना-हूयेदमुवाच ह । यक्ष्येऽहं वाजिमेधेन हयश्चोत्सृज्यतामिति ६ ततोऽस्य विज्ञाय चिकीर्षितं तदा कृष्णो महात्मा सहसा जगाम । पारीक्षितं द्रष्टुमदीनसत्त्वं द्वैपायनः सर्वपरावरज्ञः ७ पारीक्षितस्तु नृपतिर्दृष्ट्वा तमृषिमागतम् । अर्घ्यपाद्यासनं दत्त्वा पूजयामास शास्त्रतः ८ तौ चोपविष्टावभितः सदस्यास्तस्य शौनक । कथा बहुविधाश्चित्राश्चक्राते वेदसंहिताः ९ ततः कथान्ते नृपतिर्नोदयामास तं ऋषिम् । पितामहं पाण्डवानामात्मनः प्रपितामहम् १० महा-भारतमाख्यानं बह्वर्थं श्रुतिविस्तरम् । निमेषमात्रमपि मे सुखश्राव्यतया गतम् ११ विभू-तिविस्तारकरं सर्वेषां वै यशस्करम् । त्वया सुविहितं ब्रह्मन् शंखे क्षीरमिवाहितम् १२ अमृतेन तु तृप्तिः स्याद्यथा स्वर्गसुखेन च । तथा तृप्तिं न गच्छामि श्रुत्वेमां भारतीं कथाम् १३ अनुमान्य तु सर्वज्ञं पृच्छामि भगवन्नहम् । हेतुः कुरूणां नाशस्य राजसूयो मतो मम १४ दुःसहानां यथा ध्वंसो राजन्यानामुपप्लवे । राजसूयं तथा मन्ये युद्धार्थ-मुपकल्पितम् १५ राजसूयस्तु सोमेन श्रूयते पूर्वमाहृतः । तस्यान्ते सुमहद्युद्धमभवत्तारकाम-

---

रखें तृप्त करणारें व सर्व पापाचा नाश करणारें तें आह्मांला अतिशय संतुष्ट करतें २. हे धीरा, त्याचें श्रवण सुखरूप असल्यामुळें तें आमच्या मनाला जणुंकाय अतिशय आल्हाद देत असतें; पण हे सौते, जनमेजयराजा हें उत्तम आख्यान ऐकून सर्पसत्रानंतर काय करितां झाला ३. सौतिः— हें सर्वोत्तम आख्यान ऐकून सर्पसत्रानंतर राजा जनमेज-यानें काय करावयास आरंभ केला तें सांगतों ४. तें सत्र संपलें असतां तो परीक्षित्पुत्र अश्वमेध यज्ञ करण्याकरितां संभार जमवूं लागला ५. ऋत्विक्, पुरोहित व आचार्य यांस बोलावून तो असें ह्मणाला, " मी अश्वमेध यज्ञ करण्याचा निश्चय केला आहे. यास्तव, घोडा सोडा " ६. पण इतक्यांत हा त्याचा मनोरथ जाणून महात्मा सर्वज्ञ द्वैपायन कृष्ण अकस्मात् उदार चित्त परीक्षित्पुत्राला भेटावयास आला ७. तेव्हां तो ऋषि आला आहे असें पाहून जनमेजय राजा अर्घ्य, पाद्य व आसन देऊन त्याचें यथाशास्त्र पूजन करितां झाला ८. ते दोघे एकमेकासमोर तोंडें करून बसले. हे शौनका, सदस्यही आपापल्या जागीं बसले. नंतर त्या दोघांनीं वेदसंबंधीं नानाप्रकारच्या विचित्र कथा केल्या ९. त्यानं-तर गोष्टी बोलून झाल्या असतां राजानें पांडवांचा पितामह व स्वतःचा प्रपितामह ( वृद्ध प्रपितामह ) अशा मुनीस ह्मटलें. " प्रभो, बहु—अर्थयुक्त व वेदासारखें विस्तृत असेंही भारत आख्यान कर्णेंद्रियास तृप्त करणारें असल्यामुळें तें ऐकतांना माझीं वर्षेंही एका निमेषासारखें गेलें १०,११. तें विभूतीचा विस्तार करणारें, सर्वांचें यश पसरविणारें आहे. ब्रह्मन्, आपण तें फार चांगलें रचलें आहे. व शंखांतील क्षीराप्रमाणें तें योग्य शिष्यांचे ठायीं अर्पण केलें आहे १२. स्वर्गसुखानें जशी तशीच अमृतानेंही तृप्ति होईल; पण ही भारती कथा ऐकून माझी तृप्ति होत नाहीं १३. यास्तव तुज सर्वज्ञास योग्य मान देऊन, हे भगवन्, मीं कांहीं विचारतों. कुरूंच्या नाशाचें कारण राजसूय आहे असें मला वाटतें १४. ज्याअर्थी अजिंक्य क्षत्रियांचा त्या संकटांत नाश झाला त्याअर्थी देवांनीं

यम् १६ आहृतो वरुणेनाथ तस्यान्ते सुमहाक्रतोः । देवासुरं महायुद्धं सर्वभूतभयावहम् १७
हरिश्चंद्रश्च राजर्षिः क्रतुमेनमुपाहरत् । तत्राप्याडीबकं नाम युद्धं क्षत्रियनाशनम् १८
ततोऽनन्तरमार्येण पाण्डवेनातिदुस्तरः । महाभारत आरंभः संभृतोऽग्निरिव क्रतुः १९
तदस्यमूलं युद्धस्य लोकक्षयकरस्य तु । राजसूयो महायज्ञः किमर्थं न निवारितः २०
राजसूयो ह्यसंहार्यो यज्ञांगैश्च दुरत्ययैः । मिथ्याप्रणीते यज्ञांगे प्रजानां संक्षयो ध्रुवः २१
भवानपि च सर्वेषां पूर्वेषां नः पितामहः । अतीतानागतज्ञश्च नाथश्चादिकरश्च नः २२
ते कथं भवता नेत्रा बुद्धिमन्तश्च्युता नयात् । अनाथा ह्यपराध्यन्ते कुनेतारश्च मानवाः २३
व्यास उवाच ॥ कालेन विपरीतास्ते तव पूर्वपितामहाः । न मां भविष्यं पृच्छन्ति न
चापृष्टोऽब्रवीम्यहम् २४ सामर्थ्यं च नपश्यामि भविष्यस्य निवर्तने । परिहर्तुं न शक्या हि
कालेन विहिता मतिः २५ त्वया त्विदमहं पृष्टो वक्ष्याम्यागन्तु भावि यत् । अतश्च
बलवान्कालः श्रुत्वापि न करिष्यसि २६ न संरंभान्न चारंभान्न वै स्थास्यसि पौरुषे ।
लेखा हि काललिखिताः सर्वथा दुरतिक्रमाः २७ अश्वमेधः क्रतुः श्रेष्ठः क्षत्रियाणां
परिश्रुतः । तेन भावेन ते यज्ञं वासवो धर्षयिष्यति २८ यदितच्छक्यते राजन्परिहर्तुंकथं-

---

राजसूयाची योजना युद्धाकरितांच केली असें मला वाटतें १५. हाच राजसूय पूर्वी सोमानें केला होता असें ऐकतों; पण त्याच्या शेवटीं तारेसंबंधीं फार मोठें युद्ध झालें १६. वरुणानें तो महाक्रतु केला; पण त्याच्या शेवटीं सर्व भूतांस भयावह असें देवासुरांचें महायुद्ध झालें १७. हरिश्चंद्र राजर्षीनें हा क्रतु केला; पण त्यांतही आडीबक या नांवाचें क्षत्रियांचा नाश करणारें युद्ध झालें. ( आपण एवढे मोठे ऋषी असतांना उवड उवड युद्ध कसें करावें ?, ह्मणून लज्जित झालेले वसिष्ठ व विश्वामित्र क्रमानें आडी व बक या नांवाचे जळचर पक्षी होऊन लढले. त्याप्रसंगीं त्या दोघांचा पक्ष घेणाऱ्या क्षत्रियांचा मोठा संग्राम झाला; अशी पुराणांत कथा आहे. ) १८. त्यानंतर आर्य पांडवानें अति दुस्तर महाभारतयुद्धाच्या आरंभास कारण होणाऱ्या ह्या अग्नितुल्य क्रतूस संपादन केलें १९. यास्तव लोकांचा क्षय करणाऱ्या या युद्धाचें मूल अशा या राजसूय महायज्ञाचें निवारण आपण कां केलें नाहीं ? २०. दुःसंपाद्य यज्ञांगांनीं राजसूय चांगल्या रीतीनें समाप्त करितां येत नाहीं. ( सर्वांगसंपूर्ण तडीस जात नाहीं. ) व त्यांत कांहीं अन्यथा अनुष्ठान झालें असतां ( यज्ञांगांत कांहीं न्यून पडलें असतां ) निश्चयानें प्रजासंहार होतो २१. आपणही आमच्या सर्व पूर्वजांचे पितामह आहां. आपण भूत व भविष्य जाणणारे आणि आमचे आदिकर नाथ आहां २२. तेव्हां आपण मार्ग-दर्शक असतांना ते बुद्धिमान् पूर्वज नीतीपासून च्युत कसे झाले. अनाथ व दुर्नायक मानवच अपराध करीत असतात २३. व्यासः– हे राजन्, तुझ्या पूर्व पितामहांची बुद्धि कालवशात् फिरली. त्यांनीं मला पुढचें भविष्य कधीं विचारलें नाहीं व मीही आपण होऊन त्यांना सांगितलें नाहीं २४ भावी गोष्टींचा बदल करण्याचें सामर्थ्य मी पहात नाहीं. कारण कालकृत गतीचा परिहार करतां येणें शक्य नसतें २५. पण तूं आतां विचारीत आहेस ह्मणून यापुढें काय होईल तें सांगतों. पण बाबारे, काल बलवान् आहे. तूं पुढचें भाविवृत्त ऐकूनही कांहीं करणार नाहींस २६. भय व उत्साह यांच्या योगानें तूं स्वप्रयत्नामध्यें स्थिर रहाणार नाहींस. कारण,

चन । दैवं पुरुषकारेण माय जेथाश्च तं क्रतुम् २९ न चापराधः शक्रस्य नोपाध्याय-गणस्य ते । तव वा यजमानस्य कालोऽत्र दुरतिक्रमः ३० तस्य संस्थाकृतमिदं कालुष्य परमेष्ठिनः । यथादृष्ट प्रजासर्गे गमिष्यति युगक्षये ३१ तथा यज्ञफलानां च विक्रेतारो द्विजातयः । तत्प्रणेयं निबोधस्व त्रैलोक्यं सचराचरम् ३२ जनमेजय उवाच ॥ निवृत्ता-वश्वमेधस्य किंनिमित्तं भविष्यति । श्रुत्वा परिहरिष्यामि भगवन्यदि मन्यसे ३३ व्यास उवाच ॥ निमित्तं भविता तत्र ब्रह्मकोपकृतं प्रभो । यतेथाः परिहर्तुं त्वमित्येतद्भद्रमस्तु ते ३४ त्वया वृत्तं क्रतुं चैव वाजिमेधं परंतप । क्षत्रिया नाहरिष्यन्ति यावद्भूमिर्धरि-ष्यति ३५ जनमेजय उवाच । निवृत्तावश्वमेधस्य ब्रह्मशापाग्नितेजसा । अहं निमित्तमिति मे भयं तीव्रं तु जायते ३६ कथं ह्यकीर्त्या संयुक्तः सुकृती मद्विधो जनः । लोकानुत्सहते गंतुं खं सपाश इव द्विजः ३७ यथा ह्यनागतमिदं दृष्टमत्र प्रणाशनम् । यद्यस्ति पुनरावृत्ति-र्यज्ञस्याश्वासयस्व माम् ३८ व्यास उवाच ॥ उपात्तयज्ञो देवेषु ब्राह्मणेषूपपत्स्यते । तेजसा ह्याहृतं तेजस्तेजस्येवावतिष्ठते ३९ औद्भिज्जो भविता कश्चित्सेनानीः काश्यपो द्विजः । अश्वमेधं कलियुगे पुनः प्रत्याहरिष्यति ४० तद्युगे तत्कुलीनश्च राजसूयमपि क्रतुम् ।

---

कालानें लिहिलेल्या लेखा सर्वथा दुर्लंघ्य असतात २७. क्षत्रियांचा अश्वमेध यज्ञ श्रेष्ठ ह्मणून सांगितलेला आहे. त्यामुळें महत्त्वाच्या इच्छेनें इंद्र त्याचा नाश करील २८. यास्तव, हे राजन्, प्रयत्नानें दैवाचा परिहार कोणत्याही प्रकारें करतां येणें जर शक्य असेल तर तो यज्ञ करूं नकोस २९. त्यांत इंद्राचा, तुझ्या उपाध्यायवर्गाचा किंवा तुज यजमानाचाही कांहीं अपराध नाहीं. तर या प्रसंगीं काल दुरतिक्रम आहे ३०. त्या परमेष्ठी कालाच्या इच्छेप्रमाणें हें सर्व होणार आहे. यज्ञाच्या समाप्तीकरितां त्यानें केलेलें हें कालुष्य आहे. युगक्षय झाला असतां प्रजासृष्टि अदृष्टानुरूप नष्ट होईल ३१. त्याच-प्रमाणें ब्राह्मण यज्ञफलाचा विक्रय करतील. राजन्, सर्व सचराचर त्रैलोक्य कालाधीन आहे असें तूं समज ३२. जनमेजयः— भगवन्, अश्वमेधाच्या निवृत्तीचें निमित्त काय आहे ? तें ऐकून, जर आपली इच्छा असेल तर मी त्याचा परिहार करीन ३३. व्यासः— हे प्रभो, ब्राह्मणाच्या कोपामुळें तें निमित्त होईल. यास्तव, तूं ब्राह्मणकोपाचा परिहार करण्याविषयीं यत्न कर. तुझें कल्याण होवो ३४. हे परंतप, तूं केलेला हा अश्वमेध यज्ञ पुनः कोणी क्षत्रिय पृथ्वी असेपर्यंत करणार नाहीं ३५. जनमेजयः—ब्राह्मणशापरूपी अग्नीच्या तेजानें अश्वमेधाच्या निवृत्तीस मी निमित्त होणार हें ऐकून मला फार मोठें भय वाटत आहे ३६. कारण अकीर्तीनें युक्त झालेला माझ्यासारखा पुण्यवान् पुरुष, पाशयुक्त पक्षी आकाशांत जाण्यास जसा, तसा उत्तम लोकांस जाण्यास कसा बरें समर्थ होईल ३७. प्रभो, ज्याप्रमाणें आपण हा पुढें ओढवणारा नाश आतांच पाहिला आहे त्याप्रमा-णेंच या यज्ञाची पुनः यालोकीं आवृत्ति जर होणार असेल तर ती मला सांगून माझें आश्वासन करा ३८. व्यासः— या लोकांत ज्याचा उपसंहार झाला आहे असा अश्व-मेध यज्ञ देवादिकांमध्यें ज्ञानरूपानें राहील. व तोच पुढें ब्राह्मणांमध्यें प्रकट होईल. कारण तेजानें आहरण केलेलें तेज तेजामध्येंच रहातें, असा नियम आहे ३९. भूमि खणीत असतांना निघालेला कोणी एक काश्यपगोत्री सेनानी नांवाचा औद्भिज्ज योगी ब्राह्मण कलियुगांत अश्वमेधास पुनः परत आणील ४०. त्या युगांत त्याच्याच कुलांत

आहरिष्यति राजेंद्र श्वेतग्रहाभिवीतकः ४१ यथाबल मनुष्याणां कर्तृणां दास्यते फलम् । युगांन्तद्वारसृषिभिः संवृतं विचरिष्यति ४२ तदा प्रभृति हास्यन्ति नृणां प्राणाः पुराकृतीः । न निवर्तिष्यते लोके वृत्तान्ता वर्तनेष्विह ४३ तदा सूक्ष्मो महोदर्को दुस्तरो दानमूलवान् । चातुराश्रम्यशिथिलो धर्मः प्रविचलिष्यति ४४ तदा ह्यल्पेन तपसा सिद्धिं प्राप्स्यन्ति मानवाः । धन्या धर्मं चरिष्यन्ति युगान्ते जनमेजय ४५ [ ६२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

जनमेजय उवाच ॥ आसन्नं विप्रकृष्टं वा यदि कालं न विद्महे । तस्माद्द्वापरसंविद्धं युगान्तं स्पृहयाम्यहम् १ प्राप्ता वयं तु तत्कालमनया धर्मतृष्णया । आदद्यात्परमं धर्मं सुखमल्पेन कर्मणा २ शौनक उवाच ॥ त्रासमुद्वेगकरणं युगान्तं समुपस्थितम् । प्रनष्टधर्मं धर्मज्ञ निमित्तैर्वक्तुमर्हसि ३ सौतिरुवाच ॥ पृष्ट एवं भविष्यस्य गतिं तत्त्वेन चिन्तयन् । युगान्ते सर्वभूतानां भगवानब्रवीत्तदा ४ व्यास उवाच ॥ अरक्षितारो हर्तारो बलिभागस्य पार्थिवाः । युगान्ते प्रभविष्यन्ति स्वरक्षणपरायणाः ५ अक्षत्रियाश्च राजानो विप्राः शूद्रोपजीविनः । शूद्राश्च ब्राह्मणाचारा भविष्यन्ति युगक्षये ६ काण्डे स्पृष्टाः श्रोत्रेयाश्च निष्क्रियाणि हवींष्यथ । एकपंक्त्यामशिष्यन्ति युगान्ते जनमेजय ७ शिल्पवन्तोऽ-

---

उत्पन्न झालेला एक राजेंद्र, प्रलयकाल श्वेतग्रह नांवाच्या उत्पातास जसा आणतो त्याप्रमाणें, राजसूय यज्ञालाही आणील ४१. तो क्रतु कर्त्या मानवांच्या श्रद्धादिरूप बलाप्रमाणें फल देईल. ऋषींनीं झांकून ठेवलेल्या युगांतद्वारांत लोक संचार करतील. युगान्तापासून मानवांचे प्राण ( इंद्रियें ) शिष्टाचाराप्रमाणेंच पूर्णपणें आचरण करणार नाहींत. पूर्वींच्या लोकांचें अनुकरण ते या लोकीं करणार नाहींत ४२, ४३. त्यावेळीं थोडासाही पण महा फळ देणारा, अनेक विघ्नें आल्यामुळें दुस्तर, दानरूपी मूलानें युक्त ( ह्म. दानमूलक ) व चार आश्रमांनीं शिथिल झालेला ( वर्णाश्रम विभागरहित ) असा धर्म चालेल ४४. त्यावेळीं थोड्याशाच तपानें मानव सिद्धीस प्राप्त होतील. आणि हे राजा जनमेजया, कांहीं थोडेसे धन्य लोकच युगांतसमयीं धर्माचरण करतील ४५. इति श्रीमहा. खि० हरि० भविष्य० दुसरा अध्याय समाप्त झाला. ॥ २ ॥

जनमेजयः—ज्याअर्थीं जवळ आलेला अथवा दूर असलेला मोक्षाचा काळ आह्माला कळत नाहीं त्याअर्थीं धर्माधर्म साम्यवान् द्वापरास अधर्माधिक्यानें दूषित करणाऱ्या युगाच्या शेवटच्या कलीचा प्रभाव जाणण्याची मी इच्छा करतों १. अल्प अयासानें महत्फल मिळेल या आशेनें तर आह्मी कलियुगांतील जन्माची इच्छा करून या वेळीं जन्मास आलों आहों. हा काल अल्प कर्मानें सुखकर परम धर्म देईल २. शौनकः—भय व उद्वेग उत्पन्न करणारा कलि प्राप्त झाला आहे. यास्तव, हे धर्मज्ञा, विशेषेंकरून नष्ट झालेला धर्म निमित्तांसह सांगण्यास तूं योग्य आहेस ३. सौतिः—शौनका, याप्रमाणें राजाकडून भाविष्य गति विचारला गेलेला भगवान् बादरायण कलियुगांतील सर्व भूतांच्या अवस्थेचा तत्त्वतः विचार करून असें बोलूं लागला ४. (५) ? कलियुगांमध्यें क्षत्रिय नसलेले लोक राजे होतील. ब्राह्मण शूद्रांवर उपजीविका करूं लागतील व शूद्र ब्राह्मणांच्या आचारांचें अनुष्ठान करतील ६.

नृतपरा नराः मद्यामिषप्रियाः । मित्रभार्या भविष्यन्ति युगान्ते जनमेजय ८ राजवृत्ति-स्थिताश्चौर राजानश्चौरशीलिनः । भृत्याश्चानिर्दिष्टभुजो भविष्यन्ति युगक्षये ९ धनानि श्लाघनीयानि सतां वृत्तमपूजितम् । अकुत्सना च पतिते भविष्यति युगक्षये १० प्रनष्टचेतना मर्त्या मुक्तकेशा विचूलिनः । ऊनषोडशवर्षाश्च प्रजास्यन्ति नराः सदा ११ अट्टशूला जनपदाः शिवशूलाश्चतुष्पथाः । प्रमदाः केशशूलाश्च भविष्यन्ति युगक्षये १२ सर्वे ब्रह्म वदिष्यन्ति सर्वे वाजसनेयिनः । शूद्रा भोवादिनश्चैव भविष्यन्ति युगक्षये १३ तपोयज्ञफलानां च विक्रेतारो द्विजातयः । ऋतवश्च भविष्यन्ति विपरीता युगक्षये १४ शुक्लदंताजिताक्षाश्च मुंडाः काषायवाससः । शूद्रा धर्मं चरिष्यन्ति शाक्यबुद्धोपजीविनः १५ श्वापदप्रचुरत्वं च गवां चैव परिक्षयः । स्वादूनां विनिवृत्तिश्च ज्ञातव्या तुगते युगे १६ अन्त्या मध्ये निवत्स्यन्ति मध्याश्चान्तनिवासिनः । यथानिम्नं प्रजाः सर्वा गमिष्यन्ति युगक्षये १७ तथा द्विहायना दम्यास्तथा पल्वलकर्षकाः । चित्रवर्षी च पर्जन्यो युगे क्षीणे भविष्यति १८ सर्वे

---

बा जनमेजया, सर्व युगांच्या शेवटच्या युगांत ब्राह्मण क्षत्रियांची वृत्ति करूं लागतील. यज्ञक्रिया विधिहीन होतील व सर्व एका पंक्तींत भोजन करतील ७. जनमेजया, युगांतसमयीं नर शिल्पकुशल, मिथ्यापरायण, मद्य व मांस ज्यांना प्रिय आहे असे व भार्याच ज्यांचे मित्र आहेत असे होतील ८. चोर राजव्यवहारांत स्थित होतील. ( ? ) भृत्य न सांगितलेल्या ( न दिलेल्या ) वस्तूंचा उपभोग घेऊं लागतील ९. सर्व प्रकारचीं धनेंच स्तुत्य ( व सर्वांस प्रिय ) होतील. संतांच्या आचरणाचा सत्कार होणार नाहीं व पतित पुरुषाची निंदा होणार नाहीं ( उलट त्याचा मोठा गौरव होईल ) १०. मानवांचा धर्माधर्मस्वरूप बोध सर्वथा नष्ट होईल. विधवा केश मोकळे सोडून आनंदानें वावरतील. मुंडन केलेले सर्व संन्यासीच मानले जातील. सोळा वर्षांच्या पूर्वींच मानवांना संतति होऊं लागेल ११. देश अन्नविक्रय करणारे, चव्हाटे वेदविक्रय करणारे व तरुण स्त्रिया देह विक्रय करणाऱ्या होतील १२. सर्व ब्रह्मवादी होऊन कर्मानुष्ठानाचा त्याग करतील. सर्व वाजसनेयी होतील. ( ह्मणजे इतर शाखांचा लोप झाल्याकारणानें वेदत्रयसाध्य यज्ञ उत्पन्न होईल. सिंध, काठेवाड इत्यादि पश्चिम देशांत हल्लींच ती अवस्था प्राप्त झाली आहे. ) व शूद्र भो हा पूज्यतावाची शब्द परस्पर बोलूं लागतील ( ब्राह्मण व ब्राह्मणेतर यांच्यामध्यें चालू झालेला परस्पर नमस्काराचा प्रकार पाहून असें होणें अशक्य आहे असें कोण ह्मणेल ? ) १३. ब्राह्मण तप व यज्ञ यांच्या फलांचा विक्रय करूं लागतील. ( हें हल्लीं चाललेंच आहे. ) वसंतादि ऋतूही बदलतील ( स्वधर्म सोडतील. ) १४. मांसाशनाचा त्याग केल्यामुळें ज्यांचे दांत शुभ्र आहेत व नेत्र सूक्ष्म झाले आहेत असे मुंडन केलेले, काषायवस्त्रें धारण करणारे आणि शाक्यमत व बुद्धमत यांवर उपजीविका करणारे शूद्र धर्माचरण करूं लागतील १५. हिंस्र प्राण्यांची वृद्धि व गाईंचा संहार होईल व हें युग संपलें असतां उत्तम रसांमध्यें बदल होईल असें जाण १६. अन्त्य जन मध्यभागीं रहातील व मध्यम लोक अन्त्य अवस्थेस पोंचतील. सर्व प्रजांचा अधःपात होईल १७. हें युग क्षीण झालें असतां दोन वर्षांचे पाडे नांगर, गाडा इत्यादि वाहण्यास योग्य होतील. त्याचप्रमाणें ते मस्त होऊन तळीं व नद्या

चोरकुले जाताश्चैव यानाः परस्परम् । स्वल्पेनाढ्या भविष्यन्ति यत्किंचित्प्राप्य दुर्गताः १९ न ते धर्मं करिष्यन्ति मानवा निर्गते युगे । ऊषार्कबहुला भूमिः पंथानस्तस्करावृताः २० सर्वे वाणिज्यकाश्चैव भविष्यन्ति कलौ युगे । पितृदत्तानि देयानि विभजन्ते सुतास्तदा ॥ हरणाय प्रपत्स्यन्ते लोभाद्नृतवादिनः २१ सौकुमार्ये तथा रूपे रत्ने चोपक्षयं गते । भविष्यन्ति युगान्ते च नार्यः केशैरलंकृताः २२ निर्विहारस्य भूतस्य गृहस्थस्य भविष्यति । युगान्ते समनुप्राप्ते नान्या भार्यासमा गतिः २३ कुशीलानार्यभूयिष्ठं वृथारूपसमन्वितम् । पुरुषाल्पं बहुस्त्रीकं तद्युगान्तस्य लक्षणम् २४ बहुयाचनका लोको न दास्यति परस्परम् । अविचार्य गृहीष्यन्ति दानं वर्णान्तरात्तथा २५ राजचौराग्निदण्डार्तो जनः क्षयमुपेष्यति । सस्यनिष्पत्तिरफला तरुणा वृद्धशीलिनः ॥ ईहयासुखिनो लोका भविष्यन्ति युगक्षये २६ वर्षासु वाताः पुरुषा नीचैः शर्करवर्षिणः । संदिग्धः परलोकश्च भविष्यति युगक्षये २७ लोभिनश्च दुराचारा ब्रह्मदूषणतत्पराः । आत्मानं बहुमन्यन्ते मन्युरेवाभ्ययाद्द्विजान् २८ वैश्याचाराश्च राजन्या धनधान्योपजीविनः । युगापक्रमणे सर्वे भविष्यन्ति द्विजातयः २९ अप्रवृत्ताः प्रपत्स्यन्ते समयाः शपथास्तथा । ऋणं सविनयभ्रंशं युगे क्षीणे भविष्यति ३० भविष्यत्यफलो हर्षः

---

यांचें कांठ शिंगांनीं उकरूं लागतील ( अर्थात् दोन वर्षांतच ते मदोन्मत्त होतील ) आणि पर्जन्य चमत्कारिक रीतीनें वर्षाव करूं लागेल १८. चोरांच्या कुळांत झालेले सर्व परस्परांस लुटतील. थोड्याशा संपत्तीनें संपन्न होतील. पण स्वल्पशा संकटानेंही भिकारी बनतील १९. ते मानवधर्म करणार नाहींत. भूमि क्षारमृत्तिकायुक्त व त्यामुळेंच स्वेद बहुल होईल. ( तिच्यामध्यें पेरलेलें बीज नष्ट होईल ). सर्व मार्ग चोरांनीं भरून रहातील २०. कलियुगांत सर्व वाणिज्य करणारे होतील. पित्यानें द्यावयाचें कर्ज पुत्र बुडवितील. ( अथवा शास्त्रतः पितृदेय असलेल्या अलंकारादिकांचीही वाटणी करतील. ) लोभानें असत्य भाषण करणारे पुरुष दुसऱ्याचें धन हरण करण्याचा प्रयत्न करतील २१. कलियुगांत सौकुमार्य, रूप व रत्नें यांचा क्षय झाला असतां स्त्रिया आपल्या केशांनींच अलंकृत होतील २२. पुष्पमाळा, चंदन, दिव्य शय्या इत्यादि भोगसामग्री नाहींशी झाल्याकारणानें भूतप्रमाणें दिसणाऱ्या गृहस्थाच्या भोगाची गति भार्येवाचून अन्य कांहीं रहाणार नाहीं २३. कुशील व अनार्य ज्यांत फार आहेत आणि वृथारूपयुक्त थोडे पुरुष व पुष्कळ स्त्रिया ज्यांत आहेत तें कलियुग असें त्या युगान्ताचें लक्षण आहे २४. सर्व लोक पुष्कळ याचना करणारे होतील. पण ते एकमेकांस देणार नाहींत. पण कांहीं विचार न करितां अन्य वर्णाच्या लोकांपासून ते दान घेतील २५. ( ? ) चोर, अग्नि व दंड यांच्या योगानें पीडलेली प्रजा क्षय पावेल. शेती निष्फळ होईल. तरुण वृद्धांच्या शीलाचे होतील. युगक्षयप्रसंगीं लोक तृष्णेनें असुखी होतील २६. वर्षर्तूंत वायू कठोरपणें वाहतील. ते हळू हळू वाहत असतांनाही बारिक खड्यांचा वर्षाव करतील. त्यावेळीं परलोक संदिग्ध होईल २७. ब्राह्मण लोभी, दुराचार व वेदांस दूषित करण्यास तत्पर होतील. आपल्याला श्रेष्ठ मानूं लागतील व त्यांना क्रोध लवकर येईल २८. क्षत्रिय वैश्यांचा आचार करूं लागतील. ते धनधान्यावर उपजीविका करतील. सारांश युगांतीं असा धर्म मर्यादाभंग झाला असतां सर्व द्विजांची अशी दुरवस्था होईल. सांकेतिक धर्म व शपथा व्यर्थ होतील. ( दिव्य करणारावर कांहीं परिणाम

क्रोधश्च सफलो नृणाम् । अजाश्चैवोपरोत्स्यन्ते पयसोऽर्थे युगक्षये ३१ अशास्त्रविदुषां पुंसामेवमेव स्वभावतः । अप्रमाणं वदिष्यन्ति नीतिं पण्डितमानिनः ३२ शास्त्रोक्तस्याप्रवक्तारो भविष्यन्ति युगक्षये । सर्वे सर्वं हि जानन्ति वृद्धाननुपसेव्य वै ३३ न कश्चिदकविर्नाम युगान्ते समुपस्थिते । न क्षत्राणि नियोक्ष्यन्ति विकर्मस्था द्विजातयः ॥ चौरप्रायाश्च राजानो युगान्ते पर्युपस्थिते ३४ कुण्डावृषा नैकृतिकाः सुरापा ब्रह्मवादिनः । अश्वमेधेन यक्ष्यन्ति युगान्ते जनमेजय ३५ अयाज्यान्याजयिष्यन्ति तथाभक्ष्यस्य भक्षिणः । ब्राह्मणा धनतृष्णार्ता युगान्ते समुपस्थिते ३६ भोशब्दमभिधास्यन्ति न च कश्चित्पठिष्यति । एकशंखास्तथा नार्यो गवेधुकपिनद्धकाः ३७ नक्षत्राणि विवर्णानि विपरीता दिशस्तथा । सन्ध्यारागोऽथ दिग्दाहो भविष्यत्यवरे युगे ३८ पितॄन्पुत्रा नियोक्ष्यन्ति वध्वः श्वश्रूश्च कर्मसु । वियोनिषु चरिष्यन्ति प्रमदासु नरास्तदा ३९ वाक्शरैस्तर्जयिष्यन्ति गुरूञ्शिष्यास्तथैव च । मुखेषु च प्रयोक्ष्यन्ति प्रमत्ताश्च नरास्तदा ४० अकृताग्राणि भोक्ष्यन्ति नराश्चैवाग्निहोत्रिणः । भिक्षां बलिमदत्त्वा च भोक्ष्यन्ति पुरुषाः स्वयम् ४१ पतीन्सुप्तान्वञ्चयित्वा गमिष्यन्ति स्त्रियोऽन्यतः । पुरुषाश्च प्रसुप्तासु भार्यासु च परस्त्रियम् ४२ नाव्याधितो नाप्यरुजो जनः

---

होणार नाहीं. ) उत्तम उत्तम लोकही कलियुगांत सावकाराचें ऋण बुडवितील मग नीचांविषयीं काय सांगावें. ? मानवांचा हर्ष निष्फल व क्रोध मात्र सफल होईल. त्या युगांत दुधाकरितां बकऱ्या पाळतील ३१. शास्त्रांस न जाणणाऱ्या पुरुषांचें स्वभावतः असेंच वर्तन होईल. आपणाला पंडित समजणारे लोक नीतीचीं प्रमाणरहित तत्त्वें सांगतील ३२. शास्त्रोक्त तत्त्व कोणीही सांगणार नाहींत. आचार्यादि वृद्धांचें सेवन केल्यावांचून सर्व सर्व कांहीं जाणतील ३३. युगान्तसमय प्राप्त झाला असतां अकवि (अथवा अग्रंथकार ) कोणीही असणार नाहीं ( ह्मणजे सर्वच कवि व सर्वच ग्रंथकार होतील ) विरुद्ध कर्मांचें आचरण करणारे ब्राह्मण क्षत्रियांस धर्मांत नियुक्त करणार नाहींत. युगान्त आला कीं, ( ? ) ३४. बा जनमेजया, कलि लागला ह्मणजे कुंडावृष, ( पति जिवंत असतांना जारापासून उत्पन्न झालेल्या कन्येच्या ठायीं रेतःसेक करणारे ) नैकृतिक ( अधिकार नसतांना यज्ञादि करणारे ), सुरा पान करणारे, मिथ्या वेदवादी होणारे ब्राह्मण अश्वमेध यज्ञ करतील ३५. धनलोभानें व्याकुळ झालेले ब्राह्मण कलीच्या प्रभावानें जे अयाज्य आहेत त्यांच्याकडून यजन करवितील व स्वतः मांसादि अभक्ष्य पदार्थांचें भक्षण करतील ३६. अयोग्यांनाही भोशब्दपूर्वक मोठा मान मिळेल. वेदाचें अध्ययन कोणीही करणार नाहीं. स्त्रिया शंख, गवेधुक नांवाचें धान्य, गुंजा इत्यादिकांनीं आपल्या शरीरास भूषित करतील ३७. नक्षत्रें निस्तेज होतील. दिशा अप्रसन्न होतील. त्या हीन युगांत संध्यासमय रागरहित होईल व दिशांचा दाह होऊं लागेल ३८. पुत्र आईबापांस कामाला लावतील. सुना सास्वांना कामें सांगतील आणि त्यावेळीं पुरुष जातिशून्य तरुण स्त्रियांशीं समागम करतील ३९. त्याचप्रमाणें शिष्य गुरूंना वाक्शरांनीं पीडतील. अति मत्त लोक मुखांमध्यें मैथुनादि प्रयोग करतील ४०. ज्यांतील चतुर्ग्रासप्रमाण धान्य अग्नीस समर्पण केलेलें नाहीं असें अन्न अग्निहोत्री भक्षण करतील. ( ह्म. अग्नींत आहुत्या टाकल्यास तेवढेंच अन्न कमी होईल अशा भावनेनें आहुत्या न देतांच भोजन करतील. ) अतिथींस भिक्षा व चांडाल—वायसादिकांस बलि न समर्पण करतां पुरुष स्वतः जेवतील ४१.

सर्वोऽभ्यसूयकः । न कृतेप्रतिकर्ता च काले क्षीणे भविष्यति ४३ [ १०६ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

जनमेजय उवाच ॥ एवं विलुलिते लोके मनुष्याः केन पालिताः । निवत्स्यन्ति किमाचाराः किमाहारविहारिणः १ किंकर्माणः किमीहन्तः किंप्रमाणाः किमायुषः । कां च काष्ठां समासाद्य प्रपत्स्यन्ति कृतं युगम् २ व्यास उवाच ॥ अत ऊर्ध्वं च्युते धर्मे गुणहीनाः प्रजास्ततः । शीलव्यसनमासाद्य प्राप्स्यन्ते ह्रासमायुषः ३ आयुर्हान्या बलग्लानिर्बलग्लान्या विवर्णता । वैवर्ण्याद्व्याधिसंपीडा निर्वेदो व्याधिपीडनात् ४ निर्वेदादात्मसंबोधः संबोधाद्धर्मशीलता । एवं गत्वापरां काष्ठां प्रपत्स्यति कृतं युगम् ५ उद्देशतो धर्मशीलाः केचिन्मध्यस्थतां गताः । विमर्शशीलाः केचित्तु हेतुवादकुतूहलाः ६ प्रत्यक्षमनुमानं च प्रमाणं चेति निश्चिताः । प्रमाणैकं करिष्यन्ति नेति पण्डितमानिनः ७ अप्रमाणं करिष्यन्ति वेदोक्तमपरे जनाः । तदासुखभगाश्चैव भविष्यन्ति स्त्रियोऽपराः ८ नास्तिक्यपरमाश्चापि केचिद्धर्मविलोपकाः । भविष्यन्ति नरा मूढा मन्दाः पण्डितमानिनः ९ तदात्वमात्रश्रद्धेयाः शास्त्रज्ञानबहिष्कृताः । दांभिकास्ते भविष्यन्ति वादशीलकुतूहलाः १० तदा विचलिते धर्मे जनाः शेष-

---

निजलेल्या पतींस फसवून स्त्रिया अन्यतः जातील व पुरुषही भार्या निजल्या कीं, परस्त्रीसमागम करतील ४२. सर्वांच्या गुणांमध्यें दोषदृष्टि ठेवणारा कोणताही पुरुष काळ क्षीण झाला असतां व्याधिरहित व मनःपीडाशून्य रहाणार नाहीं व कोणी पीडा दिल्यास तिचा प्रतिकार करावयासही तो समर्थ होणार नाहीं ४३. इति श्रीमहा. खिल. हरि. भविष्यपर्वाचा तिसरा अध्याय समाप्त झाला. ॥ ३ ॥

जनमेजयः— याप्रमाणें सर्व लोक कलुषित केले गेले असतां मानव कोणाकडून पाळले जाऊन रहातील ? त्यांचा आचार, आहार व विहार कसा काय असेल ? १. ते कोणतीं कर्मे करतील ? कशाची इच्छा करतील ? त्यांचें देहप्रमाण व आयुःप्रमाण काय असेल ? कोणत्या पराकाष्ठेस पोंचल्यावर ते पुनः कृतयुगास प्राप्त होतील २. व्यासः—त्यानंतर धर्म च्युत झाला असतां गुणहीन प्रजा शीलभ्रष्ट होईल व त्याकारणानें लोकांच्या आयुष्याचा ऱ्हास होईल ३. आयुष्य क्षीण झालें कीं, बलाला ग्लानि येईल. बलाच्या ग्लानीनें निस्तेजस्ता वाढेल. निस्तेजस्त्वामुळें व्याधींची पीडा होईल. आणि व्याधिपीडेमुळें देहादिकांविषयीं विरक्ति येईल ४. वैराग्यामुळें आत्म्याचें स्वरूप कळेल. आत्मज्ञानामुळें धर्मशीलता बाणेल आणि याप्रमाणें पराकाष्ठेस पोंचल्यावर कृतयुग प्राप्त होईल. कलियुगांत कित्येक लेशतः धर्मशील असतात, कित्येक मध्यस्थतेस प्राप्त होतात, कित्येक विवेकशील बनतात आणि कित्येक हेतुवादाविषयींच कौतुक मानणारे असतात ५,६. त्यांतील वैशेषिक व बौद्ध प्रत्यक्ष व अनुमान अशीं दोनच प्रमाणें मानतात. कित्येक पंडितंमन्य चार्वाक प्रत्यक्ष हेंच एक प्रमाण आहे; दुसरें कोणतेंही नाहीं, असें समजतात ७. दुसरे कित्येक लोक वेदोक्त सिद्धान्तास अप्रमाण करितात. ( अशी दुरवस्था प्राप्त होईल. ) दुसऱ्या स्त्रिया त्यावेळीं सुख हेंच ज्यांचें भग आहे अशा होतील ८. त्याचप्रमाणें कित्येक पंडितमानी, मंद, मूढ नर नास्तिक्याचा आश्रय करून धर्मलोप करणारे निपजतील ९. ते प्रत्यक्षफल देणाऱ्या गोष्टींवरच विश्वास ठेवतील. त्यांना वैदिकशास्त्रांचा परिचय मुळींच असणार नाहीं. वावदूकशीलाचीच ज्यांना मोठी हौस

पुरस्कृताः । शुभान्येवाचरिष्यन्ति दानसत्यसमन्विताः ११ सर्वभक्षो ह्यसंगुप्तो निर्गुणो निरपत्रपः । भविष्यति तदा लोकस्तत्कषायस्य लक्षणम् १२ विप्राणां शाश्वतीं वृत्तिं यदा वर्णावरा जनाः । प्रतिपत्स्यन्ति वृत्त्यर्थं तत्कषायस्यलक्षणम् १३ कषायोपप्लवे लोके ज्ञानविद्याप्रणाशने । सिद्धिं स्वल्पेन कालेन यास्यन्ति निरुपस्कृताः १४ महायुद्धं महानादं महावर्षं महाभयम् । भविष्यति युगे क्षीणे तत्कषायस्य लक्षणम् १५ विप्ररूपाणि रक्षांसि राजानः कर्णवेदिनः । पृथिवीमुपभोक्ष्यन्ति युगांतेसमुपस्थिते १६ निःस्वाध्यायवषट्कारा अनेयाश्चाभिमानिनः । विप्राः क्रव्यादरूपेण सर्वभक्षा वृथाव्रताः १७ मूर्खाः स्वार्थपरा लुब्धाः क्षुद्राः क्षुद्रपरिच्छदाः । व्यवहारोपवृत्ताश्च च्युता धर्माच्च शाश्वतात् १८ हर्तारः पररत्नानां परदारापहारकाः । कामात्मानो दुरात्मानः सोपधाः प्रियसाहसाः १९ तेषु प्रभवमानेषु तुल्यशीलेषु सर्वतः । अभाविनो भविष्यन्ति मुनयो बहुरूपिणः २० उत्पन्ना ये कृतयुगे प्रधानपुरुषाश्रयाः । कथायोगेन तान्सर्वान्पूजयिष्यन्ति मानवाः २१ सस्यचौरा भविष्यन्ति तथा चैलापहारिणः । भक्ष्यभोज्यापहाराश्च करण्डानां च हारिणः २२ चौराश्चौरस्य हर्तारो हन्ताहर्तुर्भविष्यति । चौरैश्चौरक्षये चापि कृते क्षेमं भविष्यति २३ निःसारे क्षुभिते लोके निष्क्रिये व्यंतरस्थिते । नराः श्रयिष्यन्ति वनं करभारप्रपीडिताः २४ पितॄनाज्ञापयिष्यन्ति

---

आहे असे ते दांभिक बनतील १०. पण राजा जनमेजया, अशा रीतीनें धर्म संचलित झाला असतां अवशिष्ट राहिलेल्या ईशस्मरणादि धर्माचा पुरस्कार करून कांहीं उत्तम जन दान व सत्य यांनीं युक्त होतसाते दया, परोपकार इत्यादि शुभ कर्मांचेंच अनुष्ठान करतील ११. तथापि त्या घोर कलियुगांत प्रायः सर्व लोक सर्वभक्षक, अजितेंद्रिय, निर्गुण, व निर्लज्ज होतील. खरोखर तें मळाचें लक्षण आहे १२. ज्यावेळीं हीन वर्णाचें लोक उपजीविकेकरितां ब्राह्मणांची शाश्वती भिक्षावृत्ति स्वीकारतील त्यावेळीं तें कलिमळाचें चिह्न आहे. असें समजावें १३. सर्व लोक मलानें व्याप्त झाला असतां व तो शास्त्रीय बोध व आत्मदर्शन यांचा करण्यास तयार झाला असतां प्रतिग्रह न करणारे लोक नुस्त्या त्यागानेंच, थोड्या कालानें सिद्धीस प्राप्त होतील १४. युग क्षीण झालें असतां महायुद्ध, मोठा कोलाहल, महावृष्टि व महाभय होईल. तेंच कलिमलाचें लक्षण आहे १५. त्या युगांत राक्षस विप्ररूपानें उत्पन्न होतील. राजे चहाड्या ऐकण्यांत तत्पर होऊन पृथ्वीचा उपभोग घेतील १६. ब्राह्मण स्वाध्याय-वषट्कार रहित, मोठे अभिमानी, त्यामुळेंच कोणाचें हितवचनही न ऐकणारे, सर्व भक्षक व वृथाव्रतें करणारे, असे राक्षसरूपानें निपजतील १७. ते मूर्ख, स्वार्थपरायण, लुब्ध, क्षुद्र, क्षुद्रसामग्रीनें युक्त, भोजन---आच्छादनादि व्यवहारामध्यें तत्पर व आपल्या शाश्वत धर्मापासून च्युत झालेले असे उद्भवतील १८. दुसऱ्यांच्या रत्नांचा अपहार करणारे, कामस्वभाव, परस्त्रियांचे हरण करणारे, दुरात्मे, कपटी व ज्यांना साहस प्रिय आहे असे ते निर्माण होतील १९. समानशीलाचे असे ते सर्व सर्वतः उत्पन्न होऊं लागले असतां बहुरूपी मुनींचा अभाव होईल २०. त्यांतूनही जे थोडेसे परमेश्वराचे भक्त निपजतील ते मानव कृतयुगांत उत्पन्न झालेल्या पुण्यवान् पुरुषांचें कथायोगानें कीर्तन करूनच त्या सर्वांचें पूजन करतील. ( आचरणानें नव्हे. ) २१. लोक धान्याची चोरी करतील. वस्त्रांचा अपहार करतील. भक्ष्य व भोज्य यांचा अपहार करतील. धान्य सांठविण्याची पाट्या, हारे इत्यादि भांडीं पळवितील २२. चोर

पुत्राः कर्माणि सर्वशः । स्नुषा श्वश्रूस्तथाचैव युगान्ते प्रत्युपस्थिते २५ वाक्शरैरर्दयिष्यन्ति गुरूञ्शिष्याः समंततः । यज्ञकर्मण्युपरते रक्षांसि श्वापदानि च २६ कीटमूषकसर्पाश्च धर्षयिष्यन्ति मानवान् । क्षेमं सुभिक्षमारोग्यं सामग्र्यं चापि बंधुषु ॥ उद्देशतो नरश्रेष्ठ भाविष्यंति युगक्षये २७ स्वयं पालाः स्वयं चोरा युद्धसंभारसंभृताः । मण्डले प्रचालिष्यन्ति देशे देशे पृथक् पृथक् २८ स्वदेशेभ्यः परिभ्रष्टा निःसाराः सहबन्धुभिः । नराः सर्वे भविष्यन्ति तदा कालपरिक्षयात् २९ तदा स्कन्धे समाधाय कुमारान्विद्रुता भयात् । कौशिकीं प्रतरिष्यन्ति नराः क्षुद्भयपीडिताः ३० अंगान्वंगान्कलिंगाश्च काश्मीरानथ मेकलान् । ऋषिकान्तगिरिद्रोणीः संश्रयिष्यन्ति मानवाः ३१ कृत्स्नं च हिमवत्पार्श्वं कूलं च लवणांभसः । अरण्येषु च वत्स्यन्ति नरा म्लेच्छगणैः सह ३२ नैव शून्या न चाशून्या भविष्यति वसुन्धरा । गोप्तारश्चाप्यगोप्तारः प्रभविष्यन्ति शस्त्रिणः ३३ मृगैर्मत्स्यैर्विहंगैश्च श्वापदैः सर्पकीटकैः । मधुशाकफलैर्मूलैर्वर्तयिष्यन्ति मानवाः ३४ चीरं पर्णं चबहुलं वल्कलान्यजिनानि च । स्वयं कृतानि वत्स्यन्ति यथा मुनिजनास्तथा ३५ बीजानामाकृतिं निम्नेष्वीहंतः काष्ठशंकुभिः । अजैडकं खरोष्ट्रं च पालयिष्यन्ति यत्नतः ३६ नदीं स्रोतांसि रोत्स्यन्ति तोयार्थे कूलमाश्रिताः । पक्का-

---

चोरांना लुटतील. लुटारू दुसऱ्या लुटारूंनाच लुटतील. आणि अशा रीतीनें चोरांनीं चोरांचा नाश केला असतां लोकांस सुख होईल २३. सर्व मनुष्यवर्ग क्षुब्ध व दरिद्री झाला असतां, संध्यावंदनादि कर्मशून्य झाला असतां व सर्व वर्णांचे लोक सम होऊन राहिले असतां अतिशय पीडलेले लोक वनाचा आश्रय करतील २४. पुत्र पितरांस सर्वप्रकारचें कर्म करण्याविषयीं आज्ञा करतील व युगांतसमय येऊन ठेपला असतां सुना सास्वांना आज्ञा करतील २५. शिष्य गुरूंना वाग्बाणांनीं अतिशय पीडा देतील. यज्ञकर्में बंद पडलीं ह्मणजे राक्षस, श्वापदें, वृश्चिकादि किडे, उंदीर व सर्प मानवांस भयभीत करतील २६. बा नरश्रेष्ठा, युगक्षयप्रसंगीं क्षेम, सुभिक्ष, आरोग्य, व बंधूंचें समग्रत्व क्वचित्च आढळेल २७. निरनिराळया देशांत पृथक् पृथक् लोक स्वतःच पालक व स्वतःच चोर होऊन युद्धसामग्री जमवून सैन्यांसह प्रत्येक राष्ट्रांतून हिंडतील २८. त्यावेळीं कालाचा सर्वतः क्षय झाल्यामुळें स्वदेशांतून सर्वशः भ्रष्ट झालेले सर्व मानव आपल्या आप्तांसह निःसार ( निर्बल ) होतील २९. त्यावेळीं लहान बाळकांना खांद्यावर घेऊन भयानें जीव घेऊन पळणारे व क्षुद्व्याधीनें पीडलेले नर कौशिकी नदीचेंही उल्लंघन करतील ३०. अंग, वंग, कलिंग, काश्मीर व मेकल हे देश आणि ऋषिकान्तपर्वताच्या दऱ्या यांचा आश्रय मानव करतील ३१. किंवा आर्यावर्तांतील जन हिमालयाचा सर्व पार्श्वभाग, क्षारसागराचें सर्व तीर व अरण्यें यांत म्लेच्छगणांसह रहातील ३२. येणेंप्रमाणें पृथ्वी शून्यही नाहीं व अशून्यही नाहीं अशी होईल. शस्त्रवान् लोक तिचे रक्षक व अरक्षकही होतील ३३. मानव पशु, मासे, पक्षी, श्वापदें, सर्प, किडे, मध, भाज्या, फळें व मूळें यांवर निर्वाह करतील ३४. जसे मुनी त्याप्रमाणेंच तेही ( दारिद्र्यामुळें प्रसंगीं ) फाटक्या चिंध्या, झाडांचे टाळे, साली, चामडीं यांना स्वतःच तयार करून नेसतील ३५. पर्वतांच्या दऱ्याखोऱ्यांतून राहून ग्राम्य व आरण्य धान्यांचें स्वरूप जाणण्याची व त्यांस खाण्याची इच्छा करणारे ते लांकडीं मेखांनीं भूमीला उकरूं लागतील. धान्य इतस्ततः नेण्याकरितां बकरे व मेंढे यांचे समूह पाळतील. गांधार, काश्मीर, इत्यादि प्रत्यंत देशांत रहाणारे लोक

ऽव्यवहारेण विपणन्तः परस्परम् ३७ तनूरुहैर्यथा जातैः समूलांतरसंवृतैः । बह्वपत्याः प्रजाहीनाः कुललक्षणवर्जिताः ३८ एवं भविष्यन्ति तदा मनुष्याः कालकारिताः । हीनाद्धीनं तदा धर्मं प्रजाः समनुवर्त्स्यति ३९ आयुस्तत्र च मर्त्यानां परं त्रिंशद्भविष्यति । दुर्बला विषयग्लाना रजसा समभिप्लुताः ४० भविष्यति तदा तेषां रोगैरिन्द्रियसंक्षयः । आयुःप्रक्षयसंबोधाद्विषादः प्रभविष्यति ४१ शुश्रूषवो भविष्यन्ति साधूनां दर्शनेरताः । सत्यं च प्रतिपत्स्यन्ति व्यवहारोपसंक्षयात् ४२ भविष्यन्ति च कामानामलाभाद्धर्मशीलिनः । करिष्यन्ति च संकोचं स्वपक्षक्षयपीडिताः ४३ एवं शुश्रूषणे दाने सत्ये प्राणाभिरक्षणे । चतुष्पादः प्रवृत्तश्च धर्मः श्रेयोभिपत्स्यते ४४ तेषां लब्धानुमानानां गुणेषु परिवर्ततास् । स्वादु किंन्विति विज्ञाय धर्म एवं वदिष्यति ४५ यथा हानिः क्रमात्प्राप्ता तथा वृद्धिः क्रमाद्गता । प्रगृहीते यतो धर्मे प्रपत्स्यति कृतं युगम् ४६ साधुवृत्तं कृतयुगे कषाये हानिरुच्यते । एक एव तु कालः स हीनवर्णो यथा शशी ४७ छन्नो हि तमसा सोमो यथाकलियुगे तथा । पूर्णश्च तमसा हीनो यथाकृतयुगे तथा ४८ अर्थवादः परं ब्रह्म वेदार्थ इति तं विदुः । अनिर्णिक्त-

---

उंट व गाढवेंही मोठ्या यत्नानें पाळतील ३६. नदीतीरांचा आश्रय करणारे ते जलाकरितां नद्यांच्या प्रवाहांस रोध करतील. ( अडवितील ) शिजलेलें अन्न आज एक शेर देऊन उद्यां सव्वाशेर घेणें इत्यादि प्रकारें तें परस्पर पक्वान्नांचा व्यापार करतील ३७. मूलधनासह वृद्धीचा अपहार होत आहे, असें पाहून ते एकमेकांशीं ऐकणाऱ्याच्या अंगांवर कांटा उभा राहील अशा रीतीनें कलह करतील. सारांश, ज्यांना पुष्कळ अपत्यें आहेत अथवा एकही वंशांकुर नाहीं असे ते सर्व कुललक्षणशून्य निपजतील ३८. कालाच्या अधीन असलेले मानव त्यावेळीं असे होतील. त्यावेळीं प्रजा हीनाहून हीन अशा धर्माचें अनुष्ठान करतील ३९. त्या घोर समयीं तीस वर्षें हें मनुष्यांचें सर्वांत अधिक आयुमान होईल. लोक दुर्बल, विषयपराधीन व रजोगुणानें भरलेले असे होतील ४०. त्यावेळीं रोगांनीं त्यांचा इंद्रियक्षय होईल. आयुष्य अतिक्षीण झालें आहे, असें कळल्यामुळें मोठा विषाद उत्पन्न होईल ४१. त्यामुळें विवेकी जन साधूंची शुश्रूषा व दर्शन यांमध्यें रत होतील. व्यवहाराचा बहुधा क्षय झाला आहे असें पाहून सत्याचा अंगीकार करतील ४२. इष्ट मनोरथांचा लाभ न झाल्याकारणानें लोक धर्मशील होतील. आपल्या पक्षाच्या क्षयानें पीडलेले ते दुराचराचा संकोच करतील ४३. याप्रमाणें शुश्रूषा, दान, सत्य व प्राणरक्षण या चार पादांनीं प्रवृत्त झालेला धर्म लोकांचें कल्याण करील ४४. नंतर ज्यांचें कल्याण झालें आहे व त्यामुळें धर्माचरणानें कल्याण होतें व अधर्माचरणानें अकल्याण होतें असें अनुमानानें ज्यांस कळलें आहे असे धर्माधर्म फलामध्यें निमग्न झालेले लोक धर्मामध्यें सुखावह काय आहे याचा विचार करून व तत्त्व जाणून असें बोलतील ४५. जशी क्रमानें हानि झाली तशीच वृद्धिही झाली. यास्तव धर्माचा स्वीकार केला असतां कृतयुग प्राप्त होईल ४६. कृतयुगांत सदाचरण होतें. व कलिमलसमयीं त्याची हानि होते. एकच काल चंद्राप्रमाणें प्रसंगीं हीनवर्ण होतो ४७. जसा चंद्र तमोरूप राहूकडून आच्छादित केला जातो त्याप्रमाणें काल कलियुगांत कलिमलानें आवृत्त होतो. आणि राहुरहित चंद्र जसा परिपूर्ण दिसतो त्याप्रमाणें काल ( व धर्म ) कृतयुगांत परिपूर्ण होतो ४८. परब्रह्म हा सत्यार्थवाद आहे. त्यालाच वेदार्थ असें समजतात. वरून मलिन दिसणारा

मविज्ञाय दायायमिव धार्यते ४९ इष्टवादस्तपोनाम तपो हि स्थावरं कृतम् । गुणैः कर्माभिनिर्वृत्तिर्गुणास्तथ्येन कर्मणा ५० आशीस्तु पुरुषं दृष्ट्वा देशकालानुवर्तिनी । युगे युगे यथाकालमृषिभिः समुदाहृता५१ इह धर्मार्थकामानां देवतानां प्रतिक्रिया । आशिषश्च शुभाः पुण्यास्तथैवायुर्युगे युगे ५२ यथा युगानां परिवर्तनानी चिरंप्रवृत्तानि विधिस्वभावात् । क्षणं न संतिष्ठति जीवलोकः क्षयोदयाभ्यां परिवर्तमानः ५३ [ १५९ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणी चतुर्थोऽध्याय ॥ ४ ॥

सूत उवाच ॥ इत्येवमाश्वासवतो राजानं जनमेजयम् । अतीतानागतं वाक्यमृषेः परिषदा श्रुतम् १ अमृतस्येव संवाहः प्रभाचन्द्रमसो यथा । अतर्पयत तच्छ्रोत्रं महर्षेर्वाङ्मयो रसः २ धर्मकामार्थसंयुक्तं करुणं वीरहर्षणम् । रमणीयं तदाख्यानं कृत्स्नं परिषदा श्रुतम् ३ केचिदश्रूणि मुमुचुः श्रुत्वा दध्युस्तथापरे । इतिहासं तमृषिणा पाणाविव निदर्शितम् ४ सदस्यान्सोऽभ्यनुज्ञाय कृत्वा चापि प्रदक्षिणाम् । पुनर्द्रक्ष्याम इत्युक्त्वा जगाम भगवानृषिः ५ अनुजग्मुस्तदा सर्वे प्रयान्तमृषिसत्तमम् । लोके प्रवदतां श्रेष्ठं ये विशिष्टास्तपो-

---

वडिलार्जित सोन्याचा गोळा, हा सोन्याचा आहे, असें न जाणणारा पुरुष मी दरिद्री आहें, असें जाणतो; पण तोच त्यावरील मल गेला कीं, मी आतां धनवान् झालों आहें, असें समजतो त्याप्रमाणें शास्त्रार्थ विचारानें ब्रह्म प्रत्यगभिन्न आहे, असें ज्ञान होतें व त्यानंतर मी संसारी, सुखी, दुःखी इत्यादि आहें हा भ्रम जातो ४९. वर्णाश्रमयोग्य तपोधर्म हा इष्टवाद आहे. ( स्वर्गादि इष्ट कथन आहे. ) कारण तप हें अनादि व अव्यभिचारी फल देणारें आहे, असा शास्त्रांत निश्चय आहे. देहादि गुणांच्या योगानें कर्मनिष्पत्ति होते व कर्म आणि सत्य यांच्या योगानें देहादि गुण उद्भवतात. ( ह्मणजे कर्मानें मुक्ति नाहीं ) ५०. पुरुषांच्या श्रद्धादिन्यूनाधिक भावाप्रमाणें देशकालानुरूप एकाच कर्मापासून भिन्न भिन्न फलप्राप्ति होते. अर्थात् कर्मफल प्रतियुगीं कालानुरूप मिळणारें आहे, असें ऋषींनीं सांगून ठेवलें आहे ५१. यालोकीं धर्म-अर्थ-कामांच्या व देवतांच्या प्रतिक्रिया, त्याचप्रमाणें शुभ व पुण्यकारक फलप्राप्ति प्रतियुगीं न्यूनाधिक प्रमाणानें होतात ५२. ज्याअर्थीं युगांची परिवर्तनें विधिस्वभावामुळें अनादि कालापासून प्रवृत्त झालीं आहेत त्याअर्थीं हा जीवलोक क्षय व उदय यांच्या योगानें बदलल्यावांचून एक क्षणभरही रहात नाहीं ५३. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वाचा चवथा अध्याय समाप्त झाला. ॥ ४ ॥

सूतः—यांप्रमाणें राजा जनमेजयाचें समाधान करणाऱ्या ऋषीचें भूत-भविष्यत्संबंधीं वाक्य सभेंतील सर्व लोकांनीं ऐकलें १. त्या महर्षीचा तो वाङ्मय रस चंद्राची प्रभा किंवा अमृताचा प्रवाह यांप्रमाणें सभासदांच्या कर्णांस तृप्त करता झाला २. धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांनीं युक्त, करुण, वीरांस हर्ष देणारें व रमणीय असें तें सर्व आख्यान ( भारत ) सभासदांनीं ऐकलें ३. तें ऐकून कित्येकांनीं अश्रू ढाळिले. दुसरे कित्येक मनांत विचार करूं लागले. ऋषीनें तो इतिहास जणुं काय हातावर ठेवल्याप्रमाणें साक्षात् दाखविला ४. नंतर सभासदांची अनुज्ञा घेऊन व त्यांस प्रदक्षिणा करून आणि पुनः तुमचें दर्शन घेऊं असें सांगून तो भगवान् महर्षि निघाला ५. तेव्हां निघालेल्या त्या उत्तम ऋषीच्या मागोमाग ते सर्व लोक निघाले. या लोकच्या

मधर्मज्ञस्तामसौ जनमेजयः २० असतीं वपुष्टमामेतां निर्यातयत मे गृहात्। यया मे चरणौ मूर्ध्नि पातितौ रेणुगुण्ठितौ २१ शौंडीर्यं मे यया भग्नं यशो मानश्च दूषितः। न चैनां द्रष्टुमिच्छामि परिक्लिष्टामिव स्रजम् २२ न स्वादु सोऽश्नाति नरः सुखं स्वपिति वा रहः। अन्वास्ते यः प्रियां भार्यां परेण मृदितामिह २३ एवमुच्चैः प्रभावन्तं क्रुद्धं पारीक्षितं नृपम्। गन्धर्वराजः प्रोवाच विश्वावसुरिदं वचः २४ विश्वावसुरुवाच ॥ त्रियज्ञशतयज्वानं वासवस्त्वां नमृष्यते। अप्सरास्तेन पत्नी ते विहितेयं वपुष्टमा २५ रंभा नामाप्सरा देवी काशिराजसुता सती। सैषा योषिद्वरा राजन् रत्नभूतानुभूयताम् २६ यज्ञे विवरमासाद्य विघ्नमिन्द्रेण ते कृतम्। यज्वा ह्यसि कुरुश्रेष्ठ समृध्या वासवोपमः २७ बिभेत्यभिभवाच्छक्रस्तव क्रतुफलैर्नृप। तस्मादावर्तितश्चैव क्रतुरिन्द्रेण ते विभो २८ मायैषा वासवेनेह प्रयुक्ता विघ्नमिच्छता। क्रतोर्विवरमासाद्य संज्ञप्तं विश्ववाजिनम् २९ रतमिन्द्रेण रंभायां मन्यसे यां वपुष्टमाम्। अथ ते गुरवः शप्तास्त्रियज्ञशतयाजिनः ३० भ्रंशितस्त्वं च विप्राश्च बलादिन्द्रसमादिह। त्वत्तश्चैव सुदुर्धर्षा त्रियज्ञशतयाजिनः ३१ बिभेति हि सदा त्वत्तो ब्राह्मणेभ्योऽपि वासवः। एकेनवै तदुभयं तीर्णं शक्रेण मायया ३२ स एष सुमहातेजा विजिगीषुः पुरंदरः। कथमन्यैरनाचीर्णं नमुदर्शनविक्रमेत् ३३ यथैव हि परा बुद्धिः परो धर्मः परो दमः। यथैव परमे-

---

गृहामध्यें असलेल्या स्त्रियांना अशी आज्ञा करिता झाला २०. "या असाध्वी वपुष्टमेला माझ्या घरांतून घालवून द्या. कारण तिनें माझ्या मस्तकावर धुळीनें भरलेले दोन्ही पाय ठेविले आहेत २१. तिनें माझें सर्व माहात्म्य नाहींसें केलें. यश व मान यांस दूषित केलें. कुस्करून सोडलेल्या पुष्पमाळेप्रमाणें हिला पाहण्याची मी इच्छा करीत नाहीं २२. दुसऱ्यानें मळीन करून सोडलेल्या आपल्या प्रिय भार्येसहवर्तमान जो या लोकीं रहातो त्याला अन्न गोड लागत नाहीं व तो एकांतांत सुखानें निजूं शकत नाहीं २३. याप्रमाणें मोठ्यानें भाषण करणाऱ्या क्रुद्ध पारिक्षित राजाला गंधर्वराज विश्वावसु असें वचन बोलला २४. विश्वावसुः— इंद्राला तीनशें यज्ञ करणारा तूं सहन होत नाहींस. त्यानच ही वपुष्टमा अप्सरा तुझी पत्नी केली २५. रंभानांवाची अप्सराच ही काशिराजाची कन्या व तुझी साध्वी देवी झाली आहे. हे राजन्, ही श्रेष्ठ स्त्री आहे. रत्नभूत अशा हिचा तूं अनुभव घे २६. तुझ्या यज्ञामध्यें न्यूनतारूपी छिद्र आढळतांच इंद्रानें विघ्न केलें. तथापि हे कुरुकुलश्रेष्ठा, तूं यथाशास्त्र यज्ञ केला आहेस. समृद्धीनें इंद्रतुल्य आहेस २७. हे राजन्, तुझ्या यज्ञफलांच्या योगानें आपला पराभव होईल कीं काय झणून इंद्र भीत असतो. हे विभो त्यामुळेंच त्यानें तुझ्या यज्ञांत असें विघ्न आणलें २८. विघ्न करण्याची इच्छा करणाऱ्या देवेंद्रानें मायेचा उपयोग केला. यज्ञिय अश्वाला मारलें आहे हेंच यज्ञांतील छिद्र मिळालें असतां जिला तूं वपुष्टमा झणून समजत आहेस त्या रंभेशीं त्यानें संयोग केला. तुझें तीनशें यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांस तूं शाप दिलास २९,३०. याप्रमाणें तूं व ब्राह्मण असे दोघेही इंद्रतुल्य बलापासून भ्रंश पावला आहां. कारण तीनशें यज्ञ करविणारे ते ऋत्विज तुझ्याहूनही अतिशय असह्य होते. तुझ्याहूनही त्या ब्राह्मणांचें इंद्राला फार भय वाटत होतें. पण त्यानें एकाच कपटप्रयोगानें त्या दोन्ही भयकारणांचें उल्लंघन केलें आहे ३१,३२. असें जर नसतें तर तो महातेजस्वी व विजयेच्छु इंद्र, दुसऱ्या कोणीही कधीं न केलेलें, असें हें नातवाच्या स्त्रीचें अतिक्रमण कसें करता ? ३३.

धनाः ६ याते भगवति व्यासे तदा ब्रह्मर्षिभि सह । ऋत्विजः पार्थिवाश्चैव प्रतिजग्मुर्यथागतम् ७ पन्नगानां सुघोराणां कृत्वातां वैरयातनाम् । जगाम रोषमुत्सृज्य राजा विषनिर्घोरगः ८ होत्राग्निदीप्तशिरसं परित्राय च तक्षकम् । आस्तीकोऽथाश्रमपदं जगाम स महामुनिः ९ राजापि हास्तिनपुरं जगाम स्वजनावृतः । अन्वशासच्च मुदितस्तदा प्रमुदिताः प्रजाः १० कस्यचित्त्वथ कालस्य स राजा जनमेजयः । दीक्षितो वाजिमेधेन विधिवद्भूरिदक्षिणः ११ संज्ञप्तमश्वं तत्रास्य देवी काश्या वपुष्टमा । संविवेशोपगम्याथ विधिदृष्टेन कर्मणा १२ तां तु सर्वानवद्यांगीं चकमे वासवस्तदा । संज्ञप्तमश्वमाविश्य तया मिश्री बभूव सः १३ तस्मिन्विकारे जनिते विदित्वा तत्त्वतश्च तत् । असंज्ञप्तोऽयमश्वस्ते ध्वंसेत्यध्वर्युमब्रवीत् १४ अध्वर्युर्ज्ञानसंपन्नस्तान्द्रिन्द्रस्य विचेष्टितम् । कथयामास राजर्षेः शशाप स पुरंदरम् १५ जनमेजय उवाच ॥ यद्यस्ति मे यज्ञफलं तपो वा रक्षतः प्रजाः । फलेनानेन सर्वेण ब्रवीमि श्रूयतामिदम् १६ अद्य प्रभृति देवेन्द्रमजितेंद्रियमस्थिरम् । क्षत्रिया वाजिमेधेन न यक्ष्यन्तीति शौनक १७ ऋत्विजश्चाब्रवीत्क्रुद्धः स राजा जनमेजयः । दौर्बल्यं भवतामेतद्यदयं धर्षितः क्रतुः १८ विषये मे न वस्तव्यं गच्छध्वं सह बान्धवैः । इत्युक्तास्त्यक्तुर्विप्रास्तं नृपं जातमन्यवः १९ अमर्षादन्वशासच्च पत्नीशालागताः स्त्रियः । राजा पर-

---

वक्त्यांतील श्रेष्ठ असलेल्या त्याच्या मागून श्रेष्ठ तपोधन चालले ६. तेव्हां ब्रह्मर्षीसह भगवान् व्यास गेला असतां ऋत्विज व राजे परत आले ७. सर्प विषोत्सर्ग करून जसा परततो त्याप्रमाणें अतिघोर सर्पांची ती वैरयातना ( वैराची फेड, सूड ) करून राजा रोष सोडून गेला ८. अग्निहोत्रसंबंधी अग्नींनीं ज्याचें मस्तक दीप्त झालें आहे ( जळूं लागलें आहे ) अशा तक्षकाचें रक्षण करून महामुनि आस्तिक आपल्या आश्रमस्थानास गेला ९. राजाही आपल्या परिजनांनीं आवृत होत्साता हास्तिनपुरास गेला व स्वतः आनंदित झालेला तो आनंदित झालेल्या प्रजेचें संरक्षण करूं लागला १०. त्यानंतर कांहीं काल लोटला असतां तो राजा जनमेजय यथाशास्त्र पुष्कळ दक्षिणा देऊन अश्वमेध यज्ञानें दीक्षित झाला. ( म्ह. त्यानें यज्ञदीक्षा घेतली ) ११. त्या यज्ञांत त्याची महाराणी काशिराजकन्या वपुष्टमा मारलेल्या घोड्यापाशीं शास्त्रोक्त कर्मानें जाऊन बसली १२. पण त्यावेळीं सर्व अंगांनीं अनिंद्य असलेल्या तिची इंद्र इच्छा करता झाला. व मारलेल्या घोड्यामध्यें प्रवेश करून तिच्याशीं मिथुनभावानें संगत झाला १३. पण याप्रमाणें त्या घोड्यामध्यें विकार झाला आहे असें तत्त्वतः पाहून राजा ' तूं मर; हा घोडा मेला नाहीं ' असें अध्वर्यूस बोलला १४. तेव्हां ज्ञानसंपन्न अध्वर्यूनें तें इंद्राचें कपटाचरण राजर्षीस सांगितलें. तेव्हां त्यानें इंद्राला असा शाप दिला १५. जनमेजयः— प्रजेचें रक्षण करणाऱ्या माझें जर कांहीं तप किंवा यज्ञफळ असेल तर त्या सर्व फलानें मी काय सांगतों तें ऐका १६. आजपासून क्षत्रिय या अश्वमेध यज्ञानें अजितेंद्रिय व चंचल अशा देवेंद्रास पूजणार नाहींत १७. नंतर हे शौनका, रागावलेला तो राजा जनमेजय ऋत्विजांस म्हणाला, " या यज्ञाचा अशा रीतीनें पराभव केला गेला हें तुमचें दौर्बल्य आहे १८. यास्तव तुम्ही माझ्या देशांत राहूं नका. आपल्या आप्तजनांसह येथून निघून जा. " याप्रमाणें राजाकडून बोलले गेलेले व त्यामुळें रागावलेले विप्र त्या राजास सोडते झाले १९. नंतर क्रोधानें तो परम धर्मज्ञ राजा जनमेजय पत्नीच्या

मधर्मज्ञस्तामसौ जनमेजयः २० अमर्ती वपुष्टमामेतां निर्यातयत मे गृहात् । यया मे चरणौ मूर्ध्नि पातितौ रेणुगुण्ठितौ २१ शौंडीर्यं मे यया भग्नं यशो मानश्च दूषितः । न चैनां द्रष्टुमिच्छामि परिक्लिष्टामिव स्रजम् २२ न स्वादु सोऽश्नाति नरः सुखं स्वपिति वा रहः । अन्वास्ते यः प्रियां भार्यां परेण मृदितामिह २३ एवमुच्चैः प्रभावन्तं क्रुद्धं पारीक्षितं नृपम् । गन्धर्वराजः प्रोवाच विश्वावसुरिदं वचः २४ विश्वावसुरुवाच ॥ त्रियज्ञशतयज्वानं वासवस्त्वां नमृष्यते । अप्सरास्तेन पत्नी ते विहितेयं वपुष्टमा २५ रंभा नामाप्सरा देवी काशिराजसुता सती । सैषा योषिद्वरा राजन् रत्नभूतानुभूयताम् २६ यज्ञे विवरमासाद्य विघ्नमिन्द्रेण ते कृतम् । यज्वा ह्यसि कुरुश्रेष्ठ समृध्या वासवोपमः २७ बिभेत्यभिभवाच्छक्रस्तव क्रतुफलैर्नृप । तस्मादावर्तितश्चैव क्रतुरिन्द्रेण ते विभो २८ मायैषा वासवेनेह प्रयुक्ता विघ्नमिच्छता । क्रतोर्विवरमासाद्य संज्ञप्तं विश्ववाजिनम् २९ रतमिन्द्रेण रंभायां मन्यसे यां वपुष्टमाम् । अथ ते गुरवः शप्तास्त्रियज्ञशतयाजिनः ३० भ्रंशितस्त्वं च विप्राश्च बलादिन्द्रसमादिह । त्वत्तश्चैव सुदुर्धर्षा त्रियज्ञशतयाजिनः ३१ बिभेति हि सदा त्वत्तो ब्राह्मणेभ्योऽपि वासवः । एकेनवै तदुभयं तीर्णं शक्रेण मायया ३२ स एष सुमहातेजा विजिगीषुः पुरंदरः । कथमन्यैरनाचीर्णं नमुदर्शानविक्रमेत् ३३ यथैव हि परा बुद्धिः परो धर्मः परो दमः । यथैव परमे-

---

गृहामध्यें असलेल्या स्त्रियांना अशी आज्ञा करिता झाला २०. "या असाध्वी वपुष्टमेला माझ्या घरांतून घालवून द्या. कारण तिनें माझ्या मस्तकावर धुळीनें भरलेले दोन्ही पाय ठेविले आहेत २१. तिनें माझें सर्व माहात्म्य नाहींसें केलें. यश व मान यांस दूषित केलें. कुस्करून सोडलेल्या पुष्पमाळेप्रमाणें हिला पाहण्याची मी इच्छा करीत नाहीं २२. दुसऱ्यानें मळीन करून सोडलेल्या आपल्या प्रिय भार्येसहवर्तमान जो या लोकीं रहातो त्याला अन्न गोड लागत नाहीं व तो एकांतांत सुखानें निजूं शकत नाहीं २३. याप्रमाणें मोठ्यानें भाषण करणाऱ्या क्रुद्ध पारिक्षित राजाला गंधर्वराज विश्वावसु असें वचन बोलला २४. विश्वावसुः— इंद्राला तीनशें यज्ञ करणारा तूं सहन होत नाहींस. त्यानच ही वपुष्टमा अप्सरा तुझी पत्नी केली २५. रंभानांवाची अप्सराच ही काशिराजाची कन्या व तुझी साध्वी देवी झाली आहे. हे राजन्, ही श्रेष्ठ स्त्री आहे. रत्नभूत अशा हिचा तूं अनुभव घे २६. तुझ्या यज्ञामध्यें न्यूनतारूपी छिद्र आढळतांच इंद्रानें विघ्न केलें. तथापि हे कुरुकुलश्रेष्ठा, तूं यथाशास्त्र यज्ञ केला आहेस. समृद्धीनें इंद्रतुल्य आहेस २७. हे राजन्, तुझ्या यज्ञफलांच्या योगानें आपला पराभव होईल कीं काय ह्मणून इंद्र भीत असतो. हे विभो त्यामुळेंच त्यानें तुझ्या यज्ञांत असें विघ्न आणलें २८. विघ्न करण्याची इच्छा करणाऱ्या देवेंद्रानें मायेचा उपयोग केला. यज्ञिय अश्वाला मारलें आहे हेंच यज्ञांतील छिद्र मिळालें असतां जिला तूं वपुष्टमा ह्मणून समजत आहेस त्या रंभेशीं त्यानें संयोग केला. तुझें तीनशें यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांस तूं शाप दिलास २९, ३०. याप्रमाणें तूं व ब्राह्मण असे दोघेही इंद्रतुल्य बलापासून भ्रंश पावला आहां. कारण तीनशें यज्ञ करविणारे ते ऋत्विज तुझ्याहूनही अतिशय असह्य होते. तुझ्याहूनही त्या ब्राह्मणांचें इंद्राला फार भय वाटत होतें. पण त्यानें एकाच कपटप्रयोगानें त्या दोन्ही भयकारणांचें उल्लंघन केलें आहे ३१, ३२. असें जर नसतें तर तो महातेजस्वी व विजयेच्छु इंद्र, दुसऱ्या कोणीही कधीं न केलेलें, असें हें नातवाच्या स्त्रीचें अतिक्रमण कसें करता ? ३३.

श्वर्यं कीर्तितं हरिवाहने । तथैव त्वयि दुर्धर्षे त्रियज्ञशतयाजिनि ३४ मा वासवं मा च गुरुमात्मानं मा वपुष्टमाम् । गच्छ दोषेण कालो हि सर्वथा दुरतिक्रमः ३५ ऐश्वर्येणाश्वमाविश्य देवेन्द्रेणासि रोषितः । आनुकूल्येन देवस्य वर्तितव्यं सुखार्थिना ३६ दुस्तरं प्रतिकूलं हि प्रतिस्रोत इवांभसः । स्त्रीरत्नमुपभुंक्ष्वेमामपापां विगतज्वरः ३७ अपापास्त्यज्यमाना वै त्यजेयुरपि योषितः । अदुष्टास्तु स्त्रियो राजन् दिव्यास्तु सविशेषतः ३८ भानोः प्रभा शिखा वह्नेर्वेदी होमे तथाहुतिः । परामृष्टाप्यसंसक्ता नापदुष्यन्ति योषितः ३९ आह्या लालयितव्याश्च पूज्याश्च सततं बुधैः । शीलवत्यो नमस्कार्याः पूज्याः श्रिय इव स्त्रियः ४० [ १९९ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

सौतिरुवाच ॥ एवं स विश्वावसुनानुनीतः प्रसादमागम्य वपुष्टमायाः । चकार मिथ्याव्यतिशंकितात्मा शान्तिं परां मानवधर्मदृष्टाम् १ श्रममभिविनिवर्त्य मानसं सः समभिलषज्जनमेजयो यशः स्वम् । विषयमनुशशास धर्मबुद्धिर्मुदितमना रमयन्वपुष्टमां ताम् २ न हि विरमति विप्रपूजनाच्च च विनिवर्तति यज्ञदानशीलात् । न विषयपरिरक्षणाच्च्युतोऽभूच्च च परिगर्हति तां वपुष्टमां च ३ विधिविहितमशक्यमन्यथा हि कर्तुं यदृषिरचिन्त्यतया

---

गरुडामध्यें जशी श्रेष्ठ बुद्धि, श्रेष्ठ धर्म, श्रेष्ठ दम, व परम ऐश्वर्य सांगितलेलें आहे तसेंच तें सर्व दुर्धर्ष व तीनशें यज्ञ करणाऱ्या तुझ्याठायीं आहे ३४. यास्तव बा राजा, इंद्र, गुरु, स्वतः तूं व ही वपुष्टमा यांतील कोणालाही दोष देऊं नकोस. कारण, काल सर्वथा दुर्लंघ्य आहे ३५. आपल्या दैवी ऐश्वर्यानें मृत अश्वामध्यें प्रवेश करून देवेंद्राकडून तूं क्रुद्ध केला गेला आहेस. पण सुखाची इच्छा करणाऱ्या तुला देवाच्या अनुकूलतेनें रहाणेंच योग्य आहे ३६. जलप्रवाहाच्या उलट दिशेस जाणें जसें कठिण त्याप्रमाणें समर्थ पुरुषांच्या प्रतिकूल आचरण करणें दुस्तर होय. यास्तव आतां तूं संतापशून्य होऊन या निष्पाप स्त्रीरत्नाचा उपभोग घे ३७. निष्पाप स्त्रियांचा त्याग केल्यास सर्व स्त्रिया तुझा त्याग करतील, राजन्, स्त्रिया सदां दोषरहित असतात. त्यांतून दिव्य स्त्रिया तर विशेषेंकरून दूषित होत नाहींत ३८. सूर्याची प्रभा, अग्नीची ज्वाला, वेदी, त्याचप्रमाणें होमांतील आहुति या जशा दूषित झाल्या तरी अदूषितच असतात त्याप्रमाणें स्त्रियाही कधीं दूषित होत नाहींत ३९. शहाण्यांना त्या सदां ग्रहण करण्यास योग्य, लालन करण्यास उचित व सदा पूज्य आहेत. लक्ष्मीप्रमाणेंच शीलसंपन्न स्त्रिया नमस्कार करण्यास योग्य व पूज्य असतात ४०. इति श्रीम० खि० हरि० भविष्य पर्वाचा पांचवा अध्याय समाप्त झाला. ॥ ५ ॥

सौतिः– याप्रमाणें विश्वावसूनें सांत्वन केलें असतां निष्कारण दूषितचित्त झालेला राजा जनमेजय वपुष्टमेवर प्रसन्न होऊन मानुषधर्मानें पाहिलेली श्रेष्ठ शांति करिता झाला. ( त्यानें वपुष्टमेचा क्रोध घालविला. ) १. जनमेजय राजा मानसिक श्रमाला निःशेष हटवून आपल्या यशाची इच्छा करूं लागला. ज्याचें मन प्रसन्न झालें आहे असा तो धर्मबुद्धि त्या आपल्या वपुष्टमाप्रियेस रममाण करीत स्वदेशाचें राज्य करूं लागला. २. तो विप्रांचें पूजन सोडून कधीं विरत झाला नाहीं. यज्ञ व दान या शीलापासून निवृत्त झाला नाहीं. देशाच्या सर्व प्रकारच्या रक्षणापासून तो कधीं च्युत झाला नाहीं व त्यादिवसापासून त्यानें वपुष्टमेची निंदाही केली नाहीं ३. ज्याचें तप अचिन्त्य आहे

पुराब्रवीत्सः । इति स नृपतिरात्मवांस्तदासौ तदनुविचिन्त्य बभूव वीतमन्युः ४ इदं महाकाव्यमृषेर्महात्मनः पठन्नृणां पूज्यतमो भवेन्नरः । प्रकृष्टमायुः समवाप्य दुर्लभं लभेत सर्वज्ञफलं च केवलम् ५ शतक्रतोः कल्मषविप्रमोक्षणं पठन्निदं मुच्यति कल्मषान्नरः । तथैव कामान्विविधान्समश्नुते ह्यवाप्तकामश्च चिराय नन्दति ६ यथाहि पुष्पप्रभवं फलं द्रुमाः फलात्प्रजायन्ति पुनश्च शाद्रपाः । तथा महर्षिप्रभवा इमा गिरः प्रवर्धयंतेतमृषिंप्रवर्धिताः ७ पुत्रानपुत्रो लभते सुवर्चसश्च्युतः पुनर्विन्दति चात्मनः स्थितिम् । व्याधिं न चाप्नोति चिरं च बन्धनं क्रियां च पुण्यां लभते गुणान्वितः ८ पतिमभिलभते च सत्सु कन्या श्रवणमुपेत्य शुभा मुनेस्तु वाचः । जनयति च सुतान्गुणैरुपेतान्स्वजनहिते द्विषतां प्रमर्दनं च ९ विजयति वसुधां च राजवृत्तिर्धनमतुलं लभते द्विषज्जयं च । विपुलमपि धनं लभेच्च वैश्यः सुगतिमियाच्छ्रवणाच्च शूद्रजातिः १० पुराणमेतच्चरितं महात्मनामधीत्य बुद्धिं लभते च नैष्ठिकीम् । विहाय दुःखानि विमुक्तसंगः सवीतरागो विचरेद्वसुन्धराम् ११ इत्येतदाख्यानमुदाहृतं मया प्रतिस्मरन्तो द्विजमण्डलेषु । स्थैर्येण धैर्येण पुनः स्मरन्तः सुखं भवन्तोऽनुचरन्तु लोकम् १२ इति चरितमिदं महात्मनामृषिकृतमद्भुतवीर्यकर्मणाम् । कथितमिदं हि समासविस्तरैः किम-

---

ऋषीनें पूर्वी जें सांगितलें होतें तें विधिविलसित बदलतां येणें शक्य नाहीं; असा मागून पुष्कळ विचार करून तो आत्मज्ञ राजा क्रोधरहित झाला ४. महात्म्या व्यासर्षीचें हें महाभारत नांवाचें काव्य जो पढतो तो नर सर्व मानवांत अतिशय पूज्य होतो. त्याला दुर्लभ असलेलेंही उत्कृष्ट दीर्घ आयुष्य प्राप्त होतें, व केवळ सर्वज्ञ फल मिळतें ५. इंद्राचें हें पापापासून पूर्णपणें सुटणें जो नर पढतो तो सर्व पापांतून मुक्त होतो. त्याचप्रमाणें तो नानाप्रकारचे विषयभोग भोगतो. आणि ज्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत असा तो दीर्घ काल आनंद भोगतो ६. ज्याप्रमाणें वृक्ष पुष्पापासून उत्पन्न होणाऱ्या फलाला वाढवितात व फलापासून वृक्ष पुनः उत्पन्न होतात; त्याप्रमाणें महर्षि—व्यासापासून उद्भवलेल्या या वाणी पठन पाठनाच्या योगानें स्वतः अतिशय वृद्धि पावून त्या ऋषीला वाढवितात ( ह्म० त्यांचें पठन करणारे प्रति व्यास बनतात ) ७. याच्या पठनानें जो अपुत्र असतो त्याला पुत्र होतो. उत्तम तेजापासून च्युत झालेला पुरुष पुनः आपल्या पूर्व स्थितीस प्राप्त होतो. त्याला व्याधि व दीर्घबंधन यांचा अनुभव घ्यावा लागत नाहीं आणि त्या गुणयुक्ताला पुण्य क्रिया प्राप्त होते ८. मुनीच्या या शुभ वाणी ऐकून कन्या सज्जनांतील उत्तम पतीस प्राप्त होते. गुणयुक्त पुत्रांस जन्म देते. ती स्वजनांचें हित व शत्रूंचें मर्दन करूं शकते ९. क्षत्रवृत्ति पुरुष पृथ्वीला जिंकतो. अतुल धन संपादन करतो. व शत्रुविजय संपादितो. याच्या श्रवणानें वैश्याला विपुल धनही मिळतें व शूद्रजातीच्या पुरुषास उत्तम गति मिळते १०. महात्म्यांच्या या जुन्या चरित्राचें अध्ययन केल्यानें पुरुषास नैष्ठिक बुद्धि प्राप्त होते. तो दुःखांचा त्याग करून व संगरहित होऊन विरक्त मनानें पृथ्वीवर संचार करतो ११. हें मी कथन केलेलें आख्यान ब्राह्मणमंडळांत पाठ ह्मणणारे, स्थैर्य व धैर्य यांच्या योगानें पुनः याचें स्मरण करणारे व त्यामुळें सुख भोगणारे लोक या सृष्टींत आनंदानें संचार करोत १२. अद्भुतवीर्ययुक्त कर्में करणाऱ्या महात्म्याचें हें ऋषिकृत चरित्र मी तुला संक्षेपतः व विस्तारपूर्वक सांगितलें. आतां आणखी काय इच्छा आहे ? मी तुला आणखी काय

परमिच्छसि किं ब्रवीमि ते १३ [ २१२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि भविष्यांतग्रंथार्थप्रकाशो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

जनमेजय उवाच ॥ प्रभावं पद्मनाभस्य स्वपतः सागरांभसि । पुष्करे वैयथोद्भूता देवाः सर्षिगणाः पुरा १ एतदाख्याहि निखिलं योगं योगविदांपते । शृण्वतस्तस्य मे कीर्तिं न तृप्तिरभिजायते २ कियन्तं चैव कालं वै शयिता पुरुषोत्तमः । किमर्थं शयते कालं तस्य कालस्य संभवः ३ कियता चैव कालेन प्रबुध्यति सुराधिपः । कथमुत्थाय भगवान्सृजन्निखिलं जगत् ४ के प्रजापतयस्तात आसन्पूर्वं महामुने । कथं निर्मितवांश्चैव चित्रं लोकं सनातनः ५ एकार्णवे लोके नष्टे स्थावरजंगमे । नष्टे देवासुरगणे प्रनष्टोरगराक्षसे ६ नष्टानलानिले लोके नष्टाकाशमहीतले । केवलं गह्वरी भूते महाभूतविपर्यये ७ प्रभुर्महाभूतपतिर्महातेजा महामतिः । आस्ते सुरगुरुश्रेष्ठो विधिमादाय कां मुने ८ तन्मे त्वमुपपन्नाय ब्रह्मन्नेतदसंशयम् । वक्तुमर्हसि धर्मिष्ठ यशो नारायणात्मकम् ९ प्रादुर्भावं पुरस्कृत्य भूतं भव्यं महात्मनः ।

---

सांगूं ? १३. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वातील भविष्यान्त ग्रंथार्थ—प्रकाश—नामक सहावा अध्याय समाप्त झाला. ॥ ६ ॥

जनमेजयः—सागरजलांत शयन करणाऱ्या पद्मनाभाचा प्रभाव व पूर्वी कमलांत ऋषिगणांसह देव कसे उत्पन्न झाले तें हे योगवेत्त्यांतील श्रेष्ठा, मला सांग. ( या श्लोकाचा परमार्थदृष्ट्या अर्थ— सागरजलांत शयन करणारा ह्मणजे अनंत व अपार शुद्ध ब्रह्माच्या आश्रयानें रहाणारा व पद्मनाभ ह्मणजे सर्व कार्य प्रपंचरूप पद्म ज्याच्या नाभींत आहे असा मायोपाधि ईश्वर अशा ईश्वराचा प्रभाव ह्मणजे उत्पत्ति—स्थिति—लय, सामर्थ्य किती व कसें आहे ? तें सांग ? हा मुख्य प्रश्न व पुष्करांत ह्मणजे ब्रह्मांडांत किंवा अव्याकृत आकाशांत देवर्षी अथवा इंद्रियप्राण कसे उत्पन्न झाले हा दुसरा प्रश्न आहे. ) त्याचप्रमाणें मला ईशज्ञानाचा उपाय सांग. कारण त्या नारायणाची कीर्ति ऐकत असतांना माझ्या मनाची तृप्ति होत नाहीं १,२. तो पुरुषोत्तम सृष्टीचा पालक या रूपानें किति काल राहून शयन करील ? तो कालाचेंही कारण असतांना कालाच्या स्वाधीन होऊन शयन कां करतो ? ( परिमित कालींच सृष्टि व प्रलय कां करितो ? सृष्टिच सतत कां करीत नाहीं ? ) ३. तो देवाधिप किती कालानें जागा होतो ? ( प्रलयाचा अवधि कितीसा आहे ? ) त्या भगवानानें उठून हें जग कसें निर्माण केलें ? ४. बा महामुने, पूर्वी कोणकोण प्रजापति होते. सदा एकरूप अशा त्यानें या विचित्र सृष्टीला कसें निर्माण केलें ५. याप्रमाणें सर्व लोक एक समुद्रमय झाला असतां, स्थावर व जंगम नष्ट झालें असतां, देवासुरगणांचा लय झाला असतां, उरग व राक्षस यांचा विशेषप्रकारें क्षय झाला असता ६, अग्नीचा व वायूचा लोक नाहींसा झाला असता, आकाश व पृथ्वीतल यांचा बाध झाला असता, सारांस, सर्व शून्यतुल्य झाले असता आकाशादि महाभूतांचा भयंकर विपर्यास झाला असता ७, हे मुने, तो महाभूतांचा स्वामी, महातेजस्वी, महामति व श्रेष्ठ देवगुरु प्रभु कोणत्या नियतीचा आश्रय करून रहातो; तें हे ब्राह्मणा, तुला शरण आलेल्या मला निःसंशय सांग. हे धर्मिष्ठ, नारायणात्मक यश सांगण्यास तूंच योग्य आहेस ८, ९. त्या महात्म्याच्या ज्ञानिदृष्ट्या नित्यसिद्ध व मूढदृष्ट्या उत्पन्न होणाऱ्या प्रादुर्भावास उद्देशून मोठ्या श्रद्धेनें ऐकावयास

श्रद्धानामुपविष्टानां भगवान्वक्तुमर्हसि १० वैशंपायन उवाच ॥ नारायणयशोज्ञाने या भवेद्भवतः स्पृहा । त्वद्वंश्यानघपूतस्य कार्यं कुरु कुलर्षभ ११ शृणुष्वादिपुराणेभ्यो देवताभ्यो यथाश्रुति । ब्राह्मणानां च वदतां श्रुतोऽस्माभिर्महात्मनाम् १२ तथा च तपसा दृष्टो बृहस्पतिसमद्युतिः पाराशर्यस्ततः श्रीमान्गुरुर्द्वैपायनोऽब्रवीत् १३ तत्तेहं संप्रवक्ष्यामि यथाप्रज्ञं यथाश्रुतम् । न विज्ञातुं मया शक्यमृषिमात्रेण भारत १४ कः समुत्सहते ज्ञातुं परं नारायणात्मकम् । विश्वात्मनोऽयं ब्रह्मापि न वेदयति तत्त्वतः १५ श्रुतं मे विश्वदेवानां यद्रहस्यं महर्षिणाम् । तदिदं सर्वदेवानां तत्त्वतस्तत्त्ववादिनाम् १६ तदध्यात्मविदां चिन्त्यं कारणं चैव कर्मिणाम् । अधिदैवं च यद्दैवं तद्दैवमिति संज्ञितम् १७ यद्भूतमाधिभूतं च यत्परं च महर्षिणाम् । यत्सत्यं देवदृष्टं च यत्तद्वेदविदो विदुः १८ यः कर्ता कारको बुद्धिर्मनः क्षेत्रज्ञ एव च । प्रधानं पुरुषः शास्ता एकस्तदभिशब्यते १९ कालः कालं स्वपयति द्रष्टा स्वाधीन एव च । प्राणः पंचविधश्चैव ध्रुवमक्षय एव च २० उच्यते विविधैर्भावैस्तस्यैवानघ तत्परैः । स एव भगवान्सर्वं करोति विकरोति च २१ योऽस्मान्कारयते कर्मतेनाऽस्म व्याकुलीकृताः । यजामहे तमेवेशं तमेवेच्छाम निर्वृताः २२ यो वक्ता यश्च

---

बसलेल्या आह्मांला सांगण्यास आपण समर्थ आहां १०. वैशंपायन:—हे कुरुकुलोत्पन्ना, नारायणाच्या यशाविषयीं जिज्ञासा होणें हें तुमच्या निष्पाप व पवित्र वंशाचें कार्यच आहे ११. यास्तव, आदिपुराणांतून देवतांपासून जसें ऐकलें आहे तसें तें तूं श्रवण कर. वर्णन करणाऱ्या महात्म्या ब्राह्मणांच्या तोंडून आह्मी तें ऐकलें आहे १२. त्याचप्रमाणें मोठ्या तपानेंच ज्याचें दर्शन झालें आहे अशा बृहस्पतितुल्य तेजस्वी पराशरपुत्र गुरु द्वैपायनानें जसें सांगितलें आहे व मी तें जसें ऐकलें आहे तसेंच यथामति तुला सांगतों. हे भरतवंशजा, केवल मंत्रद्रष्टा झाल्यानें तें मला जाणतां येणें शक्य नाहीं १३,१४. कारण ( ईशप्रसादावांचून ) नारायणात्मक परतत्त्व जाणण्यास कोण समर्थ आहे ? त्या विश्वात्म्याचें स्वरूप तत्त्वतः ब्रह्माही जाणत नाहीं १५. पण सर्व आत्मज्ञ देवांचें व कृपेनें शिष्यांस तत्त्व सांगणाऱ्या महर्षींचें रहस्य ह्मणून जें कांहीं आहे तें हेंच नारायणात्मक यश होय १६. तेंच अध्यात्मवेत्त्यांचें चिन्त्य आहे. कर्मठांचें कारण आहे. देवां ( विद्वानां ) चें जें अधिदैव ( ज्ञानाख्य महाभाग्य ) त्याला दैव ( अदृष्ट ) असें ह्मणतात १७. भूतें ज्याच्या आनंदाच्या लेशावर आपली उपजीविका करितात ( ह्मणजे स्वतःला आनंदी समजतात ) तें अनंत अधिभूत, व जें महर्षींचें परम ज्ञेय अबाधित व ज्ञानमात्रस्वरूप तत्त्व त्याला ब्रह्मज्ञ जाणतात १८. जो आकाशादिकांचा कर्ता, हिरण्यगर्भादिकांच्या द्वारां कारक ( क्रियासंपादक ), महत्तत्त्व, अहंकार, केवल साक्षिरूपानें द्रष्टा, ( हें प्रथम प्रश्नाचें उत्तर ) आणि जो स्वतः जडवर्गरूप, जीव व शास्ता तो एकच परमात्मा आहे १९. ( आतां तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर ) तो स्वतः कालात्मा कालाला निजवितो ( ह्म. तो कालाचाही काल आहे. ) त्यामुळेंच तो स्वाधीन आहे. ( आह्मां दैवपराधीन प्राण्याप्रमाणें कालाधीन नाहीं ). ( पांचव्या प्रश्नाचें उत्तर ) तोच स्वतः ध्रुव व अक्षय पंचविध प्राण आहे. हे निष्पाप राजा, जें अविनाशि व ऱ्हासशून्य तत्त्व तोच प्राणादि पंचविध भेदांनीं विकार पावतो. तोच भगवान् आपल्या अचिंत्य मायेनें आपल्याच स्वरूपांत विकार उत्पन्न करून आकाशादि सर्व कार्यं प्रपंच करतो २०,२१. जो आमच्या-

वक्तव्यो यश्चाहं तद्ब्रवीमि वः। इदं शृणुत यच्छ्रेयो यच्चान्यत्परिजल्पथ २३ याः कथाश्चैव वर्तन्ते श्रुतयो वाऽथ गह्वराः। विश्वं विश्वपतिर्देवाः सर्वं नारायणात्मकम् २४ यत्सत्यं यदनृतमादिमं क्षरं वै यच्चूलं भवति मिथश्च यद्भविष्यम्। यत्किंचिच्चरमचराव्ययं त्रिलोके तत्सर्वं पुरुषवरः प्रभुर्वरिष्ठः २५ [ २३७ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पुष्करप्रादुर्भावेसप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

वैशंपायन उवाच ॥ चत्वार्याहुः सहस्राणि वर्षाणां तु कृतं युगम्। तस्य तावच्छती संध्या द्विगुणा जनमेजय १ तत्र धर्मश्चतुष्पादो ह्यधर्मः पादविग्रहः। स्वधर्मनिरताः संतो यजन्ते चैव मानवाः २ स्थिता धर्मपरा विप्रा राजवृत्तेः स्थिता नृपाः। कृष्यामभिरता वैश्याः शूद्राः शुश्रूषवस्तथा ३ सदा सत्यं तपश्चैव धर्मश्चैव विवर्धते। सद्भिराचरितं यच्च क्रियते ख्यायते च यत् ४ एतत्कृतयुगे वृत्तं सर्वेषामेव भारत। प्राणिनां धर्मबुद्धीनामपि चेन्नीचयोनिनाम् ५ त्रीणि वर्षसहस्राणि त्रेतायुगमिहोच्यते। तस्य तावच्छतीसन्ध्या द्विगुणा परिकीर्तिता ६ द्वाभ्यामधर्मः पादाभ्यां त्रिभिर्धर्मो व्यवस्थितः। तत्र सत्यं च सत्वं च कृते

---

कडून बरें वाईट कर्म करवितो त्याच्याकडून आह्मी विधिनिषेधरूप संकटांत पाडले गेलों आहों. यास्तव, आह्मी त्याचेंच यजन करूं व शांतचित्त होऊन त्याचीच इच्छा करूं २२. ( आतां हें सर्व चिन्मात्र आहे असें सांगतात. ) जो वाणीचा प्रवर्तक, वाणीचा विषय व वक्तृत्वाचा अभिमान् बाळगणारा जीव त्याचें तत्त्व मी तुह्मांला सांगतों. मोक्षरूप श्रेय व स्वर्गादि नाना विकल्परूप दुसरें जें कांहीं तुह्मी ह्मणत असतां तें हें सर्व ऐका २३. ज्या सत्यार्थरूप किंवा रहस्यप्रतिपादक कथा विद्वानांमध्यें चालतात त्याही मी तुह्मांला सांगतों. ज्याचें पालन करावयाचें तें हें विश्व, पालक विश्वपति व पालनाचीं साधनें देव हें सर्व नारायणात्मक आहे २४. जें लौकिक सत्य व असत्य, कारण व कार्य, भूत व भविष्य परस्परजनक बीजांकुरादि व तसेंच या त्रिभुवनांत असणारें जें कांहीं चर ( परिणामी ) व अचर ( कूटस्थ ) आहे तें हा सर्व श्रेष्ठ प्रभु पुरुषवर आहे २५. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य पर्वांतील पुष्करप्रादुर्भावाविषयीं सातवा अध्याय समाप्त झाला. ॥ ७ ॥

वैशंपायनः— बा जनमेजया, कृतयुगाचें कालमान चारसहस्र वर्षें सांगितलें आहे. व त्याची पूर्व व उत्तर अशी द्विगुण संध्या तितकींच शंभर वर्षें आहे ( ह्मणजे दोन्ही संध्येचें मिळून आठशें वर्षें हें प्रमाण आहे ) १. त्या युगांत धर्म चतुष्पाद व अधर्म एकपाद ( ह्म. चवथा भाग ) रहातो. त्यामुळें संत मानव स्वधर्मामध्यें निरत होऊन पूजनादि करितात २. त्या युगांत ब्राह्मण धर्मपरायण, क्षत्रिय ( राजे ) राजकार्यांत निमग्न, वैश्य शेतीमध्यें तल्लीन व शूद्र शुश्रूषा करीत राहतात ३. त्या युगांत सत्य, धर्म व तप यांची सदा वृद्धि होत रहाते. सज्जन त्यांचेंच आचरण करितात. तेंच स्वतः करून दुसऱ्यांना उपदेशही त्याचाच करितात ४. हे भारता, कृतयुगामध्यें सर्व नीच योनींत उत्पन्न झालेल्या ( स्त्रीशूद्रादि ) धर्मबुद्धि प्राण्यांचेही असें आचरण होत असे ५. त्रेतायुग तीन सहस्र वर्षें असतें व त्याची संध्या त्याच्या दुप्पट ह्मणजे सहाशें वर्षें असते असें सांगतात ६. त्यावेळीं अधर्म दोन अंशांनीं युक्त होतो व धर्म तीन पादांनीं व्यवस्थित होऊन रहातो. ह्मणजे कृतयुगांत पूर्णपणें प्रवृत्त होणारें सत्य

सर्वं प्रवर्तते ७ त्रेतायां विकृतिं याति वर्णा लौल्येन संयुताः । चातुर्वर्ण्यस्य वैकृत्यायान्ति-
दौर्बल्यमाश्रिताः ८ एष त्रेतायुगविधिर्विहितोदेवनिर्मितः । द्वापरस्यापि या चेष्टा तामपि
श्रोतुमर्हसि ९ द्वापरं द्वे सहस्रं तु वर्षाणां कुरुसत्तम । तस्य तावच्छती संध्या द्विगुणा परि-
कीर्तिता १० तत्राप्यर्थपरा विप्रा ज्ञानिनो रजसा वृताः । शठा नैष्कृतिकाः क्षुद्रा जायन्ते
कुरुपुंगव ११ द्वाभ्यां धर्मः स्थितः पद्भ्यामधर्मस्त्रिभिरुत्थितः । विपर्ययं शनैर्यान्ति कृते ये
धर्मसेतवः १२ ब्राह्मण्यभावा नश्यन्ति तथास्तिक्यं विशीर्यते । व्रतोपवासास्त्यज्यन्ते द्वापरे युग-
पर्यये १३ तथा वर्षसहस्रं तु वर्षाणां द्वे शते तथा । संध्यायाः सह संख्यातं क्रूरं कलियुगं स्मृतम् १४
तत्राधर्मश्चतुष्पादः स्याद्धर्मः पादविग्रहः । कामनिष्ठास्तमश्छन्ना जायन्ते तत्र मानवाः १५
नैवोपवासकृत्कश्चिन्न च साधुर्न सत्यवाक् । आस्तिको ब्रह्मवक्ता वा नरो भवति वै तदा १६
अहंकारगृहीताश्च प्रक्षीणस्नेहबन्धनाः । विप्राः शूद्रसमाचाराः शूद्रास्त्वाचारलक्षणाः १७
दूषकास्त्वाश्रमाणां च वर्णानां चैव संकराः । अगम्येष्वभिरंस्यन्ते वर्तन्त्येवं कलौ युगे १८
एवं द्वादशसाहस्रं तदेकं युगमुच्यते । तदेकसप्ततिगुणं मन्वन्तरमिहोच्यते १९ त्रय्यां चैव न
संदेहो युगान्ते जनमेजय । दिव्यं द्वादशसाहस्रं युगं तु कवयो विदुः ॥ एतत्सहस्रपर्यन्तं
तदहो ब्राह्ममुच्यते २० ततोऽहानि गते तस्मिन्सर्वेषामेव देहिनाम् । शरीरनिर्वृतिं चक्रे रुद्रः

---

व सत्त्व त्रेतायुगांत विकार पावतें. चारी वर्णांचे लोक धर्मफलाच्या इच्छेनें युक्त होतात. त्यामुळें चातुर्वर्ण्य धर्म विकल होतो व लोक दौर्बल्याचा आश्रय करितात ७,८. राजन्, हा देवनिर्मित त्रेतायुगविधि तुला सांगितला. आतां द्वापराची चेष्टा कोणत्या प्रकारची असते तें ऐक ९. हे कुरुश्रेष्ठा, द्वापर दोन सहस्र वर्षें असून त्याची संध्या त्याच्या दुप्पट शंभर वर्षें ह्मणजे चारशें वर्षें सांगितलेली आहे १०. त्यांतही ज्ञानी ब्राह्मण सुद्धां द्रव्यपरायण, रजोगुणानें आवृत, शठ, निर्दय व क्षुद्र निपजतात ११. त्यांत धर्म दोन अंशांनीं स्थित होऊन अधर्म तीन पायांनीं उभा रहातो. कृतयुगांतील धर्ममर्यादा हळू हळू शिथिल होत जातील १२. ब्राह्मण्यभाव नाश पावतील. आस्तिक्य नष्ट होईल. द्वापराच्या शेवटीं कलि-सांकर्य झालें असतां ब्राह्मणादि व्रतोपवासादिकांचा त्याग करतील १३. त्याचप्रमाणें क्रूर कलियुगाचें प्रमाण संध्याकालच्या दोनशें वर्षांसह एकसहस्र वर्षें ( ह्म. एकसहस्र दोनशें वर्षें ) इतकें मोजलेलें आहे १४. त्या युगांत अधर्म चतुष्पाद व धर्म एकांशानें युक्त होईल. त्यावेळचे मानव कामनिष्ठ व तमानें आच्छादित झालेले असे निपजतील १५. त्यावेळीं प्रायः कोणीही नर उपवास करणारा, साधु, सत्यवक्ता, आस्तिक व ब्रह्मवक्ता असणार नाहीं १६. सर्व ब्राह्मण अहंकार पिशाचिकेनें पछाडलेले, ज्यांचीं स्नेहबंधनें अतिशय क्षीण झालीं आहेत असे व शूद्रतुल्य आचार करणारे होतील आणि शूद्र उत्तम लक्षण संपन्न निपजतील १७. ते आश्रमांना दूषित करतील. वर्णांचा संकर करतील व अगम्य स्त्रियांशीं अभिरत होतील. सारांश, कलियुगांत सर्व असें वागतील १८. याप्रमाणें त्या देवांच्या बारा सहस्र वर्षांचें एक देवयुग होतें. त्याचीच एकाहत्तर पट ह्मणजे मन्वंतर होय १९. राजन्, जें जें कार्य तें तें अनित्य या न्यायास अनुसरून वेदांतही स्थावरादि ब्रम्हान्त सृष्टीचें विनाशित्व सांगितलें आहे. त्यामुळें या युगाच्या नाशाविषयीं मुळींच संदेह नाहीं. असो; याप्रमाणें दिव्ययुग बारा सहस्र वर्षांचें होतें, असें ज्ञानी ( मन्वादि ) जाणतात. अशा सहस्रयुगांनीं ब्रह्मदेवाचा दिवस संपतो, असें म्हणतात २०.

संहारबुद्धिमान् २१ देवतानां च सर्वेषां ब्राह्मणानां महीपते । दैत्यानां मानवानां च यक्ष-गन्धर्वरक्षसाम् २२ देवर्षीणां ब्रह्मर्षीणां तथा राजर्षिणामपि । किन्नराणामप्सरसां भुजंगानां तथैव च २३ पर्वतानां नदीनां च पशूनां चैव भारत । तिर्यग्योनिगतानां च सत्त्वानां मृगपक्षिणाम् २४ महाभूतपतिर्देवः पंचभूतानि भूतकृत् । जगत्संहरणार्थाय कुरुते वैशसं महत् २५ भूत्वा सूर्यश्चक्षुषी चाददानो भूत्वा वायुः संहरन्प्राणिजातम् । भूत्वा वह्निर्दह्यते सर्वलोकान्मेघो भूत्वा भूय एवाभ्यवर्षत् २६ [ २६३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भाविष्यपर्वणि पुष्करप्रादुर्भावे प्रश्नोत्तरं नामाष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

वैशंपायन उवाच ॥ भूत्वा नारायणो योगी सप्तमूर्तिर्विभावसुः । गभस्तिभिः प्रदीप्ताभिः संशोषयति सागरान् १ पीत्वार्णवांश्च सर्वान्स नदीकूपांश्च सर्वशः । पर्वतानां च सलिलं सर्वं पीत्वा च रश्मिभिः २ भित्त्वा सहस्रशश्चैव महीं नीत्वा रसातलम् । रसातलजलं कृत्स्नं पिबतेरसमुत्तमम् ३ अप्सु सृजन्क्लेदमन्यद्ददाति प्राणिनां ध्रुवम् । तत्सर्वमरविंदाक्ष आदत्ते पुरुषोत्तमः ४ वायुश्च बलवान्भूत्वा स विधूयाखिलं जगत् । प्राणोदयं सुराणां च वायुना कुरुते हरिः ॥ ततो देवगणानां च सर्वेषामेव देहिनाम् ५ ये चेन्द्रियगणाः सर्वे ये चान्ये च यतोद्भवाः । पूर्यं घ्राणं शरीरं च पृथिवीमाश्रिता गुणाः ६ जिह्वारसश्च क्लेदश्च

---

ब्रह्माचा हा एवढा दिवस संपला असतां तोच परमात्मा संहारबुद्धिमान् रुद्र होऊन सर्व प्राण्यांच्या शरीराचा नाश करतो २१. राजन्, सर्व देव, ब्राह्मण, दैत्य, मानव, यक्ष, गंधर्व, राक्षस, देवर्षी, ब्रह्मर्षी, त्याचप्रमाणें राजर्षी, किन्नर, अप्सरा, भुजंग, पर्वत, नदी, पशू, तिर्यक्-योनीमध्यें पडलेले प्राणी, हरिणें, पक्षी, या सर्वांचें तो महाभूतपति देव, पंचभूतांचा कर्ता जगत्संहाराकरितां मोठें कदन करतो २२-२५. सूर्य होऊन नेत्रांचें ग्रहण करणारा व वायु होऊन प्राणिवर्गाचा उपसंहार करणारा तो स्वतः अग्नि होऊन सर्व लोकांस जाळतो आणि मेघ होऊन पुनः वृष्टि करतो २६. इति श्रीमहा० खि० हरि० भाविष्यपर्वाच्या पुष्करप्रादुर्भावापैकीं प्रश्नोत्तरनामक आठवा अध्याय समाप्त झाला. ॥ ८ ॥

वैशंपायनः—योगी नारायण ( स्वयं शुद्ध चिन्मात्रच राहून ) महत्, अहंकार व पंचतन्मात्र अशा सात मूर्तींनीं युक्त अग्नीसारखा होऊन चैतन्योद्दीपित किरणरूप वृत्तींनीं सागरांस सुकवून सोडतो १. नद्या व दुसरे कुपादि जलाशय यांसह सर्व सागरांस पिऊन आणि पर्वतांतील जल आपल्या किरणांनीं नाहींसें करून ( म्हणजे नदी, कूप सदृश सर्व कामांस व पर्वततुल्य कामादिकांच्या सामर्थ्यांस आत्मप्रवण चित्तपरिणामांनीं नाहींसें करून ) स्थूल-सूक्ष्मशरीररूप पृथ्वीस फोडून ( सर्वथा-विलाप करून ) व तिला रसातळास पोंचवून ( कारण ब्रह्मरूप करून ) त्यांतील सर्व जल ( निष्पापत्वादि संकल्पांत गुणजात ) व उत्तम रस ( मानुषादि आनंदाहून अति उत्कृष्ट आनंद ) यांस सुकवून सोडतो. जलांत ( कारण ब्रम्हामध्यें ) स्थित असलेल्या क्लेदाचें प्राण्यांस अवश्य असलेलें दुसरें कार्य निर्माण करून तो देतो व कमलनयन पुरुषोत्तम त्यांच्या जीवनास अवश्य असलेलें सर्व घेतो. तो हरि बलवान् वायु होऊन व सर्व जगाला हालवून वायूच्या योगानें देवांचे प्राणोदय करतो. त्यानंतर सर्व देवगण व देही यांचें सर्व इंद्रियगण आणि दुसरे शब्दादि विषय त्याच्यापासून उत्पन्न होतात. गंध

संश्रिताः सलिले गुणाः । रूपं चक्षुर्विपाकश्च ज्योतिरेवाश्रिता गुणाः ७ स्पर्शः प्राणश्च चेष्टा च पवनं संश्रिता गुणाः । परमेष्टिनं वरेण्यं च हृषीकेशं समाश्रिताः ८ ततो भगवता तत्र रश्मिभिः परिवारिताः । वायुनाकृष्यमाणाश्च रूपान्योन्यसमाश्रयात् ९ तेषां संघर्षजो-ऽग्निः पावकः शतधा ज्वलन् । अदहन्निखिलाँल्लोकानुग्रः संवर्तकोऽनलः १० सपर्वतांस्तरून्गुल्मॉंल्लतावल्लीस्तृणानि च । विमानानि च दिव्यानि पुराणि विविधानि च ११ आश्रमांश्च तथापुण्यान्दिव्यान्यायतनानि च । यानि चाश्रयणीयानि तानि सर्वाणि सोऽदहत् १२ भस्मीभूतांस्ततः सर्वाँल्लोकाँल्लोकगुरुर्हरिः । भूयो निर्वापयामास जलयुक्तेन कर्मणा १३ सहस्रदृङ्महातेजा भूत्वा कृष्णो महाघनः । दिव्यतोयेन हविषा तर्पयामास मेदिनीम् १४ ततः क्षीरनिकाशेन स्वादुना परमांभसा । शिवेन पुण्येन मही निर्वाणमगमत्परम् १५ तेन सा जलसंछन्ना पयसः सर्वतो धरा । एकार्णवजला भूत्वा सर्वसत्त्वविवर्जिता १६ महाभूतान्यपि चतं प्रविष्टान्यमितौजसम् । नष्टार्कपवनाकाशे सूक्ष्मे जनाविवर्जिते १७ संशोषयित्वा पीत्वा च वसत्येकः सनातनः । पौराणं रूपमास्थाय किमप्यमितबुद्धिमान् १८ एकार्णवजले ह्यासीद्योगी योगमुपागतः । अयुतानां सहस्राणि गतान्येका-

---

नांवाचा गुण, घ्राण-इंद्रिय व शरीर हे पृथ्वीचा आश्रय करून असणारे गुण आहेत. जिह्वा, रस व क्लेद हे गुण जलाच्या आश्रयानें रहातात. रूप, चक्षुरिंद्रिय व पाक हे ज्योतीचा आश्रय करणारे गुण आहेत २-७. स्पर्श, प्राण व चेष्टा हे गुण वायूचे आश्रित आहेत. पण हे सर्व परिणाम सूत्रात्मा, अवश्य उपासना करण्यास योग्य व इंद्रियांचा ईश अशा देवाचा उत्तमप्रकारें आश्रय करून रहातात ८. त्यानंतर अंतर्यामी भगवानानें सूत्रात्म्यामध्यें मिळविलेले आणि सूक्ष्मवृत्तींनीं परिवेष्टित झालेले देव व इंद्रियगण वायु आकर्षण करूं लागला असतां रूपादि विषय एकमेकांचा आश्रय केल्यामुळें एकरूप होतात ९. नंतर त्यांच्या संघर्षामुळें उत्पन्न झालेला अग्नि शेंकडों मार्गांनीं दीप्त होतो. तो उग्रप्रलयाग्नि सर्व लोकांस जाळतो १०. पर्वतांसह वृक्ष, गुल्म, लता, वेली, तृण, दिव्य विमानें, नानाप्रकारचीं पुरें ११, पुण्य आश्रम, दिव्य मंदिरें, आणि त्याचप्रमाणें प्राण्यांना आश्रय करण्यास उचित असलेलीं दुसरीं सर्व ( शरीरादि ) स्थानें त्यानें जाळलीं १२. त्यानंतर भस्मीभूत झालेल्या सर्व लोकांस लोकगुरु हरि जलयुक्त कर्मानें पुनः शांत करता झाला १३. तो सहस्र नेत्र महातेजस्वी कृष्ण महामेघ होऊन दिव्य जलरूपी हवीनें पृथ्वीला तृप्त करता झाला १४. त्या दुधासारख्या मधुर, शुभ व पुण्य परम जलानें पृथ्वी अतिशय शांत झाली १५. त्यामुळें ती पृथ्वी जलानें सर्वतः आच्छादित झाली. एकसमुद्रजलमय होऊन ती सर्व प्राणिशून्य झाली १६. याप्रमाणें ज्यांतील सूर्य वायु व आकाश नष्ट झालें आहे अशा जनवर्जित सूक्ष्म व शुद्ध वस्तूमध्यें स्थित असलेल्या त्या अमित बलाढ्य ईश्वरामध्यें महाभूतें प्रविष्ट होतात १७. वर सांगितल्याप्रकारें सर्वांचा शोष करून ( विषयांमध्यें विभक्त असलेलें ज्ञान आपल्या स्वरूपांत लीन करून ) व त्याचें प्राशन करून ( निर्विशेष ब्रह्मामध्यें त्यांचा पूर्ण लय करून ) आणि वाङ्मनसातीत ( असें आपलें प्राचीन सनातन रूप धरून तो अमित बुद्धिमान् ईश एकटाच रहातो १८. याच न्यायानें मागच्या प्रलयसमयींही सर्व त्रिभुवन जलमय झालें असतां योगास प्राप्त झालेला योगी त्या एकार्णवांतच राहिला होता. तेथें त्याचीं अनेक सहस्र वर्षें गेलीं. त्या अवस्थेंत

र्णवेऽभसि ॥ न चैनं कश्चिदव्यक्तं व्यक्तं वेदितुमर्हति १९ जनमेजय उवाच ॥ एकार्णवविधिः कोऽयं यश्चैव परिकिर्तितः । क एष पुरुषो नाम किंयोगः कश्च योगवान् २० वैशंपायन उवाच ॥ एतावंतमसौ कालमेकार्णवविधिं प्रति । करिष्यतीमं भगवानिति कश्चिन्न बुध्यते २१ न वै माता न च द्रष्टा न ज्ञाता नैव पार्श्वगः । न ततोऽवज्ञायते कश्चिदृते तं देवमुत्तमम् २२ नभः क्षितिं पवनमथप्रकाशयन्प्रजापतिं भुवन पतिं सुरेश्वरम् । पितामहं श्रुतिनिलयं महामुनिं महोदधौः शयनमरोचयत्प्रभुः २३ [ २८६ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पुष्कर प्रादुर्भावेनवमोऽध्यायः ॥ ९ ॥

वैशंपायन उवाच ॥ एवमेकार्णवीभूते शेते लोके महाद्युतिः । प्रच्छाद्य सलिलं सर्वं हरिर्नारायणः प्रभुः १ महतो रजसो मध्ये महार्णवसमस्य वै । विरजस्को महाबाहुरक्षरं ब्रह्म यं विदुः २ आत्मरूपप्रकाशेनतपमासंवृतः प्रभुः । त्रिकमास्थायकालंतुततःसुष्वापसोऽव्ययः ३ पुरुषो यज्ञ इत्येवं यत्परं परिकीर्तितम् । यच्चान्यत्पुरुषाख्यं स्यात्सर्वं तत्पुरुषोत्तमः ४ ये

---

असलेल्या त्या अव्यक्ताला कोणीही व्यक्त ( स्पष्टपणें ) जाणूं शकत नाहीं १९. जनमेजयः— प्रभो, आपण सांगितलेला हा एकार्णवाचा अवधि कशा प्रकारचा आहे ? ( दैनंदिनप्रलयाप्रमाणें या आत्यंतिक प्रलयाचाही कांहीं अवधि आहे कीं नाहीं ? असल्यास कैवल्य आपोआप सिद्ध होईल. मग साधनानुष्ठानाची कांहीं अवश्यकता नाहीं असा याचा भावार्थ ) त्याचप्रमाणें हा पुरुष कोण ? योग कशाला ह्मणतात. व योगवान् ( योगी ) कोण २०. वैशंपायनः— हा भगवान् इतके दिवसच किंवा इतक्या दिवसांनीं एकार्णव करील असा नियम कोणी जाणीत नाहीं. ( यास्तव सत्वर कैवल्य मिळण्याकरितां साधनानुष्ठान अवश्य करावें. शिवाय प्रलयामध्यें बीजभाव नष्ट होत नाहीं. त्यामुळें उत्पत्तिसमयीं पुनः अनर्थांत पडावें लागतें. यास्तव बीजभावाच्या विनाशाकरितांही साधनानुष्ठानाची अवश्यकता आहे. ) त्यावेळीं असणारा एक पुरुष अहंकारशून्य असल्यामुळें प्रमाता नव्हे, द्रष्टा नव्हे, ज्ञाता नव्हे, व तटस्थही नव्हे. त्या अवस्थेंत त्या उत्तम देवावाचून अन्य कोणी कळत नाहीं. ( दुसऱ्या कोणाचा भास होत नाहीं )२१,२२. आकाश, पृथ्वी व वायु यांस प्रकाशित करणारा प्रजापति भुवनपति, सुरेश्वर, पितामह, वेदान्तवेद्य व महा मननशील मुनि असा तो प्रभु प्रलयानंतर महा सागरांत आपलें शयनस्थान करिता झाला. ( सागरांतील शय्या त्याला आवडली. शुद्ध आत्माच उपाधीच्या अभिमानामुळें बद्ध होऊन योगाचा अधिकारी होतो ) २३. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० पुष्करप्रादुर्भावाविषयीं नववा अध्याय समाप्त झाला. ॥ ९ ॥

वैशंपायनः— याप्रमाणें सर्व सृष्टि एकसागरमय झाली असतां महातेजस्वी, हरि, नारायण प्रभु सर्व जलाला आच्छादित करून शयन करतो १. ह्मणजे महासागरासारख्या मोठ्या रजामध्यें, ज्याला अक्षर ब्रह्म ह्मणतात तो रजःशून्य महाबाहु शयन करतो. ( आपल्या स्वाभाविक शांत अवस्थेंत रहातो ) २. असो; ज्ञानी ज्याला परब्रह्म ह्मणून समजतात तो परमात्मा चैतन्याभासरूप मनोरथात्मक तपानें आपल्या स्वरूपास आच्छादित करून घेऊन आणि भूत, वर्तमान व भविष्यत् अशा तीन कालांचा अधिष्ठाता होऊन शयन करतो. ( आपल्या स्वरूपाला विसरतो ) ३. पुरुष, यज्ञ, अशाच दुसऱ्याही पुरुषाच्या संज्ञा ज्या त्याला दिलेल्या

च यज्ञवराः विप्रा ऋत्विजा इति संज्ञिताः । आत्मदेहात्पुरा भूता यज्ञेभ्यः श्रूयतां तदा ५
ब्रह्माणं परमं वक्त्रादुद्गातारं च सामगम् । होतारमथ चाध्वर्युं बाहुभ्यामसृजत्प्रभुः ६
ब्रह्मणो ब्राह्मणच्छंसि प्रस्तोतारं च सर्वशः । तान्मित्रा वरुणं सृष्ट्वा प्रतिष्ठातारमेव च ७
उदरात्प्रतिहर्तारंपोतारं चैव भारत । अध्यापकमथोरूभ्यां नेष्टारं चैव भारत ८ पाणि-
भ्यामथ चाग्नीध्रं सुब्रह्मण्यं च याज्ञियम् । ग्रावाणमथ बाहुभ्यामुन्नेतारं च याज्ञिकम् ९
एवमेव भगवान्षोडशैतान् जगत्पतिः । प्रवक्तॄन्सर्वयज्ञानामृत्विजोऽसृजदुत्तमान् १० तदेष
वै वेदमयः पुरुषो यज्ञसंमितः । वेदाश्च तन्मयाः सर्वे सांगोपनिषदक्रियाः ११ स्वपित्ये-
कार्णवे चैव यदाश्चर्यमभूत्पुरा । श्रूयते तद्यथावृत्तं मार्कण्डेयो यदन्वभूत् १२ जीर्णो
भगवतस्तस्य कुक्षावेव महामुनिः । बहुवर्षसहस्रायुस्तस्यैव वरतेजसा १३ इति तीर्थ-
प्रसंगेन पृथिवीतीर्थगोचरः । आश्रमानपि पुण्यांश्च तीर्थान्यायतनानि च १४ देशान्रा-
ष्ट्राणि चित्राणि पुराणि विविधानि च । जपहोमरतः क्षान्तस्तपो घोरं समाश्रितः १५ मार्कं-
डेयस्ततस्तस्य शनैर्वक्त्राद्विनिःसृतः । निष्क्रामन्तं नचात्मानं जानीते देवमायया १६ निष्क्रा-
न्तस्तस्य वदनादेकार्णवमथो गतः । सर्वतस्तमसाच्छन्नं मार्कण्डेयोऽनिरीक्ष्यत १७ तस्यो-

---

आहेत त्या सर्व हा पुरुषोत्तमच होय. ( चैतन्याचे ठायीं आरोपित असलेलें यांतील कांहीं-एक चैतन्यभिन्न नाहीं ) ४. ऋत्विज या नांवाचे जे यज्ञपरायण असलेले ब्राह्मण तेही पूर्वी या आत्मदेहापासून यज्ञानुष्ठानाकरितां ( केवल विषयभोगाकरितां नव्हे, ) कसे उत्पन्न झाले तें ऐका ५. तो प्रभु श्रेष्ठ ब्रह्मा व सामवेदी उद्गाता आणि होता व अध्वर्यु यांस मुखापासून उत्पन्न करता झाला. त्याचप्रमाणें बाहूपासून ब्राह्मणाच्छंसी, प्रस्तोता, मैत्रावरुण व प्रतिप्रस्थाता यांस उत्पन्न करून. उदरापासून प्रतिहर्ता व पोता; मांड्यापासून अध्यापक अच्छावाक व नेष्टा आणि दोन्ही हातांपासून आग्नीध्र, सुब्रह्मण्य, ग्रावस्तोता व उन्नेता यांस क्रमानें त्यानें उत्पन्न केलें ६-९. याप्रमाणें हा भगवान् जगत्पति सर्व यज्ञांच्या उत्तम सोळा प्रवक्त्या ऋत्विजांस उत्पन्न करता झाला १०. यास्तव हा यज्ञसंमित पुरुष वेदमय आहे. अंगें, उपनिषदें व सर्व क्रिया यांसह सर्व वेद तन्मय आहेत ११. तो प्रभु एकार्णवामध्यें शयन करूं लागला असतां पूर्वी जें आश्चर्य झालें व मार्कंडेयानें ज्याचा अनुभव घेतला त्याचें असें इत्थंभूत वृत्त ऐकूं येतें १२. तो महामुनि त्या भगवानाच्या कुक्षींतच जीर्ण झाला. ( सर्व उपाधींचा त्याग करून लीन झाला. ) त्या भगवानाच्या श्रेष्ठ तेजानें त्याचें आयुष्य अनेक सहस्र वर्षें होतें १३. त्यामुळें पृथ्वींतील सर्व तीर्थांस विषय करणारा ( त्याचें दर्शन घेणारा ) तो तीर्थयात्राप्रसंगानें पुण्य आश्रम, तीर्थें, मंदिरें १४, देश, विचित्र राष्ट्रें व नानाप्रकारचीं पुरें पहाता झाला. तो जप व होम यांमध्यें रत व क्षमावान् होऊन घोर तपाचा आश्रय करून राहिला १५. पुष्कळ दिवस भगवानाच्या कुक्षींत राहून मार्कंडेय हळुच त्याच्या तोंडांतून बाहेर पडला. ( ह्मणजे व्युत्थान संकल्पावाचूनच तो, झोंपेंतून उठल्याप्रमाणें, समाधींतून उठला. ) पण आपण आतां बाहेर पडत आहों हें त्याला देवमायेमुळें कळलें नाहीं १६. त्याच्या मुखांतून बाहेर निघालेलाही तो चिन्मात्रांत प्रवेश करण्याचा प्रयत्न करूं लागला. पण त्याला आवरण-विक्षेप शक्तियुक्त अज्ञानानें आच्छादित झालेला चिन्मात्रात्मा दिसला. (ह्म. तो चित्ताला तत्त्वामध्यें एकाग्र करूं लागला असतां तत्त्व तमानें आच्छादित झाल्यामुळें

त्पन्नं भयं तीव्रं संशयश्चात्मजीविते । देवदर्शनसंहृष्टो विस्मयं चागमत्परम् १८ सांचिन्तयाति मध्यस्थो मार्कंडेयोऽतिशंकितः । किंन्विदं वेदियं चिन्ता मोहः स्वप्नोऽनुभूयते १९ व्यक्तमन्यतमो भावो ह्येतेषां भविता मम । न हीदृशमसंक्लिष्टमयुक्तं सत्यमर्हति २० नष्टचन्द्रार्कपवन च्छन्नपर्वतभूतलः । कतमः स्यादयं लोक इति चिन्ताव्यवस्थितः २१ अपश्यच्चापि पुरुषं शयानं पर्वतोपमम् । तोयाद्व्यमिवजीमूतंमध्येमग्नं महार्णवे २२ तपन्तमिव तेजोभिर्भास्वन्तमिव वर्चसा । जाग्रन्तमिवगांभीर्याच्छ्वसन्तमिवपन्नगम् २३ स देवं प्रष्टुमायाति को भवानिति विस्मयात् । तथैव च शनैर्भूयो मुनिः कुक्षिं प्रवेशितः २४ सम्प्रविष्टः पुनः कुक्षौ मार्कण्डेयः सुनिश्चितः । तथैव चरते भूयोऽविजानन्स्वप्नदर्शनम् २५ स तथैव यथापूर्वं पृथिवीमटते पुनः । पुण्यतीर्थानि पूतानि निरीक्षन्दिवि भूतले २६ क्रतुभिर्यजमानांश्च समाप्तवरदक्षिणैः । पश्यते देवकुक्षिस्थान्यज्ञियाञ्छतशो द्विजान् २७ सद्वृत्तमाश्रिताः सर्वे वर्णा ब्राह्मणपूर्वकाः । चत्वारश्चाश्रमास्सम्यग्यथोद्दिष्टपदानुगाः २८ वर्षाणां शतसाहस्रं मार्कण्डेयो महामुनिः । विचरन् पृथिवीं कृत्स्नां न च कुक्ष्यन्तमीक्षत २९ ततः कदाचिदथ वै पुनर्वक्त्राद्विनिःसृतः । सुप्तं न्यग्रोधशाखायां बालमेकं निरीक्षते ३० यथा चैकार्णवजले

---

त्याचें विक्षेपरूप ऐश्वर्यच पाहता झाला १७. त्याकारणानें त्याला मोठें भय वाटलें. व आपल्या जीविताविषयीं संशय आला. आणि शुद्ध साक्षात्कारामुळें अतिशय संतुष्ट झालेला तो मोठ्या आश्चर्यांत पडला १८. नंतर अतिशय साशंक झालेला तो मुनि मार्कंडेय निर्णयाभावीं मोठ्या बुचकळ्यांत पडून असा विचार करूं लागला.— हें काय बरें आहे ? ज्याचा मी आतां अनुभव घेत आहें तो मनोरथ ( मनोराज्य ) आहे कीं, गारुडाप्रमाणें भ्रम आहे कीं स्वप्न आहे ? १९. खचित यांतील कोणता तरी एक विकार माझ्या मनाला झाला आहे. पण असंग व अविद्यादि क्लेशशून्य असें पारमार्थिक तत्त्व मनोरथादि रूप होणें शक्य नाहीं २०. ज्यांतील चंद्र, सूर्य व वायु नष्ट होऊन पर्वतांसह भूतल आच्छादित झालें आहे असा हा कोणता लोक आहे, अशा चिंतेमध्यें तो निमग्न झाला २१. त्या मार्कंडेयमुनीनें महासागरांत मग्न झालेल्या जलसंपन्न मेघाप्रमाणें त्या निजलेल्या पर्वततुल्य पुरुषासही पाहिलें २२. आपल्या तेजांनीं संतप्त करीत असल्याप्रमाणें, दीप्तीनें प्रकाशित करीत असल्याप्रमाणें, गांभीर्यामुळें जागत असल्याप्रमाणें व श्वास सोडीत असलेल्या भुजंगाप्रमाणें त्यानें त्याला पाहिलें २३, व विस्मयानें 'तुम्ही कोण ?' असें ह्मणून देवास विचारावयास तो त्याच्या पाशीं आला. तो मुनि पुनरपि हळुच त्याच्या कुशींत शिरला २४; पण भगवानाच्या कुशींत शिरलेला तो अति निश्चित मार्कंडेय हें स्वप्नदर्शन आहे, असें न जाणतां पुनः तसाच भटकूं लागला २५. तो पूर्वीप्रमाणेंच पृथ्वीभर फिरत सुटला. भूतळीं व अंतरिक्षांत त्यानें पवित्र पुण्यतीर्थें पाहिलीं २६. उत्तम दक्षिणा देऊन संपविलेल्या यज्ञांनीं परमेश्वराचें पूजन करणाऱ्या देवाच्या कुक्षिस्थ यज्ञिय शेंकडों ब्राह्मणांना पहाता झाला २७. सद्वृत्ताचें आश्रय करून राहिलेले ब्राह्मणादि सर्व वर्णांचे लोक शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें उत्तमप्रकारें वर्तन करणारे चार आश्रम त्याच्या दृष्टीं पडले २८. याप्रमाणें तो मार्कंडेय महामुनि अनेक सहस्रवर्षें नारायणाच्या उदरवर्ति सर्व पृथ्वीभर फिरत राहिला; पण त्याला त्याच्या कुक्षीचा अंत लागला नाहीं २९. त्यानंतर पुनः एकदां तो त्याच्या मुखांतून बाहेर पडला. तों त्याला

निहारेण वृतान्तरे। अव्यक्तभीषणे लोके सर्वभूतविवर्जिते ३१ स भूयो विस्मयाविष्टः कौतूहलसमन्वितः। बालमादित्यसंकाशं न शक्तोऽप्युपसर्पितुम् ३२ सोऽचिन्तयदथैकान्ते स्थित्वा सलिलसंनिधौ। पूर्वदृष्टमिदं नेति शंकितो देवमायया ३३ अगाधे सलिले स्तब्धे मार्कण्डेयः प्लवन्मुनिः। न शान्ति लभते तत्र श्रमात्संत्रस्तविक्लवः ३४ तथैव भगवान्हंसो गतो योगेन बालताम्। बभाषे मेघतुल्येन स्वरेण पुरुषोत्तमः ३५ श्रीभगवानुवाच ॥ मा भैर्वत्स न भेतव्यमिहैवायाहि चान्तिकम्। मार्कण्डेयमुने धीर बालस्त्वं श्रमपीडितः ३६ मार्कंडेय उवाच ॥ को मां नाम्ना कीर्तयते तपः परिभवन्मम। बहुवर्षसहस्राख्युर्धर्षयंश्चैव मे वयः ३७ न ह्येषु समुदाचारो देवेष्वपि समाहितः। मां ब्रह्मापि स विश्वेशो दीर्घायुरिति भाषते ३८ कस्तपोघोरशिरसं मानय त्यक्तजीवितः। मार्कंडेयेति मां प्रोच्य मृत्युमीक्षितुमिच्छति ३९ वैशंपायन उवाच ॥ एवमाभाषते क्रोधान्मार्कण्डेयो महामुनिः। अथैनं भगवान् भूयो बभाषे तत्परायणम् ४० श्रीभगवानुवाच ॥ अहं ते जनको वत्स हृषीकेशः पिता गुरुः। आयुः प्रदाता पौराणः किमर्थं नोपसर्पसे ४१ मां पुत्रकामः प्रथमं पिता तेऽङ्गिरा मुनिः। पूर्वमाराधयामास तपस्तीव्रमुपाश्रितः ४२ ततस्त्वां घोरशिरसं दहनोपमतेजसम्। दत्तवान-

---

वटवृक्षाच्या शाखेवर निजलेला एक बालक दिसला ३०. ज्याचा अंतर्भाग अंधःकारानें व्यापून सोडला आहे अशा एकार्णव जलांतील सर्व भूतरहित अव्यक्त व भयंकर लोकांत जसा तसाच तो त्याला ( त्या वटशाखेवर ) दिसला ३१. तेव्हां तो मुनि पुनः विस्मययुक्त व कौतुकपूर्ण झाला. सूर्यासारख्या त्या तेजस्वी बाळापाशीं जाण्यास तो समर्थ झाला नाहीं ३२. ह्मणून तो जलाजवळ एकांतांत बसून असा विचार करूं लागला. हें मी पूर्वी पाहिलेलें नाहीं असें वाटून मी देवमायेनें शंकित झालों आहे ३३. याप्रमाणें मनांत ह्मणणारा आणि अगाध व स्तब्ध जलांत बुडणारा मार्कंडेय मुनि श्रमानें अति त्रस्त व व्याकुळ झाला. त्याला तेथें शांति मिळेना ३४. तेव्हां आपल्या अघटित घटना करणाऱ्या योगसामर्थ्यानें बालत्वास प्राप्त झालेला भगवान् हंस पुरुषोत्तम मेघासारख्या गंभीर ध्वनीनें असें ह्मणाला ३५. श्रीभगवान्:— वत्सा, भिऊं नको. येथेंच मजपाशीं ये. हे मार्कंडेय मुने, हे धीरा, तूं श्रमानें पीडलेला बालक आहेस ३६. मार्कण्डेयः— माझें आयुष्य अनेक सहस्र वर्षें आहे. पण माझ्या तपाचा पराभव करीत व वयाची अवज्ञा करीत मला नांवानें कोण हाक मारीत आहे ३७. अशा प्रकारचा माझ्या नांवाचा उच्चार देवामध्येंही माझ्या कानीं पडला नाहीं. तो विश्वाचा ईश्वर ब्रह्माही मला दीर्घायु असें म्हणतो ३८. असें असतांना ज्यानें आपल्या जीविताची आशा सोडली आहे असा हा कोण बरें, तपानें ज्याचें मस्तक घोर झालें आहे अशा मला ‘ मार्कंडेया ’ अशी हाक मारून मृत्यूला भेटण्याची इच्छा करीत आहे? ३९. वैशंपायनः— राजन्, मार्कंडेय महामुनि क्रोधानें असें बोलूं लागला असतां इतक्यांत क्रोधपरायण झालेल्या त्याला भगवान् पुनः असें ह्मणाला ४०. श्रीभगवान्:— अरे बाळा, मी तुझा जनक, हृषीकेश, पिता, गुरु, फार जुना व आयुष्य देणारा आहें. असें असतांना मजजवळ कां येत नाहींस? ४१. पूर्वी पुत्राची इच्छा करणारा तुझा पिता अंगिरा मुनि तीव्रतपाचा आश्रय करून प्रथम माझी आराधना करता झाला ४२. तेव्हां मला अतिप्रिय असलेल्या त्या महर्षीला मी घोर मस्तकयुक्त, अग्नीसारखा तेजस्वी व अमित

इमात्मेदं महर्षिममितायुषम् ४३ तत्र नोत्सहते चान्यो यो न भूतो ममात्मकः। द्रष्टुमेकार्णवगतं क्रीडन्तं योगधर्मिणम् ४४ वैशंपायन उवाच ॥ ततः प्रसन्नवदनो विस्मयोत्फुल्ललोचनः। मूर्ध्नि बद्धांजलिपुटो मार्कण्डेयो महातपाः ४५ नामगोत्रे ततः श्रुत्वा दीर्घायुर्लोकपूजितः। अथाकरोन्नमस्कारं प्रणतः शिरसाप्रभुम् ४६ मार्कंडेय उवाच ॥ इच्छेहं तत्त्वतो मायामिमां ज्ञातुं तवानघ। यदेकार्णवमध्यस्थः शेषे त्वं बालरूपवान् ४७ किंसंज्ञः कश्च भगवँल्लोके विज्ञायसेऽनघ। तर्कये त्वां महाभूतं न भूतमिह तिष्ठति ४८ श्रीभगवानुवाच ॥ अहं नारायणो ब्रह्मा संभवः सर्वदेहिनाम्। सर्वभूतोद्भवकरः सर्वभूतविनाशनः ४९ अहमैन्द्रेपदे शक्र ऋतूनामपि वत्सरः। अहं युगे युगाख्यश्च युगस्यावर्त एव च ५० अहं सर्वाणि सत्त्वानि देवतान्यखिलानि च। भुजगानामहं शेषस्तार्क्ष्यो हं सर्वपक्षिणाम् ५१ अहं सहस्रशीर्षाद्यैर्यैःपादैरभिसंवृतः। आदित्यो यज्ञपुरुषो देवो यज्ञमयोमखः। अहमग्निर्हव्यवाहो यादसां पतिरव्ययः ५२ यत्पृथिव्यां द्विजेन्द्राणां तपसा भावितात्मनाम्। बहुजन्मनिरुद्धात्मा ब्राह्मणो यतिरुच्यते ५३ ज्ञानवान् दृष्टविश्वात्मा योगिनां योगवित्तमः। कृतान्तः सर्वभूतानां विश्वेषां कालसंज्ञितः ५४ अहं कर्म क्रिया जीवः सर्वेषां धर्मदर्शनः। निष्क्रियः सर्वभूतेषु स्वात्मज्योतिः सनातनः ५५ प्रधानं पुरुषो देवोऽहमाद्यस्त्वक्षयोऽव्ययः। अहं

---

आयुष्यमान् अशा तुजसारख्या पुत्राचें समर्पण केलें ४३. वास्तव जो मद्रूप झालेला नाहीं असा दुसरा कोणीही एकसागरांत असलेल्या व खेळणाऱ्या मज योगधर्मवानाला पहाण्यास कोणी समर्थ होत नाहीं ४४. वैशंपायनः—त्यानंतर ज्याचें मुख प्रसन्न आहे व ज्याचे नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले आहेत असा महा तपस्वी, दीर्घायु व लोकपूजित मार्कंडेय मस्तकावर अंजलिपुट जोडून व नांव आणि गोत्र ऐकून त्या प्रभूस नम्र होऊन मस्तकानें प्रणाम करता झाला ४५,४६. मार्कंडेय ह्मणतोः—हे निष्पाप, मी ही तझी माया तत्त्वतः जाणण्याची इच्छा करतों. कारण तूं एकसागरामध्यें असलेला बालरूपानें शयन करीत आहेस ४७. तुझें नांव काय ? हे निष्पाप भगवन्, तूं लोकांमध्यें कसा जाणला जातोस ? मी तुला महद्भूत समजत आहें. पण येथें कोणतेंही भूत स्थित नाहीं ४८. श्रीभगवान्:—मी नारायण ब्रह्मा आहें. मी सर्व भूतांचा संभव ( कारण ) आहें. मी सर्व भूतांचा उद्भव करणारा व सर्व भूतांचा नाश करणारा आहें ४९. मीच इंद्राच्या पदावर शक्र होऊन बसतो. वसंतादि ऋतूंचाही वत्सर मीच. मी युगांतील युगाख्य व युगाचा आवर्त ( फेरा ) आहें ५०. मीच सर्व प्राणी व सर्व देव आहें. भुजंगांतील मी शेष आहें. सर्व पक्ष्यांतील गरुड आहें ५१. सहस्रशीर्षादि पादांनीं मीच अभिवेष्टित आहें. आदित्य, यज्ञपुरुष, यज्ञमय देव, मख, घृतादि हव्यांना वाहणारा अग्नि व जलजंतूंचा अव्यय स्वामी मीच आहें ५२. स्वधर्मानुष्ठानानें शुद्ध चित्त झालेल्या या पृथ्वीस्थ द्विजश्रेष्ठामध्यें जो अनेक जन्मांत आपल्या चित्ताला निरुद्ध करण्याचा प्रयत्न करीत असतो त्याला ब्रह्मज्ञ व संन्यासी असें म्हणतात. पण शास्त्रांत ज्या रूपानें त्याला ब्रम्हवित् ह्मणतात तें मायारहित ब्रम्ह मी आहें ५३. मी ज्ञानवान्, ज्यानें विश्वाचें स्वरूप पाहिलें आहे असा, योग्यांतील उत्तम योगवेत्ता व विश्वांतील सर्व भूतांचा कालसंज्ञक अंत करणारा आहें ५४. मी कर्म, क्रिया, जीव, सर्वांस धर्म दाखविणारा, निष्क्रिय, व सर्वभूतांमध्यें सनातन स्वात्मज्योति ५५, प्रधान, पुरुष, आद्य, अक्षय व अव्यय देव आहें. सर्व आश्र-

धर्मस्तपश्चाहं सर्वाश्रमनिवासिनाम् ५६ अहं हयशिरो देवः क्षीरोदो यो महार्णवे । ऋतं सत्यं च परममहमेकः प्रजापतिः ५७ अहं सांख्यमहं योगमहं तत्परमं पदम् । अहमिज्यो भवश्चाहमहं विद्याधिपः स्मृतः ५८ अहं ज्योतिरहं वायुरहं भूमिरहं नभः । अहमापः समुद्राश्च नक्षत्राणि दिशो दश । अहं वर्षमहं सोमः पर्जन्योऽहमहं रविः ५९ क्षीरोदः सागरश्चाहं समुद्रो वडवामुखः । वह्निः संवर्तको भूत्वा पिबंस्तोयमहं रविः ६० अहं पुराणं परमं तथैवेह परायणम् । अहं भूतस्य भव्यस्य वर्तमानस्य संभवः ६१ यत्किंचित्पश्यसे चैव यच्छृणोषि च किंचन । यच्चानुभवसे लोके तत्सर्वं मामकं स्मृतम् ६२ विश्वं सृष्टं मया पूर्वं सृजेयं चाद्य पश्य माम् । युगे युगे च स्रक्ष्यामि मार्कण्डेयाऽखिलं जगत् ६३ तदे-तदखिलं सर्वं मार्कण्डेयावधारय । शुश्रूषुर्मम धर्मेप्सुः कुक्षौ चर सुखी भव ६४ मम ब्रह्मा शरीरस्थो देवाश्च ऋषिभिः सह । व्यक्तमव्यक्तयोगं मामवगच्छापराजितम् ६५ अह-मेवाक्षरो मंत्रस्त्र्यक्षरश्चैव सर्वशः । त्रिपदश्चैव परमस्त्रिवर्गार्थनिदर्शनः ६६ वैशंपायन उवाच ॥ एवमेतत्पुराणेषु वेदान्ते च महामुनिः । वक्त्रं व्याहृतवानाशु मार्कण्डेयं महा-मुनिम् ६७ प्रवेशयामास ततो जठरं विश्वरूपधृक् । ततो भगवतः कुक्षिं प्रविष्टो मुनिसत्तमः । -रराम सुखमासाद्य शुश्रूषुर्हंसमव्ययम् ६८ तदक्षरं विविधमशाश्रितो वपुर्महार्णवे व्यपगत-

---

मांत रहाणाऱ्या लोकांचा धर्म मी, तप मी, हयग्रीव देव मी, महासागरांतील क्षीरसागर मी, वाचिक व मानसिक परम सत्य मी व मुख्य प्रजापति मीच आहें ५६,५७. मी सांख्य, योग व तें परम पद आहें. मी पूज्य आहें. मीच शंकर आहें. मीच विद्याधिप म्हटला गेलों आहें ५८. मी ज्योति, मी वायु, मी भूमि, मी आकाश, मी जल, समुद्र, नक्षत्रें, दहादिशा, मीच वर्ष, मी सोम, मी पर्जन्य व मीच सूर्य आहें ५९. क्षीरोद-सागर मी. समुद्र मी, वडवाग्नियुक्त समुद्र मी. प्रलयसमयींचा अग्नि होऊन जल प्राशन करणारा सूर्य मी ६०. मी अतिशय पुराण ( जुना ) व परम परायण आहें. मी भूत, वर्तमान व भविष्यत् कालच्या वस्तूंचा संभव आहें ६१. तूं यालोकीं जें कांहीं पहातोस व ऐकतोस आणि ज्याचा अनुभव घेतोस तें सर्व माझेंच रूप आहे ६२. मी पूर्वीं हें विश्व उत्पन्न केलें. व आज उत्पन्न करीत आहे. मला पहा. मार्कंडेया, मी प्रति-युगांत सर्व जग असेंच निर्माण करीत राहीन ६३. यास्तव बा मार्कंडेया, या सर्वांचा तूं निश्चय कर. श्रवणाची अथवा शुश्रूषा करण्याची व माझ्या ऐश्वर्याच्या प्राप्तीची इच्छा करणारा तूं माझ्या कुक्षींत संचार कर व सुखी हो ६४. ब्रम्हा व ऋषींसह सर्व देव माझ्या शरीरांत स्थित आहेत. पराजित न होणारा व सृष्टिरूपानें व्यक्त असणारा मी अव्यक्त घटनावान् आहे, असें समज ६५. मीच अ हें अक्षर व सर्व प्रकारें त्र्यक्षर ( ओं ) मंत्र आहें. त्रिपदा गायत्री मी आहें. धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थाचें प्रयोजन निदर्शन मीच आहें ६६. वैशंपायनः— राजन्, याप्रमाणें महामुनि व्यासांनीं पुराणें व वेदान्त यांमध्यें परम तत्त्व बांधून ठेवलें. असो; नंतर मार्कंडेय महामुनीस मुखांत टाकण्याकरितां सत्वर जवळ आणलें ६७. व विश्वरूप धारण करणाऱ्या देवानें त्याला जठरांत प्रविष्ट केलें. तेव्हां तो श्रेष्ठ मुनि भगवानाच्या कुशींत शिरला व अव्यय हंसाची शुश्रूषा करणारा ( निर्विकल्प समाधीनें आराधना करण्याची इच्छा करणारा ) तो सुखी होऊन रममाण झाला ६८. अक्षर ब्रह्मच असा तो हंससंज्ञक देव विविध शरीराचा आश्रय

चन्द्रभास्करे । शनैश्वरप्रभुरपि हंससंज्ञितोऽसृजज्जगद्विसृजति कालपर्यये ६९ [ ३५५ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि दशमोऽध्यायः ॥ १० ॥

वैशंपायन उवाच ॥ आपवः स विभुर्भूत्वा कारयामास वै तपः । छादयित्वात्मनो देहमात्मना कुंभसंभवः १ ततो महात्माऽतिबलो मतिं लोकस्य सर्जने । महतां पंचभूतानां विश्वभूतो व्यचिन्तयत् २ तस्य चिन्तयतस्तत्र तपसा भावितात्मनः । निराकाशे तोयमये सूक्ष्मे जगतिगह्वरे ३ ईषत्संक्षोभयामास सोर्णवं सलिले स्थितः । सोऽनन्तरोर्मिणा सूक्ष्ममथच्छिद्रमभूत्तदा ४ तत्र शब्दगतिर्भूत्वा मारुतछिद्रसंभवः । स लब्ध्वान्तरमक्षोभ्यो व्यवर्धत समीरणः ५ विवर्धता बलवता तेन संक्षोभितोऽर्णवः । अन्योन्यवेगाभिहता ममन्थुश्चोर्मयो भृशम् ६ महार्णवस्य क्षुब्धस्य तस्मिन्नंभसि मथ्यति । कृष्णवर्त्मा समभवत्प्रभुर्वैश्वानरोऽर्चिमान् ७ तत्र संशोषयामास पावकः सलिलं बहु । क्षयाज्जलनिधेश्छिद्रमभवन्निः

---

करूनही, चंद्र, सूर्य, त्यांची कारणें मन व चक्षु आणि इतर सर्व कारण कार्यरूप प्रपंच यांनीं रहित असलेल्या महासागरांत ( चिन्मात्र-अवस्थेंत ) हळू हळू ( भूमिजय क्रमानें ) संचार करीत अविद्यालेशवशात् समाधिसुखाचा विच्छेद झाला असतां जगास उत्पन्न करता झाला. नंतर महाभूतमय विविध भौतिक जग त्यानें उत्पन्न केलें ६९. इति श्रीमहा. खि० हरि० भविष्यपर्वाचा दहावा अध्याय समाप्त झाला. ॥ १० ॥

वैशंपायनः— तो हंससंज्ञक विभु आपव ( वसिष्ठसंज्ञक ) ब्रह्मर्षी होऊन व आपला कुंभांतून उत्पन्न झालेला देह समष्ट्यभिमानानें आच्छादित करून ( म्ह. स्थूल देहतादात्म्य सोडून ) योगनामक तप करता झाला १. त्यानंतर तो अतिबलाढ्य महात्मा विश्वात्मा लोकांच्या व पांच महाभूतांच्या उत्पत्तीविषयीं मनांत आणून विचार करूं लागला २. तेव्हां तपाच्या योगानें ज्याचा अहंकार वाढला आहे असा तो, त्या आकाशशून्य, जलमय, सूक्ष्म, अज्ञेय जगाचा लय झाला असतां पुष्कळ विचार करीत राहिला ३ नंतर जलांत ( म्ह. अधिष्ठान चिदात्म्यांत ) स्थित असलेला तो सागरास ( परतत्त्वास ) किंचित् क्षुब्ध करता झाला ( म्ह. शुद्ध चैतन्य समष्टि—अहंकारानें मी ईश्वर आहें अशी भावना करूं लागला. ) नंतर तो ईश्वर स्वतः दुसऱ्या ऊर्मीनें ( संकल्पानें ) सूक्ष्म ( इंद्रियांस ग्रहण करितां न येणारें ) आकाशसंज्ञक छिद्र झाला ४. त्यानंतर तो संकल्पानेंच त्या आकाशांत शब्दरूपानें परिस्पंदवान् झाला. याप्रमाणें वायुद्रवोद्भव होऊन त्या वायुवेगानेंच संयोग व विभाग यांस कारण होणारा तो शब्दोत्पत्तीचें कारण झाला. सारांश आकाशरूपी छिद्र मिळतांच तो अक्षोभ्य ईश्वरही वायु होऊन वृद्धि पावला ( म्ह. आकाशाच्या मागोमाग उत्पन्न झालेला वायु शब्द व गति यांचें निमित्त झाला ) ५. वृद्धि पावणाऱ्या त्या बलवान् वायूनें समुद्रांत क्षोभ उत्पन्न केला. त्यामुळें एकमेकांच्या वेगानें एकमेकांवर हापटणाऱ्या लाटा अतिशय व्याकुळ करूं लागल्या ( अध्यात्म दृष्ट्या अर्थः— समुद्र म्हणजे चिदात्मा. त्याला अहंकार, आकाश व वायु यांनीं एकमेकांचा घात करून व्याकुळ करून सोडलें. अहंकारानें त्याचें शुद्धत्व घालविलें. व वायूला स्पंदयुक्त केलें. वायूनें अहंकार वृत्तीच्या निश्चलतेचा घात केला. याप्रमाणें परस्परांवर परिणाम करून अनेक संकल्पांचा उद्भव झाला व त्यांनीं चिदात्म्यास व्याकुळ केलें ) ६. क्षुब्ध झालेल्या महासागराचें जल याप्रमाणें वेगानें हलूं लागलें असतां

सृतं नभः ८ आत्मतेजोद्भवाः पुण्या आपोऽमृतरसोपमाः । आकाशं छिद्रसंभूतं वायुराकाशसंभवः ९ आज्यसंघर्षणोद्भूतं पावकं चाज्यसंभवम् । दृष्ट्वा प्रीतियुतो देवो महाभूतादिभावनः १० दृष्ट्वा भूतानि भगवाँल्लोकसृष्ट्यर्थतत्त्ववित् । ब्रह्मणो जन्मसहितं बहुरूपो विचिन्तयति ११ चतुर्युगादिसंख्यान्ते सहस्रयुगपर्यये । यत्पृथिव्यां द्विजेंद्राणां तपसा भावितात्मनाम् १२ बहुजन्मविशुद्धात्मा ब्रह्मणो यतिरुत्तमः । ज्ञानवान् दृष्टविश्वात्मा योगिनां योगवित्तमः १३ तं योजयन्तं विज्ञेयं संपूर्णैश्वर्यविक्रमम् । देवो ब्रह्माणि विश्वे च नियोजयति योगवित् १४ ततस्तस्मिन्महातोये हविषो हरिरच्युतः । स्वपन् क्रीडंश्च विविधं मोदते चैष पावकिः १५ पद्मं नाभ्युद्भवं चैकं समुत्पादितवांस्तदा । सहस्रपत्रं विरजो भास्कराभं हिरण्मयम् १६ हुताशनज्वलितशिखोज्ज्वलत्प्रभं सुगन्धिनं शरदमलार्कतेजसम् । विराजत कमलमुदारवर्चसं महात्मनस्तनुरुहचारुदर्शनम् १७ [ ३७२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

---

प्रभु वैश्वानर ज्वालावान् अग्नि उत्पन्न झाला. ( अध्यात्म दृष्ट्या—चित्तरव संकल्पांच्या योगानें व्याकुळ झालें असतां-असा भावार्थ ) ७. नंतर त्या अग्नीनें सर्व जल सुकवून सोडलें. जलनिधीचा क्षय झाला असतां छिद्ररूप आकाश व्यक्त झालें ८. आत्मतेजापासून उत्पन्न झालेलें जल ( चवथें महाभूत ) अमृततुल्य मधुर होतें. याप्रमाणें ईश्वराच्या आकाशसंकल्पापासून तोच स्वतः आकाश झाला. आकाशापासून वायूचा संभव झाला. ( वायूपासून अग्नि; अग्नीपासून जल व ) जलाच्या परस्पर संघर्षामुळें पृथ्वी उद्भवली. महाभूतांच्या कारणाची भावना करणारा तो देव त्या भूतांस पाहून प्रीतियुक्त झाला ९,१०. याप्रमाणें भूतांना पाहून लोकांची उत्पत्ति, प्रयोजन व तत्त्व यांस जाणणारा तो अनेकरूप भगवान् ब्रह्मदेवाच्या उत्पत्तीविषयीं विचार करतो ११. चतुर्युगादि प्रमाणानें सहस्रयुगांचा फेरा संपला असतां पृथ्वींतील तपाच्या योगानें श्रेष्ठ झालेल्या ब्राम्हणश्रेष्ठांमध्यें जो अनेक जन्मांतील योगाभ्यासानें चित्तजय करून उत्तम यति झालेला असतो तो योग्यांतील उत्तम योगवेत्ता, व ज्ञानवान् व विश्वरूप परमात्म्याचा उपासक ब्रम्हा होतो १२,१३. याप्रमाण उपासनेमुळें ज्याला सूत्रात्मभावाचा साक्षात्कार झाला आहे अशा त्या सर्वांस उपास्य झालेल्या, संपूर्ण ऐश्वर्य व सामर्थ्य यांनीं युक्त असलेल्या व योगवान् सर्वोत्तम उपासकाला योगवेत्ता देव वेद व जगत् यांचा सततभाव विच्छिन्न होऊं नये म्हणून त्यांत नियुक्त करतो. ( सूत्रात्म्याची उपासना करणारांतील ज्याच्याठायीं भावनेच्या उत्कर्षाची परम अवधि, पराकाष्ठा झाली असेल तो उत्तर कल्पांत ब्रह्मा होतो. )१४. ब्रह्मदेवाची सृष्टिकर्मांत योजना केल्यानंतर अच्युत हरि महाजळांत ( आपल्या स्वरूपांत ) निजून रहातो. व ज्याला हरीनें नियुक्त केलें आहे असा तैजस ब्रह्मा प्राण्यांच्या कर्मवशात् विविध क्रीडा करतो १५. असो; ब्रह्मदेवाच्या उत्पत्तिसमयीं हरीनें आपल्या नाभींतून एक कमळ उत्पन्न केलें. त्याला हजार पाकळ्या असून तें निर्मल सूर्यतुल्य तेजस्वी व सुवर्णमय होतें १६. त्याची प्रभा अग्नीच्या उज्ज्वल ज्वालांप्रमाणें होती. त्याला सुंदर वास येत होता. शरत्कालच्या निर्मल सूर्याप्रमाणें त्याची कांति होती. सारांश ज्याची दीप्ति उत्कृष्ट आहे, असें तें कमल त्या महात्म्याच्या अंगावरील रोमाप्रमाणें ज्याचें दर्शन आहे असें विराजमान झालें १७. इति श्रीमहा. खि० हरि० भविष्य० अकरावा अध्याय समाप्त झाला. ॥ ११ ॥

वैशंपायन उवाच ॥ अथ योगविदां श्रेष्ठं सर्वभूतमनोमयम् । स्रष्टारं सर्वभूतानां ब्रह्माणं सर्वतोमुखम् १ तस्मिन् हिरण्मये पद्मे बहुयोजनविस्तृते । सर्वतेजोगुणमये पार्थिवैर्लक्षणैर्युते २ तच्च पद्मं पुराणज्ञाः पृथिवीरूपमुत्तमम् । नारायणांगसंभूतं प्रवदन्ति महर्षयः ३ या तु पद्मासना देवी पृथिवीं तां प्रचक्षते । ये गर्भाङ्कुरासारास्तान्दिव्यान्पर्वतान्विदुः ४ हिमवन्तं च मेरुं च निलं निषधमेव च । कैलासं मुञ्जवन्तं च यथाद्रिं गन्धमादनम् ५ पुण्यं त्रिशिखरं चैव कान्तं मन्दरमेव च । उदयं च गिरिश्रेष्ठं विन्ध्यमस्तं च पर्वतम् ६ एते देवगणानां च सिद्धानां च महात्मनाम् । आश्रमाः पुण्यशीलानां सर्वकामयुताद्रयः ७ एतेषामन्तरो देशो जंबुद्वीप इति स्मृतः । जंबुद्वीपस्य संख्यानं याज्ञिया यत्र चक्रिरे ८ गर्भाद्यत्स्रवते तोयं देवामृतरसोपमम् । दिव्यतीर्थशतापांगयस्ता दिव्याः सरितः स्मृताः ९ यान्येतानि तु पद्मस्य केसराणि समंततः । असंख्याता: पृथिव्यां तु विश्वे ते धातुपर्वताः १० यानि पद्मस्य पत्राणि भूरीण्यूर्ध्वं नराधिप । ते दुर्गमाः शैलचिता म्लेच्छदेशा विकल्पिताः ११ यान्यधः पद्मपत्राणि वासार्थं तानि भागशः । दैत्यानामुरगाणां च पातालं तन्महात्मनाम् १२ तेषामधोगतं यत्तदुदकेत्यभिसंज्ञितम् । महापातककर्माणो मज्जन्ते यत्र मानवाः १३ पद्मस्यान्ते कुशं यत्तदेकार्णवजलं महत् । प्रोक्ता स्ते दिक्षु संघाताश्चत्वारो जलसागराः १४ ऋषेर्नारायणस्यायं महापुष्करसंभवः । प्रादुर्भावोऽप्ययं तस्मान्नाम्ना

---

वैशंपायनः— नंतर आपव जगदात्मा त्या योगवेत्त्यांतील श्रेष्ठ सर्वभूतांच्या मनोमय, सर्वभूतांचा स्रष्टा व सर्वतोमुख अशा ब्रह्मदेवाला त्या हिरण्मय, अनेक योजनें विस्तीर्ण, सर्व तेजोगुणमय व पार्थिव लक्षणांनीं युक्त अशा कमलांत नियुक्त करतो १, २. अंतर्यामी नारायणाच्या अंगापासून उत्पन्न झालेलें व त्यामुळेंच देहाच्या आंत असलेलें तें कमळ ( सर्व जगाच्या उत्पत्तीचें कारण असल्यामुळें ) उत्तम आहे असें पुराणज्ञ महर्षी ह्मणतात ३. जी कमलासना पृथ्वी तिलाच पृथिवी असें ह्मणतात. तिचे जे अति दृढ अंकुर त्यांनाच दिव्य पर्वत असें समजतात ४. हिमालय, मेरु, निल, निषध, कैलास, मुंजवान्, गंधमादनपर्वत, पुण्यवान् त्रिशिखर, रम्य मंदर, पर्वतश्रेष्ठ उदयगिरि, विंध्य, अस्तपर्वत, हे व दुसरेही सर्व उपभोगसाधनयुक्त पर्वत पुण्यशील देवसंघ व महात्मे सिद्ध यांचे आश्रम आहेत ५–७. यांच्या मधील देश जंबुद्वीप ह्मणून सांगितलेला आहे. कारण यज्ञिय देशाची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांनीं जंबुद्वीपाचें संख्यान करून तेथें यज्ञ केले ८. यज्ञगर्भांतून जें देवांच्या अमृतासारखें जल वृष्टिरूपानें पडतें त्याच्याच योगानें दिव्य तीर्थें हेच ज्यांचे शेकडों कटाक्ष आहेत अशा दिव्य नद्या ह्मणून सांगितलें आहे ९. असो; त्या कमलाचीं समंततः पसरलेलीं केसरें हेच पृथ्वींतील असंख्य सर्व धातुयुक्त पर्वत होत १० हे नराधिपा, त्या कमलाचीं अनेक ऊर्ध्वमुख पत्रें ( पाकळ्या ) हेच दुर्गम पर्वतांनीं भरलेले म्लेच्छदेश आहेत ११. त्याचीं जीं खालचीं पत्रें तींच महात्म्या दैत्यांच्या व सर्पांच्या निवासाकरितां भागशः कल्पिलेलें पाताळ आहे १२. त्या पाताळभूत पत्रांच्या खालीं असलेला उदक नांवाचा जो कमलाधोभाग त्यांत महापातकें करणारे मानव बुडतात १३. कमलाच्या अगदीं खालीं असलेलें जें पृथ्वीचें आधारभूत जल तेंच मोठें एकार्णव ( एक समुद्रमय ) जल होय. त्या जलसंघातालाच चार दिशांतील चार सागर असें ह्मटलें आहे १४. नारायण ऋषीचा हा महा पुष्कर ( कमळ ) संभव आहे. यास्तव हा त्याचा

पुष्करसंभवः १५ एतस्मात्कारणात्तज्ज्ञैः पुराणैः परमर्षिभिः। याज्ञियैर्वेददृष्टार्थैर्यज्ञे पद्म-चिता कृता १६ एवं भगवता पद्मे विश्वस्य परमाविधिः। पर्वतानां नदीनांचदेवतानांच-निर्मितः १७ विभुस्तथैवाप्रतिमप्रभावः प्रभाकरो वै भगवान्महात्मा। स्वयं स्वयंभूः शयनेऽसृजत्तदा जगन्मयं पद्मनिधिं महार्णवे १८ [ ३९० ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

वैशंपायन उवाच॥ चतुर्युगादिसंभूतौ सहस्रयुगपर्यये। विघ्नस्तमसि संभूतो मधुर्नाम महासुरः १ तस्यैव च सहायोऽन्यो भूतो रजसि कैटभः। तौ रजस्तमसाविष्टौ संभूतौ कामरूपिणौ २ एकार्णवजलं सर्वं क्षोभयन्तौ महासुरौ। कृष्णरक्ताम्बरधरौ श्वेतदीप्ताग्रदंष्ट्रिणौ ३ किरीटमुकुटोदग्रौ केयूरवलयोज्ज्वलौ। महाविकृतताम्राक्षौ पीनोरस्कौ महाभुजौ ४ महच्छिरःसंहननौ जंगमाविवपर्वतौ। नीलमेघाभ्रसंकाशावादित्यप्रतिमाननौ ५ विद्युदंभोदताम्राभ्यां कराभ्यामतिभीषणौ। पादसंचारवेगाभ्यामुत्क्षिपन्ताविवार्णवम् ६ कंपयन्ताविवहरिं शयानमरिसूदनम्। तौ तत्र विहरन्तौ स्म पुष्करे विश्वतो मुखम् ७ पश्यतां दीप्तवपुषं योगिनां श्रेष्ठमुत्तमम्। नारायणसमाज्ञप्तं सृजन्तमखिलाः प्रजाः। दैवतानि च विश्वानि मानसांश्च सुतानृषीन् ८ ततस्तावूचतुस्तत्र ब्रह्माणमसुरोत्तमौ। इमौ युयुत्सकौ क्रुद्धो रोष-

---

प्रादुर्भावही पुष्करसंभव या नांवानें प्रसिद्ध आहे १५. याच कारणानें तत्त्वज्ञ, यज्ञपरायण, वेदाचा अर्थ जाणणाऱ्या पुराण परमर्षींनीं यज्ञांत पद्मचिती ( इटांनीं पद्माकार चयन ) केली आहे १६. याप्रमाणें भगवानानें त्या कमलामध्यें विश्वाचा, पर्वतांचा, नद्यांचा, व देवतांचा परम अवधि निर्मिला आहे १७. असो; अप्रतिम प्रभाववान्, भगवान्, महात्मा, विभु, स्वयंभू देव स्वतः शयन करून ( स्थूल देहास विसरून ) त्यावेळीं तसाच महासागरांत जगन्मय असंख्य कमलांचा सांठा उत्पन्न करिता झाला १८. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा बारावा अध्याय समाप्त झाला. ॥ १२ ॥

वैशंपायनः — सहस्रयुगांचा फेरा संपला असतां व चतुर्युगाला आरंभ झाला असतां तमोगुणांत मधुनामक असुर मोठें विघ्न उत्पन्न झाला १. त्याचाच सहायकर्ता दुसरा एक कैटभनांवाचा एक राक्षस रजोगुणांत उत्पन्न झाला. मनांत येईल तें रूप घेणारे व रज व तम यांनीं भरलेले ते दोघे उत्पन्न झाले २. त्या महा असुरांनीं सर्व एकसागरमय जळ क्षुब्ध करून सोडलें. त्यांनीं क्रमानें काळें व लाल वस्त्र धारण केलें होतें. त्यांच्या पुढच्या दाढा शुभ्र व दीप्त होत्या ३. किरीट व मुकुट यांच्या योगानें ते उत्कृष्ट झाले होते. बाहुभूषणें व कंकणें यांनीं त्यांच बाहू उज्ज्वल दिसत होते. त्यांचे नेत्र मोठे, विक्राळ व तांबडे होते. त्यांचा उरोभाग पुष्ट व भुजा लांब होत्या ४. त्यांचीं मस्तकें व शरीरें मोठीं होतीं. ते दोघे राक्षस म्हणजे जणुं काय चालते बोलते पर्वतच होते. नीलवर्ण मेघ व अभ्रें यांच्यासारखी त्यांची अंगकांति होती. सूर्यासारखीं त्यांचीं तोंडें होतीं ५. विद्युद्युक्त मेघांप्रमाणें लालट हातांनीं तें अतिभयंकर झाले होते. पायांचा संचार व वेग यांच्या योगानें ते सागराला जणुं काय वर उडवीतच होते ६. निजणाऱ्या शत्रुनाशक हरीला ते जणुं काय कंपायमानच करीत होते. असो; ते दोघे त्या पुष्करामध्यें सर्वतः विहार करीत राहिले ७. इतक्यांत ज्याचें शरीर दीप्त आहे अशा योग्यांतील अतिश्रेष्ठ व नारायणानें आज्ञा केल्यामुळें सर्व प्रजेला उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाला, सर्व

संरक्तलोचनौ ९ कस्त्वं पुष्करमध्यस्थः सितोष्णीषश्चतुर्मुखः । आवामगणयन्मोहादासे त्वं विगतज्वरः १० एह्यावयोर्बाहुयुद्धं प्रयच्छ कमलोद्भव । आवाभ्यामनिवाराभ्यां न शक्यं स्थातुमाहवे ११ कस्त्वं कश्चोद्भवस्तुभ्यं केन वासीह चोदितः । कः स्रष्टा कश्च वै गोप्ता केन नाम्नाभिधीयसे १२ ब्रह्मोवाच ॥ यः क इत्युच्यते लोके ह्यविज्ञातः सहस्रशः । तत्संभवं योगवन्तं किं मां नाभ्यवगच्छथः १३ मधुकैटभावूचतुः ॥ नावयोः परमं लोके किंचिदस्तिमहामते । आवां च्छादयतो विश्वं तमसा रजसा तथा १४ रजस्तमोमयावावां यतीनां दुःखलक्षणौ । छलकौ धर्मशीलानां दुस्तरौ सर्वदेहिनाम् १५ आवाभ्यां मुह्यते लोक उच्छ्रिताभ्यां युगे युगे । आवामर्थश्च कामश्च यज्ञाः सर्वपरिग्रहाः १६ सुखं यत्र मुदो यत्र यत्र श्रीः सन्निवृत्तयः । एषां यत्कांक्षितं चैव तद्बुध्यस्व विचिन्तयन् १७ ब्रह्मोवाच ॥ यत्तद्योगवतां श्रेष्ठं यच्च पूर्वमयाचितम् । तत्समाधाय गुणवान्सत्त्वे चास्मि प्रतिष्ठितः १८ यत्परं योगयुक्तानामक्षरं सत्त्वमेव च । रजसस्तमसश्चैव यत्स्रष्टा जीवसंभवः १९ यतो भूतानि जायन्ते सात्त्विकानीतराणि च । स एव युक्तः समरे वशी वां शमयिष्यति २० वैशंपायन उवाच ॥ ततः शयानं श्रीमन्तं बहुयोजनविस्तृतम् । पद्मनाभं हृषीकेशं प्रणम्याबोचतामुभौ २१ जानीवस्त्वां विश्वयोनिमेकं पुरुषसत्तमम् । तवोपासनहेत्वर्थमिदं नौ

---

देवांना, मानसपुत्रांना व ऋषींना त्यांनीं पाहिलें. ' व ते मत्त, युद्धाची इच्छा करणारे, रागावलेले, क्रोधानें ज्यांचे नेत्र लाल झाले आहेत असे दोघे श्रेष्ठ राक्षस ब्रह्मदेवाला ह्मणाले ८,९. ' कमलामध्यें असलेला, शुभ्र शिरोवेष्टन धारण करणारा व चतुर्मुख असा तूं कोण ? आह्मांला मुळींच न मोजतां मोहानें तूं निर्भयपणें राहिला आहेस १०. हे कमलोद्भवा, ये; आमच्याशीं बाहुयुद्ध कर. पण अनिवार अशा आमच्यापुढें तूं रणांगणांत उभा रहाण्यास समर्थ नाहींस ११. तूं कोण, तुला कोणी उत्पन्न केलें ? तुला या सृष्टिकार्यांत कोणी नियुक्त केलें आहे ? उत्पन्न करणारा कोण ? याचा रक्षण करणारा कोण ? तूं कोणत्या नांवानें हाक मारला जातोस ? १२. ब्रह्मा:—लोकांमध्यें ज्याला क ( ब्रह्मा ) असें ह्मणतात व जो सहस्रावधि उपायांनींही जाणला जात नाहीं त्या सर्वांच्या उत्पादक व योगसंपन्न मला तुह्मी जाणत नाहीं कां ? १३. मधुकैटभः—बा महामते, आह्मां उभयतांपेक्षां या जगांत श्रेष्ठ असें कांहीं नाहीं. आह्मी तम व रज या गुणांच्या योगानें सर्व विश्व झांकून सोडतों १४. प्रयत्नशीलांना दुःख देणारे असे आह्मी दोघे रजस्तमोमय आहों. आह्मी धर्मशील पुरुषांचा छल करणारे व सर्व देहधारी जीवांस दुस्तर आहों १५. प्रत्येक युगांत वृद्धि पावलेल्या आमच्याकडून लोक मोहित केले जातात. आह्मींच दोघे अर्थ, काम, यज्ञ व सर्व परिग्रह ( स्त्री-पुत्र-धनादि ) आहों १६. जेथें सुख, विषयानन्द, संपत्ति, कामजन्य तृप्ति व या सर्वांकरितां प्राण्याचें जें इष्ट आहे तें सर्व आह्मीं आहों, असें तूं विचार करून जाण १७. ब्रह्मा:—जें योगवानांतील श्रेष्ठ व जें पूर्वीं अयाचित, तें सर्व एकत्र जमवून गुणवान् झालेला मी सत्त्वामध्यें प्रतिष्ठित झालों आहें १८. जें योगयुक्त पुरुषांना श्रेष्ठ अक्षर वाटत असतें तें सत्त्व मीं आहें. जीवांच्या उत्पत्तीचें निमित्त व रज आणि तम यांचा स्रष्टा मीं आहें १९. यास्तव ज्याच्यापासून सात्त्विक व इतर भूतें उत्पन्न होतात तोच वशी समरामध्यें तुमच्याशीं भिडून तुमचा नाश करील २०. वैशंपायन:—त्यानंतर निजलेल्या व अनेक योजनें विस्तृत असलेल्या त्या श्रीमान् पद्मनाभ हृषीकेशास

विद्धि कारणम् २२ अमोघदर्शनं सत्यं यतस्त्वां विदुरीश्वरम् । ततस्त्वामभितो देव कांक्षावः प्रतिवीक्षितुम् २३ तदिच्छावो वरं दत्तं त्वया ह्याकामरिंदम । अमोघं दर्शनं देव नमस्तेस्त्वजित जय २४ श्रीभगवानुवाच ॥ कानिच्छतो नु वरं ब्रूत वरानसुरसत्तमौ । दत्तायुषौ मया भूयस्त्वहो जीवितुमिच्छथः २५ तस्माद्यदेष वां यत्नस्तत्प्राप्नुत महाबलौ । वध्यौ भवन्तौ तु स्यातां ताविस्येवाब्रवीद्धरिः ॥ उभावपि महात्मानावूर्जितौ क्षतवर्जितौ २६ मधुकैटभावूचतुः ॥ यस्मिन्न कश्चिन्मृतवांस्तस्मिन्देशे विभो वधम् । इच्छावः पुत्रतां यातुं तव चैव सुराधिप २७ श्रीभगवानुवाच ॥ बाढं सुतौ मे प्रवरौ भविष्ये कल्पसंभवे । भविष्यथो न संदेहः सत्यमेतद्ब्रवीमि वाम् २८ वैशंपायन उवाच ॥ वरं प्रदायाथ महासुराभ्यां सनातनो विश्वहरो महाद्युतिः । रजस्तमोभ्यां भवभावनोपमौ ममंथतावूरुतले सुरारिहा २९ [ ४१९ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि मधुकैटभ वरप्रदानं नामत्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

वैशंपायन उवाच ॥ स्थित्वा तस्मिंस्तु कमले ब्रह्मा ब्रह्मविदां वरः । ऊर्ध्वबाहुर्महाबाहुस्तपो घोरं समाश्रितः १ ज्वलन्निव च तेजस्वी भाभिः स्वाभिस्तमोनुदः । बभासे सर्वधर्मस्थः सहस्रांशुरिवांशुमान् २ अथान्यद्रूपमास्थाय शंभुर्नारायणोऽव्ययः । द्विधा कृत्वात्म-

---

प्रणाम करून ते दोघे ह्मणाले २१. " तूं एक विश्वयोनि व पुरुषोत्तम आहेस, हें आह्मीं जाणतों. तुझ्या उपासनेकरितां आमचा हा सर्व प्रयत्न आहे २२. तूं ईश्वर सफलदर्शन व सत्य आहेस, असें ज्याअर्थी तुला ज्ञानी जाणतात त्याअर्थी हे देवा, आह्मीं दोघे सर्वतः तुला जाणण्याची इच्छा करीत आहों. २३. हे शत्रुदमना, आह्मीं दोघे तूं दिलेला वर मिळविण्याची इच्छा करीत आहों. देवा, तुझें दर्शन अमोघ आहे. हे अजित, तुला नमस्कार असो. तुझा जयजयकार असो " २४. श्रीभगवान्:– हे श्रेष्ठ असुरांनो, तुह्मी कोणत्या वरांची इच्छा करीत आहां तें सांगा? मी तुह्मांला दीर्घ आयुष्य दिलें असतां आणखी अधिक जगण्याची इच्छा करितां, हें मोठें आश्चर्य आहे २५. तस्मात् हे महाबलाढ्यांनो, ज्याकरितां तुमचा हा यत्न आहे तें तुह्माला प्राप्त होवो. पण तुह्मी मला वध्य व्हाल. असें हरि त्या दोघांना ह्मणाला. ते दोघेही महात्मे ऊर्जित व क्षतरहित होते २६. मधुकैटभः– हे विभो, ज्याप्रदेशांत कोणी आजवर मेलेला नाहीं तेथें आमचा वध व्हावा व हे देवाधिपा, आह्मीं तुझे पुत्र व्हावें असें इच्छितों २७. श्रीभगवान्:– बरें आहे. उत्तरकल्प लागला असतां तुम्ही माझे अतिश्रेष्ठ पुत्र व्हाल, यांत संदेह नाहीं. हें मी तुह्माला सत्य सांगत आहें. २८. वैशंपायनः– याप्रमाणें त्या दोघां महाअसुरांस वर देऊन तो सनातन, विश्वास हरण करणारा महातेजस्वी देवशत्रुनाशक रज व तम यांच्या योगानें भव व भावन यांच्या सारख्या असलेल्या त्यांस आपल्या मांड्याखालीं चिरडून टाकता झाला २९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० मधुकैटभवरप्रदाननामक तेरावा अध्याय समाप्त झाला. ॥ १३ ॥

वैशंपायनः—नंतर वेदवेत्त्यांतील श्रेष्ठ व महाबाहु ब्रह्मा घोर तपाचा आश्रय करून व बाहु वर उचलून त्या कमलांत राहिला १. दीप्त असल्याप्रमाणें तेजस्वी, आपल्या प्रकाशानें अंधकाराचा नाश करणारा व सर्व धर्मस्थ असा तो सहस्रकिरण सूर्याप्रमाणें भासला २. नंतर दुसरेंच रूप घेऊन कल्याण करणारा, अव्यय, अचिंत्यात्मा व सनातन

नात्मानमचिन्त्यात्मा सनातनः ३ आजगाम महातेजा योगाचार्यो महायशाः । सांख्याचार्यश्च मतिमान्कपिलो ब्राह्मणो वरः ४ देवर्षिभिस्तुतावेतौ युक्तौ ब्रह्मविदां वरौ । उभावपि महात्मानावूर्जितौ क्षेत्रतत्परौ ५ तौ प्राप्तावूचतुस्तत्र ब्रह्माणममितौजसम् । परावरविशेषज्ञौ पूजितौ परमर्षिभिः ६ बहुत्वाद्दृढपादश्च विश्वात्मा जगतः स्थितिः । ग्रामणीः सर्वलोकानां ब्रह्मा लोकगुरुर्वरः ७ तयोस्तद्वचनं श्रुत्वा तिस्रो व्याहृतयो जपन् । त्रीनिमान्कृतवाँल्लोकान्यथाह ब्राह्मणी श्रुतिः ८ पुत्रं भूसंज्ञकं चैव समुत्पादितवान्प्रभुः । ततोऽग्रे तद्गतस्नेहो ब्रह्मा मानसमव्ययम् ९ सोत्पन्नस्त्वग्रे ब्रह्माणमुवाच मानसः सुतः । करोमि किं ते साहाय्यं ब्रवीतु भगवानिति १० ब्रह्मोवाच ॥ य एष कपिलो नाम ब्रह्मा नारायणस्तथा । वदते वरद त्वां तु तत्कुरुष्व महामते ११ वैशंपायन उवाच ॥ ब्रह्मणोक्ते तदा सोऽथ भूयस्तावुपस्थितः । शुश्रूषुरस्मि युवयोः किं कुर्वेति कृतांजलिः १२ परमेश्वरावूचतुः ॥ यत्सत्यमक्षरं ब्रम्ह ह्यष्टादशविधं स्मृतम् । यत्सत्यममृतं चैव परं तत्समनुस्मर १३ वैशंपायन

---

नारायण आपणच आपल्याला द्विधा करता झाला ३. त्यामुळें महातेजस्वी व महायशस्वी असा नारायण स्वतः योगाचार्य बनला आणि दुसरा कपिल नांवाचा श्रेष्ठ ब्राह्मण बुद्धिमान् सांख्याचार्य झाला ४. ते दोघेही देवर्षींकडून स्तुति केले गेले. ते शांताचित्त व वेदवेत्त्यांतील श्रेष्ठ होते. ते दोघेही महात्मे, ऊर्जित व क्षेत्रांमध्यें ( प्रकृतीच्या कार्यरूप शरीरामध्यें ) तत्पर होऊन राहिले. ( क्षेत्राचा विचार करण्यांत गढून गेले ) ५. परम ऋषींकडून पूजले गेलेले आणि पर व अवर ह्मणजे कारण व कार्य यांचे तत्त्व जाणणारे ते दोघे अमिततेजस्वी ब्रह्मदेवापाशीं येऊन ह्मणाले ६. " बंध व मोक्ष यांची व्यवस्था लागणें अवश्य असल्यामुळें जीव अनेक मानले पाहिजेत. व त्यांचा नियन्ता सेनापतीप्रमाणें तटस्थ असणेंच सयुक्तिक आहे. शिवाय तो सत्यपाद आहे. ह्मणजे विषयादि सत्य असल्यामुळें प्रकृतीही सत्य आहे. ( हें योगाचार्यांचें वचन झालें. आतां सांख्याचार्य ह्मणतात — ) तो लोकगुरु विश्वात्मा आहे. ह्मणजे सर्व चेतन हेंच त्याचें स्वरूप आहे. ( ब्रह्मरूपी समुद्रांत जगत्–जीव–ईश्वररूप तरंग कोट्यवधि उद्भवतात. ) तोच जलचंद्रन्यायानें ( औपाधिक भेदानें ) जगाची स्थिति करणारा आहे. तो सर्व लोकांच्या समूहांचा नेता आहे. सारांश तो ब्रह्मा श्रेष्ठ लोकगुरु आहे ( येथील सांख्य ह्मणजे औपनिषद्दर्शन घ्यावें. व कपिल शब्दानें सेश्वरवादी देवहूती पुत्र घ्यावा. निरीश्वर वादी कपिल नव्हे. ) ७. असो; त्या दोघांचें तें वचन ऐकून ब्रह्मदेवानें भूः इत्यादि तीन व्याहृतींचा जप केला. व या तीन लोकांस निर्मिलें. ब्रह्मप्रतिपादक श्रुतीनेंही असें सांगितलें आहे ८. नंतर त्या प्रभूनें भूसंज्ञक मानसपुत्रास निर्माण केलें. त्यानंतर ब्रह्मदेवाचा त्याच्यावर मोठा स्नेह बसला ९. याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या संकल्पामुळें उत्पन्न झालेला तो मानसपुत्र पुढें उभा राहून ब्रम्हदेवास ह्मणाला " मी कोणतें साहाय्य करूं तें आपण मला सांगावें " १०. ब्रह्माः— बा महामते, हा जो कपिल नांवाचा ब्रह्मा व नारायण आहे ते दोघे जें तुला सांगतील तें कर ११. वैशंपायनः— ब्रह्मदेवानें असें सांगितलें असतां तत्काल तो पुनः त्यांच्या समीप जाऊन अनन्यभावानें उभा राहिला. " व हात जोडून मी तुमची शुश्रूषा करणारा आहें. काय करूं ? " असें विचारूं लागला. १२. परमेश्वर ह्मणतातः— जें त्रैकालिक बाधरहित, अपरिणामी, ज्याला कर्मेंद्रिय-ज्ञानेंद्रिय

उवाच ॥ एतद्वचो निशम्याथ स ययौ दिशमुत्तराम् । गत्वा च तत्र ब्रम्हत्वमगमज्ज्ञानचक्षुषा १० ततो ब्रम्हा भुवर्नाम द्वितीयमसृजत्प्रभुः । संकल्पयित्वा च पुनर्मनसैव महामनाः १५ ततः सोप्यब्रवीद्वाक्यं किं कुर्वेति पितामहम् । पितामहसमाज्ञप्तो ब्रम्हाणं समुपस्थितः १६ ब्रम्हभ्यां सहितः सोथ भूयो भागवतींगतः । प्राप्तश्च परमं स्थानं स तयोः पार्श्वमागतः १७ तस्मिन्नपि गते पुत्रं तृतीयमसृजत्प्रभुः । मोक्षोपपत्ति कुशलं भूर्भुवं नाम तं विदुः १८ आससाद स तद्धर्मं तयोरेवागमद्गतिम् । एवं पुत्रास्त्रयोप्येते उक्ताः शंभोर्महात्मनः १९ तान् गृहीत्वा सुतांस्तस्य प्रययौ स्वां गतिं तथा । नारायणोऽथ भगवान्कपिलश्च यतीश्वरः २० यं कालं तौ गतौ मुक्तौ ब्रम्हा तत्कालमेव तु । तेपे घोरतरं भूयः स तपः संशितव्रतः २१ न रराम ततो ब्रह्मा प्रभुरेकस्तपश्चरन् । शरीरार्धमथो भार्यां समुत्पादितवाञ्छुभाम् २२ तपसा तेजसा चैव वर्चसा नियमेन च । सदृशीमात्मनो भार्यां समर्थां लोकसर्जने २३ तया सह ततस्तत्र रेमे ब्रम्हा तपोमयः । सृजत्प्रजापतीन्सर्वान्सागरान्सरितस्तथा २४ ततोऽसृजद्वै त्रिपदां गायत्रीं वेदमातरम् । अकरोच्चैव चत्वारो वेदान् गायत्रिसंभवान् २५ आत्मार्थे चासृजत्पुत्राँल्लोककर्तॄन्पितामहः । विश्वे प्रजानां पतयो येभ्यो लोका विनिःसृताः २६ विश्वेशं प्रथमं नाम महातपसमात्मजम् । सर्वाश्रमपदंपुण्यं नाम्ना

---

इत्यादि अठराप्रकारचें ह्मणतात व जें सत्य अमृत त्या परम तत्त्वाचें अनुसंधान कर १३. वैशंपायनः - हें त्यांचें वचन ऐकून तो उत्तर दिशेस गेला. तेथें गेल्यावर ज्ञानदृष्टीनें तो ब्रह्मत्वास प्राप्त झाला. १४. त्यानंतर महा उदार प्रभु ब्रह्मदेवानें पुनः संकल्प करून मनानेंच दुसऱ्या भुवर्नामक मानसपुत्रास उत्पन्न केलें १५. तोही पितामहाला " मी काय करूं " असें वाक्य बोलला. पितामहानें आज्ञा केली असतां तो नारायणापाशीं सेवकभावानें जाऊन उभा राहिला १६. पण त्यांच्या योग व विचारशास्त्रांसह तो पुनः भगवत्संबंधीं पराकाष्ठेस पोंचला. ( ह्मणजे त्या शास्त्रांचाही जेथें लय होतो अशा स्थितीस पोंचला. ) तात्पर्य, त्या दोघांपाशीं गेलेला, तो परम स्थानास प्राप्त झाला. तो दुसरा पुत्रही गेला असतां प्रभूनें तिसरा पुत्र निर्मिला. तो मोक्षोपायांमध्यें फार कुशल होता. त्याला भूर्भुव या नांवानें लोक ओळखतात १७,१८. पण त्यानेंही पूर्वीच्या दोघांच्या धर्माचाच अंगीकार केला, व त्यामुळें तो त्यांच्या गतीस प्राप्त झाला. अशा प्रकारचे हे तीनही पुत्र महात्म्या शंभूचे ह्मणून सांगितलेले आहेत १९. त्याच्या त्या पुत्रांस घेऊन नारायण व यतीश्वर भगवान् कपिल आपल्या निर्विकल्प गतीस गेले २०. पण ते ज्यावेळीं मुक्त होऊन गेले त्याचवेळीं तीक्ष्ण व्रत करणारा ब्रह्मा पुनः अतिशय घोर तप करता झाला २१. पण तो एकटाच तप करणारा प्रभु ब्रह्मा रममाण झाला नाहीं. ( त्याच्या मनाला चैन पडलें नाहीं ). ह्मणून त्यानें आपल्याच शरीराच्या अर्धभागास शुभ भार्यारूपानें कल्पिलें २२. तप, तेज, कांति व नियम यांच्या योगानें आपल्यासारखी व लोकांची उत्पत्ति करण्यास समर्थ अशी भार्या उत्पन्न केली २३. त्यानंतर तपोमय ब्रह्मा तिच्याशीं तेथें रममाण होऊं लागला. त्यानें तिच्या सहायानें सर्व प्रजापती, सागर व नद्या यांस उत्पन्न केलें २४. त्यानंतर वेदमाता त्रिपदा गायत्री निर्मिली. गायत्रीपासून उद्भवणारे चार वेद केले २५. त्या पितामहानें आपल्याकरितां लोककर्ते पुत्र उत्पन्न केले. ज्यांच्यापासून सर्व लोक निघाले ते सर्व प्रजापती निर्माण केले २६. त्यानें विश्वेश नांवाच्या

धर्मं स सृष्टवान् २७ दक्षं मरीचिमत्रिं च पुलस्त्यं पुलहं क्रतुम् । वसिष्ठं गौतमं चैव भृगुमंगिरसं मनुम् २८ अथर्वभूता इत्येते ख्याताचैवमहर्षयः । त्रयोदश सुता येषां वंशा वै संप्रतिष्ठिताः २९ अदितिर्दितिर्दनुः काला ह्यनायुः सिंहिकाखसा । प्रबोधा सुरसा क्रोधा विनता कद्रुरेव च ३० दक्षस्यैता दुहितरः कन्या द्वादश भारत । नक्षत्राणि च भद्रं ते सप्तविंशतिरूर्जिताः ३१ मरीचेः कश्यपः पुत्रस्तपसा निर्मितः प्रभुः । तस्मै कन्या द्वादशेमा दक्षस्ता अन्वमन्यत ३२ नक्षत्राख्यानि सोमाय वसवे दत्तवानृषिः । रोहिण्यादीनि सर्वाणि पुण्यानि जनमेजय ३३ लक्ष्मीः कीर्तिस्तथा साध्या विश्वा कामानुगाशुभा । देवी मरुत्वती चैव ब्रम्हणा निर्मिता पुरा ३४ एताः पंच वरिष्टा वै सुरश्रेष्ठाय भारत । दत्ता धर्माय भद्रं ते ब्रम्हणा दृष्टधर्मणा ३५ या रूपार्द्धमयी पत्नी ब्रह्मणः कामरूपिणी । सुरभि सा तु गौर्भूत्वा ब्रह्माणं समुपस्थिता ३६ ततस्तामगमद्ब्रम्हा मैथुने लोकपूजितः । लोकसर्जनहेतुज्ञो गवामर्थाय भारत ३७ जज्ञे चैकादश सुतान्विपुलान्धर्मसंहितान् । रक्तसंध्याभ्रसदृशान्दहनोपमतेजसः ३८ ते रुदन्तो द्रवन्तश्च भगवन्तं पितामहम् । रोदनाद्द्रावणाच्चैव ततो रुद्रा इति स्मृताः ३९ निर्ऋतिश्चैव सर्पश्च तृतीयो ह्यज एकपात् । मृगव्याधः पिनाकी च दहनोऽथेश्वरश्च वै ४० अहिर्बुध्न्यश्च भगवान्कपालाचापराजितः । सेनानीश्च महातेजा रुद्रा एकादश स्मृताः ४१ तस्यामेव सुरभ्यां तु जज्ञे गोवृषभस्तथा । आकृष्टाश्च तथा माषाः सिकताः प्रश्रयोऽक्षताः ४२

---

पहिल्या महातपस्वी आत्मजाला जन्म दिला. सर्व आश्रमांचें स्थान अशा पुण्य धर्मनामक पुत्राला तो उत्पन्न करता झाला २७. दक्ष, मरीचि, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, वसिष्ठ, गौतम, भृगु, अंगिरस व मनु हे मागून झालेले त्याचे मानसपुत्र अथर्वभूत असून महर्षि या नांवानें प्रख्यात आहेत. त्यांतील दक्षाच्या तेरा कन्यांच्या द्वारां त्यांचे वंश प्रतिष्ठित झाले २८,२९. अदिति, दिति, दनु, काला, अनायु, सिंहिका, खसा, प्रबोधा, सुरसा, क्रोधा, विनता व कद्रु ३०. हे भारता, या बारा दक्षाच्या कन्या तशाच सत्तावीस नक्षत्रें याही त्याच्या ऊर्जित कन्या होत. तुझें देव बरें करो ३१. मरीचीचा पुत्र कश्यप. त्या प्रभूनें मरीचीनें तपानें निर्माण केलें. त्याला या बारा कन्या दक्ष देता झाला ३२. त्या ऋषीनें नक्षत्र नांवाच्या कन्या सोमसंज्ञक वसूला दिल्या. हे जनमेजया, रोहिणी प्रभृति सर्व नक्षत्रें पुण्यकारक आहेत ३३. लक्ष्मी, कीर्ति तशीच साध्या, विश्वा, शुभा कामानुगा व देवी मरुद्वती यांस पूर्वीं ब्रह्मदेवानें निर्मिलें ३४. या श्रेष्ठ पांच ( सहा ? ) कन्या ज्यानें धर्म प्रत्यक्ष पाहिला आहे अशा ब्रह्मदेवानें धर्मास दिल्या. राजा, तुझें कल्याण होवो ३५. जी अर्धशरीरमयी कामरूपिणी ब्रह्मदेवाची पत्नी तीच सुरभि गाय होऊन ब्रह्मदेवापाशीं त्याची सेवा करीत राहिली ३६. तेव्हां लोकपूजित ब्रह्मा लोकांच्या उत्पत्तीचें कारण जाणत असल्यामुळें गायींची प्रजा वाढावी या हेतूनें तिच्याशीं मैथुनभावानें संगत झाला ३७. तिच्याठायीं अकरा, मोठें, धर्मयुक्त, संध्याकाळच्या लाल अभ्रासारखे अग्नीप्रमाणें दीप्त पुत्र झाले ३८. ते मोठ्यानें रडत व पळत भगवान् पितामहाकडे गेले. रोदनामुळें व पळण्यामुळें त्यांना रुद्र असें ह्मटलें आहे ३९. निर्ऋति, सर्प, तिसरा अज, एकपाद, मृगव्याध, पिनाकी, दहन, ईश्वर ४०, भगवान् अहिर्बुध्न्य, अपराजित कपाळी व महातेजस्वी सेनानी असे ते अकरा रुद्र सांगितलेले आहेत ४१. त्याच सुरभीच्याठायीं गोवृषभ झाला. तसेच माष

अजाश्चैवैकशफाश्च तथैवामृतमुत्तमम् । ओषध्यः प्रवरा याश्च सुरभ्यां ताः समुत्थिताः ४३ धर्माल्लक्ष्म्युद्भवः कामः साध्या साध्यन्व्यजायत । भवं च प्रभवं चैवमीशानं सुरभिं तथा ४४ अरण्यं मरुतश्चैव विश्वावसुबलध्रुवौ । महिषं च तनूजं च विधानमनघं तथा ४५ मत्सरं च विभूतिं च सर्वाः सुरभिसूनवः । सुपर्वतं वृषं नागं साध्या लोकनमस्कृता ४६ वासवानुमता देवी जनयामास वै सुतान् । धरं वै प्रथमं देवं द्वितीयं ध्रुवमव्ययम् ४७ विश्वावसुं तृतीयं च चतुर्थं सोममीश्वरम् । पंचमं पर्वतं चैव योगेन्द्रं तदनन्तरम् ४८ सप्तमं च ततो वायुमष्टमं निर्ऋतिं वसुम् । धर्मस्यापत्यमित्येव सुरभ्यां समजायत ४९ विश्वेदेवास्तु विश्वायां धर्माज्जाता इति श्रुतिः । सुधर्मा च महाबाहुः शंखपाश्च महाबलः ५० उक्थश्चैव महाबाहुर्वपुष्मांश्च तथैव च । चाक्षुषस्य मनोरेते तथाऽनन्तमहीरणौ ५१ विश्वावसुसुपर्वाणौ विष्टरश्च महायशाः । रुरुश्च ऋषिपुत्रो वै भास्करप्रतिमद्युतिः ५२ विश्वेदेवान् देवमाता विश्वेशान् जनयत्सुतान् । मरुत्वती मरुत्वत्तो देवानजनयच्छुभान् ५३ अग्निश्चक्षुर्हविर्ज्योतिः सावित्रं मित्र एव च । अमरं शरवृष्टिं च संक्षयं च महाभुजम् ५४ विरजं चैव शुक्रं च विश्वावसुविभावसू । अश्मन्तं चित्ररश्मिं च तथा निष्कुपितं नृपम् ५५ नहुषं चाहुतिं चैव चारित्रं बहुपन्नगम् । बृहन्तं च बृहद्रूपं तथैव परतापनम् । मरुत्वत्यां पुरा धर्माज्जज्ञे पुत्रद्वयं शुभम् ५६ अदित्यां जज्ञिरे राजन्नादित्याः कश्यपादथ । इंद्रो विष्णुर्भगस्त्वष्टा वरुणोंऽशोऽर्यमा रविः ५७ पूषा मित्रश्च वरदो मनुः पर्जन्य एव च । इत्येते द्वादशादित्या वरिष्ठास्त्रिदिवौकसः ५८ आदित्यस्य सरस्वत्यां जज्ञे पुत्रद्वयं शुभम् । रूपश्रेष्ठं बलश्रेष्ठं त्रिदिवे

---

( उडीद ) सिकता ( रेती ) प्रश्नी ( ? )—— व अक्षता काढल्या. बकरे, एकवंश, तसेंच उत्तम अमृत, व त्याचप्रमाणें उत्तम असलेल्या औषधी सुरभीच्याठायीं झाल्या ४२,४३. धर्मापासून लक्ष्मीजन्य काम झाला. साध्या साध्यांस उत्पन्न करती झाली. भव, प्रभव, ईशान, तशीच सुरभि ४४, अरण्य, मरुत, विश्वावसु, बलध्रुव, महिष, तनूज, विधान, अनघ ४५, मत्सर, व विभूति हे सर्व सुरभीचे पुत्र होत. सुपर्वत, वृष व नाग यांस लोकनमस्कृत साध्या जन्म देती झाली ४६. इंद्रानुमता देवी या पुत्रांस उत्पन्न करती झाली. पाहिला धर देव, दुसरा अव्यय ध्रुव ४७, तिसरा विश्वावसु, चवथा सोम ईश्वर, पांचवा पर्वत व त्यानंतर योगेंद्र ४८. त्यामागून सातवा वायु व आठवा निर्ऋति वसु अशाप्रकारचीं अपत्यें धर्मापासून सुरभीच्या ठायीं झालीं ४९. विश्वेच्या ठायीं धर्मापासून विश्वेदेव झाले, असें वेदांत सांगितलें आहे. महाबाहु सुधर्मा, महाबलाढ्य शंखपा, महाबाहु उक्थ, तसाच वपुष्मान्, हे चाक्षुस मनूचे अनंतमहीरणीचे ठायीं झालेले पुत्र आहेत ५०,५१. विश्वावसु, सुपर्वा, महायशस्वी विष्टर, व सूर्यासारखा अप्रतिमतेजस्वी ऋषिपुत्र रुरु ५२. देवमाता विश्वेश्वर विश्वेदेवसंज्ञक पुत्रांस उत्पन्न करती झाली. मरुत्वती शुभ मरुत्वत्त देवांस प्रसवली ५३ अग्नि, चक्षु, हवि, ज्योति, सावित्र, मित्र, अमर, शरवृष्टि, महाभुज संक्षय ५४, विरज, शुक्र, विश्वावसु, विभावसु, अश्मंत, चित्ररश्मि, त्याचप्रमाणें निष्कुपित राजा ५५, नहुष, आहुति, चारित्र व बहुपन्नग, त्याचप्रमाणें पूर्वी धर्मापासून मरुत्वतीच्या ठायीं बृहंत व त्याचप्रमाणें शत्रूंना पीडा देणारा बृहद्रूप असे दोन शुभ पुत्र झाले ५६. हे राजन्, कश्यपापासून अदितीच्या ठायीं आदित्य झाले. इंद्र, विष्णु, भग, त्वष्टा, वरुण, अंश, अर्यमा, रवि ५७, पूषा, मित्र, वरद मनु व

रूपिणां वरम् ५९ दनुस्तु दानवान् जज्ञे दितिर्दैत्यान्व्यजायत । कालानुकालकेयांश्च ह्यसुरान्राक्षसांस्तथा ६० अनायुषायास्तनयाव्याधयश्चाधयस्तथा । सिंहिका ग्रहमाता च गंधर्वजननी मुनिः ६१ प्रबोधाप्सरसः श्रेष्ठा सुरसायां सरीसृपाः । क्रोधायाः सर्वभूतानि पिशाचाश्चैव भारत ६२ तथा यक्षगणाश्चैव गुह्यकाश्च विशांपते । चतुष्पदानि सर्वाणि ऋते गावस्तु सौरभाः ६३ अरुणो गरुडश्चैव विनतायां व्यजायत । महीधरान्सर्पनागान्देवी कद्रूर्व्यजायत ६४ एवं विवृद्धिमगमन्विश्वे लोकाः परस्परम् । तदा पौष्करके राजन्प्रादुर्भावे महात्मनः ६५ पुराणं पौष्करे चैव मया द्वैपायनाच्छ्रुतम् । कथितं तेन पूर्वेण यत्कृतं परमर्षिभिः ६६ यश्चेदमग्र्यं प्रथमं पुराणं सदाऽप्रमत्तः पठते महात्मा । अवाप्य कामानिह वीतशोकः परत्र स स्वर्गफलानि भुंक्ते ६७ [ ८६ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

जनमेजय उवाच ॥ श्रुतं नः परमं ब्रह्मन्स्ववंशचरितं महत् । दिव्यमन्योन्यसंभूतं मानितं बहुभिर्गुणैः १ छंदोभिर्वृत्तसंजालैः समासैश्च सविस्तरैः । लघुभिर्मधुराभाषैर्ग्रथितं पदविग्रहैः २ त्रिवर्गेणाभिसंपन्नं धर्मेणार्थेन भोगिनाम् । कामेन बहुरूपेण शरीरान्तर्गतेन च ३ ब्राह्मणानां प्रभावैश्च योधानां च पराक्रमैः । वैरनिर्यातनैश्चैव प्रतिज्ञानां च पारगैः ४ रिपुस्तवसुसंपन्नैर्नानुबन्धः प्रचोदितः । वंशयोगविनाशाय नृपेणसहविग्रहात् ५ ये च तस्मिन्म-

---

पर्जन्य हे बारा आदित्य वरिष्ठ देव आहेत ५८. आदित्याला सरस्वतीच्या ठायीं दोन शुभ पुत्र झाले. एक रूपश्रेष्ठ व दुसरा बलश्रेष्ठ. ते दोघेही स्वर्गांतील रूपवान्नांत उत्कृष्ट होते ५९. दनु दानवांस प्रसवली. दितीनें दैत्यांना जन्म दिला. कालानें अनुकालकेयांस, असुरांस व राक्षसांस उत्पन्न केलें ६०. आधी व व्याधी हे हे अनायुषेचे पुत्र होत. सिंहिका ही ग्रहांची माता. मुनि खसा ही गंधर्वांची जननी. प्रबोधेला श्रेष्ठ अप्सरा झाल्या. सुरसेच्या उदरीं सर्प जन्माला आले. हे भारता, क्रोधच्याठायीं सर्व भूतें व पिशाच ६१,६२, त्याचप्रमाणें हे राजा, यक्षगण, गुह्यक आणि सुरभीपासून झालेल्या गायीबैलावाचून बाकीचे सर्व चतुष्पाद प्राणी झाले ६३. अरुण व गरुड हे विनतेच्या उदरीं जन्मले. पर्वत, सर्प व नाग यांना देवी कद्रू जन्म देती झाली ६४. हे राजन्, त्या महात्म्याच्या पौष्कर प्रादुर्भावामध्यें याप्रमाणें सर्व लोक परस्पर वृद्धि पावले ६५. हे पौष्करसंबंधीं पुराण मीं द्वैपायनापासून ऐकलें व त्या पूर्व मुनीनें जें केलें तेंच परमऋषींनीं पुढें सांगितलें ६६. जो महात्मा हें सर्वोत्तम प्रथम पुराण सदा अप्रमत्त राहून पढतो तो या लोकीं शोकरहित होऊन इष्ट मनोरथांस प्राप्त होतो. आणि परलोकीं स्वर्गफलें भोगतो ६७. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा चवदावा अध्याय समाप्त झाला. ॥ १४ ॥

जनमेजयः—हे ब्रह्मन्, आमच्या मोठ्या वंशाचें उत्तम चरित्र ऐकलें. तें दिव्य, अन्योन्यसंभूत व अनेक गुणांनीं मान्य झालेलें आहे. तें वृत्तांच्या योगानें उत्तम बनलेल्या छंदांनीं आणि संक्षिप्त व विस्तृत, लघु व मधुरभाषायुक्त पदविग्रहांनीं ग्रथित केलेलें आहे १,२. भोगी पुरुषांच्या शरीरगत बहुरूपी कामानें, धर्मानें व अर्थानें अशा त्रिवर्गानें तें संपन्न आहे ३. ब्राह्मणांच्या प्रभावांनीं, योध्यांच्या पराक्रमांनीं, वैऱ्यांचा सूड घेण्यांनीं, प्रतिज्ञांच्या पार जाण्यांनीं ४ व शत्रूंच्या स्तुतींनीं तें सुसंपन्न आहे. राजाशीं

हारौद्रे संग्रामे निहता नृपाः । तेषां सर्वाणि राष्ट्राणि पुत्राः सर्वे प्रपेदिरे ॥ कौरवः प्रथितो
राजा भगवच्छासनानुगः ६ धर्मश्च बहुधा प्रोक्तस्त्रयाणां वर्णसंपदा । शूराणामपि विख्यातः
स्वर्गहेतुर्द्विजर्षभ ७ अनुग्रहार्थं भूतानां नोत्सेकाय कथंचन । चतुर्णां वर्णसंज्ञानां पृथक्पृथ-
गनेकधा ८ गर्भवासंप्रवर्तंतश्च भूतानां संप्रबोधिताः । पृच्छतां देवसंचारे क्षीणे क्षीणेचकर्माणि ९
दाने यश्चापि संयोगः स चापि बहुधाकृतः । द्वाभ्यां संयोगविहितामधुवाग्वचनं तयोः १०
न तच्छक्यं मयाख्यातुं भारताध्ययनं महत् । एकाहेन महाब्रह्मन्नपि दिव्येन चक्षुषा ११
ब्रह्मणोह्यस्तु विस्तारं संक्षेपं च सुसंग्रहम् । श्रोतुमिच्छामि भगवन्महत्कौतूहलं हि मे १२
[ ४९८ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

वैशंपायन उवाच ॥ शृणुष्वैकमना राजन् पंचेंद्रियसमाहितः । कथां कथयतो राजन्नि-
र्विकारेण चेतसा १ ब्रह्मसंबंधसंबद्धमबद्धं कर्मभिर्नृप । पुरस्ताद्ब्रह्मसंपन्नं ब्रह्मणो यददक्षि-
णम् २ अव्यक्तं कारणं यत्तन्नित्यं सदसदात्मकम् । निष्कलः पुरुषस्तस्मात्संबभूवात्म-
योनिजः ३ दिव्यो दिव्येन वपुषा सर्वभूतपतिर्विभुः । अचिन्त्यश्चाव्ययश्चैव युगानां प्रभवा-
व्ययः ४ अभूतश्चाप्यजातश्च सर्वत्र समतां गतः । अव्यक्तात्परमं यत्तन्नारायणविदो विदुः ५

---

युद्ध करून वंशाचा सर्वथा विनाश करण्याकरितांच तो त्यांचा कलहसंबंध प्रवृत्त झाला होता ५. जे राजे त्या महाभयंकर संग्रामांत मारले गेले त्यांचीं सर्व राष्ट्रें त्यांच्या सर्व पुत्रांस प्राप्त झालीं. भगवानाच्या आज्ञेप्रमाणें वागणारा धर्म कौरवांचा प्रख्यात राजा झाला ६. वर्णसंपत्तीनें युक्त असलेल्या त्रैवर्णिकांचा धर्म बहुतप्रकारें सांगितला. हे ब्राह्मणश्रेष्ठा, शूरांचा प्रख्यात स्वर्गहेतु धर्माचेंही प्रतिपादन केलें ७. भूतांवर अनुग्रह करण्याकरितां, उच्छेद करण्याकरितां नव्हे, चारीवर्णांच्या लोकांचे पृथक् पृथक् अनेकप्रकारचे धर्म सांगितले ८. गर्भवासांत पडणाऱ्या भूतांस जागें केलें. देवसंचार क्षीण झाला असतां व कर्म क्षीण झालें असतां प्रश्न करणाऱ्या लोकांस उद्देशून दानाविषयींचा संयोगही बहुतप्रकारें वर्णिला. तुम्हीं दोघांनीं मिळून मधुर वाणीचा त्यांत संयोग केला आहे. त्या तुमचें ( व्यास वैशंपायनांचें ) वचन अमृतासारखें मधुर आहे ९,१०. त्या भारताच्या मोठ्या अध्ययनाचें वर्णन करून सांगणें मला शक्य नाहीं. हे महाब्रह्मन्, एका दिवसांत दिव्य दृष्टीनेंही त्याचें अवलोकन करतां येणें शक्य नाहीं ११. असो; आतां ज्ञानयज्ञाचा चांगला संग्रह करतां येण्यासारखा विस्तार व संक्षेप मी ऐकण्याची इच्छा करीत आहे. त्याविषयीं मला मोठें कौतुक वाटत आहे १२. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा पंधरावा अध्याय समाप्त झाला. ॥ १५ ॥

वैशंपायनः—हे राजन्, पांची ज्ञानेंद्रियांस शांत करून एकमनानें ऐक. हे भूपाला, कथा सांगत असलेल्या माझें भाषण निर्विकार चित्तानें ऐक १. हें माझें सांगणें वेदसंबंधानें संबद्ध आहे. पण त्याचा कर्मांशीं संबंध नाहीं. तें ब्रह्मज्ञांना पूर्वींच प्राप्त असून कर्मांच्या योगानें कधींही प्राप्त होत नाहीं २. अव्यक्त, नित्य व सदसदात्मक असें जें कारण तोच स्वयंभू निष्कल पुरुष होय. त्याच्यापासून अहंकाररूप अज्ञानप्रधान अहं अशा प्रकारचा प्रथमाध्यास उत्पन्न झाला ३. तो दिव्य सर्व भूतपति विभु दिव्य आकारानें प्रकट झाला. तो अचिंत्य व अव्यय आत्मयोनिज युगांचा उद्भव व लय आहे ४. तो अजात म्हणजे उत्पन्न झालेला नसल्यामुळें तिन्ही काळीं असिद्ध आहे. असा असूनही

सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोक्षिशिरोमुखम् । सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ६
असतश्च सतश्चैव विज्ञेयं तत्र कारणम् । अव्यक्तो व्यक्तरूपस्थश्चरन्नपि न दृश्यते ७ विका-
रपुरुषोऽव्यक्तो ह्यरूपी रूपमाश्रितः । चरत्यचिन्त्यः सर्वेषु गूढोऽग्निरिव दारुषु ८ भूतभव्यो-
द्भवो नाथः परमेष्ठी प्रजापतिः । प्रभुः सर्वस्य लोकस्य नाम चास्येति तत्त्वतः ९ अपदात्तु
पदो जातस्तस्मान्नारायणेऽभवत् । अव्यक्तो व्यक्तिमापन्नो ब्रम्हयोगेन कामतः १० ब्रह्मभावे
च तं विद्धि सशब्दं लब्धवान्प्रभुः । प्रभुः सर्वस्य लोकस्य स्थावरस्येतरस्य च ११ अहं
त्विति स होवाच प्रजाः स्रक्ष्यामि भारत । प्रभवः सर्वभूतानां यस्य तन्तुरिमाः प्रजाः १२
स्वभावाज्जायते सर्वं स्वभावाच्च तथाभवत् । अहंकारः स्वभावाच्च तथा सर्वमिदं जगत् १३
सर्वव्यापी निरालंबो ह्यग्राह्योऽथ जयो ध्रुवः । एवं ब्रह्ममयो ज्योतिर्ब्रह्मशब्देन शब्दितः १४
अव्यक्तो व्यक्तिमापन्नः पंचभिः क्रतुलक्षणः । धारयन् ब्रह्मणोव्यक्तं विविधं चिन्तितं त्वरन् १५
अथ मूर्तिं समाधाय स्वभावाद्ब्रह्मचोदितः । ससर्ज सलिलं ब्रह्मा येन सर्वमिदं ततम् १६

---

सर्वत्र समरूप आहे. नारायणास जाणणारे अव्यक्ताहून पर असें जें कांहीं अनिर्वाच्य तत्त्व जाणतात तें तो होय ५. तें तत्त्व सर्वतः पाणिपादयुक्त, सर्वतः नेत्र–मस्तक–भूषित व सर्वतः कर्णयुक्त असून सर्व लोकांत सर्वाला व्यापून राहिलें आहे ६. असत् कारण व सत् कार्य या दोघांचेंही कारण ( कल्पक अज्ञान ) तेथें आहे. व्यक्तरूप वस्तूमध्यें राहून सर्व व्यवहार करीत असूनही तें स्वभावतः अव्यक्त असलेलें तत्त्व बाह्य ज्ञानसाधनांनीं दिसत नाहीं ७. इंद्रियादिकांच्या योगानें विकार पावून कांहींसा व्यक्त होणारा तो पुरुष अव्यक्त व अरूपीच असतां तो दुसऱ्या रूपवान् पदार्थांचा आश्रय करतो. तो अचिंत्य पुरुष काष्ठांतील अग्नीप्रमाणें सर्व भूतांमध्यें गुप्त राहून व्यवहार करितो ८. तो भूत व भव्य यांचा उद्भव, नाथ, परमेष्ठी, प्रजापति व सर्व लोकांचा प्रभु असून तत्त्वतः त्याला अहं असें नांव पडलें आहे ९. अज्ञानापासून तो अहंनामा अहंकार झाला आहे. तो शुद्ध अशाही नारायणाचे ठायीं अनादिकालापासून अध्यस्त आहे. तो अहंकारही वस्तुतः अज्ञानरूप म्ह. अव्यक्त असूनही अधिष्ठानभूत ब्रम्हाच्या सत्तेनें व्यापल्यामुळें अनादि रागादि वासनावशात् व्यक्त झाला आहे १०. तो पदसंज्ञक अहंनामा पुरुष ब्रम्हभावामध्यें स्थित आहे, असें जाण. त्यामुळेंच त्याला ब्रह्मा हा शब्द प्राप्त झाला व तो प्रभुत्वादि युक्त झाला. तो सर्व स्थावर जंगम जगाचा प्रभु आहे ११. हे भारता, मी आतां प्रजा उत्पन्न करतों असें तो म्हणाला व त्यामुळें " अहं " या नांवानें प्रख्यात झाला. तो सर्व भूतांच्या उत्पत्तीचें कारण आहे. ह्या सर्व प्रकारच्या प्रजा हा त्याचाच तंतु आहे १२. सर्व अनादिसिद्ध स्वभावानें होतें, असा सिद्धांत आहे. व त्याप्रमाणें सर्व स्वभावापासून झालें आहे. अहंकार स्वभावापासून झाला. तसेंच हें सर्व जगत् त्याच्यापासून उद्भवलें १३. तो अहंकार समष्टीवर "मी" असा अभिमान ठेवीत असल्यामुळें सर्वव्यापी, असंग ज्ञानवान् असल्यामुळें निरालंब ( निराधार ), अपरिभाव्य, जयवान्, नित्य व ब्रह्ममय ज्योतिरूप असून ब्रह्मा या शब्दानें बोलला जातो १४. तो स्वरूपतः अव्यक्त असला तरी पांच सूक्ष्म भूतांच्या व संकल्पमात्र भावांच्या योगानें पुरुषाकृतीस प्राप्त झाला व मोठ्या त्वरेनें वेदाज्ञेप्रमाणें केवल संकल्पानेंच व्यक्त होणारें नानाप्रकारचे सर्व वस्तु जात धारण करूं लागला १५. ज्यानें हें सर्व

वायुं पूर्वमयोसृष्ट्वा यो धातुर्धातृसत्तमः । धारणाद्धातृशब्दं च लभते लोकसंज्ञितम् १७ तदेतद्वायुसंभूतं कृत्स्नं जगदभूत्पुरा । एतद्देवैरतिक्रान्तं पूर्वमेव सरस्वति १८ पृथक्त्वं समितं तोयं पृथिवीशब्दमिच्छता । घनत्वाच्च द्रवत्वाच्च निखिलेनोपलभ्यते १९ फलत्वात्सीदमाना च सलिले सलिलोद्भवः । व्याजहार शुभां वाणीं समंतात्पूरयन्निव २० ऊर्ध्वाहं स्थातुमिच्छामि संसीदाम्युद्धरस्व माम् । गंभीरे तोयविवरे मूर्तिविक्षोभितान्तरम् २१ ततो मूर्तिधरा देवी सर्वभूतप्ररोहिणी । यथायोगेन संभूता सर्वत्र विषयैषिणी २२ श्रुत्वा च गदितं तस्या गिरं तां च सुभाषिताम् । वराहरूपमास्थाय निपपात महार्णवे २३ उद्धृत्य सोवनिं तोयात्कृत्वा कर्म सुदुष्करम् । समाधौ प्रलयं गत्वा प्रलीनो न च दृश्यत २४ यत्तद्ब्रह्ममयं ज्योतिराकाशमिति संज्ञितम् । तत्र ब्रह्मा समुद्भूतः सर्वभूतपितामहः २५ अद्यापि मनसा धात्रा धार्यते सर्वयोगिना । ज्ञानयोगेन सूक्ष्मेण प्रजानां हितकाम्यया २६ भित्वा तु पृथिवीमध्यमुपयाति समुद्भवम् । तपनस्तूर्ध्वमातिष्ठद्रश्मिभिःप्रदहन्निव २७ तस्य मण्डलमध्यात्तु निःसृतं सोममण्डलम् । स सनातनजो ब्रम्हा सौम्यं सोमत्वमन्व गात् २८ सोममण्डलप—

---

व्यापलें आहे त्या स्वभावरूप ब्रह्मदेवानें प्रेरणा केला गेलेला तो आपल्या मूर्तीस स्थिर ( निश्चळ, शांत ) करून जल निर्मिलें १६. ईश्वराच्या वशवर्ती असणाऱ्या मरीच्यादि प्रजापतींतील श्रेष्ठ अशा त्यानें जलोत्पत्तीच्या पूर्वी वायूला निर्मिलें व सर्व सृष्टीचें धारण केल्यामुळें लोकांनीं योजलेल्या धातृशब्दास तो प्राप्त झाला १७. याप्रमाणें स्थूल वायूपासून अग्नि, जल इत्यादि क्रमानें हें सर्व जग पूर्वी झालें. पण पूर्वींच समुद्रांत स्थित असलेल्या त्याला देवांनीं आपल्या अधीन करून घेतलें १८. पृथ्वी या शब्दाचा अर्थ अशा या भूलोकीं लोकांस रहातां यावें या इच्छेनें समुद्राचें जल पृथ्वीहून निराळें केलें. घनत्व व द्रवत्व या भिन्न धर्मांवरून पृथ्वी व जल यांचें पृथक्त्व सर्वांच्या अनुभवास येतें १९. कार्यरूप असल्यामुळें कारणरूप जलांत विलीन होणारा जलोद्भव भूदेवता पुरुष समंतात् भाग भरून सोडीत असल्याप्रमाणें शुभ वाणी उच्चारता झाला २०. मी वर उभा राहण्याची इच्छा करीत आहें. या गंभीर जलाच्या विवरांत ढेंकळाप्रमाणें मी विरघळत आहें. माझी मूर्ति घन झालेली असल्यामुळें माझा अंतर्भाग अतिशय क्षुब्ध होत आहे. यास्तव मला वर काढ. माझा उद्धार कर २१. त्यानंतर स्थानाची इच्छा करणारी व सर्व भूतांस उत्पन्न करणारी मूर्तिमती पृथ्वी देवी बुडत आहे अशा अवस्थेंत सर्व दिशांकडे तोंड करून मला वर काढ, मला वर काढ, असा आक्रोश करीत सर्वत्र दिसूं लागली २२. तिचें तें स्पष्ट भाषण व सुभाषितरूप वाणी ऐकून नारायण वराहरूप घेऊन महासागरांत पडला २३. व पृथ्वीला जलांतून वर काढून व तें तसलें अतिशय दुष्कर कर्म करून तो समाधींत जाऊन अगदीं लीन झाला. त्यामुळें कोणास दिसेना २४. तें जें आकाशसंज्ञक ब्रह्ममय तेज त्यांत सर्व लोकपितामह ब्रह्मा उत्पन्न झाला २५. व अद्यापि त्या सर्व योगी धात्याकडून मनानें हें सर्व धारण केलें जातें. प्रजांचें हित करण्याच्या इच्छेनें सूक्ष्म ज्ञानयोगानें तो पृथ्वीचें धारण करतो २६. पण त्यानें पृथ्वीला अशा रीतीनें धारण केलें होतें तरी पृथ्वीचें कारण जल पृथ्वीच्या मध्यभागास फोडून वर निघालें. तों इतक्यांत सूर्य आपल्या किरणांनीं जणुंकाय अतिशय दाह करीत वर राहिला २७. त्याच्या मंडलांतून सोममंडल निघालें. तो सनातन ब्रम्हापासून झालेला सोम ब्राम्हण, ब्रम्ह विद्यावान् व उत्पन्न होतांच

र्यन्तात्पवनः समजायत । तदक्षरमयं ज्योतिस्तेजोभिरभिवर्धयन् २९ स तु योगमयाज्ज्ञानात्स्वभावाद्ब्रह्मसंभवात् । सृजते पुरुषं दिव्यं ब्रह्मयोनिं सनातनम् ३० द्रवं यत्सलिलं तस्य घनं यत्पृथिवी भवत् । छिद्रं यच्च तदाकाशं ज्योतिर्यच्चक्षुरेव तत् ३१ वायुना स्पन्दते चैमं संघाताज्ज्योतिसंभवः । पुरुषात्पुरुषो भावः पंचभूतमयो महान् ३२ भूतात्मा वै समे तस्मिंस्तस्मिन्देहः सनातनः।गुहायां निहितं ज्ञानं योगाध्यक्षः सनातनः ३३ तपनस्यैव तद्रूपं योऽग्निर्वसति देहिनाम् । शरीरे नित्यशो युक्ते धातुभिः सह संगतः ३४ स्वभावात्क्षयमायाति स्वभावाद्भयमेति च। स्वभावाद्विन्दते शान्तिं स्वभावाच्च न विन्दति ३५ इंद्रियैरतिमूढात्मा मोहितो ब्रह्मणः पदे । संभवं निधनं चैव कर्मभिः प्रतिपद्यते ३६ यावत्तद्ब्रम्हविषयं नोपयातीह तत्त्वतः । तावत्संसारमाप्नोति संभवांश्च पुनः पुनः ३७ इंद्रियैर्व्यतिरिक्तो वै यदा भवति योगवित् । तदा ब्रम्हत्वमापन्नः प्रलयाग्रे प्रतिष्ठति ३८ प्रतिषिद्धममुं लोकं ब्रम्हवान्स भवत्युत । न च रागव्ययैर्याति न च सज्जति कर्हिचित् ३९ आगतिं च गतिं चैव निधनं संभवं तथा । भूतेभ्यो वेत्ति सर्वज्ञः परां सिद्धिमुपागतः ४० आत्मनो गतयश्चैव तथा विषयगोचरे ॥

---

ब्रम्हवेत्ता झाला २८. त्या सोमाच्या मुखप्रदेशापासून वायु निःश्वास झाला. तो निश्वासच वेदरूप ज्योति होऊन तिला तो स्वतेजानें वाढवूं लागला २९. सूर्यमंडलपर्यंत आधिदैविक पदार्थांना उत्पन्न करणारा ईश्वर सोमाख्य कार्यापासून वेद प्राप्त करून घेऊन स्वाभाविक जन्मांतरीय योगप्रभावानें उत्पन्न झालेल्या प्रकाशानें त्यास वाढविता झाला आणि ब्रम्हसत्तेनें जागें केल्यामुळें तो ब्रम्हयोनि सनातन दिव्य पुरुष उत्पन्न करिता झाला ३०. सारांश द्रवरूप जल होतें तीच घनरूप पृथ्वी झाली व छिद्ररूप असलेलें जें तत्त्व तेंच आकाश बनलें. ज्योतीच चक्षुरिंद्रिय झालें ३१. प्राणवायूच्या योगानें हा देहरूप संघात स्पंद करतो. त्या सस्पंद देहापासूनच ज्योतीचा संभव होतो. याप्रमाणें पुरुषापासून पुरुषाकार मोठा पंचभूतमय भाव उद्भवतो ३२. सर्व शरीरधारी प्राण्यांचे ठायीं सम असलेल्या पांचभौतिक संघातांत तो भूतात्मा जीव अनादि कालापासून रहातो व भूतसंघातमय देह त्याच्या आधारानें असतो. देहान्तर्गत बुद्धिलक्षण गुहेंत ज्ञान सांठविलेलें आहे. त्या ज्ञानाचा साक्षी ( ज्ञाता ) ईश्वर आहे ३३. देहवानांच्या देहांत असणारा अग्नि हें सूर्याचेंच रूप आहे व हें परमात्म्याचें रूप आहे. यास्तव सतत युक्त असलेल्या शरीरांत तो धातूंशीं संगत झालेला असतो ३४. पूर्व संस्कारांमुळें तो क्षय व ऐश्वर्याविषयींचें भय यांस प्राप्त होतो. संस्काररूप स्वभावामुळेंच त्याला शांति मिळते व प्रसंग विशेषीं मिळत नाहीं ३५. इंद्रियांच्या योगानें ज्याचें चित्त अति मूढ झालें आहे असा तो ब्रह्मपदाविषयीं मोहित झाला आहे. जन्म व मरण त्याला कर्मांच्या योगानेंच प्राप्त होतें ३६. जोंपर्यंत तो यालोकीं तत्त्वतः ब्रह्मविषयास प्राप्त होत नाहीं तोंपर्यंत संसारास व वारंवार जन्मांस प्राप्त होतो ३७. पण जेव्हां तो इंद्रियें व त्यांचे विषय यांचें उल्लंघन करतो व योगबलवान् होतो तेव्हां ब्रह्मत्वास प्राप्त झालेला तो स्वरूपानंदांत प्रतिष्ठा पावतो ३८. या विषयानंदमय लोकास प्रतिषिद्ध करून तो ब्रम्हवान् होतो ( निर्विकल्पपदभाक् होतो. ) तो रागादिकांच्या योगानें क्षीण होत नाहीं ( तर त्यांस जिंकून सोडतो. ) तो कोठेंही आसक्त होत नाहीं ३९. परम सिद्धीस प्राप्त झालेला तो सर्वज्ञ भूतांचा उत्कर्ष, अपकर्ष, मरण, उद्भव इत्यादि जाणतो ४०. परम पदीं स्थित असलेला

पुरस्तात्कर्मनिर्वृत्तेः पदे ब्रम्हा प्रतिष्ठितः ४१ चित्त ग्रन्थींश्च मनसा रुन्ध्यात्पूर्वाश्च यातनाः । भिद्यमानाः प्रलोभेन वायुभिन्नमिवार्णवम् ४२ पच्यते हृदयं नीलं परेभ्यो ज्ञानचक्षुषा । ब्रम्हप्रोक्तानिवात्मा वै विमुक्तो देहबन्धनात् ४३ सृजेदपि परं लोकं संहरेदपि विद्यया । तेजोमूर्तिरिवाविद्धमिह लोकं च संसृजेत् ४४ तिर्यग्योनौ गतांश्चैव कर्मभिर्नियमोपमैः । तान्यपि प्रतिमुच्येत ब्रम्हयुक्तेन चेतसा ४५ अक्षरं च क्षरं चैव योगकर्माभिविद्यते । न क्षरं विद्यते तत्र यद्ब्रम्ह कर्मभिर्ध्रुवम् ४६ [ ५४४ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

वैशंपायन उवाच ॥ पृथिव्यां यत्कृतं छिद्रं तपनेन विवर्धता । तस्मिन्न्यस्तोऽथ मैनाकः स्वभावविहतोऽचलः १ पर्वभिः पर्वतत्वं च लभते नाम संज्ञितम् । अचलादचलत्वं च स्वभावान्मेरुरेव सः २ तस्य पृष्ठे सुविस्तीर्णे नगस्य सुमहर्धिमान् । तस्मिंस्तु पुरुषो व्यक्तो वसति ज्योतिसंभवः ॥ विहितश्च स्वभावेन तेनैव परमात्मना ३ यत्तद्ब्रम्हमयं तेजो निहितं शिरसोंतरे । तस्य ज्योतिर्मयं रूपं दीप्तं पुरुषविग्रहम् ४ वदनादभिनिष्क्रांतं ज्वलन्तमिव तेजसा । चतुर्भिर्वदनैर्युक्तं चतुर्भिश्च द्विजोत्तमैः ५ वक्त्रं ब्रम्हसमुद्भूतं ब्रम्हा ब्राम्हणपुंगवः । तदेव तन्महाभूतं पुनर्भावत्वमागतम् ६ उद्धृता पृथिवी देवी पुरस्तात्सलिलाशयात् । ब्रम्हत्वं ब्रम्हणः स्थाना-

---

ब्रम्हवेत्ता मुक्तीचे उपाय, भूत, भविष्यत् विषय पुढें मिळणारीं कर्मफलें या सर्वांस जाणतो ४१. कामादि चित्तग्रंथींस व वायूनें क्षुब्ध केलेल्या सागराप्रमाणें विशेष लोभामुळें पृथक् झालेल्या पूर्व यातनांस मनानें निरुद्ध करावें. ( त्यांना प्रतिबंध करावा. ) ४२. ज्ञानदृष्टीनें कामादिकांपासून निरुद्ध केलेलें चित्त वेदांत सांगितल्याप्रमाणें शुद्ध होतें. व त्यामुळें आत्मा देहबंधनापासून मुक्त होतो ४३. नंतर तो साक्षात् ईश्वर होत असल्यामुळें आपल्या विद्येनें दुसऱ्या लोकालाही उत्पन्न करील. किंवा एकाद्या लोकाचा संहारही करील. अथवा तेजोमूर्तीप्रमाणें तो एखादा अविद्ध लोकही येथें निर्माण करील ४४. ब्रह्ममध्यें योजिलेल्या चित्तानें शुभसंकल्प करून खोड्याप्रमाणें प्राण्यांचें नियमन करणाऱ्या कर्मांच्या योगानें तिर्यक्–योनींत पडलेल्या जीवांनाही तो मुक्त करूं शकेल ४५. कर्म योगाख्य साधनामध्यें क्षर व अक्षर असें दोन्ही प्रकारचें कर्मफल व्यापून राहिलेलें असतें. पण ब्रह्म नित्य असल्यामुळें त्यांत कर्मांच्या योगानें प्राप्त होणारें क्षर फल नसतें ४६. इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० सोळावा अध्याय समाप्त झाला. ॥ १६ ॥

वैशंपायनः— वृद्धि पावणाऱ्या सूर्यानें पृथ्वीमध्यें जें छिद्र केलें होतें त्यांत स्वभावतःच झालेला मैनाक पर्वत ठेवला गेला १. पर्वें ह्मणजे कामना पूर्ण करणारे चिंतामणि, कामधेनु, कल्पद्रुमादिक पदार्थ. त्यांच्या योगानें त्याला पर्वतत्व प्राप्त होतें. ह्मणजे पर्वत हें त्याचें संकेतित नांव आहे. तो चलनरहित असल्यामुळें अचल होतो. पण स्वभावतः तो मेरुच होय २. त्या पर्वताच्या अति विस्तृत पृष्ठभागीं ज्योतीपासून उत्पन्न झालेला व्यक्त व महाऋद्धिमान् पुरुष रहातो. त्या परमात्म्यानेंच स्वभावानें त्याला केलें आहे ३. तें जें प्रसिद्ध ब्रह्ममय तेज तें मस्तकांत ठेवलें. त्याचेंच तें दीप्त, पुरुषाकृति ज्योतिर्मय रूप होय ४. तेजानें दीप्त असल्याप्रमाणें तें तोंडांतून निष्पन्न झालें. तें चार मुखें व चार उत्तम द्विज यांनीं युक्त होतें ५. ते ब्रम्हापासून उत्पन्न झालेलें मुख ( वेद ) होय. ब्रम्हा ब्राम्हणश्रेष्ठ आहे.

द्लोको लोकतां गतः ७ पद्संधौ ब्रम्हलोकं शृंग मेरोस्तदाभवत् । उच्छ्रितं योजनशतं सहस्र शतमेव च ८ एवमेव च विस्तारं चतुर्भिर्गुणितं गुणैः। अथवा नैव संख्यातुं शक्यं भूतेन केनचित् । समाः सहस्रं बहुभिरपि दिव्येन तेजसा ९ चतुर्भिः पार्श्वविस्तारैः शिलाभिरभिसंवृतैः। नगस्य यस्य राजेन्द्रविस्तारैः शतयोजनैः १० कोटिकोटीशतत्पुत्रैर्गुणितं ब्रम्हवादिभिः । योगयुक्तैः सदासिद्धैर्नित्यं ब्रम्हपरायणैः ११ मरुद्भिः सह देवेंद्रैरुद्रैर्वसुभिरेव च । आदित्यैर्विश्वसहितै ररक्ष वसुधाधिपान् १२ ररक्ष पृथिवीं चैव भगवान्विष्णुना सह । विवस्वद्वरुणाभ्यां च संघातं ममितां नृप १३ तेन ब्राम्हेण वपुषा ब्रम्हप्राप्तेन भारत । यत्तद्विष्णुमयं तेजः सर्वत्र समतां गतम् १४ यत्तब्रह्मेति वै प्रोक्तं ब्राम्हणैर्वेदपारगैः । नियमैर्बहुभिः प्राप्तैः सत्यव्रतपरायणैः १५ एवमेते त्रयो लोका ब्राम्हेऽहानि समाहिताः । अहनि ब्रम्हचाव्यक्तं व्यक्तं प्राणे प्रतिष्ठितम् १६ ब्राम्हणो नियतं कर्म प्रभावेन प्रचोदितम् । प्रवर्तमानं भावेन शश्वदच्छलवादिनाम् १७ एतद्धितमिति प्रोक्तं ब्राम्हणैर्वेदपारगैः । यदेकं ब्रम्हणः पादं दिष्टत्वं ममितं पदम् १८ बहुत्वाद्विप्रभावानां विश्वशब्दः प्रयुज्यते। ब्राम्हणे-

---

तेंच तें महाभूत पुनः भावत्वास प्राप्त झालें ६. त्यानें पूर्वी जलाशयांतून पृथ्वीदेवीचा उद्धार केला. ब्रम्हाच्या स्थानास म्हणजे मेरुपृष्ठास प्राप्त होऊन तेच ब्रम्हत्वास ( चतुर्मुखत्वास ) प्राप्त झालें. याप्रमाणें अव्यक्त असाही पृथ्वीचा उद्धार करणारा व्यक्त झाला ७. तेव्हां पदसंधीमध्यें मेरूचें शृंग ब्रम्हलोक झालें. तें शृंग शेंकडों व सहस्रावधि योजनें उंच होतें ८. असाच याच्या चौपट त्याचा विस्तार होता. अथवा त्याची लांबी-रुंदी-उंची कोणत्याही प्राण्याला दिव्य ज्ञानानें अनेक सहस्र वर्षांनींही मोजतां येणें शक्य नाहीं ९. शिलांनीं व्याप्त असलेले त्या पर्वताचें चार पार्श्वविस्तार हे राजेंद्रा, शेंकडों योजनें विस्तीर्ण होते १०. पण त्यांचें यथार्थ प्रमाण कोणालाही कळलें नाहीं. ब्रम्हदेवाच्या वेदवेत्त्या, योगयुक्त, सदा सिद्ध, व नित्य ब्रह्मपरायण पुत्रांनीं त्याची गणना असंख्य वेळां केली ११. देवेंद्रांसह वायूंनीं, रुद्रांनीं, वसूंनीं, विश्वेदेवांसह आदित्यांनींही त्याचें प्रमाण जाणलें नाहीं. असो; वर सांगितलेल्या या सर्वांसह पितामहाच्या स्वरूपानें भगवान् पृथ्वीपतीचें व पृथ्वीचें रक्षण करूं लागला. राजा, सूर्य व वरुण यांसह संघातास प्राप्त झालेल्या पृथ्वीचें तो विष्णुसह रक्षण करूं लागला १२,१३. हे भारता, परमात्म्यानें ब्रह्मापासून प्राप्त झालेल्या त्या ब्राह्मस्वरूपानेंच हें सर्व केलें. विष्णुमय तेज सर्वत्र समतेस प्राप्त झालें आहे १४. अनेक नियमांनीं युक्त असलेल्या, सत्यव्रतपरायण व वेदपारग ब्राह्मणांनीं त्यालाच ब्रह्म असें ह्मटलें आहे १५. असो; याप्रमाणें हे तीन लोक ब्राह्म दिवसामध्यें समाहित आहेत. त्या दिवशीं अव्यक्त असलेलें ब्रह्म प्राणामध्यें व्यक्त होऊन प्रतिष्ठित झालें आहे, असा अनुभव येतो १६. ईश्वराच्या निःश्वसित मात्र प्रभावानें विशेष प्रकारें विधान केलें गेलेलें नित्य कर्म निष्कपट भाषण करणाऱ्या पुरुषाकडून शुद्धचित्तानें होऊं लागलें असतां तेंच हित असें ह्मटलें जातें १७. वेदपारंगत ब्राह्मणांनीं त्याला हित असें ह्मटलें आहे. ब्रह्माचें जें पद कर्मजन्य सुकृतफलास प्राप्त झालें आहे तो त्याचा एक सामान्य अंश आहे असें वेद सांगतात १८. ज्याचा एक पाद हें सर्व विश्व आहे तो ब्रह्मभूत आत्मा नित्यसिद्ध आहे. ( कर्म प्राप्य नाहीं. ) पण ब्राह्मणांच्या चित्तवृत्ती अनेक असल्यामुळें त्या सत्यव्रतपरायणांनीं त्या एकालाच इंद्र, मित्र, वरुण इत्यादि नांवें दिलीं

ब्रम्हभूतात्मा सत्यव्रतपरायणैः १९ विश्वरूपं मनोरूपं बुद्धिरूपं च मानयन् । एवं द्वंद्वं स भगवान् प्रथमं मिथुनं सृजत् २० स एव भगवान्विश्वो देव्या सह सनातनः । विधाय विपुलान् भोगान् ब्रम्हा चरति सानुगः २१ स एष भगवान् ब्रम्हा नित्यं ब्रम्हविदां वरः । निर्वाणपदं गं[?]णामकिंचनार्थैषिणाम् २२ सोमात्सोमः समुत्पन्नो धारासलिलविग्रहात् । यथाभिषिक्तो भूतानामाधिपत्ये महेश्वरः २३ अभिषिच्य च भूतेशं कृत्वा कर्म स्वभावतः । नदति स्म तदा नादं तेन सा ह्युच्यते नदी २४ सा ब्रम्हलोकं संभाव्यमभिभूय सहस्रधा । गां गता गगनाद्देवी सप्तधा प्रससार च २५ सहस्राधा च राजेन्द्र बहुधा च पुनः पुनः । इमं लोकममुं चैव भावयन् क्षरसंभवम् २६ ततो भूतानि रोहन्ति महाभूतफलानि च । ततः सर्वे क्रियारंभाः प्रवर्तन्ते मनीषिणाम् २७ चतुर्भिर्वदनैस्तस्य मुखपद्माद्विनिःसृताः । तदाक्षरमयी सिद्धिर्दिशत्वं समुपागता २८ तस्य ज्ञानमयं पुण्यं चतुष्पादं सनातनम् । पतित्वेनाभवद्देवो ब्रम्हा चात्र पितामहः २९ पादा धर्मस्य चत्वारो यैरिदं धार्यते जगत् । ब्रम्हचर्येण व्यक्तेन गृहस्थेन च पावने ३० गुरुभावेन वाक्येन गुह्यगामिनगामिना । इत्येते धर्मपादाः स्युः स्वर्गहेतोः प्रचोदिताः ३१ न्यायाद्धर्मेण गुह्येन सोमो वर्धति मंडले । ब्रह्मणो ब्रह्मचरणाद्वेदा

---

व यज्ञामध्यें त्यांचाच ते उपयोग करितात १९. स्थूलरूप व सूक्ष्मरूप असें दोन्ही बुद्धिमात्रस्वरूप आहे, असें जाणणारा भगवान् उक्त क्रमानें पहिलें स्त्रीपुरुषात्मक जोडपें उत्पन्न करता झाला २०. ( पण तें जोडपें सुद्धां नटाप्रमाणें त्याचेंच रूपांतर होय. ) कारण तोच सनातन भगवान् ब्रह्मा विश्व देवीसह अनेक भोगांस प्रकाशित करून त्यांच्या उपभोगाकरितां कश्यपादि अनुयायींसहवर्तमान कर्मानुष्ठान करितो २१. तो भगवान् ब्रह्मा निर्वाणपदास जाणाऱ्या व दरिद्र्यांच्या मार्गाची इच्छा करणाऱ्या ब्रह्मवेत्यांस नित्य श्रेष्ठ आहे २२. स्वर्गांतून पडलेली जलधारा हेंच ज्याचें रूप आहे अशा सतत अलुप्त ज्ञानशक्तिमान् परमेश्वरापासून चंद्र झाला. त्या धारेनें त्या महेश्वराला भूतांच्या आधिपत्यावर अभिषेक केला २३. भूतेशाला अभिषेक करून व स्वभावतः कर्म करून ती ( धारा ) तत्काल मोठा नाद करूं लागली. त्यामुळें तिला नदी असें ह्मणूं लागलें २४. असो; ती पूज्य ब्रह्मलोकास सहस्रधा फोडून ह्मणजे मार्गरोधक पर्वतादिकांचें उन्मूलन करून आकाशांतून पृथ्वीवर आल्याकारणानें ती देगंगा होऊन सात मुखांनीं पसरली ( गोदावरीला उद्देशून हा उल्लेख असावा. ) हे राजेंद्रा, भागीरथी, नर्मदा इत्यादि नद्यांच्या रूपानें ती पुनः पुनः अनेक प्रवाहांनीं पसरते. असो; अविद्याजन्य अशा या व पर लोकाला पुष्ट करीत चंद्र राहतो २५ २६. त्यामुळें महाभूतांचीं जणुंकाय फळेंच अशीं भूतें ( जरायुआदि चतुर्विध प्राणी ) वृद्धि पावतात. त्यांच्या योगानें विद्वानांचे सर्व क्रियारंभ प्रवृत्त होतात २७. ब्रह्मदेवाच्या मुखकमलापासून चारप्रकारचे चार वेद निघाले. तेव्हां तीच अक्षररूप सिद्धि उपदेशत्वास प्राप्त झाली २८. त्याचा ज्ञानमय पुण्यकारण सनातन ( ब्रह्मा, उद्गाता, होता व अध्वर्यु या ) चार पादमय यज्ञ असून त्याचा स्वामी ब्रह्मा देव झाला. पण हें सर्व पितामह ( शुद्ध ब्रह्मच ) आहे २९. ज्यांच्या योगानें जगाचें धारण होतें ते धर्माचे चार पाद आहेत. स्वाध्यायरूप व ध्यानरूप अशा व्यक्त ब्रह्मचर्यानें एक पाद होतो. गृहांत स्थित असलेल्या गृहस्थाश्रमानें दुसरा पाद होतो. [illegible] भारानें दुर्वह झालेल्या वानप्रस्थाश्रमानें तिसरा पाद होतो आणि तत्त्वमस्यादि

वर्तन्ति शाश्वताः ३२ गृहस्थानभिवाक्येन तृप्यन्ति पितरस्तथा । ऋषयोऽपि च धर्मेण नगस्य शिरसि स्थिताः ३३ नगस्य तस्य संपश्य मेरोः शिखरमुत्तमम् । पद्भ्यां संपीड्य वृषणा वृषिभिस्तैर्विचार्यते ३४ ग्रीवां निगृह्य पृष्ठं च विनाम्य प्रहसन्निव । नाभिदेशे करौ न्यस्य सर्वतोंगानि संक्षिपन् ३५ मूर्ध्नि ब्रह्म समुत्क्षिप्य मनसापि पितामहः । असृजन्मनसा विष्णुं योगाद्योगेश्वरस्य च ३६ व्यतिरिक्तेंद्रियो विष्णुर्बिंबाद्बिंबमिवोद्धृतः । तेजोमूर्तिधरो देवो नभसींदुरिवोदितः ३७ रराज ब्रह्मयोगेन सहस्रांशुरिवापरः । विराजन्नभसो मध्ये प्रभाभिर-

---

कूटस्थ आत्मतत्त्वप्रतिपादक संन्यासाश्रमानें धर्माचा चवथा पाद होतो. हे धर्मपाद सुखाचें कारण ह्मणून सांगितलें आहेत ३०,३१. वेदान्तन्यायानें श्रवणमननद्वारा परिपूर्ण झालेल्या विचाराच्या व योगसंज्ञक गुह्य धर्माच्या योगानें मंडलामध्यें सोम वाढतो. ( ब्रह्मांडगोलामध्यें चंद्रदेवताक मन अध्यात्म परिच्छेदाभिमान सोडून समष्ट्यभिमान धारण करतो. ) याप्रमाणें प्रमाणभूत वेदापासून योगानुष्ठानाचें ज्ञान करून घेऊन साक्षात् योगानुष्ठान केलें असतां शाश्वत वेदही बाधित होतात ३२. पूर्वोक्त ब्रम्हप्रतिपादक वाक्यानें युक्त असलेल्या गृहस्थांस पाहून पितर तृप्त होतात. त्या पर्वताच्या शिखरावर रहाणारे ऋषीही धर्माचरणानें आनंदित होतात ३३. ( याप्रमाणें आपापल्या आश्रमधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या गृहस्थादिकांचे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह हे यम आणि शौच, संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान हे नियम स्वभावतःच सिद्ध होतात असें सांगून आतां आसनादि पुढच्या योगांगांचें विधान करण्याच्या इच्छेनें प्रथम मेरुशिखरसंज्ञक ब्रह्मलोक जिंकावा असें सांगतात.) ज्याअर्थी आश्रमधर्मसंपन्न ऋषींकडून त्याचाच विचार केला जातो त्याअर्थी त्या मेरुसंज्ञक पर्वताचें उत्तम शिखर, पायांनीं वृषणांस दाबून धरून, पहा ३४. ग्रीवेचा निग्रह करून ( म्हणजे हनुवटी गळयाच्या खालीं रोंवून ), ऊर वर येईल अशा बेतानें पाठ वांकवून, हंसत असल्याप्रमाणें ( दांत दांतांस स्पर्श न करतील अशारीतीनें ), नाभिप्रदेशीं जोडलेले हात धरून, सर्वतः शरीरावयवांचा निग्रह करावा ३५. मूर्धास्थानीं ब्रम्हाचा न्यास करून मनानें पितामहाचेंही संधारण करावें. कारण योगेश्वराच्या योगसामर्थ्यानें पितामह मनानें विष्णूस निर्माण करता झाला. ( त्यानेंही प्राणायामाच्या योगानें मनाचा निरोध करून सृष्टीच्या उत्पत्तीचें अचिंत्य सामर्थ्य मिळविलें. तसेंच आधुनिक जीवालाही प्राणायामानें मनोनिग्रह केल्यास अचिंत्य ऐश्वर्य प्राप्त होणें शक्य आहे ) ३६. ज्याचीं इंद्रियें विषयांपासून निवृत्त झालीं आहेत असा प्रत्याहारवान् योगी जवळ असलेल्याही विषयांचें ग्रहण करीत नसल्यामुळें परिच्छेदाभिमानाभावीं व्यापक होतो. मुशींत धातूचा रस ओतून त्यांतून तसलीच मूर्ति जशी काढावी तशी त्याची अवस्था होते. आकाशांत उदय पावलेल्या जणुं काय चंद्राप्रमाणें तो तेजोमूर्तिधर देव होतो. ( याचा भावार्थ— घटामध्यें ठेवलेल्या दिव्याची प्रभा घटांतील अवकाशालाच मात्र व्यापते; तिलाच घटाच्या तोंडांतून बाहेर सोडल्यास ती घरांतील कांहीं भागास व्यापते पण तोच घागरींतील दिवा बाहेर काढल्यास घरांतील सर्व भागास व्यापतो. हें प्रसिद्ध आहे. या दृष्टान्ताप्रमाणें जीवचैतन्य देहांत असलें ह्मणजे केवळ देहांतील भागासच विषय करतें. इंद्रियांच्या द्वारां बाहेर गेलें कीं, त्या त्या इंद्रियांच्या विषयास व्यापतें, व मनानें तें सर्व सृष्टीचें चिंतन करूं लागलें कीं, जगन्मय होतें. त्यामु-

तुलं प्रभुः ३८ नोपलभ्याति मूढानां प्रत्यक्षं ब्रह्म शाश्वतम् । ललाटमध्ये तिष्ठंतं द्विधाभूतं क्रियां प्रति ३९ ज्योतिश्चक्षुषि संबद्धं बिंबं भास्करसोमयोः । बुध्द्या पूर्वं तु पश्यन्ति अध्यात्मविषयं रताः ४० ब्राह्मणा वेदविद्वांसः सत्यव्रतपरायणाः । नेतरे जातु पश्यन्ति अध्यात्मं नावबुध्यते ४१ हिंसायोगैरयोगात्मा सर्वप्राणचरैर्नृप । भूतयो भुवि भूतेशो मोहप्राप्तेन चेतसा ४२ कर्मभिः कुत्सितैरन्यैः सर्वप्राणिवधैषिणाम् । नराणां योगमाधाय स्वेषु मात्रेषु भारत ४३ समाहितमना ब्रम्हन्मोक्षप्राप्तेन हेतुना । चन्द्रमण्डलसंस्थानाज्ज्योतिश्चान्द्रं महत्तदा ४४ प्रविश्य हृदयं क्षिप्रं गायत्र्यानयनान्तरे । गर्भस्य संभवो यश्च चतुर्धा पुरुषात्मकः ४५ ब्रह्मतेजोमयो शुक्रः शाश्वतोऽथ ध्रुवोऽव्ययः । न चेंद्रियगुणैर्युक्तोऽयुक्तस्तेजोगुणेन च ४६ चंद्रांशुविमलप्रख्यो भ्राजिष्णुर्वर्णसंस्थितः । नेत्राभ्यां जनयद्देवो ऋग्वेदं यजुषा सह ४७ सामवेदं च जिह्वाग्रादथर्वाणं च मूर्धतः । जातमात्रास्तु ते वेदाः क्षेत्रं विन्दन्ति

---

ठेंच योग्यांना सर्वज्ञत्व प्राप्त होत असतें ) ३७. नंतर देहादि तादात्म्याध्यास जाऊन प्राप्त झालेल्या ब्रम्हभावानें तो योगी साक्षात् दुसऱ्या सूर्याप्रमाणें शोभतो. त्याच्या हृदयाकाशांत प्रभु अतुल प्रभांनीं विराजमान होतो ३८. पण भुंवया व नासिका यांच्या संधिभागीं असणाऱ्या व नियमन क्रियेस उद्देशून द्विधा झालेल्या शाश्वत ब्रम्हास मूढ साक्षात् जाणत नाहींत ( पण योग्यांनीं तेथेंच चित्ताच्या धारणेचा अभ्यास करावा ) ३९. ( आतां धारणेचा विषय सांगतात— ) सूर्य व सोम या ज्यांच्या देवता आहेत अशा इडा व पिंगला नाडींच्यामध्यें नेत्रांशीं संबद्ध असलेली ज्योति हा धारणेचा विषय आहे. पूर्वी अध्यात्मविषयामध्यें रत असलेले.मागाहून बुद्धीच्या योगानें तिला पाहतात ४०. वेदवेत्ते व सत्यव्रतपरायण ब्राम्हणच तिला पहातात. अध्यात्म्यास न जाणणारे इतर प्राकृत जन त्यास पाहूं शकत नाहींत ४१. ( इतरांचें वर्णन करितात ) जो या भूलोकीं भूतांचा निग्रहानुग्रह करण्यास समर्थ असलेला योगी ऐश्वर्यकृत मोहास प्राप्त झालेल्या चित्तानें अयोगात्मा होतो त्या योगास प्राप्त होऊनही स्वरूपानंदापासून च्युतचित्त झालेल्या पुरुषास ऐश्वर्यें सर्व प्राणभक्षक हिंसा योगानें पराभूत करून सोडतात ४२. सर्व प्राण्यांचा वध करण्याची इच्छा करणाऱ्या त्या पुरुषांचा जो इष्ट विषयांच्या निमित्तानें अन्य कुत्सित कर्मांशीं संबंध जडतो. ( वास्तव योगसिद्धीविषयीं आनंदित न होतां त्या श्रेयो मार्गांत विघ्न करणाऱ्या आहेत असें जाणून त्यांचा त्याग करावा ) ४३. योगामध्यें अशीं अनेक विघ्नें येत असल्यामुळें ब्रम्हामध्यें मनास स्थिर करून मोक्ष मिळाविण्याच्या हेतूनें चंद्रमंडलरूप मनोविग्रहास सोडून त्यांतील मोठ्या दीप्त ज्योतीस म्हणजे हृदयस्थ चैतन्यास प्राप्त व्हावें ४४. विघ्नांच्या भीतीनें सत्वर हृदयांत प्रवेश करून गायत्र्याख्य सगुणब्रम्हाचेंही प्रकाशक अशा शुद्ध ज्योतीमध्यें स्थिर रहावें. अव्यक्ताचा संभव अकार, उकार, मकार व अर्धमात्रारूपानें चार प्रकारें होतो ४५. तो निरातिशय उत्कृष्ट तेज जें चैतन्य तन्मय आहे. इंद्रियादिकांचा विषय होत नाहीं. तो शाश्वत, कूटस्थ व अव्यय आहे. तो इंद्रियग्राह्य रूपादि गुणांनीं युक्त नाहीं. पण तेजोगुणांनीं ( म्हणजे मनाशीं तादात्म्याध्यास झाल्याकारणानें त्याच्या सुखदुःखादि गुणांनीं ) युक्त होतो ४६. चंद्राच्या किरणांप्रमाणें त्याची प्रभा आल्हादकारक आहे. तो सद्रूपानें स्फुरण पावतो. लाल, शुक्ल व कृष्ण हे ज्यांचे वर्ण आहेत अशा तेज, जल व अन्न यांच्या परिणामभूत

तत्त्वतः ४८ तेन वेदत्वमापन्ना यस्माद्विन्दन्ति तत्पदम् । ते सृजन्ति तदा वेदा ब्रह्मपूर्वं सनातनम् ४९ पुरुषं दिव्यरूपाभं स्वैः स्वैर्भावैर्मनोभवैः । अथर्वणस्तु यो योगः शीर्षं यज्ञस्य तत्स्मृतम् ५० ग्रीवाबाह्वन्तरं चैव ऋग्भागः स भवेत्ततः । हृदयं चैव पार्श्वे च सामभागस्तु निर्मितः ५१ बस्तिशीर्षं कटीदेशं जंघोरुचरणैः सह । एवमेष यजुर्भागः संघातो यज्ञकल्पितः । पुरुषो दिव्यरूपाभः संभूतो ह्यमरात्पदात् ५२ स हि वेदमयो यज्ञः सर्वभूतसुखावहः । उभयोर्लोकयोस्तात हिंसावर्ज्यः सनातनः ५३ योगारंभं कर्म साध्यं ब्रह्मचर्ये सनातनम् । प्रभवः सर्वभूतानां यो विन्दन्ति स वेदवित् ५४ स सिद्धः प्रोच्यते लोके सिद्धिरेव न संशयः । निर्मुक्तैः सर्वकर्मभ्यो मुनिभिर्वेदपारगैः ५५ वैष्णवे यज्ञमित्येवं भवन्ते वेदपारगाः । ब्राह्मणा नियमश्रान्ता वेदोपनिषदे पदे ५६ जनमेजय उवाच ॥ चेतसस्तूपलंभं हि मनोग्राह्यस्य कामतः । कारणं श्रोतुमिच्छामि यथा त्वं मन्यसे मुने ५७ वैशंपायन उवाच ॥ न ह्यस्य कारणं किंचिद्बाह्यं भवति भारत । अंतर्गतं कारणं तु शारीरं मानसं नृप ५८ येन वेद्यं विदुर्मर्त्या ब्राह्मणाः संशितव्रताः । अवेद्यमपि वेद्यं च शक्यं वेत्तुं न कर्मणा ५९.

---

देहाकारांत तो राहिलेला असतो. तो देव दोन्ही नेत्रांपासून यजुर्वेदासह ऋग्वेदास उत्पन्न करतो ४७. त्याच्या जिह्वाग्रापासून सामवेद व मूर्धप्रदेशापासून अथर्वणवेद झाला. व्यक्त होतांच हे आपापल्या उपाधीस प्राप्त होतात ४८. ते तत्पदास प्राप्त होतात म्हणूनच त्यांना वेदत्व प्राप्त झालें आहे. ते वेद अगोदर सनातन ब्रह्मास प्रकाशित करितात ४९. ते चारी मिळून आपापल्या स्वभावभूत मनोरथांनीं दिव्यरूपाकृति पुरुषास निर्माण करितात. अथर्वणाचा जो योग तें यज्ञाचें मस्तक म्हणून म्हटलें आहे ५०. त्या पुरुषाच्या बाहूंचा मध्यभाग व गळा हा ऋग्भाग होय. हृदय व कुशी हा सामभाग निर्माण केला आहे ५१. बस्तीचें मस्तक आणि जंघा, मांड्या व चरण यांसह कटिदेश एवढा हा यजुर्भाग होय. सारांश, अशा प्रकारचा यज्ञकल्पित संघात आहे. दिव्यरूपानें प्रकाशमान होणारा पुरुष अमर पदापासून उत्पन्न झाला. तो वेदमय यज्ञ सर्वभूतांस दोन्ही लोकीं सुखावह आहे. कारण तो सनातन योगयज्ञ हिंसाशून्य आहे ५२,५३. सनातन कर्मसाध्य योगारंभ ब्रह्मचर्यांत स्थित आहे. या सर्वभूतांच्या उत्पत्तिरूप योगाला जो जाणतो तो वेदवेत्ता होय ५४. त्याला लोकांमध्यें सिद्ध असें म्हणतात. ती त्याची सिद्धिच आहे यांत कांहीं संशय नाहीं. सर्व कर्मबंधांपासून मुक्त झालेल्या व वेदांत पारंगत असलेल्या मुनींकडून तो सिद्ध म्हटला जातो ५५. परमार्थ वस्तु प्राप्त करून देणाऱ्या वेदरहस्य विद्यारूप पदामध्यें निष्ठा ठेवणारे, नियमांच्या योगानें श्रांत झालेले वेदपारग ब्राह्मण त्याला यज्ञ असें म्हणतात ५६. जनमेजयः—स्वेच्छेनें मनोग्राह्य असलेल्या चित्ताचा उदय पुनः कोणत्या कारणानें होतो. हे मुने, आपल्याला जसें माहीत असेल तसें सांगा. तें ऐकण्याची माझी इच्छा आहे ५७. वैशंपायनः—हे भारता, त्याचें बाह्य कारण कांहीं नाहीं. हे राजा, चित्ताच्या पुनरुदयाचें कारण आंतर आहे. शरीरानें केलेलें सुकृत व दुष्कृत मनामध्यें संस्काररूपानें असतें. तेंच मनाचें उद्बोधक आहे ५८. ज्या चैतन्यानें सर्व जाणलें जातें तें तद्रूप सर्व असल्यामुळें अवेद्य असेंही तें शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाच्या द्वारां वेद्य होतें. कर्मानें नव्हे. तीक्ष्ण व्रतें करणारे ब्राह्मण मर्त्य त्याला याच उपायानें जाणतात ५९. राजा, यास्तव वेदाध्यायी, विद्यामदहीन, ब्रह्मयज्ञादि करणाऱ्या, सदा ज्ञाततत्त्व ब्राह्मणानें सिद्धीकरितां

ब्राम्हणेनविनीतेनसदाब्रह्मनिषेविणा । सदाविदिततत्त्वेनसिद्धिहेतोर्महीपते ६० सदा चैव शुचिर्भूत्वा नियतो ब्रम्हकर्मणा । उपतिष्ठेत स गुरुं बद्धांजलिपरो द्विजः ६१ सायं प्रातश्चतत्त्वज्ञो मोक्षकर्माणि कारयेत् । विनीतो ब्रम्हभावेन समाहितमतिर्मुनिः ६२ संप्रपद्येद् मनसा वैष्णवं पदमुत्तमम् । ध्यायन्नेव प्रसीदेत समाहितमतिर्द्विजः ६३ गच्छते परमं ब्रम्ह निर्विकारेण चेतसा । अपुनर्भवभावज्ञो निर्ममो भावबन्धनात् ६४ तदेवाक्षरमित्याहुर्यत्तद्ब्रम्ह सनातनम् । तर्हि तत्कर्मयोगेन विद्यायोगेन दर्शितम् ६५ ब्राम्हणानां विनानानां वैष्णवे पदसंचये । सर्वद्रव्यातिरिक्तानां कामयोगविगर्हिणाम् ६६ अपुनर्भाविना लोकाः कर्मयोगप्रतिष्ठिताः । अनादानेन मनसा राजन्कर्मणि कर्मणि ६७ आदाना-द्बध्यते जन्तुर्निरादानात्प्रमुच्यते । ब्राम्हणेभ्यः क्रियावाप्तिर्जातोः पूर्वाज्जिनाधिप ६८ मुक्तश्चेंद्रियबन्धेन प्राप्तश्च परमं पदम् । न भूयः पुनरायाति मानुषं देहविग्रहम् ६९ [ ६१३ ] इति श्रीमन्महाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

जनमेजय उवाच ॥ उपसर्गं च योगं च ध्यातव्यं चैव यत्पदम् । न भूयः पुनरायाति मानुषं देहविग्रहम् १ वैशंपायन उवाच ॥ श्रृणु विस्तरतः सर्वं यथा पृच्छसि मेधया । उपपन्नेन मनसा ब्रम्हादीनामनेकधा २ पंचसिद्धिगुणांस्त्यक्त्वा पश्यतो ब्रम्हणो नृप ।

---

यत्न करावा ६०. सदा शुचि व ब्रह्मकर्माच्या योगानें नियत होऊन साधक ब्राह्मणानें हात जोडून गुरूपाशीं शुश्रूषेकरितां उभें रहावें ६१. त्या तत्त्वज्ञानें सकाळसंध्याकाळ मोक्षोपयोगीं कर्मे करावींत. ब्रह्मभावानें गर्वहीन, समाहितचित्त व मननशील व्हावें ६२. मनानें उत्तम वैष्णवपदास प्राप्त व्हावें. शांत चित्त ब्राह्मणानें ध्यान करीतच प्रसन्न रहावें ६३. अपुनर्जन्माचा भाव जाणणारा व परमात्म्यामध्यें चित्ताचा सर्व भाव ठेवल्यामुळें ममताशून्य झालेला साधक निर्विकार चित्तानें परब्रह्मास पोंचतो ६४. जें सनातन ब्रह्म तेंच अक्षर असें ह्मणतात. निष्काम कर्मयोग व विद्यायोग यांच्या योगानें त्याचा साक्षात्कार होतो ६५. गर्वशून्य, वैष्णव पदामध्यें निश्चित, सर्व द्रव्यरहित ( संग्रहशून्य, त्यागशील ) व स्त्रीसंगादि कर्म योगाची निंदा करणारे असे जे ब्राह्मण त्यांना तें अक्षर ब्रह्म अवगत होतें ६६. हे राजन्, प्रत्येक कर्माच्या फळाविषयीं मनापासून निरिच्छ असलेल्या पुरुषांचें पुनर्जन्मरहित लोक कर्मयोगामध्येंच प्रतिष्ठित आहेत. ( निष्काम कर्मयोगानें त्यांना मोक्ष प्राप्त होतो. ) ६७. कारण फलाचें संकल्पद्वारां ग्रहण केलें कीं प्राणी बद्ध होतो व संकल्पानेंच त्याचा त्याग केला असतां तो मुक्त होतो. हे राजन्, कर्मफलाचा त्याग पूर्वसंस्कारामुळेंच होणें शक्य आहे. यास्तव विद्वान् ब्राह्मणांपासून कर्मांचें तत्त्व समजून घेऊन प्राण्यानें कर्म संपादन करावें. ६८. याप्रमाणें दीर्घ प्रयत्न करून इंद्रिय बंधापासून मुक्त व परमपदास प्राप्त झालेला योगी पुनरपि मानुष शरीरांत येत नाहीं ६९. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वाचा सतरावा अध्याय समाप्त झाला. ॥ १७ ॥

जनमेजयः—ज्याच्या योगानें मानुष देहाकार पुनः प्राप्त होत नाहीं तें ध्यान करण्यास उचित पद, योग व त्याचा उपसर्ग मला सांगा १. वैशंपायनः—ब्रह्मादि योग्यांस अनेक प्रकारें प्राप्त होणाऱ्या योगोपसर्गादिकांविषयीं तूं जें विचारीत आहेस तें सर्व मेधायुक्त मनानें ऐक २. राजन्, पांच इंद्रियांनीं कल्पिलेल्या दूरचा शब्द ऐकणें, दूरचें रूप

योगयुक्तेन मनसा पंचेंद्रियनिवासिनः ३ ब्रम्हणश्चिन्तयानस्य ब्रम्हयज्ञं सनातनम् । बहुरूपमनैश्वर्यात्प्रवर्तति निरोधनम् ४ पंचेंद्रियस्य ग्रामस्य नवद्वारस्य भारत । कामक्रोधस्य लोभस्य सन्निरुद्धस्य मेधया ५ तेजसा मूर्ध्नि चाधाय धूमो दोधूयते महान् । नीललोहितवर्णाभैः पीतैः श्वेतैश्च धातुभिः ६ मांजिष्ठरागवर्णाभैः कपोतसदृशैस्तथा । शुद्धवैडूर्यवर्णाभैः पद्मवर्णदलप्रभैः ७ स्फाटिकैर्मणिवर्णाभैर्नागेन्द्रसदृशैस्तथा । इन्द्रगोपकवर्णाभैश्चन्द्रांशुसलिलप्रभैः ८ बहुवर्णैः सुधूमैर्घैरिंद्रायुधसमप्रभैः । संपतद्भिश्च युगपन्मेघैरिव समागमे ९ निरुध्यन्त इवाकाशेपक्षवद्भिरिवाद्रिभिः । ते धूमवर्णाः संघाता घनाः सालिलधारिणः ॥ निर्वेमुश्चैव तोयौघान्विविशुर्वसुधातले १० मूर्ध्नि चैव महानग्निर्मानसो धूयते प्रभुः । शुक्रः परमयोगेन शतशोर्चिभिरावृतः ११ तस्यार्चैर्विस्फुलिंगानां सहस्राणि शतानि च । विसस्रुः सर्वगात्रेभ्यो ज्वलन्निव युगाग्नयः १२ यावन्त्यो वर्षधारास्तु तावंत्योर्च्यो नलस्य च । समेयुर्वारिधाराभिर्विपुले वसुधातले १३ वर्णाभ्यां युज्यमानस्य वायुर्दोधूयते महान् । दिव्यसिद्धगुणोद्भूतः सूक्ष्मप्राणविवर्धनः १४ वेगवान्भीमनिर्घोषो बलवान्प्राणगोचरः । तैरेव चाग्निसंघातैर्धातुभिः सह संगतः १५ सहस्रशोथ शतशो मूर्तिं कृत्वा पृथग्वि-

---

पहाणें, इत्यादि पांच सिद्धीरूप पंचइंद्रियांत रहाणाऱ्या गुणांचा त्याग करून योगयुक्त मनानें ब्रह्माचें दर्शन घेणाऱ्या ३, सनातन ब्रह्मयज्ञ करून ब्रह्माचें चिंतन करणाऱ्या पुरुषास परवैराग्याचें बल नसल्यास अनेक प्रकारचे उपसर्ग उद्भवतात ४. पंच ज्ञानेंद्रिय समूह, नऊ द्वारें, काम, क्रोध व लोभ यांचा निश्चयात्मक बुद्धीनें चांगला निरोध केला तरी ५ भुवया व घ्राण यांच्यामध्यें ठेवलेल्या तेजाशीं चित्ताचा संयोग करून राहिलेल्या योग्याला भयंकर धूर दिसूं लागतो. नील वर्ण, रक्तवर्ण, पीत, श्वेत, मांजिष्ठ, पारव्यासारखा, शुद्ध वैडूर्यवर्ण, पद्मवर्ण, स्फटिक मण्याचा वर्ण, नागराजाच्या वर्णासारखा वर्ण, इंद्रगोप किड्याचा वर्ण, चंद्रकिरण व जल यांच्या रंगासारखा रंग, इंद्रधनुष्यासारखा विचित्र रंग इत्यादि अनेक प्रकारच्या वर्णांनीं युक्त असलेल्या फार मोठ्या धूमांचे ओघ एकाचवेळीं सर्व बाजूंनीं येत असलेल्या मेघांप्रमाणें पळत येत आहेत असें दिसतें ६–९. पंखयुक्त पर्वताप्रमाणें असलेले ते जणुंकाय आकाशास भरून सोडतात. ते धूम्रवर्ण संघात जलाला धारण करणारे मेघच होत. ते जलसमूहास ओकतात व पृथ्वीतळीं प्रवेश करितात. ( म्हणजे रज व तम या गुणांच्या योगानें अविरक्त योग्याला नाड्यांमध्येंच हा सर्व भास होतो ) १०. नंतर मूर्धप्रदेशीं मोठा मानस अग्नि पेटतो. परम सामर्थ्यानें युक्त असलेला तो प्रभु शेंकडों ज्वालांनीं आवृत झालेला असतो ११. युगांतींचे अग्नीच जळत असल्याप्रमाणें त्या अग्नीपासून सर्व गात्रांतून हजारों व शेंकडों किटाळें बाहेर निघतात १२. जितक्या जलवृष्टीच्या धारा तितक्याच अग्नीच्या ज्वाला जलधारांशीं मिळून विपुल पृथ्वीतलावर येऊन पोंचतात १३. जल व अग्नि यांच्या शुक्ल व लालवर्णांनीं युक्त असलेल्या ( त्या रूपानें परिणाम पावलेल्या ) त्याचा सत्त्वोत्कर्ष झाला असतां दिव्य सिद्ध गुणांपासून उत्पन्न झालेला व सूक्ष्म प्राणांची वृद्धि करणारा महावायु वाहूं लागतो १४. तो वेगवान्, भयंकर ध्वनि करणारा बलवान् वायुच प्राणसंज्ञक सूत्रात्मा होतो. तो अग्नीशीं ज्याचा दृढ संबंध झाला आहे अशा त्याच पृथ्वी व जल या धातूंशीं संगत झाला असतां स्थूल होतो १५. नंतर ब्रह्मप्रेरित अग्नि, वायु,

धाम् । अग्निर्वायुर्जलं भूमिर्धातवो ब्रम्हचोदिताः १६ समवायत्वमापन्ना बीजभूता महीपते ।
संघातं ब्रम्हवेगेन धातवो गमिता नृप १७ यद्ब्रम्ह चक्षुषोर्मध्ये ससूक्ष्मः पुरुषो विराट् ।
तयोरन्यान्वसून्सूक्ष्मान्नसृजे पुरुषोत्तमः १८ स एव भगवान्विष्णुर्व्यक्ताव्यक्तः सनातनः ।
आधारः सर्वविद्यानां प्रलये प्रलयान्तकृत् १९ तं मूर्ध्नि धातुभिर्नद्धं विशन्ति ब्रम्हचोदिताः ।
तेऽन्तरा पुरुषाः सर्वे ज्ञातारः सुखदुःखयोः २० अथ चेष्टितुमारब्धा मूर्तयो ब्रम्हसंमिताः ।
भित्त्वाचधरणींदेवींप्रापद्यन्त दिशो दश २१इत्येते पार्थिवाः सर्वे ऋषयो ब्रम्हनिर्मिताः । तत्रैव
प्रलयं याता भूमित्वमुपयान्ति च २२ कर्मक्षयाद्विमुच्यंतेधातुभिः कर्मबन्धनैः । कर्मक्षयाद्वि
मुक्तन्वादिन्द्रियाणां च बन्धनात् २३ तामेव प्रकृतिं यांति अज्ञातां कर्मगोचरैः। क्षराद्धूमक्षयं
चैव अग्निगर्भास्तपोमयाः २४ येन तन्तुरिवाच्छन्नो भावाभावः प्रवर्तते । धूमादभ्रास्तु संभूता
अभ्रात्तोयं सुनिर्मलम् २५ जगतीं जलात्तुसंभूता जगत्येव च यत्फलम् । फलाद्रसस्तु संजज्ञे
रसात्प्राणस्तु देहिनाम् २६ रसश्च तन्मयो यज्ञे यत्तब्रम्ह सनातनम् । प्रधानं ब्रम्हचोद्दिष्टं
बहुभिः कारणान्तरैः । ब्राम्हणैस्तपसि श्रान्तैः सत्यव्रतपरायणैः २७ अव्यक्ताद्व्यक्तिमापन्नं

---

जल व भूमि हे धातू शेंकडों अथवा सहस्रावधि भिन्न भिन्न मूर्ती करून रहातात १६. हे राजन्, संघातरूपास प्राप्त झालेले ते धातू बीजभूत बनतात. हे राजा, ब्रह्मवेगानें ते धातू संघातरूपास प्राप्त झाले आहेत १७. दोन्ही नेत्रांमध्यें असलेलें जें चैतन्य तोच सूक्ष्म पुरुष व विराट् होय. त्या दोघांपासून ब्रह्मभूत योगी त्यांच्याच सारखे दुसरे सूक्ष्म वसू निर्माण करतो १८. अशा योग्यतेचा योगी हाच भगवान् व्यक्ताव्यक्त सनातन विष्णु होय. सर्व विद्यांचा आधार, व प्रलयसमयीं प्रलयान्त करणारा आहे १९. मूर्धाप्रदेशीं सूत्रात्मरूपानें स्थित असलेल्या योग्यामध्यें ब्रह्मदेवानें ज्यांस प्रेरणा केली आहे असे इतर सुखदुःखांचे भोक्ते व ज्ञाते जीव प्रवेश करितात २०. कारण स्थूल देहावरील अभिमान टाकून ईशसाम्यास प्राप्त झालेले व सूत्रात्म्याच्या ऐश्वर्यानें युक्त असलेले ते चेष्टा करावयास लागले असतां दशदिशांस जाऊन पोंचतात. ( या अवस्थेंत योगी सर्वात्मरूप होत असल्यामुळें सर्ववित् होतो ) २१. याप्रमाणें हे सर्व पृथु भूतांपासून झालेले ऋषी व्यवहाराकरितां योग्यांनींच निर्मिले आहेत. प्रलयसमयींही तेथेंच लीन झालेले ते भूमिभावास प्राप्त होतात २२. कर्मक्षय झालेला असल्यास ते कर्मबन्धनभूत धातूंकडून मुक्त केले जातात. कर्मक्षयामुळें ते इंद्रियांच्या बंधांतून मुक्त होतात २३. आणि कर्मठ लोकांस अज्ञात असलेल्या त्याच प्रकृतीस प्राप्त होतात. पण तेच अग्निहोत्रादि प्रधान, कृच्छ्रचांद्रायणादि तपोमय असले तर त्या कर्मांमुळें धूमादि मार्गानें प्राप्त होणाऱ्या स्थानास जातात. ( तेथून पुनः संसारांत यावें लागतें. ) २४. कारण न तुटलेल्या तंतूप्रमाणें कर्मांच्या योगानें सद्सद्रूप संसार प्रवृत्त होतो. धूमाच्या द्वारां ते अभ्ररूप बनतात. अभ्रापासून अति निर्मल जल झालें २५. नंतर जलरूप झालेले ते कर्मी वृष्टीच्या धारांबरोबर पृथ्वीवर येतात. तेथें ते अन्नरूप बनतात. तें अन्न पुरुषाच्या शरीरांत जाऊन अन्नरूप फलाचें रसामध्यें रूपांतर होतें. रसापासून रक्तादि क्रमानें शरीरधारी जीवाचे प्राण पुष्ट होतात २६. फलापासून उत्पन्न झालेला रस ब्रह्मचैतन्यमय असतो. ( ब्रह्माच्या सत्तेनेंच देहादिकांमध्यें चैतन्य असतें. ) यास्तव जें सनातन ब्रह्म तेंच प्रधान आहे, असें अनेक युक्तींनीं तप करून श्रांत झालेल्या व सत्यव्रत-

स्वेन भावेन भारत । अन्तस्थं सर्वभूतेषु चरन्तं विययया सह २८ कर्मकर्तेति राजेन्द्र विषयस्थ-मनेकधा । नोपलभ्येत चक्षुर्भ्यां तपसा दग्धकिल्बिषैः २९ उपलभ्येत चक्षुर्भ्यां ज्ञानिभिर्ब्रम्हवादिभिः । निःसृतस्तु भ्रुवोर्मध्यान्मेघमुक्त इवांशुमान् ३० चरद्भिः पक्षिवल्लोकेनिर्द्वंद्वैर्निष्परिग्रहैः । योगधर्मेण कौरव्य ध्रुवमासाद्यते फलम् ३१ प्रादुर्भावंक्षयं चैव भूतस्य निधनं तथा । विधत्ते शतशो ब्रम्हा संक्षये च भवेत्तदा ३२ कर्मणः कर्मयोगज्ञो भूतेभ्यो नात्र संशयः । अविनाशाय लोकस्य धर्मस्याप्यायनेन च ३३ युगं द्वादशसाहस्रं सहस्रयुगसंहितम् । एतद्ब्रम्हयुगं नाम युगानां प्रथमं युगम् ३४ सहस्रयुगयोरंते संहारः प्रलयान्तकृत् । सूक्ष्मं भवति लोकानां निर्विकारमचेतनम् ३५ तथा प्रलयमापन्नं जगत्सर्वं सनातनम् । ब्रम्ह संपद्यते सूक्ष्मं निर्मितं कारणैर्गुणैः ३६ [ ६४९ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि अष्टादशो ऽध्यायः ॥ १८ ॥

जनमेजय उवाच ॥ भार्गवंशं श्रोतुमिच्छामि विस्तरेण महामुने । आद्ययोर्युगयोर्ब्रम्हन् ब्रम्हशामस्य सर्वशः १ वैशंपायन उवाच ॥ शृणु विस्तरशः सर्वं यन्मां पृच्छसि मेधया ।

---

परायण ब्राह्मणांनीं निश्चित केलें आहे २७. हे भारता, सर्व भूतांच्या आंत असलेलें व ब्रह्माकार चित्तवृत्तीसह प्रकाशमान होणारें तत्त्व अनादि संस्कारांमुळें माया प्रभावानें व्यक्त झालें आहे. ( संसारी बनलें आहे ) २८. विषयाकार झालेलें तेंच अनेक प्रकारचें कर्म व कर्ता होय. पण हे राजेंद्रा, अशा अनेक प्रकारांनीं भासणारेंही तें सामान्य चर्ममय चक्षूंना दिसत नाहीं. पण तपाच्या योगानें ज्यांचें पाप जळलें आहे अशा ब्रह्मवेत्त्यांकडून ज्ञाननेत्रांच्या योगानें तें पाहिलें जातें. भुंवयांच्या मधून व्यक्त होणारें ( तेथें एकाग्रतेनें लावलेल्या नेत्रांना दिसणारें ) तें तत्त्व मेघावरणांतून सुटलेल्या सूर्याप्रमाणें साक्षात् ज्ञात होतें २९,३०. बा कौरवकुलोत्पन्ना, शीतोष्णादि द्वंद्वभाव सोडून, स्त्रीपुत्रादि परिग्रहाचा त्याग करून या लोकीं पक्ष्याप्रमाणें असंग मनानें संचार करणारे पुरुष योगधर्मानें त्या ध्रुव ( नित्य ) फलास प्राप्त होतात ३१. ब्रह्मज्ञ ब्रह्मा असल्या योगधर्मामुळें सर्व भूतांची उत्पत्ति, क्षय, नाश व प्रलयकालानंतर पुनः उद्भव करूं शकतो ३२. कर्मयोगास जाणणारा तो भूतांस कर्माचें फल सुखादि वाटून देतो. धर्माच्या पुष्टीनें, लोकांचा नाश होऊं नये ह्मणून तो हें सर्व करितो. ( ह्मणजे वर्णी व आश्रमी लोकांकडून त्याच्याच संतोषाकरितां कर्में केलीं जातात. व संतुष्ट झालेल्या त्या योगैश्वर्यसंपन्नाकडून लोकांचें रक्षण केलें जातें. ) सहस्र युगांच्या संघातांनीं झालेलें हें देवांच्या बारा सहस्र वर्षांनीं होणारें युग ब्रह्मयुग होय. तें युगांतील पाहिलें युग होय ३३,३४. याप्रमाणें दोन सहस्र युगांच्या शेवटीं ( ह्म. अनेक वर्षांनंतर ) कालाचाही अंत करणारा मुक्तिसंज्ञक महाप्रलय होतो. त्यावेळीं लोकांचें स्वरूप सूक्ष्म होतें. ( केवल सत्तामात्र अवशिष्ट रहातात. ) सत्त्वादि कारण गुणांनीं निर्मिलेलें सर्व जगत् प्रलयभावास प्राप्त झालें असतां सूक्ष्म सनातन ब्रह्म होतें ३६. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा अठरावा अध्याय समाप्त झाला. ॥ १८ ॥

जनमेजयः— हे महामुने ब्राह्मणा, सर्व प्रकारें ब्रह्मवेत्त्याची त्रेता व द्वापर या दोन युगांतील प्राचीन संतति सविस्तर ऐकण्याची मला इच्छा आहे १. वैशंपायनः— राजन्, दिव्यज्ञानसाधन शीलयुक्त मनानें व धारणाशक्तीनें जें मला

उपपन्नेन मनसा देवप्रत्ययसाधिना २ ऋद्धिं प्राप्तस्तु भगवान्योगात्मा ब्रम्हसंभवः । भूतानां बहुलत्वं च चकारेहेश्वरः प्रभुः ३ स्थितो ब्रम्हासने ब्रम्हा विक्षिप्तः सहसा प्रभुः । अचलेनैव भावेन स्थाणुभूतेन भारत ४ रक्तश्च मोक्षविषये स च ज्ञानमये पदे । यस्मात्पदसहस्राणि प्रभवन्ति भवन्ति च ५ ब्रम्हयज्ञं तु यजते योगाद्वेदात्मकं सदा । ब्रम्हणो विपुलं ज्ञानमैश्वर्यं च प्रवर्तते ६ ततः प्रथममैश्वर्यं युंजानेन प्रवर्तितम् । ब्राम्हणा ब्रम्हभूतेनभूतानांहितामिच्छता ७ तदास्वाकाशमैश्वर्यं युंजानस्य प्रवर्तते । ब्रम्हणो ब्रम्हभूतस्य निर्विकारेण कर्मणा ८ तदांतरिक्षं संभामं निर्मलं ब्रह्म चाव्ययम् । संहारः सर्वभूतानां नराणां ब्रह्मवादिनाम् ॥ ध्रुवमैश्वर्ययोगानां प्रतिपद्यंति देहिनः ९ आकाशैश्वर्यभूतेन संयुगे ब्रह्मवादिना । प्रवर्तमानमैश्वर्यं वायुभूतं करोति च । विकारैर्बहुभिः शुभैः संपतद्भिर्महाबलैः १० एतैर्विकारैः संवृत्तैर्निरुद्धैश्च समंततः । ध्रुवमैश्वर्यमापन्नः सिद्धो भवति ब्राह्मणः ११ शरीरादभिनिष्क्रम्य आकाशेन प्रधावति । निरालंबो निरालंबानालंब्य मनसा ततः १२ ऐश्वर्यभूतो भूतात्मा चरन्दिवि न दृश्यते । चक्षुर्भिर्बहुभिर्लोकैः पुरंदरसमैरपि १३ ओंकारं ये त्वधीयन्ते मनसा ब्रम्हसत्तमाः । विभक्ताः सर्वकर्मभ्यस्तेहिपश्यन्ति साधवः १४ एतद्धि परमं ब्रम्ह ब्राह्मणानां मनीषिणाम् । अन्तश्चरांति भूतानां विद्धि चेतनया सह १५ एष शब्दो महानादः

---

विचारीत आहेस तें सविस्तर ऐक २. ऋद्धीस प्राप्त झालेला, योगैकनिष्ठ, ब्रह्मरूपानें अभिव्यक्त झालेला भगवान् ईश्वर, प्रभु भूतांचें अनेकत्व करता झाला ३. कारण अचळभावानें स्तंभासारखा ब्रह्मासनावर स्थित झालेला ( ब्रम्हामध्यें स्थित असलेला ) प्रभु ब्रह्मा रजोगुणाच्या योगानें एकाएकीं विक्षिप्त होतो ४. नंतर ज्याच्यापासून सहस्रावधि पदें उत्पन्न होतात व ज्याच्या आधारानें कार्यक्षम होऊन रहातात त्या ज्ञानमय मोक्षविषय पदाविषयीं तो अनुरक्त होतो ५. त्यानंतर वेदात्मक ब्रह्मसंज्ञक यज्ञ जो विष्णु त्याचें तो योगानें यजन करतो. त्यामुळें ब्रह्मदेवाचें विपुल ज्ञान व ऐश्वर्य प्रवृत्त होतें ६. यास्तव भूतांचें हित इच्छिणाऱ्या ब्रह्मभूत व योगाभ्यास करणाऱ्या ब्राह्मणानें आपलें सर्व प्रथम ऐश्वर्य परोपकारार्थ नियुक्त करावें. ( स्वार्थाकडे त्याचा विनियोग करूं नये ) ७. असो; योगाभ्यास करणारा तो रजस्तमोजन्य विकारानें रहित असें कर्म करूं लागला असतां त्या ब्रह्मभूत ब्राह्मणापासून अव्याकृत ऐश्वर्य प्रवृत्त होतें ८. नंतर तें अंतरिक्षरूप ऐश्वर्यही अव्यक्त व निर्मल ब्रह्मरूप होतें. कारण ते कूटस्थ ब्रह्मच सर्व भूतें, नित्य ऐश्वर्यवान् ब्रह्मादि देव व ब्रम्हवादी मानव यांच्या जीवाचें लयस्थान आहे असें ते जाणतात ९. योगयज्ञामध्यें आकाशैश्वर्यभूत ब्रह्मवेत्यानें ज्यास प्रेरणा केली आहे असें ऐश्वर्य महाबलाढ्य अशा अनेक विकारांस प्राप्त होत शेवटीं वायुभूत होतें १०. पण असें हे अनेक होत असतांना त्यांस सर्वतः निरोध केला असतां ध्रुव ऐश्वर्यास प्राप्त झालेला ब्राह्मण सिद्ध होतो ११. त्यानंतर शरीरांतून निघून स्वतः निराधार झालेला तो निराधार पदार्थांचाच आश्रय करून मनानें आकाशमार्गानें धांवत सुटतो १२. ऐश्वर्यभूत झालेला तो भूतात्मा इंद्रासारख्या अनेक नेत्रांनीं लोक जरी पाहूं लागले तरी अंतरिक्षांत संचार करीत असतांना कोणाला दिसत नाहीं १३. जे ब्रम्हसत्तम साधु मनानें ओंकाराचें अध्ययन करितात ते सर्व कर्मांपासून मुक्त होऊन त्याला पहातात १४. विद्वान् ब्राह्मणांना इष्ट असलेलें हेंच परब्रह्म होय. तें चेतनेसह भूतांच्या अंतःकरणांत संचार करीत असतें असें जाण १५.

पुराणो ब्रम्हसंभवः । वायुभूतोऽक्षरं प्राप्तो वदन्त्येवं द्विजातयः १६ अरूपी रूपसंपन्नो धातुभिः सह संगतः । अंतश्चरति भूतेषु कामकारकरो वशी १७ एतत्पूर्व-मनुध्याय मनसा पूरयन्निव । वेदात्मकं तदा यज्ञं चिन्तयन्तो मनीषिणः १८ ब्राह्मणाः शुचयो दान्ता यशोयुंजं स्तदन्वयाः । ब्रम्हलोकं कांक्षमाणा वैष्णवं पदमुत्तमम् १९ पद्-हेतोः क्रियाः सर्वाः कुर्वन्ति विगतज्वराः । न ह्येते प्रसवादाने भवमिच्छन्ति भारत २० त्रभिर्माल्योपहारैश्च प्रतिभावैश्च वै द्विजः । यजन्ति परमात्मानं विष्णुं सत्वपराक्रमम् २१ यजनं विक्रमं चैव ब्रम्हपूर्वाः प्रचक्रिरे । ब्रम्हापि वैष्णवं तेजो वेदोक्तैर्वचनैर्नृप २२ ब्राम्हणै-र्ब्रम्हविद्भिश्च ब्रम्हज्ञैर्ब्रम्हवादिभिः।शुचिभिः कर्मनिर्मुक्तैः सत्यव्रतपरायणैः२३धातुभिर्मोक्षकाले च महात्मा संप्रदृश्यते । तदेव परमं ब्रम्ह वैष्णवं परमाद्भुतम् २४ रसात्मकं तदैश्वर्यं विका-रान्ते प्रदृश्यते । घोररूपा विकारास्ते व्यथयन्ति महात्मनः २५ संच्छाद्यतीव तोयेन क्षुभ्य-माणो विचेतनः । ऊर्मिभिश्छाद्यते चैव शीतोष्णाभिर्विकारतः २६ महार्णवगतश्चैव दह्यते-न च मज्जते । भग्नाश्चैव महानद्यः सालिले नैव सीदति २७ सीदमानश्च सलिले स शीता-त्पात्यते बलात् । आसनाच्छादनाच्चैव मुच्यमानोविचेतनः २८ श्वभ्रे प्रपद्यमानश्च तोयेन

---

हा ओं-शब्दच महानाद आहे. तो सर्व वर्णांचा आभिव्यंजक, नित्य व आश्र-यकर्त्यास ब्रम्हभाव देणारा आहे. तोच मध्यमावाणीरूप होऊन मातृकामय वैखरीरूप झाला आहे असें ब्राह्मण सांगतात १६. तो रूपरहित असूनही धातूंशीं संगत होत्साता रूपसंपन्न झाला आहे. हाच स्वतंत्र इच्छावान् व असंग होऊन भूतांच्या शरीरांत अंत-र्यामीरूपानें संचार करतो १७. प्रथम याच प्रणवात्मक ब्रह्माचें ध्यान करून हाच श्रुति-सारभूत योग आहे असें अनुचिंतन करणारे विद्वान् ब्राह्मण संकल्पानें त्यास सर्वतः जणु काय प्राप्त झाले आहेत १८. शुचि, दांत, ब्रह्मवंशज व ब्रह्मलोकाची इच्छा करणारे ब्राह्मण उत्तम वैष्णवपदाच्या प्राप्त्यर्थ त्याच्याशीं ऐक्य पावतात १९. त्या परम पदाकरितांच ज्वररहित होऊन ते सर्व क्रिया करितात. पण ते कर्मे करीत असले तरी संसारास कारण होणाऱ्या जन्माची ते इच्छा करीत नाहींत २० पुष्पांप्रमाणें प्रतिभासरूप विश्व, तैजस व प्राज्ञ यांचें समर्पण करून ( त्याचा कारण तुरीय आत्म्यामध्यें लय करून ) द्विज सात्त्विक पराक्रमी परमात्म्या विष्णूचें पूजन करितात २१. ते वेदांनाच मुख्य प्रमाण समजून योग व योगैश्वर्य करते झाले. वेदोक्त वचनांप्रमाणें हे राजा, ब्रह्मवेत्ताही वैष्णवतेजास प्राप्त होतो २२. ब्रह्मज्ञ, ब्रह्मवादी, ब्रह्मवेत्ते, शुची, कर्मांपासुन सर्वथा मुक्त झालेले व सत्यव्रतपरायण ब्राह्मण दोन्ही शरीरांपासून मुक्त होण्याचेवेळीं त्या महात्म्यास साक्षात् पहातात. तेंच वैष्णव, परमअद्भुत, परम ब्रह्म आहे २३, २४. विकारांचा नाश झाला असतां तेंच परमानंदरूप ऐश्वर्य अनुभवास येतें. भयादि घोर तामस विकार महात्म्यास फार व्यथा देत असतात २५. जलानें आतिशय आच्छादित होऊन क्षुब्ध होणारा व त्यामुळें चेतनाशून्य अशा त्याला विकारांच्या योगानें उद्भवलेल्या उष्ण व शीत ऊर्मी आच्छादित करितात २६. महासागरांत पडलेला तो दुःखानें पोळून निघतो. पण त्यांत बुडून मरत नाहीं. त्याच्या दृष्टीनें सर्व महानद्या जणुकाय तुटून त्याच्यावर येऊन कोस-ळतात. पण तो त्यांच्या पाण्यांतही गतप्राण होत नाहीं २७. त्या संकल्पमय तामस विकाररूप जलांत तो आतिशय क्लेश मात्र भोगतो. आसन व आच्छादन यांच्यापासून

परिषिच्यते । शुक्लवर्णेन बहुधा स्रोतसा मूर्ध्नि सर्वतः २९ ऊर्ध्वं ज्योतिरवेक्षंश्च शुक्लैः पीतैश्च बाध्यते । वारिपूर्णैः सुगंभीरैर्विद्युद्भिरिव भासितैः ३० एतैर्विकारैः संवृत्तैर्निरुद्धैश्चैव सर्वशः। ध्रुवमैश्वर्यमासाद्य सिद्धो भवति ब्राम्हणः ३१ रसात्मकं तदैश्वर्यं जिह्वाग्रादभिनिः सृतम् । सहस्रधारं विततं मेघत्वं समुपागतम् ३२ रसांश्च विविधान्योगान्संसिद्धः सृजते प्रभुः । भान्वर्थं सर्वभूतानां योगप्राप्तेनहेतुना ३३ तेजसो रूपमैश्वर्यं विकारैः सह वर्धते । आत्मनो विघ्नजननं स्वस्थो ब्राह्मणकारणे ३४ उग्ररूपैर्विरूपैश्च हन्यते दण्डपाणिभिः । घोररूपैः सुगंभीरैः पिंगाक्षैर्नराविग्रहैः ३५ नेत्रं समुद्धरन् भीमं जिह्वाग्रं चास्य विंदति । नदन्तियुगपन्नादं जृंभमाणाः पुनः पुनः ३६ पुनरेव तदा भूत्वा बहुरूपास्तदाभवन् । नृत्यमानाः प्रगायन्ति तर्पयन्तो विशेषतः ३७ स्त्रीभूताश्च ततः सर्वे युंजानाश्चावलंबिरे । कंठेषु बहुरूपत्वाद्विघ्नैश्चैव प्रलोभयन् ३८ मधुरैरभिधानैश्च व्याहरन्ति न भीतवत् । पतन्ति युगपत्सर्वे पादयोर्मूर्धभिर्युताः ३९ प्रसादं कांक्षमाणाश्च योगस्यान्तरविघ्नतः । बहुप्रकारं कथयन्नृत्यन्ति च तरन्ति च ४० एतैर्विकारैः संवृत्तैर्निरुद्धैश्चैव सर्वशः । ध्रुवमैश्वर्यमासाद्य सिद्धोभवति ब्राह्मणः ४१ तदर्चिष इवाग्नेया आदित्यस्येव रश्मयः । तेजोरूपकमैश्वर्यं जनितास्तेजवि-

---

मुक्त झालेला तो निश्चेष्ट होतो. शीत त्याला बलात्कारानें खालीं पाडतें २८. खळग्यांत पडणाऱ्या त्याच्यावर जल परिसेक करितें. त्याच्या मस्तकावर सर्व बाजूंनीं शुक्लवर्ण जलाचे अनेक प्रवाह पडूं लागतात २९. वर ज्योतीकडे पाहूं लागल्यास त्याला जलपूर्ण व आतिगंभीर अशा चमकणाऱ्या विजाप्रमाणेंच शुभ्र व पिवळ्या तेजाकडून पीडा होते ३०. हे तामस विकार योग्याला सर्वतः आवृत करूं लागले असता त्यानें धैर्यानें त्यांचा सर्वशः निरोध करावा. ह्मणजे ध्रुव ऐश्वर्यास प्राप्त होऊन तो ब्राह्मण सिद्ध होतो ३१. तेव्हां रसनेंद्रियापासून बाहेर निघालेलें रसात्मक ऐश्वर्य सहस्रधारांनीं पसरून मेघत्वास प्राप्त होतें ३२. तो सिद्ध झालेला प्रभु विविध योग व रस यांस निर्माण करतो. योग प्राप्त झालेला असल्याकारणानें सर्व भूतांच्या शरीरभोगादिकांकरितां तो ऐश्वर्यसंपन्न होतो ३३. तेजाचें ऐश्वर्य रूप हें आहे. स्वस्थ व ब्रह्मज्ञ ब्राह्मणाच्या मोक्षसाधनभूत योगामध्यें विघ्न उत्पन्न करणारें तें आपल्या विकारांसह वाढतें ३४. उग्ररूप, विद्रूप, दंडपाणी, घोररूप, आति गंभीर, पिंगटवर्ण नेत्रयुक्त मनुष्याशरीरी तेजोविकारांकडून तो मारला जातो ३४,३५. ते त्याचे नेत्र उपटतात. भयंकर कर्म करून जिव्हाग्राचे तुकडे करितात. पुनः पुनः व्यक्त होऊन भयंकर नाद करितात ३६. पण असल्या चेष्टांना साधक दाद देत नाहीं असें वाटल्यास ते पुनः बहुरूपी होतात. विशेषरीतीनें साधकास तृप्त करण्याच्या उद्देशानें नाचणारे ते गायनही करितात ३७. ते सर्व स्त्रियांच्या आकृतीचे होतात, व अनन्य मनानें त्याच्या गळ्यांत मिठ्या मारतात. याप्रमाणें बहुरूपी होऊन अनेक विघ्नांच्या योगानें ते तैजस विकार साधकाला लोभ उत्पन्न करितात ३८. जणुकाय निर्भयपणें मधुर नांवांनीं ते त्याला हाक मारतात. एकाचवेळीं ते सर्व त्याच्या पायांवर डोकीं ठेवितात ३९. योगाभ्यासांत विघ्न आणून त्यानें अपल्यावर अनुग्रह करावा असें ते इच्छितात. नानाप्रकारच्या गोष्टी सांगून ते त्याच्यापुढें विचित्र नाच करितात व त्याचें उल्लंघन करितात. ( त्याला जिंकतात ) ४०. पण तैजस विकारांनीं अशारीतीनें सर्वतः घेरलें असतांनाही जो धीर साधक सर्वशः त्यांचा

न्द्वः ४२ ज्योतींषि चैव संवृत्ता आकाशमुपसंगताः । चरन्ति लोके सततं सूर्याचन्द्रमसो- र्जितम् ४३ चन्द्रसूर्यात्मकं दिव्यं ज्योतिष्मद्वनमुत्तमम् । एतद्विभ्राजते लोके कालचक्रं ध्रुवं वरम् ४४ अर्धमासाश्चमासाश्चऋतुसंवत्सराण्यथ । क्षणा लवा मुहूर्ताश्च कलाः काष्ठास्तथैव च ४५ अहोरात्रप्रमाणं च निमिषोन्मेषणं तथा । ताराणां गतयश्चैव ग्रहाणां च विशेषतः ४६ अथ पार्थिव मैश्वर्यं विकारग्रहसंभवम् । योगयुक्तास्त्वभिग्रस्ता यान्त्यंते ह्यचलासनात् ४७ अलोभाच्छिद्यते सद्यो वेपमानोऽनुकीर्त्यते । सीदते वसुधामध्ये भिद्यमानः पुनः पुनः ४८ भूतानां बहुरूपैश्च अन्यैश्च तलवासिभिः । विषयैर्युज्यते क्षिप्रं संक्षेपात्समवरुध्यते ४९ ततः पार्थिवमैश्वर्यं सेवमानश्च सर्वतः । मूर्तिमद्भिश्च बहुधा धातुभिः स च हन्यते ५० शक्तितो- मरनिस्त्रिंशैर्गदाभिश्चाप्यनेकधा । असिभिः पात्यते चैव क्षुरधारैः सहस्रशः ५१ भिद्यते चैव बाणाग्रैः सुतीक्ष्णैर्मर्मभेदिभिः । एभिर्विकारैर्निवृत्तैर्निरुद्धैश्चैव सर्वशः ५२ ध्रुवमैश्वर्यमा- पन्नः सिद्धो भवति ब्राह्मणः । ततः पार्थिवमैश्वर्यं निर्मुक्तस्य विकारतः ५३ प्रादुर्भवति संजाते समाधौ प्रलयं गते । दिव्यं गन्धं समाघ्राय दिव्यार्थांस्ताञ्छृणोति च ५४ दिव्य-

---

निरोध करतो तोच ब्राह्मण नित्य ऐश्वर्यास प्राप्त होऊन सिद्ध होतो ४१. नंतर तेच विकार अग्नीच्या ज्वालांप्रमाणें अथवा सूर्याच्या किरणांप्रमाणें तेजोरूप ऐश्वर्य उत्पन्न करितात. ते तेजोविकारच जलबिंदू बनतात ५२. नंतर सत्त्वादि गुणांनीं युक्त असलेले योगी ज्योतिस्वरूप बनतात व सूर्य आणि चंद्र यांनीं संपादन केलेल्या आकाशाशीं संगत झालेले ते या सृष्टींत सतत संचार करीत रहातात ४३. ध्रुवाच्या अनुरोधानें सतत फिरणारें हें कालचक्र विशेषप्रकारें भासत असतें. तें चंद्रसूर्यात्मक, दिव्य, ज्योतिष्मत उत्तम वनच असून तेंही या योग्याच्या आज्ञेनेंच प्रवृत्त होतें ४४. अर्धमास ( पक्ष ), मास, ऋतु, संवत्सर, क्षण, लव. मुहूर्त, कला, काष्ठा ४५, अहोरात्र प्रमाण, निमिषोन्मेषण, तारांच्या व विशेषतः ग्रहांच्या गती ( इत्यादि सर्व त्याच्या अधीन असतें. ही योग्याची स्तुति आहे ) ४६. आतां पार्थिव ऐश्वर्याचें वर्णन ऐक. राजस व तामस विकारांचा स्वीकार केला असतां तें प्राप्त होतें. योगयुक्त पुरुषांस त्या विकारांनीं ग्रासून सोडल्यास शेवटीं ते अचल आसनापासून चलायमान होतात. अलोभानें तें छिन्न-भिन्न होतें. पण लोभवश होऊन योगी कंपायमान झाल्यास त्याची निंदा होते. पुनः पुनः सिद्धीपासून भ्रष्ट होणारा तो पृथ्वीमध्यें खिन्न होतो ४७,४८. भूतांच्या अनेकरूप व भूतलवासी दुसऱ्याही अनेक विषयांनीं तो युक्त होतो. सर्वतः संकुचित झाल्यामुळें तो विकारांकडून घेरला जातो ४९. नंतर पार्थिव ऐश्वर्याचें सेवन करणारा योगी अनेकप्रकारच्या मूर्तिमान अन्नादि धातूंकडून मारला जातो ५०. शक्ति, तोमर, निस्त्रिंश, गदा, तीक्ष्णधारांच्या तरवारी इत्यादिकांच्या योगानें अनेकप्रकारें ते त्याच्यावर सहस्रशः प्रहार करितात ५१. मर्म- भेदी व अतितीक्ष्ण अशा बाणांच्या अग्रांनीं ते त्याचें शरीर छिन्न-भिन्न करून सोडतात. पण इतकें करूनही योगी भीत नाहीं असें पाहून पार्थिव विकार आपोआप शांत होऊन योग्यानेंही त्यांचा सर्वशः निरोध केला असता ५२, ध्रुव ऐश्वर्यास प्राप्त झालेला ब्राह्मण सिद्ध होतो. नंतर विकारापासून सर्वथा मुक्त झालेल्या त्याचें समाधी लागून मन लीन झालें असतां पार्थिव ऐश्वर्य व्यक्त होतें. दिव्य गंधाचा सुवास घेऊन तो दिव्य विषयांचा अनुभव घेतो. शरीरपात होई तों दिव्यरूप मुक्त पुरुषांहून तो भिन्न आहे असा अनुभव येतो. पण त्यानंतर

रूपैश्च पुरुषैश्छिद्यते न च भिद्यते । गच्छन्सुकृतिनां चान्तः प्रधानात्मा क्षरन्निव ५५
[ ७०४ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततोन्यां धारणां गत्वा मनसा स पितामहः । ब्रह्मकर्म समारंभे निर्मुक्तेनांतरात्मना १ सर्वांगधारणां कृत्वा मनसा प्रहसन्निव । ब्रह्मयोगेन च ब्रह्मा सृजते मनसा प्रजाः २ चक्षुषा रूपसंपन्ना ह्यप्सरा सृजते प्रभुः । नासिकाग्राच्च गन्धर्वान्सुचित्राम्बरवाससः ३ तुंबुरुप्रमुखान्सर्वाञ्छतशोऽथ सहस्रशः । नृत्यवादित्रकुशलान्कुशलान्समगीतिषु ४ ब्रह्मयोगेन योगज्ञः स्वयंभूर्भगवान्प्रभुः चारुनेत्रांशुकेशांतांसुभ्रूंचारुनिभाननान् ५ पद्मेनशतपत्रेणचारुणासुविराजिताम् । स्वक्षांशुचिगिरंसेव्यांब्राह्मीं मूर्तिमतींश्रियम् ६ ससृजेमनसाब्रह्मासम्यक्प्रोक्तेनचेतसा । भावयोगेन भूतात्मा सर्वप्राणभृतान्नृप ७ चक्षुषो रूपसंपन्नाः सृजत्सोप्सरसः प्रभुः । नासिकाग्राच्च गन्धर्वान्सुवासः सुप्रवादितान् ८ गानप्रभावं संचक्रे गन्धर्वाणामशेषतः । अन्येषां चैव विप्राणां गानं ब्रह्मप्रभाषितम् ९ पद्भ्यां सृजति भूतानि गतिमन्ति ध्रुवाणि च । नरकिन्नरयक्षांश्च पिशाचोरगराक्षसान् १० गजान्सिंहांश्चव्याघ्रांश्च मृगांश्चैवसहस्रशः । तृणजातींश्च बहुधा भावहेतोश्चतुष्पदान् ११ ये तु हस्ताच्चिखादन्ति कर्मप्राप्तेनहेतुना । हस्तेभ्यः कर्म ससृजे मन्तव्यं मनसा तथा १२

---

( म्हणजे शरीर सोडून ऐकात्म्यास प्राप्त झाल्यावर ) तो भिन्न आहे असें मुळींच वाटत नाहीं. तो पुण्यवानांच्या अंतःकरणांतही प्रवेश करतो. प्रधानाप्रमाणें परिणाम पावणारा तो त्याला जिंकून सर्वांच्या अंतःकरणाचा साक्षी होतो ५३-५५. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वांचा एकूणिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ १९ ॥

वैशंपायनः—त्यानंतर मनानें दुसऱ्या धारणेस धरून ( म्हणजे पूर्वोक्त विपरीत हें सर्व मीच आहे— अशी भावना करून ) तो पितामह बाह्य विषयांपासून परतविलेल्या मनानें ब्रह्मप्रापक आसनादि धारणापर्यंत कर्माचा आरंभ करता १. मनानें सर्वांग धारणा करून हंसत असल्याप्रमाणें ब्रह्मा ( ब्रह्मज्ञ ) सूत्रात्म्याशीं ऐक्य पावून मनानेंच सर्व प्रजा उत्पन्न करता २. तो प्रभु नेत्रानें रूपसंपन्न अप्सरा निर्मितो. नासिकाग्रापासून विचित्र वस्त्रें नेसणाऱ्या तुंबुरुप्रभृति सर्व शेंकडों व सहस्रावधि नृत्यवादित्र कुशल व उत्तम गायनांत निपुण अशा गंधर्वांस उत्पन्न करतो. तो योगज्ञ स्वयंभू, भगवान् प्रभु ब्रह्मा ब्रह्मयोगानें जिच्या केसांचीं अग्रें चांगलीं आहेत, भुंवया उत्तम आहेत, नेत्र रमणीय आहेत, जिचें मुख शतपत्र कमलाप्रमाणें शोभेनें अतिशय विराजमान होत आहे, जिचे नेत्रगोलक पाणिदार आहेत व वाणी पवित्र आहे, अशा सर्वांस सेव्य असलेल्या साक्षात् ब्राह्मीलक्ष्मीस उत्तमप्रकारें चित्तस्थैर्य करून उत्पन्न करता झाला. हे राजा, त्यानें त्या वेदलक्षण देवीला जीवांच्या अभिप्रायाकडे ध्यान देऊन निर्माण केलें. आपल्या भोगांकरितां नव्हे ३–७. त्या प्रभूनें नेत्रापासून रूपसंपन्न अप्सरा व नासिकाग्रापासून उत्तमवस्त्रें व अत्युत्तम वाद्यें यांनीं युक्त असलेले गंधर्व यांस निर्माण केलें ( असें वर सांगितलेंच आहे. ) ८. तो प्रभु सर्व गंधर्वांकरितां गांधर्व वेद व इतर ब्राह्मणांकरितां सामगायन करता झाला ९. तो आपल्या दोन्ही पायांपासून गतियुक्त ( चर, जंगम ) व स्थिर ( अचर स्थावर ) भूतें निर्मितो. नर, किन्नर, यक्ष, पिशाच, उरग, राक्षस, गज, सिंह, व्याघ्र, नानाप्रकारचे हजारों पशू, व प्राण्यांकरितांच नानाप्रकारच्या तृणजाती

वायुना सविसर्गं च भूतानां सुखमिच्छता । उपतस्थे तदानन्दं पंचेन्द्रियसमाधिना १३
हृदयादसृजद्गावो बाहुभ्यां पक्षिणस्तथा । अन्यानि चैव सत्त्वानि तैस्तैर्वेषैः पृथग्विधैः १४
ऋषिं त्वंगिरसं चैव मुनिं ज्वलिततेजसम् । ब्रह्मवंशकरं दिव्यं व्यतिषिक्तषडिन्द्रियम् १५
भ्रुवोंतरादजनयद्योगाद्योगेश्वरः प्रभुः । ब्रह्मवंशकरं दिव्यं भृगुं परमधार्मिकम् १६ ललाटम-
ध्यादसृजन्नारदं प्रियविग्रहम् । सनत्कुमारं मूर्ध्नश्च महायोगी पितामहः १७ अभिषिच्य तु
सोमं च यौवराज्ये पितामहः । ब्राह्मणानां च राजानं शाश्वतं रजनीश्वरम् १८ तपसा
महता युक्तो ग्रहैर्ग्रहपुरः सरः । चचार नभसो मध्ये प्रभाभिर्भासयन् जगत् १९ स गात्रै-
र्भगवान्योगान्मनसा सिद्धिमागतः । सृष्टवान्सर्वभूतानि स्थावराणि चराणि च २० तत्रस्था-
नानि भूतानां योगांश्चैव पृथग्विधान् । निधत्ते शतशो ब्रम्हा सर्वभूतपितामहः २१ एव
ब्रम्हमयो यज्ञो योगः सांख्यश्च तत्त्वतः । विज्ञानं च स्वभावश्च क्षेत्रं क्षेत्रज्ञ एव च २२ एकत्वं
च पृथक्त्वं च संभवो निधनं तथा । कालः कालविदां चैव ज्ञेयं विज्ञानमेव च २३ [७२७]

---

कर्म प्राप्त कारणानें जे हातांत घेऊन भक्ष्य खातात असे वानरादि चतुष्पाद, यांस त्यानें पायांपासून निर्मिलें. हातांपासून कर्म व तसेंच मनापासून मननविषय उत्पन्न केले १०-१२. भूतांच्या सुखाची इच्छा करणाऱ्या त्यानें वायूच्या योगानें प्राण्याच्या प्राणनादि कार्यरूप विविध सृष्टि निर्माण केली. ( पण अशी राजसी सृष्टि करणाऱ्या त्याला मुक्ति कशी मिळेल असें कोणी ह्मणेल ह्मणून सांगतात. ) पांची इंद्रियांच्या निराधानें परमात्म्याचें ध्यान करीत स्थित असतांनाच त्यानें लीलेनें ही सृष्टि रचली. अर्थात् ब्रह्मसामीप्यास प्राप्त झालेल्या त्याच्या मुक्तीला कांहीं बाध येत नाहीं १३. असो; त्यानें हृदयापासून गायींना उत्पन्न केलें. दोन्ही बाहूंपासून पक्षी निर्माण केले. त्या त्या निरनिराळ्या वेषांनीं दुसरे प्राणीही त्यानें उत्पन्न केले १४. ब्रह्मवंशकर, दिव्य व पाहिजे त्या ज्ञानें-द्रियानें पाहिजे त्या विषयाचा भोग घेणाऱ्या अति तेजस्वी अंगिरस नामक मंत्रद्रष्टया मुनीस ब्रह्मदेवानें भ्रूमध्यांतून उत्पन्न केलें १५. तो योगेश्वर प्रभु ललाटमध्यांतून योगसामर्थ्यानें ब्रह्मवंशकर, दिव्य व परम धार्मिक अशा भृगूस उत्पन्न करता झाला १६. ज्याला कलह प्रिय आहे अशा नारदास सनत्कुमारास तो महायोगी पितामह मूर्धप्रदेशांतून निर्माण करता झाला १७. त्यानें सोमाला ब्राह्मणांचा शाश्वत राजा व रात्रीचा वल्लभ करून यौवराज्यावर स्थापिलें १८. तेव्हां मोठ्या तपानें युक्त असलेला तो ग्रहांचा पुरःसर ग्रहांसह आपल्या प्रभेनें जगाला प्रकाशित करीत आकाशाच्या मध्यप्रदेशांतून संचार करूं लागला १९. तो भगवान्, गात्रें व मन यांसह योगाभ्यासामुळें सिद्धीस प्राप्त झाला आणि सर्व स्थिरचर भूतें उत्पन्न करता झाला २०. नंतर सर्वभूत पितामह ब्रह्मानें त्या सृष्टीमध्यें भूतांचीं शेंकडों भिन्न भिन्न स्थानें व भिन्न भिन्न अधिकार नियत केलें २१. तत्त्वतः हाच ब्रह्ममय यज्ञ, योग, सांख्य, विज्ञान, स्वभाव, क्षेत्र व क्षेत्रज्ञ आहे २२. एकत्व, पृथक्त्व, उद्भव, मरण, कालवेत्त्यांचा काळ, ज्ञेय व विज्ञान हेंही सर्व तेंच तत्त्व आहे. ( ह्मणूनच—सर्व जगाचें जें आदि कारण तेंच शून्यवाद्यांचें शून्य, ब्रह्मवेत्त्यांचें ब्रह्म, विज्ञानवादी बौद्धांचे विज्ञान, सांख्यांचा पुरुष, योग्यांचा ईश्वर, शैवांचा शिव, वैष्णवांचा वैष्णव, कालज्ञांचा कालपुरुष, आत्म-ज्ञांचा आत्मा, अनात्मवाद्यांचा अनात्मा, माध्यमिकांचें मध्य, सर्वत्र समदृष्टि ठेवणाराचें

इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि विंशोऽध्यायः ॥ २० ॥

जनमेजय उवाच ॥ श्रुतं ब्रम्हयुगं ब्रह्मन्युगानां प्रथमं युगम् । क्षत्रस्यापि युगं ब्रम्हञ्छ्रोतुमिच्छाम्यहं प्रभो १ ससंक्षेपं सविस्तारं नियमैर्बहुभिश्चितम् । उपायज्ञैश्च कथितं क्रतुभिश्चैव शोभितम् २ वैशंपायन उवाच ॥ एतत्ते कथयिष्यामि यज्ञकर्मभिरर्चितम् । दानधर्मैश्च विविधैः प्रजाभिरुपशोभितम् ३ तेऽङ्गुष्ठमात्रा मुनय आदत्ताः सूर्यरश्मिभिः । मोक्षप्राप्तेन विधिना निराबाधेन कर्मणा ४ प्रवृत्ते चाप्रवृत्ते च नित्यं ब्रम्हपरायणाः । परायणस्य संगम्य ब्रम्हणस्तु महीपते ५ श्रीवृताः पावनाश्चैव ब्राम्हणाश्च महीपते । चरितं ब्रम्हचर्याश्च ब्रम्हज्ञानावबोधिताः ६ पूर्णे युगसहस्रान्ते प्रभावे प्रलयं गताः । ब्राम्हणा वित्तसंपन्ना ज्ञानसिद्धाः समाहिताः ७ व्यतिरिक्तेन्द्रियो विष्णुर्योगात्मा ब्रम्हसंभवः । दक्षः प्रजापतिर्भूत्वा सृजते विपुलाः प्रजाः ८ अक्षराद्ब्राम्हणाः सौम्याः क्षरात्क्षत्रियबान्धवाः । वैश्याविकारतश्चैव शूद्रा धूमविकारतः ९ श्वेतलोहितकैर्वर्णैः पीतैर्नीलैश्च ब्राम्हणाः । अभिनिर्वर्तिता वर्णाश्चिन्तयानेन विष्णुना १० ततो वर्णत्वमापन्नाः प्रजा लोके चतुर्विधाः । ब्राम्हणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्चैव महीपते ११ एकलिंगाः पृथग्धर्मा द्विरदाः परमाद्भुताः । यातना-

---

सम, सर्व शास्त्रांचा सिद्धान्त, सर्व प्राण्यांच्या हृदयांत असलेलें, व सर्व आहे, असें बृहद्योगवासिष्ठ, पद्मपुराण इत्यादिकांत ह्मटलें आहे ) २३. इति श्रीमहा० खिल० हरि० भविष्य पर्वाचा विसावा अध्याय समाप्त झाला ॥ २० ॥

जनमेजयः— हे ब्रह्मन्, युगांतील पहिलें ब्रह्मयुग मीं ऐकलें. आतां हे प्रभो, मी क्षत्रयुगही ऐकण्याची इच्छा करीत आहे १. कारण तें संक्षेप व विस्तार यांसह यज्ञांनीं उपशोभित, अनेक नियमांनीं व्याप्त, व उपायज्ञ पुरुषांनीं सांगितलेलें आहे २. वैशंपायनः— हें धर्माचें माहात्म्य मी तुला सांगतों. उपासनादि कर्मे न करितां केवल यज्ञादिकर्मेंच करणाऱ्या कर्मठांकडून त्यांचा मोठा सत्कार होत असतो. अनेक दानधर्म व जातेष्ट्यादि प्रजाकर्मे यांनीं अतिशय सुशोभित असतें ३. तें आपणाला, शरीर सोडून स्वर्गास जाणें पुनः या लोकीं परत येणें इत्यादि कृत्यांस योग्य अशा, अंगुष्ठप्रमाण समजणारे मुनी सूर्य किरणांकडून वर आकर्षण केले जातात. पण मोक्षप्राप्त विधीनें न जातां निष्प्रतिबंध कर्मानें व्यवहार करितात. यज्ञादिकांमध्यें प्रवृत्त, शमादिकांमध्यें अप्रवृत्त, सतत वेदपरायण, ईश्वराच्याप्रीतीच्या उद्देशानें वेदोक्त कर्म करणारे, श्रुतिसंपन्न, पावन, ब्राह्मणधर्माचें आचरण करणारे, हे राजा, ब्रह्मचर्य पाळणारे व परोक्ष ब्रह्मज्ञानयुक्त, असे जे कर्मठ युगसहस्रपर्यंत ह्मणजे ब्रह्मदेवाची आयुर्मर्यादा संपेपर्यंत ब्रह्मलोकीं राहून पूर्व कल्पीं लीन झालेले असतात ते दैव—मानुष वित्तसंपन्न, शांतचित्त व ज्ञानसिद्ध ब्राह्मण होऊन उत्पन्न होतात ४—७. त्यामध्यें जो योगात्मा होऊन देहेंद्रियांवर आसक्ति न ठेवतां विष्णूच मी आहें असा अभिमान धरतो तो या कल्पामध्यें ब्रह्मपुत्र दक्षप्रजापति होऊन विपुल प्रजा निर्माण करतो ८. सात्त्विक धर्मापासून सौम्य ब्राह्मण, सत्त्वरजोमय मिश्र धर्मापासून क्षत्रिय, सकाम धर्मापासून वैश्य, व तमोमय विधर्मापासून शूद्र झाले ९. वर्णाविषयीं चिंतन करणाऱ्या विष्णूनें श्वेत, रक्त, पीत व कृष्ण या वर्णांनीं ब्राह्मणादिकांस निर्माण केलें १०. गुण व वर्ण यांच्या गौण प्रयोगावरूनच या लोकांतील चतुर्विध प्रजा वर्णत्वास प्राप्त झाली आहे व हे राजा, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चारी वर्ण होत ११. ज्यांची

याभिसंपन्ना गतिज्ञाः सर्वकर्मसु १२ त्रयाणां वर्णजातानां वेदप्रोक्ताः क्रियाः स्मृताः । तेन ब्राम्हणयोगेन वैष्णवेन महीपते १३ प्रज्ञया तेजसा योगात्तस्मात्प्राचेतसः प्रभुः । विष्णुरेव महायोगी कर्मणामन्तरं गतः १४ ततो निर्माणसंभूताः शूद्राः कर्मविवर्जिताः । तस्मान्नार्हन्ति संस्कारं न ह्यत्र ब्रम्ह विद्यते १५ यथाग्नौ धूमसंघातो ह्यरण्या मथ्यमानया । प्रादुर्भूतो विसर्पन्वै नोपयुञ्जतिकर्मणि १६ एवं शूद्रा विसर्पन्तो भुवि कार्त्स्न्येन जन्मना । नासंस्कृतेन धर्मेण वेदप्रोक्तेन कर्मणा १७ ततोऽन्ये दक्षपुत्राश्च संभूता ब्रम्हयोनयः । बलवन्तो महोत्साहा महावीर्या महौजसः १८ पित्रा प्रोक्ता महात्मानो दक्षेणायज्ञकर्मणा । अन्तमिच्छाम्यहं श्रोतुं धात्र्याः पुत्राबलो ह्यहम् १९ ततो विधास्ये तत्त्वज्ञः प्रजानां विपुलं बलम् । विपुलत्वाद्धि क्षेत्राणां ममापि विपुलाः प्रजाः २० न तेषां दर्शयद्देवी चक्षुषा रूपमात्मनः । प्रजापतिसुतानां वै विपुलासारमिच्छताम् २१ आत्मनो भावनिर्वृत्ते भावे कृतयुगे तदा । जनित्री सर्वभूतानामण्डजानुद्भिजांस्तथा २२ संवेदजननी धात्री चोति माया प्रचोदिता । अणुतां तनुतां चैव जन्तूनां कर्मभोगिनाम् २३ [ ७५० ] इति श्रीमहाभारते खिलेषु

---

आकृति एकसारखीच असून धर्म मात्र पृथक् आहेत असें हे अति अद्भुत द्विपद प्राणी आहेत. सर्व कर्मांतील गति जाणणारे ते कर्मफलांचा भोग घेण्याकरितां ब्राह्मणादिवर्णांत उत्पन्न होतात १२. त्यांतील पहिल्या तीन वर्णांच्या लोकांना वेदोक्त क्रिया सांगितल्या आहेत. यास्तव हे महीपते, तुझां तिघांनाच ब्राह्मण व वैष्णव योगानें वेद प्राप्त आहे. ( अर्थात् त्रैवर्णिकत्व हें केवल भगवत्कृपेनेंच प्राप्य आहे ) १३. ज्ञान व ऐश्वर्य यांच्या योगानें दक्ष स्वत: प्रभु विष्णूच आहे. तो महायोगी कर्मपाशांनीं बद्ध आहे असें वाटलें तरी तो ज्ञानीच आहे. ( आपल्या अधिकारानुरूप सृष्टि करीत असला तरी तो जीवन्मुक्तच होय ) १४. त्रैवर्णिकांची सेवा करण्याकरितांच उत्पन्न केलेले शूद्र कर्मशून्य आहेत. यास्तव ते संस्कारास पात्र नाहींत व त्यांना वेदाध्ययन नाहीं १५. मंथन करीत असलेल्या अरणीपासून जसा धूमसंघात प्रकट होतो त्याप्रमाणें शूद्र सृष्टीमध्यें प्रादूर्भूत झालेला असल्याकारणानें कर्मामध्यें नियुक्त केला जात नाहीं १६. यास्तव शूद्र सर्व जन्मभर सेवा करून भूलोकीं आयुष्य घालवितात. संस्कारांच्या अभावीं वेदोक्त धर्म व कर्म यांच्याशीं त्याचा संबंध होत नाहीं १७. त्यानंतर वेदांचें स्थानभूत असे दुसरे दक्षपुत्र उत्पन्न झाले. ते मोठे बलवान्, महा-उत्साहसंपन्न, महावीर्यवान् व महापराक्रमी होते १८. त्या महात्म्यांस यज्ञकर्म न करणाऱ्या दक्ष पित्यानें ह्मटलें ' पुत्रांनो, मी धात्रीचा अंत ऐकण्याची इच्छा करितों. कारण मी अबल आहें १९. त्याला जाणून नंतर तत्त्वज्ञ झालेला मी प्रजांनाही विपुल बल देईन. कारण क्षेत्रें विपुल असल्यामुळें मला प्रजाही विपुल होईल ' २०. पण त्या मायेचें सार जाणण्याची इच्छा करणाऱ्या दक्षपुत्रांना त्या धात्री देवीनें आपलें रूप दाखविलें नाहीं. ( कारण मायेचें प्रमाणत: निरूपण करतां येणें शक्य नाहीं. प्रकाशाच्या अभावीं अनुभवास येणाऱ्या अंधकाराप्रमाणें विचार करीपर्यंतच ती अबाधित असते ) २१. पण त्या प्रजापतिपुत्रांच्या कृतयुगामध्यें शुद्धसत्त्वमय भाव झाला असतां व त्या धात्रीचें दर्शन घडलें असतां प्रमात्यानें प्रेरणा करितांच ती सर्व भूतें, अंडज, उद्भिज्ज इत्यादिकांस उत्पन्न करूं लागली. ज्ञानजननीही तीच धात्री होय. त्याचप्रमाणें कर्मांचीं फळें भोगणाऱ्या जंतूंची सूक्ष्मता व विस्तृतताही तीच निर्माण

हरिवंशे भविष्यपर्वणि एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

जनमेजय उवाच ॥ साध्वहंश्रोतुमिच्छामित्रेतायांब्राम्हणोत्तम । यज्ज्ञात्वासर्वविद्यानांपरं-पश्ये यमव्ययम् १ वैशंपायन उवाच ॥ दक्षस्तु पुनरालंब्य स्त्रीभावं पुरुषोत्तमः । योगायोगेश्वरात्मानं विषण्णो गिरिमूर्धनि २ सुजानुः पीनजघना सुभ्रूः पद्मनिभानना । रक्तान्तनयना कान्ता सर्वभूतमनोरमा ३ दक्षः प्राचेतसस्तस्यां कन्यायां जनयत्प्रभुः देहार्धयोगविधिना-कन्याः पद्मनिभाननाः ४ दक्षः पुरुषरूपेण स्त्रीरूपमपहाय वै । दर्शने सर्वभूतानां कान्तः कान्ततरोऽभवत् ५ तां कन्याः प्रददौ दक्षः स्वयं प्राचेतसः प्रभुः । ब्रह्मदेयेन विधिना ब्रह्म-प्राप्तेन भारत ६ प्रददौ दश धर्माय कश्यपाय त्रयोदश । सप्तविंशति सोमाय पत्नीर्हितोः समाहितः ७ दक्षोदत्वाथताः कन्या ब्रम्हक्षेत्रं प्रपद्य च । ब्रम्हणाध्युषितं पुण्यं समाहित-मना मुनिः ८ तप्यमानो मृगैः सार्धं चचार वसुधां नृप । तृणमूलफलैर्वृद्धो वृद्धश्चतप-सासकृत् ९ मृगास्तु तस्य मोदन्ति फलं मोदन्ति ब्राम्हणाः । दीक्षिताः पुण्यकर्माणस्तपसा दग्धकि-ल्बिषाः १० संग्रामकाले कालज्ञः शरीरादिपतिर्मुनिः । कर्मयज्ञकृतां तत्र सिद्धिं पश्यति लक्षणाम् ११ दानमानप्रवीराश्च निरुद्वेगा निरामिषाः । मृगैः सह जरां यान्ति सपर्णाकाः सुपुत्रिणः १२ ब्राह्मणाः स्तोत्रसंसिद्धा जनित्रे प्रथमे पदे । ब्रम्हणाध्युषितत्वाच्च ब्रम्हक्षेत्र-

---

करते २२,२३. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वांचा एकविसावा अध्याय समाप्त झाला॥ २१॥

जनमेजयः—हे उत्तम ब्राह्मणा, आतां मी त्रेतायुगांतील केवल प्रवृत्त्यात्मक यज्ञादि-रूप धर्मामध्यें जें चांगलें असेल तेंच ऐकण्याची मी इच्छा करतों. ह्मणजे त्या चांगल्या कर्माचेंच तेवढें आचरण करून मी सांख्ययोगादि सर्व विद्यांचें प्रतिपाद्य जें अव्यय ब्रह्म तें पाहीन १. वैशंपायनः—नंतर पर्वताच्या शिखरावर एकटाच असलेला दक्ष खिन्न झाला. त्या पुरुषोत्तमानें योगसामर्थ्यानें दक्षांच्या आत्मभूत स्त्री भावाचा अवलंब केला ( तो स्वतः अर्धशरीरानें स्त्री झाला. ) जिच्या जानू चांगल्या आहेत, जघनभाग पुष्ट आहे, भुंवया उत्तम आहेत, कमलाप्रमाणें जिचें मुख आहे, नेत्रांचे प्रांतभाग लाल आहेत, जी रमणीय व सर्व भूतांस रमणीय वाटणारी आहे. अशी ती स्त्री होती २,३. प्राचेतस प्रभु दक्षानें त्या कन्येच्या ठायीं देहार्धयोगविधीनें कमलमुखी कन्या उत्पन्न केल्या ४. नंतर दक्ष स्त्रीरूप सोडून पुरुषरूपानें सर्व भूतांस दिसूं लागला व तो त्यावेळीं पहिल्यापेक्षांही अधिक रमणीय दिसला ५. हे भारता, त्या प्राचे-तस दक्ष प्रभूनें स्वतः त्या कन्या योग्य वरांस वेदोक्त ब्राह्मविवाहविधीनें दिल्या ६. त्या शांतचित्त दक्षानें साठ कन्यांतील दहा धर्माला दिल्या, तेरा कश्यपाला दिल्या व सत्तावीस सोमाला भार्या होण्याकरितां दिल्या ७. याप्रमाणें त्या कन्या देऊन व ब्रह्मदेवानें जेथें वास केला होता त्या पुण्यकारक ब्रम्हक्षेत्रास ( आध्यात्मिक प्रयागास ) प्राप्त होऊन तो मुनि शांतचित्त झाला ८. व हे राजा, तप करणारा तो हरिणांसह या सर्व पृथ्वीभर फिरूं लागला. तो वृद्ध तृण, फळें, मूळें यांवर निर्वाह करून वारंवार केलेल्या तपानेंही वृद्ध झाला होता ९. त्या अरण्यांतील पशू त्याच्या दर्शनानें आनंदित होत असत. दीक्षित; पुण्यकर्में करणारे व तपानें ज्यांचें पाप दग्ध झालें आहे असे ब्राह्मणही त्याला मिळालेले अहि-सेचें फळ पाहून आनंदित होत असत १०. कालज्ञ व शरीरादिकांचा स्वामी मुनि चित्तजय-समयीं कर्मयज्ञकृत परिमित सिद्धीस पहातो ११. आणि असे जे दान–मान–शूर, उद्वेगशून्य,

मिहोच्यते १३ यतिभिः कर्मभिर्मुक्तैर्जितक्रोधैर्जितेंद्रियैः । चरद्भिर्वसुधां विप्रैरकिंचनपथे- षिभिः १४ या प्रजा पूर्वमारूढा मानसी ब्रम्हचारिणी । सैवैषा व्यक्तिमापन्ना स्वभावद्दुर- तिक्रमा १५ अव्यक्ता व्यक्तिमापन्ना स्वभावाद्दुरतिक्रमा । व्यक्ताव्यक्तगतिश्चैषा काल- धर्मान्महीपते १६ स्थावरा जंगमाश्चैव स्थूलसूक्ष्माश्च भारत । कालयोगन कालज्ञा भवन्ति न भवन्ति च १७ एताश्चैताः प्रजाः सर्वा दक्षकन्यासु जज्ञिरे । कश्यपेनाव्ययेनेह संयुक्ताः कालधर्मणा १८ आदित्या वसवो रुद्रा विश्वे च समरुद्गणाः । नागाश्चानेकशि- रसः साध्या वै पन्नगास्तथा १९ गन्धर्वाः किन्नरा यक्षाः सुपर्णाश्च तथापरे । गरुत्मान्सह यक्षैश्च किन्नराश्च सुवाससः २ गावः पशुगणैः सार्धं नराश्च वसुधाधिप । चराचराश्च वसुधा धत्तारश्च धराधराः २१ गजाः सिंहाश्च व्याघ्राश्च हयाः पक्षधरास्तथा । खड्गा विषा- णिनश्चैव वृषभाश्च मृगास्तथा २२ चतुर्विषाणा नागेन्द्रा पद्माभा वर्णतः शुभ्राः । सर्वलक्ष- णसंपन्नाः प्राणिनः कामरूपिणः २३ तेषांरूपैस्तथा गात्रैस्तैः शीलैस्तैः पराक्रमैः । मुनयः पुनरुद्भूता धर्मक्षेत्र सनातने २४ क्षेत्रज्ञा मानसे लोके धर्मिणो वेदगोचराः । यत्रोद्भूताः सुराः सर्वे दिवि लोके प्रतिष्ठिताः २५ ये चान्ये तपसा सिद्धा गृहस्था मनुजाधिप । ब्रम्ह-

---

आशारहित, व सुपुत्रसंपन्न पुरुष पत्नीसह हरणांबरोबर जरेस प्राप्त होतात १२. वेदाध्ययनरूप स्तोत्रानें उत्तमप्रकारें शुद्धचित्त झालेले ब्राम्हण सर्वोत्पादक प्रथम पद जें ब्रम्ह त्याचे ठायीं प्रणवोच्चार करीत याच जीवदेहांत निष्ठेस प्राप्त होतात. त्यामुळ यत्न- शील, कर्मापासून मुक्त झालेल्या, जितक्रोध, जितेंद्रिय, निष्कांचनमार्गाची इच्छा कर- णाऱ्या व पृथ्वीभर संचार करणाऱ्या ब्राह्मणांनीं या देहास ब्रम्हक्षेत्र असें वेदांत म्हटलें आहे १३, १४. ( याप्रमाणें सपत्नीक वनस्थांनासुद्धां योगसिद्धि मिळते असें सांगून आतां योगफळ सांगतात. ) जी मनोमात्रकल्पित व ब्रम्हरूपानें अवगत होणारी प्रजा पूर्वी हृदयाकाशांत आरूढ झाली तीच ही प्रारब्धाचें उल्लंघन करण्यास असमर्थ असलेली प्रजा समाधींत ब्रम्हभावास प्राप्त झालेल्याही योग्याच्या प्रारब्धकर्मवशात् संसारांत व्यक्त होते १५. समाधींत स्वभावतःच अव्यक्तरूपास प्राप्त झालेली प्रजा स्वभाव दुर्लंघ्य अस- ल्यामुळें व्युत्थानसमयीं व्यक्त होते. राजन्, समाधि व व्युत्थान कालधर्मामुळेंही अव्यक्त व व्यक्तरूप होते १६. हे भारता, कालज्ञ स्थावर व जंगम कालयोगानें स्थूल व सूक्ष्म होतात. ते उद्भवतात व नष्ट होतात १७. असो; अशा प्रकारची ही सर्व स्थूल व सूक्ष्म प्रजा दक्षकन्यांचे ठायीं कालधर्मवान् अव्यय कश्यपाशीं या सृष्टींत संयुक्त होऊन उत्पन्न झाली आहे १८. आदित्य, वसु, रुद्र, मरुद्गण, अनेक मस्तकांचे नाग, साध्य, पन्नग १९, गंधर्व, किन्नर, यक्ष, तसेच इतर पक्षी, यक्षांसह गरुड, उत्तम वस्त्रें नेसलेले किन्नर २०, इतर सर्व पशुसंघांसह गायी, हे राजा, तसेच पुरुष, इतर चराचर प्राणी, पृथ्वीचें धारण करणारे पर्वत २१, हत्ती, सिंह, व्याघ्र, तसेच पंखयुक्त घोडे, गेंडे, मोठमोठ्या शिंगांचे बैल, हरिण २२, चार दातांचे व कमलासारखे रंगानें शुभ्र नागेंद्र, यथेच्छ रूप धारण करणारे सर्व लक्षणसंपन्न प्राणी इत्यादि सर्व त्यांच्याच रूपांनीं, तशाच गात्रांनीं, त्याच शीलानें व पराक्रमानें युक्त असे सनातन धर्मक्षेत्रामध्यें पुनः उत्पन्न झाले. तसाच मुनीही उद्भवले २३,२४. असो ज्यामध्यें सर्व देव उत्पन्न होऊन स्वर्गलोकामध्यें प्रतिष्ठित झाले त्याच मानस ( मनःकल्पित ) बाह्य अथवा आंतर लोकांत धार्मिक वेदज्ञ व आत्मनिष्ठ मुनी

चर्येण गांसिद्धाः परिचर्यां गता गुरोः २६ ये च योगगतिं प्राप्ताः सिद्धिहेतोर्महीपते । क्लेशाधिकैः कर्मजन्यैर्वृत्तिं लप्स्यन्ति वै द्विजाः १७ शिलोंच्छवृत्तयः ख्याताः सपत्नीका दृढव्रताः । सर्वे त्वेते दिवि चरा भवन्ति चरितव्रताः २८ [ ७७८ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हारिवंशे भविष्यपर्वणि द्वाविंशतितमोऽध्यायः ॥ २२ ॥

वैशंपायन उवाच ॥ पितामहं पुरस्कृत्य मेरुपृष्ठे समाहिताः । जटाजिनधरा विप्रास्त्यक्तक्रोधा जितेन्द्रियाः १ पर्वतांतरसंसिद्धे बहुपादपसंवृते । धातुसंरंजितशिले समे निस्तृणकण्टके २ त्रयाणां ब्रह्मवेदानां पंचस्वरविराजिते । मंत्रयज्ञपरा नित्यं नित्यं व्रतहिते रताः ३ एक एवाग्निमाधाय सर्वे ब्राह्मणपुंगवाः । बिभिदुर्मन्त्रविषयैः सुसमाहितमानसाः ४ त्रिधा प्रणीतो ज्वलनो मुनिभिर्वेदपारगैः । अतस्तेतत्त्वमापन्नायदेकस्त्रिविधः कृतः ५ एकएवमहानाग्निर्हविषामंप्रवर्तते । स्वधाकारेण मन्त्रज्ञ मन्त्राणां कार्यसिद्धये ६ स्वयं च दक्षसंप्राप्तो भगवान् भूतसत्कृतः । ब्रह्मा ब्राह्मणनिर्माता सर्वभूतपितामहः ७ दण्डी चर्मी शरी

---

झाले आहेत २५. हे मनुष्येश्वरा, जे दुसरे तपाच्या योगानें सिद्ध झालेले गृहस्थ, गुरूची परिचर्या करून ब्रह्मचर्यानें सिद्ध झालेले ब्रह्मचारी २६, त्याचप्रमाणें, हे महीपते, सिद्धीकरितां योगगतीस प्राप्त झालेले, कर्मजन्य मोठ्या क्लेशांनीं वृत्ति मिळविणारे ब्राह्मण, शेतांतील कणसें घेणें हें शिल व पडलेला एकेक कण जमवून आणणें हें उञ्छ यांकर निर्वाह करणारे प्रख्यात शीलोञ्छवृत्ति सपत्नीक दृढव्रत हे सर्व व्रताचरण केलेले पुरुष आकाशांत संचार करणारे होतात २७.२८. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा बाविसावा अध्याय समाप्त झाला ॥ २२. ॥

वैशंपायनः—मेरुपृष्ठावर समाहित होऊन राहिलेले, जटा व आजिन ( मृगचर्म ) धारण करणारे, क्रोधरहित व जितेंद्रिय ब्राह्मण पितामहास पुढें करून कर्मानुष्ठान करीत होते. पर्वतांच्या मधील सखल प्रदेशानें युक्त, अनेक वृक्षांनीं आच्छादित, ज्याच्यावरील शिला, गेरु इत्यादि धातूंनीं रंजित झाल्या आहेत अशा, सम, तृणकंटकरहित व तिन्ही ब्रह्मप्रतिपादक वेदांच्या पांच स्वरांनीं विराजित असलेल्या त्या पर्वतपृष्ठावर नित्य मंत्र—यज्ञ परायण व नित्य व्रतहितांत रत असलेले ते सर्व ब्राह्मणश्रेष्ठ एकाच अग्नीचें आधान करून मंत्रांच्या प्रतिपाद्य विषयांच्या योगानें प्राणाग्नीस प्राण—अपानादि वृत्तींच्या द्वारां भिन्न करते झाले १,२ ( याच श्लोकांचा अध्यात्मपर संक्षिप्त अर्थ असा—मेरुपृष्ठसंज्ञक भ्रू व घ्राण यांच्या मध्यावरून उपलक्षित होणारें जें सर्व कारण, नित्यसिद्ध, अनेक वर्णबीजयुक्त नाडीत्रयसंचारी जीवोपाधानें युक्त व बाह्याभ्यंतर दुःखशून्य ब्रम्ह त्याच्या ठायीं क्रोधादिकांस जिंकणारे निर्मम ब्राह्मण निरोधाभ्यासानें निर्विशेष ब्रह्मास प्राप्त होण्याकरितां प्राणजयद्वारा चित्तवृत्तीस एकाग्र करितात. ते एकाच प्राणाग्नीचा आश्रय करून त्यास प्राणापानादि पांचप्रकारें भिन्न करितात ) ३,४. त्या वेदपारंगत मुनींनीं प्राणाग्नीचें त्रिधा प्रणयन केल्यामुळें ( पूरक—रेचक— कुंभकरूपानें नाडीमार्गांनीं संचार करविल्यामुळें ) ते सर्व तत्त्वास प्राप्त झाले आहेत. ( पूरकादि प्राणायामांच्या योगानें आत्मतत्वास साक्षात् जाणतात ) ५. हे मंत्रज्ञ राजा, मंत्रांच्या कार्यसिद्ध्यर्थ तो एकच मोठा अग्नि हविर्द्रव्यांच्या योगानें व स्वधाकारानें प्रवृत्त होतो. ( योगाभ्यास करणाऱ्या साधकाच्या क्षीर, घृत, मिष्टान्न, व मिताहाररूप हवीनें दीप्त होऊन विक्षेप न करितां आरोह व अव-

खड्गी शिखी पद्मनिभाननः । अभवन्नयस्तसंतापो जितक्रोधो जितेन्द्रियः ८ यजते पुष्करे ब्रम्हा मेधया सह संगतः । इन्द्रप्रोक्तानि सामानि गीयन्ते ब्रम्हवादिभिः ९ घृतं क्षीरं च वा व्रीहिः सर्वपरमकं हविः । वेदप्रोक्तं मखे न्यस्तं कल्पितं ब्रम्हणः पदे १० निर्मथ्यारमिणाग्नेयीं शमीगर्भसमुत्थितम् । स ब्रह्मा प्रथमम् तस्मिन्नाग्निमन्यं प्रवर्तयत् ११ न ह्यल्पं विहितं द्रव्यं यथाग्निर्यज्ञकर्मणि । प्रवर्तयेद्विभागैर्वा हुतद्रव्यमयं बलम् १२ फलानि तैः प्रयुक्तानि हवींषि विततेऽध्वरे । प्रयुंजन्ते प्रयोगज्ञा मुनयो ब्रह्मवादिनः १३ षण्मासांश्चतुरो वेदान्त्संबभाषे बृहस्पतिः । ब्रह्मणो वितते यज्ञे परया ब्रह्मसंपदा १४ शिक्षाक्षरसमेताया मधुरायाः

रोह मार्गांमध्यें यथेष्ट संचार करतो ) ५,६. ( असो; याप्रमाणें वर दोन श्लोकांत सांगितल्याप्रमाणें पूरक–रेचक–कुंभकाभ्यासानें विपुल केलेला, हविष्यान्नभोजन व अभ्यास यांच्या योगानें वश करून घेतलेला आणि कोठेंही धारण केलेला प्राणाग्नि त्या त्या धारणेचें फळ देतो. आतां या श्लोकांत प्रणवाच्या योगानें परमात्म्याच्या ठायीं धारण केलेल्या प्राणाचें फळ सांगतात-) इतक्यांत सर्व कार्यांमध्यें दक्ष असलेला, ब्राह्मणांस निर्माण करणारा, सर्व भूतांचा पितामह व भूतांकडून सत्कार केला जाणारा भगवान् ब्रह्मा स्वयं प्राप्त झाला. ( प्रणवाच्या योगानें आत्म्याच्या ठायीं चित्त एकाग्र करणाऱ्या साधकाला प्रथम उकाराचा अर्थ असा जो सूत्रात्मा त्याचा साक्षात्कार होतो ), ७. तो दंड धारण करणारा, अजिनयुक्त, बाणसंपन्न, खड्गवान्, शिखाभूषित, कमलमुख, ज्यानें संतापाचा त्याग केला आहे, जितक्रोध व जितेंद्रिय होता. ( प्राणाग्नीच हा दक्ष होय ) ८. ब्रह्मा दक्ष पुष्करांत ( आत्मतीर्थामध्यें ) मेधेशीं संगत होऊन यजन करतो ( आत्मनिष्ठ होऊन रहातो ) त्यावेळीं तैत्तिरीयगत इंद्रप्रोक्त अहमन्नमहन्न० इत्यादि सामें वेदवेत्ते गातात ९. घृत, क्षीर, व्रीहि, इत्यादि सर्व उत्तम वेदोक्त हवि यज्ञामध्यें देवतोद्देशानें टाकलें असतां ब्रह्मपदीं पोचतें १०. आग्नेयी अरणीचें निर्मथन करून त्यांतून उद्भवलेल्या अग्नींत प्रथम तो ब्रह्मा अन्य अग्नीस प्रवृत्त करिता झाला. ( अविद्येचा नाश करून शरीरावरील अभिमान सोडल्यामुळें ब्रह्म देहांतच स्वरूपानें व्यक्त होतें ) ११. यज्ञकर्मामध्यें जसा बाह्य अग्नि विहित आहे तसा या मानस यज्ञांत नाहीं. यांत कोणतेंही अल्प द्रव्य विहित नाहीं. कारण या लौकिक यज्ञांत अल्प द्रव्य अथवा अग्नींत टाकलेलें घृतादि स्वर्गांत दिव्य देहादिकांच्या योगानें परिपक्व होतें व त्याचें बल अन्नविभागांनीं उच्चनीच स्थानीं प्रवृत्त करतें; पण या मानस यज्ञांत तसें होत नाहीं. ( म्हणजे अल्पद्रव्य साध्य यज्ञामध्यें द्रव्याचा व्यय, श्रद्धा इत्यादिकांच्या न्यूनाधिकतेप्रमाणें फलामध्यें न्यूनाधिकता येते. पण आत्मयज्ञामध्यें हा भेद नाहीं. कारण तो यज्ञ करणाऱ्या सर्वांना कैवल्यरूप एकाच प्रकारचें फल मिळतें ) १२. ( तर मग येथें हवी, अग्नि इत्यादिकांची कल्पना करण्याचें प्रयोजन काय ? म्हणून कोणी विचारील यास्तव सांगतात-) योगयज्ञ चालला असतां जीं हविर्द्रव्यें विहित आहेत त्यांची कल्पना केल्यानें त्यांचें फळ मिळतें. ( जशी वासना ठेवावी, जशा प्रकारच्या आत्म्याचें चिंतन करावें तसेंच चिंतकाला फळ मिळतें. ) पण जे ब्रह्मसाक्षात्कारवान् असतात त्यांना त्यांचीं इष्ट फळें निग्रहानुग्रह प्रयोगज्ञ मुनी येथेंच प्रकाशित करितात. ( अर्थात् हविष्यादि कल्पना काम्य आहे. तात्त्विक नव्हे ) १३. देवाचार्य बृहस्पति ब्रह्मसंपत्तीनें ब्रह्मसंबंधीं याग सुरू झाला असतां

समंततः । सानुस्वारितरामायाः सरस्वत्याः प्रभाषते १५ तेन ब्राह्मणशब्देन ब्राह्मप्रोक्तेन भारत । विभाति समखो व्यक्तं ब्रह्मलोक इवापरः १६ मखो ब्रम्हमुखोत्तीर्णो ब्रम्हशब्दैरनामयैः । प्रयोगैः संप्रयुक्तस्य जल्पन्निव विवर्धते १७ समिद्भिःसोमकलशैःपात्रैश्चैव बर्हिःखलैः । यवैर्व्रीहिभिराज्यैश्चपूर्णैश्चजलभाजनैः १८ कर्म प्राप्तैश्च पशुभिः कर्मभिश्चापरान्वितैः । गोभिः पयस्विनीभिश्च परिवत्सैश्च कोमलैः १९ ब्रम्हवृद्धो वयोवृद्धस्तपोवृद्धश्च भारत । ब्रम्हज्ञानमयो देवो विद्यया सह संगतः २० मानसैश्च क्रियामूर्तिर्ये च भूताः स्वयं नृप । ब्रम्हा जुहोति तांतस्मान्मरुद्भिः सहितस्तदा २१ तेजोमूर्तिर्धरैरूपैर्न च तत्कर्णाऽस्पृशत् । वेदप्रोक्तेन विधिना सर्वप्राणभृतां नृप २२ निर्मथ्यारणिमाग्नेयीं शमीगर्भ समुत्थिताम् । क्रतुना यजते पूर्णमग्निष्टोमेन स प्रभुः २३ सदस्यैस्तत्सदो व्यक्तं शुशुभे यज्ञकर्मणि । जल्पन्ति मधुरा वाचः सानुसाराः क्रियास्तथा २४ कर्मभिश्च तपोयुक्तैर्वेदवेदांगपारगैः । सूर्येंदुसदृशै राजन्विरराज महाक्रतुः २५ ब्रम्हघोषेण महता ब्रम्हावास इवापरः । वसुधामिव संप्राप्तैः सर्वैरेव दिवौकसैः २६ वेदवेदांगविद्भिश्च विनीतैर्ब्रह्मवादिभिः । गतागतैस्तपः श्रान्तैः स्वर्गलोके महीयते २७ ज्वलद्भिरिव विप्रैस्तैस्त्रिभिरेवाध्वरेऽग्निभिः ।

---

सहा महिने मोठ्या आदरानें दीर्घकाल अभ्यास केल्यानेंच चार वेदांशीं संभाषण करूं लागला. ( त्यास वेदांची प्राप्ति झाली ) १४. तो शिक्षाक्षरयुक्त, समंततः मधुर व सानुस्वार असल्यामुळें अभिराम अशा सरस्वतीशीं संभाषण करीत असतो. ( शिष्यांना ती वेदवाणी शिकवितो ) १५. हे भारता, त्या वेदोक्त ब्राह्मणवाक्यांनीं केला जाणारा यज्ञ आध्यात्मिक योगयज्ञाप्रमाणें भासतो १६. याप्रमाणें ब्रम्हमुखांतून निघालेला यजमानाचा यज्ञ अप्रामाण्यशंकाशून्य अशा वेदशब्दांचा ( मंत्रांचा ) यथाश्रुत विनियोग केला असतां जल्पना करीत असल्याप्रमाणें वाढतो १७. समिधा, सोमकलश, स्रुक्-स्रुवादि पात्रें, खळांत न झोडलेले यव, व्रीहि, आज्य, पूर्ण जलपात्रें १८. प्राप्त पशू, परब्रह्माचे ठायीं समर्पण केलेलीं कर्मे व कोमल वत्सांनीं परिवेष्टित असलेल्या दुभत्या गायी यांच्या योगानें यज्ञकर्म वृद्धि पावतें १९. वेदघोषानें वृद्ध, दक्षिणेनें वृद्ध, व तपानें वृद्ध, असा ब्रह्मज्ञानमय देव उद्गीथादि उपासनेशीं संगत झालेला आसतो २०. हे राजा, कल्पित सामग्रीनें यज्ञरूप ब्रह्मा देवांसह यज्ञ करतो. व इतर ब्राह्मण अकल्पित घृतादि पदार्थांच्या योगानें हवन करितात २१. पण चिन्मय द्रव्य-देवतादि सामग्रीनें होणारा तो ब्रह्मदेवाचा यज्ञ वेदोक्त विधीनें केलेल्या सर्व प्राण्यांच्या यज्ञास स्पर्श करीत नाहीं. ( म्हणजे तो सर्वांच्या यज्ञांहून श्रेष्ठ आहे ) २२. शमीच्या आंतून निघालेल्या पिंपळाच्या लाकडानें केलेल्या आग्नेयी अरणीचें मंथन करून तो प्रभु प्रथम क्रतु व नंतर अग्निष्टोम यज्ञ करतो २३. यज्ञकर्मामध्यें त्याचें तें यज्ञगृह सदस्यांच्या योगानें फार शोभतें. सर्व मधुरवाणी बोलतात. समस्त क्रिया सर्व सहाययुक्त असतात २४. हे राजा, तो महाक्रतु, कर्मठ, तपोयुक्त, वेदवेदांगपारंगत व सूर्यचंद्रतुल्य तेजस्वी अशा ब्राह्मणांकडून विराजमान झाला होता २५. मोठ्या ब्रम्हघोषानें साक्षात् दुसऱ्या ब्रह्मलोकाप्रमाणेंच तें स्थान दिसत होतें. जणुकाय सर्व देवच पृथ्वीवर उतरून आले आहेत असें भासविणारे वेदवेदांगवेत्ते, नम्र, वेदज्ञ व तपाच्या योगानें श्रांत अशा ब्राम्हणांच्या येण्याजाण्यानें स्वर्गातील यज्ञालाही जर मोठी शोभा येते तर भूलोकच्या यज्ञाला येईल यांत

ब्रह्मलोक इवाभाति ब्रह्मणः समहाक्रतुः २८ इंद्रप्रोक्तानि सामानि गायन्ति ब्रम्हवादिनः ।
वचनानि प्रयुक्तानि यजुंषि विततेऽध्वरे २९ तपःशान्ता ब्रम्हपराः सत्यव्रतसमाहिताः ।
आययुर्मुनयः सर्वे मनोभिः श्रोत्रवादिभिः ३० होता चैवाभवद्राजन् ब्रम्हत्वे च बृहस्पतिः ।
सर्वधर्मविदां श्रेष्ठः पुराणो ब्रम्हसंभवः ३१ यजमानश्च यज्ञांते विष्णोः पूजां प्रयुज्य च ।
आदित्याः पश्चिमे गर्भे तपसा संवृते नृप ३२ पदं विष्णुरजो ब्रम्हा निर्द्वंद्वं निष्परिग्रहम् ।
यतः पदसहस्राणि भविष्यन्त्युद्भवन्ति च ३३ अवंध्यं चाप्रमेयं च व्यतिरिक्तं च कर्मभिः ।
आत्मापियस्य मुनयो भवन्ति निष्परिग्रहाः ३४ परिग्रहाश्च विषयाद्दोषप्रामा महीपते ।
दोषाश्च युगपत्सर्वे छादयन्ति मनो बलात् ३५ इंद्रियग्रामविषयेचरंतोऽनिष्परिग्रहाः ।
परिग्रहं शुभं धर्ममविद्यालक्षणं विदुः ३६ विद्यालक्षणसंयोगान्न मनश्छाद्यते नृप ।
यदि चेन्मुनिशब्देन गृह्यते ब्रम्हवादिभिः ३७ वेदविद्याव्रतस्नातैर्नियतैः कुरुसत्तम । दिवि-
लोकाः सतां स्थानं लोकानां लोक उच्यते ३८ यत्रदेवा हव्यपुष्टा न क्षयं यान्ति भारत ।
यजमानश्च भोगैः स्वैः कर्मप्राप्तोदिते पदे । मोदते सह पत्नीभिर्विज्वरो वसुधाधिप ३९ यज्ञा-
वसाने शैलेन्द्रं द्विजेभ्यः प्रददौ प्रभुः । दयया सर्वभूतानां निर्मलनान्तरात्मना ४०

---

काय आश्चर्य आहे २६,२७. ब्रम्हदेवाचा तो महाक्रतु दीप्त ब्राम्हणांच्या योगानें दीप्त त्रेताग्नियुक्त ब्रम्हलोकाप्रमाणेंच भासतो २८. यज्ञ चालला असतां इंद्रप्रोक्त सामें वेदवादी गातात. यजुर्वेदाचीं वचनें म्हणतात २९. तपाच्या योगानें शांत झालेले, ब्रह्मपरायण व सत्यव्रतनिष्ठ असे सर्व मुनी श्रवण करितांच संकल्पांनीं तेथें आले ३०. हे राजन्, सर्व धर्मवेत्त्यांतील श्रेष्ठ, पुराण व ब्रम्होद्भव बृहस्पति आपलीं दोन शरीरें कल्पून होता व ब्रम्हा झाला ३१. त्या यज्ञाच्या शेवटीं यजमान विष्णूची पूजा करून ( म्ह. कर्म विष्णूस समर्पण करून ) हे राजा, तपानें युक्त असलेल्या आदितीच्या शेवटच्या गर्भांत उत्पन्न झाला. ( यज्ञांच्या योगानें देवत्व प्राप्त होतें, हा याचा अर्थ ) ३२. ब्रह्मवेत्ता ब्रह्मा अज विष्णुसंज्ञक निर्द्वंद्व, परिग्रहशून्य व ज्याच्यापासून सहस्रावधि पदें उत्पन्न होतात व होतील त्या कर्मप्राप्य पदास प्राप्त होतो ३३. तें विष्णुपद सर्व कर्मफलांस उदरांत सांठविणारें, अप्रमेय व कर्मशून्य असून परिग्रहशून्य मुनी त्याचें स्वरूप होतात ३४. राजन्, सर्वतः बांधून सोडणारे परिग्रह म्हणजे विषयरागादि दोषांनींच कल्पित आहेत. ते सर्व दोष एकदांच पूर्वसंस्कारबलानें मनाला आच्छादित करितात ३५. इंद्रियविषयामध्यें संचार करणारे मुनीही अहंममाभिमानरहित असल्यामुळें परिग्रहशून्य राहूं शकतात. ते वेदबोधित शुभ धर्मही अविद्यालक्षण बंधच आहे, असें जाणतात ३६. बा राजा, ब्रह्मवादी लोक मुनित्व प्रतिपादक तत्त्वमसि इत्यादि शब्दांनीं जेव्हां अनुग्रह करितात तेव्हां त्यांच्या अर्थाचें मनन केल्यामुळें तत्त्वज्ञ झाल्याकारणानें त्याचें मन रागादि दोषांनीं आच्छादित केलें जात नाहीं ३७. संतजनांचें द्युलोकांत जें उत्तम स्थान असतें त्यालाच वेदविद्याव्रतस्नात व नियत कर्मठ वृद्ध स्वर्गलोक असें म्हणतात ३८. हे भारता, तेथें हव्यांच्या योगानें पुष्ट झालेले देव क्षय पावत नाहींत. हे पृथ्वीपते, यजमान कर्मप्राप्त उत्कृष्टपदीं पत्नीसह ज्वररहित होऊन आपल्या सुखोपभोगांनीं आनंदित होतो ३९. यज्ञ समाप्त झाला असतां प्रभु निर्मळ अंतःकरणानें सर्व भूतांवर दया करून त्या ब्राह्मणांस पर्वतश्रेष्ठ देता झाला ( अध्यात्म-

तं शैलं सर्वगात्राणि परस्परविशेषिणः। न शेकुः प्रविभागार्थं भेत्तुं सर्वोद्यमैरपि ४१ ततस्ते ब्राम्हणगणा निषेदुर्वसुधातले। श्रमेणाभिहताः सर्वे विवर्णवदना नृप ४२ सुपार्श्वो गिरिमुख्यस्तु वाग्भिर्मधुरभाषितैः। अब्रवीत्प्रणतः सर्वाञ्छिरसा तान्द्विजोत्तमान् ४३ न हि शक्यो बलाद्भेत्तुं युष्माभिरसुसंगिभिः। अपि वर्षशतैर्दिव्यैः परस्परविरोधिभिः ४४ एकीभूता यदा सर्वे भविष्यथ समाहिताः। अविरोधेन युगपद्विभजिष्यथ निर्वृताः ४५ बलं हि रागद्वेषाभ्यां वर्धते ब्रह्मसत्तमाः। विमुक्तं रागद्वेषाभ्यां ब्रम्ह वर्धति शाश्वतम् ४६ यदाहं भेदयिष्यामि स्वर्गभिन्नैः शिलाशितैः। धातुभिश्च विसर्पद्भिः शिखरैश्चानुपातिभिः ४७ विशीर्णैः पार्श्वविवरैर्नागैश्च गलितैर्भुवि। बहुभिर्व्यालरूपैश्च चोद्यमानो गुहाशयैः ४८ प्रतिगृह्य च तद्वाक्यं शैलेन्द्रस्य सुभाषितम्। तूष्णीं बभूवुस्ते सर्वे तदा ब्राम्हणसत्तमाः ४९ [ ८१७ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि त्रयोविंशतितमोऽध्यायः॥ २३॥

वैशंपायन उवाच॥ बलिर्होमाश्च वर्धन्ते अहन्यहनि भारत। द्विजानां तपसाढ्यानां गृहधर्मेषुतिष्ठताम् १ देवतार्च्याश्च पूज्यन्ते तदा प्रभृति भारत। तेषां ब्रम्हविदां राजन्

---

दृष्टच्या पर्वतश्रेष्ठ ह्मणजे दिव्य शरीर ) ४०. पण सर्व अवयवरूप अशा त्या पर्वताला *भेददृष्टच्या मी ब्राह्मण, तूं क्षत्रिय इत्यादि जात्यभिमानानें सर्व कर्मांनींही फोडून आपसांत वाटून घेऊं शकले नाहींत. ( आत्म्याहून त्या क्षेत्राला पृथक् करण्याचा प्रयत्न करूनही त्यांना त्यांत यश आलें नाहीं. अर्थात् शेंकडों कर्मांनींही मोक्ष मिळत नाहीं ) ४१. तेव्हां श्रांत झालेले ब्राह्मणगण भूतळीं बसले. हे राजा, ते सर्व श्रमानें व्याकुळ झाले. त्यांचीं तोंडें निस्तेज झालीं ४२. तें पाहून शिरसा नम्र झालेला तो पर्वतश्रेष्ठ सुपार्श्व मधुरवाणीनें त्या सर्व श्रेष्ठ ब्राह्मणांस ह्मणाला. ( येथें अध्यात्मदृष्टच्या सुपार्श्व ह्मणजे सद्गुरु ) ४३. देहेंद्रियादिकांस आत्मा समजणाऱ्या व परस्पर विरोधी अशा तुह्मांस हा देहाभिमानरूप पर्वत शेंकडों दिव्यवर्षांनींही बलात्कारानें फोडतां येणें शक्य नाहीं ४४. तर तुह्मी सर्व शांत व एकचित्त जेव्हां व्हाल तेव्हां अविरोधानेंच एकाचवेळीं त्याचा विभाग करूं शकाल. व सुखी व्हाल ४५. हे ब्रह्मश्रेष्ठहो, राग व द्वेष यांच्या योगानें बल वाढतें; पण तेंच-रागद्वेषशून्य पुरुषांचें शाश्वत ब्रह्म वाढतें ४६. जेव्हां मी ( गुरु ) ऐहिक व पारलौकिक भोगांविषयीं विरक्त, ह्मणूनच स्फटिक शिलांप्रमाणें अतिस्वच्छ, वाणी, प्राण व मन यांच्या प्रवृत्तीस कारण होणाऱ्या, पतनशील इंद्रियांच्या योगानें उंच झालेल्या, समीपस्थ स्त्रीप्रभृति हृदयसर्पास प्रवेश करण्यास योग्य अशा बिलयुक्त, श्वेतसर्पतुल्य शास्त्रादि व्यसनें व कृष्णसर्पतुल्य कामादि व्यसनें यांनीं संपन्न अशा हृदयगत संस्कारांकडून प्रेरित होतसाता तुह्मांला या शैलाचा भेद करावयास लावीन तेव्हां तुह्मी त्याला फोडूं शकाल ४७,४८. शैलेंद्राचें तें सुभाषितरूप भाषण मान्य करून ते सर्व उत्तम ब्राह्मण ( वैराग्यादि साधनाच्या अभावीं ) मुकाट्यानें बसले. ( आत्म्यापासून देहाला पृथक् करण्याचा व्यापार सोडून स्वस्थ बसले ) ४९. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वाचा तेविसावा अध्याय समाप्त झाला. ॥२३॥

वैशंपायनः—हे भारता, तेव्हांपासून पर्वत फोडण्यास असमर्थ असलेल्या त्या कर्मवेत्त्यांचीं वेदवेत्त्या ऋत्विजादिकांसह प्रत्यहीं बलि व होम हीं कृत्यें वाढलीं. तपानें संपन्न व गृहधर्मामध्यें निरत असलेले ते द्विज विष्णु व गुरु इत्यादिक यांची पूजा करूं

पृथिव्यं ब्रम्हवादिभिः २ तत्रैव ब्रम्हसदने समे निस्तृणकण्टके । प्राज्येन्धनतृणे देशे पुण्ये पर्वतरोधसि ३ वासं यत्र प्रकुर्वन्ति दृष्ट्वा भगवतः क्रियाम् । तपोर्थिनो महाभागा ब्रह्मचर्यव्रते स्थिताः ४ गृहस्थधर्मनिरता जितक्रोधाः समाहिताः । यतयश्चापि कांक्षन्ति धर्मेणेह विकांक्षिणः ५ वन्यैः कर्मफलैश्चैव रता ब्रम्हणपुंगवाः । अग्निहोत्रव्रतस्नाता जितक्रोधाः समाहिताः ६ दैवयुक्तेन वा युक्ताः कर्मणा ब्रम्हसत्तमाः। चीरवल्कलसंवीता नियता नियतेन्द्रियाः ७ चरन्ती ब्रम्हचर्यं च व्रतमास्थाय दारुणम् । अनेन विधिना राजन् क्रमप्राप्तेन सर्वशः ८ क्रमाये वेदसंस्कारं पुण्यं प्राप्ताः सनातनम् । पूर्वैराचरितं राजन्मुनिभिर्ब्रम्हवादिभिः ९ नावेदविद्वाचागच्छेन्नापि रौद्रं व्रतं चरेत् । न च त्यागेन गच्छेत गृहधर्मं न च त्यजेत् १० नैवं गच्छेत दुःस्थानमप्राप्तो वेदसंचयम् । ऋचश्च संचयः सर्वः सामगानां च भारत ११ ये चापि पुत्रिणो न स्युः श्रुत्वापि प्राप्नुयुः फलम् । ब्राम्हणास्तपसा श्रान्ता गुरोश्च परिचर्यया १२ यस्य नैव श्रुतं ब्रम्ह न गृहीतं विशांपते । कामं तं धार्मिको राजा शूद्रकर्माणि कारयेत्।१३ अथवा नैव विद्येत यद्ब्रम्ह नाद्रियेद्द्विजः। द्वाभ्यां तु श्रोत्रविषयेमनः पूर्वं समाहितम् १४ एवं सर्वेंद्रियारंभान्वेदपूर्वान्त्समाचरेत् । ब्राम्हणो भूतसंपन्नो य इच्छे-

---

लागले १,२. तेथेंच त्या सम, तृणकंटकरहित, ब्रह्मसदनरूप, जेथें पुष्कळ जळण व गवत आहे अशा पुण्य पर्वततीरावरील देशांत तीं कर्में सुरू झालीं ३. तेथें भगवानाची क्रिया चालली आहे असें पाहून तपांची इच्छा करणारे, महाभाग, ब्रह्मचर्यव्रतामध्यें स्थित असलेले, गृहस्थधर्मनिरत, जितक्रोध व शांतचित्त यतीही रहाण्याची इच्छा करितात. धर्मानें विशेषस्थानीं रहाण्याची आकांक्षा करणारे लोक तेथील निवास पसंत करतात ३–५. जे ब्राह्मण श्रेष्ठ वन्य कर्मफलांमध्यें रत असतात ते अग्निहोत्रव्रतस्नात, क्रोधरहित, शांतचित्त, शरीरस्थितीकरितां अयाचित प्राप्त अथवा याचनादिकामुळें प्राप्त झालेल्या कंदफळांवर निर्वाह करणारे, ब्रह्मनिष्ठ, लंगोटी नेसून वल्कल पांघरणारे, नियत व्यापार व नियतेंद्रिय वानप्रस्थही तेथें रहाण्याची इच्छा करितात ६,७. आणि दारुण व्रत धरून ब्रह्मचर्य पाळतात. हे राजन्, क्रमप्राप्त अशा या सर्व विधीनें क्रमानेंच जे पुण्य व सनातन वेदसंस्कारास प्राप्त झाले आहेत ते पूर्वींच्या ब्रह्मवादी मुनींनीं आचरिलेला धर्म करितात ८,९. वेद पूर्णपणें जाणल्यावाचून गृहस्थधर्माचा स्वीकार करूं नये, रौद्र व्रत आचरूं नये, गृहधर्म सोडून वानप्रस्थ अथवा यति होऊं नये. ( सारांश वेदग्रहणापूर्वीं कांहीं करूं नये. ) १०. वेदसंचय प्राप्त करून घेतल्यावाचून स्थितिरहित अवस्थेंत ( ह्मणजे संन्यास आश्रमांत ) प्रवेश करूं नये. हे भारता, ऋचांचा, यजुर्मंत्रांचा व सामगानांचा सर्वसंचय अवश्य संपादन करावा ११. पण तपानें व गुरूच्या परिचर्येनें श्रांत झालेल जे ब्राह्मण पुत्रवान् ( ह्मणजे गृहस्थ ) नसतील त्यांना वेदान्तश्रवणानेंही इष्ट फल मिळेल १२. हे राजन्, जो ब्राम्हण अशा रीतीनें प्रत्यक्ष अध्ययन अथवा श्रवणही करीत नाहीं त्याच्याकडून धार्मिकराजानें खुशाल शूद्र कर्में करवावींत १३. अथवा ब्राह्मण असून ज्यानें वेदाचा आदर केलेला नाहीं तो ब्राह्मणच नव्हे. ( यास्तव राजाला त्याला शूद्रतुल्य वागविण्याचें कारणच नाहीं. ) ब्रह्मचारी व गृहस्थ या दोघांनीं श्राव्य धर्म व ब्रह्म यांचे ठायीं पूर्वीं अध्ययन अध्यापनसमयींच मन स्थिर केलेलें असतें. यास्तव राजानें ब्राह्मणाची अवहेलना करूं नये १४. असो; ज्याला विद्येचें

भूतिमान्भवेत् १५ [ ८८२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥

वैशंपायन उवाच ॥ ते तु गोब्राम्हणा नागाश्चन्द्रादित्यपुरस्कृताः । ब्राम्हणान्पूजयन्देवान्वसूभिर्ब्रम्हसंभवैः १ नारदप्रमुखाश्चैव गन्धर्वा ऋषयो नृप । कुर्वन्ति सततं यज्ञं क्रमप्राप्तं पितामहम् २ वचोभिर्मधुराभाषैः पंचेंद्रियनिवासिभिः । सर्वभूतप्रियकरैः सर्वभूतहितैषिभिः ३ स्तूयमानश्च यज्ञान्ते पंचेन्द्रियसमाहितैः । प्रोवाच भगवान्ब्रम्हा दिष्ट्या दिष्ट्येति भारत ४ ततः कश्यपमाभाष्य प्रोवाच भगवान्प्रभुः । भवानपि सुतैः सार्धं यक्ष्यते वसुधातले ५ क्रतुभिः परमप्राप्तैः संपूर्णवरदक्षिणैः । यक्षा सुराश्च ते सर्वे यथाप्रतिगुणैः प्रभो ६ वयं यक्षामहे पूर्वं पूर्वं यक्षामहे वयम् । एवमन्योन्यसंरंभाद्वियन्ते बलदर्पिताः ७ दैतेयाश्चाप्यदैतेयाः परस्परजयैषिणः । युद्धायैव प्रतिष्ठन्ति प्रगृह्य विपुलौ भुजौ ८ निवार्यमाणाऋषिभिस्तपसादग्ध किल्बिषैः । अन्यैश्च विविधैर्विप्रैर्वेदवेदांगपारगैः ९ निवार्यमाणा युद्ध्यन्ते वृषभा इव गोकुले । प्रयुद्धारंभसंक्राताः सर्वे प्राणजयैषिणः १० पश्यतां सर्वभूतानां मृत्योर्विषयमागताः । ततः शब्देन महता परं कृत्वा महाबलाः ११ रुन्धन्ति बाहुभिः क्रुद्धाः

---

ऐश्वर्य ( अपरोक्ष ज्ञानसंपत्ति ) पाहिजे असेल त्या भूतसंपन्न ब्राह्मणानें सर्व इंद्रियचेष्टा अशा वेदपूर्वकच कराव्या १५. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा चोविसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २४ ॥

वैशंपायनः– ते नारदप्रभृति वेदप्रधान, निरपराध, दर्श व पूर्णमास यांस ज्यांनीं महत्त्व दिलें आहे, असे ब्राह्मण, गंधर्व व ऋषी ब्राह्मण व ब्रह्मसंभव वसूंसह देव यांस पुजते झाले. ते ब्राह्मणपूजेच्या क्रमानें यज्ञांत पितामह ब्रह्मदेवाचेंही पूजन करते झाले १, २. पांची ज्ञानेंद्रियांस निश्चल करणाऱ्या, सर्वभूतांचें प्रिय करणाऱ्या, सर्वभूतांचें हित इच्छिणाऱ्या व एकाग्रचित्त अशा ब्राह्मणाकडून मधुर भाषणयुक्त स्तोत्रांनीं स्तविला जाणारा भगवान् ब्रह्मा यज्ञाच्या शेवटीं मोठी आनंदाची गोष्ट आहे, मोठा आनंद झाला असें ह्मणाला ३, ४. नंतर कश्यपास हाक मारून भगवान् ब्रह्मा ह्मणाला " भूलोकीं तूंही आपल्या पुत्रांसह यज्ञामध्यें प्रवृत्त होत आहेस ही मोठ्या भाग्याची गोष्ट आहे ५. हे विभो, तुजप्रमाणेंच आपापल्या सात्त्विक, राजस, तामसगुणांनीं युक्त झालेले हे सर्व यक्ष, देव इत्यादि तुझे पुत्रही सर्वांगपूर्ण व संपूर्ण श्रेष्ठ दक्षिणायुक्त यज्ञांनीं यजन करितात ६. आह्मी पूर्वी यज्ञ करणार, आह्मी अगोदर यज्ञ करणार अशा अहमहमिकेनें असें म्हणून परस्परांस जिंकण्याची इच्छा करणारे दैतेय व अदैतेय बलानें दृप्त होऊन एकमेकाशीं मोठी स्पर्धा करूं लागतात ( येथें दैत्य ह्मणजे कामादि व अदैत्य ह्मणजे शमादि असें जाणावें ) ते आपले विपुल बाहू पुढें करून युद्धालाच प्रवृत्त होतात ७, ८. तपाच्या योगानें ज्याचें पाप दग्ध झालें आहे असे ऋषी व वेदवेदांगपारंगत दुसरे ब्राह्मण त्यांचें निवारण करीत होते तरी ते गोठ्यांतील बैलाप्रमाणें युद्ध करीत राहतात ( ब्राम्हणांनीं कितीही प्रयत्न केला तरी त्या दोन्ही प्रकारच्या वृत्तींस ते प्रतिबंध करूं शकत नाहींत. ) देवांनीं वाक्–प्रभृति मनःपर्यंत सर्व इंद्रियांचा आश्रय केला पण दैत्यांनीं त्या सर्वांना वेध केला. त्यामुळें तीं आपापल्या चांगल्या व वाईट विषयांचेंही ग्रहण करूं लागलीं. शेवटीं मोठें युद्ध करणाऱ्या देवांनीं प्राणाचा आश्रय केला. ( ह्मणजे यज्ञ सोडून ते प्राणाच्या उपासनेंत प्रवृत्त झाले ) तेव्हां

सपक्षा इव पक्षिणः । चचाल वसुधा चैव पादाक्रान्ता चरोचिभिः १२ नौ यथा पुरुषाक्रान्ता निषीदति महाजले । पर्वताश्च विशीर्यन्ते नर्दमाना गजा इव १३ चक्षुभुश्च म[illegible]नय स्ताडिता मातरिश्वना । ततः समभवद्युद्धं मधोर्विष्णोश्च भारत १४ युगान्तकरणं घोरं सर्वप्राणिभयंकरम् । प्रममाथ बलं विष्णुः समग्र बलपौरुषम् १५ वह्नेरिव बलं दीप्तं शमयत्यम्बुना यथा । तथा प्रशामितं तेन भगवत्यपकारिणा १६ [ ८५८ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पंचविंशतितमोऽध्यायः ॥ २५ ॥

वैशंपायन उवाच ॥ बलवान्स तु दैतेयो मधुर्भीमपराक्रमः । बबन्ध पाशैर्निशितैर्महेन्द्र पर्वतान्तरे १ तं वै प्रल्हादवचनाल्लक्षणज्ञश्च भारत । ऐश्वर्यमैन्द्रमाकांक्षन्भविष्यं बुद्धिसंक्षयात् २ बध्वेंद्रं सहसा मध्ये पाशैर्मर्मविवर्जितैः । आयसैर्बहुभिश्चित्रैर्बलवद्भिर्विदारणैः ३ विष्णुमेवाग्रणी रुद्रमाह्वयद्युद्धकोविदः । मृधे गणानां सर्वेषां कालस्य वशमागतः ४ द्वैधीभूताः काश्यपेया मधोर्वशमुपागताः । युद्धार्थमभ्यधावन्त प्रगृह्य विपुला गदाः ५ गन्धर्वाः किन्नराश्चैव वाद्ये गीते च कोविदाः । प्रनृत्यन्ति प्रगायन्ति प्रहसन्ति च सर्वशः ६ तन्त्रीभिः सप्र-

---

देव व असुर ( ह्मणजे शुभाशुभ इंद्रिय वृत्ती ) प्राणास ( सूत्रात्म्यास ) जिंकण्याची इच्छा करूं लागले; पण त्यामुळें पाषाणांवर फेकलेल्या ढेंकळाप्रमाणें ते सर्व, सर्व भूतांसमक्ष चूर होऊन मृत्युवश झाले; पण पुढें शाब्दज्ञानजन्य विवेकानें बाह्यइंद्रियवृत्तिसमूहास तोडून रागावलेले ते महाबलाढ्य, पक्षयुक्त पक्ष्यांप्रमाणें, आपल्या बाहूंनीं रोध करूं लागले. ( बाहू म्हणजे वैराग्यादि साधनें ) पण त्यांत रजस्तमोजन्य विघ्न आलें. सत्त्वापत्तिरूप योगभूमि त्यांच्या पायांच्या वेगानें आक्रांत झाली असतां चळचळ कांपूं लागली. ती विषयवासनाज्वालांनीं दीप्त झाली ९–१२. पुरुषांकडून आक्रांत झालेली नौका जशी महाजलांत बुडते, भयंकर आवाज करणाऱ्या गजांकडून पर्वत जसे फोडले जातात त्याप्रमाणें त्यांच्या वेगानें पृथ्वीची दुर्दशा झाली १३. वायूच्या वेगानें ताडित झालेल्या नद्या क्षुब्ध झाल्या. त्यानंतर मधु राक्षस व विष्णु यांचें घोर युगांत करणारें व सर्व प्राण्यांस भयंकर असणारें युद्ध झालें. समग्र बल व पौरुष यांनीं युक्त असलेल्या बलाचें विष्णूनें अतिशय मर्दन केलें १४,१५. पण अग्नीचें दीप्त बल जलानें जसें शांत करितात त्याप्रमाणें भगवानाचे ठायीं अपकार करणाऱ्या त्यानें विष्णूचें बल शांत केलें १६. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्वाचा पंचविसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २५ ॥

वैशंपायनः—भयंकर पराक्रम करणाऱ्या त्या बलाढ्य मधु दैतेयानें महेंद्रास तीक्ष्ण पाशांनीं पर्वतामध्यें बांधून सोडलें ( येथें आसुर भाव मोह हा मधु, वासनामय पाश, आत्मा–महेंद्र व पर्वत ह्मणजे देह असें समजावें ) १. योग्याचें लक्षण जाणणारा मोह प्रल्हादा ( प्रहर्षा )च्या सांगण्यावरून बुद्धिक्षयामुळें इंद्राचें ( आत्म्याचें ) भावि द्वैताचें अदर्शनरूप ऐश्वर्य आपणाला प्राप्त व्हावें अशा आशेनें अनेक बळकट विदारण करणाऱ्या, विचित्र व जणुं काय लोखंडीच अशा अभेद्यपाशांनीं इंद्राला अकस्मात् मध्यें बांधून विष्णूच्या अग्रभागीं गेला व तो युद्धपंडित रुद्राला युद्धार्थ आह्वान करिता झाला. कालाच्या वश झालेला तो सर्व गणांच्या संग्रामांत उभा राहिला २–४. तेव्हां मधूच्या अधीन झालेले ते कश्यपपुत्र द्विधा होऊन व मोठाल्या गदा घेऊन युद्धार्थ धांवले ५. वाद्यें व

युक्ताभिर्मधुराभिः स्वभावतः। मनो मधोर्विधुन्वन्ति युध्यमानस्य रागिणः ७ मधोर्बलार्थं मधुनो नियोगात्पद्मयोनिनः। एतान्विकारान्कुर्वन्ति गन्धर्वाः सत्यवादिनः ८ तत्र शक्तो हि गान्धर्वे तस्मिञ्छब्दे मधुर्मनः। दानवाश्चासुराश्चैव प्रत्यक्षं यान्ति प्राणदन् ९ मधोश्च मन आक्षिप्य पश्यन्योगेन चक्षुषा। मंदरं प्रक्षते विष्णुर्गूढोऽग्निरिव दारुषु १० ऋषयो दीप्तमनसं किंचिद्व्यथितमानसाः। पितामहं पुरस्कृत्य क्षणेनान्तरधीयत ११ विष्णुं सोऽभ्यहनत्क्रुद्धो मधुर्मधुनिभेक्षणः। भुजेन शंखदेशांते न च कंपे पदात्पदम् १२ विष्णुश्चाभ्यहनद्दैत्यं कराग्रेण स्तनान्तरे। स पपात महीं तूर्णं जानुभ्यां रुधिरं वमन् १३ न चैनं पतितं हन्ति विष्णुर्युद्धविशारदः। बाहुयुद्धे हि समयं मत्वा चिन्त्यपराक्रमः १४ इन्द्रध्वज इवोत्तिष्ठन् जानुभ्यां स महीतलात्। मधूरोषपरीतात्मा निर्दहन्निव चक्षुषा १५ परुषाभिस्ततो वाग्भिरन्योन्यमभिगर्जतुः। समीयतुर्बाहुयुद्धे परस्परवधैषिणौ १६ उभौ तौ बाहुबलिनावुभौ युद्धविशारदौ। उभौ च तपसाशान्तावुभौ सत्यपराक्रमौ १७ दृढप्रहारिणौ वीरावन्योन्यं विचकर्षतुः। शैलेन्द्राविव युद्ध्यन्तौ पक्षैः पाषाणसन्निभैः १८ विकर्षन्तौ च मत्तौ च अन्योन्यं वसुधातले। गजाविवविषाणाग्रैर्नखाग्रैश्चविचेरतुः १९ ततोव्रणमुखैश्चैवसुस्रावरुधिरंबहु। ग्रीष्मान्ते धातुसंसृष्टं शैलेभ्य इव कांचनम् २० संसिक्तौ रुधिरौघैश्च स्रवद्भिः समरक्षितौ। अथोयतैः

---

गायन यांत निपुण असलेले गंधर्व व किन्नर गावूं, नाचूं व सर्वशः हसूं लागले ६. स्वभावतःच मधुर असून चांगल्या लावलेल्या तारांनीं रजोगुणी गंधर्वादिक युद्ध करणाऱ्या रागी मधूचें मन चंचळ करूं लागले ७. मधु मत्त व्हावा म्हणून कमलोद्भव मधाची योजना केल्यामुळें सत्यवादी गंधर्व हे विकार करीत होते ८. मोठा नाद करणारा समर्थ मधु, दानव व असुर त्या गांधर्व शब्दामध्यें मन आसक्त करते झाले ९. याप्रमाणें मधूचें मन विषयाक्षिप्त करून दिव्य दृष्टीनें पहाणारा विष्णु, काष्ठांतील गूढ अग्नीप्रमाणें, मंदरांत गुप्त होऊन राहिला १०. त्यामुळें ज्यांच्या मनाला व्यथा झाली आहे असे मंत्र दीप्तचित्त पितामहाला पुढें करून एका क्षणांत अंतर्धान पावले ११. पण मधाप्रमाणें ज्याचे नेत्र लाल आहेत असा रागावलेला मधु(विष्णूला म्हणजे विवेकाला हुडकून काढून) आपल्या भुजानें गळ्याजवळ प्रहार करता झाला. पण भगवान् एक पाऊलभरही मागें सरला नाहीं १२. विष्णूनें हाताच्या अग्रभागानें ( म्हणजे तळहातानें ) दैत्याच्या छातीवर थप्पड दिली. तेव्हां लागलीच रक्त ओकीत तो गुडघे टेकून भूमीवर पडला १३. पण युद्धविशारद विष्णूनें त्या पडलेल्या वीराला मारलें नाहीं. त्या अचिंत्य पराक्रमी वीरानें आतां बाहुयुद्धाची वेळ आहे असें ताडलें १४. तों इतक्यांत गुडघे टेंकूनच तो दैत्य इंद्रध्वजाप्रमाणें भूतलावरून उठला व रोषानें व्याप्त झालेला तो मधु नेत्रांनीं जणुंकाय समंतात् भाग जाळूं लागला १५. नंतर ते दोघे कठोर वाणीनें परस्परांस मोठ्यानें ओरडून शिव्याशाप देऊं लागले. एकमेकांच्या वधाची इच्छा करणारे ते बाहुयुद्धांत भिडले १६. ते दोघेही बाहुबलसंपन्न, युद्धविशारद, तपाच्या योगानें श्रांत झालेले व सत्यपराक्रमी होते १७. दृढप्रहार करणारे ते वीर एकमेकांस ओढते झाले. ते पाषाणासारख्या दोन्ही बाजूंनीं पर्वतश्रेष्ठांप्रमाणें युद्ध करीत होते १८. दांतांच्या अग्रांनीं फाडणाऱ्या हत्तींप्रमाणें ते दोघे मत्त एकमेकांस भूमीवर फरफर ओढून नखांनीं फाडीत संचार करूं लागले १९. त्यामुळें ग्रीष्मऋतूच्या शेवटीं धातुयुक्त पर्वतावरून गळणाऱ्या सुवर्णरसाप्रमाणें त्यांच्या अंगावरील व्रणांच्या मुखांतून पुष्कळ रक्त

पदाग्रैश्च तौ व्यदारयतां महीम् २१ अभिहत्य तु तौ वीरौ परस्परमनेकधा । पतंगाविव युध्येतां पक्षाभ्यां मांसगृद्धिनौ २२ शुश्रुवुश्चान्तरिक्षेथ सर्वभूतानि पुष्करे । सिद्धानां वदनोन्मुक्ताः परया वर्णसंपदा २३ स्तुतयो विष्णुसंयुक्ताः सत्याः सत्यपराक्रमे । शरीरं धातुसंयुक्तं संयुक्तं चेतनेन च २४ तद्ब्रह्म इन्द्रियैर्युक्तं तेजोभूतं सनातनम् । ध्रुवं तिष्ठंति भूतास्ते सूक्ष्मे प्रलयतां गते २५ पुनश्चोद्भवते सूक्ष्मं बहुरूपमनेकधा । प्रबोध्य भावं भूतानां त्रिषु लोकेषु कामदः २६ सुरूपो बहुरूपांस्तांल्लोकान्संचरते वशी । मानसीं तनुमास्थाय बहुभिः कारणान्तरैः २७ योगात्मा धारयन्नुर्वीं नागात्मानं दिवंधरः । ब्रह्मभूतं परं चैव सूक्ष्मेणात्मानमीश्वरः २८ ब्राह्मेण विप्रान्वसति युद्धेनैव च क्षत्रियान् । प्रदानकर्मणा वैश्याञ्छूद्रान्परिचरेण च २९ गावः क्षीरप्रदानेन अश्वान्यज्ञेषु प्रोक्षणैः । पितरश्चोष्मणा वेदहविर्भागेन देवताः३० चतुर्भिर्व्यतिरिक्तांगैस्त्रिभिरन्यैश्च धातुभिः । सप्तभिः पितृभिर्नित्यैस्त्रीँल्लोकान्परिरक्षति ३१ चन्द्रसूर्यात्मकं नित्यं तद्रूपं निहतात्मकम् । प्रकाशं चाप्रकाशं च निगूढं स्वेन तेजसा ३२ त्रयस्तु पितरो नित्यं वर्धयन्ति दिवाकरम् । चतुर्भिः पितृभिश्चैव चन्द्रो वर्धति मण्डले ३३

---

गळूं लागलें २०. गळणाऱ्या रक्ताच्या ओघानें भिजलेले ते चांगले रंगले. वारंवार उचललेल्या पावलांनीं त्यांनीं पृथ्वीला विदीर्ण केलें २१. परस्परांस अनेक प्रकारें मारून ते दोघे वीर मांसाची इच्छा करणाऱ्या व पंखांनीं लढणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें युद्ध करूं लागले २२. इतक्यांत सर्व भूतें पुष्करामध्यें श्रेष्ठ वर्ण संपत्तीनें सिद्धांच्या तोंडून निघणाऱ्या अंतरिक्षांतील विष्णूच्या स्तुती ऐकूं लागलीं २३. त्या सत्य पराक्रमी ईश्वराच्या त्या सत्य स्तुती होत्या. ( अनात्म्याचेठायीं आत्म्याचा अध्यास करणें हा अविद्याख्य मोह होय. त्याच्या नाशार्थ अनात्मा व आत्मा यांना पृथक् करण्याकरितां ही पुढील स्तुति आहे. ) स्थूल शरीर हा तेज, जल व अन्न ( पृथ्वी ) या धातूंचा संघ आहे. त्याच्याशीं अगदीं विलक्षण असलेल्या चेतनाचा संबंध झाला आहे. तें चेतनच ब्रह्म आहे तें अनादि चिन्मात्र असून इंद्रिययुक्त झालें असतां जीव होतें. सूक्ष्म प्रलयतेस प्राप्त झालें असतां देहारंभक भूतें सूक्ष्मामध्यें निश्चित रहातात २४,२५. सूक्ष्मच बहुरूप होऊन पुनः अनेकधा उत्पन्न होतें. कारण, सूक्ष्म, स्थूलरूप तीन लोकांतील भूतांचें स्वरूप जाणून त्यांनाच स्वरूप चैतन्यानें व्यापून तो असंग आत्मा त्या बहुरूप लोकांत संचार करतो. ( लोक व आत्मा हे परस्परांचे पालन करितात. ) तो योगात्मा ईश्वर दुष्टनिग्रह, साधुरक्षण इत्यादि दुसऱ्या अनेक कारणांनीं शेष—कूर्मादि मानसी तनु धारण करून शेषरूपानें पृथ्वीचें धारण करतो. द्युलोकाचें रक्षण करितो. वेद व चतुर्विध भूतवर्ग हा धार्यवर्ग असून स्वतः आत्मा धारक आहे. तो सूक्ष्मरूपानें सर्वांचें धारण करतो २६,२८. तो वेदमयरूपानें ब्राह्मणामध्यें रहातो; क्षात्रविद्येनें क्षत्रियांमध्यें असतो; दानकर्मानें वैश्यांमध्यें व परिचर्याकर्मानें शूद्रामध्यें वास करतो २९. गायीमध्यें अधिष्ठित होऊन क्षीरदानानें तुमचें तो रक्षण करतो. यज्ञिय द्रव्यांमध्यें अधिष्ठित होऊन फलामृतानें तुमचें पालन करतो. पितरांत राहून ऊष्महविर्भागानें व देवतामध्यें राहून वेदहविर्भागानें तो सर्वांचें संरक्षण करतो ३०. दर्श—पूर्णमास—पिंडपितृयज्ञ—साधारण व मन, वाणी आणि प्राण अशा सात अन्नांनीं तो नित्य पितरांसह तीन लोकांचें परिरक्षण करतो ३१. हें सप्तक चंद्रसूर्यात्मक, नित्य, अर्चिरादि मार्ग व धूमादि मार्गरूप व ज्यानें आत्म्याला संकटांत पाडलें आहे असें असून चित्प्रका–

त्रयः पितृगणा नित्यं पिण्डान्पश्चाददन्ति ते । चत्वारो न्ये पितृगणाः सिद्धाः पंचक आददे ३४ त्वमेवपंचतान्धर्मांस्त्वमेवापंचतान्विभो । सनातनमयोदिव्यः शाश्वतोब्रह्मसंभवः ३५ तस्मात्तेजआदत्तेअग्निर्वायुश्चसर्वशः । अतस्त्वंकर्मणातेनआदित्यः समपद्यत ३६ यदश्नासिजगत्सर्वंरश्मिभिः प्रदहन्निव । युगांतकालेसंप्राप्तेपरांसिद्धिमुपागतः ३७ पक्षसंधावमावास्यांलोकंचरसिमानुषम् । ऋषिभिः सहगूढात्मासूर्येंदुवसुसप्रभैः ३८ सफलं कर्मकुर्वाणोयजतांपुष्टिवर्धनम् । हेतूनामविकारायमाभूत्कर्मविपर्ययः ३९ वनस्पत्यौषधीश्चैव युगपत्प्रतिपद्यसे । बालभावाय वसुधां पक्षे पक्षे जनिस्तव ४० भूतानां भुवि भूतेश भाव्यर्थं वसुधातले । वसु यद्भुवि किंचिच्च सर्वं तत्त्वन्मय विभो ४१ त्वमेव त्रिविधं धर्मं शाश्वतं वसुधातले । देवयज्ञंमन्त्रवाक्यमात्मयज्ञं समानुषम् ४२ द्विविधः स्वर्गमार्गश्च सूर्यश्चन्द्रश्च निर्मलः । चन्द्रमाः पितृयानश्च देवयानश्च भास्करः ४३ त्वमेव वसुधायुक्तो विश्वं चरसि सीमया । एकीकृत्य गणान्सर्वान्संक्षिप्यामुत्र संभवः ४४ एकस्त्वमसि संभूतः पुराणपुरुषो विराट् । अक्षयश्चाप्रमेयश्च कामकारकरो वशी ४५ मूर्तस्तेजसि संभूतो वायुः पर्येति खेचरः । सप्तभी रूपसंस्थानैर्नित्यमावृत्य तिष्ठति ४६ साधने चापि निर्माणे संहारे प्रलये

---

शानें व्याप्त आहे ३२. त्यांतील मन, वाणी व प्राण एतत्संज्ञक तीन पितर नित्य सूर्याला वाढवितात व बाकीच्या चार पितरांच्या योगानें चंद्र मंडलामध्यें वाढतो ३३. तीन पितृगण फल भोग घेऊन झाला असतां नियमानें स्थूल—सूक्ष्म—कारण देहाचा उपसंहार करितात. ( मन, वाणी व प्राण अवश्य क्रमानें आत्ममुक्तीस कारण होतात. ) पण इतर पितृगण शरीराकार परिणत होऊन पांच विषयांचा भोग घेतात ३४. हे प्रभो, तूंच ते पांच धर्म आहेस. तूंच आकाशादि पांच भूतें आहेस. तूं सनातनमय, शाश्वत, दिव्य, व ब्रह्मापासून परणत झालेला आहेस ३५. अग्नि व वायु सर्वप्रकारें तुजपासूनच तें तेज घेतात. त्या कर्मामुळें तूं आदित्य झाला आहेस ३६. कारण तूं युगांतकाल आला असतां आपल्या किरणांनीं जणुं काय दहन करीत असल्याप्रमाणें सर्व जग खाऊन सोडतोस. तूं पर सिद्धीला प्राप्त झाला आहेस ३७. पूर्णिमा व अमावास्या या तिथींस सूर्य, चंद्र व वसु यांच्यासारख्या तेजस्वी ऋषींसहवर्तमान गूढ रूपानें यजन करणारांची पुष्टि वाढविणारा व सफल कर्म करणारा तूंच स्वर्गादि साधनभूत कर्मांचा काललोपानें धर्मविपर्यय न व्हावा म्हणून मानुषलोकांत संचार करतोस ३८, ३९. पुनरुत्पत्तीकरितां तूं चंद्ररूपानें पृथ्वीवरील ओषधी व वनस्पती यांत प्रवेश करतोस. याप्रमाणें प्रतिपक्षीं तुझी उत्पत्ति होते ४०. हे विभो, हे भूतेशा, पृथ्वीच्या पाठीवर मागच्या व पुढच्या भूतांच्या पुष्टीकरितां जेवढें म्हणून द्रव्य आहे तें सर्व त्वन्मय आहे ४१. भूपृष्ठावरील विविध शाश्वत धर्म तूंच आहेस. देवयज्ञ, मंत्रवाक्य, समानुष आत्मयज्ञही तूंच ४२. निर्मल स्वर्गमार्ग दोनप्रकारचा आहे. एक सूर्य व दुसरा चंद्र. चंद्रमा हा पितृयानमार्ग असून भास्कर हा देवयानमार्ग आहे ४३. तूंच भूमीवरील प्राणिरूपानें नियमपूर्वक सर्व विश्वांतील विषय भोगतोस. सर्व इंद्रियगणांस एकत्र करून देहमात्ररूपानें परलोकीं उद्भव होतो ४४. एक तूंच पुराणपुरुष, विराट्, अक्षय, अप्रमेय, जितेंद्रिय व लीलाकारी उत्पन्न झाला आहेस ४५. तूं रूपाच्या आकारानें उत्पन्न झालेला आहेस म्हणूनच चक्षुर्ग्राह्य आहेस. महत्, अहंकार व पंचत-

तथा । धाता धारणकाले च दिशश्चक्षुषि धारिणि ४७ सेव्यमानो मुनिगणैर्नित्यं विगतकिल्बिषः । कर्मभिः सत्यमापन्नैः समरागैर्जितेन्द्रियैः ४८ स्तूयमानश्च विबुधैः सिद्धैर्मुनिवरैस्तथा । सस्मार विपुलं देहं हरिर्हयशिरो महान् ४९ कृत्वा वेदमयं रूपं सर्वदेवमयं वपुः । शिरोमध्ये महादेवो ब्रम्हा तु हृदये स्थितः ५० आदित्या रश्मयो बाला चक्षुषी शशिभास्करौ । जंघे तु वसवः साध्याः सर्वसंधिषु देवताः ५१ जिह्वा वैश्वानरो देवः सत्या देवी सरस्वती । मरुतो वरुणश्चैव जानुदेशे व्यवस्थिताः ५२ एवं कृत्वा तथारूपं सुराणामद्भुतं महत् । असुरं पीडयामास क्रोधाद्रक्तान्तलोचनः ५३ मधोर्मेदोवपूर्णा च पृथिवी समदृश्यत । प्रमदेव घना चैव शुक्लांशुकनिवासिनी ५४ मेदिनीत्येव शब्दश्च लब्धः पृथ्व्या नरोत्तम । नामासुरसहस्रेण धरण्यां संप्रतिष्ठितम् ५५ [ ९१३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि षड्विंशतितमोऽध्यायः ॥ २६ ॥

वैशंपायन उवाच ॥ मधोर्निपतनं दृष्ट्वा सर्वभूतानि पुष्करे । प्रहृष्टानि प्रगायन्ति प्रनृत्यन्ति च सर्वशः १ सुपार्श्वो गिरिमुख्यस्तु कांचनैः शिखरोत्तमैः । बहुधा तु विचित्रैश्च खंलिखन्निव चाबभौ २ गिरयश्चाभिशोभन्ते धातुभिः समरंजिताः । प्रांशुभिः शिखराग्रैश्च

---

न्मात्रा या सात रूपाकारांनीं नित्य परिवेष्टित होऊन रहातोस ४६. शमादि साधनसमर्यी जीवरूपानें तूंच आहेस. निर्माणसमयीं शुद्धरूपानें तूंच रहातोस. दैनंदिन लय व ब्राह्मप्रलय यांमध्यें रुद्ररूपानें तूंच असतोस. स्थितिकालीं धाता ( पालक ) तूंच. वर्णाश्रममर्यादा तूंच. पोषकपदार्थ व इंद्रियें यांत चिद्रूपानें तूंच निवास करतोस ४७. पापरहित अकर्मे ब्रह्मसमर्पण करून शत्रु व मित्र यांचे ठायीं समान प्रेम करणाऱ्या, जितेंद्रिय मुनिगणांकडून तूं नित्य सेविला जातोस ४८. असो; याप्रमाणें देव, सिद्ध व श्रेष्ठ मुनी यांच्याकडून स्तुति केला जाणाऱ्या हरीनें घोड्याचें ज्याला मस्तक आहे अशा आपल्या सर्वात्मक देहाचें स्मरण केलें ४९. वेदमय व सर्व देवमय शरीर करून तो सज्ज झाला. त्याच्या मस्तकामध्यें महादेव व हृदयामध्यें ब्रह्मा स्थित झाला ५०. सूर्याचें किरण त्याचे केंस झाले. सूर्य व चंद्र हे दोघे नेत्र बनले. वसु व साध्य हे त्याच्या जंघांचा आश्रय करून राहिले. सर्व शरीरसंधींमध्यें देवता राहिल्या ५१. वैश्वानर देव जिह्वा झाला. वद्वाणी हीच त्याची वाग्देवता झाली. मरुत व वरुण त्याच्या जानुप्रदेशीं स्थित झाले ५२. याप्रमाणें देवांच्या योगानें अद्भुत व मोठें रूप करून ज्याचे नेत्रप्रांतभाग क्रोधानें लाल झाले आहेत असा तो विश्वात्मा मधु ( मोह ) असुराला पीडा देता झाला ५३. तेव्हां मधूचें शरीर मेदानें परिपूर्ण आहे असें दिसलें. त्यामुळें शुभ्रवस्त्र परिधान करणाऱ्या तरुण प्रमदेप्रमाणें त्याचें शरीर ( पृथ्वी ) नूतन असल्याप्रमाणें भासत होतें ५४. हे नरोत्तमा, मोहाच्या संबंधानें परिपूर्ण होणारें त्याचें शरीर ( पृथ्वी ) मेदिनी या शब्दास प्राप्त झालें व तेंच पृथ्वीचें नाम प्रतिष्ठित झालें ५५. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा सव्विसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २६ ॥

वैशंपायनः-- याप्रमाणें मधुराक्षस पडलेंं आहे असें पाहून पुष्करांतील सर्वभूतें अतिशय आनंदित झालीं व सर्वप्रकारें गावूं व नाचूं लागलीं १. पर्वतश्रेष्ठ सुपार्श्व बहुप्रकारें विचित्र सोन्याच्या शिखरांनीं आकाशास स्पर्श करीत असल्याप्रमाणें दिसला २. काव इत्यादि धातूंनीं चांगलेच रंगलेले इतर पर्वत उंच शिखरांच्या योगानें विद्युद्युक्त मेघांप्रमाणें

सविद्युत इवांबुदाः ३ पक्षवातोद्धतो रेणुश्चूर्णैः सांजनवालुकैः । छादयन्पर्वताग्राणि महामेघ इवाबभौ ४ मेघसंश्लिष्टशिखराः पक्षविक्षिप्तपादपाः । कांचनोद्भेदबहुलाः खे तिष्ठंतीव पर्वताः ५ पक्षवन्तः सशिखरा हेमधातुभिरंजिताः । पवनेन समुद्भूतास्त्रासयंति विहंगमान् ६ कांचनाः पर्वताः सर्वे स्फाटिकैर्मणिभिश्चिताः । सूर्यकान्तैश्च बहुभिश्चन्द्रकान्तैश्च निर्मलैः ७ हिमवांश्च महाशैलः श्वेतैर्धातुभिराचितः । कांचनैः शिखराग्रैश्च सूर्यपादप्रकाशितैः ८ मणिभिश्च प्रकाशाद्भिः पक्षान्तरविनिःसृतैः । ताम्रपुष्पैश्च शिखरैर्दीप्यमानैः स्वतेजसा ९ मन्दरश्चोग्रशिखरः स्फाटिकैर्मणिभिश्चितः । वज्रगर्भैर्निरालंबैः स्वर्गोपम इवाबभौ १० सहस्रशृंगः कैलासः शिलाधातुविभूषितः । तोरणैश्चैव निबिडैः प्रांशुभिश्चैव पादपैः ११ प्रवाद्यद्भिर्गन्धर्वैः किन्नरैश्च प्रगायिभिः । देवकन्यांगहावैश्च प्रक्रीडाद्रिरिवाबभौ १२ मधुरैर्वाद्यगीतैश्च नृत्यैश्चाभिनयोद्गतैः । शृंगारैः सांगहारैश्च कैलासो मदनायते १३ आदित्यभासिभिः शृंगैर्भिन्नांजनचयोपमैः । विन्ध्यो नीलांबुदश्यामो विभिन्न इव तोयदः १४ धात्वर्थं सर्वभूतानां मेरुपृष्ठे महाबले । निर्वेमुर्विमलं तोयं मेघजालैरिवोत्तमैः १५ शिलाभिर्बहुचित्राभिर्धातुभिर्बहुरूपिभिः । प्रस्रवद्भिर्गुहाद्वारैः सलिलं स्फटिकप्रभम् १६ ग्रीष्मान्ते वायुसंमूढा घना इव सविद्युतः । चित्रैः पुष्पैस्तरुगणाः शोभन्त इव भूषिताः १७ नागाः कनकसंभूतैर्विचित्रैरिव

---

शोभत होते ३ त्यांच्या पंखांच्या वाऱ्यानें उडालेली धूळ काळया वाळूंच्या चूर्णांनीं पर्वतांचीं अग्रें आच्छादित करूं लागलीं असतां महामेघासारखी दिसलीं ४. ज्यांच्या शिखरांचा आश्रय मेघांनीं केला आहे, ज्यांच्या पंखांच्या वाऱ्यानें वृक्ष जोरानें हालत आहेत व ज्यांच्यावर सुवर्णयुक्त भाग पुष्कळ आहेत असे पर्वत जणुंकाय आकाशांतच उभे राहिले आहेत ( असा भास होऊं लागला ) ५. ते सर्व पंखयुक्त, शिखरयुक्त व सुवर्णधातूनें रंगलेले होते. वाऱ्यानें ज्यांच्यावरील धूळ उडविली आहे असे ते पर्वत पक्ष्यांस भय दाखवीत होते ६. ते सर्व सुवर्ण पर्वत स्फाटिक मणी, पुष्कळ निर्मल सूर्यकान्त व चंद्रकान्त मणी यांनीं व्याप्त होते ७. महाशैल हिमवान् शुभ्रधातूंनीं व सूर्यकिरणांनीं प्रकाशित होणाऱ्या सुवर्णाच्या शिखराग्रांनीं व्याप्त होता ८. तो पंखांच्या आंतून निघालेल्या प्रकाशमान मणींनीं व आपल्या तेजानें दीप्त होणाऱ्या ताम्रपुष्पयुक्त शिखरांनीं सुशोभित झाला होता ९. ज्याचीं शिखरें उग्र आहेत असा निराधार व वज्रगर्भ स्फाटिक मणींनीं व्याप्त असलेला मंदरपर्वत स्वर्गासारखा भासत होता १०. शिला व धातु यांनीं अतिशय भूषित झालेला आणि स्तंभरहित बहिर्द्वाराप्रमाणें उंच वृक्षांनीं युक्त असलेला सहस्रशृंगवान् कैलास ११ वाद्यें वाजविणारे गंधर्व, गाणारे किन्नर व देवकन्यांच्या अंगचे हावभाव यांनीं क्रीडापर्वताप्रमाणें शोभत होता १२. मधुर वाद्यें व गीतें, अभिनयाच्या योगानें उज्ज्वल झालेलीं नृत्यें आणि अंगविक्षेपांसह शृंगारभाव यांच्या योगानें कैलास मदनाप्रमाणें कामोद्दीपक झाला १३. नीलमेघासारखा श्यामवर्ण विष्णु मेघांच्या योगानें पृथ्वीवर जसा जलवर्षाव करतो त्याप्रमाणें नीलमेघासारखा श्यामवर्ण विंध्यपर्वत सूर्याच्या प्रभेनें भासमान होणाऱ्या, काळया काजळाच्या ढिगाप्रमाणें दिसणाऱ्या शिखरांनीं सर्वभूतांच्या पुष्टीकरितां महाबलाढ्य मेरुपृष्ठावर निर्मल जलाचा वर्षाव करतो १४,१५. त्याच्या अनेक विचित्र व बहुरूपी धातूंनीं रंजित झालेल्या शिलांनीं भूषित असलेल्या व स्राव करणाऱ्या गुहाद्वारांनीं स्फटिकासारखें शुभ्र

भूषिताः । विहंगमाभिर्लीनाश्च लतास्तरुसमाश्रिताः १८ विलंबंत्यः सपुष्पाश्चनृत्यंतेवायुघट्टिताः । पवनेन समुद्धूता महता माधवेऽहनि १९ मुमुचुः पुष्पसंघातं तोयं वेलेव वर्षति । बलवद्भिश्च विपुलैः शाखिस्कन्धावरोहिभिः २० पादपैर्पर्णबहुलैर्ध्रियते च वसुन्धरा । मधुप्रिया मधुकरा मधुमत्ता विहंगमाः । घोषयन्तीव गायन्तः कामस्यागमसंभवम् २१ विष्णुर्मधोर्निहंता च चकार मधुवाहिनीम् । नदीं प्रस्रवनिर्भेदां सुतीर्थां बहुलोदकाम् २२ अंगारवर्णसिकतां मधुतीर्थां मनोरमाम् । विमलैरंबुभिः पूर्णां पुष्पसंचयवाहिनीम् २३ विवेश पुष्करं सा तु ब्रह्मणो वाक्यनोदिता । ऋषिभिश्चानुचरिता ब्रह्मतन्त्रनिषेविभिः २४ धात्री कपिलरूपेण गौर्भूत्वा क्षरते पयः । मधुरं वितते यज्ञे ब्रम्हणो वाक्यचोदिता २५ शिरश्च पृथिवीभूतं संधातुं यत्नवान्महीम् । शुद्धं च भजते लोकं शाश्वतं परमाद्भुतम् २६ सरस्वत्याः समुद्भूतं ब्रह्मक्षेत्रे तमोनुदम् । मरुतीर्थमतिक्रम्य पुष्करेषु विसर्पति २७ सुचारु-

---

जल वहात होतें १६. ग्रीष्मऋतूच्या शेवटीं विचित्र पुष्पांनीं भूषित झालेले वृक्षगण वायूनें उडविलेल्या विद्युद्युक्त मेघांप्रमाणें शोभतात १७. त्या पर्वतावरील गज सोन्याच्या विचित्र भूषणांनीं भूषित झाल्याप्रमाणें दिसत होते. तेथील वृक्षाचा आश्रय करून रहाणाऱ्या वेलींवर अनेक पक्षी बसले होते १८. लोंबणाऱ्या पुष्पयुक्त लता चैत्रांतील एकाद्या दिवशीं मोठ्या वायूनें उडविल्याप्रमाणें, वायूच्या योगानें हालूं लागल्या असतां नाचत असल्याप्रमाणें दिसतात १९. वृक्षांच्या शाखांवरून खालीं उतरणाऱ्या विस्तृत व विपुल लतांनीं वेला जशी जलाचा वर्षाव करते त्याप्रमाणें पुष्पांचा वर्षाव केला २०. ज्यांच्यावर पानें पुष्कळ आहेत अशा वृक्षांकडून पृथ्वी धारण केली जाते. वसंतास प्रिय असलेले, मध करणारे, मधानें मत्त होणारे व गायन करणारे पक्षी कामाच्या उत्पत्तीच्या वृत्तांताचा जणुं काय घोष करितात २१. मधूचा निहंता विष्णु प्रवाहाच्या योगानें दुर्लंघ्य झालेली, चांगला घाट व पुष्कळ जल यांनीं युक्त असलेली मधुवाहिनी नदी करता झाला २२. त्या नदींतील वाळू निखाऱ्यासारखी लाल होती. तीर्थजल मधासारखें मधुर होतें. ती पुष्पसंचयास वाहणारी व निर्मल जलानें भरलेली नदी मनोरम होती २३. पण ब्रह्मदेवाच्या वाक्यानें प्रेरित व ब्रह्मतंत्रांचें सेवन करणाऱ्या ऋषींकडून आज्ञा केली गेलेली ती नदी ( मधुमती योगभूमि ) येथें नाना असें कांहीं नाहीं अशा श्रुत्युपदेशानें युक्त असलेल्या योग्याच्या हृदयाख्य पुष्करांत प्रवेश करती झाली २४. ( याप्रमाणें योगविघ्नें नष्ट झालीं असतां ब्रह्मविद्येचा उदय होतो असें आतां सांगतात ) धात्री ( मूलप्रकृति ) कपिल ( त्रिगुणात्मकत्वामुळें मिश्रवर्णानें ) रंगाची गाय ( विद्या ) होऊन योग विशेषरीतीनें प्रसिद्ध झाला असतां ‘ अहं ब्रह्मास्मि ’ या ब्रह्म ( वेद ) वाक्यानें प्रेरित होत्साती मधुर दुग्ध ( आनंदरूप ब्रह्म देते ) २५. उत्तम पण गुणकार्यरूप असल्यामुळें अपक्षययुक्त वृत्ति जड होऊन कूटस्थ वस्तूशीं संधान करण्यास समर्थ असूनही आपल्या उपादानभूत पृथ्वीकडे आली. ह्मणजे योगी शुद्ध शाश्वत व अति अद्भुत आत्मलोकास निर्विकल्प समाधीच्या द्वारां भजतो २६. ( पण सर्व धर्मशून्य वस्तु शून्यरूपच आहे असें ह्मणावें लागेल ह्मणून सांगतात ) ‘ परमात्मा आहे असेंच जाणावें ’ अशा अर्थाच्या वेदवाक्यापासून उत्पन्न झालेलें, अज्ञानाशीं विरोध करणारें ज्ञानमात्र आणि भ्रू व घ्राण यांच्या मध्यभागीं उत्पन्न झालेलें

रूपा धर्मज्ञा अजा रूपेण छादयन् । रूपं कनकवर्णाभं तपोयुक्तेन तेजसा २८ अजगन्धकृतोन्मुक्तः संभूतः पर्वतोमहान् । गुरुद्वारः गुणप्राणः शाश्वतः सिद्धसेवितः २९ वेदिकाभिः सुचित्राभिः कांचनाभिर्विराजितः । पुष्कराणि परीतानि त्वष्ट्रा विपुलदक्षिण ३० महामेरोर्यथारूपं पंचभिर्धातुभिर्वृतम् । चेतनायाभिसंपन्नो रूपेणाद्भुतदर्शनः ३१ करिष्याम्यहमप्येतन्मनसा धर्मचारिणम् । रूपं बहुविधं लोके पार्थिवीं चेतनां तथा ३२ त्रींश्च लोकाम्पश्येयं पंचभिर्धातुलक्षणैः । षष्ठेन च ससर्जेयं मनसा धर्मचारिणीम् ३३ संगेषु भावमोहाभ्यां पश्यन्ति च समृद्धयः । विमुक्ताः सर्वसंगेभ्यो धारयन्ति परिग्रहान् ३४ न च विन्देत मां कश्चिन्मनसा कामरूपिणम् । पंचधातुनिबद्धश्च नानाभाषितचोदनः ३५ ये च विष्णुमधी-

---

असें तें तत्त्व मृगजळासारख्या विषयांचे अतिक्रमण करून मायाशबल परमाकाशांत संचार करतें २७. अति सुंदररूपा व अद्वैतास जाणणारी अशी अनादि माया तपोयुक्त चित्तानें त्या दिव्यरूप तत्त्वास अहंकारादिकानें आच्छादित करते २८. कारण हा अहंकार महापर्वताप्रमाणें अभेद्य आहे. पण तो ( अहंकारादि संसार ) स्थूल आकारानें उद्भूत झाल्यासारखा जरी दिसला तरी तो प्रथम सन्मात्र वस्तूच्या लेशानें झालेला व मागून त्याच्याकडून सोडला गेलेला आहे. ( अहंकारादि जाग्रदादि दोन अवस्थामध्येंच विद्यमान असल्यासारखा दिसतो. सुषुप्ति, समाधि व मूर्च्छा या अवस्थांत नाहीं. वास्तव, या दुःखादि धर्मवानाला आत्मरूपत्व नाहीं. तर मिथ्यात्व आहे. ) या अहंकार पर्वताचें गुरुपदेश हेंच द्वार आहे. तीन गुण हेच त्याचे प्राण आहेत. तो अनादि असून सिद्धही जर त्याचें सेवन करितात तर मूढांविषयीं काय बोलावें २९. तो जाग्रत्स्वप्न–सुषुप्त्याख्य अतिशय विचित्र ( परस्परविलक्षण ) व सुंदर वेदिकांनीं ( अवस्थांनीं ) विराजित आहे. हे पुष्कळ दक्षिणा देणाऱ्या राजा, विचित्र जगाला निर्माण करणाऱ्या कारागिरानें ( ईश्वरानें ) पुष्करांस ( मूल अज्ञानांस ) व्यापून सोडलें आहे. ( पण त्याला इतरांनीं व्यापलेलें नाहीं ) ३०. या अहंकारपर्वताचें रूप महामेरूच्या रूपासारखें असून शरीराकार झालेल्या पंचमहाभूतांनीं व्याप्त आहे. हा रूपानें अद्भुतदर्शन ( अनिर्वचनीय ) असूनही प्रसिद्ध चेतनेनें अभिसंपन्न असतो. ( स्वतः चेतन नव्हे. ) ३१. मीच या धर्माचरण करणाऱ्या देहास मनानें करतों. केवल देहालाच नव्हे तर बहुविध रूपालाही ( दृश्यालाही ) संकल्पानेंच करतों. त्याचप्रमाणें शरीरसंबंधीं चेतनेलाही मी बहुरूप करतों. ( तात्पर्य सर्व चेतना चेतनकेवळ मज परमेश्वराच्या संकल्पापासून झालेलें आहे. माझ्याहून दुसरें कांहीं नाहीं ) ३२. ( वरील श्लोकांत आत्म्याचें सर्वात्मत्व सांगून आतां सर्वज्ञत्व सांगतात ) पृथिव्यादिकांस लक्षित करणाऱ्या पांच इंद्रियांनीं मी तीन लोकांस जाणीन. सहाव्या मनःसंज्ञक इंद्रियाच्या योगानें आत्मसदृश असंग चिदाकार वृत्ति मी उत्पन्न करतों. ( मी विद्यारूप आहें. मोह व विद्या मीच देतों ) ३३. ( आतां विद्येचे अधिकारी कोण तें सांगतात-) जे अति ऐश्वर्यसंपन्न पुरुष ऋद्धींचा योग झाला असतां त्या संकल्पमात्र व भ्रममात्र आहेत असें पहातात व त्यामुळेंच सर्व आसक्तीपासून मुक्त असतात ते ज्ञानेंद्रियें, मन व प्राण यांचा निग्रह करूं शकतात. ( विषयदोषदर्शन, वैराग्य व अभ्यास यांच्या योगानें पुरुष विद्याधिकारी होतो ) ३४. पंचधातुमय देहानें बद्ध झालेला कोणीही कामरूपी

यत्ने बहुधाकामविभ्रहैः । ते मां पश्येयुरव्यक्तं तपसा दग्धकिल्बिषाः ३६ ये च मामभिरोहेयुर्नरा धर्मपथे स्थिताः । तेऽपि स्वर्गजितः स्वर्गे पश्येयुर्मां गतक्लमाः ३७ पश्चैव पर्वतः प्रांशुर्मेरुपृष्ठे व्यवस्थितः । पुनरारुह्य युद्ध्येयुः प्राणत्यागेषु निर्मलाः ३८ अप्सरोभिः समाकाम्य विचरेयुर्मनोजवाः । नन्दनं वनमासाद्य काम्यकं च महद्वनम् ३९ इमां विद्यां समास्थाय मद्भक्ताः पुष्करेष्विह । शरीरं क्षपयिष्यन्ति व्रतैर्बहुविधैः कृतैः ४० सिद्धिं प्राप्य कमेयुस्ते कामैर्बहुविधैर्नराः । इमं लोकममुं चैव संपतेयुर्यथासुखम् ४१ गौरीसिद्धेति विख्याता त्रिषु लोकेषु विश्रुता । प्रभावं तपसो वृत्तं दर्शयन्ति समाहिताः ४२ षण्णां ज्ञानाभिसंधीनामभिज्ञानात्ससंग्रहाः । भवेयुस्ते निरारंभा धातुनिर्मुक्तबन्धनाः ४३ सहस्रगुणमप्यत्र दत्त्वा दानफलादिव । अविमानेन विप्राणां मनःशुद्धेन कर्मणा ४४ सर्वत्रैवाप्रमेयेण अत्यन्तं फलमाप्नुयुः । अमुष्मिँल्लोके धर्मज्ञाः सह सर्वे कुलोद्भवैः ४५ येषामिह च सान्निध्यं यज्ञे ब्राह्मणसंकुले । ते भूयो यजमानाद्या अभिषिच्य पुनः पुनः ४६ तथा तां

---

अशा मला मनानें जाणणार नाहीं. कारण, प्रायः सर्व जन अनेक अर्थवादोक्त फलाकरितां प्रयत्न करणारे असतात. ( निष्काम कर्म करणारे फारच विरळा. ) ३५. जे स्वेच्छेनें घेतलेल्या रामकृष्णादि शरीरांनीं उपलक्षित असलेल्या विष्णूचें प्रणवादि नामोच्चारानें स्मरण करितात ते तपाच्या योगानें निष्पाप झालेले संत व्यक्ताच्या द्वारां मज अव्यक्ताला पाहूं शकतात ३६. जे धर्ममार्गामध्यें स्थित असलेले जन उक्त क्रमानें मज निर्गुणास जाणतात तेही स्वर्गास जिंकणारे खेदरहित होऊन स्वर्गांत मला पहातात ३७. भुंवयांच्या मध्यभागीं ( ह्मणजेच मेरुपृष्ठावर ) उंच पर्वत ( समष्ट्यहंकार ) आहे. त्यावर आरोहण करून इंद्रियांचा लय केल्यामुळें निर्मल झालेले साधक दुष्ट चित्तवृत्तीशीं युद्ध करतात ३८. त्यानंतर मनाप्रमाणें ज्यांचा वेग आहे, असे ते नंदन व काम्यक नांवाच्या मोठ्या वनास प्राप्त होऊन अप्सरांसमवर्तमान संचार करितात ३९. या योगविद्येचा आश्रय करून या पुष्कर क्षेत्रामध्यें माझे भक्त आचरिलेल्या नानाप्रकारच्या व्रतांनीं शरीर क्षीण करतील ४० व नंतर ते नर सिद्धीस प्राप्त होऊन नानाप्रकारच्या विषयांचा भोग घेत इहलोकीं व परलोकीं मोठ्या सुखानें विहार करतील ४१. जेव्हां अशा प्रकारचा, तपामुळें प्राप्त झालेला प्रभाव योगी दाखवितात तेव्हां शास्त्राचार्योपदेशजन्य ज्ञानानें संपन्न झालेले ते त्रिभुवनामध्यें ब्रह्मविद्यासिद्ध झाले आहेत अशी त्यांची ख्याति होते ४२. बाह्य व आभ्यंतर कर्मांग, दोन भगवन्मूर्तिरूप प्रतीकें, विराट्, सूत्रात्मा व अंतर्यामी अशा सहा ज्ञानाभिसंधींच्या साक्षात्कारामुळें संग्रह झालेले ( ह्मणजे ज्यांचें योगैश्वर्य क्षीण झालेले नाहीं असे ) व ह्मणूनच सर्व कर्मशून्य असे ते ज्यांनीं शरीररूपी बंधन तोडून सोडलें आहे असे होतात ४३. ज्याप्रमाणें यालोकीं एकदा अपराधी राजाला सहस्रपटही दंड देऊन त्या दानापासून उद्भवलेल्या राजप्रीतीनें मुक्त होतो त्याप्रमाणें ब्राह्मणांचा सन्मान, शुद्धचित्त व शुद्ध दानकर्म यांच्या योगानें साधक मुक्त होतो ४४. सर्वत्र असंकुचित वृत्ति ठेवल्यानें धर्मज्ञांस सर्व वंशजांसह परलोकीं अत्यंतिक दुःखपरिहाररूपी फल परमेश्वराच्या अनुग्रहानें मिळतें ४५. ब्राह्मणांनीं परिपूर्ण असलेल्या या यज्ञामध्यें ज्या यजमान—ऋत्विजादिकांचें सान्निध्य असतें ( देवतादिकांच्या ठायीं चित्तैकाग्र्य होतें ) त्यांनाही वारंवार अवभृथ स्नानादि प्राप्त होऊन पूर्वोक्त फळ

मन्यसे गौरीं मनसा धर्मचारिणीम् । अनुग्रहाय भूतानां तन्मयाग्रे तपोधने ४७ सत्य एष परोऽविद्ये भविता नात्र संशयः । नाफलो विद्यते धर्मश्चरितो धर्मचारिणा ॥४८॥ [ १६१ ]
इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि सप्तविंशतितमोऽध्यायः ॥ २७ ॥

वैशंपायन उवाच ॥ दिशं जिगमिषुर्दिव्यामुत्तरां सत्यसाधनः । तथा स धातुनिचये पुण्ये पर्वतरोधसि १ विष्णुः परमधर्मात्मा एकपादेन तिष्ठति । दशवर्षसहस्राणि पुष्करे पुष्करेक्षणः २ आत्मन्यात्मानमाधाय तपसा ब्रह्मसंभवः । घटते कर्मणाग्रेण लोकमुत्थापकारणात् ३ भासुरो भस्मनाच्छाद्य गात्राणि स्वयमात्मनः । अष्टौ वर्षसहस्राणि सहस्रं च तपोधनः ४ तेजसा तेन ज्योतींषि विभाव्य ब्राह्मणर्षभः । तिष्ठते नभसो मध्ये योगात्मा भावयन् जगत् ५ सोमो विषयमाक्षिप्य मनसा धारयन्मनः । युक्तः परमधर्मात्मा ब्राह्मीं सिद्धिमुपागतः ६ संप्रदृश्यत सर्वत्र दिवि भुव्यन्तरे तथा । ज्योतिष्णु कर्म कुर्वाणो बहुरूपः ससंपदा ७ महेश्वरोऽतिगूढात्मा वृषरूपेण तिष्ठति । उद्धृत्य दक्षिणं पादं वायुभक्षः समाहितः ८ अष्टौ वर्षसहस्राणि सहस्रशतमेव च । महायोगी महादेवो नियमाद्ब्रह्मसंभवः ९

---

मिळतें ४६. हे राजन्, ज्याप्रमाणें दानयज्ञामध्यें संपत्ति मिळते त्याप्रमाणें ती पूर्वोक्त गौरीसंज्ञक ब्रह्मविद्यासंपत तपोधनाच्या अग्रभागीं असेल म्हणून जर तूं समजत असशील तर तसें मात्र समजूं नको. ती गौरी भूतांवर अनुग्रह करण्याकरितां मनानें धर्माचरण करणारी आहे. ( वास्तव, बाह्य दान–यज्ञादिकांनीं साध्य असलेली बाह्य संपत्ति परिमित असते. पण ही ब्रह्मविद्यासंपत मानस असल्यामुळें अनंत आहे. ) ४७. ब्रह्मविद्येमुळें प्राप्त होणारा हा अबाधित आत्मा अविद्यावान् पुरुषापासून दूर होतो, यांत संशय नाहीं. पण धार्मिक पुरुषानें आचरिलेला धर्म कधींही निष्फळ होत नाहीं. ( वास्तव, विवेकरितां धर्मानुष्ठान अवश्य करावें ) ४८. इति श्रीम० खि० हरि० भविष्यपर्वाचा सत्ताविसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २७ ॥

वैशंपायनः—दिव्य उत्तर दिशेस ( मोक्षाख्य पराकाष्ठेस ) जाण्याची इच्छा करणारा, सत्यसाधन, परमधर्मात्मा कमलनयन विष्णु आकाशादि धातूंच्या समुदायरूप शरीरांत नासिकामूलामध्यें ( ह्म० पुण्य पर्वताच्या तटावर ) पुष्करक्षेत्रांत ( हृदयाकाशांत ) दहा सहस्र वर्षें एका पायावर ( तुर्यरूपानें ) उभा राहिला १, २. शुद्धात्म्यामध्यें मायोपाधि शरीरास लीन करून तपाच्या योगानें व उग्रकर्मानें लोकांचा उद्धार व्हावा या हेतूनें तो ब्रह्मोद्भव देव यत्न करतो ३. प्रकाशमान होणारा सोम स्वतः भस्मानें आपलें अंग आच्छादित करून तप हेंच ज्याचें धन आहे असा तो ब्राह्मणश्रेष्ठ व योगात्मा देव नऊ सहस्र वर्षें त्या आपल्या प्रसिद्ध तेजानें ग्रह–तारादि ज्योतींना प्रकाशित करीत व सर्व जगावर उपकार करीत आकाशांत रहातो. तो परम धर्मात्मा योगी शब्दादि विषयांस मनानें सोडून व मनाचा निग्रह करून ब्राह्मी सिद्धीस प्राप्त झाला आहे ४,६. नाना औषधींमध्यें प्रवेश करून नाना रसत्वास प्राप्त झालेला असा तो आकाशांत व तसाच भूलोकीं प्रकाशन क्रिया करीत असतांना सर्वत्र दृष्टीं पडतो ७. ज्याचें स्वरूप अति गूढ आहे, असा महेश्वर वृषभरूपानें वायुभक्षण करीत शांतचित्तानें उजवा पाय उचलून उभा रहातो. ( अहिंसाप्रधान निष्काम कर्म व सकाम कर्म हे धर्माचे उजवे दान पाय व हिंसाप्रधान यज्ञादिरूप सकाम व निष्काम कर्म हे डावे दोन पाय. त्यांतील वृषभरूप महेश्वर निष्काम जपादि कर्मरूप उजवा पाय उचलून म्हणजे

अथ वायुर्घनीभूतो अन्ते चरति गोपतेः । फेनीभूतं समुद्गारैः पवनं निर्गिरन्मुखात् १०
सनिष्क्रान्तस्ततो वक्त्रात्प्राणेन परमात्मवान् । निर्यासभूतो पतितो नैवार्द्रो नैव पार्थिवः ११
सफेनो वारिणा विश्य चचार वसुधातले । नैवार्द्रो नैव शुष्काङ्गो वायुसंघातमागतः १२
तत्कालं फेनमुत्क्षिप्य पवनः सह वारिणा । निरालंबे निरालंबस्त्वभ्राणि समपद्यत १३ ते
क्षिपन्ति पयो भूमावात्मानं स्वेन घट्टिताः । नीलमेघारुणपङ्क्त्या नैवार्द्रो नैवपार्थिवः १४
ब्राह्मीं मूर्तिं समाधाय वायुः सर्वत्रगो वशी । समाः सहस्रं संपूर्णं चचार विपुलं तपः १५
वह्निर्बहुजटी भूत्वा चीरवल्कलवासभृत् । तपस्तप्यदनाहारो मौनमास्थाय पौष्करे १६
वर्षाणां च सहस्राणि त्रीणि चैकं च यत्नतः । तस्याग्नेस्तेजसंभूतो महानग्निः प्रवर्तते १७
स्वर्गप्रकाशं कृत्वा च स्वर्गवासी तमोनुदः । दिवि भूतप्रकाशाख्यस्तपसा ब्रह्मसंभवः १८
तत्तमो भुवि राजेन्द्र मानुषेषु प्रतिष्ठितम् । भास्करस्तेजसंहारस्ततो भवति सत्तमः १९
मर्त्यानां सर्वभूतानां तेज आक्षिप्य वर्तते । न तु योगबले राजन् ब्राह्मणस्य विशेषतः २०
तत्तमो नाशयेद्राशौ नाप्यह्नो भवितात्ययम् । पुष्पमिश्रो महातेजा यक्षः सर्वत्रगो वशी ।

---

जपादि परायण होऊन राहतो ) ८. तो ब्रह्मसंभव महायोगी महेश्वर नियमानें नऊ सहस्र वर्षें याप्रमाणें तप करता झाला ९. नंतर घन झालेला वायु त्या गोपतीच्या शरीरांत संचार करूं लागला. तेव्हां तो बैल फेनरूप झालेल्या वायूला तोंडानें बाहेर सोडूं लागला १०. तेव्हां उद्गारवायूबरोबर तोंडातून बाहेर पडलेला तो फेंस विलक्षण रूपांतरास प्राप्त झाला. वृक्षाच्या अंगांतून बाहेर येणाऱ्या डिंकाप्रमाणें तो खालीं पडला. तो फारसा आर्द्र नव्हता व शुष्कही नव्हता ११. ज्यांत पाणी शिरलें आहे असा तो फेंस चामड्याच्या म्यानाच्या आकाराचा होऊन पृथ्वी हें ज्याचें तल आहे अशा अंतरिक्षांत फिरूं लागला. वायूशीं ज्याचा संसर्ग झाला आहे असा तो आर्द्र किंवा शुष्कही नव्हता १२. पुढें तोच वायु तत्काळ जलासह त्या फेंसाला उडवून निराधार आकाशांत निराधार राहून जलास धारण करणारा मेघ झाला. ( ह्म० त्या वायूलाच मेघ ही संज्ञा प्राप्त झाली ) १३. नंतर ते मेघ जलरूप अशा आपल्याला गारेप्रमाणें घनरूपत्वास प्राप्त करून नीलमेघाकार होतात, व भूमीवर जलसेक करितात. पण ते त्यावेळीं आपलें घन झालेलें जल सूर्याकडून वितळविलें जात आहे असें दाखवितात १४. असो; ब्राह्मणशरीर धारण करून सर्वत्र गमन करणारा व स्वतंत्र वायु संपूर्ण सहस्र वर्षें विपुल तप करता झाला १५. अग्निही विपुल जटा धारण करून, लंगोटी व वल्कलें धारण करून, मौन धरून, कांहीं आहार न करितां पुष्करतीर्थाचे ठायीं तप करूं लागला १६. त्यानें याप्रमाणें चार सहस्र वर्षें मोठ्या यत्नानें तप केलें. तेव्हां त्या अग्नीच्या तेजापासून उत्पन्न झालेला मोठा अग्नि प्रवृत्त झाला १७. तो स्वर्गांत रहाणारा अग्नि स्वर्गाला प्रकाशरूप करून अंधकाराला नाहींसें करितो. तपाच्या योगानें ब्रह्मोद्भव असा तो अंतरिक्षांत भूतप्रकाश नांवाचा अग्नि होतो. ( तेंच तेजनामक तिसरें महाभूत होय ) १७,१८. राजन्, त्यानें स्वर्गांतून घालविलेला अंधकार भूलोकीं मानवामध्यें प्रतिष्ठित झाला. ह्मणून अग्निप्रभृति तेजांचा उपसंहार करणारा सर्वोत्तम सूर्य उत्पन्न होतो १९. तो सर्व मरणधर्मवान् भूतांच्या तेजांचें आहरण करतो. पण हे राजन्, ज्याच्यामध्यें योगबल असतें त्याचें व विशेषतः ब्राह्मणाचें तेज तो हरण करीत नाहीं २०. तो पूर्वोक्त गुणवान् सूर्य ( चंद्ररूपानें ) पूर्वोक्त तमाचा

तपश्चरति धर्मात्मा पुष्करेषु समाहितः २१ महेन्द्रशिखराद्धारा यावन्त्यो यान्ति मेदिनीम् । तावन्त्वरूपमास्थाय तिष्ठते निखिलाः समाः २२ जानुभ्यां पतितो भूमौ ज्योतिर्नभसि पश्यति । समाः सहस्रं निखिलं नेत्रैरनिमिषैर्जगत् २३ नेत्राणि बहुधा तस्य नेत्रान्तैरभिनिःसृताः । मध्ये दिनकरे प्राप्ते रश्मिवाग्रस्तपरिग्रहे २४ ते रश्मयः प्रभानेत्रैः शतशोऽथ सहस्रशः । रराज तेजः संयोगाद्विद्वद्भिरिव पावकः २५ स विस्फुलिंगैर्नेत्रान्तैरादित्यमनुवर्तते । कर्मण्यन्ते युगान्ते वा जगतो बहुरूपिणः २६ बहुतापः पुनर्भूत्वा विषण्णो वसुधातले । समो रहितस्तु संपूर्णंस्तपस्तेपे सुदारुणम् २७ निगृहीतेन्द्रियो भूत्वा अप्सरोभिर्ललाम ह । मेरोः शिखरमासाद्य कामं कामेन निर्वमन् २८ तपः कामः स यक्षस्तु कुबेरो नरवाहनः । विष्णुरेव तपोध्यक्षस्तेजसोन्ते विजृंभति २९ न हि कश्चित्पुमानस्ति य एवं तप आचरेत् । त्रिषु लोकेषु राजेन्द्र ऋते विष्णुं सनातनम् ३० वासुकिर्बहुशिर्षस्तु नागेन्द्रो मौनमास्थितः । तप आचरते सम्यङ्निधाय मनसा मनः ३१ शेषः सत्यधृतिर्नागो बलवान् ब्रह्मसंभवः । वृक्षमारुह्य धर्मात्मा अवाक्शिर्षोऽवलंबते ३२ जिह्वाभिर्लेलिहानाभिर्गात्रजं विषमुत्सृजन् । समाः सहस्रं संपूर्णं निराहारस्तपोधनः ३३ कालकूटं विषं तद्धि सुमहत्समपद्यत । येन लोको ह्यभिग्रस्तो न सुखं विन्दते नृप ३४ सर्वबानुमतं तीक्ष्णं भुजं गेषु महीपते । जंगमं

---

रात्रींही नाश करतो. व स्वरूपानें दिवसाही त्याला प्रादुर्भूत होऊं देत नाहीं महातेजस्वी, सर्वगामी, स्वतंत्र व धार्मिक पुष्पमित्र यक्ष शांतचित्त होऊन पुष्करांत तप करतो २१. महेंद्र पर्वताच्या शिखरावरून जितक्या धारा पृथ्वीवर पडतात तितकीं म्हणजे असंख्य वर्षें तो यक्ष शरीरयुक्त होऊन प्रकाशमान् होतो २२ गुडघे टेंकून भूमीवर पडून तो नमस्कारप्रिय सूर्याची आराधना करतो. आकाशांतील ज्योतीला पहातो. एकसारखीं सहस्रवर्षें तो निमिषरहित नेत्रांनीं सर्व जग पहातो २३. त्याचे अनेक नेत्र नेत्रप्रांतांतून निघालेले आहेत. तो दिनकर परिवेषाप्रमाणें किरणवान् असून मध्यभागीं आदर्श ( आरशाच्या )तळाप्रमाणें आहे. ( यास्तव त्याच्यामध्यें नेत्रप्रांतांनीं प्राप्त झाला असतां उपासकही तसाच होतो ) २४. यज्ञामध्यें अग्नि जसा विद्वानांच्या योगानें शोभतो त्याप्रमाणें प्रभानेत्रांच्या योगानें ते शेंकडों व हजारों किरण तेजःसंयोगामुळें शोभतात २५. तो प्रारब्धकर्माचा क्षय झाला असतां किंवा बहुरूपी जगाचा युगान्त झाला असतां विस्फुलिंगयुक्त नेत्रप्रांतांनीं आदित्यास प्राप्त होतो २६. नंतर सर्व आदित्य–मंडलास व्यापून रहाणारा व त्यामुळेंच ज्याचा ताप वाढला आहे असा तो पृथ्वीतलावर बसून हजारों वर्षें अतिदारुण तप करतो २७. इंद्रियांचा निग्रह करून व मेरूच्या शिखरांवर जाऊन तो अप्सरांशीं रममाण होतो. तो भोगांच्या योगानेंच कामाचा त्याग करतो २८. जो तपाची इच्छा करणारा यक्ष तोच कुबेर झाला. तपाचा अध्यक्ष विष्णु व तपाच्या शेवटीं कुबेररूपानें व्यक्त होतो २९. कारण हे राजन्, सनातन विष्णुवाचून असें तप करणारा दुसरा कोणीही पुरुष त्रिभुवनांत नाहीं ३०. अनेक मस्तकांनीं युक्त असलेला वासुकि नागेंद्र मौन धारण करून व निश्चयानें मन ब्रह्मामध्यें स्थिर करून चांगलें तप करतो ३१. सत्य धैर्यवान् शेष नाग बलवान् व ब्रह्मसंभव आहे. पण तो धर्मात्मा तपोधन वृक्षावर आरोहण करून व मस्तक खालीं करून ओठांवरून फिरणाऱ्या जिह्वांनीं शरीरजन्य विषाचा त्याग करीत संपूर्ण सहस्र वर्षें कांहीं न खातां धूम्रपान करतो ३२,३३. तें विषच अति भयंकर

स्थावरं चैव सर्वत्रानुगतं विषम् ३५ परस्परविवृद्धेन हिंसा युक्तेन भारत । नाशयत्यात्मभोगानि तेन तीक्ष्णेन भारत ३६ अथ ब्रह्मा महाभागो भूतानां हितकाम्यया । मंत्रं विसृजते राजन् ब्रह्माक्षरमहिंसकम् ३७ गरुत्मान्वितर्तैः पक्षैर्नखाग्रैः सलिलं महीम् । समाः सहस्रं सपूर्णं चूडाग्रेणावलंबिना ३८ पर्णभारैश्च विकचैर्विस्तीर्णैर्वसुधातले । रराज वसुधा चैव पर्णैर्बहुविचित्रितैः ३९ येन वृत्तेन जीवेयुः सर्वभूतानि भारत । इह लोके मनुष्येन्द्र देवलोके च भारत । यौरिवाचितनक्षत्रा महीतलविहारिभिः ४० हिमवान् हिमसंपाते भवत्येकं चरो वशी । पुष्करांभसि धर्मात्मा मत्स्यो लिखितमूर्धजः ४१ अथ सुतलमाक्रम्य पृथिवी प्रांशुदेहिनी । तपश्चरति धर्मात्मा बाहुमुद्यम्य दक्षिणम् ४२ साग्रं वर्षसहस्रं च शतमकं च सुव्रत । तपश्चरति संयोगाद्वायुभक्षो समाहितः ४३ समाधियोगात्संगाद्वा ब्रह्मयोगस्य भारत । येनेयं पृथिवी राजन् धार्यते ब्रह्मयोनिना ४४ अनाद्यन्तेन नित्येन सर्वत्र विषयैषिणा । योऽसौ विष्णुरगाधात्मा परमात्मा निराकृतिः ४५ दिने निषण्णो भवति रात्रौ भवति वै

---

कालकूट विष झालें आहे. हे राजा, त्याच्या योगानें ग्रासलेल्या लोकांना सुख मिळत नाहीं ३४. हे पृथ्वीपते, सर्व भुजंगांच्या ठिकाणीं तेंच तीक्ष्ण विष राहिलें आहे. स्थावर व जंगम विष सर्वत्र अनुगत आहे ३५. हे भारता, एकमेकापासून वाढलेल्या व हिंसायुक्त अशा त्या विषाच्या योगानें तो आपल्याच अंगांचा नाश करतो. ( सारांश, तामस तप परस्परांचा प्राण घेणाऱ्या तामसरूपानें परिणाम पावतें. पण अशाप्रकारचें हिंसक विष उत्पन्न झाल्यावर त्याच्या प्रतीकाराकरितां ) भूतांच्या हिताच्या इच्छेनें महाभाग ब्रह्मा विषघ्न वेदाक्षरमय मंत्र उत्पन्न करतो ३६,३७ ( त्याच मंत्राचा पुढच्या दोन श्लोकांत निर्देश करितात. ) गरुड आपले विस्तृत पंख व नखाग्रें यांच्या योगानें माझ्या जीवनभूत जलाचें व पृथ्वीचें संपूर्ण सहस्र वर्षें, त्यांस चूडाग्रावर धारण करून रक्षण करो ३८. विकास पावलेल्या पाकळ्यांच्या भारांनीं विस्तीर्ण व अनेक प्रकारें विचित्रित अशा पानांनीं भूपृष्ठीं पृथ्वी शोभूं लागली आहे. असें योग्यांस दिसतें. ( पृथ्वी व शरीर शोभतें. जो सर्वांच्या शरीरांत सर्वात्मरूपानें शोभतो व ज्याच्या योगानें शरीर शोभतें तोच गरुड असून त्याच्या पसरलेल्या व वाढणाऱ्या पंखांनीं म्हणजे इंद्रियांनीं शरीररूपी पृथ्वी शोभते. यास्तव, त्याच्या अनुग्रहानें विषाचा नाश होवो. असा याचा भावार्थ. ) ३९. हे मनुजेंद्रा भारता, या लोकीं व देवलोकीं ज्या आचरणाच्या योगानें सर्व भूतें जिवंत रहातात व ज्याच्यायोगानें भूतलीं संचार करणाऱ्या भूतांच्या योगानें पृथ्वी ( शरीर ) नक्षत्रांनीं व्यापलेल्या अंतरिक्षाप्रमाणें दिसते तें आचरण अथवा त्या मंत्राचा जप करावा ४०. हिम पडून प्रळय झाला असतां तो जितेंद्रिय हिमालय एकटाच संचार करतो. तो धर्मात्मा पुष्कर जलामध्यें ज्याचे केंस वर दिसत आहेत अशा माशाप्रमाणें तरंगत रहातो. ( येथें पुष्कर जल म्ह० निर्विशेष चैतन्य व हिमवान् म्ह० जीवात्मा ) ४१. त्यानंतर उंच आकाराची पृथ्वी सुतलाचें आक्रमण करून राहते. तो धर्मात्मा उजवा हात वर करून तप करतो ४२. हे सुव्रत राजा, तो शांत चित्त होऊन साग्र एक सहस्र व एकशें वर्षें वायुभक्षण करीत उत्तम योगानें तप करतो ४३. हे भारता, समाधियोगामुळें किंवा ब्रह्मयोगाच्या आसक्तीनें त्या ब्रह्मयोनी पुरुषाकडून ही पृथ्वी धारण केली जाते ४४. तो पुरुष आदि-अंतशून्य, नित्य व सर्वत्र विषयांची इच्छा करणारा आहे. हा जो विष्णु

स्थिरः । सत्यसन्धः स धर्मात्मा कामकारकरो भवेत् ४६ तस्य यः सोद्यतः पाणिः पृथिव्यां पृथिवीसमः । रात्रौ तपनो भवति मण्डलं विपुलं नभः ४७ स चन्द्रविषयं राजन्छमयामास रुन्धति । ग्रहाणां गतयश्चैव ताराणां च विशेषतः ४८ तां छायामाक्षिपन्सोमात्स्रवद्भिर्मण्डलेन वै । पृथिव्यां दक्षिणो हस्तो महायोगी महामनाः ४९ सैषा छाया शशीभूना शशिमण्डलमाविशत् । अलिंगा पृथ्वीलिंगादद्भुतादक्षया दिवि ५० अंगांगान्युपसंहृत्य तपश्चरति निश्चयात् । प्रोक्ष्य पादौ तु सततं पृथिवी तपसि स्थिता ५१ सूर्याविभिः पीयमानादाक्षिप्यत मही ततः महीसलिलवसनां युगांते विष्णुतेजसा ५२ रराज सूर्यरश्मिभिर्ध्वतिविक्तामहानदी । स्फाटिकेव शुभा सैषा कांचनैर्धातुभिर्वृता ५३ आदित्येन समादत्ता रश्मितेजोभिसंभवैः । मण्डलान्तर्गता देवी चक्षुषा नोपलभ्यते ५४ रश्मिभिः पुनरुत्तीर्णा ततो योगेन धावति । आकाशगंगा सा वृत्ता विपुलैरंबुविग्रहैः ५५ शीतच्छायैश्च तरुभिर्लताभिश्च सुगन्धिभिः । पद्मषण्डैश्च विविधैः कुसुमैः दिव्यगंन्धिभिः ५६ कांचनाभीरुजघना स्फाटिकान्तरमेखला । पद्मरेणुसिता पीता चक्रवाकावतं-

---

तोच आगाधरूपी परमात्मा असून तो वस्तुतः निराकार आहे ४५. तो दिवसां ( म्ह. विद्येमध्यें ) स्थित आहे. ( तो केवल विद्येनेंच लभ्य आहे. ) व रात्रीं ( अविद्येमध्यें ) स्थिर आहे. तो धर्मात्मा सत्यप्रतिज्ञ आहे तो केवल लीलेनेंच सृष्ट्यादिकार्यें करतो ४६. त्या विष्णूचा जो हा वर उचललेला पृथ्वींतील पृथ्वीसारखा हात ( भक्तांचा उद्धार करणारा धर्म ) तो रात्रीं ( अविद्यावस्थेंत ) तपन ( सूर्य, विवेक देणारा ) होतो. त्याच्या योगानेंच विपुल मंडल ( चंद्र ) व आकाश होतें. ( भोग व मोक्ष धर्माच्या अधीन आहेत ) ४७. हे राजन्, तो धर्म चंद्राचा ( मनोविषय रागादिकांचा ) नाश करतो. ग्रहांच्या व विशेषतः तारांच्या ( इंद्रियांच्या ) गतींना प्रतिबंध करतो ४८. सोमापासून स्रवणाऱ्या गंगाप्रवाहाच्या योगानें व चंद्रमंडलामध्यें धारणा केल्यानें अविद्येला शिथिल करीत तो पृथ्वीमध्यें उचललेला हात ( धर्म ) साधक महायोगी होईल, अशाप्रकारची चित्तशुद्धि देणारा होतो ४९. तीही रात्रिरूपी छाया अनिर्वचनीय असल्यामुळें तत्त्वज्ञान करून देणाऱ्या प्रमाणांनीं रहित असून अद्भुत पृथ्वीस ( म्हणजे शरीरास ) प्राप्त होऊन चित्तैकाग्र्यामुळें चंद्ररूप होऊन चंद्रमंडलांत प्रवेश करते. ती आकाशांत असणारी अविद्या स्वरूपतः मिथ्या असल्यामुळें क्षयशून्य आहे ५०. सर्व अंगांचा उपसंहार करून, सतत पादप्रोक्षण करून ( म्ह तीर्थस्नानादिकही करून ) पृथ्वी तपामध्यें स्थित होऊन निश्चयानें तप करते ५१. सूर्यकिरणांकडून प्याल्या जाणाऱ्या जलांतून काढून पृथ्वी सूर्यासमीप नेली गेली. युगांतसमयीं विष्णूच्या तेजानें जल हेंच जिचें वस्त्र आहे अशी पृथ्वी ज्याप्रमाणें विष्णुवश होते त्याप्रमाणें ती सूर्यरूप झाली ५२. पण पुढें ती भूमि सूर्यकिरणांशीं संबद्ध होऊन महानदी झाली. सौवर्ण धातूंनीं युक्त असलेली ती स्फटिकाप्रमाणें शुभ्र होती ५३. किरणांच्या तेजापासून उत्पन्न झालेली ती जणुं काय सूर्यानें दिल्यासारखीच होती. पण मंडलामध्यें अंतर्भूत झालेली ती देवी नुसत्या डोळ्यांनीं उपलब्ध होत नाहीं ५४. नंतर किरणांनीं जिला द्रवरूप करून पुनः सोडलें आहे अशी ती योगसामर्थ्यानें पुनः धावूं लागली आहे. विपुल जलाकारानें ती आकाशगंगा झाली ५५. ती शीतलछायायुक्त वृक्षांनीं, सुगंधयुक्त लतांनीं व दिव्यगंधयुक्त

सिका ५७ नीलगर्भेक्षुकेशान्ता पुष्पसंश्रयसंकुला । शोभते विप्रसर्पन्ती प्रमदेव विभूषिता ५८ सैषा गंगा कलं लेभे पुष्करेण समाहिता । सुतपा चंद्रविहिता लोकानां धारणे रता ५९ सरस्वतीस्वरैर्व्यक्तैरधीते ब्रह्मवादिनी । पृष्ठात्प्रयाता शैलेन्द्रे मंदरे मन्दगामिनी ६० ऋङ्मयांश्चतुरो वेदान्पादैश्चतुर्भिरावृतान् । यजुर्भिः सामभिश्चैव ग्रथिताञ्छिक्षया तथा ६१ ऋषिभिर्ज्वलनप्रख्यैस्तपसा दग्धकिल्बिषैः । सुपार्श्वस्य गिरेः पादे परिदायैः सुपारणैः ६२ निःस्वनं सर्वभूतानि इन्द्रियैश्च न शृण्वते । मन्दराग्रे विसर्पन्तं जगत्कृत्स्नमतीन्द्रियम् ६३ विरामनियमे प्राप्ते तूष्णीं भूता बभूव ह । न वाचमीरयेद्देवी नियमात्सत्यवादिनी ६४ अथ भूतानि सर्वाणि तूष्णीं भूतानि सर्वशः । न शेकुरभिधानार्थे व्याहर्तुं वदनैर्बलात् ६५ विभज्य योगं मनसा सर्वभूतेष्वनुग्रहम् । सरस्वती तीरयुता व्याजहार महास्वनम् ६६

---

नानाप्रकारच्या कमलांच्या समूहांनीं शोभत होती ५६. तिच्या कटिप्रदेशीं सोन्याचा पट्टा होता. तिच्या मेखलेमध्यें स्फटिकमण्याची योजना केली होती. कमलरेणूंनीं ती शुभ्र असूनही पिवळी झाली. चक्रवाक पक्षी हींच तिचीं कर्णादि भूषणें होतीं ५७. नीलकमलांच्या आंतील भाग हींच तिच्या रम्य केसांचीं अग्रें होतीं. व तिच्या प्रवाहांत उमललेलीं पुष्पें हींच तिच्या केंसांत घातलेलीं पुष्पें असून त्यांच्या योगानें ती आकुल होती. सारांश, याप्रमाणें वहात असतांना ती महानदी भूषित प्रमदेप्रमाणें शोभत असे ५८. तात्पर्य, लोकास धारण करण्यामध्यें रत असलेली पृथ्वी सुंदर तप करून पूर्वीं चंद्ररूप झाली; नंतर गंगात्वास प्राप्त झाली. त्यानंतर परमात्म्याशीं एकरूप होऊन तपाचें फल असें जें सर्वात्मत्व व पावनत्व त्यांस प्राप्त झाली ५९. ती सरस्वती होऊन व्यक्त स्वरांनीं वेदाध्ययन करते. ती सर्व इंद्रियदेवतांच्या निवासस्थानभूत मेरुपृष्ठावरून निघून मंदरपर्वतावर ( स्थूल प्रपंचाचे ठायीं ) मंद गमन करते ६०. चार पादांनीं आवृत झालेले ऋचांनीं पूर्ण असलेले, यजुर्मंत्र व सामें यांनीं व शिक्षेनें ग्रथित केलेले चार वेद ती म्हणते ६१. तपाच्या योगानें ज्यांचें पाप क्षीण झालें आहे अशा अग्नितुल्य, सर्वतः ज्ञानाख्य वित्त देणाऱ्या व शिष्यांचा उद्धार करणाऱ्या ऋषींसह सुपार्श्व पर्वताच्या पायथ्याशीं ती देवी अध्ययन करते ६२. पण सर्व भूतें सरस्वतीचें तत्त्वभूत असें हें नादब्रह्म निजकानीं ऐकत नाहींत. कारण तें अतींद्रिय आहे. ( मग त्याच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण काय ? म्हणून विचाराल तर सांगतों. ) स्थूल प्रपंचाच्या अग्रभागीं अति स्थूलरूपानें तें अनुभवास येतें. तें सर्व जगास व्यापतें. ( म्हणजे मानवांच्या तोंडांतून निघणारा जो वैखरी शब्द तेंच नादब्रह्म होय. पण तें सूक्ष्म असल्यामुळें अनुभवास येत नाहीं. तथापि तो सर्व वैखरीच्या आरंभीं अवश्य असतो. ) ६३. तुरीयसंज्ञक तत्त्वाच्या समीप येतांच ती मुकाट्यानें बसते. नियमपूर्वक सत्य भाषण करणारी ( ब्रह्मप्रतिपादिका ) देवी नियमानें वाणीचा उच्चार करीत नाहीं. कारण वाणीनें उच्चारिलेलें सर्व असत्य असतें असा नियम आहे ६४. त्याप्रमाणें सर्व भूतें सर्व प्रकारें सुषुप्तींत अथवा समाधींत तुर्यपदास प्राप्त झाल्यावर मूक होतात. ते बोलावयास अथवा बलात्कारानें तोंडांनीं शब्दोच्चार करावयासही समर्थ होत नाहींत ६५. पण सर्व भूतांवर अनुग्रह करण्यासाठीं सरस्वती मन या उपाधीच्या योगानें बिंब–प्रतिबिंबन्यायानें द्विधा विभाग करून तटस्थ ब्रह्माचा शाखाचंद्र न्यायानें उपदेश करूं लागते. ( म्हणजे ब्रह्माचा

सरस्वत्यासमायुक्तोशिक्षांगृह्णातिदेहिनः । तस्मिन्नेवाथतेसर्वेगानंगायंतिशिक्षया ६७
आदित्यावसवोरुद्रामरुतश्चाश्विभिःसह । जटिलाश्चीरवसनामुंजमेखलधारिणः ६८
गंधर्वाः किन्नराश्चैवमनागाःसहचाभसः । तपश्चरंति सहिताःपुष्करेषुमनीषिणः ६९
अपि कीटपतंगैश्च सह सर्वैः सरीसृपैः । शोषयन्ति शरीराणि तपसोग्रेण यत्नतः ७० विष्णु-र्विष्णुत्वमापन्नो देहान्तर विसृष्टवान् । संरक्षति महायोगी सर्वांस्तान्सहचारिणः ७१ पुष्कर रमते विष्णुर्विष्णुरेव द्विधा कृतः । दीप्यमानः स्वतेजोभिर्विधूम इव पावकः ७२ सोऽग्निर्मनः समुद्भूतः पृथिवीं तापयन्निव । प्रधावति समं तेन मण्डलं दशयोजनम् ७३ विरराजार्चिभिर्दीप्तैः पृष्ठतश्चावलंबिभिः । विशीर्णपार्थिविभवैर्मयूखैरिव दीपितः ७४ तस्याग्नेर्विस्फुलिंगानां न शेकुर्लंघने रताः । विप्रकीर्णस्य वसुधामर्यादामिव भास्करम् ७५ सोऽग्निर्दीप्य विभज्यांशून्विधूम इव पावकः । ऋत्विग्भिर्ज्वलनप्रख्यैर्विक्रीयत इवाध्वरे ७६ सोऽग्निर्धूमागतस्तत्र तिष्ठते विपुलं तदा । यावद्विष्णुः क्रमप्राप्तो नियमस्य समापनात् ७७ रक्षां कृत्वा

---

साक्षात् उपदेश करितां येणें जरी अशक्य असलें तरी लक्षणेनें बोध करितां येतो, असा याचा भावार्थ ) ६६. सरस्वतीसहवर्तमान प्राणी शिक्षेचें ग्रहण करितात. व त्या शब्दागम्य शबल ब्रह्मामध्यें स्थित होऊन शिक्षेप्रमाणें गायन करितात ६७. जटा, मुंजतृणाची मेखला, लंगोटी इत्यादि धारण करून आदित्य, वसू, रुद्र, अश्विनीकुमारांसह मरुत्, नागांसह गंधर्व, जलासह किन्नर इत्यादि सर्व विद्वान् मिळून पुष्करामध्यें तप करितात ६८,६९ सर्व सर्पांसह कीट—पतंगादिकांनाही बरोबर घेऊन मोठ्या यत्नानें ते उग्र तप करून शरीरांस सुकवितात ७०. विष्णुत्वास ( व्यापकत्वास ) प्राप्त झालेलाही विष्णु आपल्या व्यापक स्वरूपानें सृष्टीचें पालन करण्यास असमर्थ झाल्याकारणानें चतुर्भुज शरीर करितां झाला. त्याच्या योगानें तो यज्ञादिकांचा भोक्ता व सर्व भूतांचा नियंता झाला. त्याकारणानेंच तो महायोगी सर्व सहचरांचें संरक्षण करूं शकतो ७१. सर्व कार्यरूप जगामध्यें विष्णुच नर-नारायणादिरूप होऊन लोकशिक्षणार्थ तपादिरूप लीला करतो. तो द्विधा झालेला विष्णुच धूमरहित अग्नीप्रमाणें आपल्या तेजानें देदीप्यमान होतो ७२. तो विष्णु मनःकल्पित गार्हपत्यादि अग्निरूप होऊन पृथिवी हाच माझा देह आहे, असा अभिमान धारण करणाऱ्या पृथ्वीदेवतेस ( जीवात्म्यास ) सोन्याप्रमाणें निर्दोष करीत त्याच्याबरोबर दशयोजन मंडल दूर धावतो. धार्मिकाचा जीव लोकांतरीं जाऊं लागला म्हणजे हा विष्णुच स्वतः कर्म व त्याचें अंग एतद्रूप होऊन त्यास उचित गति देतो ७३. सर्व बाजूंनीं ग्रासणाऱ्या दीप्त व देहच मी आहें, असें म्हणून वाद करणाऱ्या वाद्यांच्या मोहसामर्थ्यास जाळणाऱ्या, ज्वालांनीं जणुंकाय किरणांनींच दीपित झालेला तो अग्नि अतिशय शोभित होतो ७४. प्राकृत जन पृथिवीला मर्यादित करणाऱ्या सूर्याचें जसें उल्लंघन करूं शकत नाहींत त्याप्रमाणें पसरलेल्या विष्णुरूपी अग्नीच्या किटाळांना विषयासक्त लोक उल्लंघन करूं शकले नाहींत ७५. तो अग्नि विपुल प्रकाश करून व आपल्या किरणांस द्रव्य, देवता इत्यादिरूपानें अनेक प्रकारें वाढवून धूमरहित अग्नीप्रमाणें होऊन रहातो. नंतर यज्ञामध्यें अग्नीसारख्या तेजस्वी ऋत्विजांकडून त्या सोमरूपी भगवानाचा नानाप्रकारें जणुं काय विक्रय केला जातो ७६. यज्ञ समाप्त होईतों तो धूमरहित अग्नि द्रव्य—देवतादिरूपानें प्रकाशित होतो. तोच अग्नि फलरूपानें पृथिवी, अंतरिक्ष, व द्युलोक

स्थितं विद्याद्विष्णुर्विष्णुपराक्रमः। भूत्वा शतशरीरो वै नागो बालाहकोऽभवत् ७८ तमाग्नि-मात्मसंसृष्टं लेलिहानं महामतिम्। प्रतिप्रवृत्तं तेजोभिर्भूतानां हितकाम्यया ७९ वारिणा सुखशीतेन प्राणिनां प्राणवर्धनः। न्यषिंचद्दहनं तत्र नागो बालाहकस्तदा ८० ततः सिद्धगणैर्जुष्टः पुष्करे तप्यते तपः। संहृत्य मनसात्मानं महायोगी महाबलः ८१ पादगात्राणि संहृत्य मनो मूर्ध्नि विधारयन्। अचलं स्थानमासाद्य तूष्णीं भूतो बभूव ह ८२ एष धर्मो हि धर्माणां लोपधानविकल्पितः। हितः सर्वेषु भूतेषु इह चामुत्र चोभयोः ८३ अथ दैत्या हतास्तत्र समागम्योद्धतायुधाः। मायाप्राप्तैर्बहुविधैर्नगरैरभिसंवृताः ८४ अग्निं दैत्याः पर्वताग्रैरभि-घ्नन्ति परंतप। ज्वलन्तं ज्वलनप्रख्या महाकाया महाबलाः ८५ मेघीभूताश्च मायाभिर्वर्षन्ति बलदर्पिताः। तस्मिन्संघाभिसंघाते ससंघातं महाबलम् ८६ ते शैलास्त्वर्चिषा दग्धाः शतशोऽथ सहस्रशः। युगान्ते प्रभुरादित्यः प्रजा इव दिधक्षति ८७ न शेकुरग्निं दैत्यास्ते मायाभिमुख-मुद्यतम्। आदित्यमिव दीप्यन्तं नभः सूर्योदये यथा ८८ विहितैरुद्यमैः सर्वैर्दैत्या भग्नपरा-क्रमाः। गन्धमादनमासाद्य निषण्णा नगमूर्धनि ८९ स चाग्निर्वैष्णवैर्लोकैर्विद्युद्भिः सह संगतः। अन्तरिक्षचरान्दैत्यान्निर्दहन्विचरन्दिवि ९० नागो बालाहकश्चैव मेघसंघातसागतः।

---

क्षेत्रपर्यंत गेलेला आहे. ( सर्व लोकहितार्थी विष्णु सर्व क्रतु, त्यांचीं अंगें, व त्याच्या फल-रूप होता ) ७७. त्याच सर्वांचें रक्षण करून स्थित असलेल्या विष्णूला विष्णूसारख्या पराक्रमी साधकानें जाणावें. तो व्यापी देव योगानें शतशरीर होऊन मेघांचा भेद करणारा ऐरावत हत्ती होतो ७८. त्या विष्णूरूपी जाठर व त्यामुळेंच देहांत असणाऱ्या दिव्य ज्ञान-प्रद अग्नीवर भूतांच्या हिताच्या इच्छेनें तो मेघरूपी प्राणवर्धक ऐरावत सुखकर व शीतल जलानें वर्षाव करता झाला. ( झ० वृष्टिरूप होत झाला ) ७९,८०. नंतर सिद्धांनीं ज्याचें सेवन केलें आहे असा तो महाबळ महायोगी मनानें आपला उपसंहार करून पुष्करामध्यें तप करतो ८१. पादादि खालच्या खालच्या गात्रांचा वरच्या वरच्या गात्रांत लय करून मन मस्तकांतील सहस्रदलयुक्त कमलांत स्थिर करतो. आणि अचल स्थानास प्राप्त होऊन मुकाट्यानें बसतो ८२. हा सर्व धर्मांतील श्रेष्ठ धर्म आहे. तो उपाधिकल्पित नसून स्वभा-वसिद्ध आहे. तो यालोकीं व परलोकीं असा दोन्ही ठिकाणीं सर्व भूतांस हितकर आहे ८३. ( यावेळींही योगाचे उपसर्ग प्राप्त होतात पण त्यांचा परिहार केला पाहिजे ) योगाभ्यासाला आरंभ करण्यापूर्वी कामादि दैत्यांना जरी मारलेले असले तरी ते नानाप्रकारच्या मायाप्राप्त शरीरांनीं वेष्टित होत्सात एकमत होऊन व आयुधें उचलून समाधिकालींही पुनः उद्भव-तात ८४. हे शत्रुनाशका, ते अग्नीसारखे तेजस्वी, धिप्पाड शरीराचे व महाबलाढ्य दैत्य जाज्वल्य अग्नीवर पर्वताग्रांनीं प्रहार करितात ८५. बलानें दृप्त व मायेनें मेघरूप झालेले ते त्याच संघातांत संघातयुक्त महाबल अग्नीवर वर्षाव करितात ८६. पण अग्नि आपल्या ज्वालांनीं त्या शैलांना शतशः व सहस्रशः जाळतो. युगांतसमयींच्या प्रभु आदित्याप्रमाणें तो प्रजांना जाळण्याची इच्छा करितो ८७. ते दैत्य मायेनें सन्मुख प्रकट झालेल्या व सूर्योदयसमयीं आदित्याप्रमाणें आकाशास प्रकाशित करणाऱ्या अग्नीला शांत करूं शकले नाहींत ८८. इतके सर्व उद्यम करूनही दैत्य भग्नपराक्रम झाले व गंधमादन पर्वतावर येऊन त्या पर्वतशिखरावर बसले ८९. तो अग्नि वैष्णवलोक व विद्युत् यांसह संगत होऊन अंतरि-क्षचर दैत्यांस जाळीत अंतरिक्षांत संचार करूं लागला ९०. मेघ संबंधीं नाग ( ऐरावत )

मुमोच सलिलं भूमौ पर्जन्य इव वृष्टिमान् ९१ मन्त्रैः संचोदितो नागो द्विजेभ्यो वदनोद्गतैः ॥ मुमोच तोयसंघातं मानयन्विप्रजं जलम् ९२ [ १०४३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि अष्टाविंशतितमोऽध्यायः ॥ २८ ॥

जनमेजय उवाच ॥ संयुज्य तपसा देवाः किमकुर्वंस्ततः परम् । न हि तद्विद्यते लोके तपसा यन्न लभ्यते १ वैशंपायन उवाच ॥ अथ दीक्षां समास्थाय सर्वे विष्णुमया गणाः । पुष्करादग्निमुद्धृत्य प्रणीय च यथाविधि २ जुहुवुर्मन्त्रविधिना ब्राह्मणा मन्त्रचोदिताः । हविषा मन्त्रपूतेन यथा वै विधिरेव च ३ स चाग्निर्विधिवत्तत्र वर्धते ब्रह्मतेजसा । तेजोभिर्बहुलीभूतः प्रभुः पुरुषविग्रहः ४ ब्रह्मदण्ड इति ख्यातो वपुषा निर्दहन्निव । दिव्यरूपप्रहरणो ह्यसिचर्मधनुर्धरः ५ सगदो लांगली चक्री शरी चर्मी परश्वधी । शूली वज्री खड्गपाणिः शक्तिमान्वरकार्मुकः ६ विष्णुश्चक्रधरः खड्गी मुसली लांगलायुधः । नरो लांगलमालंब्य मुसलं च महाबलः ७ वज्रमिन्द्रस्तपोयोगाच्छतपर्वाणमाक्षिपत् । रुद्रः शूलं पिनाकं च मनसा धारयन्भुवि ८ मृत्युर्दण्डं पाशमापः कालः शक्तिमगृह्णत । जग्राह परशुं त्वष्टा कुबेरश्च परश्वधम् ९ निर्विकारैः समायुक्ताः शतशोऽथ सहस्रशः । विश्वकर्मा च त्वष्टा च चक्राते ह्यायुधं बहु १० इंद्रायाग्निरथं प्रादात्सूर्याय च प्रतापिने । परमात्मा ददौ कृष्णो रुद्राय च महात्मने ११ छंदोभिरेव त्वष्टा च स चकाराथ वाहिनीम् । विश्वकर्मा

---

मेघांशीं संगत झाला. व वृष्टिमान् पर्जन्याप्रमाणें भूमीवर जल सोडूं लागला ९१. मुखांतून निघालेल्या मंत्रांनीं ज्यास प्रेरणा केली आहे, असा तो नाग ( ऐरावत गज ) विप्रजन्य जन्मला ( ब्राह्मणसंततीला ) मान देत जलसंघात सोडता झाला ९२. इति श्रीमहा. खि० हरि० भविष्यपर्वांतील अठ्ठाविसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २८ ॥

जनमेजयः— त्यानंतर देव तपोयुक्त होऊन काय करते झाले ? तपाच्या योगानें प्राप्त होत नाहीं असें या लोकांत कांहीं नाहीं १. वैशंपायनः— नंतर सर्व विष्णुमय गणांनीं दीक्षा घेऊन, पुष्करांतून अग्नीचा उद्धार करून व यथाविधि त्याचें प्रणयन करून मंत्रांनीं प्रेरणा केले गेलेले ब्राह्मण मंत्रांच्या योगानें यथाविधि पवित्र झालेल्या हवीनें मंत्रविधीनें त्यांत हवन करिते झाले २,३. तेथें तो अग्नि ब्रह्मतेजानें यथाविधि वाढला. तो पुरुषशरीरी प्रभु तेजाच्या योगानें बहुलीभूत झाला ४. शरीरानें जाळीतच असल्यासारखा तो ब्रह्मदंड या नावानें प्रख्यात होता. त्याचें रूप व शस्त्रेंही दिव्य होतीं. तो ढाल, तरवार व धनुष्य धारण करणारा होता ५ गदा, नांगर, चक्र, बाण, ढाल, परशु, शूल, वज्र, खड्ग, शक्ति व श्रेष्ठ धनुष्य इतक्या वस्तू त्यानें आपल्या हातांत घेतल्या होत्या ६. चक्रधर विष्णुच खड्गवान्, मुसळवान् व लांगलायुध झाला. हल व मुसळ यांचा आश्रय करून तो महाबलवान् नर झाला ७. ज्याला शंभर पर्वें आहेत असें वज्र इंद्र तपोयोगानें धारण करता झाला. रुद्रानें भूलोकीं मनानें शूल व पिनाक यांचें धारण केलें ८. मृत्यूनें दंड धारण केला. वरुणानें पाशाचें ग्रहण केलें व कालानें शक्तीचा स्वीकार केला. त्वष्ट्यानें परशु व कुबेरानें फरशी हातांत घेतली ९. त्यामुळें ते सर्व देव शेकडों व हजारों निर्विकार शक्तींनीं युक्त झाले. त्वष्टा व त्याचीच एक विशेषमूर्ति असा विश्वकर्मा यांनीं आपापलीं आयुधें अनेक प्रकारचीं केलीं १०. परमात्मा कृष्ण इंद्राला, प्रतापी सूर्याला व महात्म्या रुद्राला अग्निरथ देता झाला ११. वेदांच्या योगानें ( म्ह. वेदांत सांगितल्याप्रमाणें ) त्वष्ट्यानें

विमानानि चकार बहुभिः क्रमैः १२ शरीरांशं समुद्धृत्य विष्णुः सत्यपराक्रमः । पुष्करात्पर्वणि घनात्पूतनार्थं प्रवर्तयन् १३ यां चैव सर्वऋक्षाणां वाचा वै समकल्पयत् । यया स पूज्यः संग्रामे शत्रूञ्जिर्बिभिदे रणे १४ स तं दण्डं समुचितं निर्विकारं समाहितम् । ब्रह्मा जग्राह विधिना अन्तर्धानगतः प्रभुः १५ स्वैः प्रभावैश्च विधिना सोऽस्त्रग्रामं चतुर्विधम् । ऐन्द्रमाग्नेयवायव्ये रौद्रं रौद्रेण वर्चसा १६ एभिर्विकारैः संयुक्ता दितेः पुत्रा महाबलाः । तपसा शिक्षया चैव स्वास्त्रैः प्रहरणैरपि १७ बलेन चतुरंगेण वीर्येण सुसमाहिताः । अप्रधृष्या रणे सर्वे समपद्यन्त वै तदा १८ ते विहाय गुहामध्ये सभाण्डोपस्करे रथे । मन्दरस्य गिरेः पादे विचेरुर्वसुधातले १९ चतुरंगं बलं सर्वं संहृत्य तमसः प्रभुः । विष्णुरेव महायोगः चचार वसुधातले २० भूयोऽप्यत्तप आसेदुश्चरन्तो ब्राह्मणैः सह । तैश्च सर्वैः सुरगणैश्चर्मचीरनिवासिभिः २१ [१०७४] इति श्रीम० खि० हरि० भवि० एकोनविंशत्तमोऽध्यायः ॥ २९ ॥

जनमेजय उवाच ॥ ब्रह्मन् खिले वर्तमाने निर्मर्यादे महाग्रहे । अविनाशे च भूतानां कथमासन्प्रजास्तदा १ वैशंपायन उवाच ॥ अभ्यषिंचत्पृथुं वैन्यं पुरा राज्ये प्रजापतिः । राज्याय ऋषिभिः सार्धं प्रजाधर्मपरायणः २ एष नो परमो राजा सानुरागादजायत ।

---

सेना केली. विश्वकर्म्यानें अनेक प्रकारें विमानें रचलीं १२. सत्यपरासत्य पराक्रमी विष्णूनें अव्यय पुष्करस्थानांतून शरीरांश काढून सेना प्रवृत्त केली १३. ज्या वाणीच्या योगानें तो पूज्य इंद्र पुढें संग्रामांत शत्रूंचा नाश करता झाला त्याच वाणीनें त्यानें सूर्य व इतर नक्षत्रें यांच्या स्थित्यर्थ आकाशाची कल्पना केली १४. अंतर्धान पावलेला प्रभु ब्रह्मा त्या अति उचित निर्विकार व शांत दंडास यथाविधि धारण करता झाला (इंद्रानें असुरांवर फेंकलेल्या दंडास, त्याच्यामध्यें विकार न होईल अशारीतीनें, देवांस न दिसतां, विष्णूनें धरलें असा भाव ) १५. त्यानें आपल्या प्रभावानें यथाशास्त्र ऐंद्र, आग्नेय, वायव्य, व रुद्रतेजानें रौद्र असा चार प्रकारचा अस्त्रसमुदाय निर्माण केला १६. या विकारांनीं संयुक्त झालेले महाबल दितिपुत्र तप, शिक्षा, आपली पहिलीं अस्त्रें व प्रहरणें, चतुरंग सैन्य व वीर्य यांच्या योगानें अतिशय धैर्यवान् झाले. आणि रणांमध्यें ते सर्व धर्षण न करतां येण्यासारखे बनले १७,१८. ते गुह्य रूपें सोडून भोग्य—वस्तुयुक्त रथामध्यें बसून स्थूलकार्यरूप मंदराच्या एकदेशरूपी पायथ्याशीं पृथ्वीवरच फिरत राहिले. ( ह्मणजे त्यांस उर्ध्वगति मिळाली नाहीं ) १९. तमोगुणाचें कार्य असें तें सर्व आसुर चतुरंग सैन्य एकत्र जमवून महायोगी विष्णुच पृथ्वीवर फिरत होता २०. पण चीर व अजिनें परिधान करून तप करणाऱ्या ब्राह्मणासह व सर्व देवगणांसह त्या असुरांनीं पुनः आणखी तप केलें. ( पण तें त्यांचें तप तामस व त्यामुळेंच नश्वर होतें. यास्तव मुमुक्षूंनीं सात्विक तप करावें ), २१. इति श्रीम० खिं० ह० भविष्य० एकूणतिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ २९ ॥

* जनमेजन:—हे ब्रह्मन्, याप्रमाणें हा निर्मर्याद व अविनाशी खिळ्यासारखा मोठा संसारनक्र प्रवृत्त झाला असतां ( दुःखपरंपरेंत बुडालेल्या ) प्रजाजनांची काय दशा झाली १. ( तामसजन पुनः पुनः जन्म घेतात असें ऐकून त्यांच्या दुःखनाश कसा होईल, असा हा प्रश्न जनमेजयानें दयेनें केला आहे. त्याचें उत्तर-राजानें सर्व प्रजाजनांना स्वधर्मात स्थापिलें

---

* मन हा क्षीरसागर, मति हा पर्वत, शमादि व कामादि वृत्ती हेच क्रमानें देव व असुर, अभ्यास हें मंथन व मुक्ति हें अमृत व इतर रत्नें असें रूपक करून येथें वर्णन केलें आहे.

त्रेतायां संप्रवृत्तायामन्योन्यमनुजल्पिरे ३ एष नो वृत्तिदाता च विप्राणां च प्रवर्तिता। नेता सर्वभूतानां सत्यप्रोक्तेन कर्मणा ४ एतस्मिन्नन्तरे देवा गन्धमादनसानुषु। बहुभिर्नियमैः श्रान्ता निषण्णा गिरिसानुषु ५ अथ गन्धं समासाद्य समंताद्देवमानवाः। माधवे समये प्राप्ते तेन गन्धेन दर्पिताः ६ पुष्पमात्रस्य सद्वीर्यं मारुतेन विसर्पितम्। मनोग्राहि सुखं सर्वं पार्थिवं गन्धमुत्तमम् ७ ते दैत्यास्तेन गन्धेन किंचिद्विस्मयमागताः। प्रसन्नमनसो भूत्वा परं सौख्यमुपागताः ८ ऊचुश्च सहिताः सर्वे तेन गन्धेन दर्पिताः। पुष्पमात्रस्य सद्वीर्यं किं तस्य फलतो भवेत् ९ अनुमानेन विज्ञेया विविधाः कर्मबुद्धयः। शुभाश्च वा शुभाश्चैव बुद्धिभागेन देहिनाम् १० तस्माद्वयं पयोमध्ये औषधीर्मथामहे। मन्दरेण विशालेन बलिना कामरूपिणा ११ समुद्रमभिसंरंभान्मन्थीमः सोमजं जलम्। पीत्वा च सहिताः सर्वे भविता कामरूपिणः १२ विष्णुरेवाग्रणीस्तेषां भविष्यति महाबलः। दिवं च वसुधां चैव भोक्ष्यामः सह शत्रुभिः १३ समूलपत्रशाखाश्च सपुष्पाः फलशालिनः। सर्वग्रहांश्च गृह्णीमः सुधां च वसुधातले १४ उद्धृत्य गिरिपादेभ्यो गन्धमादनसानुजान्। प्रभाष्य वचनं देवा मन्दरस्य प्रकंपने १५ समुद्धर्तुं प्रधावन्तः कंपयन्तिस्म मेदिनीम्। निकषा महावीर्या बाहुभिः परिणाहिभिः १६ न शक्नुस्ते समुद्धर्तुं शैलेन्द्रं दनुवंशजाः। निपेतु-

---

असतां त्यांचीं क्रमानें चित्तशुद्धि होऊन बंधमुक्ति होते असें वैशंपायन देणार आहेत.)

वैशंपायनः—पूर्वी प्रजाधर्मपरायण प्रजापतीनें वेनपुत्र पृथूला ऋषींसह राज्याकरितां राज्यावर अभिषेक केला २. त्रेतायुग प्रवृत्त झालें असतां त्याला राज्य देऊन मोठ्या प्रमानें हा सत्यकर्मानें आम्हांला वृत्ति देणारा, विप्रांचा प्रवर्तक व सर्व भूतांचा निर्माता आहे, असें ते आपसांत बोलूं लागले ३. ४. इतक्यांत देव गंधमादन पर्वताच्या शिखरावर अनेक नियमांनीं श्रांत होऊन बसले ५. देव व मानव समंततः सुवासाचा अनुभव घेऊन वसंतसमय आला असतां त्याच गंधानें दर्पयुक्त झाले ६. तो सुगंध म्हणजे वायूनें पसरलेलें प्रत्येक पुष्पाचें वीर्यच असून तें सर्व मनांचें आकर्षण करणारें, सुखकर व पृथ्वीच्या उत्तम गंधगुणरूप होतें ७. त्या गंधानें दैत्य कांहींसे विस्मित झाले. त्यांचीं चित्तें प्रसन्न होऊन परमसुख झालें ८. आणि त्या गंधानें दर्पित झालेले ते सर्व मिळून म्हणाले, 'प्रत्येक पुष्पाचें जर हें असलें वीर्य आहे तर फलतः त्याचें महत्त्व केवढें असेल?! ९. क्रमानें मोक्षाला व भोगाला कारण होणाऱ्या नानाप्रकारच्या प्राण्यांच्या कर्मबुद्धी (धारणेपासून उत्पन्न झालेलीं ज्ञानें) बुद्धिसामर्थ्यानें अनुमानानें जाणणेंच उचित होय १०. यास्तव आम्ही आतां बलाढ्य, कामरूपी व विशाल अशा मंदराच्या योगानें जलामध्यें ओषधी घुसळतों ११. मोठ्या वेगानें समुद्राचें मंथन करून व त्यांत उत्पन्न झालेल्या अमृताचें पान करून अविद्यानाशार्थ मिळून प्रयत्न करावयास लागलेले आम्ही सर्व कामरूपी होऊं १२. आराधित महाबल विष्णुच आमचा योगमार्गांतील अग्रणी होईल. नंतर आम्ही शत्रूंसहवर्तमान पृथ्वी व स्वर्ग यांचा उपभोग घेऊं १३. त्यामुळें आम्हीं कोठेंही न जातां म्हणजे येथल्या येथेंच पित्रादि मूल, भार्यादि पत्र, भ्रात्रादि शाखा, व अपत्यादि फलें यांसहवर्तमान सर्व (ऐकात्म्यग्रहरूप) अमृताचा (व मोक्षाचा) स्वीकार करूं १४. याप्रमाणें दैत्य मंदरास चाळविण्याविषयीं संकेत करून पर्वताच्या पायथ्यापासून गंधमादनाच्या शिखरास उपटूं लागले (त्यांनीं सर्व वासनांचा त्याग केला). १५. विस्तृत

जीवितुभिर्भृष्टा बि ले पर्वतान्तरे १७ समाधायात्मनात्मानं तपसा दग्धकिल्बिषाः । पितामहं
प्रपद्यन्ते शिरोभिः कामरूपिभिः १८ तेषां मनोभिलषितं ब्रह्मा सर्वगो वशी । ज्ञात्वा
बहुविधैर्वाक्यैर्व्याजहार सरस्वतीम् १९ अशरीरां शरीरस्थः परया वर्णसंपदा । सर्वलोकप-
तिर्ब्रह्मा लोकानां हितकाम्यया २० आदित्यैर्वसुभिश्चैव रुद्रैश्च समरुद्गणैः । देवैर्यक्षैः सगं-
धर्वैः किन्नरैश्च प्रगायिभिः २१ समेत्य सहितैः सर्वैः शक्य उद्धर्तुं गिरिः । अमृतार्थे महा-
तेजा धातुभिः समरंजितः २२ सुरासुरगणाः सर्वे समुत्पाट्य महागिरिम् । हस्तारूढाः प्रप-
श्यन्ति वीरुधो हिमवद्गसम् २३ एतच्छ्रुत्वा च वचनं सर्वेषामन्तिके तदा । दैतेया बाहुब-
लिनो मनोभिर्वाग्भिरेव च २४ विक्रीडभूता बहुधा बभूवुर्लवणांभसः । यत्र पुष्करविन्यस्तः
सहितैर्देवदानवैः २५ सुरासुरगणाः सर्वे सहिता लवणांभसः । मंदरं पुष्करं कृत्वा नेत्रं
वासुकिमेव च २६ समाः सहस्रं मथितं जलमौषधिभिः सह । क्षीरभूतं समारंभादमृतं
समपद्यत २७ तज्जन्हुरसुराः पूर्वमाक्रान्ता लोभमन्युना । धन्वंतरिस्तथा मद्यं श्रीर्देवीकौ-
स्तुभोमणिः २८ शशांको विमलश्चापि समुत्तस्थुः समंततः । उच्चैःश्रवा हयो रम्यः पीयूषं
तदनन्तरम् २९ पश्चाद्देवास्तदादातुमुद्यता राहुमब्रुवन् । न तु केचित्त्रिबन्ति स्म दैत्या नैव
च दानवाः ३० चिच्छेदाथ हरिः संख्ये राहोश्चक्रेण कं तदा । अनिर्मुक्तं पितृगणैर्मुनिभिश्च

---

बाहूंनीं त्याला निश्चयानें उपटण्याकरितां धावणाऱ्या महावीर्यवान् दैत्यांनीं पृथ्वीला कांप-
वून सोडलें १६. पण ते दनुवंशज त्या शैलेंद्रास उपटण्यास समर्थ झाले नाहींत. पर्व-
ताच्या विपुल अंतराल भागीं ते धृष्ट दैत्य गुडघ्यांवर पडले १७. कांहीं वेळानें आपणच
होऊन सावध झाल्यावर तपाच्या योगानें ज्यांचें पाप जळलें आहे असे ते कामरूपी मस्त-
कांनीं ईश्वराला शरण गेले १८. तेव्हां तो सर्वगामी जितेंद्रिय, शरीरस्थ व सर्व लोकपति
ब्रह्मा त्यांचें अभिलषित जाणून त्यांस प्रणवरूप अशरीरावाणीनें ब्रह्मात्मैक्य प्रतिपादक
नानाप्रकारच्या वाक्यांनीं लोकांचें हित व्हावें या इच्छेनें उपदेश करता झाला १९-२०.
हे महातेजस्वी दैत्यांनो, आदित्य, वसु, मरुद्गणांसह रुद्र, देव, यक्ष, गंधर्वांसह उत्तम गायन
करणारें किन्नर या सर्वांनीं मिळून अमृताकरितां प्रयत्न केल्यास धातूंनां उत्तम रंगी--बेरंगी
झालेला हा पर्वत उपटून काढतां येणें शक्य आहे २१,२२. ते सर्व सुरासुरगण ( मानवा-
दिकही) त्या पर्वतास उपटून प्राण्यांस भोग्यरूपानें श्रेयस्कर वाटणारा संसार वासना संतति-
रूपानें हस्तस्थित आवळ्याप्रमाणें ( साक्षात् ) पाहतात २३. सर्वांसमक्ष त्यानें उच्चारलेलें हें
उपदेशवचन ऐकून बाहुबलशाली दैतेय आपल्या मनांनीं व वाणींनीं ईश्वराज्ञेप्रमाणें अनु-
ष्ठान करण्यास प्रवृत्त झाले. पण वैराग्याच्या अभावीं ते समुद्रजलाचीं क्रीडास्थानें बनले.
भ्रू-घ्राणमध्यादि ज्या चक्रांत सर्व कार्यांचे अवस्थान आहे तेथें देव व दानव मिळून
प्रयत्न करूं लागले असतां पूर्वोक्त विघ्नांनीं पराभूत होऊन जलानें त्यांना इतस्ततः झोंक
दिले २४. २५. सर्व सुरासुर गण मिळून अमृत उत्पन्न करते झाले. मंदरपर्वताला रवी करून
व वासुकीला त्याची दोरी बनवून सहस्र वर्षें औषधींसह घुसळलेलें जल उत्तम उपायामुळें
क्षीररूप झालें व तेंच शेवटीं अमृत झालें २६,२७. तेव्हां लोभरूपी वेगानें आक्रांत झालेल्या
असुरांनीं पूर्वीं त्याचें हरण केलें. त्याचप्रमाणें त्यांतून धन्वंतरी, मद्य, देवी, श्री, कौस्तुभ मणि २८,
निर्मल चंद्रमा, रम्य उच्चैःश्रवा अश्व, व सर्वांच्या मागून अमृत अशी रत्नें त्यांच्या सभोंवार
उभीं राहिलीं २९. नंतर अमृत घ्यावयास उद्युक्त झालेले देव राहूस उद्देशून आपसांत म्हणाले

सनातनैः ३१ तादिन्द्रहस्तादमृतं जहार पृथिवी स्वयम् । जगामांकगता देवी ब्रह्मवाक्यप्रचोदिता ३२ [ ११०६ ] इति श्रीमहा० खि० ह० भविष्यपर्वणि त्रिंशोऽध्यायः ॥ ३० ॥

जनमेजय उवाच ॥ निहते दैत्यसंघाते विष्णौ चातिपराक्रमे । दैतेया दानवेयाश्च किमिच्छन्ति पराक्रमात् १ वैशंपायन उवाच ॥ दानवा राज्यमिच्छन्ति पराक्रममहाबलाः ॥ तप इच्छन्ति सहिता देवाः सत्यपराक्रमाः २ जनमेजय उवाच ॥ कथं कालस्य महतो हिरण्यकशिपुस्तदा । यजते ब्रह्मणः क्षेत्रे प्राप्तैश्वर्यः सकामदः ३ वैशंपायन उवाच ॥ यजेद्बहुसुवर्णेन राजसूयेन पार्थिवः । क्रतुना दानवश्रेष्ठो वसुधायां महाफलः ४ गंगायमुनयोर्मध्ये यद्भूद्विपुलं तपः । समेयुस्तत्र सहिता यजमाने महासुरे ५ ब्राह्मणा वेदविद्वांसो महाव्रतपरायणाः । यतयश्चापरे सिद्धा योगधर्मेण भारत ६ मुनयो वालखिल्याश्च धन्या धर्मेण शोभिताः । बहवो हि द्विजा मुख्या नित्या धर्मपरायणाः ७ ऋषयश्च महाभागा विप्रैः पूज्याः सहस्रशः । विपुलैरत्र विभवैर्ह्रियमाणैस्ततस्ततः ८ शुक्रस्तु सहपुत्रेण दैत्यं योजयते प्रभुः । हिरण्यकशिपुं मध्ये गणानां प्रभवः प्रभुः ९ हिरण्यकशिपुश्चैव व्याजहार सरस्वतीम् । कामाद्वरं ददातीति तद्वै समतिपद्यताम् १० विष्णुर्वामनरूपेण भिक्षां तां प्रतिगृह्णाति । हिरण्यकशिपोर्हस्ताद्वद्वे पदे पदमेव च ११ ततः क्रमितुमारेभे विष्णुः सत्यपरा-

---

दैत्य व दानव यांतील कोणीही अमृत पीत नाहींत. राहु मात्र तें पीत आहे ३१,३०. तें कळतांच तत्काळ विष्णूनें संग्रामांत चक्रानें राहूचें मस्तक तोडलें. सनातन मुनि व पितृगण यांनीं नित्य सेविलेलें तें अमृत इंद्रापासून प्रतर्दनादि क्रमानें पृथिवीनें हरण केलें. ( कैवल्यसंज्ञक तें अमृत ग्रहण करण्यास पृथ्वींतील मानवही अधिकारी आहेत. ) वेदवाक्यानें प्रेरित झालेली ती देवी शिष्यत्वास प्राप्त झाली ३१,३२. इति श्रीमहा० खि० ह० भविष्य० तिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ ३० ॥

जनमेजयः—दैत्यसंघात मारला गेला असतां व विष्णु अतिपराक्रमी झाला असतां दैतेय व दानवेय पराक्रमाच्या योगानें कशाची इच्छा करितात १. वैशंपायनः—पराक्रमानें महाबल झालेले दानव राज्याची इच्छा करूं लागले व सत्य पराक्रमी देव एकमत होऊन तपाची इच्छा करूं लागले २. जनमेजयः—ज्याला ऐश्वर्य प्राप्त झालें आहे असा व याचकांचे मनोरथ पूर्ण करणारा हिरण्यकशिपु ब्रह्मक्षेत्रांत दीर्घ काल कसें यजन करीत राहिला ? ३. वैशंपायनः—राजानें पुष्कळ सुवर्ण दक्षिणायुक्त राजसूयानें यजन करावें. तसेंच ज्याला महाफळ पाहिजे असेल अशा दानवश्रेष्ठानें पृथ्वीमध्यें क्रतूनें यजन करावें ४. गंगा व यमुना यांच्या मध्यभागीं जें विपुल तप चालेलें होतें त्याकरितां महा असुर यजमान असतांना तेथें वेदवेत्ते ब्राह्मण, महाव्रतपरायण यती व दुसरेही योगधर्मानें सिद्ध झालेले ऋषी, धर्मानें सुशोभित झालेले धन्य वालखिल्य मुनी, नित्य धर्मपरायण असे दुसरेही पुष्कळ मुख्य ब्राह्मण आणि सहस्रावधि ब्राह्मणांकडून पूजले जाणारे महाभाग ऋषी, विपुल वैभवांनीं आकृष्ट होत्साते दिशदिशांतून आले ५-८. प्रभव व प्रभु शुक्र पुत्रासह गणांच्या मध्यभागीं हिरण्यकशिपु ( बलि ) दैत्यास नियुक्त करीत होता ९. त्यावेळीं हिरण्यकशिपु " पाहिजे त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें वर मागून घ्यावा मी देतो " अशी वाणी बोलला १०. त्याबरोबर विष्णु वामनरूपानें त्या भिक्षेचा स्वीकार करून हिरण्यकशिपूच्या हातून तीन पावलें भूमीचें दान

क्रमः । त्रील्लोँकांस्त्रिपदैः क्रान्तैर्दिव्यं वपुरधारयत् १२ हृतराज्याश्च ते दैत्याः पातालविवरं ययुः । ससैन्यगणसंबद्धाः सप्रासाः सासितोमराः १३ सयंत्रलगुडाश्चैव सपताका रथध्वजाः । सचर्मवर्मकोकाश्च सायुधाः सपरश्वधाः १४ तथेंद्रविष्णुसहिताः सयस्त्वभ्युत्थिता गणाः । अभ्यषिंचत्प्रमुदिता लोकानामधिपे सुराः १५ स तान्स्वधामृतेनाशु पितृत्वे समतर्पयत् । ब्रम्हा तदमृतं दिव्यं महेन्द्राय प्रयच्छति । अक्षयश्चाव्ययश्चैव संवृतस्तेन कर्मणा १६ ततः शंखमुपाध्मासीद्द्विषतां लोमहर्षणम् । पितामहकरोद्भूतं जनित्रे प्रथमे पदे १७ तं श्रुत्वा शंखशब्दं तु त्रयो लोकाः समाहिताः । निर्वृत्तिं परमां प्रापा इंद्रं प्राप्यमवाप्य च १८ सर्वैः प्रहरणैश्चैव संयुक्ता वह्निसंभवैः । मन्दराग्रेषु विहितैर्ज्वलद्भिरिव पावकैः १९ [११२५] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततो महति वृत्तान्ते स्थिते राज्ये महोदये । देवतानां मनुष्याणां सहवासोऽभवत्तदा १ एकतः समधीयन्ति सहिताः प्ररुदन्ति च । स्वयं च भागं गृह्णन्ति यज्ञकर्माणि भारत २ प्राचेतसं ततो दक्षं दीक्षित्वा वै बृहस्पतिः । वाजिमेधाय भगवानृषिभिः परिवारितः ३ तस्मिन्मातामहे यज्ञे दक्षस्याविदितात्मनः । शामित्रमकरोद्रुद्रो भागार्थे सह नन्दिना ४ रुद्रस्यैव हि तद्रूपं द्विधाभूतं तदीषया । जातः परमधर्मात्मा नन्दी पुरुषविग्रहः ५

---

घेतलें ११. नंतर सत्य पराक्रमी विष्णु पावलें टाकूं लागला. दिव्य शरीर धारण करून तीन लोकांस व्यापणाऱ्या तीन पावलांनीं त्यानें दैत्यांचें राज्य हरण करून घेतलें. तेव्हां ते राज्यरहित दैत्य सैन्यगण, प्रास, तरवारी, तोमरें, यंत्रपाषाण, पताकांसह रथध्वज, ढाली, कवचें, म्यानें, इतर आयुधें, परशू, यांसह पाताळ विवरांत गेले १२-१४. इकडे इंद्र व विष्णु यांसह उत्कर्ष पावलेले देवगण अतिशय आनंदित होऊन बलीला लोकांच्या आधिपत्यावर अभिषेक करते झाले १५. तो त्या देवांना पितृत्वबुद्धीच्या स्वधामृतानें सत्वर तृप्त करता झाला. ब्रह्मदेवानें तें दिव्य अमृत महेंद्राला दिलें. त्या कर्मानें तो अक्षय व अमृत झाला १६. त्यानंतर शत्रूंच्या अंगावर रोमांच उत्पन्न करणारा व पितामहाच्या हातांतून उत्पन्न झालेला शंख त्यानें जनित्र प्रथमपदीं वाजविला १७. तो शंखाचा ध्वनि ऐकून तिन्ही लोक शांतचित्त झाले. प्राप्त करण्यास योग्य असलेल्या इंद्राला प्राप्त करून घेऊन ते सर्व परम सुख भोगूं लागले १८. देव अग्नींतून उत्पन्न झालेल्या सर्व प्रहरणांनीं संयुक्त झाले. मंदराच्या अग्रभागीं केलेलीं ती प्रहरणें दीप्त अग्नीप्रमाणें होतीं १९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० एकतिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ ३१ ॥

वैशंपायनः— राजन्, अशाप्रकारचा हा मोठा वृत्तांत झाला असतां व महा उत्कर्ष संपन्न राज्य स्थित झालें असतां आत्मज्ञानानें समान योग्यतेस प्राप्त झालेले सर्व देव व मानव एकत्र वास करूं लागले १. ते एकीकडे आपल्याला उचित अशी चर्या करीत, व दुसरीकडे मनुष्यांसह प्रेमानें रडत. हे भारता, ते मनुष्यांनीं यज्ञांत दिलेला आपला भाग घेत २. नंतर ऋषींनीं परिवेष्टित झालेल्या भगवान् बृहस्पतीनें अश्वमेध यज्ञाकरितां प्राचेतस दक्षास दीक्षा देऊन त्या मातामहाच्या यज्ञांत नंदीसह रुद्रानें आपल्या भागाकरितां त्या आत्मज्ञानशून्य व ह्मणूनच पशुतुल्य अशा दक्षाचें शमन ( हिंसा ) केलें ३,४. त्याच्या इच्छेनें त्या रुद्राचेंच तें रूप द्विधा झालें. हे राजेंद्रा, परम धर्मात्मा नंदीच योगसामर्थ्यानें पुरुषशरीरी झाला.

तेन योगेन शर्वेण रुद्रेण परमात्मना ६ सुरूपैश्चा-प्यरूपैश्च विरूपैर्घटोदरैः । ऊर्ध्वनेत्रैर्महाकायैर्विकटैर्वामनैस्तथा ७ शिखिभिर्जटिभिश्चैव त्र्यक्षैर्शंकुकर्णिभिः । चीरिभिश्चर्मिभिश्चैव कूटमुद्गरपाणिभिः ८ सघंटाधारिभिश्चैव मुंज-मेखलधारिभिः । सहस्तकटकैश्चैव स्वर्णकुण्डलधारिभिः ९ सडिण्डिमैः सभेरीकैः समृदंगैः सवेणुभिः । एतैः परिवृतो देवो मखं तं समुपासृजत् १० सशंखमुरजैश्चापि सतालतलपा-णिभिः । उग्रायुधधरो देवः सपिनाक इवान्तकः ११ विरराजार्चिनिर्दीप्तैर्मखे मखवतां वरः । कालाग्निरिव दीप्तार्चिर्जगद्दग्धुमिवोद्यतः १२ नन्दी पिनाकपाणिश्च जघ्नतुर्मखमुत्तमम् । युगान्त इव कालाग्निः क्षिप्रं दग्धुमिवोद्यतः १३ यूपमुत्क्षिप्य धावन्ति निशाचरगणास्तथा । त्रासयन्मुखसंघांश्च चीरचर्मनिवासिनः १४ हवींष्यन्येपिबंत्यन्ये जिह्वाभिस्ताम्रलोचनाः । भक्षयन्ति पशूनन्ये रसनान्तावलंबिनः १५ मुमुचुश्चापरे यूपात्पशवः प्रहरन्ति च । वह्नि-मन्ये प्रसिंचन्ति वारिभिः प्रशमाय च १६ सोममन्ये जह्रुः केचिन्नेत्रैस्ताम्रजवोपमैः । दर्भान्केचिद्विलुंपन्ति हस्तैः पद्मदलप्रभैः १७ बभंजिरे च यूपाग्रान्कलशांश्चापि चिक्षिपुः । चिच्छिदुः कांचनान्वृक्षाञ्छोभार्थमुपकल्पितान् १८ बिभिदुश्चैव बाणैस्ते मुमुचुश्च हिर-ण्मयान् । लुलुपुश्चैव पात्राणि ममन्थुश्चारणीमपि १९ अरुजंश्चैव प्राग्वंशं लुलुपुश्च समाहिताः ।

---

त्याच रुद्र परमात्म्यानें वेदवचनांनीं सनातन ब्रह्म प्रस्थापित केलें ५,६. सुरूप, विरूप, विरूपाक्ष, घटोदर, ज्यांचे नेत्र वर आहेत, शरीर मोठें आहे, विकट, ठेंगू, शिखावान्, जटाधारी, तीन नेत्रांनीं युक्त, खिळ्यांसारखे ज्यांचे कान आहेत, लंगोट्या नेसणार, अजिन परिधान करणारे, हातांत कूट व मुद्गर घेतलेले, घंटा धारण करणारे, मुंजतृणाची मेखला धारण करणारे, हातांत कडीं घातलेले, सुवर्णकुंडलें कानांत घातलेले आणि डिंडिम, भेरी, मृदंग, व वेणु यांस वाजविणारे अशा नानाप्रकारच्या गणांनीं परिवेष्टित झालेला तो महादेव दक्षयज्ञाकडे वेगानें आला ७-१०. त्याच्या गणांतील कांहीं शंख व मृदंग यांस वाजवीत असून कित्येक हातांनीं टाळ्या वाजवीत होते. उग्र आयुधें धारण करणारा तो देव पिनाक धनुष्ययुक्त अंतकाप्रमाणेंच दिसत होता ११. दीप्त ज्वालायुक्त व जगास जाळण्यास तयार झालेल्या कालाग्नीप्रमाणें त्या यज्ञांत तो यज्ञवानांतील श्रेष्ठ दीप्त ज्वालांनीं शोभूं लागला १२. नंदी व पिनाकपाणी यांनीं उत्तम यज्ञावर प्रहार केला. तेव्हां युगांतींचा कालाग्निच सत्वर सर्व जाळण्याकरितां उद्यत झाला आहे कीं काय, असा भास झाला १३. निशाचरगण यज्ञिय स्तंभास उचलून घेऊन धावूं लागले. चीर व चर्म यांचें परिधान करणारे ते समारच्या संघांस त्रास देत होते १४. ज्याचे नेत्र लाल आहेत असे ते आपल्या जिह्वांनीं हविर्भाग चाटूं लागले. गजशुंडेप्रमाणें जिह्वेनें प्रांत भागाचा आश्रय करून रहाणारे दुसरें कित्येक पशूंचें भक्षण करूं लागले १५. कित्येकांनीं स्तंभापासून पशूंना सोडून मारिलें. कित्येक अग्नीला शांत करण्याकरितां त्यावर जलाचा सेक करूं लागले १६. लालभडक नेत्रांनीं युक्त असलेल्या कित्येकांनीं सोमरसाचें हरण केलें. कमलदलांसारख्या हातांनीं कित्येकांनीं दर्भांचा नाश केला. कांहीं रुद्रगणांनीं यूपाग्रें तोडून टाकिलीं. कलश फोडले. शोभेकरितां लावलेल्या कांचन वृक्षांस तोडून टाकलें १७,१८. त्यांनीं बाणांनीं तेथल्या सर्वांना वेध केले. सुवर्णमय बाण सोड-ण्याचा सपाटा चालविला. सर्व पात्रांचा नाश केला. अरणीचें मंथन केलें १९.

चखादिरे पुरोडाशान्नखाग्रैश्चावदारिरे २० एवं दिवा च रात्रौ च भिद्यमानो महा-
मखः । चुक्रोश च महानादान्भिद्यमान इवार्णवः २१ धनुः सशरमादाय पूर्वदत्तं स्वयं-
भुवा । कृतं कीचकवेणुभ्यां समरे सुमहारथः २२ प्रतिगृह्य महादेवः सशरं समयोजयत् ।
धनुर्निगृह्य जानुभ्यां जघान समहाक्रतुम् २३ सविद्धस्तेन बाणेन खं समुत्पतितः क्रतुः ।
मृगो भूत्वा नर्दमानो ब्रह्माणमुपधावति २४ शरेणाभिहतस्त्राणं न लेभे स सुखं भुवि ।
शरणार्थी ह्ययं प्राप्तः शरेणान्तर्गतेन च २५ तमुवाच मृगं ब्रह्मा शुभं सानुनयं वचः ।
स्वरेणोत्तमवीर्येण गंभीरेण सुभाषिणा । एवंरूपो नभसि त्वं भविष्यसि महामृगः २६
विजितश्च त्रिपर्वेण शरेणा नतपर्वणा । निष्ठन्नक्षत्रशिरसि सह रुद्रेण नित्यशः २७ सोमेन
सह संयुक्तो ह्यक्षयेणाव्ययेन च । दिवि संचारभूतो वै ताराभिः सह संगतः २८ ज्योतिर्भूतो
ज्योतिषां त्वं ध्रुवस्यैव महाध्रुवः । यच्चैतद्रुधिरं दिव्यं क्षतजाद्विभिनिःसृतम् २९ नभस्युत्प-
तितं चैव प्रवेगेन प्रधावतः । क्षतजं बहुवर्णं च क्षेत्रं मण्डलसंज्ञितम् । निमित्तभूतं भूतानां
वर्षं वर्षप्रदं तथा ३० सुखं दुःखं च भूतानां दर्शने संप्रवर्तते । इन्द्रियश्रवणाच्चैव नभसीन्द्रा-
युधोभवत् ३१ चक्षुषी मानुषे राजन्विस्मयात्समवेक्षत । अद्भुतं बहुचित्रं च मनसा संप्रक-
ल्पितम् ३२ न तु रात्रौ प्रदृश्येत खे सब्रह्माणि संज्ञितम् । दिनस्यैव सदा त्वभ्रे महत्कार्यं प्रदृ-

---

प्राग्वंशाला पीडा दिली व त्यांनीं सर्व वस्तूंचा नाश करून सोडला. पुरोडाशाचें
भक्षण केलें व नखाग्रांनीं प्रहार केले २०. याप्रमाणें अहोरात्र त्या महामखाचा
विध्वंस होऊं लागला असतां तो ( यज्ञ ) सशरीरी होऊन, विध्वंस
पावणाऱ्या समुद्राप्रमाणें, मोठा आक्रोश करूं लागला २१. पूर्वीं स्वयंभूनें दिलेलें व
वेळूच्या काठीचें केलेलें धनुष्य बाणासह घेऊन उत्तम महारथ रुद्र समरांत उभा
राहिला २२. महादेवानें तें धनुष्य घेऊन भूमीवर गुडघे टेकून व त्याच्यावर शरसंधान करून
महाक्रतूस वेध केला २३. तेव्हां त्या बाणानें विद्ध झालेला क्रतु आकाशांत उडाला. तो
मृग होऊन ओरडत ब्रह्मदेवाकडे जाऊं लागला २४. कारण रुद्रानें शरानें ज्याच्यावर प्रहार
केला आहे अशा त्याला भूलोकीं अनायासानें कोणी त्राता मिळाला नाहीं. अंगांत बोंच-
लेल्या शरासह आश्रयाची इच्छा करणारा तो मृगरूपी यज्ञ ब्रह्मदेवापाशीं आला असतां २५,
गंभीर, उत्तम वीर्ययुक्त व सुभाषण करणाऱ्या अशा स्वरानें तो ( ब्रह्मा ) त्या मृगाला
सांत्वनपूर्वक असें शुभ वचन बोलला. तूं अशाच रूपाचा महामृग होऊन आकाशांत
राहशील. ज्याचें अग्र नमविलेलें आहे अशा तीन पेरांच्या शरानें विशेषरीतीनें जिंकलेला
तूं नक्षत्रांच्या शिरोभागीं रुद्रासह सतत उभा रहा. अक्षय व अव्यय अशा सोमाशीं संयुक्त
होऊन तारांशीं संगत होत्साता अंतरिक्षांत संचार कर २६,२८ तूं ज्योतींतील ज्योति झालेला
आहेस. ध्रुवाचाही ध्रुव झाला आहेस. शरीरास झालेल्या व्रणांतून निघालेलें हें जें वेगानें
धावणाऱ्या तुझें रक्त आकाशांत उडलें आहे तें मंडलसंज्ञक अनेक रंगाचें क्षेत्र आहे. तें
भूतांचें निमित्तभूत व वर्षासमर्थ वृष्टि करणारें आहे २९,३०. त्याचें दर्शन झालें असतां
भूतांचें सुख व दुःख प्रवृत्त होतें. इंद्रियश्रवणामुळें तें आकाशांत इंद्रायुध झालें आहे ३१.
हे राजन्, मनुष्यांचे दोन्ही नेत्र त्याला अतिशय विस्मयानें पहातात. तें अति अद्भुत व
बहुचित्रित असून मनःकल्पित आहे ३२. स्वप्नवृत्तांताप्रमाणें हें सर्व अविद्यादशेंत दिसतें.
अविद्यानिवृत्ति झाली असतां शुद्धब्रह्मसाक्षात्कारस्थानीं वाणीचा आश्रय करून असणारें

ःश्यते ३३ भूमावेव समुत्तिष्ठेदाकाशे तु विलीयते। शतशश्च समं सर्वे प्रधावन्ति प्रचेतसः ३४
ःभयाद्रुद्रस्य महतो धन्विनो बाणपाणयः। नन्दी रुद्रगणैः सार्धं पिनाकी समतिष्ठत। युगा-
न्तकाले ज्वलितो ब्रह्म दण्ड इवोद्यतः ३५ विष्णुः संग्रामसंभूतं प्रगृह्य विपुलं धनुः। प्रातिष्ठत महाबाहुः पाणिना चक्रमादधत् ३६ गदां सघंटामन्येन खड्गमन्येन पाणिना। प्रगृह्य
सोऽग्रतो तिष्ठद्रुद्रायोद्यतपाणये ३७ ततः शृंगाग्रसंभूतं प्रगृह्य विपुलं धनुः। शंखं चाप्रतिमं
लोके शरांश्चानतपर्वणः ३८ विष्णुरग्रस्थितो भाति सबलः संहतांजलिः। बद्धगोधांगु-
लित्राणः सचंद्र इव तोयदः ३९ आदित्या वसवश्चैव दिव्यैः प्रहरणैः सह। विष्णुमेवाभितः
सर्वे तिष्ठन्ति ज्वलनप्रभाः ४० मरुतश्चैवविश्वे च रुद्रमेवाभिपेदिरे। गन्धर्वाः किन्नराश्चैव
नागा यक्षाः सपन्नगाः ४१ ऋषयो न्यस्तदण्डाश्च उभयोः पक्षयोर्हिताः। जपन्ति शान्तये
नित्यं लोकानां हितकाम्यया ४२ शरेण हतवान्रुद्रो विष्णुमेवाग्रणी रणे। हृदि सर्वांगसं-
धीषु तीक्ष्णाग्रेण सुयंत्रिणा ४३ न च कंपं तदा विष्णुः सर्वात्मा ब्रह्मसंभवः। न च रोषमना
नित्यं वृतः सर्वैः षडिन्द्रियैः ४४ विष्णुश्च धनुरानम्य शरेण समयोजयत्। जत्रुदेशे मुमो-
चाशु ब्रह्मदण्डमिवोद्यतम् ४५ सविद्धस्तेन बाणेन महादेवो न कंपते। वज्रेण च महासंधि-
र्मन्दरस्य न चाल्यते ४६ ततः प्रसभमाप्लुत्य रुद्रं विष्णुः सनातनम्। कण्ठे जग्राह भग-
वान्नीलकण्ठस्ततोऽभवत् ४७ अनादिनिधनो देवः क्षमतां हि भवान्मम। सर्वभूतागमाचार्या

---

तें दिसत नाहीं. कारण सर्व स्थूल कार्य दिवसाच्या अग्रभागींच दिसतें. त्याप्रमाणें अविद्यादशेंत सर्व भ्रामक प्रपंच हृदयाकाशांत दिसतो ३३. ही अविद्या रात्री शरीर असल्यासच उद्भवणार व त्याचा बाध होऊन प्रपंचाचा अभाव झाला, कीं ती नाश होणार हें उघड आहे. असो; सर्व अविद्यावान् प्रचेतःपुत्र हातांत बाण घेऊन एकटाच महाधनुर्धर रुद्राच्या भयानें शतशः धांवूं लागले. रुद्र गणांसह नंदी पिनाक घेऊन उभा राहिला. तो युगांतकालीं वर उचललेल्या दीप्त ब्रह्मदंडासारखा दिसत होता ३४,३५. तेव्हां महाबाहु विष्णु संग्रामसंभूत मोठें धनुष्य घेऊन व दुसऱ्या हातांत चक्र धारण करून निघाला. तिसऱ्या हातानें घंटायुक्त गदा. व चवथ्या हातानें खड्ग घेऊन तो ज्यानें आपला हात वर उचलला आहे अशा रुद्राच्या अग्रभागीं उभा राहिला ३६,३७. शिंगांच्या अग्रांनीं केलेलें मोठें धनुष्य, लोकांमध्यें अप्रतिम असलेल्या शंख व टोंकें नमविलेले बाण घेऊन व सैन्यांसह हात जोडून ज्यानें गोधांगुलित्राण बांधलें आहे असा अग्रभागीं स्थित असलेला विष्णु चंद्रयुक्त मेघाप्रमाणें शोभत होता ३८,३९. अग्नीसारखे तेजस्वी आदित्य, वसु इत्यादि सर्व दिव्य प्रहरणांसह विष्णूच्या सभोंवार उभे राहिले ४०. मरुत्, विश्वेदेव, गंधर्व, नाग, किंन्नर, व पन्नगासह यक्ष रुद्राला जाऊन मिळाले. ज्यांनीं दंडाचा त्याग केला आहे, असे ऋषी दोन्ही पक्षांत राहून सतत लोकांच्या हिताच्या इच्छेनें शांतीकरितां जप करूं लागले ४१,४२. अग्रगामी रुद्रानें रणामध्यें बाणानें विष्णूलाच वेध केला. हृदय व सर्वांगसंधी यांमध्यें सुयंत्रितपणें तीक्ष्ण अग्रानें क्षतें केलीं ४३. पण सर्वात्मा ब्रह्मसंभव विष्णु कंपित झाला नाहीं. सर्व सहाही इंद्रियांनीं युक्त असलेला तो कधीं रागावलाही नाहीं ४४. त्यानें आपलें धनुष्य वाकवून त्याच्याशीं शर जोडला. व उचललेल्या ब्रह्मदंडाप्रमाणें तत्काल तो बाण शंकराच्या गळ्याखालच्या आडव्या हाडांवर सोडला ४५. परंतु त्या बाणाचा वेध झाला असतां शंकरही कंपित झाला नाहीं. कारण

मम कर्ता च कर्मणाम् ४८ कर्मणां चैव कर्ता च विकर्ता चैव भारत । अशेषत्वाच्च भूतानां सर्वभूतेषु चोत्तमः ४९ सर्वमेव हि यत्कर्म विधत्ते कर्मयोनिषु । तयोः शुभतमो राजन्स्त्वमेव तथाकरोत् ५० अंतरिक्षाच्छुभा वाचः श्रूयन्ते परमाद्भुताः । सिद्धानां वदनोन्मुक्ताः सनातन नमोऽस्तु ते ५१ नन्दी पिनाकमुद्यम्य बलवान् रुद्रसंभवः । मूर्धन्यभिजघानाजौ विष्णुं क्रोधेन मूर्च्छितः ५२ ततः प्रहसितो विष्णुर्नंदीं दृष्ट्वा सुरोत्तमः । स्तंभयामास भगवान्सर्वभूतपतिर्हरिः ५३ विष्णुर्ब्रह्मसमो भूत्वा तेजसा प्रज्वलन्निव । क्षमयाच समायुक्तः स्थितः स्थाणुरिवाचलः ५४ अचिन्त्यश्चाप्रमेयश्च ह्यजेयश्चाप्यरिंदमः । युगान्ताग्निसमो भूत्वा शान्तात्मा हरिरव्ययः ५५ प्रसन्नः कल्पयामास भागं रुद्राय धीमते । विष्णोर्धर्मपरो नित्यं त्यक्तकामः सुरोत्तमः ५६ विष्णुना चैव राजेन्द्र स यज्ञः संधितः पुनः । यथापक्षं च ते सर्वे गणास्त्वासन्महीपते ॥ तस्मिन्युद्धे महाघोरे विष्णो रुद्रस्य चैव ह ५७ यथापक्षं भवयुद्धं दक्षयज्ञविनाशने । विनाशश्चैव यज्ञस्य तदा लोके प्रतिष्ठितः ५८ सर्वभूतेषु राजेन्द्र हितो यज्ञः सनातनः । दक्षो यज्ञफलं चैव प्राप्तवान्स प्रजापतिः ५९ इमां चोदाहृतां दिव्यां कथामिति स बुद्धिमान् । श्रावयेद्यस्तु विप्रेभ्यः शुचिः प्रयतमानसः ६० अधीत्य सर्वम-

---

वज्राच्या प्रहारानें मंदराचा मोठा संधि चंचल होत नाहीं ४६. त्यानंतर विष्णु वेगानें उडी मारून सनातन रुद्राला कंठप्रदेशीं घट्ट धरता झाला. त्यामुळें तो भगवान् नीलकंठ झाला ४७. इतक्यांत तूं अनादि निधन ( उत्पत्तिनाशशून्य ) देव आहेस. तूं मला क्षमा कर. तूं सर्व भूतांचा विद्योपदेश करणारा आचार्य आहेस. माझ्या कर्मांचा कर्ता, सर्व कर्मांचा कर्ता विकर्ता ( विषम करणारा ); भूतांच्या कारणभूत, अज्ञानानें रहित व सर्व भूतांमध्यें उत्तम आहेस ४८.४९. कर्मप्रमाणें प्राप्त झालेल्या नानाविध योनींमध्यें स्थित होऊन तूंच अंतर्यामी स्वतः सर्व कर्म करतोस. कर्ता व करविता या दोघांहून निराळा असाच कोणी अतिशय ( शुद्धरूप ), पूर्वोक्त नियम करतो. ( निर्विशेष चिन्मात्रामध्येंच जीवेशादिक कल्पित आहे ) ५०. हे सनातन, तुला नमस्कार असो; अशा प्रकारच्या शुभ, अति अद्भुत व सिद्धांच्या तोंडून निघालेल्या वाणी, हे राजन्, अंतरिक्षांतून ऐकूं येऊं लागल्या ५१. इतक्यांत रुद्रसंभव, बलवान् व क्रोधानें मूर्छित झालेल्या नंदीनें पिनाक उचलून संग्रामांत विष्णूच्या मस्तकांवर प्रहार केला ५२. तेव्हां सुरोत्तम विष्णु नंदीकडे पाहून हंसला. त्या भगवान् सर्वभूतपति हरीनें त्याचें स्तंभन केलें ५३. नंतर विष्णु ब्रह्मासारखा होऊन तेजानें जळत असल्याप्रमाणें पण क्षमायुक्त होऊन खांबासारखा अचल उभा राहिला ५४. तो शत्रूंचें दमन करणारा अव्यय हरि शांतात्मा, अचिंत्य, अप्रमेय व अजेय असल्याकारणानें युगांताच्या अग्नीसारखा होऊन राहिला ५५. प्रसन्न झालेल्या त्यानें बुद्धिमान् रुद्राला यज्ञभाग दिला. त्यामुळें ज्यानें आपला अभिलाष सोडला आहे असा तो देवोत्तम शंकर विष्णूच्या धर्मामध्यें नित्य तत्पर झाला ५६. हे राजेंद्रा, विष्णूनें त्या यज्ञाला पुनः साधलें. महीपते, विष्णु व रुद्र यांच्या त्या मोठ्या घोर संग्रामांत सर्व गण आपापल्या पक्षांत जाऊन उभे राहिले ५७. दक्षयज्ञाच्या विनाशप्रसंगीं दोन्ही पक्षांतील लोकांचें आपापल्या पक्षांत राहूनच युद्ध झालें. त्यावेळीं यज्ञाचा विनाश लोकांमध्यें प्रतिष्ठित झाला ५८. हे राजेंद्रा, सर्वभूतांमध्यें सनातन यज्ञ हितकर आहे. त्या दक्षप्रजापतीला यज्ञफळ मिळालें ५९. ही येथें सांगितलेली दिव्य कथा पवित्र व शुद्धचित्त

ध्यात्मं देवलोके महीयते । एष पौष्करको नाम प्रादुर्भावो महात्मनः ६१ पुराणे पौष्करे चैव मया द्वैपायनेरितः । यथावदनुपूर्वेण संस्कृतः परमर्षिभिः ६२ यश्चैनमग्र्यं पुरुषं पुराणं सदाप्रमत्तः शृणुयाद्यथोक्तम् । अवाप्य कामानिह वीतशोकः परत्र च स्वर्गफलानि भुंक्ते ६३
[ ११८८ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि द्वात्रिंशोऽध्यायः ॥ ३२ ॥

जनमेजय उवाच ॥ प्रादुर्भावः पुराणेषु विष्णोरमिततेजसः । सतां कथयतां विप्र वाराह इति नः श्रुतः १ न जाने तस्य चरितं न विधिं नैव विस्तरम् । न कर्मगुणसद्भावं न हेतुं न मनीषितम् २ किमात्मको वराहोऽसौ का मूर्तिः कास्य देवता । किमाचारः किंप्रभावः किं वा तेन पुरा कृतम् ३ एतन्मे शंस तत्त्वेन वाराहं श्रुतिविस्तरम् । यज्ञार्थे च समेतानां द्विजातीनां महात्मनाम् ४ वैशंपायन उवाच ॥ एतत्ते कथयिष्यामि पुराणं ब्रह्मसंमितम् । नानाश्रुतिसमायुक्तं कृष्णद्वैपायनेरितम् । महावराहचरितं कृष्णस्याद्भुतकर्मणः ५ यथा नारायणो राजन्वाराहं वपुरास्थितः । दंष्ट्रया गां समुद्रस्थामज्जहारारिसूदनः ६ छान्दसीभिरुदाराभिः श्रुतिभिः समलंकृतः । शुचिः प्रयतवाग्भूत्वा निबोध जनमेजय ७ इदं पुराणं परमं पुण्यं वेदैश्च संमितम् । नानाश्रुतिसमायुक्तं नास्तिकाय न कीर्तयेत् ८ पुराणमेतदखिलं सांख्यं योगं तथैव च । कार्त्स्न्येन विधिना प्रोक्तं योऽस्यार्थं ज्ञास्यते बुधः ९ विश्वे देवास्तथा साध्या रुद्रादित्यास्तथाश्विनौ । प्रजानां पतयश्चैव सप्त चैव महर्षयः १०

---

होऊन जो ब्राम्हणांस सांगतो तोच खरा बुद्धिमान् होय ६०. या सर्व अध्यात्मशास्त्राचें अध्ययन केलें असतां तो अध्ययनकर्ता देवलोकीं पूज्य होतो. त्या महात्म्या भगवानाचा हा पौष्करक नांवाचा अवतार आहे ६१. पौष्कर पुराणांत व्यासानें सांगितलेला व परम ऋषींनीं क्रमानें यथार्थपणें संस्कारयुक्त केलेला हा अवतार मी तुला सांगितला आहे ६२. जो कोणी या श्रेष्ठ पुराणपुरुषाचें पूर्वोक्त रीत्या सदा सावधान चित्तानें श्रवण करतो तो सर्व मनोरथ पूर्ण झाल्याकारणानें या लोकीं शोकरहित होतो व परलोकीं स्वर्गफल भोगतो ६३. इति श्रीमहा० खि० ह० भवि० बत्तिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ ३२ ॥

जनमेजयः—हे ब्राह्मणा, कथा सांगणाऱ्या संतांच्या तोंडून पुराणांत अमित तेजस्वी विष्णूचा वाराह या नांवाचा अवतार आम्ही ऐकला आहे १. पण त्याचा विधि, चरित, विस्तार, कर्म-गुणयुक्त भाव, कारण व अभिप्राय मला माहीत नाहीं २. हा वराह कोणत्या स्वरूपाचा होता? त्याची मूर्ति कोणती होती? त्याची देवता कोणती? त्याचा आचार कसा काय होता? प्रभाव कोणत्या प्रकारचा होता व त्यानें पूर्वी काय केलें? ३. हें कर्णोपकर्णी लोकांत पसरलेलें वृत्त मला व या यज्ञाकरितां येथें एकत्र जमलेल्या महात्म्या ब्राह्मणांना तत्त्वतः सांग ४. वैशंपायनः—कृष्णद्वैपायनानें सांगितलेलें हें अनेक वार्तांनीं युक्त व वेदतुल्य पुराण मी तुला सांगतों. अद्भुत कर्मै करणाऱ्या कृष्णाचेंच तें महावराहचरित आहे ५. हे राजन्, अरिसूदन नारायणानें वराहाचें रूप घेऊन दाढेनें समुद्रामध्यें असलेल्या पृथ्वीचें उद्धरण कसें केलें व वैदिक उत्कृष्ट श्रुतींनीं तो अलंकृत कसा झाला तें, हे जनमेजया, तूं शुचि व नियतवाक् होऊन ऐक ६,७. हें पुराण अतिशय पुण्यकारक, वेदतुल्य आणि अनेक आख्यानांनीं भरलेलें आहे. पण तें नास्तिकाला सांगूं नये ८. हें सर्व पुराण म्हणजे ज्यांत सांख्य व योग यांचा पूर्णपणें संग्रह केला आहे, असें आहे. यास्तव, याचा यथार्थ अर्थ जो पुरुष जाणतो तोच खरा पंडित असून इतर कथामात्रोपजीवी पामर होत ९.

मनःसंकल्पजाश्चैव पूर्वजाश्च महर्षयः । वसवोऽप्सरसश्चैव गन्धर्वा यक्षराक्षसाः ११ दैत्याः पिशाचा नागाश्च भूतानि विविधानि च । ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा म्लेच्छादयो भुवि १२ चतुष्पदानि सर्वाणि तिर्यग्योनि गतानि च । जंगमानि च सत्त्वानि यच्चान्यज्जीवसंज्ञितम् १३ पूर्णे युगसहस्रान्ते ब्राह्मेऽहनि तथा गते । निर्वाणे सर्वभूतानां सर्वोत्पातसमुद्भवे १४ हिरण्यरेतास्त्रिशिखस्ततो भूत्वा वृषाकपिः शिखाभिस्त्रिविधांल्लोकान्संशोषयति देहिनः १५ दह्यमानास्ततस्तस्य तेजोराशिभिरग्रतः । विवर्णवक्त्रदग्धांगा हतार्चिष्मद्भिराननैः १६ सांगोपनिषदा वेदा इतिहासपुरोगमाः । सर्वविद्याश्रयाश्चैव सत्यधर्मपरायणाः १७ ब्रह्माणमग्रतः कृत्वा छन्दतो विश्वतोमुखम् । सर्वे देवगणाश्चैव त्रयस्त्रिंशच्च कोटयः १८ तस्मिन्नहानि संप्राप्ते तं हंसं महदक्षरम् । प्रविशन्ति महायोगं हरिं नारायणं प्रभुम् १९ तेषां भूयः प्रविष्टानां निधनोत्पत्तिरुच्यते । यथा सूर्यस्य सततमुदयास्तमयाविह २० पूर्णे युगसहस्रान्ते कल्पो निःशेष उच्यते । तस्मिन् जीवकृतं सर्वं निःशेषमवतिष्ठते २१ संहृत्य लोकान्सकलान्त्स सदेवासुरपन्नगान् । कृत्वात्मगर्भे भगवानास्त एको जगद्गुरुः २२ यःस्रष्टा सर्वभूतानां कल्पान्तेषु पुनः पुनः । अव्यक्तः शाश्वतो देवस्तस्य सर्वमिदं जगत् २३ नष्टार्ककिरणे लोके चंद्ररश्मिविवर्जिते । त्यक्तभूताग्निपवने क्षीणयज्ञवषट्क्रिये २४

---

विश्वेदेव, साध्य, रुद्र, आदित्य, अश्विनीकुमार, प्रजापति, सात महर्षी १०, मनःसंकल्पापासून उत्पन्न झालेले पूर्वज महर्षी, वसु, अप्सरा, गंधर्व, यक्ष, राक्षस, दैत्य, पिशाच, नाग, नानाप्रकारचीं भूतें, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, भूलोकांतील म्लेच्छादिक, सर्व चतुष्पाद ( पशू ), वृक्षादि तिर्यग्योनींतील प्राणी, इतर क्षुद्र जंगम ( चर ) जीव, आणि ज्याला ज्याला जीव अशी संज्ञा आहे ते सर्व प्राणिजात ( हें सर्व त्या वराहाचें रूप आहे ) ११–१३. सहस्रयुगांचा अंत पूर्ण होऊन ब्राह्म दिवस निघून गेला असतां सर्व भूतांचा प्रलय होण्याचा प्रसंग आला. सर्व उत्पात उद्भवले १४. हिरण्यरेता वृषाकपि तीन शिखांनीं युक्त होऊन आपल्या ज्वालांनीं देहवान् प्राण्यांचें नानाप्रकारचे लोक शुष्क करून सोडूं लागला १५. त्यानंतर अग्रभागीं त्याच्या तेजोराशींनीं जळणारे सर्व प्राणी विवर्णमुख व दग्ध शरीर झाले. ज्वालायुक्त मुखांनीं ते मारले गेले १६. शिक्षादि अंगें व उपनिषदें यांसह वेद, इतिहासप्रभृति सर्व विद्यांचे आश्रय आणि विद्वान् व सत्यधर्मपरायण जन ईश्वराच्या इच्छेनें सर्वतोमुख झालेल्या ब्रह्मदेवास पुढें करून सर्व तेतीसकोटी देव सुद्धां, तो दिवस आला असतां, महत् अक्षर, हंस, प्रभु, नारायण व महायोगी हरि या नांवाच्या परमात्म्यामध्यें प्रवेश करितात १७--१९ ज्याप्रमाणें सूर्याचे उदय व अस्त ( त्याचें बिंब आह्मांला दिसणें व न दिसणें या कारणानें ) सतत होतात त्याप्रमाणें नारायणामध्यें प्रविष्ट झालेल्या त्या सर्वांचें निधन व उत्पत्ति वारंवार होते २०. सहस्रयुगांचा अंत परिपूर्ण झाला असतां कल्प निःशेष झाला असें ह्मणतात. त्यावेळीं जीवांची सर्व चेष्टा बंद पडते २१. देव, असुर, सर्प, इत्यादि सर्व लोकांचा उपसंहार करून व त्यांना आपल्या उदरांत सांठवून जगद्गुरु भगवान् एकटाच असतो २२. कल्प संपला असतां जो वारंवार सर्व भूतांस उत्पन्न करणारा अव्यक्त व शाश्वत देव त्याचें हें सर्व जगत् आहे २३. सूर्यकिरण नष्ट झाले असतां, सर्व लोक चंद्रकिरण शून्य झाला असतां, भूत–अग्नि व वायु यांनीं जगाचा त्याग केला असतां,

आशिगणसंघाते सर्वप्राण्यचरे पथि । अमर्यादाकुले रौद्रे सर्वतस्तमसावृते २५ अदृश्ये सर्वलोकेऽस्मिन्नभावे सर्वकर्मणाम् । प्रशान्ते सर्वसंपाते नष्टे वैरपरिग्रहे २६ गते स्वभावसंस्थाने लोके नारायणात्मके । परमेष्ठी हृषीकेशः शयनायोपचक्रमे २७ पीतवासा लोहिताक्षः कृष्णो जीमूतसंनिभः । शिखासहस्रविकचं जटाभारं समुद्वहन् २८ श्रीवत्सकलितं पुण्यं रक्तचन्दनभूषितम् । वक्षो बिभ्रन्महाबाहुः सविद्युदिव तोयदः २९ पुंडरीकसहस्रस्य मालास्य शुशुभे तदा । पत्नी चैव स्वयं लक्ष्मीर्देहमावृत्य तिष्ठति ३० ततः स्वपिति धर्मात्मा सर्वलोकपितामहः । किमप्यमितविक्रान्तो निद्रायोगमुपागतः ३१ ततो वर्षसहस्रे तु पूर्णे स पुरुषोत्तमः । स्वयमेव विभुर्भूत्वा बुध्यते विबुधाधिपः ३२ ततश्चिन्तयते भूयः सृष्टिं लोकस्य लोककृत् । पितृदेवासुरनरान्पारमेष्ठ्येन कर्मणा ३३ ततश्चिन्तयते कार्यं देवेषु समितिंजयः । संभवं सर्वलोकस्य विदधाति स वाक्पतिः ३४ कर्ता चैव विकर्ता च संहर्ता च प्रजापतिः । धाता विधाता च तथा संयमो नियमो यमः ३५ नारायणपरा देवा नारायणपराः क्रियाः । नारायणपरो यज्ञो नारायणपरा श्रुतिः ३६ नारायणपरो मोक्षो नारायणपरा गतिः । नारायणपरो धर्मो नारायणपरः क्रतुः ३७ नारायणपरं ज्ञानं नारायणपरं तपः । नारायणपरं सत्यं नारायणपरं पदम् । नारायणपरो देवो न भूतो न भविष्यति ३८ स्वयंभूरिति विज्ञेयः स ब्रह्मभुवनाधिपः । स वायुरिति विज्ञेय एष यज्ञः

---

यज्ञांतील वषट्कार क्षीण झाले असतां, पक्ष्यांच्या निरनिराळ्या जातींचे संघ नाहींसे झाले असतां, मार्ग सर्व प्राण्यांच्या संचारानें रहित झाले असतां, जग अमर्यादेनें आकुल, भयंकर, सर्वतः तमानें आवृत व त्यामुळेंच या लोकांतील सर्व अदृश्य झालें असतां, सर्व कर्मांचा अभाव झाला असतां, सर्व प्रकारचा संपात ( संबंध ) प्रशांत झाला असतां, वैरपरिग्रह नष्ट झाला असतां, सर्व लोक आपल्या स्वाभाविक संस्थानास प्राप्त होऊन नारायणरूप झाला असतां परमेष्ठी हृषीकेश शयन करण्यास आरंभ करता झाला २४–२७. ज्याचें वस्त्र पीतवर्ण आहे, नेत्र आरक्त आहेत, अंगकांति मेघासारखी काळी आहे, जो सहस्रावधि ज्वालांनीं विकास पावणारा जटाभार मस्तकावर वहात आहे २८. जो श्रीवत्सयुक्त, पुण्य व रक्तचंदनभूषित वक्षःस्थल धारण करीत आहे, असा तो विद्युद्युक्त मेघासारखा महाबाहु विष्णु शयन करूं लागला २९. त्यावेळीं त्याच्या गळ्यांतील हजारों कमलांची माळ फार शोभली. त्याची पत्नी स्वतः लक्ष्मी त्याच्या शरीरास आच्छादित करून रहाते ३०. त्यानंतर तो धर्मात्मा व अमितपराक्रमी सर्व लोकपितामह अवर्णनीय रीत्या निद्रायोगास प्राप्त होऊन स्वस्थ निजतो ३१. त्यानंतर सहस्र वर्षें पूर्ण झालीं असतां तो देवांचा अधिप, पुरुषोत्तम आपोआप विभु होऊन जागा होतो ३२ नंतर तो लोककर्ता पुनः लोकांच्या उत्पत्तीविषयीं विचार करतो. पितर, देव, असुर व नर यांस परमेष्ठीसंबंधीं कर्मानें निर्माण केल्यावर संग्रामांत शत्रूंना जिंकणारा तो देवांविषयींच्या कार्याचा विचार करतो. नंतर तो वाक्पति सर्व लोकांची उत्पत्ति करतो ३३, ३४. तो कर्ता, विकर्ता, संहर्ता, प्रजापति, धाता, विधाता, संयम, नियम व यम आहे ३५. सर्व देव नारायणपर आहेत. सर्व क्रिया नारायणपर आहेत, यज्ञ नारायणपर आहे, सर्व वेद नारायणपर आहेत ३६. मोक्ष नारायणपर, सर्व गति नारायणपर, धर्म नारायणपर व क्रतु नारायणपर आहे ३७. ज्ञान नारायणपर, तप नारायणपर, सत्य नारायणपर, उत्तमपद नारायणपर व देव नारायणपर आहे. नारायण नित्य असल्यामुळें

सनातनः ३९ सदसच्च स विज्ञेयः स यज्ञः स प्रजाकरः। यद्वेदितव्यं त्रिदशैस्तदेष परिविन्दति ४० यच्च वेद्यं भगवतो देवा अपि न तद्विदुः। प्रजानां पतयः सप्त ऋषयश्च महर्षिभिः ४१ नास्यान्तमधिगच्छन्ति ततोऽनन्त इति श्रुतिः। यदस्य परमं रूपं तन्न पश्यन्ति देवताः ४२ प्रादुर्भावेषु संभूतं यत्तदर्चन्ति देवताः। यत्तद्दर्शितवान्देवः कस्तदन्वेष्टुमर्हति ४३ ग्रामणीः सर्वभूतानामग्निमारुतयोर्गतिः। तेजसस्तपसश्चैव निधानममृतस्य च ४४ चतुराश्रमवर्णेषु चातुर्होत्रफलाशनः। चतुःसागरपर्यंतश्चतुर्युगनिवर्तकः ४५ तदेष संहृत्य जगत्कृत्वा गर्भस्थमात्मनः। मुमोचाण्डं महायोगी धृतं वर्षसहस्रिकम् ४६ सुरासुरद्विजभुजगाप्सरोगणैर्महौषधिक्षितिधरयक्षगुह्यकैः। प्रजापतिः श्रुतिधररक्षसां कुलं तदासृजज्जगदिदमात्मना प्रभुः ४७ [ ४२३५ ] इति श्रीम० खि० ह० भविष्य० त्रयस्त्रिंशोऽध्यायः॥ ३३॥

वैशंपायन उवाच॥ जगदण्डमिदं पूर्वमासीत्सर्वं हिरण्मयम्। प्रजापतेर्मूर्तिमयमित्येवं वैदिकी श्रुतिः १ ततो वर्षसहस्रान्ते बिभेदोर्ध्वमुखं विभुः। लोकसंजननार्थाय बिभेदाधोमुखं पुनः २ भूयोऽष्टधा बिभेदाण्डं प्रभुर्वै लोकयोनिकृत्। चकार जगतश्चात्र विभागं सर्वभागवित् ३ यच्छिद्रमूर्ध्वमाकाशं परा सुकृतिनां गतिः। विहितं विश्वयोगेन यदधस्तद्रसातलम् ४ यदण्डमकरोत्पूर्वं देवलोकसिसृक्षया। समंतादष्टधा यानि च्छिद्राणि कृतवांस्तु

---

कधीं झाला नाहीं व होणार नाहीं ३८ तो भुवनाधिप ब्रह्मा स्वयंभू आहे, असें जाणावें. तोच वायु आहे, असें जाणावें. हाच सनातन यज्ञ आहे ३९ तो सत् व असद्रूप आहे असें जाणावें. तोच यज्ञ व तोच प्रजाकर आहे. इंद्रियांच्या योगानें प्रकाशित होणारें जें कांहीं आहे तें सर्व त्याच्याच योगानें प्रकाशित होतें ४०. पण याच्या योगानेंच प्रकाशित होणारें जें स्वरूप त्याला देव ( ह्म० इंद्रियें ) विषय करीत नाहींत. प्रजांचे पति, देवांसह सतऋषी यांना याचा अंत कळत नाहीं. ह्मणून याला अनंत असें म्हणतात. याच्या परम रूपामध्येंच देवता पहातात ४१,४२. अवतारांमध्यें उत्पन्न झालेल्या रूपाचेंच पूजन देव करितात. जें या देवानें पाहिलें नाहीं. तें पहाण्यास दुसरा कोण समर्थ आहे? ४३. तो सर्व भूतांचा नायक, जाठर अग्नि व प्राण यांची गति, तेज, तप व अमृत यांचें निधान, चार आश्रम व वर्ण यांत चातुर्होत्र फळ भोगणारा, चतुःसागरांची सीमा आणि चार युगें करणारा आहे ४४,४५. तो हा महायोगी सर्व जगाचा उपसंहार करून व त्याला आपल्या उदरांत साठवून सहस्र वर्षे धारण केलेलें अंडें सोडतो ४६. नंतर तो प्रभु प्रजापति सुर, असुर, द्विज, भुजंग, अप्सरांचे गण, महा औषधि, पर्वत, यक्ष, गुह्यक यांसह श्रुतिधर राक्षसांचें कुळ व हें जग स्वतः उत्पन्न करतो ४७. इति श्रीमहा० खि० ह० भवि० तेतिसावा अध्याय समाप्त झाला. ॥ ३३ ॥

वैशंपायनः—हें जगाचें अंड पूर्वी सर्व हिरण्मय व तें प्रजापतीच्या मूर्तिमय होतें, अशी वैदिकी श्रुति आहे १. त्यानंतर एक सहस्र वर्षें पुरीं झालीं असतां त्या विभूनें तें अंडें वर तोंड करून फोडलें व लोकांच्या उत्पत्तीकरितां त्यानें पुनः त्याला खालून तोंड केलें २. नंतर त्या लोकयोनिकर्त्या प्रभूनें पुनः त्या अंड्याला आठ भोकें पाडलीं ( पांच ज्ञानेंद्रियांचीं पांच छिद्रें, व वाक्, हात व पाय यांचीं छिद्रें मिळून आठ भोकें. ) सर्व भागांना जाणणाऱ्या देवानें अशारीतीनें जगाचा विभाग केला ३. ब्रह्मरंध्रनामक जे ऊर्ध्व छिद्र तीच पुण्यवानांची परागति आहे. विश्वयोगानें त्या देवानें अधोभागीं असलेल्या

सः ५ विदिशस्ता दिशः सर्वा मनसैवाकरोद्द्विधा । नानारागविरागाणि यान्यण्डशकलानि वै ६ बहुवर्णधराश्चित्रा बभूवुस्ते बलाहकाः । यदण्डमध्ये स्कन्नं तु द्रवमासीत्समाहितम् ७ जातरूपं तदभवत्तत्सर्वं पृथिवीतले । तस्य क्लेदार्णवौघेन प्राच्छाद्यत समंततः ८ पृथिवी निखिला राजन्युगान्ते सागरैरिव । यच्चाण्डमकरोत्पूर्वं देवलोकचिकीर्षया । तत्र तत्सलिलं स्कन्नं सोऽभवत्कांचनो गिरिः १० तेनाम्भसा प्लुताः सर्वा दिशश्चोपदिशस्तथा । अन्तरिक्षं च नाकं च यच्चान्यत्किंचिदन्तरम् ११ यत्र यत्र जलं स्कन्नं तत्र तत्र स्थितो गिरिः । शैलैः समस्तैर्गहना विषमा मेदिनी भवत् १२ तैः सापर्वतजालौघैर्बहुयोजनविस्तृतैः । पीडिता गुरुभिर्देवी पृथिव्यव्यथिताऽभवत् १३ महीतले भूरिजलं दिव्यं नारायणात्मकम् । हिरण्मयं समुद्दिष्टं तेजो विमलरूपितम् १४ अशक्ता वै धारयितुमधः सा प्रविवेश ह । पीड्यमाना भगवतस्तेजसा तेन सा क्षितिः १५ पृथिवीं विशतीं दृष्ट्वा तामधो मधुसूदनः । उद्धारार्थं मनश्चक्रे लोकानां हितकाम्यया १६ श्रीभगवानुवाच ॥ मत्तेज एव बलवत्समासाद्य तपस्विनी । रसातलं विशेद्देवी पंके गौरिव दुर्बला १७ धरण्युवाच ॥ त्रिविक्रमायामितविक्रमाय महानृसिंहाय चतुर्भुजाय । श्रीशार्ङ्गचक्रासिगदाधराय नमोऽस्तु तस्मै पुरुषोत्तमाय १८ त्वयात्मना धार्यते वै त्वया संह्रियते जगत् । त्वं धारयसि भूतानि भुवनं त्वं बिभर्षि च १९ यत्त्वया धार्यते किंचित्तेजसा च बलेन च । ततस्तव प्रसादेन मयापश्चात्तु धार्यते २० त्वया धृतं धारयामि

---

छिद्राला नरक देणारें केलें ४. देवलोकास उत्पन्न करण्याच्या इच्छेनें त्यानें जें पूर्वी अंडें ( शरीर ) केलें होतें त्याला समंततः आठ छिद्रें केलीं ५. सर्व दिशा व विदिशा त्यानें मनानेंच द्विधा ( स्थूल व सूक्ष्म ) केल्या. त्या अंड्यांचीं शकलें अनेक रंगांनीं विचित्र झालीं होतीं ६. तेंच अनेक रंग धारण करणारे चित्र-विचित्र मेघ झाले. अंडाच्या मध्यभागीं जें द्रवरूप तत्त्व गळलें होतें व तेथेंच चांगल्यारीतीनें राहिलें तेंच सर्व पृथ्वीतळीं सोनें झालें हे राजन्, युगांतीं सागरांच्या योगानें जशी, त्याप्रमाणें त्या द्रवाच्या आर्द्र जलभारानें पृथ्वी समंततः आच्छादित झाली. देवलोक निर्माण करण्याच्या इच्छेनें पूर्वी जें अंडें केलें होतें त्यांत तें जल गळून त्याचा सुवर्ण पर्वत झाला. त्या जलाच्या योगानें सर्व दिशा व उपदिशा, अंतरिक्ष, स्वर्ग, व दुसरें जें अंतर होतें तें सर्व भरून गेलें ७-११. जेथें जेथें तें जल गळलें होतें तेथें तेथें पर्वत स्थित झाला. याप्रमाणें सर्व पर्वतांनीं मेदिनी गहन व विषम झाली १२. त्या अनेक योजनें विस्तृत असलेल्या भारी पर्वतसमूहांनीं पीडलेली ती देवी पृथिवी व्याकुळ झाली १३. पृथ्वीतळीं दिव्य, नारायणात्मक, हिरण्मय, तेजानें विमलरूप झालेलें पुष्कळ जल झालें १४. तेव्हां त्याला धारण करण्यास असमर्थ झालेली व भगवानाच्या त्या तेजानें पीडित झालेली ती क्षिति खालीं प्रविष्ट झाली १५. पण ती खालीं बुडत आहे असें पाहून लोकांचें हित करण्याच्या इच्छेनें मधुसूदनानें तिचा उद्धार करण्याचें मनांत आणलें १६. श्रीभगवान्:—माझ्या बलाढ्य तेजालाच प्राप्त होऊन, चिखलांतील दुर्बळ गायीप्रमाणें ही बिचारी देवी रसातळांत जाईल १७. धरणीः—त्रिविक्रमाला, अमित पराक्रमी व चतुर्भुज नृसिंहाला, श्रीशार्ङ्ग, चक्र, खड्ग, व गदा यांस धारण करणाराला, व त्या पुरुषोत्तमाला नमस्कार असो १८. हे देवा, तूंच स्वतः जगाचें धारण करितोस, तूंच संहार करतोस. तूं भूतांचें धारण करतोस. भुवनाचें पोषण करतोस १९. तूं तेजानें व बलानें जें कांहीं धारण करतोस तेंच मी मागून तुझ्या प्रसादानें

नाधृतं धारयाम्यहम् । न हि तद्विद्यते रूपं यत्त्वया न तु धार्यते २१ त्वमेव पुरुषो वीर नारायण युगे युगे । मम भारावतरणं जगतो हितकाम्यया २२ तवैव तेजसाक्रान्तां रसातलतलं गताम् । त्रायस्व मां सुरश्रेष्ठ त्वामेव शरणं गताम् २३ दानवैः पीड्यमानाहं राक्षसैश्च दुरात्मभिः । त्वामेव शरणं नित्यमुपयामि सनातनम् २४ तावन्मेऽस्ति भयं भूयो यावन्न त्वां ककुद्मिनम् । शरणं यामि मनसा शतशोऽप्युपलक्षये २५ श्रीभगवानुवाच ॥ मा भैर्धरणि कल्याणि शान्तिं व्रज समाहिता । एष त्वामुचितं स्थानमानयामि मनीषितम् २६ वैशंपायन उवाच ॥ ततो महात्मा मनसा दिव्यं रूपमचिन्तयत् । किं नु रूपमहं कृत्वा उद्धरामि वसुन्धराम् २७ जले निमग्नां धरणीं येनाहं वै समुद्धरे । इत्येवं चिन्तयित्वा तु देवो नारायणः प्रभुः २८ जलक्रीडारुचिस्तस्माद्वाराहं रूपमस्मरत् । हरिरुद्धरणे युक्तस्तदा भूदस्य भूमिभृत् २९ अधृष्यं सर्वभूतानां वाङ्मयं ब्रह्मसंमितम् । दशयोजनविस्तारमुच्छ्रितं शतयोजनम् ३० नीलमेघप्रतीकाशं मेघस्तनितनिःस्वनम् । महागिरेः संहननं श्वेतदीप्तोग्रदंष्ट्रिणम् ३१ विद्युदग्निप्रतीकाशमादित्यसमतेजसम् । पीनवृत्तायतस्कन्धं दृप्तशार्दूलगामिनम् ३२ पीनोन्नतकटीदेशं वृषलक्षणपूजितम् । रूपमास्थाय विपुलं वाराहंममितं हरिः ३३ पृथिव्युद्धरणार्थाय प्रविवेश रसातलम् । वेदपादो यूपदंष्ट्रः क्रतुन्दतश्चितीमुखः ३४ अग्निजिह्वो दर्भरोमा ब्रह्मशीर्षो महातपाः । अहोरात्रेक्षणधरो वेदाङ्गश्रुतिभूषणः ३५ आज्य-

---

आपल्या पाठीवर वागवितें २०. तूं धारण केलेलेंच मी धारण करतें. तूं न धारण केलेलें कांहींही मी धारण करीत नाहीं. तूं धारण करीत नाहींस असें रूपच नाहीं २१. तूंच पुरुष, वीर व युगा–युगांतील नारायण आहेस. जगाच्या हिताच्या इच्छेनें माझा भार उतर. तुझ्याच तेजानें आक्रांत झालेल्या, रसातळास गेलेल्या व तुलाच शरण आलेल्या माझें, हे सुरश्रेष्ठा, तूं रक्षण कर २३. दानव व दुरात्मे राक्षस यांच्या योगानें मी पीडली जात आहे. यास्तव मी नित्य व सनातन अशा तुलाच शरण आलें आहे २४. मी तुज धुंधराला मनानें शरण आलें नाहीं तोंवरच मला शतशः भय वाटत असतें २५. श्रीभगवान्:— हे कल्याणि, धरणि, भीऊं नको. शांतचित्त होऊन शांतीचा स्वीकार कर. तुला इष्ट असलेल्या उचित स्थानीं हा पहा मी तुला आणतों २६. वैशंपायनः–– त्यानंतर त्या महात्म्यानें मनानें दिव्यरूपाविषयीं असें चिंतन केलें. मी कोणतें रूप धारण करून या पृथ्वीचा उद्धार करूं बरें ? ज्याच्या योगानें मला जलांत निमग्न झालेल्या पृथ्वीचा उद्धार करितां येईल असें रूप धारण केलें पाहिजे. असा विचार करून देव नारायण प्रभु जलक्रीडेची रुचि झाल्याकारणानें वराहाचें रूप आठवता झाला आणि भूमीचें धारण करणाऱ्या हरीनें तिचा उद्धार करण्याचा प्रयत्न चालविला २७–२९. सर्व भूतांस अजिंक्य असलेलें, वाङ्मय, वेदतुल्य, दश योजनें विस्तीर्ण व शतयोजनें उंच ३०, नीलमेघासारखें काळें, मेघाच्या गडगडाटाप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे असें, महापर्वतासारख्या दृढ शरीरानें युक्त, ज्याची दंष्ट्रा ( दाढ ) श्वेतवर्ण, दीप्त व उग्र आहे ३१. विद्युताग्नीप्रमाणें भास्वर, आदित्यासारखें चकचकीत, ज्याचे खांदे पुष्ट व विस्तीर्ण आहेत असें मत्त व्याघ्राप्रमाणें गमन करणारें, ज्याचा कटीभाग पुष्ट व उंच आहे असें वृषभाच्या लक्षणांनीं पूजित, असें विपुल व अमित वाराहरूप धारण करून हरि पृथ्वीचा उद्धार करण्याकरितां रसातळांत शिरला. वेद हेच ज्याचे पाय आहेत, स्तंभ ही दंष्ट्रा आहे, क्रतु

नासाः स्रुवस्तुण्डः सामघोषस्वरो महान् । सत्यधर्ममयः श्रीमान्क्रमविक्रमसत्कृतः ३६
क्रियासत्रमहाघोणः पशुजानुर्मखाकृतिः । उद्गात्रान्त्रो महालिंगो बीजौषधिमहाफलः ३७
वाय्वन्तरात्मा मंत्रस्फिग्विक्रमः सोमशोणितः । वेदीस्कन्धो हविर्गन्धो हव्यकव्यातिवेग-
वान् ३८ प्राग्वंशकायो द्युतिमान्नानादीक्षाभिरर्चितः । दक्षिणाहृदयो योगी महासत्रमयो
महान् ३९ उपाकर्मोष्ठरुचकः प्रवर्ग्यावर्तभूषणः । नानाछन्दोगतिपथो गुह्योपनिषदासनः ४०
छायापत्नी सहायो वै मणिशृंग इवोच्छ्रितः । भूत्वा यज्ञवराहोऽसौ युगपत्प्राविशद्गुरुः ४१
अद्भिः संच्छादितामुर्वीं सतामार्च्छत्प्रजापतिः । रसातलतले मग्नां पातालान्तरसंश्रयाम् ४२
प्रभुर्लोकहितार्थाय दंष्ट्राग्रेणोज्जहार गाम् । ततः संस्थानमानीय पृथिवीं पृथिवीधरः ४३
मुमोच पूर्वं सहसा धारयित्वा धराधरः । ततो जगाम निर्वाणं मेदिनी तस्य धारणात् ४४
चकार च नमस्कारं तस्मै देवाय संभवे । एवं यज्ञवराहेण भूत्वा भूतहितार्थिना ४५
उद्धृता पृथिवी देवी लोकानां हितकाम्यया । अथोद्धृत्य क्षितिं देवो जगतः स्थापने-
च्छया ४६ पृथिवीप्रविभागाय मनश्चक्रेऽम्बुजेक्षणः । रसातलगतामेवं विचिन्त्य स सुरोत्तमः ४७
ततो विभुः प्रवरवराहरूपधृक् वृषाकपिः प्रसभमथैकदंष्ट्रया । समुद्धरद्धरणिमथैकविक्रमो

---

हेंच दांत आहेत. चिति हेंच मुख आहे ३२-३४. अग्नि हीच जिह्वा आहे, दर्भ हे रोम आहेत व प्रणव हेंच मस्तक आहे. असा तो महातपस्वी अहो-रात्र हेच दोन नेत्र धारण करणारा व वेदांचीं अंगें हींच कुंडलें कानांत घातलेला वराहरूपी हरि रसातलांत गेला ३५. यज्ञांतील हव्य घृत हीच त्याची नासा ( नाक ), स्रुवा हेंच तोंड व सामघोष हाच मोठा ध्वनि होता. तो सत्यधर्ममय, श्रीमान्, व क्रमविक्रमानें सत्कारयुक्त होता ३६. क्रियामय सत्रें हींच त्याची घोणा ( नासिका ) होती. पशू हेच त्याचे गुडघे होते. मख हीच आकृति होती. उद्गाता हींच त्याचीं आंतडीं होतीं. महालिंग व बीजभूत औषधि हेंच महाफळ यांनीं तो युक्त होता ३७. वायु हाच त्याचा अंतरात्मा, मंत्रशक्ति हाच विक्रम, सोमरस हेंच रक्त, वेदी हाच स्कंध ( खांदा ), हवि हाच त्याचा गंध, हव्य व कव्य या अतिवेगानें युक्त ३८, प्राग्वंश हेंच ज्याचें दीप्त शरीर आहे असा, नाना दीक्षांनीं पूजित झालेला, दक्षिणा हेंच ज्याचें हृदय आहे असा, योगी, महासत्रमय, महान्, उपाकर्मनामक स्मार्त वेदोपकरण हेंच ज्याचें ओष्ठभूषण आहे, प्रवर्ग्य हें ज्याचें नाभिभूषण आहे, नाना छंद हेच ज्याचे गमन मार्ग आहेत, गुह्य उपनिषद हेंच ज्याचें आसन आहे व छायापत्नीचें ज्याला सहाय्य आहे असा हा गुरु मणिशृंगासारखा उंच यज्ञवराह होऊन अकस्मात् प्रविष्ट झाला ३९,४०. तो प्रजापति जलानें आच्छादित झालेल्या त्या पृथ्वीपाशीं गेला. त्यावेळीं पाताळाच्या अंतर्भागाचा आश्रय केलेली ती रसातळांत मग्न झाली होती ४१,४२. प्रभूनें लोकहिताकरितां तिला दाढेच्या अग्रानें उचललें. नंतर त्या पृथ्वीधरानें तिला योग्यस्थानीं आणून व प्रथम सोडून मागाहून सहसा धरलें. त्यानें पुनः धरल्यामुळें पृथ्वीला सुख झालें. तिनें त्या कल्याणकर देवाला नमस्कार केला. याप्रमाणें भूतहितार्थी देवानें यज्ञवराह होऊन लोकांच्या हिताच्या इच्छेनें पृथ्वी देवीला वर काढलें. जगाच्या स्थापनेच्या इच्छेनें पृथ्वीला वर काढून तो कमलनयन देव तिच्या विभागाविषयीं विचार करूं लागला. राजन्, याप्रमाणें तो देवोत्तम रसातळांत गेलेल्या पृथ्वीविषयीं विचार करून त्यानंतर तो विभु, श्रेष्ठ वराहरूप धारण करणारा, वृषाकपि, एक पराक्रमी, व

महायशा लोकहितार्थमच्युतः ४८ [ ११८३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि चतुस्त्रिंशोऽध्यायः ॥ ३४ ॥

वैशंपायन उवाच ॥ तस्योपरि जलौघस्य महती नौरिव स्थिता । विततत्वात्तु देहस्य न ययौ संप्लवं मही १ ततः संचिंतयामास प्रविभागं क्षितेर्विभुः । समुच्छ्रयं च सर्वेषां पर्वतानां नदीषु च २ विलेखनं प्रमाणं च गतिं प्रस्रवमेव च । माहात्म्यं च विशेषंच नदीनामन्वचिन्तयत् ३ चतुरन्तां धरां कृत्वा तथा चैव महार्णवम् । मध्ये पृथिव्याः सौवर्णमकरोन्मेरुपर्वतम् ४ प्राचीं दिशमथो गत्वा चकारोदयपर्वतम् । शतयोजनविस्तारं सहस्रं च समुच्छ्रयम् ५ जातरूपमयैः शृंगैस्तरुणादित्यसन्निभैः । आत्मतेजोगुणमयं वेदिकाभोगकल्पितम् ६ विविधांश्च महास्कंधान्कांचनान्पुष्करेक्षणः । नित्यपुष्पफलान्वृक्षान्कृतवांस्तत्र पर्वते ७ शतयोजनविस्तारं ततस्त्रिगुणमायतम् । चकार स महादेवः पुनः सौमनसं गिरिम् ८ नानारत्नसहस्राणां कृत्वा तत्र सुसंचयम् । वेदिकां बहुवर्णां च संध्याभ्राभामकल्पयत् ९ सहस्रशृंगं च गिरिं नानामणिशिलातलम् । कृतवान्वृक्षगहनं षष्टियोजनमुच्छ्रितम् १० आसनं तत्र परमं सर्वभूतनमस्कृतम् । कृतवानात्मनः स्थानं विश्वकर्मा प्रजापतिः ११ शिशिरं च महाशैलं तुषारचयसंनिभम् । चकार दुर्गगहनं कन्दरान्तरमण्डितम् १२ शिशिरप्रभवां चैव नदीं द्विजगणायुताम् । चकार पुलिनोपेतां वसुधारामिति श्रुतिः १३ सा दिशं निखिलां प्राचीं

---

महायशस्वी अच्युत लोकहितार्थ एका दाढेनें बलात्कारानें पृथ्वीचा उद्धार करता झाला ४३–४८. इति श्रीम० खि० हरि० भाविष्यपर्वाचा चवतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३४ ॥

वैशंपायनः—त्या जलौघाच्या वर मोठ्या नौकेप्रमाणें पृथ्वी तरंगत राहिली. तिचा आकार फार विस्तृत असल्यामुळें ती पाण्यांत बुडाली नाहीं १, २. त्यानंतर त्या विभूनें क्षितीच्या विभागांचा विचार केला. सर्व पर्वतांची उंची, नद्यांतील मार्ग आखणें, प्रमाण, गति व प्रवाह, माहात्म्य व विशेष यांचें त्यानें अनुचिंतन केलें ३. पृथ्वीला कमलाकार समजून त्याला चार दिशेंत चार पाकळ्या योजिल्या. त्यांच्या सभोंवार समुद्र केला. पृथ्वीच्या मध्यभागीं सुवर्णाचा मेरुपर्वत केला ४. पूर्वदिशेस जाऊन त्यानें उदयपर्वत केला. त्याचा विस्तार शतयोजनें व उंची सहस्र योजनें होती ५. त्याचीं शृंगें सुवर्णमय असून तीं मध्यान्हकाळच्या सूर्यासारखीं तळपत होतीं. तो उदयपर्वत आत्मतेजोगुणमय व वेदिकाविस्तारानें व्यवस्थित केला होता ६. कमलनयनानें त्या पर्वतावर नानाप्रकारचे सुवर्णाचे महास्कंधयुक्त व नित्य पुष्पफलयुक्त वृक्ष केले ७. त्यानंतर त्या महादेवानें शतयोजन विस्तीर्ण व त्याच्या तिप्पट दीर्घ असा पुनरपि सौमनस पर्वत केला ८. त्याच्यावर नानाप्रकारच्या सहस्रावधि रत्नांचा संचय केला होता. संध्याकाळच्या अभ्राप्रमाणें शोभणारी अनेक वर्णांची वेदिका तेथें रचली ९. ज्यावर नाना रत्नांचीं शिळातळें आहेत व जो वृक्षांनीं गहन झाला आहे असा साठ योजनें उंच सहस्रशृंग पर्वत करून त्या विश्वकर्मा प्रजापतीनें त्यावर आपलें उत्तमस्थान व सर्वभूत नमस्कृत परम आसन केलें १०, ११. तुषारांच्या ढिगासारखा शिशिर महा शैल केला व तो दुर्गम स्थानांनीं गहन व आंतून गुहांनीं मंडित होता १२. त्यानें त्यावर शिशिरप्रभाव नदी निर्माण केली. ती असंख्य पक्षिगणांनीं युक्त, पुलिनानें संपन्न व वसुधारा या नांवानें

पुण्यां सुखशतैश्चिताम् । शोभयत्यमृतप्रख्यैर्मुक्ताशंखविभूषितैः १४ नित्यपुष्पफलोपेतैश्छादयद्भिः सुसंवृतैः । भूषिताभ्यधिकं कान्तैः सा नदी तीरजैर्द्रुमैः १५ कृत्वा प्राचीविभागं च दक्षिणायामथो दिशि । चकार पर्वतं दिव्यं सर्वकांचनराजतम् १६ एकतः सूर्यसंकाशं एकतः शशिसन्निभम् । स भिन्नच्छवेऽनीव द्वौ वर्णौ पर्वतोत्तमः १७ तेजसा युगपद्व्याप्तं सूर्याचंद्रमसोरिव । वपुष्मंतमथो तत्र भानुमन्तं महागिरिम् १८ सर्वकामफलैर्वृक्षैर्वृतं रम्यैर्मनोरमैः । चकार कुंजरं चैव कुंजरप्रतिमाकृतिम् १९ सर्वतः कांचनगुहं बहुयोजनविस्तृतम् । ऋषभप्रतिमं चैव ऋषभं नाम पर्वतम् २० हेमकांचनवृक्षाढ्यं पुष्पहासं स सृष्टवान् । महेन्द्रमथ शैलेन्द्रं शतयोजनमुच्छ्रितम् २१ जातरूपमयैः शृंगैः सपुष्पितमहाद्रुमम् । मेदिन्यां कृतवान्देवः प्रतिक्षोभमिवाचलम् २२ नानारत्नसमाकीर्णं सूर्येन्दुसदृश प्रभम् । चकार मलयं चाद्रिं चित्रपुष्पितपादपम् २३ मैनाकं च महाशैलं शिलाजालसमावृतम् । दक्षिणस्यां दिशि शुभं चकाराचलमायतम् २४ सहस्रशिरसं विन्ध्यं नानाद्रुमलताकुलम् । नदीं च विपुलावर्तां पुलिनश्रोणिभूषिताम् २५ क्षीरसंकाशसलिलां पयोधारामिति श्रुतिः । सुरम्यां तोयकलिलां निर्मितां दक्षिणां दिशम् २६ दिव्यां तीर्थशतोपेतां प्लावयन्तीं शुभांभसा । दिशं याम्यां प्रतिष्ठाप्य

---

प्रसिद्ध आहे १३. तिच्या शेंकडों सुखांनीं व्याप्त झालेल्या सर्व पुण्यकारक प्राची दिशेस ती मोत्यें, शंख इत्यादिकांनीं विभूषित झालेल्या आपल्या अमृततुल्य जलांनीं सुशोभित करते १४. नित्य पुष्पफलयुक्त, आच्छादित करणाऱ्या, वाटोळ्या व रम्य अशा तीरावरील वृक्षांच्या योगानें ती नदी अधिकच भूषित झाली आहे १५. याप्रमाणें पूर्व दिशेचा विभाग करून त्या देवानें दक्षिण दिशेंत सर्व सुवर्णमय व राजत पर्वत केला १६. एकीकडून सूर्यासारखा व दुसरीकडून चंद्रासारखा असे दोन्हीकडून दोन वर्ण धारण करणारा तो उत्तम पर्वत फारच शोभूं लागला १७. सूर्य–चंद्राच्याप्रमाणें तेजानें एकाचवेळीं व्यापलेल्या साक्षात् भानुमानासारखा तो महागिरि तेथें होता १८. तो सर्व कामफळें देणाऱ्या रम्य व मनोरम वृक्षांनीं आवृत होता. हत्तीप्रमाणें ज्याची आकृति आहे अशा कुंजरनामक पर्वतास त्यानें निर्माण केलें १९. त्याला सर्वतः सोन्याच्या गुहा होत्या. तो अनेक योजनें विस्तीर्ण होता. नंतर ऋषभनावाचा आणखी एक ऋषभतुल्य पर्वत निर्मिला २०. सुवर्णाच्या कांचनवृक्षांनीं संपन्न असलेला तो पुष्पांच्या योगानें हंसतच आहे कीं काय असें वाटे. त्यानंतर देवानें महेंद्र नांवाच्या शंभर योजनें उंच पर्वताला उत्पन्न केलें २१. तो सोन्याच्या शिखरांनीं युक्त होता. त्यावर फुललेले महावृक्ष होते. देवानें पृथ्वीला क्षुब्ध करण्यासाठींच तो अचल केला होता २२. नानाप्रकारच्या रत्नांनीं व्याप्त व सूर्य–चंद्रासारखा तेजस्वी असा मळयपर्वत केला. त्याच्यावर विचित्र पुष्पवृक्ष होते २३. शिलासंघानें व्यापलेला मैनाक नांवाचा शुभ महापर्वत देवानें दक्षिण दिशेंत केला. तो फार लांब होता २४. सहस्र शिखरांनीं भूषित झालेला व अनेकप्रकारच्या लता–वृक्षांनीं व्यापलेला विंध्यनांवाचा पर्वत उत्पन्न केला. त्यावर विपुळ आवर्तांनीं युक्त व पुलिनरूपी श्रोणीनें भूषित अशी नदी निर्माण केली २५. तिचें जल दुधासारखें असून तिला पयोधरा असें वेदांत म्हटलें आहे. ती अति रम्य, जलानें व्याप्त व उत्तमप्रकारें रचलेली होती. ती दिव्य नदी शेंकडों तीर्थजलांनीं युक्त, व दक्षिण दिशेस आपल्या शुभ जलानें भिजविणारी आहे. याप्रमाणें

प्रतीचीं दिशमागमत् २७ अकरोत्तत्र शैलेंद्रं शतयोजनमुच्छ्रितम् । शोभितं शिखरैश्चित्रैः सुप्रवृद्धैर्हिरण्मयैः २८ कांचनीभिः शिलाभिश्च गुहाभिश्च विभूषितम् । समाकुलं सूर्यनिभैः शालैस्तालैश्च भास्वरैः २९ शुशुभे जातरूपैश्च श्रीमद्भिश्चित्रवेदिकैः । षष्टिं गिरिसहस्राणि तत्रासौ संन्यवेशयत् ३० मेरुप्रतिमरूपाणि वपुषा प्रभया सह । सहस्रजलधारं च पर्वतं मेरुसन्निभम् ३१ पुण्यतीर्थगुणोपेतं भगवान्संन्यवेशयत् । षष्टियोजनविस्तारं तावदेव समुच्छ्रितम् ३२ आत्मरूपोपमं तत्र वाराहं नाम नामतः । निवेशयामास गिरिं दिव्यं वैडूर्यपर्वतम् ३३ राजताः कांचनाश्चैव यत्र दिव्याः शिलोच्चयाः । तत्रैव चक्रसदृशं चक्रवन्तं महाबलम् ३४ सहस्रकूटं विपुलं भगवान्संन्यवेशयत् । शंखप्रतिमरूपं च राजतं पर्वतोत्तमम् ३५ सितद्रुमसमाकीर्णं शंखं नाम न्यवेशयत् । सुवर्णरत्नसंभूतं पारिजातं महाद्रुमम् ।३६ महत् पर्वतस्याग्रे पुष्पहासं न्यवेशयत् । शुभामतिरसां चैव घृतधारामिति श्रुतिः ३७वराहः सरितं पुण्यां प्रतीच्यामकरोत्प्रभुः । प्रतीच्यां संविधिं कृत्वा पर्वतान्कांचनोज्ज्वलान् ३८ गुणोत्तरानुत्तरस्यां सन्यवेशयदग्रतः । ततः सौम्यगिरिं सौम्यमन्तरिक्षप्रमाणतः ३९ रुक्मधातुप्रतिच्छन्नमकरोद्भास्करोपमम् । स तु देशो विसूर्योऽपि तस्य भासा प्रकाशते ४० तस्य लक्ष्म्याधिकं भाति तपता रविणा यथा । सूक्ष्मलक्षणविज्ञेयस्तपतीव दिवाकरः ४१ सहस्रशिखरं चैव नानातीर्थसमाकुलम् । चकार रत्नसंकीर्णं भूयोस्तं नाम पर्वतम् ४२ मनोहरगुणोपेतं मंदरं

---

दक्षिण दिशेची प्रतिष्ठापना करून तो देव पश्चिमेस आला २६,२७. तेथें तो शंभर योजनें उंच पर्वतश्रेष्ठ करता झाला. तो अति वाढलेल्या सोन्याच्या विचित्र शिखरांनीं सुशोभित झाला होता २८. सोन्याच्या शिला व गुहा यांनीं अतिशय भूषित होता. सूर्यासारख्या लाल व भास्वर तालवृक्षांनीं तो व्याप्त झाला होता २९. सोन्याच्या कांतिमान विचित्र वेदींनीं सुशोभित होता. त्या देवानें साठ सहस्र पर्वत तेथें रचले ३०. आकार व प्रभा यांसह त्यांचीं मेरुप्रमाणें रूपें होतीं. मेरुसारख्या त्या पर्वतावरून सहस्रजलधारा पडत होत्या ३१. भगवानानें पुण्यतीर्थ गुणयुक्त अशा त्या पर्वतास वसाविलें. तो साठ योजनें विस्तीर्ण व तितकाच उंच होता ३२. आपल्या रूपाप्रमाणें ज्याचें रूप आहे अशा वाराहनांवाच्याव दिव्य वैडूर्यपर्वतास त्यानें रचलें ३३. त्यांत रुप्याचे व सोन्याचे दिव्य शिलोच्चय होते. तेथेंच चक्रासारखा चक्रवान् व महाबल असा एक पर्वत भगवानानें केला. त्याला सहस्र शिखरें असून तो रुप्याचा उत्तम व विपुल पर्वत शंखासारखा शुभ्र होता ३४,३५. शुभ्र वृक्षांनीं व्याप्त असलेल्याही त्याचें नांव शंख असेंच त्यानें ठेवलें. सुवर्णरत्नापासून उत्पन्न झालेल्या व पुष्पांच्या योगानें हंसणाऱ्या पारिजात महावृक्षास त्या पर्वताच्या अग्रभागीं स्थापिलें. त्या वराहप्रभूनें पश्चिम दिशेंत शुभ, अतिरसयुक्त, घृतधारा या नांवाची पुण्य नदी केली. याप्रमाणें पश्चिमदिशेंत रचना करून व सुवर्णानें उज्वल झालेल्या पर्वतांस रचून ३६–३८ त्यानें उत्तर दिशेंत अग्रभागीं उत्तम गुणयुक्त वस्तू निर्मिल्या. त्यानें तेथें अंतरिक्षा-इतका उंच व सौम्य पर्वत केला ३९. तो सुवर्णधातूंनीं आच्छादित व सूर्यसदृश होता. तो देश सूर्यरहित असला तरी त्या पर्वताच्या तेजानें प्रकाशित होतो ४०. चिह्नानें अधिक शोभणारा चंद्र जसा सूर्याच्या योगानें प्रकाशमान होतो त्याप्रमाणें सूर्य त्या पर्वताच्या योगानें प्रकाशित होतो. त्यामुळें सूक्ष्मलक्षणांवरून जाणला जाणारा सूर्य जणुकाय तेथें तळपतच असतो. त्याला सहस्र

चाचलोत्तमम् । उद्दामपुष्पगंधं च पर्वतं गन्धमादनम् ४३ चकार तस्य शृंगेषु सुवर्णरससंभवाम् । जांबूं जांबूनदमयीमनन्ताद्भुतदर्शनाम् ४४ गिरिं च शिखरं चैव तथा पुष्करपर्वतम् । शुभ्रं पाण्डुरमेघाभं कैलासं च नगोत्तमम् ४५ हिमवंतं च शैलेंद्रं दिव्यधातुविभूषितम् । निवेशयामास हरिर्वाराहीं तनुमास्थितः ४६ नदीं सर्वगुणोपेतामुत्तरस्यां दिशि प्रभुः ॥ मधुरांरां स कृतवान् दिव्यामृषिशताकुलाम् ४७ एवंचैवक्षितिधराः सपक्षाः कामरूपिणः ॥ तदा कृता भगवता विचित्राः परमेष्ठिना ४८ स कृत्वा प्रविभागं तु पृथिव्या लोकभावनः । देवासुराणामुत्पत्तौ कृतवान्बुद्धिमक्षयाम् ४९ सर्वासु दिक्षु रक्ताक्षश्चकार शैलान्विविधाभिधानान् । हिताय लोकस्य स लोकनाथः पुण्याश्च नद्यः सलिलोपगूढाः ५०

[ १३३३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पंचत्रिंशोऽध्यायः ॥ ३५ ॥

वैशंपायन उवाच ॥ जगत्स्रष्टुमना देवश्चिन्तयामास पूर्वजः । तस्य चिन्तयतो वक्त्रान्निःसृतः पुरुषः किल १ ततः स पुरुषो देवं किं करोमीत्युपस्थितः । प्रत्युवाच स्मितं कृत्वा देवदेवो जगत्पतिः २ विभजात्मानमित्युक्त्वा गतोऽन्तर्धानमीश्वरः । अन्तर्हितस्य देवस्य सशरीरस्य भारत ३ प्रशान्तस्येव दीपस्य गतिस्तस्य न विद्यते । ततस्तेनेरितां वाणीं सोन्वचिन्तयत प्रभुः ४ हिरण्यगर्भो भगवानेष एव च्छन्दसि श्रुतः । एष प्रजापतिः पूर्वमभवद्भुवनाधिपः ५ तदा प्रभृति तस्याद्यो यज्ञः सांगो विधीयते । प्रजापतिरुवाच ॥ विभजात्मान-

---

शिखरें असून तो नानातीर्थांनीं व्याप्त आहे. पुनः त्यानें अस्तनामक, रत्नांनीं व्याप्त असलेला पर्वत केला ४१,४२. मनोहर गुणांनीं युक्त असा मंदर या नांवाचा उत्तम पर्वत केला. ज्याला उद्दाम पुष्पगंध आहे, असा गंधमादन पर्वत केला ४३. त्याच्या शिखरांवर सुवर्णरसापासून उत्पन्न झालेली, सुवर्णमयी, अनंत व अद्भुतदर्शना जांबूनदी केली ४४. त्याचप्रमाणें पुष्कर पर्वत या नांवाचा सशिखर पर्वत केला. पांढऱ्या मेघांसारखा शुभ्र कैलास नावाचा उत्तम पर्वत निर्माण केला ४५. दिव्य धातूंनीं अतिशय भूषित झालेल्या हिमालय पर्वतश्रेष्ठास वराहाची तनु धारण करणाऱ्या हरीनें रचलें ४६. त्या प्रभूनें उत्तर दिशेंत सर्वगुणयुक्त, मधासारख्या गोड जलानें संपन्न, दिव्य व शेंकडों ऋषींनीं आकुल अशी नदी निर्माण केली ४७. याप्रमाणें त्या भगवान् परमेष्ठीनें त्यावेळीं सपक्ष, कामरूपी व विचित्र पर्वत केले ४८. त्या लोकांस निर्माण करणाऱ्या देवानें असा पृथ्वीचा विभाग करून देवासुरांच्या उत्पत्तीविषयीं अक्षय बुद्धि केली ४९. रक्तासारखे ज्याचे नेत्र लाल आहेत असा तो लोकनाथ लोकांच्या हिताकरितां सर्व दिशांमध्यें नाना नांवांचे पर्वत व जलानें भरलेल्या पुण्य नद्या करता झाला ५०. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा पसतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३५ ॥

वैशंपायनः–जगास उत्पन्न करण्याची इच्छा करणारा पूर्वज देव चिंतन करूं लागला. तेव्हां चिंतन करीत असलेल्या त्याच्या तोंडून एक पुरुष निघाला १. त्यानंतर तो पुरुष त्या देवापाशीं मी काय करूं ह्मणून उभा राहिला. तेव्हां देवाधिदेव जगत्पति थोडें हंसून उलट ह्मणाला, “ आपला विभाग कर. ” इतकें सांगून तो ईश्वर अंतर्धान पावला. हे भारता, विझलेल्या दिव्याच्या गतीप्रमाणें अंतर्धान पावलेल्या त्यास शरीर देवाची गति त्याला कळली नाहीं. तेव्हां त्यानें उच्चारिलेल्या वाणीचा तो प्रभु ( पुरुष ) विचार करूं लागला २–४. वेदामध्यें भगवान् हिरण्यगर्भ ह्मणून जो श्रुत आहे

ओमित्युक्तस्तेनास्मि सुमहात्मना ६ कथमात्मा विभज्यः स्यात्संशयो ह्यत्र मे महान् । इति
चिन्तयतस्तस्य ओमित्येवोत्थितः स्वरः ७ स भूमावन्तरिक्षे च नाके च कृतवांस्ततः ।
तं चैवाभ्यसतस्तस्य मनःसारमयः पुनः ८ हृदयाद्देवदेवस्य वषट्कारः समुत्थितः । भूम्यन्त-
रिक्षनाकानां परंभूयः स्वरात्मिकाः ९ महास्मृतिमयाः पुण्या महाव्याहृतयोऽभवन् ।
छन्दसां प्रवरा देवी चतुर्विंशाक्षराभवत् । तत्पदं संस्मरन् दिव्यं सावित्रीमकरोत्प्रभुः १०
ऋक्सामाथर्वयजुषश्चत्वारो भगवान्प्रभुः । चकार निखिलान्वेदान्ब्रह्मयुक्तेन कर्मणा ११
ततस्तस्यैव मनसः सनः सनक एव च । सनातनश्च भगवान्वरदश्च सनन्दनः १२ सनत्कुमा-
रश्च विभुस्तत्र जज्ञे सनातनः । मानसाश्चैव पूर्वाद्या इत्येते षण्महर्षयः १३ ब्रह्माणं कपिलं
चैव षडेतांश्चैव योगिनः । यतयो योगतन्त्रेषु यान्स्तुवन्ति द्विजातयः १४ ततो मरीचिमत्रिं च
पुलस्त्यं पुलहं क्रतुम् । भृगुमंगिरसं चैव मनुं चैव प्रजापतिम् १५ पितॄंश्च सर्वभूतानां देवतासुरर-
क्षसाम् । महर्षीनसृजच्छंभुरष्टावेताश्च मानसान् १६ एते युगसहस्रान्ते याश्चैषामभवन्प्रजाः ।
कल्पे निःशेषभुक्ते तु ततो गच्छन्ति निर्वृतिम् १७ भूयो वर्षसहस्रान्ते उत्पत्तिस्तु विधीयते ।
एतेषामेव देवानां प्रजाकर्तृषु वै तदा १८ किं तु कर्मविशेषेण देवतानां युगे युगे । नाम
जन्म विशेषाश्च त एव युगपर्यये १९ अंगुष्ठाद्दक्षिणाद्दक्ष उत्पन्नो भगवान् ऋषिः । तस्यैव
तु पुनर्भार्या वामांगुष्ठादजायत २० तस्य तत्राभवन्कन्या विश्रुता लोकमातरः । याभिर्व्या-

---

तोच हा पूर्वी भुवनाधिप प्रजापति झाला ५. तेव्हांपासून त्याचा हा आद्य
सांग यज्ञ विधान केला जातो. प्रजापतिः— त्या आदि महात्म्यानें 'आपला
विभाग कर' असें मला सांगितलें आहे ६. पण आत्मविभाग कसा करतां
येईल, हा मला मोठा संशय आहे. तो असें चिंतन करीत असतांना ओं असा स्वर
उठला ७. त्यापासून त्यानें भूमि, अंतरिक्ष, व स्वर्ग यांस उत्पन्न केलें. त्याचा अभ्यास
करणाऱ्या त्या देवाच्या हृदयापासून मनःसारमय वषट्कार उत्पन्न झाला. भूमि, अंतरिक्ष
व स्वर्ग यांच्या अतिशय पलीकडे स्वरात्मिका, महास्मृतिमय, व पुण्य अशा महा व्याहृति
झाल्या. छंदांतील श्रेष्ठ देवी चोवीस अक्षरांची झाली. त्या दिव्य पदाचें स्मरण करीत
प्रभूनें सावित्रीला निर्माण केलें. भगवान् प्रभूनें ब्रह्मयुक्त कर्मानें ऋक्, यजुष्, साम व अथ-
र्वण या नांवाच्या चारी संपूर्ण वेदांस उत्पन्न केलें ८–११. त्यानंतर त्याच्याच मनापा-
सून सन, सनक, सनातन व वरद भगवान् सनंदन झाला १२. तेथेंच विभु सनातन
सनत्कुमार झाला. हे रुद्रपूर्वक सहा मानस महर्षि आहेत १३. ब्रह्मा व कपिल यांची
आणि या सहा योग्यांची यत्नशील ब्राह्मण योगतंत्रांत स्तुति करितात १४. त्यानंतर
मरीचि, अत्रि, पुलस्त्य, पुलह, क्रतु, भृगु, अंगिरा, मनु प्रजापति सर्व भूतें व देवता, असुर,
राक्षस यांचे पितर, व हे आठ मानस महर्षी यांस शंभु उत्पन्न करता झाला १५,१६.
हे सर्व व यांची झालेली सर्व प्रजा सहस्र युगें झालीं असतां व सर्व कल्पाचा
निःशेष भोग झाला असतां शांत होतात १७. पुनः सहस्र युगें झालीं असतां प्रजा
करणारांतील याच देवांच्या उत्पत्तीचें विधान केलें आहे १८. युगाचा एक फेरा झाला
असतां प्रत्येक नूतन सृष्टीच्यावेळीं नवे नवे देवादि अधिकारी उत्पन्न होतात. पण विशेष
कर्माप्रमाणें त्यांचीं नांवें व विशेषप्रकारचे जन्म तेच असतात १९. भगवान् दक्षऋषि पुरु-
षाच्या उजव्या अंगठ्यापासून झाला. त्याची भार्या त्याच्या डाव्या अंगठ्यापासून उत्प-

मातरो लोकाः प्रजाभिर्मनुजाधिप २१ अदितिं च दितिं कालामनायुं सिंहिकां मुनिम् ।
प्राधां क्रोधां च सुरभिं विनतां सुरसां तथा २२ दनुं कद्रुं च दुहितॄः प्रददौ कश्यपाय तु ।
प्रजां संचिन्त्य मनसा गतिज्ञेनान्तरात्मना २३ अरुन्धतीं वसुं यामीं लंबां भानुं मरुत्वतीम् ।
संकल्पां च मुहूर्तां च साध्यां विश्वां च भारत २४ मनवे ब्रह्मपुत्राय कन्या दक्षो ददौ दश ।
ततः सर्वानवद्याङ्गीः कन्याः कमललोचनाः २५ पूर्णचन्द्राननाः दिव्या गन्धवत्यो मनोरमाः ।
कीर्तिं लक्ष्मीं धृतिं पुष्टिं बुद्धिं मेधां क्षमां तथा २६ मतिं लज्जां वसुं चैव दक्षो धर्माय वै
ददौ । अत्रेस्तु तनयो जातस्तस्य तोयात्मकः शशी २७ पुत्रो ग्रहाणामधिपः सहस्रांशुस्त-
मिस्रहा । तस्मै नक्षत्रयोगिन्यः सप्तविंशतिरुत्तमाः २८ रोहिणीप्रमुखाः कन्या दक्षः प्राचे-
तसो ददौ । एतासां पुत्रपौत्रं च प्रोच्यमानं मया शृणु २९ कश्यपस्य मनोश्चैव धर्मस्य
शशिनस्तथा । अर्यमा वरुणो मित्रः पूषा धाता पुरन्दरः ३० त्वष्टा भगोंशुः सविता पर्ज-
न्यश्चेतिविश्रुताः । अदित्यां जज्ञिरे देवाः कश्यपस्य महात्मनः ३१ दित्याः पुत्रद्वयं जज्ञे
कश्यपादिति नः श्रुतम् । हिरण्यकशिपुश्चैव हिरण्याक्षश्च वीर्यवान् । द्वावप्यमितविक्रान्तौ
तपसा कश्यपोपमौ ३२ हिरण्यकशिपोः पुत्राः पंचैव सुमहाबलाः । प्रह्लादश्चैव संह्लादस्तथा-
नुह्लाद एव च ३३ ह्रदश्चैव तु विक्रांतः पंचमोऽनुह्रदस्तथा । प्रह्लादः पूर्वजस्तेषामनुह्लादस्त-
थापरः ३४ प्रह्लादस्य त्रयः पुत्रा विक्रान्ताः सुमहाबलाः । विरोचनश्च जंभश्च सुजंभश्चेति
विश्रुताः ३५ बलिर्विरोचनसुतो बाण एको बलेः सुतः । बाणस्य चेन्द्रदमनः पुत्रः परपुरं-

---

वली २०. दक्षाला तिच्याठायीं विख्यात व लोकमाता कन्या झाल्या. हे मनुजेश्वरा, त्यांच्या प्रजांनीं त्रिभुवन व्यापलें आहे २१. आदिति, दिति, काला, अनायु, सिंहिका, मुनि, प्राधा, क्रोधा, सुरभि, विनता, सुरसा, दनु व कद्रु या आपल्या कन्या, मनानें प्रजेचें चांगलें चिंतन करून, गतिज्ञ अंतरात्म्यानें ह्मणजे दक्षानें कश्यपाला दिल्या २२,२३. अरुंधती, वसु, यामी, लंबा, भानु, मरुत्वती, संकल्पा, मुहूर्ता, साध्या, व विश्वा या दहा कन्या दक्षानें ब्रह्मपुत्र मनूला दिल्या. त्या सर्व कन्या शुद्ध अंगसंपन्न व कमलनयन होत्या २४,२५. पूर्णचंद्राप्रमाणें त्यांचें मुख होतें. त्या मनोरम दक्षकन्यांच्या शरीरास सुगंध येत होता. कीर्ति, लक्ष्मी, धृति, पुष्टि, बुद्धि, मेधा, क्षमा, मति, लज्जा व वसु, या कन्या त्यानें धर्माला दिल्या अत्रीला पुत्र झाला तो जलरूप चंद्रच होय २६,२७. तो अत्रिपुत्र ग्रहांचा अधिप, सहस्र किरणयुक्त, व अंधकाराचा नाश करणारा होता. त्याला नक्षत्रांशीं योग पावणाऱ्या सत्तावीस उत्तम कन्या दिल्या २८. प्राचेतस दक्ष आपल्या रोहिणीप्रभृति कन्या त्याला देता झाला. आतां कश्यप, मनु, धर्म व चंद्र यांच्यापासून या कन्यांना कोण कोण पुत्र व पौत्र झाले तें मी सांगतों ऐक, अर्यमा, वरुण, मित्र, पूषा, धाता, पुरंधर, त्वष्टा, भग, अंशु, सविता, व पर्जन्य या नांवांनीं प्रख्यात असलेले देव महात्म्या कश्यपास अदितीच्या उदरीं झाले २९–३१. दितीला कश्यपापासून दोन पुत्र झाले, असें आह्मी ऐकलें आहे. एक हिरण्यकशिपु व दुसरा वीर्यवान् हिरण्याक्ष. ते दोघेही अमित पराक्रमी व तपाच्या योगानें कश्यपासारखे होते ३२. हिरण्यकशिपूचे पांचच महाबलाढ्य पुत्र होते. प्रऱ्हाद, संऱ्हाद, अनुऱ्हाद, ऱ्हद व पांचवा महापराक्रमी अनुऱ्हद असे ते पांच होत. प्रऱ्हाद त्या सर्वांमध्यें वडील व अनुऱ्हाद कनिष्ठ होय ३३,३४. प्रऱ्हादाला पराक्रमी व महाबलाढ्य तीन पुत्र झाले. विरोचन, जंभ व सुजंभ अशीं त्यांचीं प्रसिद्ध

जयः ३६ दनोः पुत्रास्तु बहवो वंशे ख्याता महासुराः । विप्रचित्तिः प्रथमजस्तेषां राजा
महामनाः ३७ गणः प्रजज्ञे क्रोधायाः पुत्रपौत्रमनन्तकम् । रौद्राः क्रोधवशा नाम क्रूरकर्माण
एव च ३८ सिंहिका सुषुवे राहुं चन्द्रार्कग्रहमर्दनम् । ग्रस्तारं चैव चन्द्रस्य सूर्यस्य च महा-
प्रभम् ३९ कालायाः कालकल्पस्तु गणः परमदारुणः । अभवद्दीप्तसूर्याक्षो नीलमेघसमप्रभः ४०
सहस्रशीर्षाः शेषश्च वासुकिस्तक्षकस्तथा । बहूनां कद्रुपुत्राणां मते प्राधान्यमागताः ४१
धर्मात्मानो वेदविदः सदा प्राणिहिते रताः । लोकतन्त्रधराश्चैव वरदाः कामरूपिणः ४२ तार्क्ष्य-
श्चारिष्टनेमिश्च गरुडश्च महाबलः । अरुणिश्चारुणिश्चैव विनतायाः सुताः स्मृताः । इमाश्चाप्स-
रसः पुण्या विविधाः पुण्यलक्षणाः ४३ सुषुवेऽष्टौ महाभागाः प्राधा देवर्षिपूजिताः । अनवद्या-
मनूकां च अनूनामरुणप्रियाम् । अनुगां सुभगां भासीं स्त्रियः प्राधा व्यजायत ४४ अलंबुषा-
मिश्रकेशी पुण्डरीका तिलोत्तमा । सुरूपा लक्षणा क्षेमा तथा रंभा मनोरमा ४५ असिता च
सुबाहुश्च सुवृत्ता सुमुखी तथा । सुप्रिया च सुगन्धा च सुरसा च प्रमाथिनी ४६ काम्या
शारद्वती चैव सौनेयाप्सरसः स्मृताः । विश्वावसुर्भरण्यश्च गन्धर्वाश्चैव विश्रुताः ४७ मेनका
सहजन्या च पर्णिनी पुञ्जिकस्थला । घृतस्थला घृताची च विश्वाची चोर्वशी तथा ४८
अनुम्लोचेत्यभिख्याता प्रम्लोचेति च ता दश । मनोवती शापि तथा वैदिक्योऽप्सरसस्तथा ४९
प्रजापतेस्तु संकल्पात्संभूता भुवनप्रियाः । अमृतं ब्राह्मणा गावो रुद्राश्चेति चतुष्टयम् ५०

---

नावें होतीं ३५. बलि हा विरोचनाचा पुत्र. बाण हा एकच बलीचा पुत्र. बाणाचा शत्रूंच्या पुरांना जिंकणारा इंद्रदमन हा पुत्र होय ३६. दनूच्या वंशांत अनेक विख्यात महाअसुर पुत्र झाले. महाउदार विप्रचित्ति हा त्यांतील वडील व त्यांचा राजा होता ३७. क्रोधेपासून गण झाला. त्याचे पुत्र व पौत्र अनंत होते. ते सर्व भयंकर व क्रूरकर्मे करणारे असून क्रोधवश असें त्यांचें नाव होतें ३८. सिंहिकेला राहु झाला. तो सूर्य व चंद्र या ग्रहांना पीडा देतो. चंद्र व सूर्य यांना तो ग्रासणारा व महा तेजस्वी आहे ३९. कलेला कालकल्पगण झाला. तो परम दारुण होता. त्याचे नेत्र सूर्यासारखे दीप्त व प्रभा नील मेघासारखी होती ४०. कद्रूच्या पुष्कळ पुत्रांमध्यें सहस्रमस्तकांचा शेष, वासुकि व तक्षक हे तिघे प्राधान्यतेस प्राप्त झाले ४१. ते धर्मात्मे, वेदवेत्ते, सदा प्राण्यांच्या हितामध्यें रत, लोकतंत्र धारण करणारे, वरद व कामरूपी होते ४२. तार्क्ष्य, अरिष्टनेमी, महाबलाढ्य गरुड, अरुणि व आरुणि हे विनतेचे पुत्र सांगितलेले आहेत. प्राधा नांवाच्या दक्षकन्येनें या पुण्य, विविध, पुण्यलक्षण, महाभागा व देव आणि ऋषी यांच्याकडून पूजित अशा आठ अप्सरांस जन्म दिला. अनवद्या, अनूका, अनूना, अरुणप्रिया, अनुगा, सुभगा व भासी या स्त्रियांना प्राधेनें जन्म दिला ४३.४४ अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका, तिलोत्तमा, सुरूपा, लक्षणा, क्षेमा, रंभा, मनोरमा, असिता, सुबाहु, सुवृत्ता, सुमुखी, सुप्रिया, सुगंधा, सुरसा, प्रमाथिनी ४५.४६. काम्या, शारद्वती व सौनेया या अप्सरा ह्मणून सांगितलेल्या आहेत. विश्वावसु, भरण्य हे गंधर्व प्रसिद्ध आहेत ४७. मेनका, सहजन्या, पर्णिनी, पुंजिकस्थला, घृतस्थला, घृताची, विश्वाची, उर्वशी, अनुम्लोचा, व प्रख्यात प्रम्लोचा या दहा व त्याच-प्रमाणें मनोवती अशा अकरा वैदिक्य ( वेदांत ज्यांचा उल्लेख केला आहे ) अप्सरा आहेत ४८,४९. या प्रजापतीच्या संकल्पापासून उत्पन्न झालेल्या असून सर्व भुवनास प्रिय आहेत. अमृत, ब्राह्मण, गायी व रुद्र हीं चार प्रकारचीं अपत्यें

सुरभ्यपत्यमित्येतत्पुराणे निश्चयो महान् । एतद्वै कश्यपापत्यं मनोर्वंशं निबोध मे ५१ संक्षेपेणैव तत्सर्वं कीर्तयिष्यामि तेऽनघ । विश्वेदेवास्तु विश्वायाः साध्या साध्यान्व्यजायत ५२ मरुत्वत्यां मरुत्वन्तो वसोस्तु वसवः स्मृताः । भानोस्तु भानवस्तात मुहूर्ताश्च मुहूर्तजाः ५३ लम्बा घोषं विजज्ञेऽथ नागवीथी च जामिजा । पृथिव्यां विषमं सर्वं मरुत्वत्यामजायत ५४ संकल्पायास्तु कौरव्य जज्ञे संकल्प एव च । धर्मस्य पुत्रो लक्ष्म्यास्तु कामो जज्ञे जगत्प्रभुः ५५ यशोहर्षश्च कामस्य रत्यां पुत्रद्वयं स्मृतम् । सोमस्य पुत्रो रोहिण्यां जज्ञे वर्चो महाप्रभः ५६ उदयन्नेव भगवान्वर्चस्वी येन जायते । पुरूरवाश्च भगवानुर्वशी येन युज्यते ५७ एवं पुत्रसहस्राणि स्त्रीणां चैव परस्परम् । एतावत्तु जगन्मूलं यत्र लोकाः प्रतिष्ठिताः ५८ प्रजापतिस्तु भगवान् गुणतः प्रेक्ष्य देहिनः । आधिपत्येषु युक्तेषु नियोजयति योगवित् ५९ दिशो दश क्षितिमृषयार्णवान्नगान्द्रुमौषधीरुरगसरित्सुरासुरान् । प्रजापतीन्भुवनसृजो नभो भुवः क्रियामखान्स कृतवान् गिरिशश्च सः ६० [ १३९३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि षट्त्रिंशोऽध्यायः ॥ ३६ ॥

वैशंपायन उवाच ॥ त्रयाणामपि लोकानामादित्यानां च भारत । चकार शक्रं राजानमादित्यसमतेजसम् १ स वज्री कवची विष्णुरदित्यामभिजज्ञिवान् । स्मृतेः सहायो द्युतिमान्यथा सोऽध्वर्युभिः स्तुतः २ जातमात्रोऽथ भगवान्सकुशैर्ब्राह्मणैर्धृतः । तदाप्रभृति देवेश

---

सुरभीचा आहेत, असा पुराणामध्यें मोठा निश्चय आहे. येथवर सांगितलेला हा कश्यपाचा अपत्यवर्ग आहे. आतां माझ्यापासून तूं मनूचा वंश एक ५०,५१. हे निष्पाप, मी संक्षपतःच ते सर्व सांगेन. विश्वेचे पुत्र विश्वेदेव. साध्या साध्येला जन्म देती झाली ५२. मरुत्वतीच्या ठायीं मरुत्वंत झाले. वसूचे वसू हे पुत्र सांगितलेले आहेत. बा राजा, भानूचे भानू व मुहूर्तेपासून मूहूर्त झाले ५३. लंबेला घोष झाला. नागरीथी जामिजा ( जामीपासून झालेली ) आहे. पृथ्वीमध्यें जें जें कांहीं विषम आहे तें तें सर्व मरुत्वतीचे ठायीं झालें ५४. हे कौरव्य, संकल्पेला संकल्प हा एकच पुत्र झाला. धर्माला लक्ष्मीचे ठायीं काम हा जगत्प्रभु पुत्र झाला ५५. हर्ष व यश हे कामाचे दोन पुत्र रतीचे ठायीं झाले, असें सांगितलें आहे. सोमाला रोहिणीचे ठायीं वर्च हा महातेजस्वी पुत्र झाला ५६. तो उदय पावत असतांनाच त्याच्या योगानें वर्चस्वी होतो तसाच त्याला पुरूरवा झाला. त्याच्याशीं उर्वशी संगत झाली. याप्रमाणें त्या परस्परांपासून सहस्रावधि पुत्र व स्त्रिया झाल्या. जगाचें मूळ एवढेंच आहे व त्यामध्येंच सर्व लोक प्रतिष्ठित आहेत ५७,५८. योगवेत्ता भगवान् प्रजापति प्राण्यांचें गुणतः परीक्षण करून त्यांस योग्य अधिकारावर नेमतो ५९. याप्रमाणें दहादिशा, पृथ्वी, ऋषि, समुद्र, वृक्ष, पर्वत, औषधी, सर्प, नद्या, सुर, असुर, आकाशांत रहाणारे व भुवनांस उत्पन्न करणारे प्रजापति व क्रियारूप मख तो करिता झाला ६०. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वांचा छत्तिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३६ ॥

वैशंपायनः—हे राजन्, सूर्याप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा इंद्राला त्यानें तीन लोकांचा व सर्व अदिति–पुत्रांचा राजा केलें १. तो वज्रयुक्त व कवचयुक्त विष्णु अदितीच्या ठायीं उत्पन्न झाला. तो तेजस्वी व स्मृतीचा सहाय होता. अध्वर्यूंनीं त्याची स्तुति केली आहे २. उत्पन्न होतांच त्या भगवानाला कुशयुक्त ब्राह्मणांनीं धरलें. तेव्हांपासून तो

कौशिकत्वमुपागतः ३ अभिषिच्याधिराज्ये तु सहस्राक्षं पुरंदरम् । ब्रह्मा क्रमेण राज्यानि व्यादेष्टुमुपचक्रमे ४ यज्ञानां तपसां चैव ग्रहनक्षत्रयोस्तथा । द्विजानामोषधीनां तु सोमं राज्येऽभ्यषेचयत् ५ दक्षं प्रजापतीनां तु अंभसां वरुणं पतिम् । पितॄणां सर्वनिधनं कालं वैश्वानरं प्रभुम् ६ गन्धानां चैव सर्वेषां भूतानां च शरीरिणाम् । शब्दाकाशबलानां च वायुरीशस्तदाकृतः ७ सर्वभूतपिशाचानां मृत्यूनां च गवां तथा । उत्पातग्रहरोगाणां व्याधीनां तु तथैव च ८ व्रतानां चैव सर्वेषां महादेवः कृतः प्रभुः । यक्षाणां राक्षसानां च गुह्यकानां धनस्य च ९ रत्नानां चैव सर्वेषां कृतो वैश्रवणः प्रभुः । सर्वेषां दंष्ट्रिणां शेषो नागानामथ वासुकिः १० सरीसृपाणां सर्वेषां प्रभुर्वै तक्षकः कृतः । सागराणां नदीनां च मेघानां वर्षणस्य च । आदित्यानामवरजः पर्जन्योऽधिपतिः कृतः ११ गन्धर्वाणामधिपतिस्तथा चित्ररथः कृतः । सर्वाप्सरोगणानां च कामदेवः प्रभुः कृतः १२ चतुष्पदानां सर्वेषां वाहनानां च सर्वशः । महेश्वरध्वजः श्रीमान् गोवृषोऽधिपतिः कृतः १३ दैत्यानां च महातेजा हिरण्याक्षः प्रभुः कृतः । हिरण्यकशिपुश्चैव यौवराज्येऽभिषेचितः १४ गणानां कालकेयानां महाकालः प्रभुः कृतः । अनायुषायाः । पुत्राणां वृत्रो राजा तदा कृतः १५ सिंहिका तनयो यस्तु राहुर्नाम महासुरः । उत्पातानामनेकानामशुभानां प्रभुः कृतः १६ ऋतूनामथ सर्वेषां युगानां चैव भारत । पक्षाणां चैव मासानां तथैव तिथिपर्वणाम् १७ कलाकाष्ठामुहूर्तानां गतेरयनयोस्तथा । कृतः संवत्सरो राजा योगस्य गणितस्य च १८ पक्षिणां चैव सर्वेषां चक्षुषां च महाबलः । सुपर्णो भोगिनां चैव गरुडोऽधिपतिः कृतः १९ अरुणो गरुडभ्राता जपापुष्पचयप्रभः । योगानां

---

देवेश कौशिकत्वास प्राप्त झाला ३. असो; सहस्रनयन इंद्राला अधिराज्यावर अभिषेक करून ब्रह्मा क्रमानें सर्वांच्या राज्यांचा निर्देश करूं लागला ४. यज्ञ, तप, ग्रह, नक्षत्रें, ब्राह्मण, औषधि इत्यादिकांच्या राज्यावर सोमाचा अभिषेक करिता झाला ५. दक्षाला प्रजापतींच्या राज्यावर नेमलें. वरुणाला जलाचा पति केलें व पितरांचा, सर्व निधन काल व प्रभु वैश्वानर स्वामी झाला ६. सर्व गंधांचा, शरीर धारण करणाऱ्या भूतांचा आणि शब्द, आकाश व बल यांचा ईश वायु झाला ७. सर्व भूतें, पिशाचें, मृत्यु, गायी, उत्पात ग्रह, रोग, सर्व व्याधी व सर्व व्रतें यांचा प्रभु महादेवाला केलें. कुबेराला यक्ष, राक्षस, गुह्यक, सर्व धन, व सर्व रत्नें यांचा प्रभु केलें. सर्व दाढांनीं युक्त असलेल्यांचा राजा शेष झाला. नागांचा वासुकी झाला ८-१०. इतर सर्व सरपटणाऱ्या प्राण्यांचा स्वामी तक्षक झाला. सागर, नद्या, मेघ व वर्षण यांचा अधिपति आदितीच्या पुत्रांतील कनिष्ठ पर्जन्याला केलें ११. चित्ररथाला गंधर्वांचा राजा केलें. सर्व अप्सरांच्या गणांचा स्वामी कामदेव झाला. सर्व चतुष्पाद पशु व वाहनें यांचें आधिपत्य महेश्वराचा ध्वज जो नंदी त्याला मिळालें १२,१३. महातेजस्वी हिरण्याक्षाला दैत्यांचा प्रभु केलें. त्यानें आपल्या यौवराज्यावर हिरण्यकशिपूची स्थापना केली १४. कालकेय गणांचा प्रभु महाकाल झाला. त्वष्ट्याची भार्या जी अनायुषा तिच्या पुत्रांचा राजा वृत्र झाला १५. राहु या नांवाचा जो महाअसुर सिंहिकापुत्र त्याला ब्रह्मदेवानें अनेक अशुभ उत्पातांचा स्वामी केलें १६. हे भारता, सर्व युगें, ऋतु, मास, पक्ष, तिथी, पर्वें, कला, काष्ठा, मुहूर्त, अयनांची गति, या सर्वांचा व योग आणि गणित यांचा राजा संवत्सर झाला १७,१८. दूरवर पहाण्यास समर्थ असलेल्या सर्व पक्ष्यांचा व सर्पांचा अधिपति सुपर्ण गरुड केला गेला १९. जास्वंदीच्या

चैव सर्वेषां साध्यानामधिपः कृतः २० पुत्रोऽस्य विरथो नाम कश्यपस्य प्रजापतेः । राजा प्राच्यां दिशि तथा वासवेनाधिपः कृतः २१ आदित्यस्य विभोः पुत्रो धर्मराजो महायशाः । दक्षिणस्यां दिशि यमो महेन्द्रेणैव सत्कृतः २२ कश्यपस्यौरसः पुत्रः सलिलान्तर्गतः सदा । अंबुराज इति ख्यातः प्रतीच्यां दिशि पार्थिवः २३ पुलस्त्यपुत्रो द्युतिमान्महेन्द्रप्रतिमः प्रभुः । एकाक्षः पिंगलो नाम सौम्यायां दिशि पार्थिवः २४ एवं विभज्य राज्यानि स्वयंभूर्लोकभावनः । लोकांश्च त्रिदिवे दिव्यानददत्स पृथक्पृथक् २५ कस्यचित्सूर्यसंकाशान्कस्याचेदग्निसमप्रभान् । कस्यचित्सुष्टु विद्योतान्कस्यचिच्चन्द्रनिर्मलान् २६ नानावर्णान्कामगमाननेकेशतयोजनान् । सतान्सुकृतिनां लोकान्पापदुष्कृतिदुर्लभान् २७ येषां भासो निभान्त्यग्रे सौम्यास्तारागणा इव । एते सुकृतिनां लोका य जाताः पुण्यकर्मिणः २८ ये यजन्ति मखैः पुण्यैः समाप्तवरदक्षिणैः । स्वदारनिरताः क्षांता ऋजवः सत्यवादिनः २९ दीनानुग्रहकर्तारो ब्रह्मण्या लोभवर्जिताः । संत्यक्तरजसः संतो यान्ति ब्रह्म तपोज्ज्वलाः ३० एवं नियुज्य तनयान्स्वयं लोकपितामहः । पुष्करं ब्रह्मसदनमारुरोह प्रजापतिः ३१ सर्वे स्वयंभुदत्तेषु पालनेषु दिवौकसः । रेमिरे स्वेषु लोकेषु महेन्द्रेणाभिपालिताः ३२ स्वयंभुवा शक्रपुरः सराः सुराः कृता यथार्हं प्रतिपालनेषु ते । यशो दिवं च प्रतिपेदिरे शुभं मुदं च जग्मुर्मखभागभोजिनः ३३

[ १४२६ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि सप्तत्रिंशोऽध्यायः ॥ ३७ ॥

---

लाल पुष्पांच्या ढिगाप्रमाणें लाल असलेला अरुण हा गरुडाचा भ्राता आहे. त्याला सर्व योग व साध्य यांचा अधिपति केलें २०. या कश्यपपुत्र प्रजापतीचा विरथ या नांवाचा पुत्र होता. त्याला इंद्रानें पूर्वदिशेंत अधिपति नेमलें २१. विभु आदित्याचा पुत्र महायशस्वी धर्मराज. त्या यमाचा दक्षिण दिशेंत इंद्रानेंच सत्कार केला २२. सदा जलांत रहाणारा अंबुराज या नांवाचा जो कश्यपाचा औरस पुत्र तो पश्चिम दिशेंत राजा झाला २३. पुलस्त्याचा पुत्र मोठा तेजस्वी, महेंद्रासारखा प्रभु व एकाक्ष होता. पिंगल असें त्याचें नांव होतें. तो उत्तर दिशेंत राजा झाला २४. याप्रमाणें राज्यांचा विभाग करून लोकांस उत्पन्न करणारा स्वयंभू ब्रह्मदेव त्यांस स्वर्गांत पृथक् पृथक् दिव्य लोक देता झाला २५. कोणाला सूर्यासारखे, कोणाला अग्नीसारखे, कोणाला फारच चांगले चमकणारे, कोणाला चंद्रासारखे निर्मल २६, नानावर्णांचे, इच्छेप्रमाणें जाणारे, अनेक शेकडों योजनें विस्तीर्ण व पापरूपी दुष्कृत्यें करणारांस दुर्लभ असलेले पुण्यवानांचे लोक त्यानें निर्माण केले २७. त्यांच्या प्रभा अग्रभागीं सौम्य तारागणांसारख्या भासतात. जे पुण्यकर्मे करणारे यालोकीं उद्भवतात त्यांचे हे लोक आहेत. सर्वोत्तम श्रेष्ठ दक्षिणांनीं समाप्त केलेल्या पुण्यकारक यज्ञांनीं जे यजन करितात, जे स्वस्त्रीच्याठायीं निरत, क्षांतिमान्, सरळ स्वभावाचे, सत्य भाषण करणारे २८,२९. दीनावर अनुग्रह करणारे, ब्राह्मणभक्त, लोभरहित, ज्यांनीं रजोभाव सोडला आहे, व जे तपाच्या योगानें अमल झाले आहेत असे संत त्या लोकांस जातात ३०. असो; याप्रमाणें आपल्या सर्व पुत्रांस नियुक्त करून स्वतः लोकपितामह प्रजापति पुष्करसंज्ञक ब्रह्मसदनीं आरूढ झाला ३१. महेंद्रानें ज्यांचें पालन केलें आहे असे सर्व देव स्वयंभूनें दिलेल्या पालनकर्मामध्यें तत्पर राहून आपापल्या लोकांत रममाण झाले ३२. स्वयंभूनें इंद्रप्रभृति देवांस निर्माण केलें. योग्यतेप्रमाणें प्रतिपालनार्थ त्यांना नियुक्त केलें. त्यामुळें यज्ञभागाचें भोजन करणाऱ्या त्यांना यश व

वैशंपायन उवाच ॥ कदाचित्तु सपक्षास्ते पर्वता धरणीधराः । प्रस्थिता धरणीं त्यक्त्वा ननं तस्यैव मायया १ तदासुराणां निलयं हिरण्याक्षेण पालितम् । दिशं प्रतीचीमागम्य ह्रदेऽमज्जन्यथागजाः २ तत्रासुरेभ्यः शंसंत आधिपत्यं सुराश्रयम् । तच्छ्रुत्वाथासुराः सर्वे चक्रुरुद्योगमुत्तमम् ३ क्रूरां च बुद्धिमतुलां पृथिवीहरणे रताः । आयुधानि च सर्वाणि जगृहुर्भीमविक्रमाः ४ चक्राशनीस्तथाखड्गान्भुशुंडीश्च धनूंषि च । प्रासान्पाशांश्च शक्तीश्च मुसलानि गदास्तथा ५ केचित्कवचिनः सज्जा मत्तनागांस्तथापरे । केचिदश्वरथान्युक्ता अपरेऽश्वान्महासुराः ६ केचिदुष्ट्रांस्तथाखड्गान्महिषान्गर्दभानपि । स्वबाहुबलमास्थाय केचिच्चापि पदातयः ७ परिवार्य हिरण्याक्षं तलबद्धाः कलापिनः । इतश्चेतश्च निश्चेरुर्हृष्टाः सर्वे युयुत्सवः ८ ततो देवगणाः पश्चात्पुरन्दरपुरोगमाः । दैत्यानां विदितोद्योगाश्चक्रुरुद्योगमुत्तमम् ९ महता चतुरंगेण बलेन सुसमाहिताः । बद्धगोधांगुलित्राणास्तूणवन्तः समार्गणाः १० उग्रायुधधरा देवाः स्वेष्वनीकेष्ववस्थिताः । ऐरावतगतं शक्रमन्वगच्छन्त पृष्ठतः ११ ततस्तूर्यनिनादेन भेरीणां च महास्वनैः । अभ्यद्रवद्धिरण्याक्षो देवराजं पुरंदरम् १२ तीक्ष्णैः परशुनिस्त्रिंशैर्गदातोमरशक्तिभिः । मुशलैः पट्टिशैश्चैव छादयामास वासवम् १३ ततोऽस्त्रबलवेगेन सार्चिष्मत्यः सुदारुणाः । घोररूपा महावेगा निपेतुर्बाणवृष्टयः १४

---

स्वर्ग यांची प्राप्ति झाली व ते शुभ आनंदास प्राप्त झाले ३३. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० सदतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३७ ॥

वैशंपायनः—एकदा ते पंखयुक्त पर्वत, खरोखर त्या परमेश्वराच्याच मायेनें, पृथ्वीला सोडून निघाले १. त्यावेळीं हिरण्याक्षानें असुराचें निवासस्थान पाळिलें. ते दैत्यांच्या पक्षाचे पर्वत पश्चिम दिशेस येऊन हत्तीप्रमाणें एका मोठ्या डोहांत बुडून राहिले २. तेथें त्यांनीं असुरांस--तुमचे कनिष्ठ भ्राते देव आधिपत्याचा उपभोग घेत आहेत व तुह्मी वडील असूनही अधिकारशून्य आहां—असें सांगितलें. तें ऐकून सर्व असुर उत्तम उद्योग करूं लागले ३. त्यांनीं अतुल क्रूर बुद्धि धारण केली. पृथ्वीचें हरण करण्यामध्यें ते रत झाले. ज्यांचा पराक्रम फार भयंकर आहे अशा त्यांनीं चक्रें, अशनि, खड्गें भुशुंडी, धनुष्यें, प्रास, पाश, शक्ति, मुसळें, गदा इत्यादि सर्व आयुधें धारण केलीं ४. ५. कित्येक कवचें घालूनच सज्ज झाले. दुसरे कित्येक हत्तींवर आरूढ झाले. कित्येक अश्व व रथ यांनीं युक्त झाले. आणखी दुसरे महा असुर घोड्यांवर बसले. कित्येक उंटांवर, गेंड्यांवर, रेड्यांवर व गाढवावरही आरूढ झाले. कित्येक आपल्या बाहुबलाचा आश्रय करून पायांनीं जाऊं लागले ६, ७. सारांश, याप्रमाणें तलहस्तादिकांस आच्छादित करून व पक्ष्यांच्या पिसाऱ्यानें शोभणारे बाण घेऊन ते सर्व युद्धाची इच्छा करणारे असुर मोठ्या आनंदानें हिरण्याक्षास परिवेष्टित करून चोहोंकडून निघाले ८. तेव्हां दैत्यांचा हा उद्योग ज्यांना कळला आहे असे इंद्रप्रभृति देव उत्तम उद्योग करूं लागले. मोठ्या चतुरंग सैन्यासहवर्तमान सज्ज होऊन त्यांनीं हस्तत्राणादि आच्छादनें बांधलीं, भाते पाठीवर घेतले, बाणांचा संग्रह केला ९,१०. आणि याप्रमाणें उग्र आयुधें धारण करणारे देव आपल्या सैन्यांत उभे राहिले. ते ऐरावतावर बसून पुढें जाणाऱ्या इंद्राच्या मागून चालले ११. नंतर मंगलवाद्यांचा नाद व नगाऱ्यांचा महाध्वनि यांसहवर्तमान हिरण्याक्ष देवराज इंद्रावर चालून आला १२. तीक्ष्ण परशु, तरवारी

शिष्टाश्च दैत्या बलिनः सितधारैः परश्वधैः । परिघैरायसैः खड्गैः क्षेपणीयैश्च मुद्गरैः १५
गंडशैलैश्च विविधैरद्रिमाभिश्चाद्रिसन्निभैः । घातनीभिश्च गुर्वीभिः शतघ्नीभिस्तथैव च १६
युगयंत्रैश्च निर्मुक्तैरर्गलैश्च विदारणैः । सर्वान्देवगणान्दैत्याः सञ्जिजघ्नुः सवासवान् १७
धूम्रकेशं हरिश्मश्रुं नानाप्रहरणायुधम् । रक्तसंध्याभ्रसंकाशं किरीटोत्तमधारिणम् १८
नीलपीतांबरधरं शितदंष्ट्रोर्ध्वधारिणम् । आजानुबाहुं हर्यक्षं वैडूर्याभरणोज्ज्वलम् १९ समु-
द्यतायुधं दृष्ट्वा सर्वे देवगणास्तदा । ते हिरण्याक्षमसुरं दैत्यानामग्रतः स्थितम् २० युगान्त-
समये भीमं स्थितं मृत्युमिवाग्रतः । प्राव्यथन्त सुराः सर्वे तदा शक्रपुरोगमाः २१ दृष्ट्वा-
यान्तं हिरण्याक्षं महाद्रिमिव जंगमम् । देवाः संविग्नमनसः प्रगृहीतशरासनाः २२ सह-
स्राक्षं पुरस्कृत्य तस्थुः संग्राममूर्धनि । सा च दैत्यचमू रेजे हिरण्यकवचोज्ज्वला २३
प्रवृद्धनक्षत्रगणा शारदी द्यौरिवामला । तेऽन्योन्यमभिसंपेतुः पातयन्तः परस्परम् २४ बभं-
जुर्बाहुभिर्बाहून्द्वंद्वमन्ये युयुत्सवः । गदानिपातैर्भग्नांगा बाणैश्च व्यथितोरसः २५ विनिपेतुः
पृथक्केचित्तथान्येऽपि विजघ्निरे । बभंजिरे रथान्केचित्केचित्संमर्दिता रथैः २६ संबाधमन्ये
संप्राप्ता न शेकुश्चलितुं रथात् । दानवेंद्रबलं तत्र देवानां च महद्बलम् २७ अन्योन्यबाण-

---

गदा, तोमर, शक्ति, मुसळें व पट्टे, यांनीं त्यानें इंद्राला आच्छादित केलें. १३. त्यानंतर अस्त्रबलवेगानें ज्वालायुक्त व अतिशय दारुण अशा घोररूप, महावेगवान् बाणवृष्टि पडल्या १४. बाकीचे बलाढ्य दैत्य ज्यांच्या धारा शुभ्र आहेत अशा परशूंनीं, लोखंडी परिघांनीं, खड्गांनीं, फेंकावयाच्या मुद्गरांनीं १५, मोठमोठ्या दगडांनीं, नानाप्रकारच्या पाशांनीं, पर्वतासारख्या फेंकावयाच्या शिलांनीं, जड शतघ्नींनीं, त्याचप्रमाणें सोड-लेल्या युगयंत्रांनीं व विदारण करणाऱ्या अर्गलांनीं इंद्रासह सर्व देवांस मारूं लागले १६,१७. ज्याचे केंस धूम्रवर्ण आहेत. श्मश्रु हिरव्या रंगाची आहे, हातांत नाना-प्रकारचीं आयुधें आहेत, ज्याची अंगकांति संध्याकाळच्या अभ्राप्रमाणें आहे, ज्यानें उत्तम किरीट धारण केला आहे १८. ज्यानें नील व पीतवस्त्र नेसलें आहे, ज्यानें शुभ्र-वर्ण ऊर्ध्व दंष्ट्रा धारण केल्या आहेत, ज्याचे बाहू आजानु आहेत, नेत्र पिवळे आहेत, जो वैडूर्य–आभरणांनीं उज्ज्वल दिसत आहे १९. व ज्यानें आयुधें उचललीं आहेत अशा असुरांच्या अग्रभागीं स्थित असलेल्या हिरण्याक्षास सर्व देव पाहते झाले २०. युगां-तसमयींच्या भयंकर मृत्यूप्रमाणेंच अग्रभागीं स्थित असलेल्या त्याला पाहून इंद्रप्रभृति सर्व देव अतिशय व्यथित झाले २१. जणुंकाय चालतां बोलतां महापर्वतच अशा येत अस-लेल्या हिरण्याक्षाला पाहून ज्यांनीं धनुष्यें ग्रहण केलीं आहेत असे देव खिन्नचित्त झाले २२. पण इंद्राला पुढें करून ते संग्रामप्रदेशीं उभे राहिले. सुवर्णाच्या कवचांनीं उज्ज्वल झालेली दैत्यांची सेना ज्यांतील नक्षत्रसमूह वृद्धि पावला आहे ( मेघावरण गेल्यामुळें स्पष्ट दिसूं लागला आहे ) अशा शरदृतूंतील आकाशाप्रमाणें निर्मल शोभत होती. एकमेकांस मारीत ते वीर परस्परांच्या सन्मुख चालले २३,२४. द्वंद्वयुद्ध करणाऱ्या कित्येकांनीं आपल्या बाहूंनीं दुसऱ्यांचे बाहू मोडले. गदांचे प्रहार करून अंगें मोडली. बाणांनीं उरःस्थलास व्यथा केली. कित्येक पृथक् पृथक् चाल करून जाऊं लागले. दुसरे कित्येक नुस्ते मारीत सुटले. कित्येकांनीं इतरांच्या रथांस मोडून पाडलें. कित्येक रथांच्या खालीं सांपडून मेले २५,२६. आपसांत कित्येक इतक्या गर्दींत शिरले कीं, ते रथां-

वर्षेण युद्धदुर्दिनमाबभौ । हिरण्याक्षस्तु बलवान्क्रुद्धः स दितिनन्दनः २८ व्यवर्धत महातेजाः समुद्र इव पर्वणि । तस्य क्रुद्धस्य सहसा मुखान्निश्चेरुरर्चिषः २९ शस्त्रजालैर्बहुविधैर्धनुर्भिः परिघैरपि । सर्वमाकाशमावव्रे पर्वतैरुत्थितैरिव ३० बहुभिः शस्त्रनिस्त्रिंशैश्छिन्नभिन्नशिरोरसः । न शेकुश्चलितुं देवा हिरण्याक्षार्दिता युधि ३१ सर्वे वित्रासिता देवा हिरण्याक्षेण संयुगे । न शेकुर्यत्नवन्तोऽपि यत्नं कर्तुं विचेतसः ३२ तेन शक्रः सहस्राक्षः स्तंभितोऽस्त्रेण धीमता । ऐरावतगतः संख्ये नाशकच्चलितुं भयात् ३३ सर्वांश्च देवानखिलान्स पराजित्य दानवः । स्तंभयित्वा च देवेशमात्मस्थं मन्यते जगत् ३४ सतोयमेघप्रतिमोग्रनिःस्वनं प्रभिन्नमातंगविलासविग्रहम् । धनुर्विधुन्वन्तमुदारवर्चसं तदासुरेन्द्रं ददृशुः सुराः स्थिताः ३५ [ १४६१ ] इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वणि वाराहे अष्टत्रिंशोऽध्यायः ॥ ३८ ॥

वैशंपायन उवाच ॥ निष्प्रयत्ने सुरपतौ धर्षितेषु सुरेषु च । हिरण्याक्षवधे बुद्धिं चक्रे चक्रगदाधरः १ वाराहः पर्वतो नाम यः पूर्वं समुदाहृतः । स एष भूत्वा भगवानाजगामासुरान्तकृत् २ ततश्चंद्रप्रतीकाशमगृह्णाच्छंखमुत्तमम् । सहस्रारं च तच्चक्रं चक्रपर्वतसन्निभम् ३ महादेवो महाबुद्धिर्महायोगी महेश्वरः । पठ्यते योऽमरैः सर्वैर्गुह्यैर्नामभिरव्ययः ४ सदास-

---

तून संचार करण्यास समर्थ झाले नाहींत. त्या युद्धांत दानवांचें सैन्य व देवांचें मोठें सैन्य एकमेकांवर बाणवृष्टि करूं लागलें. त्यामुळें सूर्य आच्छादित झाला. पर्वाच्या दिवशीं जसा समुद्र वाढतो त्याप्रमाणें महातेजस्वी, बलाढ्य दितिपुत्र हिरण्याक्ष क्रुद्ध होऊन अतिशय वाढला. रागावलेल्या त्याच्या तोंडांतून अकस्मात् अग्नीच्या ज्वाला निघाल्या २९. उठलेल्या पर्वताप्रमाणेंच नानाप्रकारचे शस्त्रसमूह, धनुष्यें व परिघ यांच्या योगानें त्यानें सर्व आकाश आवृत करून सोडलें ३०. हिरण्याक्षानें युद्धांत पीडलेले व अनेक शस्त्रें आणि खड्गें यांनीं ज्यांचीं मस्तकें व उरस्थळें छिन्न—भिन्न झालीं आहेत असे देव हालचाल करण्यासही समर्थ झाले नाहींत ३१. याप्रमाणें हिरण्याक्षानें संग्रामांत ज्यांना भिवविलें आहे असे सर्व देव यत्नवान् असूनही मोहित झाल्याकारणानें यत्न करण्यास समर्थ झाले नाहींत ३२. त्या बुद्धिमान् राक्षसानें अस्त्रानें निश्चल केलेला व ऐरावतावर बसलेला सहस्राक्ष इंद्र संग्रामांत भयानें इकडे तिकडे हालण्यासही समर्थ झाला नाहीं ३३. याप्रमाणें सर्व देवांचा पूर्णपणें पराभव करून व देवेंद्राचें स्तंभन करून दानव जग आपल्या अधीन झालें असें समजूं लागला ३४. तेव्हां तेथें स्थित असलेले देव जलपूर्ण मेघाप्रमाणें ज्याचा उग्र ध्वनि आहे, मत्त हत्तीच्या विलासाप्रमाणें ज्याचें उद्धत शरीर आहे, व ज्याचें तेज उत्कृष्ट आहे अशा धनुष्य हलविणाऱ्या असुरेंद्राला पाहते झाले ३५. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० अडतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३८ ॥

**वैशंपायन:**—याप्रमाणें सुरपति प्रयत्नशून्य झाला असतां व देवांचा पराभव झाला असतां चक्र व गदा यांस धारण करणाऱ्या देवानें हिरण्याक्षाचा वध करण्याचा निश्चय केला १. वाराह पर्वत म्हणून ज्याचा वर निर्देश केला होता तोच हा असुरांचा अंत करणारा भगवान् होऊन आला २. नंतर त्यानें चंद्रासारखा शुभ्र व उत्तम शंख धारण केला. ज्याला सहस्र अर आहेत असें चक्रपर्वततुल्य चक्र त्यानें हातांत घेतलें ३. सर्व अमर अव्यय, महायोगी, महेश्वर, महाबुद्धि इत्यादि गुह्य नांवांनीं ज्याचें पठण करितात ४,

सर्वात्मनि श्रेष्ठः सद्भिर्य सेव्यते सदा । इज्यते यः पुराणैश्च त्रिलोके लोकभावनः ५ यो वैकुण्ठः सुरेन्द्राणामनन्तो भोगिनामपि । विष्णुर्यो योगविदुषां यो यज्ञो यज्ञकर्मणाम् ६ मखे यस्य प्रसादेन भुवनस्था दिवौकसः । आज्यं महर्षिभिर्दत्तमश्नुवन्ति त्रिधा हुतम् ७ यो गतिर्देवदैत्यानां यः सुराणां परा गतिः । यः पवित्रं पवित्राणां स्वयंभूरव्ययो विभुः ८ यस्य चक्रप्रविष्टानि दानवानां युगे युगे । कुलान्याकुलतां यान्ति यानि दृप्तानि वीर्यतः ९ ततो दैत्यदर्पकं पौराणं शंखमुत्तमम् । धमन्वक्त्रेण बलवानाक्षिपद्दैत्यजीवितम् १० श्रुत्वा शंखस्वनं घोरमसुराणां भयावहम् । क्षुभिता दानवाः सर्वे दिशो दश व्यलोकयन् ११ ततः संरक्तनयनो हिरण्याक्षो महासुरः । कोऽयमित्यब्रवीद्रोषान्नारायणमुदैक्षत १२ वाराहरूपिणं देवं संस्थितं पुरुषोत्तमम् । शंखचक्रोद्यतकरं देवानामार्तिनाशनम् १३ रराज शंखचक्राभ्यां ताभ्यामसुरसूदनः । सूर्याचन्द्रमसोर्मध्ये यथा नीलपयोधरः १४ ततोऽसुरगणाः सर्वे हिरण्याक्षपुरोगमाः । उद्यतायुधनिस्त्रिंशा दृप्ता देवमुपाद्रवन् १५ पीड्यमानोऽतिबलिभिर्दैत्यैः सर्वायुधोद्यतैः । न चचाल हरिर्युद्धे कंप्यमान इवाचलः १६ ततः प्रज्वलितां शक्तिं वाराहोरसि दानवः । हिरण्याक्षो महातेजाः पातयामास वीर्यवान् १७ तस्याः शक्त्याः प्रभावेण ब्रह्मा विस्मयमागतः । समीपमागतां दृष्ट्वा महाशक्तिं महाबलः १८ हुंकारेणैव निर्भर्त्स्य पातयामास भूतले । तस्यां प्रतिहतायां तु ब्रह्मा साध्विति चाब्रवीत् १९ यः प्रभुः

जो सदा सर्वात्म्यांमध्यें श्रेष्ठ आहे, जो संतांकडून सदा सेविला जातो, त्रिभुवनांत जो लोकोत्पादक पुराणांकडून पूजला जातो ५, जो देवश्रेष्ठांतील वैकुंठ, सर्पांतील अनंत, योगवेत्त्यांतील विष्णु व यज्ञकर्मांतील यज्ञ आहे ६, ज्याच्या प्रसादानें यज्ञामध्यें देव भुवनामध्यें स्थित होऊन महर्षींनीं दिलेलें व हुत, हूयमान आणि प्रहुत अशा तीन प्रकारें हवन केलेलें आज्य खातात ७, जो देव-दैत्यांची गति, देवांची तर उत्तम गति, जो सर्व पवित्रांचें पवित्र, स्वयंभू, अव्यय, प्रभु ८, प्रत्येक युगांत ज्याच्या चक्रामध्यें प्रविष्ट झालेलीं व वीर्यतः मत्त झालेलीं दानवांचीं कुलें आकुल होतात असा तो भगवान् पुढें झाला ९. नंतर त्या बळवानानें आपल्या तोंडानें दैत्यांस पळावयास लावणारा जुना उत्तम शंख वाजविला व दैत्याच्या जीवितास आक्षेप केला १०. असुरांना भयावह असलेला तो घोर शंखध्वनि ऐकून क्षुब्ध झालेले सर्व दानव दशदिशा पहाते झाले ११. त्यानंतर ज्याचे नेत्र लाल आहेत असा महाअसुर हिरण्याक्ष " हा कोण आला आहे " असें मोठ्या रोषानें ह्मणाला. आणि नारायणाकडे पाहूं लागला १२. देवांच्या दुःखाचा नाश करणाऱ्या, शंख व चक्र हातांत घेतलेल्या आणि वराहाच्या रूपानें पुढें उभ्या असलेल्या पुरुषोत्तम देवाला त्यानें पाहिलें १३. असुरांचें मर्दन करणारा तो देव शंख व चक्र यांच्या योगानें सूर्य व चंद्र यांच्या मध्यभागीं असलेल्या काळ्या मेघाप्रमाणें शोभला १४. नंतर हिरण्याक्षप्रभृति सर्व दैत्यगण मत्त होऊन व आयुधें आणि तरवारी उचलून त्या देवावर धावले १५. सर्व आयुधें उचललेल्या व बलाढ्य दैत्यांकडून पीडला जाणाराही हरि युद्धामध्यें निष्कंप पर्वताप्रमाणें निश्चल राहिला १६. तें पाहून महातेजस्वी व वीर्यवान् हिरण्याक्ष दानव आपली प्रज्वलित शक्ति वराहाच्या उरःस्थलावर टाकता झाला १७. त्या शक्तीच्या प्रभावानें ब्रह्मा विस्मित झाला. पण ती महाशक्ति समीप आली आहे असें पाहून महाबळ वराहानें नुसत्या हुंकारानेंच तिला

सर्वभूतानां वराहस्तेन ताडितः । ततो भगवता चक्रमाविध्यादित्यसन्निभम् २० ततः स्थितस्यैव शिरस्तस्य भूमौ पपात ह । हिरण्मयं वज्रहतं मेरुशृंगमिवोत्तमम् २१ हिरण्याक्षे हते दैत्ये शेषा ये तत्र दानवाः । सर्वे तस्य भयत्रस्ता जग्मुराशु दिशो दश २२ स सर्वलोकाप्रतिचक्रचक्रो महाहवेष्वप्रतिमोऽग्रचक्रः । बभौ वराहो युधि चक्रपाणिः कालो युगान्तेष्विव दण्डपाणिः २३ [ १४८४ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि एकोनचत्वारिंशोऽध्यायः ॥ ३९ ॥

वैशंपायन उवाच ॥ विद्राव्य तु रणे सर्वानसुरान्पुरुषोत्तमः । मुमोच तत्र बद्धांस्तान्पुरन्दरमुखान्सुरान् १ ततः प्रकृतिमापन्नाः सर्वे देवगणास्तथा । पुरन्दरं पुरस्कृत्य नारायणमुपास्थिताः २ देवा ऊचुः ॥ त्वत्प्रसादेन भगवन् तव बाहुबलेन च । जीवामोऽद्य महाबाहो निष्क्रान्ताश्चान्तकाननात् ३ त्वच्छासनाद्धि भगवन् किं कुर्वन्त्वदितेः सुताः । इच्छामः पादशुश्रूषां तव कर्तुं सनातन ४ वैशंपायन उवाच ॥ तच्छ्रुत्वा वचनं तेषां पुण्डरीकनिभेक्षणः । उवाच वचनं देवान्मुदायुक्तो हतद्विषः ५ श्रीभगवानुवाच ॥ यो यस्य भवतो लोको मयैव विहितः पुरा । पाल्यतां स तु यत्नेन नियोगश्च क्वचित् क्वचित् ६ ऐश्वर्यं प्रतिपन्नाः स्थ क्रतुभागपुरस्कृतम् । मयैव पूर्वं निर्दिष्टो नियोगः प्रतिपाल्यताम् ७ शक्रं चोवाच भगवान्वचनं दुन्दुभिस्वनः । इदं यथावत्कर्तव्यं सत्सु चासत्सु च त्वया ८ गच्छन्तु तपसा

---

निर्वीर्य करून भूतलावर पाडलें. याप्रमाणें ती कुंठित झाली असतां ब्रह्मा ' साधु ' ( फार चांगलें, वाहवा ! ) असें म्हणाला १८,१९. नंतर सर्व भूतांचा जो प्रभु वराह त्या भगवानानें सूर्यासारखें चकचकीत चक्र नेम धरून व गरगर फिरवून त्याच्यावर फेंकलें २०. त्याबरोबर रणांगणांत स्थित असलेल्याच त्याचें शिर, वज्राचा ज्याच्यावर प्रहार झाला आहे अशा हिरण्मय उत्तम मेरुशृंगाप्रमाणें भूमीवर पडलें २१. याप्रमाणें हिरण्याक्ष दानव मेला असतां तेथें बाकी राहिलेले सर्व दानव त्याच्या भीतीनें अतिशय त्रस्त होऊन तत्काल दशदिशांस गेले २२. ज्याची आज्ञा सर्व लोकांत अकुंठित होते ( कोठेंही अमान्य होत नाहीं ), जो संग्रामांत अप्रतिम आहे, ज्याचें चक्र आति उग्र आहे, असा रणांगणांत हातांत चक्र घेऊन उभा राहिलेला वराह युगांतसमयींच्या दंडपाणि कालाप्रमाणें दिसला २३. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वाचा एकूणचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ३९ ॥

वैशंपायनः—याप्रमाणें सर्व असुरांना रणांगणांतून पळवून पुरुषोत्तम तेथें बांधून ठेवलेल्या इंद्रप्रभृति देवांस सोडविता झाला १. त्यानंतर देहभानावर आलेले सर्व देवगण पुरंदराला पुढें करून नारायणाचें स्तुतिरूप उपस्थान करूं लागले २. देवः—हे महापराक्रमी भगवाना, आज आम्हीं तुझ्या बाहुबलानें व प्रसादानेंच जिवंत राहिलों असून अंतकाच्या तोंडांतून सुटलों आहों ३. हे भगवन्, तुझ्या आज्ञेनें आम्हीं अदितिपुत्रांनीं काय करावें ? हे सनातना, तुझी पादशुश्रूषा करण्याची इच्छा आम्ही करतों ४. वैशंपायनः—तें त्यांचें वचन ऐकून आनंदानें युक्त झालेला पुंडरीकाक्ष ज्यांचे शत्रु मेले आहेत अशा देवांस असें म्हणाला ५. श्रीभगवान्:—पूर्वीं मीच नेमून दिलेलें आपापलें कर्तव्य करा. आपापल्या लोकांचें परिपालन करा ६,७. नगाऱ्याप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे, असा भगवान् इंद्राला असें वचन बोलला. " सज्जन व असज्जन यांच्यासंबंधीं तूं हें सांगितल्याप्रमाणें कर ८. तीक्ष्ण व्रतें करणारे मुनी तपाच्या योगानें

स्वर्गं मुनयः शंसितव्रताः । तव लोकं सुरश्रेष्ठ सर्वकामदुघं सदा ९ यायजूकाश्च ये केचि-
द्ब्राह्मणाः क्षत्रिया विशः । तेषां कामदुघा लोकाः स्वर्गमादिमनोहराः । यज्ञैरिष्ट्वा याय-
जूकाः फलं ते प्राप्नुवन्तु च १० भावः सद्धर्मशीलानामभावः पापकर्मणाम् । सन्तः स्वर्गजितः
सन्तु सर्वाश्रमनिवासिनः ११ सत्यशूरा रणशूरा दानशूराश्च ये नराः । ते नराः स्वर्गमश्नन्तु
सदा ये चानसूयवः १२ अश्रद्दधानाः पुरुषाः कामिनोऽर्थपराः शठाः । अब्रह्मण्या नास्ति-
काश्च नरकं यान्तु मानवाः १३ एतावाक्रियतां वाक्यं यथोक्तं त्रिदशेश्वराः । ततो मयि
स्थिते सर्वान्बाधिष्यन्ते न चारयः १४ इत्युक्त्वान्तर्हितो देवः शंखचक्रगदाधरः । देवतानां
च सर्वेषामभवद्विस्मयो महान् १५ एतदत्यद्भुतं दृष्ट्वा वाराहचरितं सुराः । नमस्कृत्वा
वराहाय नाकपृष्ठमितो गताः १६ ततः स्वान्याधिपत्यानि प्रतिपन्नानि दैवतैः । सर्वलोका-
धिपत्ये च प्रतिष्ठां वासवो गतः १७ विमुक्ता दानवगणैः प्रकृतिं धरणी गता । स्थैर्यहेतो-
र्धरण्यास्तु ज्ञात्वा चागस्कृतान्गिरीन् १८ स्वेषु स्थानेषु संस्थाप्य पर्वतानां पुरन्दरः । चिच्छेद
भगवान्पक्षान्वज्रेण शतपर्वणा १९ सर्वेषामेव पक्षा वै छिन्नाः शक्रेण धीमता । एकः
सपक्षो मैनाकः सुरैस्तत्समयः कृतः २० एष नारायणस्यायं प्रादुर्भावो महात्मनः । वाराह
इति विप्रेन्द्रैः पुराणे परिकीर्तितः २१ कृष्णद्वैपायनमतं नानाश्रुतिसमाहितम् । नाशुचेर्न
कृतघ्नाय न नृशंसाय कीर्तयेत् २२ न क्षुद्राय न नीचाय न गुरुद्वेषकारिणे । नाशिष्याय

---

हे सुरश्रेष्ठा, सर्व कामना पूर्ण करणारा तुझा लोक जो स्वर्ग त्याला सदा प्राप्त होवो. होम-हवन करणारे जे कित्येक ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य आहेत त्यांनाच आकाशगति इत्यादि सिद्धींनीं मनोहर झालेले व कामना पूर्ण करणारे लोक मिळतात. यास्तव यज्ञांच्या योगानें पूजन करून यायजूक या फलास प्राप्त होवोत ९,१०. सद्धर्मशील पुरुषांचा भाव व पाप-कर्म करणारांचा अभाव होवो. सर्व आश्रमांत निवास करणारे संत स्वर्गास जिंकणारे होवोत ११. जे नर सत्याविषयीं शूर, रणांत शूर, दानांत शूर व जे दुसऱ्यांच्या गुणामध्यें दोषदृष्टी न करणारे असतात ते सदा स्वर्गाचा उपभोग घेवोत १२. जे पुरुष असल्या धर्माविषयीं श्रद्धा ठेवीत नाहींत, कामना करणारे, द्रव्यपरायण, शठ, ब्राह्मणांस पूज्य न मानणारे, व नास्तिक असतात ते नरकास जावोत १३. हे स्वर्गांतील अधिपतींनो, माझें एवढें हें वाक्य तुम्ही करा. म्हणजे मी तुमचें रक्षण करणारा स्थित असतांना शत्रु तुम्हांला बाधा करणार नाहींं" १४. असें बोलून शंख-चक्र-गदाधर देव गुप्त झाला. तें पाहून सर्व देवांना मोठा विस्मय वाटला १५. हें अति अद्भुत वाराहचरित पाहून व त्या वराहाला नमस्कार करून देव तेथून स्वर्गलोकास गेले व त्यांनीं आपापलीं आधिपत्यें स्वीकारिलीं. इंद्र सर्व लोकांच्या आधिपत्यावर प्रतिष्ठित झाला १६,१७. दानवगणांच्या हातांतून सुट-लेली धरणी ( पृथ्वी ) पूर्व अवस्थेस प्राप्त झाली. नंतर पर्वतांनीं दानवांस प्रेरणा करून मोठा अपराध केला आहे असें जाणून पृथ्वीच्या स्थैर्याकरितां १८, इंद्रानें त्यांना त्यांच्या यथायोग्य स्थानीं स्थापिलें. व ज्याला शंभर पर्वें आहेत अशा वज्रानें त्या भगवानानें पर्वतांचें पंख तोडून टाकले १९. बुद्धिमान् इंद्रानें त्या सर्वांचे पंख तोडले. त्यांतील एक मैनाक मात्र पंखासहवर्तमान होता देवांनीं त्याच्या रक्षणाकरितां समय केला होता २०. अशा प्रकारचा हा महात्म्या नारायणाचा, ब्राह्मणश्रेष्ठांनीं पुराणांत वाराह म्हणून वर्णि-लेला प्रादुर्भाव मी तुला सांगितला २१. नानाश्रुतिसिद्ध असें कृष्णद्वैपायनाचें हें मत

तथा राजन्नकृतघ्नाय चैव हि २३ आयुष्कामैर्यशःकामैर्महीकामैश्च मानवैः । जयैषिभिश्च श्रोतव्यो देवानामेष वै जयः २४ पुराणो वेदसंबद्धः शिवः स्वस्त्ययनो महान् । पावनः सर्वसत्त्वानां तत्कालविजयप्रदः २५ एष कौरव्य तत्त्वेन कथितस्त्वनुपूर्वशः । वाराहस्य नृपश्रेष्ठ प्रादुर्भावो महात्मनः २६ ये यजन्ति मखैः पुण्यैर्दैवतानि पितॄनपि । आत्मानमात्मना नित्यं विष्णुमेव यजन्ति ते २७ लोकायनाय त्रिदशायनाय ब्रह्मायनायात्मभवायनाय । नारायणायात्महितायनाय महावराहाय नमस्कुरुष्व २८ [ १५१२ ] इति श्रीम० खि० हरि० भविष्य० वाराहप्रादुर्भावे चत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ४० ॥

वैशंपायन उवाच ॥ वाराह एष कथितो नारसिंहमतः शृणु । यत्र भूत्वा मृगेन्द्रेण हिरण्यकशिपुर्हतः १ पुरा कृतयुगे राजन्हिरण्यकशिपुः प्रभुः । दैत्यानामादिपुरुषश्चकार सुमहत्तपः २ दशवर्षसहस्राणि शतानि दश पंच च । जलवासी समभवत्स्थानमौनव्रतस्थितः ३ ततः शमदमाभ्यां च ब्रह्मचर्येण चैव हि । ब्रह्मा प्रीतोऽभवत्तस्य तपसा नियमेन च ४ ततः स्वयंभूर्भगवान्स्वयमागम्य तत्र ह । विमानेनार्कवर्णेन हंसयुक्तेन भास्वता ५ आदित्यैर्वसुभिः साध्यैर्मरुद्भिर्दैवतैः सह । रुद्रैर्विश्वसहायैश्च यक्षराक्षसकिन्नरैः ६ दिग्भिश्चाथ विदिग्भिश्च नदीभिः सागरैस्तथा । नक्षत्रैश्च मुहूर्तैश्च खचरैश्च महाग्रहैः ७ देवैर्ब्रह्मर्षिभिः सार्धं सिद्धैः सप्तर्षिभिस्तथा । राजर्षिभिः पुण्यकृद्भिर्गन्धर्वैरप्सरोगणैः ८ चराचरगुरुः

---

आहे. अशुचि, कृतघ्न, निर्दय, क्षुद्र, नीच, गुरूंचा द्वेष करणारा, शिष्य नसलेला व शिष्य असूनही कृतघ्न झालेला इतक्यांना हें वृत्त सांगूं नये २२,२३. आयुष्याची इच्छा करणारे, यशाची इच्छा करणारे, पृथ्वीची इच्छा करणारे व जयाची इच्छा करणारे जे मानव असतील त्यांनीं हा देवांचा प्रसिद्ध जय ऐकावा २४. हा फार जुना, वेदाशीं संबद्ध असलेला, कल्याणरूप, स्वस्त्ययन, मोठा पावन, व सर्व प्राण्यांस तत्काल विजय देणारा आहे २५. हे कौरववंशजा श्रेष्ठ राजा, महात्म्या वराहाचा हा प्रादुर्भाव मी तुला क्रमानें व सत्य सांगितला आहे २६. जे पुण्यकारक यज्ञांनीं देव व पितर यांची पूजा करितात आणि आत्म्याच्या योगानें आत्म्याचें पूजन करितात ते नित्य विष्णूचेंच यजन करितात २७. यास्तव राजा, लोकांची गति, देवांची गति, ब्राह्मणांची गति, स्वयंभूची गति व आत्महिताची गति, अशा महावराहरूपी नारायणास नमस्कार कर २८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वराहाख्यानाचा चाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४० ॥

वैशंपायनः—राजन्, मी हा वाराह अवतार सांगितला. आतां नारसिंह अवतार ऐक. त्या अवतारांत हरि मृगेंद्र होऊन हिरण्यकशिपूस मारता झाला १. हे नरेंद्रा, पूर्वी कृतयुगांत दैत्यांचा आदिपुरुष जो प्रभु हिरण्यकशिपु तो फार मोठें तप करता झाला २. वृक्षादि स्थावराप्रमाणें मौनव्रत धरून राहिलेला तो साडेअकरा सहस्र वर्षें जलांत स्थित झाला ३. तेव्हां त्याचा शम, दम, ब्रह्मचर्य, तप, नियम यांच्या योगानें ब्रह्मा संतुष्ट झाला ४. नंतर तो स्वयंभू भगवान् सूर्यासारख्या तेजस्वी, हंसयुक्त व प्रकाशमान होणाऱ्या विमानानें आदित्य, वसु, साध्य, मरुत्, देवता, विश्वेदेव, सर्वांस सहाय्य करणारे रुद्र, यक्ष, राक्षस, किन्नर, दिशांच्या व विदिशांच्या देवता, नद्या, सागर, नक्षत्रें, मुहूर्त, आकाशचर महाग्रह, देव, ब्रह्मर्षि, सिद्ध, सप्तर्षि पुण्यवान् राजर्षि, गंधर्व, अप्सरागण, या सर्वांसहवर्तमान स्वतः तेथें आला ५-८. देवगणांकडून आवृत झालेला व ब्रह्मवेत्त्यांतील श्रेष्ठ

श्रीमान्वृतो देवगणैः सह । ब्रह्मा ब्रह्मविदां श्रेष्ठो दैत्यं वचनमब्रवीत् ९ ब्रह्मोवाच । प्रीतोऽस्मि तव भक्तस्य तपसानेन सुव्रत । वरं वरय भद्रं ते यथेष्टं काममाप्नुहि १० ततो हिरण्यकशिपुः प्रीतात्मा दानवोत्तमः । कृतांजलिपुटः श्रीमान्वचनं चेदमब्रवीत् ११ हिरण्यकशिपुरुवाच ॥ न देवासुरगन्धर्वा न यक्षोरगराक्षसाः । न मानुषाः पिशाचाश्च निहन्युर्मां कथंचन १२ ऋषयो नैव मां क्रुद्धाः सर्वलोकपितामह । शपेयुस्तपसा युक्ता वर एष वृतो मया १३ न शस्त्रेण न चास्त्रेण गिरिणा पादपेन च । न शुष्केण न चार्द्रेण स्याद्वै चान्येन मे वधः १४ न स्वर्गेऽप्यथ पाताले नाकाशे नावनिस्थले । न चाभ्यन्तररात्र्यह्नोर्न चाप्यन्येन मे वधः १५ पाणिप्रहारेणैकेन सभृत्यबलवाहनम् । यो मां नाशयितुं शक्तः स मे मृत्युर्भविष्यति १६ भवेयमहमेवार्कः सोमो वायुर्हुताशनः । सलिलं चान्तरिक्षं च नक्षत्राणि दिशो दश । अहं क्रोधश्च कामश्च वरुणो वासवो यमः १७ धनदश्च धनाध्यक्षो यक्षकिंपुरुषाधिपः । मूर्तिमन्ति च दिव्यानि ममास्त्राणि महाहवे । उपतिष्ठन्तु देवेश सर्वलोकपितामह १८ पितामह उवाच ॥ एते दिव्या वरास्तात मया दत्तास्तवाद्भुताः । सर्वान्कामानल्पभावात्प्राप्स्यसि त्वं न संशयः १९ वैशंपायन उवाच ॥ एवमुक्त्वा स भगवान् जगामाकाशमेव च । वैराज्यं ब्रह्मसदनं ब्रह्मर्षिगणसेवितम् २० ततो देवाश्च नागाश्च गन्धर्वा मुनिभिः सह । वरप्रदानं श्रुत्वैव पितामहमुपस्थिताः २१ देवा ऊचुः ॥ वरेणानेन भगवन्बधिष्यति स नो सुरः । तत्प्रसीदस्व भगवन्वधोऽप्यस्य विचिन्त्यताम् २२ वैशंपायन उवाच ॥

---

श्रीमान् चराचर गुरु, ब्रह्मा त्या दैत्यास असें ह्मणाला ९. ब्रह्मा:—हे सुव्रता, तुज भक्ताच्या या तपानें मी संतुष्ट झालों आहें. तुझें कल्याण होवो. वर माग. तुझा मनोरथ यथेष्ट परिपूर्ण होवो १०. त्यानंतर ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे असा दानवोत्तम श्रीमान् हिरण्यकशिपु हात जोडून हें असें वचन बोलला ११. हिरण्यकशिपु:— देव, असुर, गंधर्व, यक्ष, राक्षस, उरग, मानुष, व पिशाच मला कोणत्याही रीतीनें न मारतील १२. आणि हे सर्व लोकांच्या पितामहा, रागावलेले तपोयुक्त ऋषीही मला शाप न देतील; हा वर मी तुजपासून मागत आहे १३. मला शस्त्रानें मरण येऊं नये. अस्त्रानें येऊं नये. पर्वत व वृक्ष यांच्या आघातानें मी मरूं नये. शुष्क, आर्द्र व अशाच दुसऱ्याही कोणत्या वस्तूनें माझा वध न व्हावा १४ स्वर्गामध्यें मला मरण येऊं नये. पाताल, आकाश व भूपृष्ठ यांतील कोठेंही मी मरूं नये. रात्र, दिवस व त्यांचा संधिकाल यांमध्यें व दुसऱ्या कशानेंही माझा वध होऊं नये १५. जो एकाच हस्तप्रहारानें भृत्य, सैन्य व वाहनें यांसह माझा नाश करण्यास समर्थ असेल तो माझा मृत्यु होईल १६. मीच सूर्य, चंद्र, वायु, अग्नि, जल, अंतरिक्ष, नक्षत्रें, दहा दिशा व्हावें. मी क्रोध, काम, वरुण, इंद्र, यम १७, धनाध्यक्ष व यक्ष आणि किन्नर यांचा अधिपति कुबेर होईन. हे सर्व लोकपितामह देवेशा, महा संग्रामांत सर्व अस्त्रें मूर्तिमान् माझ्यापाशीं उभीं राहोत १८. पितामह:—बा राक्षसा, हे सर्व दिव्य व अद्भुत वर मी तुला दिले आहेत. थोड्याच भावनेनें सर्व मनोरथ तुला प्राप्त होतील, यांत कांहीं संशय नाहीं १९. वैशंपायन:—असें बोलून तो भगवान् ब्रह्मर्षिगणांनीं सेविलेल्या विराट्—संबंधी ब्रह्मसदनास आकाशमार्गानें गेला २०. त्यानंतर हें वरप्रदान ऐकून देव, नाग, गंधर्व, मुनि, इत्यादि सर्व पितामहापाशीं येऊन उभे राहिले २१. देव:—हे भगवन्, या तुमच्या वरानें

भगवान्सर्वभूतानामादिकर्ता स्वयंप्रभुः । स्रष्टा च हव्यकव्यानामव्यक्तः प्रकृतिर्ध्रुवः २३ सर्वलोकहितं वाक्यं श्रुत्वा देवः प्रजापतिः । आश्वासयामास सुरान्स शीतैर्वचनांबुभिः २४ अवश्यं त्रिदशास्तेन प्राप्तव्यं तपसः फलम् । तपसोन्ते स भगवान्वधं विष्णुः करिष्यति २५ एतच्छ्रुत्वा सुराः सर्वे वाक्यं पंकजजन्मनः । स्वानि स्थानानि दिव्यानि प्रतिजग्मुर्मुदान्विताः २६ वैशंपायन उवाच ॥ लब्धमात्रे वरे तस्मिन्त्सर्वाः सोऽबाधत प्रजाः । हिरण्यकशिपुर्दैत्यो वरदानेन दर्पितः २७ आश्रमेषु मुनीन्सर्वान् ब्राह्मणान्संशितव्रतान् । सत्यधर्मरतान्दान्तान्धर्षयामास वीर्यवान् २८ देवांस्त्रिभुवनस्थांश्च पराजित्य महासुरः । त्रैलोक्यं वशमानीय स्वर्गे वसति दानवः २९ यदा वरमदोन्मत्तश्चोदितः कालधर्मणा । यज्ञियानकरोद्दैत्यान्दैवतानप्ययज्ञियान् ३० तदादित्याश्च साध्याश्च विश्वे च वसवस्तथा । रुद्रा देवगणा यक्षा देवद्विजमहर्षयः ३१ शरण्यं शरणं विष्णुमुपतस्थुर्महाबलम् । देवं देवमयं यज्ञं ब्रह्मदेवं सनातनम् ३२ भूतं भव्यं भविष्यं च प्रजालोकनमस्कृतम् । देवा ऊचुः ॥ नारायण महाभाग देव त्वां शरणं गताः ३३ त्वं हि नः परमो धाता त्वं हि नः परमो गुरुः । त्वं हि नः परमो देवो ब्रह्मादीनां सुरोत्तम ३४ त्वंपद्मामलपत्राक्ष शत्रुपक्षभयावह । क्षयाय दितिवंशस्याक्षयाय भव न प्रभो ३५ त्रायस्व जहि दैत्येन्द्र हिरण्यकशिपुं प्रभो । विष्णुरुवाच ॥

---

तो असुर आह्मांला मारील. यास्तव कृपा करून याच्या वधाचाही उपाय योजून ठेवा २२. वैशंपायनः—तेव्हां तो भगवान्, सर्व लोकांचा आदिकर्ता, स्वयंप्रभु, हव्य—कव्यांचा उत्पादक, अव्यक्त, प्रकृतिरूप, नित्य, व तेजोरूप प्रजापति तें त्याचें सर्व लोकांचें हित करणारें वाक्य ऐकून अशा शीत वचनजलानें त्यांचें सांत्वन करिता झाला २३,२४. हे देवांनो, त्याला तपाचें फल अवश्य मिळालें पाहिजे. तप संपलें ह्मणजे भगवान् विष्णु त्याचा वध करील २५. कमलापासून उत्पन्न झालेल्या देवाचें हें वाक्य ऐकून सर्व देव आनंदयुक्त झाले व आपापल्या दिव्य स्थानीं गेले २६. वैशंपायनः—वर मिळतांच तो हिरण्यकशिपु सर्व प्रजेला पीडा देऊं लागला. वरदानानें दर्पित झालेल्या त्यानें सर्वांस त्राहि त्राहि करून सोडलें २७. त्या वीर्यवानानें आश्रमांमध्यें असणाऱ्या सर्व मुनींना, तीक्ष्ण व्रतें करणाऱ्या, सत्य व धर्म यांत रत असलेल्या व इंद्रियांचें दमन करणाऱ्या ब्राह्मणांना भयभीत केलें २८. तो महाअसुर दानव त्रिभुवनस्थ देवांचा पराभव करून व सर्व त्रैलोक्य आपल्या वश आणून स्वर्गांत राहूं लागला २९. जेव्हां वरमदानें उन्मत्त झालेला व कालधर्मानें ज्याला प्रेरणा केली आहे असा तो दानव दैत्यांना यज्ञांतील भागांचे भोक्ते व देवांना त्यांचे अभोक्ते करता झाला ३०, तेव्हां आदित्य, वसू, रुद्र, साध्य, विश्वेदेव, देवगण, यक्ष, देव, ब्राह्मण व महर्षि, शरण जाण्यास योग्य असलेल्या महाबलवान् विष्णूला शरण जाऊन त्याच्यापाशीं उभे राहिले. प्रकाशमय देव, यज्ञ, ब्रह्मदेव, सनातन, भूत, भव्य, भविष्य, व प्रजा आणि सर्व लोक यांच्याकडून नमस्कृत अशा देवाची तें अशी स्तुति करूं लागले. देवः—हे नारायण, हे महाभाग, हे देव, आह्मी तुला शरण आलों आहों ३१-३३. तूंच आह्मांस अत्यंत तृप्त करणारा, तूंच आमचा परम गुरु, व हे सुरोत्तमा, तूंच आह्मां ब्रह्मादिकांचें परम दैवत आहेस ३४. कमलाच्या निर्मल पाकळीप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत व शत्रुपक्षाला जो भयावह आहे अशा हे प्रभो, तूं दितिवंशाचा क्षय व आमच्या वंशाचा अक्षय करणारा हो ३५. प्रभो, आमचें रक्षण कर. दैत्येंद्र

भयन्त्यजध्वममरा अभयं वो ददाम्यहम् ३६ तथैव त्रिदिवं देवा प्रतिपद्यध्वम मा चिरं ।
एष तं सगणं दैत्यं वरदानेन दर्पितम् ३७ अवध्यममरेन्द्राणां दानवेन्द्रं निहन्म्यहम् । वैशं-
पायन उवाच ॥ एवमुक्त्वा स भगवान्विसृज्य त्रिदिवौकसः ३८ वधं संकल्पयित्वा तु हिर-
ण्यकशिपोः प्रभुः ३९ सोऽचिरेणैव कालेन हिमवत्पार्श्वमागतः । किं तु रूपं समास्थाय
निहन्म्येनं महासुरम् ४० यत्सिद्धिकरमाशु स्याद्वधाय विबुधद्विषः । अनुत्पन्नं ततश्चक्रे
सोऽत्यन्तं रूपमास्थितः ४१ नारसिंहमनाधृष्यं दैत्यदानवरक्षसाम् । सहायं तु महाबाहुर्ज-
ग्राहोंकारमेव च ४२ अथोंकारसहायोऽसौ भगवान् विष्णुरव्ययः। हिरण्यकशिपोः स्थानं जगाम
प्रभुरीश्वरः ४३ तेजसा भास्कराकारः कान्त्या चन्द्रइवापरः। नरस्य कृत्वार्धतनुं सिंहस्यार्धतनुं
विभुः ४४ नारसिंहेन वपुषा पाणिं संस्पृश्य पाणिना । ततोऽपश्यत विस्तीर्णां दिव्यां रम्यां मनोर-
माम् ४५ सर्वकामयुतां शुभ्रां हिरण्यकशिपोः सभाम् । विस्तीर्णां योजनशतं शतमध्यर्धमुच्छ्रि-
ताम् ४६ विहायसीं कामगमां पंचयोजनमुच्छ्रिताम् । जराशोकक्लमत्यक्तां निष्प्रकंपां शिवां
शुभाम् ४७ शुभासनवतीं रम्यां ज्वलन्तीमिव तेजसा । अन्तःसलिलसंयुक्तां विहितां विश्व-
कर्मणा ॥ दिव्यरत्नमयैर्वृक्षैः फलपुष्पप्रदैर्युताम् ४८ नीलपीतासितश्यामैः सितैर्लोहितकै-
रपि । अवतानैस्तथागुल्मैर्मंजरीशतधारिभिः ४९ सिताभ्रघनसंकाशा प्लवन्तीवाप्सु दृश्यते ।
धन्यासनवती रम्या ज्वलन्तीमिव तेजसा ५० प्रभावती भास्वरा च दिव्यगन्धमनोरमा ।

---

हिरण्यकशिपूस मार. विष्णुः—अहो देवांनो, तुह्मी भय सोडा. मी तुह्मांला अभय देतों ३६. त्याचप्रमाणें देवांनो, स्वर्गास प्राप्त व्हा. उशीर लावूं नका. हा मी आतां वरदानानें दर्पित झालेल्या व अमरश्रेष्ठांस अवध्य असलेल्या दैत्येंद्रास त्याच्या परिवारासह मारतों. वैशंपायनः—असें बोलून व देवांचें विसर्जन करून त्या प्रभूनें हिरण्यकशिपूच्या वधाचा संकल्प केला ३७–३९. तो लागलाच हिमालयाच्या पार्श्वभागीं आला. मी आतां कोणतें रूप घेऊन या महा असुराचा वध करूं ४०. त्या देवशत्रूच्या वधाला उचित व सत्वर सिद्धिकर असेंच रूप मला घेतलें पाहिजे. असा विचार करून दैत्य, दानव व राक्षस यांस पराभव न करतां येण्या सारखें नारसिंहाचें रूप त्यानें घेतलें. त्यानें अयोनिसंभव परम रूपाचा स्वीकार केला. त्या महाबाहूनें ओंकारालाच आपल्या सहायास घेतलें ४१,४२. नंतर ओंकार ज्याचा सहायकर्ता आहे, असा तो अव्यय भगवान् विष्णु, प्रभु, ईश्वर, हिरण्यकशिपूच्या स्थानीं गेला ४३. तो तेजानें भास्कराकार व कांतीनें दुसऱ्या चंद्रासारखा होता. त्या विभूनें आपली अर्धी तनु नराची व अर्धी सिंहाची केली ४४. याप्रमाणें नारसिंहाच्या शरीरानें हातानें हातास स्पर्श करून भगवान् विस्तीर्ण, दिव्य, रम्य, मनोरम, सर्व मनोरथयुक्त, शुभ्र, शंभर योजनें लांब, दीडशें योजनें रुंद, पांच योजनें उंच, आकाशांतून इच्छेप्रमाणें गमन करणारी, जरा, शोक व श्रम यांनीं रहित, अचंचल, शिव व शुभ अशा हिरण्यकशिपूच्या सभेंत गेला ४५–४७. ती शुभ आसनांनीं युक्त, रम्य व तेजानें जणूं काय जळत असल्यासारखी होती. ती अंतर्जलयुक्त, विश्वकर्म्यानें केलेली, दिव्य रत्नमय व फल–पुष्पादि देणाऱ्या वृक्षांनीं युक्त होती ४८. तिच्या छताला निळ्या, पिवळ्या, काळ्या, पांढऱ्या, व लाल रंगाच्या झालरी लावलेल्या असून मध्यभागीं शेकडों गुच्छाकार गोंडे लावलेले होते ४९. शुभ्र अभ्राप्रमाणें दिसणारी ती जणूं काय जलांत तरंगतच होती. ती सर्वोत्तम आसनयुक्त रम्य व तेजानें प्रदीप्त होती ५०. ती प्रभावाली,

नासुखा न च दुःखा सा नभीता न च घर्मदा ५१ न क्षुत्पिपासे न ग्लानिं प्राप्य तां प्राभुवन्ति हि । नानारूपैर्विरचिता विचित्रैरतिभास्वरैः ५२ स्तंभैर्मणिमयैर्दिव्यैः शाश्वती चाक्षता च सा । अतिचन्द्रं च सूर्यं च पावकं च स्वयंप्रभा ५३ दीप्यते नाकपृष्ठस्था भर्त्सयन्तीव भास्करम् । सर्वे च कामाः प्रचुरा ये दिव्या ये च मानुषाः ५४ रसवन्तः प्रभूताश्च भक्ष्यभोज्यं तथाक्षयम् । पुण्यगन्धाः स्रजस्तत्र नित्यपुष्पफलद्रुमाः ५५ उष्णे शीतानि तोयानि शीते चोष्णानि सन्ति वै । पुष्पिताग्रान्महाशाखान्प्रवालांकुरधारिणः ५६ लतावितानसंच्छन्नान्सरित्सु च सरःसु च । मनोहरांश्च विविधान् ददर्श स तदा प्रभुः ५७ द्रुमान्बहुविधांस्तत्र मृगेन्द्रो ददृशे द्रुतम् । गन्धवन्ति च पुष्पाणि रसवन्ति फलानि च ५८ तानि शीतानि तोयानि तत्र तत्र सरांसि च । अपश्यत्सर्वतीर्थानि सभायां शतशो विभुः ५९ नलिनैः पुण्डरीकैश्च शतपत्रैः सुगन्धिभिः । रक्तैः कुवलयैर्नीलैः कुमुदैः संयुतानि च ६० सकांतैर्धार्तराष्ट्रैश्च राजहंसैः सुरप्रियैः । कादंबैश्चक्रवाकैश्च सारसैः कुररैरपि ६१ विमलस्फटिकाभानि पांडुराष्टदलानि च । कलहंसोपगीतानि सारिकाभिरुतानि च ६२ गन्धवत्यः शुभास्तत्र पुष्पमञ्जरिधारिणीः । दृष्टवान्पादपाग्रेषु नानापुष्पधरा लताः ६३ केतकाशोकसरलाः पुन्नागतिलकार्जुनाः । चूतानीपानागपुष्पाः कदंबबकुला धवाः ६४ प्रियंगु पाटली-

---

भास्वरा, व दिव्य गंधानें मनोरम असलेली सभा केवल सुखरूप नव्हे, दुःखरूप नव्हे, शीत नव्हे व उष्णाही नव्हे अशी होती ५१. त्या सभेला प्राप्त होऊन क्षुधा, तृष्णा, व ग्लानि कधींच अनुभवावी लागत नाहीं. नानारूप, विचित्र, अतिभास्वर, रत्नमय व दिव्यस्तंभांनीं ती रचलेली होती. ती शाश्वत व अक्षत सभा स्वयंप्रभा असून चंद्र, सूर्य व अग्नि यांचें तिनें अतिक्रमण केलें होतें ५२, ५३. स्वर्गपृष्ठावर असलेली ती सूर्याची जणूं काय निर्भर्त्सनाच करीत होती. दिव्य व मानुष असे सर्व काम तेथें पुष्कळ असून ५४ ते सर्व रसवान् व हवे तितके होते. तिच्यामधील भक्ष्य व भोज्य अक्षय असे. तेथें सुंदर सुवासाच्या पुष्पमाळा होत्या. पुष्प व फळें यांनीं सतत युक्त असलेले वृक्ष होते ५५. त्या सभेंत उष्णकाळीं शीत जल व शीतकाळीं विपुल उष्ण जल मिळत असे. ज्यांचीं अग्रें फुललीं आहेत, ज्या कोवळे अंकुर धारण करीत आहेत, ज्यांच्या शाखा फार मोठ्या आहेत, व जे लतांच्या विस्तारांनीं झांकून गेले आहेत असे नानाप्रकारचे मनोहर वृक्ष तो प्रभु त्यावेळीं नद्या व सरोवरें यांच्या कांठीं पाहता झाला ५६,५७. त्या सिंहानें असे नानाप्रकारचे वृक्ष तेथें पाहिले सुवासिक पुष्पें व रसाळ फळें त्याला त्या सभेंत दिसलीं ५८ शीत जलें, ठिकाठिकाणचीं सरोवरें, व सर्व तीर्थें प्रभूनें त्या सभेंत शतशः पाहिलीं ५९. नील कमलें, शुभ्र कमलें, सुगंधी शतपत्र कमलें, लाल कमलें, काळीं कमलें इत्यादिकांनीं तीं तीर्थें युक्त होतीं ६०. आपापल्या प्रियांसह देवांस प्रिय असलेल्या धार्तराष्ट्र पक्ष्यांनीं व राजहंसांनीं, कादंबांनीं, चक्रवाकांच्या योगानें सारसांनीं व कुरर पक्ष्यांच्या योगानेंही तीं तीर्थें भूषित झालीं होतीं ६१. शुद्ध स्फटिकाप्रमाणें त्यांचें जल स्वच्छ होतें. त्यांत पांढरीं अष्टदल कमलें होतीं. कलहंसाचीं गीतें व सारिकांचे ध्वनी येथें ऐकूं येत असत ६२. सुवासिक, शुभ, पुष्पमंजिरी धारण करणाऱ्या व नानाप्रकारच्या पुष्पांनीं भरलेल्या अशा लता त्या सभेंतील वृक्षांच्या अग्रांवरून लोंबत असलेल्या त्या सिंहानें पाहिल्या ६३. केतक, अशोक, सरल, पुन्नाग,

वृक्षाः शाल्मलयः सहरिद्रकाः। शालास्ताला: प्रियालाश्च चंपकाश्च मनोरमाः ६५ तथा
चान्ये व्यराजन्त सभायां पुष्पिता द्रुमाः। वैद्रुमाश्च द्रुमानीका दावाग्निज्वलितप्रभाः ६६
स्कन्धवतः सुशाखाश्च बहुतालसमुच्छ्रयाः। अंजनाशोकवर्णाभा भान्ति वंजुलकाद्रुमाः ६७
वरणा वत्सनाभाश्च पनसाश्चंदनैः सह। नीलाः सुमनसश्चैव पीताम्लाश्चत्थतिंदुकाः ६८ प्राची-
नामलकालोध्रामल्लिका भद्रदारवः। आम्रातकास्तथा जंबू लकुचाः शैलवालुकाः ६९
सर्जार्जुनाः कंदुरवाः पतंगाः कुटजास्तथा। रक्ताः कुरबकाश्चैव नीपाश्चागरुभिः सह ७०
कदंबाश्चैव भव्याश्च दाडिमीबीजपूरकाः। कालीयका दुकूलाश्च हिंगवस्तैलपर्णिकाः ७१
खर्जूरा नालिकेराश्च पूगवृक्षा हरीतकाः। मधूकाः सप्तपर्णाश्च बिल्वाः पारावतास्तथा ७२
पनसाश्च तमालाश्च नानागुल्मलतावृताः। लताश्च विविधाकाराः पत्रपुष्पफलोपगाः ७३
एते चान्ये च बहवस्तत्र काननजा द्रुमाः। नानापुष्पफलोपेता व्यराजन्त समंततः ७४
चकोराः शतपत्राश्च मत्तकोकिलसारिकाः। पुष्पितान्फलिताग्रांश्च संपतन्ति महाद्रुमान् ७५
रक्तपीतारुणास्तत्र पादपाग्रगता द्विजाः। परस्परमवैक्षन्त प्रहृष्टा जीवजीवकाः ७६ [१५८८]
इति श्रीमहा० खि० हरि० भविष्यपर्वणि एकचत्वारिंशोऽध्यायः॥ ४१॥

वैशंपायन उवाच॥ तस्यां सभायां दैत्येन्द्रो हिरण्यकशिपुः प्रभुः। आसीन आसने
दिव्ये नल्वमात्रे प्रमाणतः १ दिवाकरनिभे रम्ये दिव्यास्तरणसंते। रराज सुचिरं राजन्
ज्वलत्कांचनकुण्डलः २ तस्य दैत्यपतेर्भद्रं विरजस्कं समंततः। दिव्यगन्धवहस्तत्र मारुतः

---

तिलक, अर्जुन, आम्र, नीप, नागपुष्प, कदंब, बकुल, धव ६४. प्रियंगु, पाटलीवृक्ष, शाल्मलीवृक्ष, हरिद्रक, साल, ताल, प्रियाल, मनोरम चंपक, व असेच दुसरेही फुललेले वृक्ष त्या सभेमध्यें शोभत होते. दावाग्नीप्रमाणें ज्यांची प्रभा दीप्त आहे असे वैद्रुमवृक्षांचे संघ ६५,६६. ज्यांचें स्कंध फार मोठे आहेत, शाखा चांगल्या आहेत, जे अनेक ताड उंच आहेत, व काजळासारख्या अशोकांच्या वर्णाप्रमाणें ज्यांची प्रभा आहे, असे वंजुलक वृक्ष तेथें सुशोभित होते ६७. वरण, वत्सनाभ, पनस, चंदन, निळे, पुष्पयुक्त व पिवळे अम्लवृक्ष, अश्वत्थ, तिंदुक ६८. प्राचीन, आवळीचे वृक्ष, लोध्र, मल्लिक, भद्रदारु, आम्रातक, जंबू, लकुच, शैलवालुका ६९. सर्ज, अर्जुन, कंदुरव, पतंग, कुटज, लाल कुरबक, नीप, अगुरु, भव्य कदंब, दाळींबी, महाळुंगी, कालीयक, दुकूल, हिंगु, तैल पर्णिका ७०, ७१, खजूराची झाडें, नारळी, सुपारीचीं झाडें, हिरडे, मोहा, सप्तपर्ण, बिल्व, पारावत, फणस, तमाल, इत्यादि वृक्ष नानाप्रकारच्या लतांनीं व गुल्मांनीं आवृत होते. पत्रें, पुष्पें व फळें यांनीं युक्त असलेल्या विविध आकाराच्या लता तेथें होत्या ७२, ७३. हे व असेच दुसरेही अरण्य-वृक्ष तेथें होते. ते अनेक पुष्पफलांनीं युक्त व समंततः शोभत होते ७४. चकोर, शतपत्र, मत्त-कोकिल, सारिका इत्यादि पक्षी पुष्पित व ज्यांचीं अग्रें फलयुक्त आहेत अशा महावृ-क्षांवर येऊन पडत होते ७५. मत्स्यादि इतर जीवांवर निर्वाह करणारे लाल, पिवळे, व अरुणवर्णाचे वृक्षांच्या अग्रभागीं बसलेले पक्षी मोठ्या आनंदानें परस्परांस पहात होते ७६.
इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० एकेचाळिसावा अध्याय समाप्त झाला॥ ४१॥

वैशंपायनः—त्या सभेंत दिव्य, प्रमाणतः चारशें हात, सूर्यासारखें रम्य व दिव्य आस्त-रणानें युक्त अशा आसनावर बसलेला प्रभु दैत्येंद्र हिरण्यकशिपु अतिशय शोभत होता. दीप्त सुवर्ण कुंडलांनीं युक्त असलेला तो फारवेळ तसाच अतिशय शोभत होता १, २.

सुमुखो ववौ ३ तत्र देवाः सगन्धर्वा गणैरप्सरसां वृताः । दिव्यतालेन दिव्यानि जगुर्गीतानि गायनाः ४ विश्वाची सहजन्या च प्रम्लोचेत्यभिविश्रुता । दिव्या च सौरभेया च समीचा पुंजिकस्थला ५ मिश्रकेशी च रंभा च चित्रसेना शुचिस्मिता । चारुनेत्रा घृताची च मेनका चोर्वशी तथा ६ एताः सहस्रशश्चान्या नृत्यगीतविशारदाः । उपतिष्ठन्ति राजानं हिरण्यकशिपुं तदा ७ हिरण्यकशिपुस्तत्र विचित्राभरणांबरः । स्त्रीसहस्रैः परिवृतस्तस्थौ ज्वलितकुण्डलः ८ तत्रासीनं महाबाहुं हिरण्यकशिपुं प्रभुम् । उपासन्ति दितेः पुत्राः सर्वे लब्धवराः पुरा ९ बलिर्वैरोचनस्तत्र नरकः पृथिविंजयः । प्रह्लादो विप्रचित्तिश्च गविष्ठश्च महासुरः १० अहंता क्रोधहंता च सुमनाः सुमतिः स्वरः । घटोदरो महापार्श्वः क्रथनः पिठरस्तथा ११ विश्वरूपश्च रूपश्च विरूपश्च महाद्युतिः । दशग्रीवश्च वाली च मेघवासा महारवः १२ घटाभो विकटाभश्च संह्रादश्चेन्द्रतापनः । दैत्यदानवसंघाश्च सर्वे ज्वलितकुण्डलाः १३ स्रग्विणो वाग्मिनः सर्वे सर्वे सुचरितव्रताः । सर्वे लब्धवरा शूराः सर्वे विगतमृत्यवः १४ एते चान्ये च बहवो हिरण्यकशिपुं प्रभुम् । उपासन्ते महात्मानं सर्वे दिव्यपरिच्छदाः १५ विमानैर्विविधैरन्यैर्भ्राजमानैरिवार्चिभिः । स्रग्विणो भूषणधरा यान्ति चायान्ति हेलया १६ चित्राभरणधिता विचित्रवसनास्तथा । विचित्रशस्त्रकवचा विचित्रध्वजवाहनाः १७ महेन्द्रचापसंकाशैर्विचित्रैरंगदैर्वरैः । भूषितांगा दितेः पुत्रास्तमुपासन्ति नित्यशः १८ तस्यां

---

त्या दैत्यपतीच्या सभेंत समन्ततः मंद, धुळीनें रहित असलेला व सुगंधयुक्त असा समोरचा सुखकर वायु वहात होता ३. अप्सरांच्या गणांनीं आवृत झालेले गंधर्वांसह गायक देव दिव्य तालानें गाणीं गात होते ४. विश्वाची, सहजन्या, प्रम्लोचा, अभिविश्रुता, दिव्या, सौरभेया, समीची, पुंजिकस्थला ५, मिश्रकेशी, रंभा, चित्रसेना, शुचिस्मिता, चारुनेत्रा, घृताची, मेनका, उर्वशी ६, या व दुसऱ्याही नृत्य-गीतामध्यें विशारद असलेल्या सहस्रावधि अप्सरा त्यावेळीं त्या हिरण्यकशिपुराजाची सेवा करीत होत्या ७. ज्याचीं कुंडलें दीप्त आहेत आणि ज्याचीं आभरणें व वस्त्रें विचित्र आहेत असा हिरण्यकशिपु सहस्रावधि स्त्रियांनीं परिवेष्टित होऊन बसला होता ८. मागें ज्यांना वर मिळाला आहे असे सर्व दितीचे पुत्र तेथें बसलेल्या महाबाहु हिरण्यकशिपु प्रभूची उपासना करीत होते ९. विरोचनाचा पुत्र बलि, नरक, पृथिवींजय, प्रल्हाद, विप्रचित्ति, महाअसुर गविष्ठ १०, अहंता, क्रोधहंता, सुमना, सुमति, स्वर, घटोदर, महापार्श्व, क्रथन, पिठर ११, विश्वरूप, रूप, विरूप, महाद्युति, दशग्रीव, वाली, मेघवासा, महारव १२, घटाभ, विकटाभ, संऱ्हाद, इंद्रतापन. इत्यादि सर्व दीप्त कुंडलांनीं युक्त असलेले दैत्य व दानवांचे संघ त्याच्या सेवेंत सज्ज होते १३. ते सर्व माळा घातलेले. मोठे वक्ते व सर्व उत्तमप्रकारें व्रताचरण करणारे होते. त्या सर्वांनाही वरप्राप्ति झाली होती. सर्व शूर होते. सर्व मृत्युशून्य होते १४. हे व असेच दुसरेही पुष्कळ दैत्य महात्म्या प्रभु हिरण्यकशिपूची उपासना करीत होते. ते सर्व दिव्य सामग्रीनें युक्त होते १५ ज्वालांच्या योगानें विराजमान होणाऱ्या नानाप्रकारच्या सर्वोत्तम विमानांनीं माळा धारण करणारे व भूषणयुक्त असे ते सर्व सहज लीलेनें जात-येत होते १६. ते विचित्र आभरणांनीं युक्त, विचित्र वस्त्रें नेसणारे, ज्यांचीं शस्त्रें व कवचेंही विचित्र आहेत, ज्यांचे ध्वज व वाहनें विचित्र आहेत १७, महेंद्राच्या धनुष्यासारख्या विचित्र व श्रेष्ठ बाहुभूषणांनीं ज्यांचीं अंगें भूषित आहेत असे दितीचे

सभायां दिव्यायामसुराः पर्वतोपमाः । हिरण्मयमुकुटाः सर्वे दिवाकरसमप्रभाः १९ कनकमणिविचित्रवेदिकायामुपहितरत्नसहस्रवीथिकायाम् । स ददर्श मृगाधिपः सभायां सुरुचिरदन्तगवाक्षसंवृतायाम् २० कनकविमलहारभूषितांगं दितितनयं समृगाधिपो ददर्श । दिवसकरकरप्रभं ज्वलन्तमसुरसहस्रगणैर्निषेव्यमाणम् २१ [ १६०९ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि नारसिंहे द्विचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४२ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततो दृष्ट्वा महाबाहुं कालचक्रमिवागतम् । नरसिंहवपुश्छन्नं भस्मच्छन्नमिवानलम् १ विकुंचितसटं तस्य नारसिंहस्य भारत । रूपौदार्यं बभौ तत्र सहस्रशशिसन्निभम् २ अहोरूपमिदं चित्रं शंखकुंदेंदुसन्निभम् । अब्रुवन् दानवाः सर्वे हिरण्यकशिपुश्च सः ३ एवं हि ब्रुवतां तेषां निर्दग्धानां महात्मनाम् । नारसिंहेन चक्षुर्भ्यां चोदिताः कालधर्मणा ४ हिरण्यकशिपोः पुत्रः प्रह्लादो नाम वीर्यवान् । दिव्येन चक्षुषा सिंहमपश्यद्देवमागतम् ५ तं दृष्ट्वा रुक्मशैलाभमपूर्वां तनुमास्थितम् । विस्मिता दानवाः सर्वे हिरण्यकशिपुश्च सः ६ प्रह्लाद उवाच ॥ महाराज महाबाहो दैत्यानामादिसंभव । न श्रुतं नैव दृष्टं च नारसिंहमिदं वपुः ७ अव्यक्तप्रभवं दिव्यं किमिदं रूपमद्भुतम् । दैत्यान्तकरणं घोरं शंसतीव मनांसि नः ८ अस्य देवाः शरीरस्थाः सागराः सरितस्तथा । हिमवान्पारियात्रश्च येचान्ये

---

पुत्र त्याची नित्य उपासना करितात १८. त्या दिव्य सभेमध्यें पर्वतांचीच ज्यांना उपमा आहे असे सुवर्णाचे मुकुट घातलेले, व सूर्यासारखी ज्यांची प्रभा आहे असे अनेक असुर होते १९. जिला चोहोंकडे अतिसुंदर हस्तिदंती खिडक्या आहेत. जिच्यामध्यें सोन्याची रत्नजडित वेदिका ( ओटा ) आहे, व ज्याच्या आंत रत्नजडित हजारों मार्ग केलेले आहेत अशा सभेंत तो मृगराज प्रकट झाला २०. ज्याचें अंग सोन्याच्या शुद्धहारांनीं भूषित आहे, सूर्याच्या किरणांप्रमाणें ज्याची प्रभा आहे, जो अंगकांतीनें अतिशय दीप्त आहे व सहस्रावधि असुरांचा गण ज्याची सेवा करीत आहे अशा दितिपुत्राला त्या मृगराजानें पाहिलें २१. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० नारसिंहाख्यानाचा बेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४२ ॥

वैशंपायनः—राखेंत गुप्त असलेल्या अग्नीप्रमाणें नारसिंहशरीरानें गुप्तपणें आलेल्या कालचक्रासारख्या त्या महाबाहूस पाहून सर्व चकित झाले १. हे भारता, त्या नारसिंहाच्या सटा मानेवर पसरलेल्या होत्या. सहस्रचंद्रांसारखें त्याचें तेथें उत्तमरूप भासलें २. ते सर्व दानव व हिरण्यकशिपु " अहो हे रूप किती विचित्र व शंख, कुंद व चंद्र यांसारखें आहे " असें ह्मणाले ३. नारसिंहानें नेत्रांच्या योगानें दग्ध झालेल्या कालधर्मानें ज्यांना प्रेरणा केली आहे अशा, त्या महात्म्यांच्या तोंडांतून असे शब्द निघूं लागले असतां हिरण्यकशिपूच्या प्रऱ्हादसंज्ञक वीर्यवान् पुत्रानें दिव्य दृष्टीनें सिंहरूपानें आलेल्या त्या देवाला ओळखिलें ४, ५. अपूर्व शरीरास धारण केलेल्या सुवर्णपर्वतासारख्या त्याला पाहून सर्व दानव व हिरण्यकशिपूही विस्मित झाला ६. प्रऱ्हादः— हे महाराज, हे महाबाहो, हे दैत्यांच्या आदिसंभवा, हें नारसिंह शरीर आजपर्यंत आह्मीं कधीं पाहिलें नाहीं व ऐकलेंही नाहीं ७. याचा उद्भव अव्यक्त असून हें दिव्य स्वरूप कांहीं विलक्षण आहे. हें घोर व दैत्यांचा अंत करणारें आहे, असेंच जणूं काय आमच्या मनाला सांगत आहे ८. याच्या शरीरामध्यें देव, सागर, नद्या, हिमालय, पारियात्र, व दुसरेही सर्व

कुलपर्वताः ९ चंद्रमाः सह नक्षत्रैरादित्याश्चाश्विनी तथा । धनदो वरुणश्चैव यमः शक्रः शचीपतिः १० मरुतो देवगन्धर्वा मुनयश्च तपोधनाः । नागा यक्षाः पिशाचाश्च राक्षसा भीमविक्रमाः ११ ब्रह्मदेवः पशुपतिर्ललाटस्था विभान्ति वै । स्थावराणि च भूतानि जंगमानि तथैव च १२ भवांश्च सहितोऽस्माभिः सर्वैर्दैत्यगणैर्वृतः । विमानशतसंकीर्णा तथास्यान्तरजा सभा १३ सर्वं त्रिभुवनं राजन् लोकधर्मश्च शाश्वतः । दृश्यते नारसिंहेऽस्मिन्यथेंदौ विमलं जगत् १४ प्रजापतिश्चात्र मनुर्महात्मा ग्रहाश्च योगाश्च मही नभश्च । उत्पातकालश्च धृतिःस्मृतिश्च रजश्च सत्वं च तमो मदश्च १५ सनत्कुमारश्च महानुभावो विश्वे च देवाश्चाप्सरसश्च सर्वाः । क्रोधश्च कामश्च तथैव हर्षो दर्पश्च मोहः पितरश्च सर्वे १६ इत्येवमुक्त्वा स च दैत्यराजं हिरण्यनामानमविस्मयेन । दध्यौ च दैत्येश्वरपुत्र उग्रं महामतिः किंचिदधोमुखः प्राक् १७ [ १६२६ ] इति श्रीमहा० खि० ह० भवि० नारसिंहे त्रिचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४३ ॥

वैशंपायन उवाच ॥ प्रह्लादस्य च तच्छ्रुत्वा हिरण्यकशिपुर्वचः । उवाच दानवान्सर्वान्सगणांश्च गणाधिपः १ मृगेंद्रो गृह्यतां शीघ्रमपूर्वां तनुमास्थितः । यदि वा संशयः कश्चिद्वध्यतां वनगोचरः २ तच्छ्रुत्वा दानवाः सर्वे मृगेन्द्रं भीमविक्रमम् । परिक्षिपन्तो मुदितास्त्रासयामासुरोजसा ३ सिंहनादं नादित्वा तु पुनः सिंहो महाबलः । बभंज तां सभां रम्यां व्यादितास्य इवान्तकः ४ सभायां भज्यमानायां हिरण्यकशिपुः स्वयम् । चिक्षेपास्त्राणि सिंहस्य रोषव्याकुललोचनः ५ सर्वास्त्राणामथ श्रेष्ठं दण्डमस्त्रं सुभैरवम् । कालचक्रं तथात्युग्रं

---

कुलपर्वत स्थित आहेत ९. नक्षत्रांसह चंद्रमा, आदित्य, आश्विनीकुमार, कुबेर, वरुण, यम, शचीपति इंद्र १०. मरुत्, देव, गंधर्व, मुनी, तपोधन, नाग, यक्ष, पिशाच, भयंकर पराक्रमी राक्षस, ११, ब्रह्मदेव व पशुपति हे याच्या ललाटावर स्थित असलेले दिसत आहेत. स्थावर व जंगम भूतें १२, आम्हां सर्व दैत्यगणांनीं आवृत झालेला तूं शेंकडों विमानांनीं व्यापलेली ही सभा हे राजन्, सर्व त्रिभुवन, शाश्वत लोकधर्म, हें सर्व ज्याप्रमाणें चंद्रामध्यें विमल जग त्याप्रमाणें याच्या ठिकाणीं स्पष्ट दिसत आहे १४. याचे ठिकाणीं प्रजापति महात्मा मनु, ग्रह, योग, पृथ्वी, आकाश, उत्पातकाल, धृति, स्मृति, रज, सत्त्व, तम, मद १५. महानुभाव सनत्कुमार, विश्वेदेव, सर्व अप्सरा, क्रोध, काम, हर्ष, दर्प, मोह, सर्व पितर, इत्यादि सर्व याच्या शरीरांत आहेत १६. महामति दैत्येश्वर पुत्र याप्रमाणें आपल्या हिरण्यकशिपु पित्याला सांगून विस्मित न होतां किंचिदधोमुख होऊन पूर्वीच त्या उग्राचें ध्यान करूं लागला १७. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० नारसिंहाख्यानाचा त्रेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४३ ॥

वैशंपायनः—प्रल्हादाचें तें भाषण ऐकून गणाधिप हिरण्यकशिपु गणांसह सर्व दानवांस म्हणाला १, “ अपूर्व शरीर धारण केलेल्या या सिंहाला धरा. अथवा तुम्हांला कांहीं संशय वाटत असल्यास या वनांतील पशूला मारून सोडा २. ” तें ऐकून सर्व दानव आनंदित होऊन भयंकर पराक्रम करणाऱ्या मृगेंद्रास सर्वतः हुसकीत स्वबलानें भिववूं लागले ३. पण पुनः सिंहनाद करून ज्यानें आपलें तोंड पसरलें आहे अशा अंतकासारख्या व महाबलाढ्य सिंहानें त्या रम्य सभेला तोडून टाकलें ( अथवा सभेंतील सर्वांना पळवून लाविलें ) ४. पण सभेचा असा भंग झाला असतां रोषानें ज्याचे नेत्र व्याकुळ झाले आहेत असा स्वतः हिरण्यकशिपु

विष्णुचक्रं तथैव च ६ धर्मचक्रं महच्चक्रमजितं नामनामतः। चक्रमैन्द्रं तथाघोरमृषिचक्रं तथैव च ७ पैतामहं तथा चक्रं त्रैलोक्यमहितस्वनम्। विचित्रामशनीं चैव शुष्कार्द्रे चाशनिद्वयम् ८ रौद्रं तदुग्रं शूलं च कंकालं मुसलं तथा। अस्त्रं ब्रह्मशिरश्चैव ब्राह्ममस्त्रं तथैव च ९ ऐषीकमस्त्रमैन्द्रं च आग्नेयं शैशिरं तथा। वायव्यं मथनं नाम कापालमथ किंकरम् १० तथाऽप्रतिहतां शक्तिं क्रौंचमस्त्रं तथव च। अस्त्रं हयशिरश्चैव सौम्यमस्त्रं तथैव च ११ पैशाचमस्त्रममितं सत्यमस्त्रं तथाद्भुतम्। मोहनं शोषणं चैव संतापनविलापनम् १२ जृंभणं प्रापणं चैव त्वाष्ट्रं चैव सुदारुणम्। कालमुद्गरमक्षोभ्यं क्षोभणं तु महाबलम् १३ संवर्तनं मोहनं च तथा मायाधरं परम्। गान्धर्वमस्त्रं दयितमसिरत्नं च नन्दकम् १४ प्रस्वापनं प्रमथनं वारुणं चास्त्रमुत्तमम्। अस्त्रं पाशुपतं चैव यस्याप्रतिहता गतिः १५ एतान्यस्त्राणि सर्वाणि हिरण्यकशिपुस्तदा। चिक्षेप नरसिंहस्य दीप्तस्याग्नेर्यथाहुतिः १६ अस्त्रैः प्रज्वलितैः सिंहमावृणोदसुराधिपः। विवस्वान्घर्मसमये हिमवन्तमिवांशुभिः १७ स ह्यमर्षानिलोद्धूतो दैत्यानां सैन्यसागरः। क्षणेन प्लावयन्सिंहं मैनाकमिव सागरः १८ प्रासैः पाशैस्तथा खड्गैर्गदाभिर्मुसलैस्तथा। वज्रैरशनिकल्पैश्च शिलाभिश्च महाद्रुमैः १९ मुद्गरैः कूटपाशैश्च शूलोलूखलपर्वतैः। शतघ्नीभिश्च दीप्ताभिर्दण्डैरपि सुदारुणैः २० परिवार्य समन्तात्तु निघ्नन्तश्चैव हरिं तदा। स्वल्पमप्यस्य न क्षुण्णमूर्जितस्य महात्मनः २१ ते दानवाः पाशगृहीतहस्ता महेन्द्रवज्राशनितुल्यवेगाः। समन्ततोऽभ्युद्यतबाहुशस्त्राः स्थितास्त्रिशीर्षा इव पन्नगेन्द्राः २२

---

सिंहावर सर्व अस्त्रें सोडता झाला ५ शेवटीं सर्व अस्त्रांतील श्रेष्ठ व अतिभयंकर दंड अस्त्र, आते उग्र कालचक्र, तसेंच विष्णुचक्र ६. मोठें धर्मचक्र, अजित या नांवाचें चक्र, ऐंद्रचक्र, घोर ऋषिचक्र ७, ज्याचा ध्वनि त्रैलोक्यांत पूज्य आहे असें पैतामहचक्र, विचित्र अशनि, शुष्क व आर्द्र अशा आणखी दोन अशनी ८, भयंकर व उग्र शूल, कंकाल, मुसळ, ब्रह्मशिरोऽस्त्र, ब्राह्म अस्त्र ९, ऐषिकास्त्र, ऐंद्र, आग्नेय, शैशिर, वायव्य, मथन, कापाल, किंकर १०, तशीच अप्रतिहत शक्ति, क्रौंच अस्त्र, हयशिर अस्त्र, सौम्य अस्त्र ११, अमित पैशाच अस्त्र, तसेंच अद्भुत सत्य अस्त्र, मोहन, शोषण, संतापन, विलापन १२, जृंभण, प्रापण, अति दारुण त्वाष्ट्र, अक्षोभ्य कालमुद्गर, महाबलाढ्य क्षोभणास्त्र १३, संवर्तन, मोहन, मायाधर, प्रिय गांधर्वास्त्र, रत्नश्रेष्ठ नंदक १४, प्रस्वापन, प्रमथन, वारुणसंज्ञक उत्तम अस्त्र, ज्याची गति अकुंठित आहे असें पाशुपत अस्त्र, हीं सर्व अस्त्रें हिरण्यकशिपु, दीप्त अग्नींत जशी आहुति टाकावी त्याचप्रमाणें त्या सिंहावर टाकता झाला. ग्रीष्मऋतूंत सूर्य आपल्या किरणांनीं हिमालयाला जसा आवृत करतो त्याप्रमाणें असुरराजानें प्रज्वलित अग्नीच्या योगानें सिंहाला आच्छादित करून सोडलें १७. इतक्यांत सागर जसा मैनाकास भिजवितो त्याप्रमाणें क्रोधवायूनें क्षुब्ध केलेला दैत्यांचा तो सैन्यसागर क्षणांत त्या सिंहाला विविध अस्त्रांनीं आच्छादित करिता झाला १८. प्रास, पाश, शूल, गदा, मुसळें, वज्रें, अशनीसारख्या शिला, मोठमोठे वृक्ष १९, मुद्गर, कूटपाश, शूल, उखळ, पर्वत, दीप्त शतघ्नी, व अति दारुण दंड यांच्या योगानेंही २० चोहोंकडून त्या सिंहाला वेढून दैत्य मारूं लागले. पण त्या सर्व अस्त्रांनीं त्या महात्म्या व ऊर्जित सिंहाला थोडीशी सुद्धां पीडा झाली नाहीं २१. ज्यांनीं हातांत पाश घेतले आहेत, महेंद्राचें वज्र व अशनि यांप्रमाणें ज्यांचा वेग आहे व समंततः ज्यांनीं हातांत शस्त्रें उचलली आहेत, असे ते दानव

सुवर्णमालाकुलभूषितांगा नागांगदाभोगपिनद्धगात्राः । मुक्तावलीदामविभूषितांगा हंसा इवाभान्ति विशालपक्षाः २३ तेषां तु वायुप्रतिमौजसां वै केयूरमालावलयोत्कटानि । तान्युत्तमांगान्यभितो विभान्ति प्रभातसूर्यांशुसमप्रभाणि २४ तैः प्रक्षिपद्भिर्ज्वलितानलोपमैर्महास्त्रपूगैः स समावृतो बभौ । गिरिर्यथा संततवर्षिभिर्घनैः कृतांधकारोन्नतकन्दरद्रुमः २५ तैर्हन्यमानोऽपि महास्त्रजालैः सर्वैस्तदा दैत्यगणैः समेतैः । नाकंपताऽसौ भगवान्प्रतापवान्स्थितः प्रकृत्या हिमवानिवाचलः २६ संतापितास्ते नरसिंहरूपिणा दितेः सुताः पावकदीप्ततेजसा । भयाद्विचेलुः पवनोद्धुता यथा महोर्मयः सागरवारिसंभवाः २७ शतैर्धनुर्भिः सुमहातिवेगा युगान्तकालप्रतिमाञ्छरौघान् । एकायनस्था मुमुचुर्नृसिंहे महासुराः क्रोधविदीपितांगाः २८

[ १६५४ ] इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० नारसिंहे चतुश्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४४ ॥

वैशंपायन उवाच ॥ खराः खरमुखाश्चैव मकराशीविषाननाः । ईहामृगमुखाश्चान्ये वराहसदृशाननाः १ बालसूर्यमुखाश्चैव धूमकेतुमुखास्तथा । चन्द्रार्धचन्द्रवक्त्राश्च प्रदीप्ताग्निमुखास्तथा २ हंसकुक्कुटवक्त्राश्च व्यादितास्या भयावहाः । पंचास्या लेलिहानाश्च काकगृध्रमुखास्तथा ३ विद्युज्जिह्वास्त्रिशीर्षाश्च तथोल्कासदृशाननाः । महाग्राहनिभाश्चान्ये

---

तीन मस्तकांच्या नागेंद्रांप्रमाणें तेथें उभे राहिले २२. ज्यांचीं अंगें सुवर्णमालांनीं आकुल व भूषित आहेत, ज्यांच्या हातांत नानाप्रकारचीं बाहुभूषणें असून त्यांच्या विस्तारानें गात्रें आवृत झालेलीं आहेत, मोत्यांच्या मालांनीं ज्यांचे देह भूषित झाले आहेत असे ते राक्षस ज्यांचे पंख मोठे आहेत अशा हंसांप्रमाणें शोभत होते २३. ज्यांचें ओज वायुतुल्य आहे अशा त्या दानवांचीं बाहुभूषणें, माला व कडीं यांच्या योगानें उत्कट झालेलीं तीं उत्तमांगें प्रभातसमयींच्या सूर्यकिरणाप्रमाणें तेजस्वी दिसत होतीं २४. ज्याच्यावरील उत्तम गुहा व वृक्ष अंधकारमय केले गेले आहेत असा पर्वत जसा संतत जलवृष्टि करणाऱ्या मेघांकडून आवृत होतो त्याप्रमाणें दीप्त अग्नीसारख्या दानवांकडून फेंकल्या जाणाऱ्या महाअस्त्रसमुहांनीं सिंह आवृत झाला २५. पण त्यावेळीं सर्व एकत्र जमलेल्या दैत्यगणांकडून मारला जाणाराही तो प्रतापवान् भगवान् संग्रामांत कंपायमान झाला नाहीं. तर स्वभावतःच हिमालयासारिखा निश्चळ राहिला २६. त्या नरसिंहरूपी देवानें आपल्या अग्नीसारख्या दीप्त तेजानें त्यांस संतप्त केलें. त्यामुळें ते दानव सागरजलांत उत्पन्न झालल्या व वाऱ्यानें क्षुब्ध केलेल्या लाटांप्रमाणें भयानें कांपूं लागले २७. ज्यांचे देह क्रोधानें अतिशय दीप्त झाले आहेत असे अतिवेगवान् महाअसुर एका स्थानामध्यें स्थित होऊन शंभर धनुष्यांनीं युगांतकालासारिखे शरसंघ नरसिंहावर सोडते झाले २८. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० नारसिंहाख्यानाचा चव्वेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४४ ॥

वैशंपायनः— तीक्ष्ण, तीक्ष्णमुख, मकराच्या दाढांप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत, वानरासारखीं ज्यांचीं तोंडें आहेत असे व दुसरे कित्येक वराहांच्या तोंडासारख्या तोंडांचे दानव १. बालसूर्यासारखीं ज्यांचीं तोंडें आहेत, धूमकेतूसारखीं ज्यांचीं मुखें आहेत, अर्धचंद्र व पूर्णचंद्र यांसारखीं ज्यांचीं तोंडें आहेत, त्याचप्रमाणें ज्यांचीं मुखें प्रदीप्त अग्नीसारखीं आहेत २. हंस व कुक्कुट यांच्याप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत, ज्यांनीं आपलीं तोंडें पसरलीं आहेत व त्यामुळें जे भयानक झाले आहेत, व्याघ्राप्रमाणें जे जिभल्या चाटीत आहेत, काक व गृध्र यांच्याप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत ३, विजेप्रमाणें ज्यांच्या जिभा आहेत,

दानवा बलदर्पिता: ४ कैलासवपुषस्तस्य शरीरे शरवृष्टय: । अवध्यस्य मृगेन्द्रस्य न व्यथां चक्रुराहवे ५ एवं भूयो परान्घोरानसृजन्दानवा: शरान् । मृगेंद्रस्योरसि क्रुद्धा निःश्वसन्त इवोरगा: ६ ते दानवशरा घोरा मृगेन्द्राय समीरिता: । विलयं जग्मुराकाशे खद्योता इव पर्वते ७ ततश्चक्राणि दिव्यानि दैत्या: क्रोधसमन्विता: । मृगेन्द्रायाक्षिपन्त्याशु प्रज्वलन्तीव सर्वश: ८ तैरासीद्गगनं चक्रै: संपतद्भि: समावृतम् । युगान्ते संप्रकाशद्भिश्चन्द्रसूर्यग्रहैरिव ९ तानि चक्राणि वदनं प्रविशन्ति विभांति वै । मेघोदरदरीं घोरां चन्द्रसूर्यग्रहा इव १० तानि चक्राणि सर्वाणि मृगेन्द्रेण महात्मना । निगीर्णानि प्रदीप्तानि पावकार्चिसमानि वै ११ हिरण्यकशिपुर्दैत्यो भूय: प्रासृजदूर्जिताम् । शक्तिं प्रज्वलितां घोरां हुताशनसमप्रभाम् १२ तामापतन्तीं संप्रेक्ष्य मृगेंद्र: शक्तिमुत्तमाम् । हुंकारेणैव रौद्रेण बभंज भगवांस्तदा १३ रराज भग्ना सा शक्तिर्मृगेन्द्रेण महीतले । सविस्फुलिंगा ज्वलिता महोल्केव नभश्च्युता १४ नाराचपंक्ति: सिंहस्य सृष्टा रेजे विदूरत: । नीलोत्पलपलाशानां मालेवोज्ज्वलदर्शना १५ गर्जित्वा तु यथाकामं विक्रम्य च यथासुखम् । तत्सैन्यमुत्सारितवान्तृणाग्राणीव मारुत: १६ ततोऽश्मवर्षं दैत्येन्द्रा व्यसृजन्त नभोगता: । नगमात्रै: शिलाखण्डैर्गिरिकूटैर्महाप्रभै: १७ तदश्मवर्षं सिंहस्य गात्रे निपतितं महत् । दिशो दश प्रकीर्णं हि खद्योतप्रकरो यथा १८ तदश्मौघैर्दितिसुतास्तदा सिंहमरिंदम । प्रच्छादयन्यथा मेघा धाराभिरिव

---

तीन मस्तकें आहेत, उल्केप्रमाणें ज्यांचीं तोंडें आहेत, असे महाग्राहासारखे बलदर्पित राक्षस कैलासासारख्या धिप्पाड शरीराच्या त्या सिंहावर बाणांची वृष्टि करत झाले; पण संग्रामांत ते अवध्य सिंहाला कांहीं व्यथा करूं शकले नाहींत ५. सर्पाप्रमाणें श्वास सोडणाऱ्या रागावलेल्या दानवांनीं आणखी घोर शर पुन: त्या सिंहाच्या उरावर सोडले ६. पण मृगेंद्रावर सोडलेले ते घोर दानवशर पर्वतावरील काजव्यांप्रमाणें आकाशांत कोठें गडप झाले ७. त्यानंतर क्रोधसमन्वित दैत्य जणूं काय सर्वश: जळणारीं दिव्य चक्रें सत्वर मृगेंद्रावर सोडते झाले ८. त्या पडणाऱ्या चक्रांच्या योगानें आकाश, युगांतीं अतिशय प्रकाशित होणाऱ्या चंद्र, सूर्य व ग्रह यांच्या योगानें जसें तसें झालें ९. पण चंद्र, सूर्य व ग्रह जसे मेघोदररूपी घोर दरींत प्रवेश करितात त्याप्रमाणें तीं सर्व चक्रें त्याच्या वदनांत शिरलीं व तशींच दिसूं लागलीं १०; पण अग्नीच्या ज्वालांसारखीं तीं प्रदीप्त झालेलीं सर्व चक्रें त्या महात्म्या मृगेंद्रानें गिळून सोडलीं ११. तेव्हां हिरण्यकशिपु दैत्यानें पुन: अग्नीप्रमाणें जिची प्रभा आहे अशी घोर व प्रज्वलित शक्ति सोडली १२. पण त्यावेळीं भगवान् मृगेंद्र ती उत्तमशक्ति येत आहे असें पाहून भयंकर हुंकारानेंच तिला तोडून टाकिता झाला १३. तेव्हां मृगेंद्रानें तोडून पाडलेली ती शक्ति भूतलीं आकाशांतून पडलेल्या प्रदीप्त महाउल्केप्रमाणें दिसूं लागली १४. त्या सिंहावर सोडलेली बाणपंक्ति त्याच्यापासून दूर जिचें दर्शन उज्ज्वल आहे अशा नीलकमलांच्या माळेप्रमाणें शोभत राहिली १५. नंतर यथेच्छ गर्जना करून व सुखास येईल त्या रीतीनें विक्रम करून नरसिंह, वायु जसा गवताच्या अग्रांना उडवितो त्याप्रमाणें तें सैन्य उडविता झाला १६. त्यानंतर आकाशगत दैत्येंद्र त्याच्यावर पाषाणांचा वर्षाव करूं लागले. डोंगराएवढ्या शिलांच्या तुकड्यांनीं व महातेजस्वी गिरिशिखरांनीं त्यांनीं ती वृष्टि चालविली १७. पण सिंहाच्या शरीरावर पडलेला तो मोठा पाषाणवर्षाव काजव्यांच्या सर्वा-

पर्वतम् १९ न च तं चालयामासुर्दैत्यौघा दिवमास्थितम् । भीमवेगा बलश्रेष्ठं समुद्रा इव पर्वतम् २० ततोऽश्मवर्षे निहते जलवर्षमनंतरम् । धाराभिरक्षमात्राभिः प्रादुरासीत्समंततः २१ नभसः प्रच्युता धारास्तिग्मवेगाः सहस्रशः । आवृण्वन्त्सर्वतो व्योम दिशश्चोपदिशस्तथा २२ धाराणां सन्निपातेन वायोर्विस्फूर्जितेन च । वर्धता चैव वर्षेण न प्राज्ञायत किंचन २३ धारा दिवि च संसक्ता वसुधायां च सर्वशः । न स्पृशन्ति स्म तं तत्र निपतन्त्योऽनिशं भुवि २४ बाह्यतो ववृषे वर्षं नोपरिष्टात्तु तोयदः । मृगेन्द्रप्रतिरूपस्य स्थितस्य युधि मायया २५ हतेऽश्मवर्षे तुमुले जलवर्षे च शोषिते । सासृजुर्दानवा मायामग्निं वायुं च सर्वशः २६ नभसः प्रच्युतश्चैव तिग्मवेगः समंततः । ज्वालामाली महारौद्रो दीप्ततेजाः समंततः २७ स सृष्टः पावकस्तेन दैत्येन्द्रेण महात्मना । न शशाक महातेजा दग्धुमप्रतिमौजसम् २८ तमिन्द्रस्तोयदैः सार्धं सहस्राक्षोऽमितद्युतिः । महता तोयवर्षेण शमयामास पावकम् २९ तस्यां प्रतिहतायां तु मायायां युधि दानवाः । ससृजुर्घोरसंकाशं तमस्तीव्रं समंततः ३० तमसा संवृते लोके दैत्येष्वात्तायुधेषु वै । स्वतेजसा परिवृतो दिवाकर इवाबभौ ३१ त्रिशिखां भ्रुकुटीं चास्य ददृशुर्दानवा रणे । ललाटस्थां त्रिकूटस्थां गंगां त्रिपथगामिव ३२ [१६८६] इति श्रीम० खि० हरि० भवि० नारसिंहे पंचचत्वारिंशोऽध्यायः॥४५॥

---

प्रमाणें दशदिशांस पसरला १८. हे शत्रुमर्दना, त्यावेळीं दितीचे पुत्र मेघधारांनीं पर्वताला जशा आच्छादित करितात त्याप्रमाणें, त्या सिंहाला आच्छादित करते झाले १९. पण भयंकर वेग धारण करणारे दैत्यांचे ओघ, समुद्र जसे पर्वतास त्याप्रमाणें आकाशांत असलेल्या व बलानें श्रेष्ठ अशा त्याला चंचल करूं शकले नाहींत २०. त्या देवानें राक्षसांचा पाषाणवर्षाव कुंठित करून सोडला असता नंतर समंततः स्थूलधारांनीं जलवृष्टि होऊं लागली २१. अति तीक्ष्ण वेगवाल्या सहस्रावधि धारा आकाशांतून पडल्या. त्यांनीं आकाश, दिशा व उपदिशा यांस सर्वतः व्यापून सोडलें २२. धारांचा संपात, वायूचा सोंसाटा व उत्तरोत्तर वाढणारा वर्षाव यांच्या योगानें कांहीं कळेनासें झालें २३. पण त्या धारा आकाशांत व पृथ्वीवरच सर्वतः पसरल्या. भूमीवर सतत पडणाऱ्या त्यांनीं त्यावेळीं सिंहाला स्पर्शही केला नाहीं २४. युद्धामध्यें मृगेंद्ररूपानें स्थित असलल्या त्या देवाच्या मायेनें तो मेघ सभोंवार जलवृष्टि करीत राहिला. पण त्यानें त्याच्यावर वर्षाव केला नाहीं २५. याप्रमाणें तुमुल पाषाणवृष्टी व्यर्थ झाली. जलवृष्टीचीही तीच दशा झाली. नंतर दानव शोणिताचा वर्षाव करूं लागले. तोही निष्फळ झाल्यावर त्यांनीं माया केली. सर्व बाजूस अग्नि व वायु यांस निर्माण केलें २६ समंततः तीक्ष्ण वेगवान् व ज्वालामालावान् महाभयंकर दीप्त तेजस्वी अग्नि आकाशांतून पडला २७. त्या महात्म्या दैत्येंद्रांनीं अग्नि तर उत्पन्न केला; पण तो अति तेजस्वी असूनही त्या अप्रतिमतेजस्वी सिंहास जाळं शकला नाहीं २८. अमित तेजस्वी सहस्रनयन इंद्रानें मोठ्या जलवृष्टीनें त्या अग्नीस शांत केलें २९. युद्धांत ती माया प्रतिहत झाली असतां दानवांनीं घोर व तीव्र तम समंततः उत्पन्न केलें ३०. त्या तमाच्या योगानें सर्व लोक आवृत झाला असतां व दैत्यांनीं पुनः आयुधें उचललीं असतां स्वतेजानें परिवेष्टित असलेला सिंह सूर्यासारखा भासला ३१. जिला तीन अग्रें आहेत अशा त्या सिंहाच्या ललाटावरील भ्रुकुटीला दानवांनीं रणांत त्रिकूटस्थ त्रिपथगा गंगेप्रमाणें पाहिलें ३२. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य नारसिंहाख्यानाचा पंचेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४५ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः सर्वासु मायासु हतासु दितिनन्दनाः । हिरण्यकशिपुं सर्वे विषण्णाः शरणं गताः १ ततः प्रज्वालितः क्रोधात्प्रदहन्निव तेजसा । हिरण्यकशिपुर्दैत्यश्चालयामास मेदिनीम् २ ततः प्रक्षुभिताः सर्वे सागराः सलिलाकराः । चालिता गिरयः सर्वे सकाननवनद्रुमाः ३ तस्मिन् क्रुद्धे तु दैत्येन्द्रे तमोभूतमभूज्जगत् । तमसा सम्प्रच्छन्नं न प्राज्ञायत किंचन ४ आवहः प्रवहश्चैव विवहश्च समंततः । परावहः संवहश्च उद्वहश्च महाबलः ५ तथा परिवहः श्रीमान्मारुता भयशंसिनः । इत्येते क्षुभिताः सप्त मारुता गगनेचराः ६ ये ग्रहाः सर्वलोकस्य क्षये प्रादुर्भवन्ति वै । ते ग्रहा गगने दृष्टा विचरन्ति यथासुखम् ७ अयोगाश्च तारास् सर्वेष्वृक्षेषु संगताः । सग्रहं सहनक्षत्रं प्रजज्वाल नभो नृप ८ विवर्णत्वं च भगवान् गतो दिवि दिवाकरः । कृष्णः कबन्धश्च महाँल्लक्ष्यते च नभस्तले ९ असृजच्चातितो सूर्यो धूमवर्तिं भयावहाम् । गगनस्थश्च भगवानभीक्ष्णं परितप्यते १० सप्त धूमनिभा घोराः सूर्या दिवि समुत्थिताः । सोमस्य गगनस्थस्य ग्रहास्तिष्ठन्ति शृंगगाः ११ वामे च दक्षिणे चैव स्थितौ शुक्रबृहस्पती । शनैश्चरो लोहिताङ्गो लोहितार्कसमद्युतिः १२ समं समभिरोहन्ति दुर्गाणि गगनेचराः । शृंगाणि कनकैर्घोरा युगान्तावर्तका ग्रहाः १३ चंद्रमाः सह नक्षत्रैर्ग्रहैः समभिरावृतः । चराचरविनाशार्थं रोहिणीं नाभ्यनन्दत १४ गृहीतो राहुणा चन्द्र उल्काभिरभिहन्यते । उल्काः प्रज्वलिताश्चन्द्रे प्रचेलुर्घोरदर्शनाः १५ देवानामपि यो देवः सोऽभ्यवर्षत शोणितम् । अपतन् गगनादुल्का विद्युद्रूपाः सनिःस्वनाः १६

---

वैशंपायनः—त्यानंतर सर्व माया कुंठित झाल्या असतां सर्व दितिनंदन खिन्न होऊन हिरण्यकशिपूस शरण गेले १. त्यानंतर क्रोधानें प्रज्वलित झालेला दैत्य हिरण्यकशिपु स्वतेजानें जणुं काय जळत असल्याप्रमाणें पृथ्वीला हालवून सोडता झाला २. त्यामुळें सर्व सागर व जलाशय अतिशय क्षुब्ध झाले. अरण्य, वन व वृक्ष यांसह सर्व पर्वत कांपूं लागले ३. तो दैत्येंद्र क्रुद्ध झाला असतां सर्व जगत् तमोभूत झालें. सर्व अंधकारानें झाकून गेलें. त्यामुळें कांहीं कळेनासें झालें ४. आवह, प्रवह, विवह, परावह, संवह, महाबलाढ्य उद्वह ५ व तसाच श्रीमान् परिवह हे वायु भयसूचक आहेत. ते गगनांत फिरणारे सात वायु क्षुब्ध झाले ६. सर्व लोकांच्या क्षयसमयीं जे ग्रह प्रादुर्भूत होतात ते ग्रह आकाशांत आनंदानें व मनास येईल त्याप्रमाणें फिरूं लागले ७. सर्व तारा, नक्षत्रें अनियमानें संयोग, गमन, आगमन इत्यादि करूं लागलीं. ग्रह व नक्षत्रें यांसह आकाश दीप्त झालें ८. आकाशांत भगवान् सूर्य विवर्णतेस प्राप्त झाला. नभस्थलीं एक धिप्पाड काळें कबंध दिसूं लागलें ९. सूर्यानें एक काळी व भयावह धुराची पंक्ति सोडली. तो गगनस्थ भगवान् अतिशय तापूं लागला १०. धूमासारखे घोर सात सूर्य आकाशांत उठले. ग्रह आकाशस्थ सोमाच्या शृंगांवर बसले ११. त्याच्या वामबाजूस शुक्र व दक्षिणबाजूस बृहस्पति होता. शनैश्चराचें सर्व अंग लालभडक झालें. लाल सूर्यासारखी त्याची कांति झाली १२. घोर गगनचर युगांतावर्तक ग्रह एकाचवेळीं सुवर्णनिर्मित दुर्गम शृंगांवर आरूढ झाले १३. नक्षत्रांसह चंद्रमा सात ग्रहांनीं आवृत होऊन चराचर सृष्टीच्या विनाशार्थ रोहिणीचें अभिनंदन करीनासा झाला १४. राहूनें ग्रासलेल्या चंद्रावर उल्का प्रहार करूं लागल्या. ज्यांचें दर्शन घोर आहे अशा प्रज्वलित उल्का चंद्रावर धावून जाऊं लागल्या १५. देवांचाही जो देव तो रक्ताचा वर्षाव करूं लागला. मोठा ध्वनि करणाऱ्या

अकाले पादपाः सर्वे पुष्पन्ति च फलन्ति च । लताश्च सफलाः सर्वा याः प्राहुर्दैत्यनाशनम् १७ फले फलान्यजायन्त पुष्पे पुष्पं तथैव च । उन्मीलन्ति निमीलन्ति हसन्ति च रुदन्ति च १८ विक्रोशन्ति च गंभीरं धूमयन्ति ज्वलन्ति च । प्रतिमाः सर्वदेवानां कथयन्ति युगक्षयम् १९ आरण्यैः सह संसृष्टा ग्राम्याश्च मृगपक्षिणः । चुक्रुशुर्भैरवं तत्र मृगेन्द्रे समुपस्थिते २० नद्यश्च प्रतिलोमा हि वहन्ति कलुषोदकाः । अपराह्णगते सूर्ये लोकानां क्षयकारके २१ न प्रकाशन्ति च दिशो रक्तरेणुसमाकुलाः । वानस्पत्या न पूज्यन्ते पूजनार्हाः कथंचन २२ वायुवेगेन हन्यन्ते भिद्यन्ते प्रणुदन्ति च । तदा च सर्वभूतानां छाया न परिवर्तते २३ अपराह्णगते सूर्ये लोकानां च युगक्षये । तदा हिरण्यकशिपोर्दैत्यस्योपरि वेश्मनः २४ भांडागारायुधागारे निविष्टमभवन्मधु । तथैव चायुधागारे धूमराजिरदृश्यत २५ स च दृष्ट्वा महोत्पातान्हिरण्यकशिपुस्तदा । पुरोहितं तदा शुक्रं वचनं चेदमब्रवीत् २६ किमर्थं भगवन्नेते महोत्पाताः समुत्थिताः । श्रोतुमिच्छामि तत्त्वेन परं कौतूहलं हि मे २७ शुक्र उवाच ॥ शृणु राजन्नवहितो वचनं मे महासुर । यदर्थमिह दृश्यन्ते महोत्पाता महाभयाः २८ यस्यैते संप्रदृश्यन्ते राज्ञो राष्ट्रे महासुर । देशो वा ह्रियते तस्य राजा वा बन्धमर्हति २९ अतो बुध्या समीक्षस्व यथा सर्वं प्रणश्यति । बृहद्भयं हि न चिराद्भविष्यति न संशयः ३० एतावदुक्त्वा शुक्रस्तु हिरण्यकशिपुं तदा । स्वस्तीत्युक्त्वा तु दैत्येन्द्रं जगाम स्वं निवेश-

---

विद्युद्रूप उल्का आकाशांतून पडल्या १६. सर्व वृक्ष अकालीं फुलूं व फळूं लागले. सर्व लता एकाएकीं फळयुक्त झाल्या. त्या दैत्याचा नाश सांगत होत्या १७. फळांवर फळें व पुष्पांवर पुष्पें आलीं. सर्व देवांच्या प्रतिमा नेत्रांचें उन्मीलन व निमीलन करूं लागल्या. हसूं व रडूं लागल्या. गंभीर आक्रोश करूं लागल्या. धमूं व जळूं लागल्या. या चिन्हांच्या योगानें त्या युगक्षय सुचवीत होत्या १८,१९. ग्राम्य पशु पक्षी आरण्य पश्वादिकांशीं संयुक्त झाले व तेथें मृगेंद्र आला असतां भयंकर आक्रोश करूं लागले २०. ज्यांचें जळ कलुषित झालें आहे अशा नद्या उलट वाहूं लागल्या. लोकांचा क्षयकारक सूर्य अपराह्णीं आला असतां लालरेणूंनीं व्याकुळ झालेल्या दिशा प्रकाशित झाल्या नाहींत. पूजनार्ह चैत्य वृक्षांचेंही कोणी पूजन करीनात २१,२२. ते वायुवेगानें छिन्न-भिन्न होऊन भूमीवर कोसळूं लागले. सूर्य अपराह्णीं गेला तरी त्यावेळीं कोणत्याही प्राण्याची सावली ( सूर्य निष्प्रभ झाल्यामुळें ) फिरली नाहीं. लोकांचा क्षय होण्याचा प्रसंग आला असतां हीं अशीं दुश्चिन्हें झालीं. त्यावेळीं हिरण्यकशिपु-दैत्याच्या घरावर, भांडागार व आयुधागार यांवर मधाचीं पोळीं लागलीं. आयुधागारामध्यें धूमपंक्ति दिसली २३,२५. तव्हां हे महोत्पात पाहून हिरण्यकशिपु पुरोहित शुक्रास असें वचन बोलला २६. ' भगवन्, हे महोत्पात कशासाठीं झाले आहेत, व होत आहेत, हें मी खरें खरें जाणण्याची इच्छा करीत आहे. कारण त्यांविषयीं मला मोठें कौतुक वाटतें २७. शुक्र ह्मणतो:—हे राजन्, हे महाअसुरा, सावधान मनानें हें माझें वचन ऐक. हे महाभयंकर महोत्पात येथें कां दिसत आहेत तें सांगतों २८. हे महाअसुरा. ज्या राजाच्या राष्ट्रांत हे दिसतात त्याचा देश तरी हरण केला जातो अथवा तो राजा बंध पावतो २९. यास्तव हें सर्व नष्ट होईल अशी आपल्या बुद्धीनें कांहीं युक्ति योज. पण फार मोठें भय लवकरच उद्भवणार आहे, यांत संशय नाहीं ३०. हिरण्यकशिपूला असें बोलून व त्या दैत्येंद्राला स्वस्ति असें

नम् ३१ तस्मिन्गते सदैत्येंद्रो ध्यातवान्सुचिरं तदा । आसां चक्रे सुदीनात्मा ब्रह्मवाक्यमनुस्मरन् । असुराणां विनाशाय सुराणां विजयाय च ३२ दृश्यन्ते विविधोत्पाता घोरा घोरनिदर्शनाः । एते चान्ये च बहवो घोरा ह्युत्पातदर्शनाः ३३ दैत्येन्द्राणां विनाशाय दृश्यन्ते कालनिर्मिताः । ततो हिरण्यकशिपुर्गदामादाय सत्वरम् ३४ अभ्यद्रवत्तु वेगेन धरणीमनुकम्पयन् । हिरण्यकशिपुर्दैत्यो यदा संस्पृष्टवान्महीम् ३५ संदष्टोष्ठपुटः क्रोधाद्वाराह इव पूर्वजः । मेदिन्यां कंप्यमानायां दैत्येन्द्रेण महात्मना ३६ महीधरेभ्यो नागेन्द्रा निपेतुर्भयविह्वलाः । विषज्वालाकुलैर्वक्त्रैर्विमुंचन्तो हुताशनम् ३७ चतुः शीर्षाः पंचशीर्षाः सप्तशीर्षाश्च पन्नगाः । वासुकिस्तक्षकश्चैव कर्कोटकधनंजयौ ३८ एलापत्रश्च कालीयो महापद्मश्च वीर्यवान् । सहस्रशीर्षधृङ्नागो हेमतालध्वजः प्रभुः ३९ शेषोऽनन्तो महीपालो दुष्प्रकंपः प्रकंपितः । दीप्तान्यन्तर्जलस्थानि पृथिवीधरणानि च ४० तदा क्रुद्धेन दैत्येन कंपितानि समंततः । पातालतलचारिण्यो नागतेजो धराः शिवाः ४१ आपश्च सहसा क्षुब्धाः दुष्प्रकंप्यरसाः शुभाः । नदी भागीरथी चैव सरयूः कौशिकी तथा४२ यमुना चैव कावेरी कृष्णा वेणा तथैव च । सुवेणा च महाभागा नदी गोदावरी तथा ४३ चर्मण्वती च सिन्धुश्च तथा नदनदीपतिः । मेकलप्रभवश्चैव शोणो मणिनिभोदकः ४४ सुश्रोणा नर्मदाचैव तथा वेत्रवती नदी । गोमती गोकुलाकीर्णा तथा पूर्णा सरस्वती ४५ महीकालमही चैव तमसा पुण्यवाहिनी । सीताचेक्षुमती

---

म्हणून शुक्र आपल्या घरीं गेला ३१. तो गेला असतां दैत्येंद्र पुष्कळ वेळ विचार करीत बसला. ब्रह्मदेवाच्या वाक्याचें अनुस्मरण करीत तो अतिशय दीन चित्त झाला. असुरांच्या विनाशाकरितां व सुरांच्या विजयाकरितां हे अति घोरदर्शन महोत्पात दिसत आहेत. दैत्येंद्रांच्या विनाशाकरितांच हे व असेच दुसरेही अनेक भयंकर उत्पात कालानें निर्माण केलेले दृष्टीं पडत आहेत. त्यानंतर हिरण्यकशिपु सत्वर गदा घेऊन वेगानें पृथ्वीला कांपवीत पळत सुटला. दैत्य हिरण्यकशिपु क्रोधानें दांत ओंठ खाऊन पूर्वी झालेल्या वाराहाप्रमाणें पायानें पृथ्वीला स्पर्श करता झाला ( लाथ मारली ) महात्म्या दैत्येंद्राकडून पृथ्वी कंपित केलीं गेलीं असतां भयानें विव्हल झालेले नागेंद्र पर्वतांतून विषज्वालांनीं आकुळ झालेल्या तोंडांतून अग्नि सोडीत बाहेर पडले ३२–३७ चार मस्तकांचे, पांच मस्तकांचे, सात मस्तकांचे नाग, वासुकि, तक्षक, कर्कोटक, धनंजय ३८, एलापत्र, कालीय, वीर्यवान् महापद्म, सहस्र मस्तकें धारण करणारा नाग प्रभु हेमतालध्वज ३९, शेष, अनंत, महीपाल, दुष्प्रकंप, प्रकंपित, इत्यादि सर्व बाहेर पडले. दिग्गजादिक जलांत राहून पृथ्वीस धारण करणाऱ्या प्राण्यांनाही त्या क्रुद्ध झालेल्या दैत्यानें समंततः कांपवून सोडलें. पाताळतळीं रहाणाऱ्या व नागांचें ( मणिगत ) तेज धारण करणाऱ्या कल्याणरूप जलदेवता अकस्मात् क्षुब्ध झाल्या. त्या शुभ व ज्यांचा रस निश्चल आहे अशा होत्या. भागीरथी नदी, शरयू, कौशिकी ४०–४२, यमुना, कावेरी, कृष्णा, वेणा, सुवेणा, महाभागा, नदी गोदावरी, चर्मण्वति, नद व नद्या यांचा पति सिंधु, ज्याचें जल रत्नासारखें स्वच्छ आहे असा मेकलापासून उगम पावलेला शोण नद ४३,४४, सुश्रोणा, नर्मदा, वेत्रवती नदी, गोमती, गोकुलाकीर्णा, पूर्णा, सरस्वती ४५, मही, कालमही, तमसा, पुण्यवाहिनी, सीता, इक्षुमती, महानदी देविका, सर्व रत्नांनीं उपशोभित असें रत्नवंत जंबुद्वीप, सुवर्णाच्या खाणींनीं मंडित असलेलें सुवर्णकटक ४६, ४७,

चैव देविका च महानदी ४६ जंबुद्वीपं रत्नवंतं सर्वरत्नोपशोभितम् । सुवर्णकूटकं चैव सुवर्णाकरमण्डितम् ४७ महानदश्च लौहित्यः शैलकाननशोभितः । पत्तनं कौशिकारण्यं द्रुमं च रजताकरम् ४८ मागधांश्च महाग्रामानंगान्वंगांस्तथैव च । सुह्मान्पल्हान्विदेहांश्च मालवान्काशिकोसलान् ४९ भुवनं वैनतेयस्य सुवर्णस्य च कंपितम् । कैलासशिखराकारं यत्कृतं विश्वकर्मणा ५० रक्ततोयो भीमवेगो लौहित्यो नामसागरः । शुभः पाण्डुरमेघाभः क्षीरोदश्चैव सागरः ५१ उदयश्चैव शैलेन्द्र उच्छ्रितः शतयोजनम् । सुवर्णवेदिकः श्रीमान्नागपक्षिनिषेवितः ५२ भ्राजमानोऽर्कसदृशैर्जातरूपमयैर्द्रुमैः । शालैस्तालैस्तमालैश्च कर्णिकाभिश्च पुष्पितैः ५३ अयोमुखश्च विपुलः पर्वतो धातुमण्डितः । तमालवनगन्धश्च पर्वतो मलयः शुभः ५४ सुराष्ट्राश्च सुबाह्लीकाः शूरा भीमास्तथैव च । भोजाः पांड्याश्च वंगाश्च कलिंगास्ताम्रलिप्तकाः ५५ तथैवान्ध्राश्च पुण्ड्राश्च वामचूडाः सकेरलाः । क्षोभितास्तेन दैत्येन सदेवाः साप्सरोगणाः ५६ अगस्तिभुवनं चैव यदगम्यं पुरा कृतम् । सिद्धचारणसंघैश्च सेवितं सुमनोहरम् ५७ विचित्रनागविहगं सुपुष्पितलताद्रुमम् । जातरूपमयैः शृंगैरप्सरोगणसेवितम् ५८ गिरिः पुष्पितकश्चैव लक्ष्मीवान्प्रियदर्शनः । उत्थितः सागरं भित्त्वा वयस्यश्चन्द्रसूर्ययोः ५९ रराज सुमहाशृंगैर्गगनं विलिखन्निव । सूर्यचन्द्रांशुसंकाशैः सागराम्बुसमावृतः ६० विद्युद्वान्पर्वतः श्रीमानायतः शतयोजनम् । विद्युतां यत्र संपाता निपात्यन्ते नगोत्तमे ६१ ऋषभः पर्वतश्चैव श्रीमानृषभसंस्थितः । कुंजरः पर्वतश्चैव यत्रागस्त्यगृहं

---

पर्वत व अरण्य यांनीं सुशोभित झालेला महानद लौहित, नगर, कौशिकारण्य, रजताकर वृक्ष ४८, मागध देशांतील मोठाले ग्राम, अंग, वंग, सुह्य, पल्ह, विदेह, मालव, काशि, कोसल इत्यादि सर्वांस त्या दैत्यानें भूमीला लाथ मारून कांपविलें ४९. कैलासशिखरासारखें विश्वकर्म्यानें केलेलें जें गरुडाचें सोन्याचें घर तेंही डळमळलें ५०. ज्याचें जल रक्तवर्ण व वेग भयंकर आहे असा लौहित्य नांवाचा सागर व शुभ पांढऱ्या मेघासारिखा, क्षीरोद सागर कांपूं लागला ५१. शंभर योजनें उंच, ज्याच्यावर सोन्याच्या वेदिका आहेत, नाग व पक्षी यांनीं ज्याचें सेवन केलें आहे, असा श्रीमान् उदयपर्वत ५२, सूर्यासारख्या चमकणाऱ्या, सोन्याच्या, पुष्पित, साल, ताल, तमाल व कर्णिका वृक्षांच्या योगानें शोभणारा, धातूंनीं मंडित झालेला अयोमुख नांवाचा विपुल पर्वत, तमालवनाचा वास ज्याच्यावर पसरला आहे असा शुभ मलयपर्वत ५३,५४, सुराष्ट्र, बाल्हीक, शूर, भीम, भोज, पांड्य, वंग, कलिंग, ताम्रलिप्तक ५५, तसेंच आंध्र, पुंड्र, वामचूड, केरल, इत्यादि सर्वांना, देव व अप्सरागण त्यांसह त्या दैत्यानें क्षुब्ध करून सोडलें ५६. पूर्वी मानवांना अगम्य केलेलें, सिद्ध-चारणसंघांनीं सेविलेलें, अति मनोहर ५७, ज्याच्यावर विचित्र नाग व पक्षी आहेत, सुपुष्पित लता व वृक्ष आहेत, जें सुवर्णमय शृंगांनीं सुशोभित आहे व अप्सरागण ज्याचें सेवन करीत आहे असें अगस्त्यभवन, लक्ष्मीवान्, प्रियदर्शन, सागराचा भेद करून उठलेला, चंद्र व सूर्य यांचा सखा असा पुष्पितकगिरि आपल्या अति मोठ्या शृंगांनीं आकाशास स्पर्श करीत असल्याप्रमाणें शोभत होता. त्याचीं शृंगें सूर्य व चंद्र यांच्या किरणांप्रमाणें चमकत होतीं. व तो सागर जलानें आवृत झाला होता ५८-६०. शंभर योजनें विस्तीर्ण असलेला श्रीमान् विद्युद्वान् पर्वतही कांपूं लागला. त्या उत्तम पर्वतावर विजांचे संपात पडत होते ६१. ऋषभाप्रमाणेंच

महत् ६२ विशालरथ्या दुर्धर्षा सर्पाणामालया पुरी। तथा भोगवती चापि दैत्येंद्रेणाभिकं-
पिता ६३ महामेघगिरिश्चैव पारियात्रश्च पर्वतः। चक्रवांश्च गिरिः श्रेष्ठो वाराहश्चैव
पर्वतः ६४ प्राग्ज्योतिषपुरं चैव जातरूपमयं शुभम्। यस्मिन्वसति दुष्टात्मा नरको नाम
दानवः ६५ मेरुश्च पर्वतश्रेष्ठो मेघगंभीरनिःस्वनः। षष्टिं तत्र सहस्राणि पर्वतानां विशां-
पते ६६ तरुणादित्यसंकाशो महेन्द्रश्च महागिरिः। देवावासः शुभः पुण्यो गिरिराजो हिर-
ण्मयः ६७ हेमशृंगो महाशैलस्तथा मेघसखो गिरिः। कैलासश्चापि दुष्कंपो दानवेन्द्रेण
कंपितः ६८ यक्षराक्षसगंधर्वैर्नित्यं सेवितकन्दरः। श्रीमान्मनोहरश्चैव नित्यं पुष्पितपादपः ६९
हेमपुष्करसंछन्नं तेन वैखानसं सरः। कंपितं मानसं चैव राजहंसैर्निषेवितम् ७० त्रिशृंगः
पर्वतश्चैव कुमारी च सरिद्वरा। तुषारचयसंकाशो मन्दरश्चैव पर्वतः ७१ उशीरबीजश्च गिरी
रुद्रोपस्थस्तथाद्रिराट्। प्रजापतेश्च निलयस्तथा पुष्करपर्वतः ७२ देवावृत्पर्वतश्चैव तथा वै
वालुको गिरिः। क्रौंचः सप्तर्षिशैलश्च धूम्रवर्णश्च पर्वतः ७३ एते चान्ये च गिरयो देशा
जनपदास्तथा। नद्यश्च सागराश्चैव दानवेन्द्रेणकंपिताः ७४ कपिलश्च महीपुत्रो व्याघ्राक्ष-
श्चैव कंपितः। खचराश्च निशापुत्राः पातालतलवासिनः ७५ गणास्तथापरे रौद्रा मेघनादां-
कुशायुधाः। ऊर्ध्वगो भीमवेगश्च सर्व एवाभिकंपिताः ७६ [ १७६२ ] इति श्रीम० खि०
हरि० भविष्य० नारसिंहे षट्चत्वारिंशोऽध्यायः ॥ ४६ ॥

वैशंपायन उवाच ॥ तत्रादित्याश्च साध्याश्च विश्वे च मरुतस्तथा। रुद्रा देवा महात्मानो

---

ज्याचा आकार आहे असा श्रीमान् ऋषभ पर्वत, ज्यावर अगस्त्याचें मोठें गृह आहे असा कुंजर पर्वत ६२, जिच्यांतील मार्ग विशाल आहेत अशी सर्पांची आलयापुरी, व त्याचप्रमाणें भोगवती त्या दैत्येंद्रानें कांपविली ६३. महामेघ-पर्वत, पारियात्रपर्वत, श्रेष्ठ चक्रवानपर्वत, वाराहपर्वत ६४, ज्यामध्यें नरक नावाचा दुष्ट-दानव रहातो तें सुवर्णमयशुभ प्राग्ज्योतिषपुर, ६५ मेघाप्रमाणें ज्याचा ध्वनि गंभीर आहे असा श्रेष्ठपर्वत मेरु, हे राजा, तेथील साठ सहस्र पर्वत ६६ तरुण सूर्यासारखा महेंद्र महापर्वत, देवांचें निवासस्थान असा शुभ व पुण्य असा हिरण्मय पर्वतराज ६७, ज्याला सोन्याचीं शिंगें आहेत असा महाशैल मेघसखा पर्वत व अकंप्य कैलासही दानवेंद्रानें कांपविला ६८. त्याच्या गुहांचें सेवन यक्ष, राक्षस व गंधर्व नित्य करीत असत. तो श्रीमान्, मनोहर व ज्याच्यावरील वृक्ष नित्य फुललेले आहेत असा होता ६९. सुवर्ण कमलांनीं आच्छादित असलेलें वैखानस सरोवर त्यानें कांपविलें. राजहंसांनीं ज्याचें सेवन केलें आहे असें मानस सरोवर कंपित केलें ७०. त्रिशृंग पर्वत, श्रेष्ठ नदी कुमारी, तुषारांच्या ढिगांसारखा मंदर पर्वत ७१, उशीरबीज पर्वत, पर्वतराज रुद्रोपस्थ, प्रजापतीचें निवासस्थान असा पुष्करपर्वत ७२, देवावृत्पर्वत, त्याचप्रमाणें वालुकपर्वत, क्रौंच, सप्तर्षिपर्वत, धूम्रवर्णपर्वत ७३. हे व असेच दुसरेही पर्वत, देश, प्रांत, नद्या व सागर, त्या दानवेंद्रानें कांपवून सोडले ७४. महीपुत्र कपिल व व्याघ्राक्ष यांना त्यानें कांपविलें. निशापुत्र खेचर व पातालतळीं रहाणारे ७५. ज्यांचा नाद मेघासारखा असून अंकुश हींच आयुधें आहेत असे दुसरे रुद्राचे गण, ऊर्ध्वग, व भीमवेग या सर्वांना त्यानें सर्वतः कंपित करून सोडलें ७६. इति श्रीम० खि० हरि० भवि० नारसिंहाख्यानाचा शेचाळि-सावा अध्याय समाप्त झाला ॥ ४६ ॥

वसवश्च महाबलाः १ आगम्य ते मृगेंद्रस्य सकाशं सूर्यवर्चसः । ऊचुः संत्रस्तमनसो देवा लोकक्षयार्दिताः २ जहि देव दितेः पुत्रं दानवं लोकनाशनम् । दुर्वृत्तमसदाचारं सहसर्वैर्महासुरैः ३ त्वं ह्येषामंतकृन्नान्यो दैत्यानां दैत्यनाशन । तन्नाशय हितार्थाय लोकानां स्वस्तिवै कुरु ४ त्वं गुरुः सर्वलोकानां त्वमिन्द्रस्त्वं पितामहः । ऋते त्वदन्यच्छरणं न भूतं न भविष्यति ५ तच्छ्रुत्वा वचनं देवो देवानामादिसंभवः । ननाद सुमहानादमतिगंभीरान्निःस्वनम् ६ पाटितान्यसुरेंद्राणां मृगेन्द्रेण महात्मना । सिंहनादेन महता हृदयानि मनांसि च ७ गणः क्रोधवशो नाम कालकेयस्तथापरः । वेगश्च वैगलेयश्च सिंहिकेयश्च वीर्यवान् ८ संह्रदीयो महानादी महावेगस्तथापरः । कपिलश्च महीपुत्रो व्याघ्राक्षः क्षितिकंपनः ९ खेचराश्च निशापुत्राः पातालतलचारिणः । गणस्तथापरो रौद्रो मेघनादोंकुशायुधः १० ऊर्ध्वगो भीमवेगश्च भीमकर्मार्कलोचनः । वज्री शूली करालश्च हिरण्यकशिपुस्ततः ११ जीमूतघनसंकाशो जीमूत इव वेगवान् । जीमूतघनसंनादो जीमूतघनवद्द्युतिः १२ देवारिर्दितिजो दृप्तो नृसिंहं समुपाद्रवत् । समुत्पत्य ततस्तीक्ष्णैर्मृगेन्द्रेण महानखैः १३ तथोंकारसहायेन विदार्य निहतो युधि १४ मही च लोकश्च शशी नभश्च ग्रहाश्च सूर्यश्च दिशश्च सर्वाः । नद्यश्च शैलाश्च महार्णवाश्च गताः प्रकाशं दितिपुत्रनाशात् १५ ततः प्रमुदिता देवा ऋषयश्च तपोधनाः । तुष्टुवुर्विविधैः स्तोत्रैरादिदेवं सनातनम् १६ देवा ऊचुः ॥ यस्त्वया विहितं देव नार-

---

वैशंपायनः-- तेथें आदित्य, साध्य, विश्वेदेव, मरुत्, रुद्र, महात्मे देव, महाबलवान् वसू १ इत्यादि लोकक्षयानें पीडलेले सर्व भयभीत मनानें सूर्यासारख्या तेजस्वी मृगेंद्राजवळ येऊन म्हणाले २, ' हे देवा, लोकांचा नाश करणाऱ्या, दुर्वृत्त व असदाचार अशा या दितिपुत्रास सर्व महाअसुरांसह मार ३. हे दैत्यनाशन, तूंच यांचा न्याय्य अंतकर्ता आहेस. यास्तव लोकांच्या हिताकरितां याचा नाश कर. सर्वांस स्वस्थ कर ४. तूं सर्व लोकांचा गुरु, तूं इंद्र व तूंच पितामह आहेस. तुजवांचून अन्य आश्रय पूर्वी कधीं नव्हता, आतां नाहीं व पुढेंही नसेल ' ५. देवांचें तें वचन ऐकून देवांचा आदिकारणभूत देव अतिगंभीर ध्वनीनें फार मोठा नाद करता झाला ६. महात्म्या मृगेंद्रानें त्या आपल्या गंभीर सिंहनादानें असुरेंद्रांचीं हृदयें व मनें फाडून टाकलीं ७. क्रोधवश झालेला गण, कालकेय नांवाचा दुसरा गण, वेग, वैगलेय, वीर्यवान् सिंहिकेय ८, संह्रदीय, महानदी, तसाच दुसरा महावेग, महीपुत्र कपिल व क्षितिकंपन व्याघ्राक्ष ९, आकाशचर निशापुत्र, पातालतळीं रहाणारे, मेघाप्रमाणें ज्याचा नाद आहे व अंकुश ज्यांचीं आयुधें आहेत असे रुद्राचे गण १०, ऊर्ध्वग, भीमवेग, ( भयभीत झाले. ) नंतर भीमकर्मा, सूर्यनयन, वज्रयुक्त, शूलवान्, व विक्राल हिरण्यकशिपु ११, मेघासारखी ज्याची घन आकृति आहे, मेघाप्रमाणेंच ज्याचा वेग आहे, मेघासारखाच ज्याचा घन नाद आहे, व मेघाप्रमाणेंच ज्याची कांति आहे १२ असा तो देवशत्रु, मत्त दितिपुत्र नृसिंहावर चाल करून गेला. तेव्हां मृगेंद्रानें त्याच्यावर उडी मारून ओंकाराच्या सहायानें आपल्या तीक्ष्ण महानखांनीं त्याला फाडून युद्धांत मारलें १३.१४. तेव्हां त्या दितिपुत्राच्या नाशामुळें पृथ्वी, लोक, शशी, आकाश, ग्रह, सूर्य, सर्व दिशा, नद्या, पर्वत व महासागर प्रकाशयुक्त ( आनंदित ) झाले १५. त्यानंतर अतिशय आनंदित झालेले देव व तपोधन ऋषी विविध स्तोत्रांनीं त्या सनातन आदिदेवाची स्तुति करूं

सिंहमिदं वपुः । एतदेवार्चयिष्यन्ति परावरविदो जनाः । मृगेंद्रत्वं च लोकेषु सर्वसत्त्वेषु वा विभो १७ गायन्ति त्वां च मुनयो मृगेन्द्र इति नित्यशः । त्वत्प्रसादात्स्वकं स्थानं प्रतिपन्नाः स्म वै विभो १८ एवमुक्तो देवसंघैर्नरसिंहो महामनाः । ब्रह्मा च परमप्रीतो विष्णोस्तोत्रमुदीरयत् १९ ब्रह्मोवाच ॥ भवानक्षरमव्यक्तमाचिन्त्यं गुह्यमुत्तमम् । कूटस्थमकृतं कर्तृ सनातनमनामयम् २० सांख्ययोगे च या बुद्धिस्तत्त्वार्थपरिनिष्ठिता । तां भवान्वेद विद्यात्मा पुरुषः शाश्वतो ध्रुवः २१ त्वं व्यक्तश्च तथाव्यक्तस्त्वत्तः सर्वमिदं जगत् । भवन्मया वयं देव भवानात्मा भवान्प्रभुः २२ चतुर्विभक्तमूर्तिस्त्वं सर्वलोकविभुर्गुरुः । चतुर्युगसहस्रेण सर्वलोकान्तकान्तकः २३ प्रतिष्ठा सर्वभूतानामनन्तबलपौरुषः । कपिलप्रभृतीनां च यतीनां परमा गतिः २४ अनादिमध्यनिधनः सर्वात्मा पुरुषोत्तमः । स्रष्टा त्वं त्वं च संहर्ता त्वमेको लोकभावनः २५ भवान्ब्रह्मा च रुद्रश्च महेन्द्रो वरुणो यमः । भवान्कर्ता विकर्ता च लोकानां प्रभुरव्ययः २६ परां च सिद्धिं परमं च देवं परं च मंत्रं परमं मनश्च । परं च धर्मं परमं यशश्च त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् २७ परं च सत्यं परमं हविश्च परं पवित्रं परमं च मार्गम् । परं च यज्ञं परमं च होत्रं त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् २८ परं शरीरं परमं च धाम परं च योगं परमां च वाणीम् । परं रहस्यं परमां गतिं च त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् २९ परं परस्यापि परं च यत्परं परं परस्यापि परं च देवम् । परं परस्यापि परं प्रभुं च त्वामाहुरग्र्यं पुरुषं

---

लागले १६. देवः—हे देवा, तूं जें हें नारसिंह शरीर केलें आहेस त्याचेंच पर-अपर ब्रह्मास जाणणारें लोक पूजन करितील. हे विभो, लोकांमध्यें किंवा सर्व प्राण्यांमध्यें मृगेंद्रत्व प्रतिष्ठित होईल १७. मुनी मृगेंद्र असें ह्मणून तुला नित्य गातील. हे विभो, तुझ्या प्रसादानें आह्मी आपल्या स्थानाला प्राप्त झालों आहों १८. याप्रमाणें देवसंघाकडून बोलला गेलेला महाउदार मनाचा नरसिंह प्रसन्न झाला. अतिशय प्रसन्न झालेल्या ब्रह्मदेवानेंही विष्णूची अति स्तुति केली १९. ब्रह्माः—तूं अक्षर, अव्यक्त, अचिंत्य, गुह्य, उत्तम, कूटस्थ, अकृत, कर्तृ, सनातन व अनामय आहेस २०. तत्वार्थामध्यें सर्वतः स्थिर स्थित असलेली सांख्य-योग विषयक जी बुद्धि तिला तूंच विद्यारूप, शाश्वत, ध्रुव, परुष, जाणतास २१. तूं व्यक्त तसाच अव्यक्त आहेस. तुजपासून हें सर्व जग झालें. हे देव, आह्मी सर्व त्वन्मय आहों. तूंच आत्मा व प्रभु आहेस २२. उपनिषदांत वर्णिल्याप्रमाणें तुझी मूर्ति विश्व, तैजस, प्राज्ञ व तुरीय या चार प्रकारें विभक्त आहे. तूं सर्व लोकांमध्यें विभु व गुरु आहेस. चार युगांच्या एक सहस्र फेऱ्यानें सर्व लोकांच्या अंतकाचाही तूं अंतक होतोस २३. तूं सर्व भूतांची प्रतिष्ठा आहेस. तुजमध्यें अनंत बल व पौरुष आहे. कपिल प्रभृति यतींची तूं परम गति आहेस २४. तूं आदि, मध्य, व अंत यांनीं रहित आहेस. सर्वांचा आत्मा पुरुषोत्तम आहेस. तूं स्रष्टा, तूं संहरता व तूंच एक लोकांस उत्पन्न करणारा आहेस २५. तूंच ब्रह्मा व रुद्र आहेस. महेंद्र, वरुण, यम, लोकांचा कर्ता, विकर्ता, व अव्यय प्रभु आहेस २६. परा सिद्धि, परम देव, पर मंत्र, परम मन, पर धर्म व परम यश, असें तुज अग्र्य व पुराण पुरुषाला ह्मणतात २७. परम सत्य, सर्वोत्तम हवि, परम पवित्र, परम मार्ग, पर यज्ञ व परम होत्र असें तुज पुराण अग्र्य पुरुषास ह्मणतात २८. तुज अग्र्य पुराण पुरुषास पर शरीर, पर धाम, पर योग, परम वाणी, परम रहस्य, व परम गति ह्मणतात २९ तुज सर्वोत्तम अनादि पुरुषाला पर, पराहून पर, परात्पराहून पर, परमदेव

पुराणम् ३० परं परस्यापि परं प्रधानं परं परस्यापि परं च तत्त्वम् । परं परस्यापि परं च धाता त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ३१ परं परस्यापि परं रहस्यं परं परस्यापि परं परं यत् । परं परस्यापि परं तपो यस्त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ३२ परं परस्यापि परं परायणं परं च गुह्यं च परं च धाम । परं च योगं परमं प्रभुत्वं त्वामाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ३३ वैशंपायन उवाच ॥ एवमुक्त्वा स भगवान्सर्वलोकपितामहः । स्तुत्वा नारायणं देवं ब्रह्मलोकं गतः प्रभुः ३४ ततो नदत्सु तूर्येषु नृत्यन्तीष्वप्सरःसु च । क्षीरोदस्योत्तरं कूलं जगाम प्रभुरीश्वरः ३५ नारसिंहीं तनुं त्यक्त्वा स्थापयित्वा च तद्वपुः । पौराणं रूपमास्थाय ययौ सगरुडध्वजः ३६ अष्टचक्रेण यानेन भूतयुक्तेन शोभिना । अव्यक्तः प्रकृतिर्देवः स्वस्थानमगमत्प्रभुः ३७ एवं महात्मना तेन नृसिंहवपुषा तदा । देवेन निहतः पूर्वं हिरण्यकशिपुश्च सः ३८ [ १८०० ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि नारसिंहप्रादुर्भावे हिरण्यकशिपुवधकथनं नाम सप्तचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४७ ॥

वैशंपायन उवाच ॥ नृसिंह एष कथितो भूयोऽयं वामनोऽपरः । यत्र वामनमास्थाय रूपं रूपविदां वरः १ बलेर्बलवतो यज्ञे बलिना विष्णुना पुरा । विक्रमैस्त्रिभिराक्रम्य त्रैलोक्यमखिलं हृतम् २ समुद्रवसना चोर्वी नानानगविभूषिता । हृत्वा दत्वा सुरेन्द्राय शक्राय प्रभविष्णुना ३ जनमेजय उवाच ॥ अत्र मे संशयो ब्रह्मन्नत्र कौतूहलं महत् । कथं नारायणो देवो वामनत्वमुपागतः ४ यः पुराणे पुराणात्मा भूत्वा नारायणः प्रभुः । पद्मनाभो

---

परात्पर प्रभु असें ह्मणतात ३०. पराचाही पर, परम प्रधान, पराहूनही परंतत्त्व व परात्पर धाता असें तुज अग्र्य पुराण पुरुषाला ह्मणतात ३१. पराचेंही पर, परम रहस्य, सर्व उत्तमोत्तम वस्तूंहून उत्तम, व सर्वोत्कृष्ट तप असें तुज अग्र्य पुरुषाला ह्मणतात ३२. पराचेंही पर, परम परायण, पर गुह्य, पर धाम, परम योग, परम प्रभुत्व, असें तुज अग्र्य पुराण पुरुषाला ह्मणतात ३३. वैशंपायनः— तो सर्व लोकांचा पितामह प्रभु भगवान् असें बोलून व नारायण देवाची स्तुति करून ब्रह्मलोकास गेला ३४. त्यानंतर वाद्यें वाजत असतांना व अप्सरा नाचत असतांना तो प्रभु ईश्वर क्षीरसागराच्या उत्तरतीरावर गेला ३५ नारसिंह शरीर सोडून, त्याची लोकांत स्थापना करून व आपलें जुनें स्वरूप घेऊन तो गरुडध्वज गेला ३६. ज्याला आठ चाकें आहेत व जें महाभूतांच्या योगानें केलेलें आहे अशा शोभायुक्त वाहनानें तो प्रभु अव्यक्त, प्रकृति, देव आपल्या स्थानास गेला ३७. त्याप्रमाणें त्या महात्म्या देवानें त्यावेळीं नृसिंहशरीरानें त्या हिरण्यकशिपूस पूर्वी मारलें ३८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० नरसिंहाख्यानाचा हिरण्यकशिपूच्या वधाविषयीं सत्तेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४७ ॥

वैशंपायनः— हा नरसिंह अवतार तुला सांगितला. आतां पुनः वामन अवतार ऐक. त्या अवतारांत रूपवेत्त्यांतील श्रेष्ठ देवानें वामनरूप धरिलें १ व बलाढ्य बलीच्या यज्ञांत पूर्वी त्या बलाढ्य विष्णूनें तीन पावलांनीं त्रैलोक्याचें आक्रमण करून हें सर्व त्रिभुवन त्याच्यापासून हिरावून घेतलें २. त्या प्रभु होण्याची इच्छाकरणाऱ्या देवानें समुद्र हेंच जिचें वस्त्र आहे अशा या नानापर्वतांनी भूषित झालेल्या पृथ्वीला हरण करून सुरेंद्र शक्राला ती अर्पण केली ३. जनमेजयः— हे ब्राह्मणवर्य, याविषयीं मला मोठा संशय व मोठें कौतुकही वाटत आहे. नारायणदेव वामनत्वास कसा प्राप्त झाला ४. जो

महाबाहुर्लोकानां प्रकृतिर्ध्रुवः ५ अनादिमध्यनिधनस्त्रैलोक्यादिः सनातनः। देवदेवः सुराध्यक्षः कृष्णो लोकनमस्कृतः ६ हव्यकव्यवहः श्रीमान् हव्यकव्यभुगव्ययः। अदित्या देवमातुश्च कथं गर्भेऽभवत्प्रभुः। स्रष्टा यो वासवस्यापि स कथं वासवानुजः ७ प्रसूतो देवदेवेशो विष्णुत्वं प्राप्तवान्कथम्। एतदाचक्ष्व मे विप्र प्रादुर्भावं महात्मनः ८ वैशंपायन उवाच॥ शृणु राजन्कथां दिव्यामर्चितामृषिपुंगवैः। पुराणैः कविभिः प्रोक्तां ब्रह्मोक्तां ब्राह्मणेरिताम् ९ मारीचस्य सुरेशस्य कश्यपस्य प्रजापतेः। अदितिर्दितिश्च द्वे भार्ये भगिन्यौ जनमेजय १० अदित्यां जज्ञिरे देवाः कश्यपस्य महात्मनः। धातार्यमा च मित्रश्च वरुणोंशो भगस्तथा ११ इन्द्रो विवस्वान्पूषा च पर्जन्यो दशमस्तथा। तथैकादशमस्त्वष्टा द्वादशो विष्णुरुच्यते १२ दित्यां जातो हि बलवान्हिरण्यकशिपुः प्रभुः। तस्यानुजश्च दैत्येन्द्रो हिरण्याक्षः प्रतापवान् १३ हिरण्यकशिपोः पुत्राः पंच घोरपराक्रमाः। प्रह्लादश्चानुह्लादश्च जंभः संह्लाद एव च १४ विरोचनश्च प्राह्लादिस्तस्य पुत्रो बलिः स्मृतः। पुत्रपौत्रं च बलवत्तेषामक्षयमव्ययम् १५ तेजस्विनां सुरारीणां दैत्येन्द्राणां मनस्विनाम्। गणाः सुबहुशो राजन् देशे देशे सहस्रशः १६ ते दृष्ट्वा नारसिंहेन हिरण्यकशिपुं हतम्। दैत्या देववधार्थाय बलिमिन्द्रं प्रचक्रिरे १७ दृष्ट्वा धर्मपरं नित्यं सत्यवाक्यं जितेन्द्रियम्। शौर्याध्ययनसंपन्नं सर्वज्ञानविशारदम् १८ परावरगृहीतार्थं तत्त्वदर्शिनमव्ययम्। तेजस्विनं

---

नारायण प्रभु पुराणामध्यें पुराणात्मा होऊन, पद्मनाभ, महाबाहु, लोकांची प्रकृति, ध्रुव ५, आदि, मध्य, अंतशून्य त्रैलोक्याचें कारण, सनातन, देवाधिदेव, देवांचा अध्यक्ष, कृष्ण, सर्व लोकांकडून नमस्कार केला गेलेला ६, हव्य व कव्य यांस वाहणारा, श्रीमान् हव्य व कव्य यांचा भोक्ता, अव्यय, या नांवांनीं वर्णिला जातो तो प्रभु देवाची माता जी आदिति तिच्या गर्भांत कसा राहिला? जो इंद्राचाही स्रष्टा तो इंद्राचा कनिष्ठ भ्राता कसा झाला ७ व जन्मास आलेला तो देवदेवेश पुनः विष्णुत्वास कसा प्राप्त झाला? हे विप्र, हें मला सांग व त्या महात्म्याचा तो प्रादुर्भावही मला ऐकूंदे ८. वैशंपायनः— राजन्, ऋषिश्रेष्ठांनीं जिचा मोठा सत्कार केला आहे, अशी जुन्या कवींनीं सांगितलेली, ब्रह्मदेवानें वर्णन केलेली व ब्राह्मणांनीं प्रख्यातीस आणलेली ही दिव्य कथा ऐक ९. हे जनमेजया, मरीचीचा पुत्र, देवांचा ईश, व प्रजापति अशा कश्यपाच्या अदिति व दिति अशा दोन भगिनी भार्या होत्या १०. अदितीच्याठायीं महात्म्या कश्यपापासून देव उत्पन्न झाले. धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंश, भग, इंद्र, सूर्य, पूषा, व दहावा पर्जन्य, अकरावा त्वष्टा व बारावा विष्णु होय ११,१२. दितीच्या ठायीं बलवान् हिरण्यकशिपु प्रभु झाला. त्याचा धाकटा भाऊ प्रतापवान् दैत्येंद्र हिरण्याक्ष १३. हिरण्यकशिपूचे घोर पराक्रमी प्रल्हाद, अनुह्लाद, जंभ, संह्लाद इत्यादि पांच पुत्र १४. विरोचन हा प्रल्हादाचा पुत्र, त्याचा पुत्र बलि असें सांगितलें आहे. त्या दैत्याचे पुत्र-पौत्रादि सर्व महाबलाढ्य, अक्षय व अव्यय होते १५. हे राजन्, त्या तेजस्वी व मानी देवशत्रु दैत्येंद्रांचे सहस्रावधि गण प्रत्येक देशांत पुष्कळच आहेत १६. नारसिंहानें हिरण्यकशिपूला मारलें आहे असें पाहून ते दैत्य देवांच्या वधाकरितां बलीला इंद्र करिते झाले १७. तो नित्य धर्मपरायण, सत्यवाक्य, जितेंद्रिय, शौर्याध्ययन संपन्न, सर्वज्ञान विशारद १८ उत्कृष्ट व निकृष्ट अर्थांचें ग्रहण करणारा, तत्त्वदर्शी, अव्यय, व हिरण्यकशिपूसारखाच तेजस्वी व

सुररिपुं हिरण्यकशिपुं यथा १९ अभिषेकेण दिव्येन बलिं वैरोचनिं तथा । दैत्याधिपत्ये दितिजास्तदा सर्वेऽभ्यपूजयन् २० अभिषिक्तस्तदा दैत्यैर्बलिर्बलवतां वरः । ब्रह्मणा चैव तुष्टेन हिरण्यकशिपोः पदे २१ अभिषिक्तो सुरगणैर्बलिर्वैरोचनिस्तदा । काञ्चनैः कलशैः स्फीतैः सर्वतीर्थाम्बुसंभृतैः २२ जयशब्दं ततश्चक्रुरभिषिक्तस्य दानवाः । बलेरतुलवीर्यस्य सिंहासनगतस्य वै २३ कृत्वेन्द्रं दानवाः सर्वे बलिं बलवतां वरम् । ततो विज्ञापयामासुः शिरोभिः पतिताः क्षितौ २४ दैत्या ऊचुः ॥ विदितं तव दैत्येन्द्र हिरण्यकशिपोर्यथा । त्रैलोक्यमासीदखिलं जगत्स्थावरजंगमम् २५ पितामहं तु हत्वा ते सुरेश्वरनिषूदन । हृतं तदेव त्रैलोक्यं शक्रश्चैवाभिषेचितः २६ तत्पितामहराज्यं त्वं मत्याहर्तुमिहार्हसि । अस्माभिः सहितो नाथ त्रैलोक्यमिदमव्ययम् २७ प्रशाधि स्वभद्रं ते राज्यं पैतामहं प्रभो २८ असुरव्यासहस्रसंवृतस्त्वं जय दिवि देवगणान्महानुभावान् । अमितबलपराक्रमोऽसि राजन्नतिशयसे स्वगुणैः पितामहं स्वम् २९ [ १८२१ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि बलेरभिषेको नाम अष्टचत्वारिंशोऽध्यायः ॥ ४८ ॥

वैशंपायन उवाच ॥ निशम्य तेषां वचनं महामतिर्बलिस्तदा प्रीतमना महाबलः । आज्ञापयामास स दैत्यकोटिं त्रैलोक्यमद्यैव जयाम सर्वम् १ तस्य तद्वचनं श्रुत्वा बलेर्वैरोचनस्य तु । उद्योगं परमं चक्रुर्दानवा युद्धदुर्मदाः २ महापद्मो निकुंभश्च पूर्णकुंभश्च वीर्यवान् ।

---

देवांचा वैरी आहे असें पाहून १९ सर्व दितिपुत्रांनीं दिव्य अभिषेकाच्या योगानें विरोचनपुत्र बलीला दैत्यांच्या आधिपत्यावर बसाविलें. त्यांनीं त्याची सर्व प्रकारें पूजा केली २०. दैत्यांनीं व त्यावेळीं संतुष्ट झालेल्या ब्रह्मदेवानें बलवानांतील श्रेष्ठ बलीला हिरण्यकशिपूच्या पदीं अभिषेक केला २१. असुरगणांनीं विरोचनपुत्र बलीला सर्वतीर्थजलानें भरलेल्या मोठमोठ्या सुवर्णाच्या कलशांनीं त्यावेळीं अभिषेक केला २२. त्यानंतर अभिषिक्त, अतुलवीर्यवान् व सिंहासनगत अशा बलीचा दानवांनीं जयजयकार केला २३. याप्रमाणें सर्व दानवांनीं बलाढ्यांतील श्रेष्ठ बलीला इंद्र करून व मस्तकांनीं भूमीवर पडून अशी विज्ञापना केली २४. दैत्यः— हे दैत्येन्द्रा, हें सर्व स्थावर जंगम जगत् व त्रैलोक्य हिरण्यकशिपूचें कसें होतें तें तूं जाणतोसच २५. पण हे देवेंद्रास मारणाऱ्या तुझ्या प्रपितामहास मारून त्यावेळींच देवांनीं त्रैलोक्याचें हरण केलें व इंद्राला राज्यावर अभिषेक केला २६. वास्तव तूं आतां आपलें वडिलोपार्जित राज्य तूं परत मिळविण्यास योग्य आहेस. हे नाथ, आम्हांसहवर्तमान हें अव्यय त्रैलोक्य आपल्या अधीन आण. हे प्रभो, तुझें कल्याण होवो. पितामहाचें राज्य परत मिळीव २७.२८. सहस्रावधि असुरगणांनीं आवृत झालेला तूं स्वर्गांत जाऊन महानुभावशाली देवांस जिंक. कारण हे राजन्, तूं अमितबल पराक्रमी आहेस. आपल्या गुणांनीं आपल्या पितामहाचेंही तूं उल्लंघन केलें आहेस २९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० बलीचा अभिषेक या नांवाचा अठ्ठेचाळिसावा अध्याय समाप्त झाला ॥ ४८ ॥

वैशंपायनः— त्यांचें भाषण ऐकून महामति व महाबल बलि त्यावेळीं संतुष्टचित्त झाला. त्यानें दैत्यांच्या कोटी वीरांस आपण आजच सर्व त्रैलोक्य जिंकूं या, अशी आज्ञा केली १. त्याचें तें आज्ञावचन ऐकून युद्धामध्यें अति दुर्मद असलेले दानव परमोद्योग करूं लागले २ महापद्म, निकुंभ, वीर्यवान् पूर्णकुंभ, कांचनाक्ष, कपिस्कंध, मैनाक, क्षिति-

कांचनाक्षः कपिस्कन्धो मेनाकः क्षितिकंपनः ३ शितकेशोर्ध्ववक्त्रश्च वज्रनाभः शिखी जटी । सहस्रबाहुर्विकटो व्याघ्राक्षः प्रियदर्शनः ४ एकाक्ष एकपान्मुण्डो विद्युदक्षश्चतुर्भुजः । गजोदरो गजशिरा गजस्कन्धो गजेक्षणः ५ अष्टदंष्ट्रश्चतुर्वक्त्रो मेघनादी जलंधरः । करालो ज्वालजिह्वास्यः शतांगः शतलोचनः ६ सहस्रपादः सुमुखः कृष्णश्चैव महासुरः । रणोत्कटो दानपतिः शैलकंपी कुलाकुलिः ७ समुद्रो रभसश्चण्डो धूम्रश्चैव महासुरः । गोत्रजो गोक्षुरो रौद्रो गोदन्तः स्वस्तिको ध्रुवः ८ मांसपो मांसभक्षश्च वेगवान्केतुमाञ्छिबिः । पंकदिग्धशरीरश्च बृहत्कीर्तिर्महाहनुः ९ समप्रभो विकुंभाण्डो विरूपाक्षो महोदरः । श्वेतशीर्षश्चन्द्रहनुश्चन्द्रहा चन्द्रतापनः १० विक्षरो दीर्घबाहुश्च मद्यपो मारुताशनः । तालजंघो महाभागः सरभः शलभः क्रथः ११ समुद्रमथनो नादी विततश्च महाबलः । प्रलंबो नरको व्याली धेनुकः काललोचनः १२ वरिष्ठश्च गरिष्ठश्च भूतलोमा तथा विधुः । दुष्प्रसादः किरीटी च सूचीवक्त्रो महासुरः १३ सुबाहुः कंजबाहुश्च करणः कलशोदरः । सोमपो देवयाजी च प्रवरो वीरमर्दनः १४ सुपथः खण्डमुक्तिश्च शिखिनेत्रः शिखिध्वजः । यथास्मृति मया प्रोक्ता मरीचेः कीर्तिवर्धनाः १५ एते चान्ये च बहवो नानाभूषणभूषिताः । रथौघैर्बहुसाहस्रैर्ययुर्योद्धुमरिंदमाः १६ दिव्यांबरधरा दैत्या दिव्यमाल्यानुलेपनाः । दिव्यैश्च कवचैर्नद्धा दिव्यैश्चैवोच्छ्रितैर्ध्वजैः १७ दिव्यायुधधरा दैत्या गर्जमाना यथांबुदाः । बृहद्भी रथघोषैश्च चालयन्तो वसुन्धराम् १८ महाबला दिव्यबलास्त्रधारिणो भुजंगभोगप्रतिमैर्महाभुजैः । सुदुर्जया दैत्यवृषाः सुरारयो दितिप्रिया लोहितलोहितेक्षणाः १९ ते जग्मुरर्कज्वलनेन्द्रवीर्या महेन्द्रवज्राशनितु-

---

कंपन ३, शितकेश, ऊर्ध्वमुख, वज्रनाभ, शिखी, जटावान्, सहस्रबाहु, विकट, व्याघ्राक्ष, प्रियदर्शन ४, एकाक्ष, एक पाद्, मुंड, विद्युद्दक्ष, चतुर्भुज, गजोदर, गजशिरा, गजस्कंध, गजेक्षण, अष्टदंष्ट्र, चतुर्वक्त्र, मेघनादी, जलंधर, कराल, उज्वाल जिह्वास्य, शतांग, शतनेत्र, सहस्रपाद्, सुमुख, कृष्ण, महासुर, रणोत्कट, दानपति, शैलकंपी, कुलाकुलि ५-७, समुद्र, रभस, चंड, धूम्र, महासुर, गोत्रज, गोक्षुर, रौद्र, गोदन्त, स्वस्तिक, ध्रुव, मांसप, मांसभक्ष, वेगवान्, केतुमान्, शिबि, पंकदिग्धशरीर, बृहत्कीर्ति, महाहनु ८,९, समप्रभ, विकुंभांड, विरूपाक्ष, महोदर, श्वेतशीर्ष, चद्रहनु, चंद्रहा, चंद्रतापन १०. विक्षर, दीर्घबाहु, मद्यप, मारुताशन, तालजंघ, महाभाग, सरभ, शलभ, क्रथ, ११. समुद्रमथन, अनादी, वितत, महाबल, प्रलंब, नरक, व्याली, धेनुक, काललोचन १२ वरिष्ठ, गरिष्ठ, भूतलोमा, विधु, दुष्प्रसाद, किरीटी, महासुर सूचीवक्त्र १३, सुबाहु, कंजबाहु, करण, कलशोदर, सोमप, देवयाजी, प्रवर, वीरमर्दन १४. सुपथ, खंडमुक्ति, शिखिनेत्र, शिखिध्वज, इत्यादि हे मरीचीची कीर्ति वाढविणारे दैत्य मला आठवले तितके सांगितले आहेत १५. हे व असेच आणखी दुसरेही नानाभूषणांनीं भूषित झालेले शत्रुनाशक वीर अनेक सहस्र रथांच्या ओघांनीं युद्धास निघाले १६. दिव्य वस्त्रें धारण करणारे, दिव्य माळा घालून दिव्य उटी अंगास लावणारे, दिव्य कवचांनीं सज्ज झालेले व दिव्य उंच ध्वजांनीं उपलक्षित असलेले दैत्य दिव्य आयुधें धारण करून मेघांप्रमाणें गर्जना करीत मोठमोठ्या रथांच्या घोषांनीं पृथ्वीस चाळवीत १७,१८, ( शत्रूंवर निघाले. ) महाबलाढ्य, भुजंगांच्या शरीरासारख्या महाभुजांनीं दिव्यबल व अस्त्र धारण करणारे, अतिदुर्जय, देवांचे शत्रु, दितीस प्रिय व ज्यांचे नेत्र अतिलाल आहेत असे दैत्यश्रेष्ठ १९ ( युद्ध

ल्यवेगाः । विवृद्धदंष्ट्रा हरिधूम्रकेशा विवर्धमानाः शरदीव मेघाः २० सहस्रबाहुर्बाणश्च बलेः पुत्रो महाबलः । रथातिरथकोट्या वै सन्नह्यत महाबलः २१ सर्वे मायाधरा दैत्याः सर्वे दिव्यास्त्रयोधिनः । सर्वे मदबलोत्सिक्ताः सर्वे लब्धवराः पुरा २२ सर्वे कांचनशैलाभाः पीतकौशेयवाससः । किरीटोष्णिषमुकुटा दिव्यभूषणभूषिताः २३ हिरण्यकवचाः सर्वे हिरण्यध्वजकेतवः । स्यन्दनस्था व्यराजन्त शारदा इव खे ग्रहाः २४ तापनीयैर्वरैर्निष्कैरनलज्वलितप्रभैः । हेमपर्वतशृंगस्थाः पुष्पिता इव किंशुकाः २५ तेषां मध्यगतो बाणः प्रावृषीवोत्थितो घनः । स्थितः शक्तिगदापाणिस्त्विनल्वप्रतिमे रथे २६ विचित्राश्वध्वजयुगे चित्रभक्तिविराजिते । गदापरिघसंपूर्णे हेमजालविभूषिते २७ अन्वीयमानो दितिजैर्वालखिल्यैरिवांशुमान् । नानाप्रहरणैर्घोरैस्तीक्ष्णदंष्ट्रैरिवोरगैः २८ पंच तस्य महावीर्या दानवा युद्धदुर्मदाः । ररक्षू रथमव्यग्रा व्यादितास्या भयावहाः २९ सुबाहुर्मेघनादश्च भीमगर्भश्च वीर्यवान् । तथा कनकमूर्धा च वेगवान्केतुमानिति ३० कनकरजतभक्तिचित्रपार्श्वे पतगपतिप्रतिमे रथे स्थितोऽभूत् । जलदनिनदतुल्यनेमिघोषे सुरगणसैन्यवधाय दानवेन्द्रः ३१ अनायुषायाः पुत्रस्तु बलो नाम महासुरः । वृतः शतसहस्रेण रथानां भीमवर्चसाम् ३२ युक्तमृक्षसहस्रेण

---

करावयास निघाले. ) सूर्य, अग्नि व इंद्र यांच्याप्रमाणें ज्यांचें वीर्य आहे, इंद्राच्या वज्राप्रमाणें व अशनीप्रमाणें ज्यांचा वेग आहे, ज्यांच्या दाढा वाढलेल्या आहेत, वानरांच्या केंसांप्रमाणें ज्यांचे केस धूम्रवर्ण आहेत, जे शरत्कालच्या मेघाप्रमाणें वाढत आहेत असे ते सर्व युद्धाकरितां निघाले २०. ज्याला सहस्र बाहु आहेत असा बलीचा पुत्र महाबल बाणरथ व अतिरथ वीरांच्या कोटींनें सज्ज झाला २१. ते सर्व दैत्य माया धारण करणारे, दिव्य अस्त्रानें युद्ध करणारे, सर्व मदबलानें मत्त व ज्यांना पूर्वीं वर मिळाला आहे असे होते २२. सर्व मेरुपर्वतासारखे, पिवळीं रेशमीं वस्त्रें नेसणारे, कीरीट, पागोटीं व मुकूट घातलेले, दिव्य भूषणांनीं भूषित झालेले २३, सर्व सोन्याचीं कवचें घातलेले आणि ज्याचे ध्वज व केतू सोन्याचे आहेत, असे ते रथावर बसलेले राक्षस आकाशांतील शरत्कालीन ग्रहाप्रमाणें शोभले २४. सोन्याच्या अग्नीसारख्या दीप्त प्रभायुक्त श्रेष्ठ भूषणांनीं भूषित झालेले ते सुवर्णपर्वताच्या शृंगावर असलेल्या पुष्पित पळाशवृक्षाप्रमाणें शोभले २५. त्यांच्या मध्यभागीं बाराशें हात लांबीच्या रथावर हातांत गदा घेऊन स्थित असलेला बाण वर्षाकालीं उठलेल्या मेघाप्रमाणें दिसत होता २६. तो त्याचा रथ विचित्र अश्व व ध्वज यांनीं युक्त होता. चित्रांच्या रचनेनें शोभत होता. गदा व परिघ यांनीं संपन्न होता व सुवर्णसमूहानें अतिशय भूषित होता २७. सूर्याच्या मागून जसे वालखिल्य जातात त्याप्रमाणें बाणाच्या मागून दैत्य जात होते. तीक्ष्ण दाढांनीं युक्त असलेल्या सर्पाप्रमाणें ते नानाप्रकारच्या घोर आयुधांनीं युक्त होते २८. ज्यांनीं आपलीं तोंडें पसरलीं आहेत असे पांच महावीर्यवान् युद्धाविषयीं मोठें मत्त व भयावह दानव बाणाच्या रथाचें रक्षण करीत होते २९ सुबाहु, मेघनाद, वीर्यवान् भीमगर्भ, कनकमूर्धा, व वेगवान् केतुमान् असे ते पांच होत ३०. सारांश, तो दानवेंद्र देवगणाच्या सैन्याच्या वधाकरितां सोनें व रुपें यांच्या विचित्र रचनांनीं ज्याचे पार्श्वभाग रमणीय झाले आहेत व मेघांच्या नादाप्रमाणें ज्याच्या धांवांचा घोष आहे अशा गरुडासारख्या रथावर तो स्थित झाला ३१. अनायुषेचा

रथमारुह्य वीर्यवान् । नीलायसमयं घोरं वायसांकं सुदुर्जयम् ३३ नीलांबरधरः श्रीमान्वैडूर्याचलसन्निभः । महता रथवेगेन प्रययौ दानवस्तदा ३४ तत्कैकार्णवसंकाशे सैन्यमध्ये व्यराजत । प्रभातसमये श्रीमान्समुद्रस्थ इवांशुमान् ३५ सुतप्तजांबूनदतुल्यवर्चसा निशाकराकारतडित्प्रकाशः । किरीटमुख्येन विभाति शोभिना यथा गिरिः शृंगवरेण भास्वता ३६ षष्टी रथसहस्राणि नमुचेरसुरस्य वै । खरयुक्तानि सर्वाणि मेघतुल्यस्वराणि च ३७ नानाप्रहरणाः सर्वे सर्वे ते चित्रयोधिनः । महाभ्रघनसंकाशा वेगवन्तो महाबलाः ३८ रथो व्याघ्रसहस्रेण युक्तः परमवेगवान् । नमुचेरसुरेन्द्रस्य सर्वरत्नविभूषितः ३९ शार्दूलचिह्नः शुशुभे तस्य केतुर्हिरण्मयः । रथमध्येऽसुरेशस्य मध्यंदिनरविर्यथा ४० स भीमवेगश्च महाबलश्च प्रगृह्य चापं हिमवानिव स्थितः । नीलांबरः कांचनपट्टनद्धो दिशागजो बद्धकुथेनकक्षः ४१ किंकिणीजालनिर्घोषं तपनीयविभूषितम् । सपताकाध्वजोपेतं ससन्ध्यमिव तोयदम् ४२ चक्रैश्चतुर्भिः संयुक्तमष्टनल्वायतान्तरम् । हेमजालाकुलं दीप्तं कालचक्रमिवोदितम् ४३ नानायुधधरं घोरं व्याघ्रचर्मपरिष्कृतम् । ईहामृगगणाकीर्णं चित्रभक्तिविराजितम् ४४ तूणीरशरसंपूर्णं शक्तितोमरसंकुलम् । गदामुद्गरसंबाधं चामरव्रजविभूषितम् ४५ युक्त-

---

बलनामक महाअसुर पुत्र हजारों भयंकर तेजस्वी रथांनीं परिवेष्टित झाला ३२. त्या रथाला सहस्रावधि आस्वलें जोडलीं होतीं. असो ज्याच्याव, कावळ्याचा ध्वज आहे अशा पोलादि अतिदुर्जय व घोर रथावर तो वीर्यवान् दैत्य आरूढ झाला ३३. नील वस्त्र धारण करणारा तो श्रीमान् दैत्य वैडूर्यमणीच्या पर्वताप्रमाणें दिसला. मोठ्या रथवेगानें तो दानव त्यावेळीं गेला ३४. एक सागरासारख्या सैन्यामध्यें तो राक्षस प्रभातसमयींच्या समुद्रस्थ श्रीमान् सूर्याप्रमाणें शोभला ३५. ज्याप्रमाणें एखादा पर्वत चमकणाऱ्या श्रेष्ठ शिखरानें शोभतो त्याप्रमाणें तो दैत्य तापलेल्या सोन्यासारखी ज्याची कांति आहे, अशा सुशोभित मुख्य किरीटाच्या योगानें शोभला. त्याची आकृति चंद्रासारखी अथवा विजेच्या रेषेसारखी होती ३६. नमुचि राक्षसाचे साठ सहस्र रथ होते. त्या सर्वांना गाढवें जोडलीं असून त्यांचा नाद मेघासारखा होता ३७. ते सर्व नाना आयुधांनीं युक्त होते. सर्व विचित्र युद्ध करणारे होते. ते महाबलाढ्य, मोठ्या मेघासारखे व वेगवान् होते ३८. त्याचा अतिशय वेगवान् रथ हजारों व्याघ्रांनीं युक्त होता. नमुचि राक्षसाचा तो सुंदर रथ सर्व रत्नांनीं विभूषित होता ३९. त्याचा व्याघ्रचिह्नयुक्त सोन्याचा केतु फार शोभला. मध्याह्नीं आलेल्या सूर्याप्रमाणें असुरेशाच्या रथामध्यें तो ध्वज शोभत होता ४०. तो भीमवेग व महाबल राक्षस धनुष्य धारण करून हिमालयाप्रमाणें स्थित होता. नील वस्त्र धारण करून सोन्याच्या पट्ट्यानें सज्ज झालेला तो कक्षायुक्त दिग्गजासारखा दिसला ४१. ज्याच्या क्षुद्र घंटांच्या समूहाचा मोठा ध्वनि होतो, जो सोन्यानें अतिशय भूषित आहे, जो पताका व ध्वज यांनीं युक्त आहे, जो संध्यायुक्त मेघासारखा दिसत आहे ४२, जो चार चक्रांनीं युक्त आहे, ज्याच्या आंतील भाग आठ नल्व लांब आहे, जो सुवर्णजालानें व्याप्त व दीप्त आहे, व त्यामुळेंच जो जणु काय उदय पावलेल्या कालचक्राप्रमाणें दिसत आहे ४३, नानाआयुधें धारण करणारा, घोर, व्याघ्राच्या चामड्यानें मढविलेला, चित्रांत काढलेल्या वानरांच्या समूहानें व्याप्त, चित्ररचनेनें सुशोभित ४४, भाताभाते व बाण यांनीं परिपूर्ण, शक्ति व तोमर यांनीं संकुल,

मृक्षसहस्रेण लंबकेसरवर्चसा । राजतेन विकीर्णेन शोभितं सिंहकेतुना ४६ स तेन शुशुभे दैत्यो मयो मायाविसर्पिणा । रथरत्ने स्थितः श्रीमानुदयस्थ इवांशुमान् ४७ विमलरजतबिन्दुशोभितांगं मणिकनकोज्ज्वलचारुभक्तिचित्रम् । अयुतशतसहस्रमूर्जितानां मयमनुयाति तदा महारथानाम् ४८ [ १८७७ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे मयस्य युद्धाभिगमनं नामैकोनपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ४९ ॥

वैशंपायन उवाच ॥ पुलोमा तु महादैत्यस्तिमिराकारगह्वरम् । आरुरोहायसं घोरं रथं परमथारुजम् १ पर्वतोत्करसंकाशं लोहजालांतरान्तरम् । नेमिघोषेण महता क्षुभ्यन्तमिव सागरम् २ गदापरिघनिस्त्रिंशैः सतोमरपरश्वधैः । शक्तिमुद्गरसंकीर्णं सतोयमिव तोयदम् ३ रथमुष्ट्रसहस्रेण संयुक्तं वायुवेगिना । पुलोमारुह्य युद्धाय प्रस्थितो युद्धदुर्मदः ४ षष्टिं रथसहस्राणि पुलोमानं महारथम् । अन्वयुः सूर्यवर्णानि प्रदीप्तानीव तेजसा ५ शार्ङ्गध्वजेन महता तप्तकांचनवर्चसा । भ्राजते रथमध्यस्थः पर्वतस्थ इवांशुमान् ६ सुचारुचामीकरपट्टनद्धां महागदां कालनिभां महाबलः । प्रगृह्य बभ्राज स शत्रुमध्ये कार्ष्णायसीं केतुरिवास्थितोऽव्याम् ७ हयग्रीवस्तु बलवान् हयग्रीवैर्महासुरैः । वृतः शतसहस्रेण रथानां रथसत्तमः ८ धराधरनिभाकारं सपत्नानीकमर्दनम् । स्यन्दनं भीममास्थाय युद्धायाभिमुखः

---

गदा व मुद्गर यांची ज्यांत दाटी झाली आहे, जो उत्तमोत्तम मनुष्यांनीं भाषित झाला आहे ४५, ज्याला सहस्र रीस जोडले आहेत आणि ज्याचें आयाळ खालीं लोंबत आहे, अशा रुप्याच्या विष्पाड सिंहकेतूनें जो सुशोभित झाला आहे ४६ अशा त्या मायेनें इतस्ततः चालणाऱ्या रथानें मय दैत्य फार शोभला तो श्रीमान् राक्षस उदयपर्वतावरील सूर्याप्रमाणें त्या उत्तम रथावर बसला ४७. निर्मळ रुप्याच्या ठिबक्यांनीं ज्याचें अंग सुशोभित केलें आहे आणि रत्नें व सोनें यांच्या योगानें उज्ज्वल, व सुंदर रचनांनीं जो विचित्र झाला आहे अशा रथावर बसलेल्या मयाच्या मागून सहस्रावधि ऊर्जित महारथ दैत्य चालले ४८. इति श्रीमहा. खि० हरि० भविष्य० वामनावतारांतील मयाच्या युद्धाभिगमनाविषयीं एकुणपन्नासावा अध्याय समाप्त झाला ॥ ४९ ॥

वैशंपायनः—पुलोमा या नांवाचा महादैत्य अंधकारासारखा घोर, खोल, उत्तम व पीडा न देणारा अशा रथावर बसला १. पर्वताच्या ढिगासारख्या, आंतून लोखंडी जाळ्या लावलेल्या व आपल्या मोठ्या नेमिघोषानें क्षुब्ध होणाऱ्या सागराप्रमाणें भासणाऱ्या रथावर तो बसला २. गदा, परिघ, खड्गें, तोमर, परशु, शक्ति व मुद्गर यांनीं व्याप्त असलेला तो पर्वत जलयुक्त मेघाप्रमाणें दिसत होता ३. त्या रथाला वायूप्रमाणें ज्यांचा वेग आहे असे एकसहस्र उंट जोडले होते. असो; अशा त्या रथावर आरूढ होऊन युद्धाविषयीं अति मत्त झालेला पुलोमा युद्धाकरितां निघाला ४. त्या महारथ पुलोमाच्या मागून तेजानें जणूं काय दीप्त असल्याप्रमाणें सूर्यतुल्य कांतीचे साठसहस्र दैत्य चालले ५ तापलेल्या सोन्याप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा मोठ्या शार्ङ्गध्वजानें रथामध्यें बसलेला तो पर्वतस्थ सूर्याप्रमाणें चमकत होता ६. अतिशय रमणीय सुवर्णाच्या पट्ट्यानें मढविलेली काळासारखी घोर लोखंडी गदा घेऊन तो शत्रूंमध्यें असलेला दैत्य पृथ्वीवर उभारलेल्या केतूप्रमाणेंच शोभला ७. बलाढ्य हयग्रीव राक्षस सहस्रावधि हयग्रीव ( ज्यांच्या माना घोड्यांच्या मानासारख्या आहेत

स्थितः ९ श्वेतशैलप्रतीकाशः श्वेतकुण्डलभूषणः । शुशुभे रथमध्यस्थः श्वेतशृंग इवाचलः १०
महता सप्तशीर्षेण शोभितो नागकेतुना । वैडूर्यमणिचित्रेण प्रवालांकुरशोभिना ११ अमितब-
लपराक्रमाकृतीनां वररथिनामनुजग्मुरूर्जितानाम् । असुरगणशताभिगच्छमानं त्रिदशगणा
इव वासवं प्रयान्तम् १२ प्रह्लादस्तु महाप्राज्ञः सर्वशास्त्रविशारदः । सर्वमायाधरः श्रीमान्यष्टा
क्रतुशतैरपि १३ समनह्यत तेजस्वी पावकार्चिसमप्रभः । रथानीकेन महता दुर्दिनांभोदना-
दिना १४ शूरेणामितवीर्येण हेमकुण्डलधारिणा । वृतो दैत्यसहस्रेण देवैरिव पितामहः १५
स्ववीर्यादग्रणीर्दृप्तो मत्तवारणविक्रमः । सुरसैन्यस्य सर्वस्य प्रतिक्षोभ इव स्थितः १६ स्ववी-
र्येणोदधेस्तुल्यः प्रदीप्ताग्निरिव ज्वलन् । तेजसा भास्कराकारः क्षमया पृथिवीसमः १७
तालध्वजेन दीप्तेन रथेनातिविराजता । तं यान्तमनुयान्ति स्म दानवाः शतसंघशः १८ सर्वे
हिरण्यकवचाः सर्वे रत्नविभूषिताः । दिव्यांगरागाभरणाः समरेष्वनिवर्तिनः १९ जांबूनद-
विचित्रांगा वैडूर्यविकृतांगदाः । दिव्यस्यन्दनमध्यस्थाः खस्था इव महाग्रहाः २० आचार-
वांश्चैव जितेन्द्रियश्च धर्मे रतः सत्यपरोऽनसूयः । स्थितः सतोयांबुदवायुकल्पो रूपी यथा
सर्वहरः कृतान्तः २१ शंबरस्तु महामायो रथयूथपयूथपः । आरुरोह रथं दिव्यं सर्वयुद्धवि-

---

अशा ) राक्षसांनीं परिवेष्टित झाला होता. तो सर्व रथ्यांतील उत्तम रथी होता ८. पर्व-
ताप्रमाणें ज्याचा आकार आहे, व जो शत्रूंच्या सैन्याचें मर्दन करीत असतो अशा भयं-
कर रथावर आरूढ होऊन तो युद्धाभिमुख निघाला ९. शुभ्र पर्वताप्रमाणें ज्याची कांति
आहे, श्वेत कुंडलें हींच ज्याचीं भूषणें आहेत, असा तो रथाच्या मध्यभागीं बसलेला
राक्षस श्वेत शृंगयुक्त पर्वताप्रमाणें दिसला १० ज्याला सात मस्तक आहेत अशा वैडूर्य-
मणीनें विचित्र केलेल्या व प्रवालांकुरांनीं सुशोभित झालेल्या मोठ्या नागकेतूनें तो
अतिशय शोभत होता ११. ज्यांचें बल, पराक्रम व आकार अमित आहे, असे ऊर्जित
असंख्य श्रेष्ठ रथी राक्षस अगोदरच शेंकडों असुरगण ज्याच्या मागून जात आहेत अशा
त्याच्या मागून, जात असलेल्या इंद्राच्या मागून जसे देवगण जातात, त्याप्र-
माणें गेले १२. महाबुद्धिमान्, सर्व शास्त्रविशारद, सर्व मायाधर, श्रीमान्, शेंकडों
यज्ञ करणारा, तेजस्वी व अग्नीच्या ज्वालेप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा
प्रल्हाद वर्षर्तूंतील मेघांप्रमाणें नाद करणाऱ्या मोठ्या रथांच्या सैन्यानें सज्ज झाला १३,१४.
देवांच्या योगानें जसा पितामह त्याप्रमाणें शूर, अमितवीर्यवान् व सुवर्णकुंडलें धारण
करणाऱ्या सहस्रावधि दैत्यांनीं तो परिवेष्टित झाला होता १५. स्ववीर्यानेंच अग्रणी झालेला,
दृप्त, मत्त गजाप्रमाणें पराक्रमी व सर्व देवसैन्याचा जणूंकाय साक्षात् क्षोभच असा तो
उभा होता १६. स्ववीर्यानें समुद्रासारखा असलेला तो प्रदीप्त अग्नीप्रमाणें जळत होता.
तो तेजानें भास्कराच्या आकाराचा व क्षमेनें पृथिवीसारखा होता १७. ज्याला तालध्वज
आहे अशा अतिशय शोभणाऱ्या दीप्त रथानें जाणाऱ्या त्याला दानव शेंकडों संघांनीं
अनुसरत होते १८. त्या सर्वांनीं सोन्याचीं कवचें घातलीं होतीं. सर्व रत्नांच्या योगानें
अतिशय भूषित होते. त्यांचा अंगराग व आभरणें दिव्य होतीं. ते समरामध्यें परत न
फिरणारे होते १९. सोन्याच्या योगानें त्यांचीं अंगें विचित्र झालीं होतीं. त्यांचीं बाहु-
भूषणें वैडूर्यरत्नांचीं केलेलीं होतीं. आकाशांतील महाग्रहांप्रमाणें ते दिव्य रथामध्यें स्थित
होते २०. आचारवान्, जितेंद्रिय, धर्मामध्यें रत, सत्यपरायण व असूया न करणारा

शारदः २२ लोहिताक्षो महाबाहुः प्रतप्तोत्तमकुण्डलः । जीमूतघनसंकाशो दिव्यस्रगनुलेपनः २३ विद्युज्ज्योतिर्निकाशेन मुकुटेनार्कवर्चसा । मणिरत्नविचित्रेण वैडूर्यवरशोभिना २४ तपनीयेन महता कवचेन विराजता । संध्याभ्रेणेव संच्छन्नः श्रीमानस्तशिलोच्चयः २५ त्रिंशच्छतसहस्राणि दैत्यानां चित्रयोधिनाम् । बलिनां कालकल्पानामन्वयुः शंबरं तदा २६ युक्तं हयसहस्रेण शुक्लवर्णेन राजता । क्रौंचध्वजेन दीप्तेन रथेनाहवशोभिना २७ व्यासक्तवैडूर्यसुवर्णजालं नानाविहंगैरपि भक्तिचित्रम् । विद्युत्प्रभं भीमरवं सुवेगं रथं समारुह्य रराज दैत्यः २८ [ ३९०५ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनप्रादुर्भावे शंबरादिदैत्यसन्नहनं नाम पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५० ॥

वैशंपायन उवाच ॥ अनुह्रादश्च तत्रैव दैत्यः परमदुर्जयः । हिरण्यकशिपोः पुत्रः प्रययौ युद्धलालसः १ चतुश्चक्रेण यानेन त्रिणल्वशतिमेन तु । युक्तेनाश्वैर्महावीर्यैः सिंहवक्त्रैरजिह्मगैः २ मेघगंभीरनादेन नेमिघोषेण वीर्यवान् । चालयन्वसुधां सर्वां सशैलवनकाननाम् ३ विनर्दमाना दैत्यौघा अनुह्रादं ययुः शुभाः । शतं शतसहस्राणां रथानां हेममालिनाम् ४ परिघैर्भिंदिपालैश्च भल्लैः पाशैः परश्वधैः । विविधायुधहस्तास्ते शूलमुद्गरपाणयः ५ सुवर्णजा-

---

असा तो प्ऱ्हाद साक्षात् सजल मेघयुक्त वायूप्रमाणें स्थित होता. तो त्यावेळीं सर्व हरण करणारा जणूंकाय कृतान्तच आहे असा भास झाला २१. असो; महामायावान् शंबर रथयूथपांचा यूथप होता. सर्व प्रकारच्या युद्धांत विशारद असलेला तो दिव्य रथावर आरूढ झाला २२. त्याचे नेत्र लाल व बाहु मोठे होते. त्याचीं कुंडलें तापविलेल्या सोन्यासारखीं उत्तम होतीं. त्याची अंगकांति मेघासारखी होती. दिव्य माळा व अनुलेपन त्यानें धारण केलें होतें २३ विजेच्या ज्योतीसारख्या अथवा सूर्यासारख्या तेजस्वी, मणि व रत्नें ह्यांनीं विचित्र व श्रेष्ठ वैडूर्यानें सुशोभित अशा मुकुटानें तो भूषित झाला होता २४. सोन्याच्या मोठ्या विराजमान होणाऱ्या कवचानें तो दैत्य संध्याकाळच्या अभ्रानें आच्छादित झालेल्या श्रीमान् अस्तपर्वताप्रमाणें दिसत होता २५. विचित्रयुद्ध करणारे तीस लक्ष कालासारखे बलाढ्य दैत्य त्यावेळीं शंबराच्या मागून चालले होते २६ त्याच्या रथाला सहस्र घोडे जोडले होते. तो शोभणाऱ्या विचित्र शुक्लवर्ण क्रौंचध्वजानें विराजमान होत होता, आणि अशा आहवशोभी रथानें तो चालला २७. ज्याला वैडूर्य व सुवर्णजाल लाविलें आहे, वरील नानाप्रकारच्या पक्ष्यांच्या रचनेनेंही जो विचित्र झाला आहे, ज्याची प्रभा विजेसारखी आहे, आवाज भयंकर आहे, व वेग उत्तम आहे अशा रथावर आरूढ होऊन तो दैत्य फार शोभला २८. इति श्रीम० खि० हरि० भवि० वामना० शंबरादि दैत्यांची तयारी याविषयीं पन्नासावा अध्याय समाप्त झाला ॥ ५० ॥

वैशंपायनः— अनुऱ्हाद नांवाचा हिरण्यकशिपूचा परम दुर्जय दैत्य युद्धाच्या लालसेनें तेथेंच गेला १. ज्याला चार चाकें आहेत, जो बाराशें हात लांब असलेल्या रथासारखाच आहे, ज्याला सिंहमुख व सरळ गमन करणारे महावीर्यवान् घोडे जोडले आहेत आणि ज्याच्या धावांचा ध्वनि मेघासारखा गंभीर आहे अशा रथानें पर्वत, वनें व उपवनें यांसह सर्व पृथ्वीला कांपवीत तो वीर्यवान् निघाला २,३. घोर ध्वनि करणारे दैत्यांचे शुभ ओघ अनुऱ्हादाच्या मागून चालले होते. सुवर्णमालायुक्त शेंकडोंच्या शेकडों

लनिर्मुक्तैर्वज्रैश्च समलंकृताः । रथैश्चित्रैश्च कवचैः सज्जमाना महासुराः ६ तदा विशालाच्छ्रितशैलरूप बभौ रथं कांचनचित्रितांगं । दैत्याधिपः सत्वबलानुरूपे समास्थितस्त्वप्रतिमेयरूपे ७ विरोचनश्च बलवान्वैश्वानरसमद्युतिः । महता रथवंशेन सर्वास्त्रकुशलः शुचिः ८ व्यूहानां विनियोगज्ञो ज्ञानविज्ञानतत्त्ववित् । बलेः पितासुरवरः सुराणामिव वासवः ९ सर्वायुधसमोपेतं किंकिणीजालभूषितम् । संयुक्तं वाजिमुख्यानां सहस्रेणाशुगामिनाम् १० रथमारुह्य दैत्येन्द्रो बभौ मेरुरिवापरः । किंकिणीजालपर्यन्तं गजेन्द्रध्वजशोभितम् ॥ सन्ध्याभ्रसमवर्णाभिः पताकाभिरलंकृतम् ११ प्रावालजांबूनदभक्तिचित्रं व्यालविमुक्ताफलशोभितम् । रथं समारुह्य किरीटमाली ययौ स युद्धाय महासुरेन्द्रः १२ विरोचनानुजश्चैव कुजंभो नाम दानवः । स्यन्दनैर्बहुसाहस्रैर्मणिकांचनभूषितैः १३ वृतो मदबलात्सिक्तैर्देवारिभिररिंदमः । प्रासपाशगदाहस्तैर्दानवैर्युद्धकांक्षिभिः १४ सपर्वतनिभाकारो भिन्नांजनचयप्रभः । महता भ्राजमानेन किरीटेन सुवर्चसा १ सर्वरत्नविचित्रेण कवचेन च संवृतः । महता दीप्तवपुषा रथेनेन्दुरिवांशुमान् १६ शातकौंभेन महता तालवृक्षेण केतुना । रराज रथमध्यस्थो मेरुस्थ इव भास्करः १७ रणपटुरतिवीर्यसत्वबुद्धिः सुरसमराभिमुखः प्रयातितूर्णम् ।

---

रथ त्याच्या मागें जात होते ४ परिघ, गोफणी, भाले, पाश, कुऱ्हाडी, शूल, मुद्गर व ज्यांच्या हातांत अशींच नानाप्रकारचीं आयुधें आहेत असे राक्षस त्याच्या मागून चालले. ते महा असुर सोन्याचीं जाळीं व वज्रमणी यांनीं भूषित होते. रथ व विचित्र कवचें यांनीं सज्ज झाले होते ५,६. त्यावेळीं विशाल व उंच पर्वतासारख्या, ज्याचें अंग सुवर्णानें चित्रविलें आहे, सत्त्वबलानुरूप व अप्रतिमेयस्वरूप अशा रथावर बसलेला तो दैत्याधिप अतिशय शोभला ७. असो; बलवान विरोचन मोठ्या रथवंशानें निघाला. त्याची कांति अग्नीसारखी होती. तो सर्व अस्त्रांमध्यें कुशल व पवित्र होता ८. व्यूहांचा विनियोग जाणणारा आणि शास्त्रीयज्ञान व अनुभवज्ञान यांचें तत्त्व ओळखणारा असा तो असुरश्रेष्ठ बलीचा पिता देवांतील इंद्राप्रमाणें मान्य होता ९. तो दैत्येन्द्र सर्व आयुधांनीं युक्त, क्षुद्र घंटांच्या समूहानें भूषित, सत्वर गमन करणाऱ्या मुख्य सहस्र घोड्यांनीं युक्त अशा रथावर बसून साक्षात् दुसऱ्या मेरूप्रमाणेंच शोभला. ज्याच्या चारी बाजूस क्षुद्र घंटांचा समूह लाविला आहे, जो गजेंद्राच्या ध्वजानें सुशोभित झाला आहे, जो संध्याकाळच्या अभ्रासारख्या रंगाच्या पताकांनीं अलंकृत झाला आहे, प्रवाल व सोनें यांच्या योगानें ज्याच्यावर वेलबुट्टी काढली आहे, लोंबणाऱ्या मोत्यांनीं जो अतिशय सुशोभित झाला आहे, अशा रथावर बसून तो किरीटमाली महा असुरेंद्र युद्धास निघाला १०–१२. विरोचनाचा धाकटा भाऊ शत्रुनाशक कुजंभ नांवाचा दानव मणि व सोनें यांनीं भूषित झालेल्या अनेक सहस्र रथांनीं व मदबलानें गर्वित झालेल्या देवशत्रूंनीं परिवेष्टित झाला होता. त्याला वेढणाऱ्या दानवांच्या हातांत प्रास, पाश व गदा होत्या व ते सर्व युद्धाची आकांक्षा करीत होते १३.१४. पर्वताप्रमाणें ज्याचा आकार आहे असा तो काळजाच्या गोळीच्या मध्यभागाप्रमाणें दिसत होता. मोठ्या, चमकणाऱ्या, तेजस्वी मुकुटानें आणि सर्व रत्नांनीं विचित्र झालेल्या कवचानें तो आवृत झाला होता. किरणवान् चंद्राप्रमाणें मोठ्या दीप्त आकाराच्या रथानें तो युक्त होता १५,१६. सोन्याच्या मोठ्या तालवृक्षा-

असुरगणसमावृतः कुजंभस्त्रिदशगणैरिव वृत्रहाऽमरेन्द्रः १८ असिलोमा च तत्रैव
दानवः पर्वतायुधः । दारुणं वपुरास्थाय दारुणो दारुणाननः १९ रौद्रः शकटचक्राक्षो महा-
कायो महाबलः । कृष्णवासा महादंष्ट्रः किरीटी लोहिताननः २० वृतो दैत्यसहस्रैर्यो गिरि-
पादपयोधिभिः । नानारूपधरैर्दृप्तैर्दैत्यैस्त्रिदशशत्रुभिः २१ ते शूलहस्ता गगनं चरन्त इतस्त-
तस्तोयदवृन्दतुल्याः । खं छादयन्तस्तपनीयनिष्का यथोन्नताः प्रावृषि कालमेघाः २२ अना-
युषायाः पुत्रस्तु वृत्रो नाम महासुरः । देवशत्रुर्महाकायस्ताम्रास्यो निर्णतोदरः २३ दीप्त-
जिह्वो हरिश्मश्रुरूर्ध्वरोमा महाहनुः । नीलांगो लोहितमुखः किरीटी लोहितांबरः २४
आजानुबाहुर्विकृतः श्वेतदंष्ट्रो विभीषणः । महामायाधरो भीमो हेमकेयूरभूषणः २५
महता मणिचित्रेण कवचेन तु संवृतः । हेममालाधरो रौद्रश्चक्रकेतुरमर्षणः २६ किंकिणी-
शतसंघुष्टं तपनीयविभूषितम् । युक्तं हयसहस्रेण रक्तध्वजपताकिनम् २७ रथानीकेन महता
युद्धायाभिमुखो ययौ । दिव्यं स्यंदनमास्थाय दैत्यानां नन्दिवर्धनः १८ तपितकनकबिन्दु-
पिंगलाक्षो दितितनयोऽसुरसैन्ययुद्धनेता । विकसितकमलाभचारुचक्षुः सितदशनः शुशुभे

---

केतूनें रथामध्यें बसलेला तो मेरुपर्वतस्थ भास्कराप्रमाणें शोभला १७. सारांश, देवांनीं आवृत झालेल्या वृत्रनाश देवेंद्राप्रमाणें असुरगणांनीं समावृत झालेला तो रणपटु, अतिवीर्य सत्त्वबुद्धि कुजंभ सत्वर देवसमराभिमुख निघाला १८. पर्वत हींच ज्याचीं आयुधें आहेत, ज्याचें मुख दारुण आहे व जो स्वभावतः दारुण आहे असा असिलोमा दानव दारुण शरीर धारण करून युद्धास निघाला. तो रौद्र, गाड्याच्या चाकाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत असा, महाकाय, महाबल, काळें वस्त्र नेसलेला, महादंष्ट्रावान्, क्रिरीटवान्, ज्याचें तोंड लाल आहे असा १९.२०, तो दैत्य पर्वत व वृक्ष यांच्या योगानें युद्ध करणाऱ्या हजारों राक्षसांकडून परिवेष्टित होता. त्यास वेढणारे राक्षस नानारूपें धारण करणारे, दृप्त व देवांचे कट्टे शत्रू होते २१. ते हातांत शूल घेऊन मेघवृंदाप्रमाणें आकाशास आच्छादित करीत आकाशांतून इतस्ततः फिरूं लागले. ज्यांनीं आपल्या अंगावर सोन्याचीं पदकें धारण केलीं आहेत असे ते पावसाळ्यांतील कालमेघांप्रमाणें उंच होते २२. असो; अनायुषेचा पुत्र वृत्र या नांवाचा महा असुर होता. तो देवांचा मोठा शत्रु, अति धिप्पाड, ज्याचें तोंड लाल आहे व उदर लोंबणारें आहे २३ जिव्हा दीप्त आहे, श्मश्रु हिरव्या वर्णाची आहे, केंस वर उचललेले आहेत, हनुवटी मोठी आहे, अंग नीलवर्ण आहे, तोंड लाल आहे. ज्यानें किरीट घातला आहे. लाल वस्त्र नेसलें आहे २४, जो अजानुबाहु आहे, ज्याचें स्वरूप विक्राळ आहे, दंष्ट्रा श्वेतवर्ण आहेत, जो भयभीत करणारा आहे, महामाया धारण करणारा आहे. भयंकर आहे, सोन्याचीं बाहुभूषणें घालून जो भूषित झाला आहे, मोठ्या रत्नांनीं विचित्र झालेल्या कवचानें जो आवृत झाला आहे, ज्यानें सोन्याची माळा धारण केली आहे, ज्याचा चक्राचा भयंकर केतु आहे, व जो महाक्रोधी आहे असा वृत्रासुर युद्धास निघाला. २५,२६. शेंकडों क्षुद्र घंटांचा नाद करणाऱ्या, सोन्यानें विभूषित केलेल्या, सहस्र घोडे जोडलेल्या आणि रक्तध्वज व पताका यांनीं युक्त असलेल्या अशा दिव्य रथावर आरूढ होऊन दैत्यांचा आनंद वाढविणारा तो मोठ्या रथसैन्यानें युक्त होऊन युद्धास निघाला २७, २८. तापविलेल्या सोन्याच्या बिंदूप्रमाणें ज्याचे नेत्र पिंगट आहेत, विकसित कमलाप्रमाणें रम्य नेत्र आहेत व दांत शुभ्र आहेत

२०

रथाननस्थः २. एकचक्रस्तु तत्रैव सूर्यचक्र इवोदितः । कालचक्रसमो रौद्रश्चक्रायुध इवोद्यतः । सर्वायसमयं दिव्यं रथमास्थाय भासुरम् ३० वृतो दैत्यगणैर्दृप्तैः कालायसशिलायुधैः । तस्याशीतिसहस्राणि रथिनां चित्रयोधिनाम् ३१ सर्वे कालान्तकप्रख्या रुधिराक्षा महाबलाः । आयसैः कांचनैश्चैव सन्नद्धा वरवर्णिनः ३२ विराजतान्तरिक्षस्था नीला इव पयोधराः । सर्वे कालान्तकप्रख्या धीराः समरदुर्जयाः ३३ सागरोदरगंभीरा नीलवक्त्रा दुरासदाः । रेजुर्यांतोऽसुरवरा वेलातीता इवार्णवाः ३४ ते भीममायाः सुसमृद्धकायाः किरीटिनः कांचनभूषितांगाः । ययुस्तदा स्वायुधदीप्तहस्ता नभः सपक्षा इव पर्वतेन्द्राः ३५ संदिष्टो बलिपुत्रेण वृत्रभ्राता महासुरः । वधाय सुरसैन्यस्य संनह्यस्वेति वीर्यवान् ३६ हेमताली महादंष्ट्रः स्रग्वी रुचिरकुंडलः । रक्तमाल्यांबरधरश्चण्डः समरदुर्जयः ३७ सुमहावृत्तनयनः सकिरीटी धनुर्धरः । प्रभिन्न इव मातंगः शार्दूलसमविक्रमः ३८ महातालनिभं चापं तथा रुचिरसायकम् । विस्फारयन्महावेगं वज्रनिष्पेषनिःस्वनम् ३९ रथेन खरयुक्तेन ध्वजेन भुजगेन ह । शुशुभे स्यंदनस्थः स संध्यागत इवांशुमान् ४० रथैस्तु बहुसाहस्रैर्हेमपट्टविभूषितैः । कूटमुद्गरसंपूर्णैर्जलपूर्णैरिवांबुदैः । स दैत्येन्द्रोऽभिचक्राम तस्मिन्युद्ध

---

असा तो असुरसैन्याला युद्धांत नेणारा दितिपुत्र रथावर बसला असतां फार शोभूं लागला २९. सूर्यचक्राप्रमाणें उदय पावलेला एकचक्र राक्षस कालचक्रासारखा भयंकर व चक्रायुध हरीसारखा उद्युक्त होता. तो तेथेंच सर्व पोलादी भासुर दिव्य रथावर बसून लोखंड व शिला हींच ज्यांचीं आयुधें आहेत अशा दृप्त दैत्यगणांनीं आवृत होत्साता निघाला. त्याच्याबरोबर चित्रयुद्ध करणारे ऐंशी सहस्र रथी होते ३०,३१. ते सर्व कालान्तकासारखे, रक्तनेत्र व महाबल होते. सर्व उत्तम वरांची इच्छा करणारे ते लोखंडी व सोन्याच्या कवचादिकांनीं सज्ज झाले होते ३२. अंतरिक्षामध्यें स्थित असलेले ते सर्व नीलमेघांसारखे दिसत होते. ते सर्व कालांतका सारखे दिसणारे, बुद्धिमान् व युद्धामध्यें दुर्जय होते ३३. ते सागराच्या उदराप्रमाणें गंभीर, नीलमुख व दुर्धर्ष असुरश्रेष्ठ जात असतांना वेलेचें उल्लंघन केलेल्या सागराप्रमाणें शोभले ३४. ज्यांची माया भयंकर आहे, शरीरें अति समृद्ध आहेत, जे किरीटवान् आहेत, सुवर्णानें ज्यांचीं अंगें भूषित आहेत, आयुधांनीं ज्यांचे हात दीप्त आहेत, असे पंखयुक्त पर्वताप्रमाणें आकाशांत चालले ३५. बलीच्या पुत्रानें वीर्यवान् महा असुर वृत्र भ्रात्यास देवसैन्याचा वध करावयास तयार हो, अशी आज्ञा केली ३६. हेमताली असें त्याचें नांव होतें. त्याच्या दंष्ट्रा मोठ्या होत्या; त्याच्या गळ्यांत पुष्पमाळा होत्या, कानांत सुंदर कुंडलें होतीं. लाल पुष्पें व वस्त्रें यांस तो धारण करीत होता, तो अति चंड व समरांत दुर्जय होता ३७. त्याचे नेत्र फार मोठे व गरगरीत होते. त्याच्या डोक्यावर किरीट होता. त्यानें हातांत धनुष्य धारण केलें होतें. तो गंडस्थलांवरून मदस्राव होत असलेला जणुं मातंगच होता. त्याचा पराक्रम सिंहासारखा होता ३८. मोठ्या ताडवृक्षाएवढ्या महावेगवान् धनुष्यावर गुण चढवून व त्याला सुंदर बाण जोडून वज्राच्या घर्षणाप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे अशा त्याला आकर्ण ओढीत ३९, ज्याच्यावर सर्पाचा ध्वज आहे व ज्याला गाढव जोडले आहेत अशा रथानें तो रथस्थ जाऊं लागला असतां संध्यागत सूर्याप्रमाणें शोभला ४०. असो तें युद्ध उपस्थित झालें असतां, तो दैत्येंद्र, जलपूर्ण मेघासारख्याच हेम पट्ट विभूषित, अनेक सहस्र व कूट

उपस्थितं ४१ पवनसमगतिर्विशालवक्षा विकसितपंकजचारुगर्भगौरः । प्रवररथगतो ययौ स तूर्णं त्रिदशगणैरभिलक्षितप्रभावः ४२ सिंहिकातनयश्चैव राहुर्नाम महासुरः । विकटः पर्वताकारः शतशीर्षः शतोदरः ४३ पीतमाल्यांबरधरो जांबूनदविभूषितः स्निग्धवैडूर्यसंकाशः पद्मपत्रनिभेक्षणः ४४ सर्वकांचनसंयुक्तं मणिजालपरिष्कृतम् । पताकाशतसंकीर्णं युक्तं परमवाजिभिः ४५ आरुरोह रथं दिव्यं दैत्यः परमवीर्यवान् । ननाद च महानादं कंपयन्वसुधातलम् ४६ मयेन विहितो दिव्यस्तस्य केतुर्हिरण्मयः । मयूरपक्षसंकाशं कवचं चायसं महत् ४७ भीमवेगरवैश्चान्यैरथैर्दिव्यैः सुभास्वरैः । नानाप्रहरणाकीर्णैः सेव्यमानो महाबलः ४८ असुरगणपतिर्गजेन्द्रगामी अतिरभसगतिर्महासुराणाम् । अरिगणमभितो विभुः प्रयातो गिरिवरमस्तमिवांशुमान्प्रदीप्तः ४९ विप्रचित्तिस्तु तत्रैव दनोर्वंशविवर्धनः । कश्यपस्यात्मजः श्रीमान् ब्रह्मणस्तेजसा समः ५० यष्टा क्रतुसहस्राणां वेदवित्तपसान्वितः । स्वयंभुवा दत्तवरो वरदश्च स्वयंभुवः । ईशित्वं च वशित्वं च प्राकाश्यं च महाद्युतेः ५१ ऐश्वर्यगुणसंपन्नो ब्रह्मेव स्वयमूर्जितः । सार्धं पुत्रैश्च पौत्रैश्च संनद्धत महाबलः ५२ सर्वे मायाधराः शूराः कृतास्त्रा रणदुर्जयाः । सर्वे कमलवर्णाभा हेमकूटोच्छ्रयोच्छ्रयाः ५३ सर्वे रजतसंकाशाः कैलासशिखरोपमाः । मयेन निर्मितास्तेषां सर्वे मायामया रथाः ५४ विच-

---

मुद्गरांनीं परिपूर्ण अशा रथांनीं परिवेष्टित होऊन जाऊं लागला ४१. सारांश वायुप्रमाणें ज्याची गति आहे, ज्याचें वक्षःस्थल विशाल आहे, प्रफुल्लित कमलाच्या सुंदर गाभ्याप्रमाणें जो गौरवर्ण आहे, व ज्याचा प्रभाव देवांकडून अभिलक्षित आहे, असा तो सर्वोत्तम रथावर बसून गेला ४२. सिंहिकातनय राहु या नांवाचा महाअसुर अति विकट, पर्वताकार, शंभर मस्तकांनीं भूषित, शतोदर ४३, पिवळ्या माळा व वस्त्रें धारण करणारा, सोन्याच्या भूषणांनीं भूषित झालेला, स्निग्ध वैडूर्याप्रमाणें शोभणारा व ज्याचे नेत्र कमलपत्रासारखे आहेत असा ४४ असून तो परम वीर्यवान् दैत्य सर्व सुवर्णमय, रत्नसमूहानें भूषित, शेंकडों पताकांनीं व्याप्त, व ज्यास उत्कृष्ट घोडे जोडले आहेत अशा दिव्य रथावर आरूढ झाला, व त्यानें भूतलास कांपवीत महानाद केला ४५, ४६. त्याच्या रथाचा दिव्य सुवर्णमय केतु मयासुरानें केला होता. मोराच्या पिसासारखें त्याचें लोखंडी मोठें कवच होतें. तो महाबलवान् दुसऱ्या दिव्य, अति भासुर, भयंकर वेग, व ध्वनि यांनीं युक्त आणि नानाप्रहरणांनीं व्याप्त अशा असंख्य रथांनीं सेविला जात होता ४७,४८. सारांश गजेंद्रावरून गमन करणारा व महाअसुरांमध्यें सर्वापेक्षां अति वेगानें जाणारा तो असुरगणांचा स्वामी, अतिदीप्त व विभु सूर्य श्रेष्ठ अस्ताचलास जसा जातो त्याप्रमाणें, शत्रुसमूहाच्या सन्मुख गेला ४९. तेथेंच दनूच्या वंशाची वृद्धि करणारा, कश्यपाचा श्रीमान् पुत्र, तेजानें ब्रह्मदेवासारखा ५०, सहस्रावधि यज्ञांचें यजन करणारा; स्वयंभूनें ज्यास वर दिला आहे व जो स्वतः स्वयंभूचा वरद आहे असा विप्रचित्ति होता. त्या महातेजस्वी दैत्यापाशीं ईशित्व, वशित्व व प्राकाश्य या सिद्धि होत्या ५१. ऐश्वर्यगुणांनीं संपन्न असलेला तो स्वतः ब्रह्मदेवासारखा ऊर्जित होता. तो महाबलवान् पुत्र व पौत्र यासह सज्ज झाला ५२. ते सर्व जण मायेला धारण करणारे, शूर, अस्त्रज्ञ, रणांत दुर्जय, सर्व कमलवर्णासारखे तेजस्वी व हेमकूटाच्या उंची इतके उंच होते ५३. मयानें निर्मिलेले त्यांचे सर्व रथ मायामय होतें. ते सर्व रुप्या-

रन्तो भ्राजन्त शारदा इव तोयदाः । सर्वे हंसध्वजाः श्वेताः श्वेतदण्डसमुच्छ्रयाः ५५
श्वेताम्बरधरा दैत्याः श्वेतमाल्यविभूषिताः । श्वेतातपत्राः सर्वे ते श्वेतकुण्डलमण्डिताः ५६
मुक्ताहारवृतोरस्का भान्ति नाकेश्वरा इव । महाग्रहनिभाकाराः शत्रूणां लोमहर्षणाः ५७
रक्तचित्रांबरधराश्चित्राभरणभूषिताः । त्रैलोक्यविजयं नाम रथमास्थाय वीर्यवान् ५८
कैलासशिखराकारमष्टनल्वायतान्तरम् । युक्तं वाजिसहस्रेण सितेन शिववर्चसा ॥ पताका-
शतसंच्छन्नं नानायुधविकल्पितम् ५९ हिमांशुकुंदप्रतिमं विशालं सितातपत्रं दनुजेश्वरस्य ।
विभाति तस्योपरिधार्यमाणं श्वेताद्रिमूर्धोपगतः शशांकः ६० केशी दानवमुख्यस्तु जिह्मता-
म्राक्षदर्शनः । नीलमेघचयप्रख्यः कालः पुरुषविग्रहः ६१ महाग्रहनिभाकारः शत्रूणां लोमह-
र्षणः । चित्रमाल्यांबरधरो रक्ताभरणभूषितः ६२ शताक्षः शतबाहुश्च हरिश्मश्रुर्महाबलः ।
शंकुकर्णो महानादो वपुषा घोरदर्शनः ६३ युक्तं महिषकैर्दिव्यैर्घंटाकोटिकृतस्वनम् । महा-
वारिधराकारमास्थाय रथमुत्तमम् ६४ ध्वजेनोष्ट्रेण महता नीलकेसरवर्चसा । नानारागवि-
चित्राभिः पताकाभिर्विभूषितम् ६५ द्विपंचाशत्सहस्राणि रथानामुग्रवर्चसाम् । ययुस्तस्या-

---

सारखे पांढरे व ह्मणूनच कैलास शिखरांचीच ज्यांना उपमा आहे, असे होते ५४. ते जाऊं लागले असतां शरत्कालच्या मेघांप्रमाणें शोभत होते. ते सर्व रथ शुभ्र होते. त्यांचे ध्वज हंसयुक्त होते. ते श्वेत दंडांवर उंच उभारले ५५. ते सर्व दैत्य श्वेत वस्त्रें नसले होते. शुभ्र माळांनीं अतिशय भूषित झाले होते. त्या सर्वांचीं छत्रें शुभ्र होतीं. ते सर्व शुभ्र कुंडलांनीं मंडित झाले होते ५६. त्यांचीं उरःस्थळें मोत्यांच्या हारांनीं आच्छादित झालीं होतीं. ते स्वर्गेश्वरांप्रमाणें दिसत होते. त्यांचे आकार महा नक्रांसारखे होते. शत्रूंच्या अंगांवर ते कांटा उभा करीत असत ५७. त्यांतील कित्येक लाल व चित्र वस्त्रें धारण करीत होते, चित्र—विचित्र भूषणांनीं भूषित झाले होते. असो, अशा प्रकारच्या त्या अनेक पुत्रपौत्रांसह तो वीर्यवान् विप्रचित्ति कैलासशिखराकार, आठनल्व विस्तीर्ण, सहस्रावधि घोड्यांनीं युक्त व शुभ्र कल्याणकर तेजानें संपन्न अशा त्रैलोक्यविजय नामक रथावर बसून युद्ध करावयास निघाला. त्याचा रथ शेंकडों पताकांनीं आच्छादित केलेला होता. नाना आयुधांची योजना त्यांत केली होती ५८,५९. चंद्र व कुंद पुष्पें यासारखा तो शुभ्रवर्ण होता. त्या दनुजेश्वराचें शुभ्र छत्र विशाल होतें. त्याच्या मस्तकावर धारण केलें जाणारें तें हिमालय पर्वताच्या शिखरावर आलेल्या चंद्राप्रमाणें दिसत होतें ६०. दानवश्रेष्ठ केशी शत्रूवर निघाला. त्याचे नेत्र वक्र व ताम्रवर्ण होते. नीलमेघसमूहाप्रमाणें काळा, कठोर शरीराचा ६१, मोठ्या मकरासारखा थिप्पाड व घोर, शत्रूंना भयभीत करणारा, विचित्र माळा व वस्त्रें धारण करणारा, लाल आभरणांनीं भूषित ६२, ज्याला शंभर नेत्र, शंभर बाहू व हिरवी श्मश्रु आहे, ज्या महाबलाढ्याचे कान शंकूच्या आकाराचे आहेत, ज्याचा नाद फार मोठा आहे, शरीराच्या योगानें ज्याचें दर्शन घोर आहे, असा तो केशी दैत्य दिव्य रेडे जोडलेल्या, कोटि घंटांचा ध्वनि ज्याच्यावर होत आहे अशा व मोठ्या मेघाकार उत्तम रथावर आरूढ होऊन निघाला ६३,६४. निळ्या केसरांप्रमाणें ज्याची कांति आहे, अशा मोठ्या उंटाच्या ध्वजानें तो रथ शोभत होता. नानारंगांनीं विचित्र झालेल्या पताकांनीं तो विभूषित झाला होता. देवावर चाल करून जात असलेल्या त्या असुरेंद्राच्या मागून बावन्न हजार

सुरेन्द्रस्य प्रयातस्य सुरान्प्रति ६६ भान्ति भिन्नांजननिभाः प्रयातस्य महात्मनः । दंष्ट्रार्द्धचन्द्रवदनाः सबलाका इवांबुदाः ६७ ततस्यवैडूर्यसुवर्णचित्रं विद्युत्प्रभं भास्कररश्मितुल्यम्। किरीटमाभात्यसुरोत्तमस्य दावाग्निदीप्तं शिखरं यथाद्रेः ६८ वृषपर्वासुरश्चैव श्रीमांश्च सुरसूदनः । आरुरोह रथं दिव्यं मेरुशृंगमिवांशुमान् ६९ प्रवालजांबूनदचित्रकूबरं महारथं भारसहं महार्हम् । स्वलंकृतं राजतहेमकुण्डलं गभस्तिनक्षत्रतडिन्निकाशम् ७० केयूरयुक्तांगदनद्धबाहुः सहस्रतारेण च वर्मणा सः । सांग्रामिकैराभरणैश्च चित्रैर्मध्याह्नसूर्यप्रतिमो बभूव ७१ महाबलो बद्धतलांगुलित्रो बलोत्कटः किंशुकलोहिताक्षः । प्रगृह्य चामीकरचारुचित्रं चापं स्थितो वृत्तविशालनेत्रः ७२ महासुरेन्द्रश्च महासुरैर्वृतो बलिस्तदा स्यन्दनमारुरोह । वैडूर्यहेमोपचितं विशालं विद्युत्प्रभं षोडशनल्वमात्रम् ७३ युक्तं सहस्रेण दितेः सुतानां गजाननानां विकृताकृतीनाम् । चामीकरोरःस्थलभूषितानां प्रनर्दतां प्रावृषि चांबुदानाम् ७४ महारथं देवरथप्रकाशं सहस्रमायेन मयेन सृष्टम् । ईहामृगाक्रीडितभक्तिचित्रं दिव्यं रथं दिव्यरथानुयातम् ७५ सकिंकिणीकं विमलं सुविस्तृतं हिरण्मयैः पद्मशतैरलंकृतम् । अभ्याददे वैजयिकीं जयाय स्रजं बलिर्हैमविचित्रपुष्पाम् ७६ आमुच्यमालां प्रभया

---

उग्र तेजस्वी रथ चालले. युद्धाकरितां निघालेल्या त्या महात्म्याच्या मागून जाणारे, खललेल्या काजळासारखे काळे व ज्यांच्या मुखांत दंष्ट्रारूपी अर्धचंद्र आहेत. असे त्या रथांवर आरूढ झालेले दैत्य बलाकायुक्त मेघांसारखे दिसले ६७. त्या श्रेष्ठ असुराचा वैडूर्यमणि व सोनें यांनीं विचित्र झालेला, विजेप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा व सूर्याच्या किरणांसारखा, मुकुट दावाग्नीनें पेटलेल्या पर्वताच्या शिखराप्रमाणें दिसला ६८. देवांचे मर्दन करणारा व श्रीमान् वृषपर्वा असुर, मेरूच्या शिखरावर जसा सूर्य त्याप्रमाणें दिव्य रथावर आरूढ झाला ६९. प्रवाल व सोनें यांनीं ज्याची दांडी विचित्र केली आहे, अशा भार सहन करणाऱ्या व महामूल्यावान्. महारथावर तो आरूढ झाला. त्याचें उत्तमप्रकारें अलंकृत केलेलें सोन्या-रुप्याचें कुंडल किरण, नक्षत्रें व वीज याप्रमाणें चमकत होतें ७०. केयूरयुक्त अंगदांनीं त्याचे बाहू आच्छादित झाले होते. सहस्र नक्षत्राकार ठिपक्याचें कवच त्यानें अंगांत घातलें होतें. तो विचित्र संग्राम संबंधीं आभरणांनीं मध्यान्ह काळच्या सूर्याप्रमाणें दिसत होता ७१. तो महाबल होता. त्यानें तलांगुलित्राण बांधलें होतें. तो बलानें उत्कट झाला होता. पलाशपुष्पाप्रमाणें त्याचे नेत्र लाल होते. ज्याचे नेत्र वाटोळे व विशाल आहेत असा तो राक्षस सोन्यानें सुंदर व विचित्र केलेलें धनुष्य घेऊन रणांगणांत उभा राहिला ७२. त्यावेळीं महा असुरांनीं आवृत झालेला महा असुरेंद्र बलि वैडूर्य व सुवर्ण यांनीं युक्त, विशाल, विद्युत्तुल्य तेजस्वी, सोळा नल्व प्रमाण, गजमुख, विक्राळाकार सोन्यानें ज्यांचीं उरःस्थळें भूषित झालीं आहेत व वर्षर्तूतील मेघांप्रमाणें जे भयंकर आक्रोश करीत आहेत अशा हजारों दिति पुत्रांनीं युक्त अशा महारथावर बसून निघाला ७३,७४. तो रथ देवांच्या रथासारखा दिसत होता. ज्याच्यापाशीं हजारों माया आहेत अशा मयानें त्याला निर्माण केलें होतें. त्याच्यावर कृत्रिम हरणांच्या क्रीडेची रचना करून त्याला चित्रविचित्र करून सोडलें होतें. त्या दिव्य रथाच्या मागून दुसरे अनेक दिव्य रथ येत होते ७५. त्याच्यावर क्षुद्र घंटा लाविल्या होत्या. तो अतिशय निर्मल, अति विस्तृत, हिरण्मय व शेंकडों कमलांनीं अलंकृत केलेला होता. बलीनें सुवर्णाच्या

विचित्रां बलिस्तदाभाति भुजैर्विशालैः । रराज तैः सर्वसमृद्धियुक्तैर्महार्चिषा सूर्य इवांबरस्थः ७७ स्रजं तदा बध्याति चास्य दुर्गा सर्वासुराणामिव हारभूताम् । वैरोचनिः सर्वश्रियाभिजुष्टो विभ्राजतेऽसौ शरदीव चंद्रः ७८ मेरोस्तटैर्वा ज्वलनप्रकाशैरादित्यसंयुक्तमिवाभ्रजालं । प्रासाश्च पाशाश्च हिरण्यबद्धा वर्माणि खड्गाश्च परश्वधाश्च ७९ धनूंषि वज्रायुधसप्रभाणि दिव्या गदा वज्रमुखाश्च शक्तयः । दिव्याश्च खड्गास्त्रिशिखाश्च दीप्ता नाराचपूर्णा विविधाश्च तूणाः ८० धृता रथे दैत्यवृषस्य तस्य चकाशिरे प्रज्वलिता यथोल्काः । ते चामरापीडधराः सुदंष्ट्राः सुवर्णमुक्तामणिहेमचित्राः ८१ वीज्यन्ति बालव्यजनैर्विनीताः महासुराः स्यन्दनवेदिकास्थाः । अयःशिरा अश्वशिरा दुरापः शिबिर्मतंगो विशिराः शताक्षः ८२ अयोनिकुंभः क्रथनश्च दानवो ररक्षिरे ते दश दानवाधिपम् । पुरश्चराश्चैव सहस्रशोऽसुराः पदातयो दानवराजरक्षिणः ८३ शतघ्निचक्राशनिशक्तिपाणय. प्रजग्मुरग्रेऽनिलतुल्यवेगिनः । घंटाः सुशब्दास्तपनीयबद्धा आडंबरा गर्गरडिंडिमाश्च ८४ महारवा दुन्दुभयश्च नेदू रथप्रयाणे दितिजेश्वरस्य । तस्योच्छ्रितः कांचनवेदिकाढ्यो हिरण्मयो दिव्यमहापताकः ८५ महाध्वजो वै तपनीयनद्धो रराज वीरस्य यथा विवस्वान् । समुच्छ्रितं कांचनमातपत्रं स्रक्कांचनी वक्षसि चास्य भाति ८६ समततश्चाप्यसुराश्चरन्ति दैत्य-

---

विचित्र पुष्पांची विजय देणारी माला आपल्या गळ्यांत घातली ७६. प्रभेनें विचित्र झालेली माला कंठांत घालून बलिदैत्य त्यावेळीं त्या सर्व समृद्धियुक्त विशाल भुजांनीं, महाकिरण ज्योतींनीं आकाशस्थ सूर्याप्रमाणें शोभला ७७. सर्व असुरांच्या हाराप्रमाणेंच असलेली ती माळ त्यावेळीं दुर्गेनेंच त्याच्या गळ्यांत घातली. त्यामुळें सर्व प्रकारच्या शोभा दासींप्रमाणें ज्याची सेवा करीत आहेत असा तो विरोचन पुत्र शरत्कालीन चंद्राप्रमाणें शोभला ७८. अथवा अग्नीच्या योगानें दीप्त झालेल्या मेरुच्या तटांनीं सूर्याशीं संयुक्त झालेलें अभ्रजाल जसें दिसावें तसा तो भासला. प्रास, पाश, ज्यांना सोन्याच्या मुठी आहेत अशीं खड्गें, कवचें, परशु, इंद्रधनुष्यांसारखीं दिसणारीं धनुष्यें, दिव्य गदा, ज्यांच्या तोंडांत वज्रें बसविलीं आहेत अशा शक्ति, दिव्य तरवारी, दीप्त बाण व नानाप्रकारचे भरलेले भाते त्या दैत्यश्रेष्ठाच्या रथावर ठेवलेले होते, ते प्रज्वलित उल्कांप्रमाणें चमकत राहिले. चामरें व मस्तकांवरील आडव्या माळा यांस धारण करणारे, ज्यांच्या दाढा चांगल्या आहेत, जे सुवर्ण, मोत्यें, व रत्नें यांनीं विचित्र झाले आहेत असें रथाच्या वेदींवर उभे राहिलेले व शिक्षित असुरश्रेष्ठ त्या आपल्या राजावर चवऱ्या वारीत होते. अयःशिरा, अश्वशिरा, दुराप, शिबि, मतंग, विशिरा, शताक्ष ७९-८२ अयोनिकुंभ, क्रथन व दानव हे दहा राक्षस त्या दानवाधिपांचे रक्षण करीत होते. पायानें पुढें जाणारे दुसरे सहस्र वधि असुर त्या दानवांच्या राजाचे रक्षक होते ८३. शतघ्नि, चक्रें, अशनि, व शक्ति यांस हातांत धारण करणारे व वायूसारखा ज्यांचा वेग आहे असे दानव त्याच्या अग्रभागीं जात होते. चांगला शब्द करणाऱ्या घंटा, सोन्यानें मढविलेले आडंबर, गर्गर डिंडिम व मोठा ध्वनि करणारे नगारे त्या दितिजेश्वराच्या प्रयाणसमयीं वाजूं लागले. त्या वीराचा फार उंच, सुवर्णवेदीनें संपन्न, हिरण्मय, ज्याला दिव्य महापताका आहेत, जो सोन्यानें मढविलेला आहे, असा महाध्वज सूर्यासारखा शोभला. ज्याला सोन्याचा दांडा आहे असें छत्र त्याच्यावर धरलें. सोन्याची माळा त्याच्या वक्षःस्थलावर फार शोभली.

र्षयः प्रांजलयो जयन्ति । पुरोहिताः शत्रुवधे समाहितास्तथैव चान्ये श्रुतशीलवृद्धाः ८७ जपैश्च मंत्रैश्च तथौषधीभिर्महात्मनः स्वस्त्ययनं प्रचक्रुः । स तत्र वस्त्राणि शुभाश्च गावः फलानि पुष्पाणि तथैव निष्कान् ८८ बालद्विजेभ्यः प्रयतः प्रयच्छन्विराजतेऽतीव यथा धनेशः । सहस्रसूर्यो बहुकिंकिणीकः पराद्ध्यर्जांबूनदहेमचित्रः ८९ सहस्रचन्द्रोऽयुततारकश्च रथो बलेरग्निरिवावभाति । तमास्थितो दानवसंगृहीतं महाबलः कार्मुकधृक्स बाणः९० उद्वर्तयिष्यन् त्रिदशेन्द्रसेनामतीव रौद्रं स बिभर्ति रूपम् । स वेगवान्वीररथौघसंकुलः प्रयाति देवान्प्रति दैत्यसागरः ९१ महार्णवो वीचितरंगसंकुलो यथा जलौघैर्युगसंक्षये तथा । त्रैलोक्यविन्रासकरैर्वपुर्भिस्तान्यग्रतो यान्तिबले रथस्य । महाबलान्युच्छ्रितकार्मुकाणि सपर्वतानीव वनानि राजन् ९२ [ ११९७ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि बलेर्युद्धोद्योगो नामैकपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५१ ॥

वैशंपायन उवाच ॥ श्रुतस्ते दैत्यसैन्यस्य विस्तरो जनमेजय । भूयस्त्रिदशसैन्यस्य शृणु विस्तरमादितः १ सुराधिपस्तु भगवानाज्ञापयत वै सुरान् । मरुद्गणांस्तथा दिव्यान्विश्वान्देवांश्च वासवः २ वसूनष्टौ भृशं सर्वान्यक्षरक्षोमहोरगान् । विद्याधरगणान्सर्वान् गन्धर्वांश्च महाबलान् ३ महार्णवांश्च शैलांश्च तथा रुद्रान्महौजसः । यमवैश्रवणौ चोभौ वरुणं च जनाधिपम् ४ ये तु सिद्धा महात्मानः पितरश्च मनःस्विनः । राजर्षयश्च शतशो योगसिद्धास्तथैव च ५ त्रिदशाज्ञापकः शक्र आज्ञापयति वीर्यवान् । भवन्तो दैत्यनाशाय

---

असंख्य असुर त्याच्या सभोंवार चालले होते. दैत्यांतील श्रेष्ठ वीर हात जोडून मंत्रजप करूं लागले. पुरोहित व तसेंच दुसरेही विद्या व शील यांनीं वृद्ध असलेले राक्षस शत्रुवधाविषयीं शांत मनानें प्रार्थना करूं लागले ८४-८७. जप, मंत्र व औषधि यांच्यायोगानें महात्म्यांनीं त्याचें स्वस्त्ययन केलें. त्या बलीनें त्या प्रसंगीं पवित्र होऊन ब्राह्मणांस वस्त्रें, शुभगायी, फळें. पुष्पें, त्याचप्रमाणें सोन्याचीं नाणीं इत्यादि दिलीं. तेव्हां तो कुबेराप्रमाणें अतिशय शोभला. सहस्र सूर्य, अनेक किंकिणी ( क्षुद्र घंटा ), सर्वोत्तम सोन्याचीं चित्रें ८८,८९, सहस्रचंद्र, व दशसहस्र नक्षत्रें, यांनीं युक्त असलेला बलीचा रथ अग्नीप्रमाणें भासत होता. दानवांनीं ज्याचें उत्तम प्रकारें ग्रहण केलें आहे अशा त्या रथावर बसलेला, महाबलाढ्य, धनुर्धर व बाणयुक्त बलि देवांच्या सेनेस जणुं काय उलटून सोडणार असल्यामुळें अतिशय भयंकर रूप धारण करता झाला. तो वेगवान् व वीररथांच्या ओघानें व्याप्त झालेला दैत्यसागर देवांच्या सन्मुख जेव्हां निघाला ९०,९१ तेव्हां युगाचा पूर्णपणें क्षय झाला असतां लाटा व तरंग यांनीं आकुळ झालेला महासागर जलौघांनीं जसा दिसतो, तसा दिसला. सर्व दैत्यांचीं शरीरें त्रैलोक्यास भयभीत करणारीं होतीं. सारांश हे राजन्, बलीच्या रथापुढें ज्यांचीं धनुष्यें उंच आहेत अशीं दैत्यांचीं महासैन्यें पर्वतयुक्त वनांप्रमाणेंच चाललीं ९२. इति० श्रीमहा० खि० हरि० भवि० बलीचा युद्धोद्योग नामक एकावन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५१ ॥

वैशंपायनः—हे जनमेजया, तूं दैत्यसैन्याचा विस्तार ऐकलास आतां पुनः देवांच्या सैन्याचा विस्तार आरंभापासून ऐक. १ भगवान् वासवसंज्ञक देवाधिपानें देवांस, दिव्य मरुद्गणांस व विश्वेदेवांस आज्ञा केली २. आठ वसु, सर्व यक्ष, राक्षस, महोरग, सर्व विद्याधर गण, महाबलाढ्य गंधर्व ३, महासागर, शैल, महाबलाढ्य रुद्र, यम, कुबेर, जनाधिप

सन्नह्यन्तामिति प्रभुः ६ शक्रस्य वचनं श्रुत्वा ततः सर्वे दिवौकसः । सन्नह्यन्त महात्मानः शक्रस्य समविक्रमाः ७ नानाकवचिनः सर्वे विचित्रकवचध्वजाः । नानायुधोद्यतकरा मत्ता इव महागजाः ८ केचिदारुरुहुर्व्याघ्रान् केचिदारुरुहुर्गजान् । केचिदारुरुहुर्नागान् केचिदारुरुहुर्वृषान् ९ हरिनेत्रो हरिश्मश्रुर्द्विरदैरावृतध्वजम् । रथं हरिहयैर्युक्तं स प्रायात्समरं प्रति १० आदित्यवर्णं विरजं सुधौतं त्वष्ट्रा स्वयं निर्मितमीश्वरार्थम् । जालैश्च जांबूनदभक्तिचित्रैरलंकृतं कांचनदामभिश्च ११ सकूबरोपस्करवंधुरेषं विद्युत्प्रभाभिः कृतताम्राभिताम्रम् । कैलासशृंगोपममिन्द्रयानं सुचारुचारुप्रतिचक्रचक्रम् १२ तारासहस्रैः खचितं ज्वलद्भिर्देवार्हमाल्यार्चितसर्वदेहम । समुच्छ्रितं श्रीध्वजमक्षयाक्षं प्रज्वाल्यमानं पुरुषोत्तमेन १३ आस्थाय तं भास्करमाशुवेगं शचीपतिर्लोकपतिः सुरेशः । वज्रस्य धर्ता भुवनस्य गोप्ता ययौ महात्मा भगवान्महेन्द्रः १४ आमुच्य वर्माथ सहस्रतारं हुताशनादित्यसमप्रभावम् । सूर्यप्रभं चामुमुचे किरीटं मालां च जांबूनदवैजयन्तीम् १५ त्वष्ट्राकृतं भास्कररश्मिदीप्तं सुतीक्ष्णघोरामलतीव्रधारम् । महासुराणां रुधिरार्द्रमुग्रं प्रगृह्य वज्रं शतपर्वभीमम् १६ महाशनी द्वे च महाग्रहाभे दीप्तामभोघां च स शक्तिमुग्राम् । चक्रं तथैन्द्रं

---

वरुण, महात्मे सिद्ध, मानी पितर, राजर्षि, योगानें सिद्ध झालेले शेंकडों सिद्धिमान् ४,५, या सर्वांस देवांना आज्ञा करणारा वीर्यवान् शक्र आज्ञा करूं लागला. "तुम्ही सर्व दैत्यांचा नाश करावयास सज्ज व्हा;" अशी आज्ञा त्या प्रभूनें केली ६. इंद्राची ही आज्ञा ऐकून सर्व इंद्रासारखे पराक्रमी, महात्मे स्वर्गवासी सज्ज झाले ७. ते सर्व मत्त महागजांप्रमाणें नानाप्रकारचीं कवचें धारण करणारे, ज्यांचीं कवचें व ध्वजही विचित्र आहेत असे, आणि हातांत नानाप्रकारचीं आयुधें घेतलेले होते ८. त्यांतील कित्येक व्याघ्रांवर आरूढ झाले; कित्येक गजांवर आरूढ झाले; कित्येक हत्तींवर बसले व कित्येक बैलांवर स्वार झाले ९. ज्याचे नेत्र हिरवे आहेत व श्मश्रूही हिरवी आहे, असा इंद्र गजांनीं ज्याच्या ध्वजास आवृत केलें आहे व हिरव्याच रंगाचे घोडे ज्यास जोडले आहेत अशा रथांत बसून तो समरांगणाकडे चालला १०. ज्याचा वर्ण सूर्यासारखा आहे; ज्यावर धूळ मुळींच बसलेली नाहीं; तथापि ज्याला चांगल्या रीतीनें धुतलें आहे, अशा त्या रथाला स्वतः त्वष्ट्यानें, ईश्वराकरितां, निर्माण केलें होतें. सोन्याच्या नकशीनें विचित्र दिसणाऱ्या जाळ्यांनीं व सोन्याच्या माळांनीं तो अलंकृत केलेला होता ११. ज्याची दांडीसह सर्व सामग्री सुंदर आहे, विजेच्या प्रभांनीं ज्याला सर्वतः ताम्रवर्ण केलें आहे व कैलासशृंगाची ज्याला उपमा आहे, असें तें इंद्राचें वाहन प्रत्येक शत्रुसमुहासही आज्ञा करणारें व अतिशय सुंदर होतें १२. तें सहस्रवधि दीप्त तारांनीं खचित होतें. त्याचा सर्व देह देवांस योग्य अशा पुष्पांनीं पूजलेला होता. तें उंच होतें. त्याच्यावर अतिशय सुशोभित ध्वज होता. त्याचे अक्ष अक्षय होते. व त्या पुरुषोत्तमाच्या योगानें ते अति जाज्वल्य झालें होतें १३. त्या चमकणाऱ्या व अति वेगवान् रथावर बसून शचिपति, लोकपति, सुरेश, वज्रधर, भुवनरक्षक, महात्मा महेंद्र निघाला १४. ज्याच्यावर सहस्र तारा आहेत आणि अग्नि व सूर्य यांप्रमाणें ज्याची प्रभा आहे, असें कवच घालून, सूर्यासारखा चकचकीत किरीट व सोन्याची वैजयंती माळा त्यानें घातली १५. त्वष्ट्यानें केलेलें, सूर्यासारख्या रश्मींनीं दीप्त, अति तीक्ष्ण, घोर व निर्मल धारेनें युक्त

सुमहत्प्रतापं प्रगृह्य शक्रः प्रययौ रणाय १७ सहस्रदृग्भूतपतिः सनातन. सनातनानामपि यः सनातनः । खड्गं च देवाधिपतिर्महात्मा वैयाघ्रमादाय च चर्म चित्रम् १८ क्षीरोदधिक्षोभसमुच्छ्रितानि पुरामृतादुत्तमभूषणानि । देवासुराणां समनिर्जितानि सोमार्कनक्षत्रतडित्प्रभाणि १९ दत्तान्यदित्या मणिकुण्डलानि युद्धं प्रयातस्य सुरेश्वरस्य । तैर्भूषितो भाति सहस्रचक्षुरुद्योतयद्वै विदिशो दिशश्च २० हरिः प्रभुर्नेत्रसहस्रचित्रो विभाति युद्धाभिमुखः सुरेन्द्रः । यथा सितं शारदमभ्रकल्पं नभस्तलं ऋक्षसहस्रचित्रम् २१ स्तुवन्ति यान्तं विपुलैर्वचोभिर्जयाशिषा चोर्जितसत्त्ववीर्यम् । अत्रिर्वसिष्ठो जमदग्निरौर्वो बृहस्पतिर्नारदपर्वतौ च २२ तमन्वयुर्देवगणा महेन्द्रं प्रयान्तमादित्यसमानवर्चसम् । विश्वे च देवा मरुतस्तथैव साध्यास्तथादित्यगणाश्च सर्वे २३ ते देवराजस्य पुरंदरस्य हयाश्च ये मातलिसंगृहीताः । प्रयान्ति देवेश्वरमुद्वहन्तो नभस्तलं पद्भिरिवाक्षिपन्तः २४ ब्रह्मर्षयश्चैव महर्षयश्च राजर्षयश्चाक्षयपुण्यलोकाः । सर्वेऽनुजग्मुः सहसा ज्वलन्तं तेजोन्वितं शक्रममित्रसाहम् २५ प्रगृह्य शूलांश्च परश्वधांश्च दीप्तानि चापान्यशनींश्च चित्राः । वर्माणि चामुच्य हिरण्मयानि प्रयान्ति सूर्यांशुसमप्रभाणि २६ तथा कुबेरोश्वसहस्रयुक्तं श्रेष्ठं रथं सर्वसहं महार्हम् । दिव्यं समारुह्य रणाय यातो धनेश्वरो दीप्तगदाग्रहस्तः २७ निशाचराः पावकधूमकाया रक्षोवृषा

---

महा असुरांच्या रक्तानें आर्द्र, उग्र व ज्याला शंभर पेरे आहेत असें वज्र त्यानें हातांत घेतलें होतें १६ महाग्रहासारखे दोन अशनी, अमोघ व दीप्त उग्र शक्ति, आणि फार मोठें प्रतापी इंद्राचें चक्र घेऊन शक्र युद्धास निघाला १७. व ज्याला सहस्र नयन आहेत असा तो भूतपति, सनातन सनातनांचाही सनातन, देवाधिपति महात्मा, व्याघ्राच्या चर्मानें विचित्र झालेलें खड्ग घेऊन चालला १८. पूर्वी अमृतासाठीं क्षीरसागराला क्षुब्ध करून काढलेली, देव व असुर यांना सारखींच पराभूत करणारीं, सोम, सूर्य, नक्षत्रें व वीज यांप्रमाणें ज्यांची प्रभा आहे अशीं व अदितीनें दिलेलीं उत्तम भूषणें जीं रत्नांचीं कुंडलें त्यांना युद्धास निघालेल्या इंद्रानें आपल्या कानांत घातलें होतें. त्यांनीं भूषित झालेला सहस्रनेत्र सर्व दिशा व उपदिशा यांस प्रकाशित करता झाला १९,२०. सहस्र नेत्रांनीं चित्रविचित्र झालेला हरि, प्रभु, देवेंद्र युद्धाभिमुख झाला असतां ज्याप्रमाणें शरत्कालीं नभस्तल शुभ्र मेघसमूहाच्या योगानें व सहस्रावधि ऋक्षांच्या योगानें विचित्र झाल्यासारखें दिसतें, तसा दिसूं लागला २१. अत्रि, वसिष्ठ, जमदग्नि, और्व, बृहस्पति, नारद, व पर्वत तो उत्कृष्ट वीर्य व सत्त्व यांनीं संपन्न असलेला देवेंद्र जाऊं लागला असतां, त्याची विपुल वचनांनीं व जयाशीर्वादांनीं स्तुति करूं लागले २२. आदित्यासारखी ज्याची दीप्ति आहे, अशा त्या निघालेल्या इंद्राच्या मागून देवगण, विश्वेदेव, मरुद्गण साध्य व सर्व आदित्य गण चालले २३. मातलीनें ज्यांचे लगाम धरले आहेत असे पुरंदर इंद्राचे घोडे देवेश्वरास वहात आकाशांतून जणुं काय पायांनींच चालत असल्यासारखे निघाले २४. ज्यांना अक्षय पुण्यलोक प्राप्त झाला आहे असे सर्व ब्रह्मर्षि, महर्षि, राजर्षि, शत्रूंचा क्षय करणाऱ्या तेजोयुक्त, व सहसा दीप्त होणाऱ्या इंद्राच्या मागून चालले २५. शूल, परशु, दीप्त धनुष्यें व विचित्र अशनि घेऊन आणि सूर्यासारखीं चकचकीत सोन्याचीं कवचें घालून कुबेर ज्यास सहस्र घोडे जोडले आहेत, अशा अमूल्य, अति दृढ व दीप्त रथावर बसला. आणि दीप्त गदा अग्रहस्तांत घेऊन रणांत निघाला २६,२७.

रुद्रसखस्य तस्य। विशालनानायुधदीप्तहस्ता यान्त्यग्रतो वैश्रवणस्य राज्ञः २८ ते लोहिताक्षाः परिवार्य देवं व्रजन्ति भिन्नांजनचूर्णवर्णाः। यक्षोत्तमा यक्षपतिं धनेशं रक्षन्ति वै पाशगदासिहस्ताः २९ पुण्यः प्रभुः प्राणपतिर्जितात्मा वैवस्वतो धर्मभृतां वरिष्ठः। तद्विद्रुणाभं शतवाजियुक्तं रथं समारोहत सूर्यकल्पम् ३० तं लोकपालं पितरोऽनुजग्मुर्विमुक्तपापा ज्वलितास्तपोभिः। सर्वे च भूता भुवनप्रधाना नानायुधव्यग्रकराः सुभीमाः ३१ दण्डं महास्त्रं परिगृह्य देवो लोकांकुशं निग्रहनिश्चितार्थम्। हिरण्मयानां कमलोत्पलानां मालां मनोज्ञामवसज्य कण्ठे ३२ स्थितोऽस्थिमेदामिषलोहितार्द्रं सर्वासुराणां निधनं विरूपम्। तेजोमयं मुद्गरमुग्ररूपं विकर्षमाणोऽरुणधूम्रनेत्रः ३३ समन्वितो व्याधिशतैरनेकैर्ययौ हरिश्मश्रुरुदारसत्त्वः। महासुराणां निधनाय बुद्धिं चक्रे तदा व्याधिपतिः कृतान्तः ३४ ततस्त्रिशीर्षैर्भुजगैर्बृहद्भिर्युक्तं रथं हेमचितं महात्मा। आस्थाय कुन्देन्दुनिभं जलेशो ययौ रणायासुरदर्पहन्ता ३५ वैडूर्यमुक्तामणिभूषितांगस्तेजोमयः पाशगृहीतहस्तः। महासुराणां निधनाय देवः प्रयाति रूप्यांगदबद्धबाहुः ३६ कैलासशृंगप्रतिमोऽप्रमेयः समुद्रनाथोऽमृतपो महात्मा। महोरगैः स्वैस्तनयैस्सुगुप्तो ययौ रथेनार्कसमप्रभेण ३७ युद्धाय तं यान्तमदीन-

---

अग्नि व धूम यांप्रमाणें ज्यांचीं शरीरें आहेत आणि विशाल व नानाप्रकारच्या आयुधांनीं ज्यांचे हात दीप्त झाले आहेत असे ते निशाचर राक्षसश्रेष्ठ रुद्राचा मित्र व विश्ववर्णाचा पुत्र अशा त्या राजाच्या पुढें चालले २८. तेलांत खललेल्या अंजनाप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे व नेत्र ज्याचे लाल आहेत असे ते त्या देवास परिवेष्टित करून जाऊं लागले. ज्यांच्या हातांत पाश, गदा व तरवारी आहेत असे उत्तम यक्ष यक्षपति धनेशाचें रक्षण करूं लागले २९. पुण्यवान्, प्रभु, प्राणांचा स्वामी, जितेंद्रिय, धर्मात्म्यांतील श्रेष्ठ यमधर्म विद्युद्वर्णासारख्या शंभर घोडे जोडलेल्या व सूर्यतुल्य रथांत बसला ३०. त्या लोकपालाच्या मागून पापापासून मुक्त झालेले, तपांनीं दीप्त असलेले पितर आणि भुवनांतील प्रधान, अति भयंकर आणि नाना आयुधांनीं ज्याचे हात व्यग्र झाले आहेत असे भूत चालले ३१. तो देव ज्याचें निग्रहरूपी प्रयोजन निश्चित आहे व जो लोकांचा जणुं काय अंकुशच आहे असें दंडसंज्ञक महास्त्र हातांत घेऊन व गळ्यांत सोन्याच्या कमलांची सुंदर माळ घालून सज्ज होऊन राहिला. ज्याचे नेत्र लाल व धूम्रवर्ण आहेत असा तो यमराज अस्थींतील मेद, मांस, व रक्त यांनीं आर्द्र झालेल्या सर्व असुरांच्या मृत्युरूप, विक्राळ, तेजोमय व उग्ररूप अशा मुद्गरास फिरवीत उभा राहिला ३२,३३. ज्याची श्मश्रु हिरवी व सत्त्व उदार आहे असा तो व्याधिपति कृतान्त अनेक शतव्याधींनीं युक्त होऊन युद्धास निघाला. त्यावेळीं त्यानें महा असुरांच्या मरणाविषयीं निश्चय केला ३४. त्यानंतर असुरांचा दर्प घालविणारा महात्मा वरुण ज्याला तीन मस्तकांनीं शोभणारे फार मोठे सर्प जोडले आहेत अशा सुवर्ण खचित आणि कुंद व इंदु यांप्रमाणें शुभ्र असलेल्या रथांत बसून युद्ध करावयास निघाला ३५. त्याचें शरीर वैडूर्य, मोत्यें, व रत्नें यांनीं भूषित झालें होतें. तो स्वतः तेजोमय होता. त्यानें हातांत पाश घेतले होते. रुप्याच्या अंगदांनीं त्याचे बाहू बांधलेले होते, व असा तो देव महा असुरांस मारण्यासाठीं निघाला ३६. कैलासशृंगासारिखा, अप्रमेय, समुद्रांचा नाथ, अमृतरक्षक व महात्मा वरुण आपले पुत्र जे महा सर्प त्यांच्याकडून उत्तमप्रकारें सुर-

सत्वं नभस्तले चन्द्रमिवातिकान्तम् । पश्यन्ति भूतानि महानुभावं संहृष्टरोमाणि कृताञ्जलीनि ३८ धातार्यमांशोऽथ भगो विवस्वान्पर्जन्यमित्रौ च शशीच देवः । त्वष्टा तथैवोर्जितविश्वकर्मा पूषा च साक्षाद्दिवि देवराजः ३९ सोरश्छदैः सध्वजकिंकिणीकैर्वैडूर्यनिष्कैश्चितहेमकण्ठैः । हयैर्वरैः शक्ररथप्रकाशैर्युक्तान् रथानारुरुहुः सुरास्ते ४० दिवाकराकारनिभानि केचिद्धुताशनार्चिःप्रतिमानि केचित् । निशाकरांशुप्रतिमानि केचित्तडिद्गणोद्योतनिभानि केचित् ४१ नीलांशुमेघप्रतिमानि केचित्कार्ष्णायसाकारनिभानि केचित् । वर्माणि दिव्यानि महाप्रभाणि त्वष्ट्रा कृतान्युत्तमभानुमन्ति ४२ आमुच्य मालाश्च सुवर्णपुष्पाः प्रयान्ति तोयानिलतुल्यवेगाः । द्वावश्विनौ चैव महानुभावौ रूपोत्तमौ धर्मभृतांवरिष्ठौ ४३ रथं समारुह्य सुवर्णचित्रं रणं गतौ कांचनतुल्यवर्णौ । भानोः सुता वै वसवश्च सर्वे बलोत्कटा दैत्यवधाय देवाः ४४ रथांश्च नागांश्च महाप्रमाणानास्थाय जग्मुः शुभभास्त्रहस्ताः । रुद्राश्च सर्वेऽरुणधूमवर्णाः श्वेतैर्ययुर्गोपतिभिर्बृहद्भिः ४५ महौजसः सर्वगुणोपपन्ना दीप्तात्मनो भाभिरिव ज्वलन्तः । नानायुधव्यग्रकरैर्भुजैस्तैर्लोकान्समस्तानिव निर्दहन्तः ४६ ययुः ससैन्यास्तपनीयनद्धाः सविद्युतस्तोयधरा यथैव । विश्वे च देवास्तपसाज्वलन्तो वीर्योत्तमाः सूर्यमरीचिवर्णाः ४७ ययुः ससैन्या युधि दुर्निवार्या बलोत्कटाः पद्मसहस्रमालाः । रथैः सुयुक्तैस्त-

---

क्षित होत्सता सूर्यासारख्या तेजस्वी रथानें जाऊं लागला ३७. याप्रमाणें युद्धास जात असलेल्या, उदारसत्व, नभस्तलांतील चंद्राप्रमाणें अतिशय रम्य दिसणाऱ्या महा प्रभावशाली देवास आनंदानें ज्यांच्या अंगावर रोमांच उठले आहेत व ज्यांनीं हात जोडले आहेत अशा भूतांनीं पाहिलें ३८. धाता, अर्यमा, अंश, भग, विवस्वान्, पर्जन्य, मित्र, शशीदेव, उत्कृष्ट विश्वकर्मा, त्वष्टा, पूषा, व प्रत्यक्ष स्वर्गांतील देवराज ३९, रणाकडे निघाला. उरःस्थलास आच्छादित करणाऱ्या, ध्वज व क्षुद्र घंटा यांनीं युक्त असलेल्या, वैडूर्य व सुवर्णाचीं नाणीं यांच्या माळांनीं ज्यांचें कंठ भरून गेले आहेत असे उत्तम घोडे जोडलेल्या आणि इंद्राच्या रथाप्रमाणें दिसणाऱ्या, रथावर ते देव आरूढ झाले ४०. कित्येक सूर्याच्या आकारांचीं कवचें घालून, कित्येक अग्नीच्या ज्वालेसारखीं चिलखतें चढवून, कित्येक निशाकरचंद्राच्या किरणासारखीं, कित्येक विद्युत्समूहाच्या प्रकाशासारखीं ४१, कित्येक नीलमेघाकृति व कित्येक पोलादाच्या रंगाचीं महा प्रभायुक्त दिव्य व त्वष्ट्यानें केलेलीं चकचकीत कवचें घालून आणि गळ्यांत सुवर्णपुष्पांच्या माळा घालून ते सर्व जल व वायु यांसारखे वेगवान् देव जाऊं लागले. महानुभाव व उत्तम रूपानें मंडित असलेले धर्मवानांतील श्रेष्ठ दोघे आश्विनीकुमार सुवर्णानें विचित्र झालेल्या रथावर आरूढ होऊन रणांत गेले. त्या दोघांचीही अंगकांति सोन्यासारखी होती. भानूचे पुत्र, सर्व वसु, आणि इतर महाबलाढ्य देव दैत्यांच्या वधाकरितां ४२,४३, धिप्पाड हत्ती व रथ यांवर बसून आणि अतिशय शुभ अस्त्रें हातांत घेऊन निघाले. तसेच सर्व अरुण व धूम्रवर्ण रुद्र शुभ्र व धिप्पाड बैलांवरून निघाले ४४,४५. ते महाबलवान्, सर्व गुणसंपन्न, दीप्तस्वरूप, अंगकांतींनीं जणुं काय जळत असलेले, नाना आयुधांनीं व्यग्र झालेल्या हातांनीं जणुं काय सर्व लोकांस जाळणारे, सोन्याच्या भूषणांनीं भूषित असणारे, व विद्युयुक्त मेघांप्रमाणें दिसणारे रुद्र ससैन्य युद्धार्थ निघाले. तपानें दीप्त, उत्तम वीर्यवान्, सूर्यकिरणांप्रमाणें ज्यांचा वर्ण

पनीयवर्णैर्वैडूर्यमुक्तामणिदामचित्रैः ४८ नानाविधाकारसमाकुलास्ते पारिप्लवैश्चैव सितात-पत्रैः। तेजोमयैः कांचनचारुचित्रैः सुनिर्मलैः पावकसन्निभास्ते ४९ उरच्छदैः सध्वजकिंकिणीकैर्हयैश्च वायोः समवेगवद्भिः। दिशां गजैश्चैव महाबलैस्तैः कैलासशृंगप्रतिमैर्महद्भिः ५० प्रजग्मुरुग्रायुधचापहस्ताश्चतुर्युगान्ते ज्वलिता इवोल्काः। साध्याश्च देवाः सुमहाप्रभावाः स्वाधीनचक्राः प्रतिदीप्तवक्त्राः। प्रयान्ति जांबूनदभूषितांगा गांगौघमात्रैर्गगने-र्बलौघैः ५१ विद्योतयन्तो विदिशो दिशश्च महाबलास्ते जयतां वरिष्ठाः। वरिष्ठपुष्टौष्ठभुजाः सुदृप्ता वैश्वानरार्कप्रतिमप्रभावाः ५२ ते ब्रह्मविद्भिश्च समस्यमानाः संपूज्यमानाश्च सुरैः सशक्रैः। गन्धर्वसंघैरनुगम्यमाना वधाय तेषामसुराधिपानाम् ५३ वैडूर्यवज्रस्फटिकाग्रचित्रैर्ध्वजैः सुवर्णैश्च परिष्कृतानाम्। रूपं बभौ चोत्कटभूषणानां दैत्येन्द्रनाशाय विभूषितानाम् ५४ आत्मप्रभाभिश्च रणोत्कटाभिर्वर्मप्रभाभिश्च तमोनुदाभिः। ध्वजोत्तमाभिः स्वशरीरभाभिर्महाप्रभाभिश्च महोज्ज्वलाभिः ५५ विभान्ति ते देववराः ससाध्याः प्रध्मातशंखस्वन सिंहनादाः। महारथस्थास्त्रिदिवौकसस्ते महाबलाः शत्रुबलं प्रयान्ति ५६ महास्त्रहस्ता ययुरु-

---

आहे असे विश्वेदेव ससैन्य निघाले. ते युद्धामध्यें दुर्निवार्य व बलानें उत्कट होते. त्यांनीं आपल्या गळ्यांत सहस्र कमलांच्या माळा घातल्या होत्या. ज्यांना उत्तम घोडे जोडले आहेत, ज्याचा रंग सोनेरी आहे व वैडूर्य, मोत्यें आणि रत्नें यांच्या वेलबुट्टीनें जे विचित्र झाले आहेत अशा रथांनीं ते निघाले ४६,४८. ते नानाविध आकारांनीं समाकुल झाले होते. हालणाऱ्या, तेजोमय, सुवर्णानें अति विचित्र व अति निर्मल अशा शुभ्र छत्रांच्या योगानें ते अग्नीसारखे दिसत होते ४९. वक्षःस्थलास आच्छादित करणाऱ्या ( ह्मणजे तितक्या उंच ) आणि ध्वज व क्षुद्र घंटा यांनीं युक्त असलेल्या रथांनीं, वायूसारख्या वेगवान् घोड्यांनीं आणि कैलासशृंगासारख्या मोठ्या व महाबलाढ्य दिग्गजांनीं हातांत उग्र आयुधें धारण करणारे ते चारयुगांच्या अंतीं संचार करणाऱ्या दीप्त महोल्कांप्रमाणें निघाले. ज्यांचा प्रभाव फार मोठा आहे, ज्यांचें सैन्य स्वाधीन आहे आणि ज्यांचीं तोंडें अतिशय दीप्त आहेत, असे साध्य देव जाऊं लागले. त्यांचीं अंगें सोन्याच्या भूषणांनीं भूषित होतीं. गंगेच्या ओघासारख्या अगाध व अनंत सैन्यौघांनीं दिशा व उपदिशा यांस प्रकाशित करणारे ते महाबलवान्, जिंकणारांतील वरिष्ठ, ज्यांचे ओष्ठ व भुजा उत्कृष्ट व पुष्ट आहेत, अति दर्पित आणि अग्नि व सूर्य यांप्रमाणें ज्यांचा प्रभाव आहे असे होते ५०—५२. ते ब्रह्मवेत्त्यांकडून संगति केले जाणारे, इंद्रासह सर्व देवांकडुन पूजले जाणारे व त्या असुराधिपाच्या वधाकरितां गंधर्वसंघ ज्यांच्या मागून जात आहेत असे होते ५३. वैडूर्य, वज्र, स्फटिक, यांचीं ज्यावर चित्रें काढलीं आहेत अशा सुवर्णाच्या ध्वजांनीं ज्यांचें रथ अलंकृत केले आहेत, ज्यांचीं भूषणें उत्तम आहेत, दैत्येंद्राच्या नाशाकरितां जे अतिशय भूषित झाले आहेत अशा त्यांचें रूप फार शोभलें ५४. रणाविषयीं उत्कष्ट असलेल्या आपापल्या प्रभांनीं अंधकारास घालविणाऱ्या कवचांच्या प्रभांनीं आणि ध्वजांच्या योगानें उत्तम, महा उज्वल, व अति चकचकीत अशा आपल्या शरीरांच्या प्रभांनीं साध्यांसह ते सर्व श्रेष्ठ देव शोभूं लागले. त्यांनीं शंख वाजविले. सिंहनाद केले. व महारथावर बसलेले ते अति बलाढ्य देव शत्रुसैन्यावर निघाले ५५,५६. ज्यांचे देह उग्र आहेत,

प्रकाया महासुराणां निधनाय देवाः । तथैव सर्वे महतोऽतिवीर्या बलोत्कटास्ते समरे प्रतीताः ५७ ययुर्महामेघसमानवर्णाश्चक्रायुधास्तोयदनादनादाः । महेंद्रकेतुप्रतिमा महाबलाः प्रगृह्य सर्वासुरसूदनीं गदाम् ५८ रणोत्कटा लोहितचन्दनाक्ताः सहेममाल्यांबरभूषितांगाः । ते युद्धशौण्डाः सुभुजास्त्रवीर्या बलोत्कटाः क्रोधविलोडिताक्षाः ५९ ययुः सजांबूनदपद्ममाला यथेष्टनानाविधकामरूपाः । खड्गप्रभाश्यामलितांसपीठाः पुरंदरं वै परिवार्य देवाः ६० वैडूर्यचामीकरचारुरूपाण्याबध्य गात्रेषु महाप्रभाणि । वर्माणि दैत्यास्त्रनिवारणानि प्रयान्ति युद्धाय सपत्नसाहाः ६१ तैरुत्थितैः कांचनवेदिकाग्रैर्वरध्वजैर्भास्कररश्मिवर्णैः । ययौ सुराणां पृतनोग्रभासा समुन्नदन्ती युधि सिंहनादान् ६२ इत्येवमुक्तं त्रिदिवेश्वरस्य सैन्यं तदासीद्बहुमहत्प्रभावम् । युद्धं प्रयातस्य जयावहस्य वधाय तेषामसुराधिपानाम् ६३ [ २०६०] इति श्रीम० खि० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे द्विपंचाशत्तमोऽध्यायः

वैशंपायन उवाच ॥ ततः प्रवृत्तोऽसुरदेवविग्रहस्तदद्भुतो भाति सुरासुराकुलः । वेलामतिक्रम्य युगान्तकाले महार्णवान्योन्यमिवाश्रयन्तः १ नानायुधोद्योतविदीपितांगा महाबला व्यायतकार्मुकास्ते । रणोत्सुका वारणहस्तहस्ताः सुदुर्जयास्तोयदनादनादाः २ विस्फारयन्तः

---

असे देव हातांत महास्त्रें घेऊन महाअसुरांना मारण्यासाठीं गेले. ते सर्व राक्षसांप्रमाणेंच मोठे, अति वीर्यवान्, बलोत्कट व युद्धाविषयीं निश्चित झालेले होते ५७. महा मेघाप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे, चक्रें हींच ज्यांचीं आयुधें आहेत, मेघांच्या नादाप्रमाणें ज्यांचा नाद आहे, इंद्रकेतूची ज्यांना उपमा आहे, असे ते सर्व महाबल दैत्यांचा संहार करणाऱ्या गदा हातांत घेऊन निघाले ५८. ते रणाविषयीं उत्कट झालेले देव रक्तासारख्या लाल चंदनाची उटी आपल्या अंगास लावते झाले. सोन्याच्या पुष्पांच्या माळा व वस्त्रें यांनीं त्यांनीं आपली अंगें भूषित केलीं. ते युद्धामध्यें निष्णात होते. त्यांच्या भुजा, अस्त्रें व वीर्य हीं तिन्हीं उत्तम होतीं. ते बलानें उत्कट झाले होते. क्रोधानें ते आपले नेत्र गरगर फिरवीत होते ५९. सोन्याच्या कमलांच्या माळा घातलेले, यथेष्ट नानाप्रकारचीं कामरूपें घेणारे व खड्गाच्या प्रभेनें आपले अंसप्रदेश ( खांदे ) काळे करणारे देव इंद्राला वेढून उभे राहिले ६०. वैडूर्यमणि व सोनें यांच्या योगानें सुंदररूप झालेलीं, महाप्रभाशाली, व दैत्यांच्या अस्त्रांचें निवारण करणारीं कवचें अंगांत चढवून शत्रूंस सहन करणारे देव युद्धाकरितां जाऊं लागले ६१. उभारलेल्या, सुवर्ण वेदींनीं संपन्न असलेल्या व सूर्यरश्मीप्रमाणें चमकणाऱ्या उत्कृष्ट ध्वजांनीं उग्रभासणारी देवांची सेना युद्धामध्यें सिंहनाद करीत निघाली ६२ सारांश युद्धाकरितां आलेल्या त्या असुराधिपाच्या वधासाठीं जाणाऱ्या स्वर्गेश्वराचे तें येथें वर्णिलेलें सैन्य फारच मोठें व प्रभावशाली होतें ६३. इति श्रीम० खि० हरि० भविष्यपर्वाच्या वामनावताराचा बावन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५२ ॥

वैशंपायनः—त्यानंतर देव व असुर यांचा कलह प्रवृत्त झाला. देव व असुर यांच्या योगानें आकुल झालेला तो संग्राम युगांतसमयीं वेलेचें उल्लंघन करून एकमेकांस जाऊन भिडणाऱ्या दोन समुद्रांप्रमाणें भासला १. नाना आयुधांच्या प्रकाशांनीं ज्यांचीं अंगें दीप्त झालीं आहेत, ज्यांचीं धनुष्यें फार लांब आहेत, रणोत्सुक, महाबल, हत्तीच्या सोंडप्रमाणें ज्यांचे हात आहेत, जे अतिशय दुर्जय आहेत, मेघांच्या गडगडाटाप्रमाणें ज्यांचा नाद आहे २, जे अकस्मात् धनुष्यें आकर्ण ओढीत आहेत, सूर्याप्रमाणें चमकणारीं चक्रें,

सहसा धनूंषि चक्राणि चादित्यसमप्रभाणि । समुत्क्षिपन्तो ह्यशनीश्च घोरान्खड्गांश्च ते वज्रमुखाश्च शक्तीः ३ महागदाः कांचनपट्टनद्धास्तथायसान्कार्मुकमुद्गरांश्च । शूलांश्च वृक्षांश्च विगृह्य दीप्तान्नदन्ति शूराः शतशो रणस्थाः ४ वैशंपायन उवाच ॥ एतस्मिन्नन्तरे तेषामन्योन्यमभिनिघ्नताम् । द्वन्द्वयुद्धान्यवर्तन्त देवानां दानवैः सह ५ मरुतां पंचमो यस्तु सबाणेनाभ्ययुध्यत । महाबलः सुरवरः सावित्र इति यं विदुः ६ अनायुषायाः पुत्रस्तु बलो नाम महासुरः । सोऽयुद्ध्यत रणेऽत्युग्रो ध्रुवेण वसुना सह ७ नमुचिश्चासुरश्रेष्ठो धरेण सह युध्यत । प्रवरौ विश्वकर्माणौ ख्यातौ देवासुरेश्वरौ ८ पुलोमा तु महादैत्यो वायुना सह युध्यत । ससैन्यः पर्वताकारो रणे युध्यत दंशितः ९ हयग्रीवस्तु दितिजः सह पूष्णा त्वयुध्यत । शूरेणामितवीर्येण भास्कराकारवर्चसा १० शंबरस्तु महादैत्यो महामायो महासुरः । भगेनायुध्यत तदा सहितो युद्धदुर्मदः ११ शरभः शलभश्चैव दैत्यानां चन्द्रभास्करौ । प्रयुद्धौ सह सोमेन शैशिरास्त्रेण धीमता १२ विरोचनस्तु बलवान्बलेर्बलवतः पिता । विष्वक्सेनेन साध्येन देवेन च सयुध्यत १३ कुजंभस्तु महातेजा हिरण्यकशिपोः सुतः । अंशेनायुध्यत तदा प्रासप्रहरणेन वै १४ असिलोमा तु बलिना मारुतेन समं विभो । तदायुध्यत दीप्तास्यो विकृतः पर्वतायुधः १५ अनायुषायाः पुत्रस्तु वृत्रो नाम महासुरः । अश्विभ्यां देववैद्याभ्यां सह युध्यत संयुगे १६ एकचक्रस्तु दितिजश्चक्रहस्तो दुरासदः । सहायुध्यत देवेन साध्येन दितिजारिणा १७ बलस्तु मधुपिंगाक्षो वृत्रभ्राता महासुरः । मृगव्याधेन रुद्रेण सहायुध्यत वीर्यवान् १८ राहुस्तु विकृताकारः शतशीर्षो महोदरः । अजैकपादेन

---

घोर अशनी, खड्ग, वज्रमुख शक्ति ३, सोन्याच्या पट्ट्यानें मढविलेल्या महागदा, तसेंच लोखंडी कार्मुकें व मुद्गर, दीप्त शूल आणि वृक्ष यांस जे धारण करीत आहेत असे शेंकडों शूर रणांत स्थित होऊन भयंकर नाद करूं लागले ४. वैशंपायनः—इतक्यांत एकमेकांस मारणाऱ्या त्यांचीं द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. देवदानवांशीं लढूं लागले ५. महाबल, देवश्रेष्ठ आणि सावित्र असें ज्यास म्हणतात तो मरुतांमधील पांचवा देव बाणाशीं लढूं लागला ६. अनायुषेचा बलनामक महाअसुर अति उग्र पुत्र ध्रुव वसूशीं भिडला ७. असुरश्रेष्ठ नमुचि धरसंज्ञक देवाशीं लढूं लागला. ते दोघेही असुर व देव यांचे श्रेष्ठ व प्रख्यात विश्वकर्मे होते ८. महादैत्य पुलोमा वायूशीं लढत होता. पर्वतासारखा ज्याचा आकार आहे असा तो राक्षस सैन्यासह सज्ज होऊन लढूं लागला ९. हयग्रीव दितिज पुषादेवाशीं लढला. तो देव शूर, अमितवीर्यवान् व भास्कराकार तेजानें युक्त होता १०. महामायावी, महादैत्य, महाअसुर शंबर त्यावेळीं युद्धाविषयीं दुर्मदयुक्त होऊन भग—देवाशीं लढूं लागला ११. शरभ व शलभ हे दोघे दैत्यांचे चंद्रसूर्य होते. ते शिशिर हेंच ज्याचें अस्त्र आहे अशा अतिबुद्धिमान् सोमाशीं झुंजूं लागले १२. बलवान् विरोचन, बलाढ्य बलीचा पिता, विष्वक्सेन नांवाच्या साध्यदेवाशीं लढला १३. हिरण्यकशिपूचा पुत्र महातेजस्वी कुजंभ प्रास हेंच ज्याचें आयुध आहे अशा अंशाशीं लढला १४. हे विभो, असिलोमा बलाढ्य मारुताशीं युद्ध करूं लागला. त्याचें मुख दीप्त असून तो अति विक्राळ होता पर्वत हेंच त्याचें आयुध होतें १५ अनायुषेचा पुत्र वृत्र महा—असुर संग्रामांत देवांचे वैद्य जे अश्विनीकुमार त्यांच्याशीं लढूं लागला १६. ज्याच्या हातांत चक्र आहे असा दुर्धर्ष एकचक्र दितिज दितिजारिनामक साध्य देवाशीं भिडला १७. ज्याचे नेत्र मद्यानें आरक्त झाले

रणे सहायुध्यत दंशितः १९ केशी तु दानवश्रेष्ठः प्रावृट्कालांबुदप्रभः । धनेश्वरेण भीमेन सहायुध्यत संयुगे २० वृषपर्वा तु बलिना निकुंभेन महारणे । विश्वेदेवेन विश्वेशः सहायुध्यत वीर्यवान् २१ प्रल्हादस्तु महावीर्यो वीरैः स्वैस्तनयैर्वृतः । युयुधे सह कालेन रणे काल इवापरः २२ अनुल्हादः कुबेरेण धनदेन महारणे । गदाहस्तेन युयुधे शोभयन् रिपुवाहिनीम् २३ विप्रचित्तिस्तु दैतेयो वरुणेन महात्मना । प्रवृत्तो वै रणं कर्तुं दैत्यानां नन्दिवर्धनः २४ बलिस्तु सहशक्रेण सुरेशेन महात्मना । युयुधे देवराजेन बलिना बलवान्रणे २५ शेषा देवाश्च दैत्याश्च जघ्नुरन्योन्यमाहवे । विनर्दन्तो महानादान् प्रासासिशरशक्तिभिः २६ अदृश्यन्त महोत्पाता ये प्रोक्ता जगतः क्षये । मारुताः सप्त ते क्षुब्धा व्यशीर्यन्त महीधराः २७ सप्त चैवोत्थिताः सूर्याः शोषयन्तो महार्णवान् । बहुनाभिद्यत धरा वायुना मथिता यथा २८ व्युत्थिताश्च महामेघाः शक्रचापांकितांतराः । प्रणेदुः सर्वभूतानि सर्वाः सतिमिरा दिशः २९ देवानामनयो घोरो दृश्यते कालनिर्मितः । घोरोत्पातः समुद्भूतो युगान्तसमये यथा ३० न ह्यन्तरिक्षं न दिशो न भूमिर्न भास्करोऽदृश्यत रेणुजाले । बभुश्च वातास्तुमुलाः सुधूम्रा दिशश्च सर्वास्तिमिरोपगूढाः ३१ एते चान्ये च बहवो दृश्यन्ते देवनिर्मिताः । भूमौ तथान्तरिक्षे च महोत्पाताः समंततः ३२ तद्युद्धं देवदैत्यानां भीमानां भीमदर्शनम् । अपश्यत गुरुर्ब्रह्मा सर्वैरेव सुरैः सह ३३ वेदैश्चतुर्भिः सांगैश्च विद्याभिश्च

---

आहेत असा वृत्राचा भ्राता वीर्यवान् महा-असुर बल मृगव्याध रुद्राशीं युद्ध करूं लागला १८. ज्याचा आकार विक्राळ आहे असा शंभर मस्तकांनीं युक्त असलेला महोदर राहु सज्ज होऊन अजैकपादाशीं युद्धभूमींत लढूं लागला १९. वर्षाकाळच्या मेघाप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा दानवश्रेष्ठ केशी रणभूमींत भयंकर धनेश्वराशीं युद्ध करूं लागला २०. वीर्यवान् विश्वेश वृषपर्वा महारणांत बलाढ्य निकुंभ विश्वेदेवाशीं लढूं लागला २१. रणांत जणुं काय दुसऱ्या कालासारखाच असलेला महावीर्यवान् प्रल्हाद आपल्या वीर पुत्रांसह कालाशीं लढला २२. महारणांत शत्रुसैन्यास शोभविणारा अनुल्हाद ज्यानें हातांत गदा घेतली आहे अशा धनद कुबेराशीं लढूं लागला २३. दैत्यांच्या आनंदास वाढविणारा दैतेय विप्रचित्ति महात्म्या वरुणाशीं रण करावयास प्रवृत्त झाला २४. बलवान् बलि रणांत महात्म्या बलाढ्य सुरेश, देवराज इंद्राशीं लढला २५. बाकीचे देव व दैत्य महानाद करीत प्रास, तरवारी, शक्ति, शर यांच्या योगानें युद्धांत एकमेकांस मारूं लागले २६. जगाच्या क्षयप्रसंगीं जे महा उत्पात होतात असें सांगितलें आहे तें त्यावेळीं झाले. सात वायु क्षुब्ध झाले. पर्वत छिन्नभिन्न झाले २७. साती महा सागरांस शुष्क करून सोडणारे सूर्य उगवले. पुष्कळ वायूनें मथित झालेली पृथ्वी जणुं काय फुटली २८. ज्यांचें मध्यभाग इंद्र धनुष्यानें चिन्हित झाले आहेत असे महा मेघ उठले. सर्व भूतें मोठा आक्रोश करूं लागलीं. सर्व दिशा अंधकारानें व्यापल्या २९. देवांचा काल निर्मित घोर अनय दिसूं लागला. युगांत समयीं जसा, तसाच घोर उत्पात उठला ३०. सारांश धुळीनें आच्छादित झाल्यामुळें अंतरिक्ष, दिशा, भूमि, व सूर्य यांतील कांहीं दिसेनासें झालें. तुमुल वायु वाहूं लागले. धूम्रयुक्त सर्व दिशा काळोखानें भरून गेल्या ३१. हे व असेच दुसरेही देवनिर्मित महोत्पात भूमीवर, तसेच अंतरिक्षांत चोहोंकडे दिसूं लागले ३२. भयंकर देवदैत्यांचें तें पहाण्यासही भयंकर असलेलें युद्ध सर्व उदासीन देव, गुरु व

सनातनः । पद्मयोनिर्वृतः श्रीमान्सिद्धैश्च परमर्षिभिः ३४ नानामणिस्तंभसहस्रचित्रमारुह्य यानं दद्दशे स्वयंभूः । सुभास्वरं भूतसहस्रयुक्तं प्रदीप्यमानं वपुषा वरेण ३५ सुतप्तजांबूनदभक्तिचित्रमानन्दभेरीशतसंप्रणादम् । नक्षत्रचण्डांशुभिरंशुमन्तं वैडूर्यसोमार्कविभूषितांगम् ३६ तमात्मजो वै पुलहः पुलस्त्यस्तथामरीचिर्भृगुरंगिराश्च । ऋक्सामभिः सम्यगभिष्टुवन्तः सेवन्ति देवं वरदं विमाने ३७ तं पावका लोकगुरुं स्वयंभुवं सांगाश्च वेदा मखदेवताश्च । सेवन्ति देवं भुवनेश्वरेशं भूतानि चान्यानि महानुभावम् ३८ एते बभूवुश्च महर्षिसंघा वैश्वानराः पावकयोनयश्च । सर्वे ययुर्देवपुरोहिताश्च युद्धोत्सुकाः सर्वसुरासुराणाम् ३९ योगेश्वराः षट् च दिवाकराभा विभूषणैर्भूषितसर्वदेहाः । अंतर्हिता वै दद्दशुर्नभस्था नारायणश्चैव नरश्च देवाः ४० वक्त्रैश्चतुर्वेदधरैश्चतुर्भिः संपूर्णचंद्रप्रतिमैः सुकान्तैः । सर्वा दिशो निस्तिमिराश्चकार नवोदितोऽसौ शरदीव चंद्रः ४१ [ २१०१ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि देवासुरयुद्धे सनकादिकागमनं नाम त्रिपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५३ ॥

वैशंपायन उवाच ॥ उभयोः सेनयो राजन् भूयो युद्धमवर्तत । नादेन संचालयतां त्रैलोक्यमिदमव्ययम् १ गोमुखाडंबराणां च भेरीणां मुरजैः सह । झल्लरीडिण्डिमानां च व्यश्रूयन्त महास्वनाः २ प्रवृत्तो युद्धयज्ञस्तु तुमुलो लोमहर्षणः । रणमध्ये महानादः स्वर्गीयः

---

ब्रह्मा यांनीं पाहिलें ३३. चार सांगवेद, विद्या, सिद्ध व परमर्षि यांनीं आवृत झालेला पद्मयोनि श्रीमान् सनातन स्वयंभू ब्रह्मा नानामणींच्या सहस्रावधि स्तंभांनीं विचित्र झालेल्या विमानावर आरूढ होऊन तें युद्ध पाहूं लागला. त्याचें तें विमान अतिशय भास्वर ( चकचकीत ) ज्यास सहस्र भूतें जोडलीं आहेत असें व आपल्या श्रेष्ठ आकारानें अतिशय देदीप्यमान होणारें होतें ३४, ३५ अतिशय तापलेल्या सोन्याची वेलबुट्टी त्यावर काढली होती. त्यामुळें तें विचित्र दिसत होतें. शेंकडों आनंददुंदुभींचा त्यावर मोठा नाद होत होता. नक्षत्रांच्या प्रखर किरणांनीं तें किरणयुक्त झालें होतें. आणि त्याचे अंग वैडूर्य, सोम, सूर्य यांच्या योगानें अतिशय भूषित झालें होतें ३६. त्याचे पुत्र—पुलह, पुलस्त्य, मरीचि, भृगु व अंगिरा, त्या वरददेवाची ऋक् व सामें यांच्या योगानें स्तुति करीत विमानांत सेवा करीत होते ३७. पावक ( अनेक अग्नि ) सांग वेद, मखदेवता, व दुसरींही भूतें त्या महानुभाव, भुवनेश्वरेश, लोकगुरु, स्वयंभूस सेवीत होते ३८ हे महर्षिसंघ, पावकापासून उत्पन्न झालेले वैश्वानर, व देवांचे पुरोहित हे सर्व देवासुरांच्या युद्धाविषयीं अतिशय उत्सुक होऊन निघाले ३९. सूर्याप्रमाणें ज्यांची अंगकांति आहे व सर्व भूषणांनीं ज्यांचे सर्व देह भूषित झाले आहेत असे सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार, कपिल व जैगीषव्य असे सहा योगेश्वर तसेच नर व नारायण देव आकाशांत गुप्त राहून युद्ध पाहूं लागले ४० शरत्समयीं नूतन उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें असलेला तो ब्रह्मा संपूर्ण चंद्रतुल्य, अतितेजस्वी, व चार वेदांस धारण करणाऱ्या चार तोंडांनीं सर्व दिशा अंधकाररहित करता झाला ४१. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० देवासुरयुद्धदर्शनार्थ सनकाद्यागमननामक त्रेपन्नावा अध्याय समाप्त झाला॥५३.॥

वैशंपायनः— राजन्, दोन्ही सैन्यांमध्यें आपल्या नादानें हें त्रैलोक्य चाळविणाऱ्या वीरांचें मोठें युद्ध सुरू झालें १. गोमुख, मोठ्या झांजा, दुंदुभी, मृदंग, झल्लरी, डिंडिम इत्यादि वाद्यांचे मोठे नाद तेथें ऐकूं येत असत २. तुमुल व अंगावर कांटा आणणारा

शूरसंमतः ३ युद्धयज्ञस्य नेताभूत्प्रह्लादो दैत्यसत्तमः। विरोचनस्तथाध्वर्युर्युद्धयज्ञप्रवर्तकः ४ होता चैवात्र नमुचिर्वृत्रः स्तोत्रोपकल्पकः। मन्त्रादैत्याः समाख्याता यज्ञकर्मणि तत्र वै ५ अनुयातश्च पितरमधिको वा पराक्रमैः। यष्टा तत्राभवद्बाणः संयुगे चोपतिष्ठते ६ ऐन्द्रं पाशुपतं ब्राह्मं स्थूणाकर्णं सुदुर्जयम्। मंत्रास्तत्राभ्यवर्तन्त साध्वनुन्हादयोजिताः ७ उद्गाता च मयः श्रीमान्स्थितः शत्रुभयंकरः। विनदन्दितिजश्रेष्ठो देवानीकं व्यदारयत् ८ बलिस्तु राजा द्युतिमान्स्वयं तत्र महासुरः। जाप्यैर्होमैश्चसंयुक्तो ब्रह्मत्वमकरोत्प्रभुः ९ रणाग्निर्ज्वलितो घोरो वैरेन्धनसमीरितः। हूयते त्वसुरैस्तत्र देवो विष्णुः सुरैः सह १० शंखशब्दैः सुतुमुलैर्भेरीणां च महास्वनैः। उद्घुष्टं विमलं चैव ब्रह्मण्यं सुप्रयुज्यते ११ बलश्च बलकश्चैव पुलोमा च महासुरः। प्रशस्तं च समं कृत्वा सत्रं सम्यक् प्रचक्रिरे १२ कल्माषदंडविमला विपुला रथपंक्तयः। यूपाश्च समकल्पन्त युद्धयज्ञे महाफले १३ कर्णिनालीकनाराचा वत्सदन्तोपबृंहिकाः। तोमराः सोमकलशा विचित्राणि धनूंषि च १४ अस्थीन्यत्र कपालानि पुरोडाशाः शिरांसि च। आज्यं च रौद्रं रुधिरं तस्मिन्यज्ञेऽभिहूयते १५ इध्माः परिधयस्तत्र प्रस्तारा विपुला गदाः। हयग्रीवोऽसिलोमा च राहुः केशी च दानवः १६ विरोचनश्च जंभश्च कुजंभश्च महाबलः। सदस्यास्तत्र तु मखे विप्रचित्तिस्तु वीर्यवान् १७ इषवस्तु स्रुवास्तत्र रथाक्षसदृशाः शुभाः। धनुष्कोट्यो धनुर्ज्याश्च स्रुचस्तत्र महामखे १८

---

असा मोठा रणयज्ञ तेथें प्रवृत्त झाला. रणामध्यें शूरांस संमत असलेला स्वर्गीय महानाद सुरू झाला ३. त्या युद्धयज्ञाचा नेता उत्तम दैत्य प्रऱ्हाद झाला. तसाच युद्धयज्ञप्रवर्तक विरोचन अध्वर्यु झाला. त्यांतील होता नमुचि, वृत्र प्रस्तोता व त्या यज्ञकर्मामध्यें इतर दैत्य हेच मंत्र सांगितले आहेत ४, ५. पित्याच्या मागून जाणारा पण पराक्रमांनीं त्याच्याहून अधिक असलेला बाण त्या संग्रामयज्ञांत यष्टा झाला ६. ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म, अतिशय दुर्जय स्थूणाकर्ण इत्यादि अनुऱ्हादानें उत्तमप्रकारें योजलेले मंत्र तेथें प्रवृत्त झाले ७. शत्रुभयंकरमय उद्गाता होऊन राहिला. तो दितिजश्रेष्ठ मोठा नाद करीत देवांच्या सैन्याचें विदारण करूं लागला ८. तेथें स्वतः राजा व महा–असुर द्युतिमान् बलि–प्रभु जाप्य मंत्र व होमाचे मंत्र यांनीं युक्त होऊन ब्रह्मत्व करता झाला ९. वैररूपी इंधना ( जळणा ) नें पेटविलेला रणाग्नि भयंकर रीतीनें जळूं लागला. त्यांत देव व असुर यांच्याकडून भगवान् विष्णूला उद्देशून होम केला गेला १०. तुमुल शंखशब्दांनीं व नगाऱ्यांच्या महाध्वनींनीं नादयुक्त झालेल्या विमल ब्रह्मण्याचा उत्तमप्रकारें प्रयोग केला गेला ११. बल, बलक व महा असुर पुलोमा, प्रशस्त व सम कर्में करून तें सत्र उत्तमरीतीनें चालविते झाले १२. काळ्या व पांढऱ्या ठिपक्यांनीं युक्त असलेले दंड ज्याच्यावर आहेत, अशा विपुल व अति निर्मल रथपंक्ती त्या महाफल देणाऱ्या युद्धयज्ञांत पशुस्तंभाच्याठायीं योजिल्या १३. कर्णिनालीक बाण, वत्सदंताशर व तोमर हेच त्यांतील सोमकलश, विचित्र धनुष्यें व अस्थि हींच त्या यज्ञांतील कपालें ( पुरोडाश ठेवावयाची परळें ) मस्तकें हेच पुरोडाश व भयंकर रक्त हेंच घृत त्या यज्ञांत हवन केलें जात होतें १४,१५. त्या यज्ञांत बाणपंक्ति हेच इध्म व विपुल गदा ह्याच परिधी होत्या. हयग्रीव, असिलोमा, राहु, केशी दानव १६. विरोचन, जंभ, महाबल कुभंज, व वीर्यवान् विप्रचित्ति हे त्या यज्ञांतील सदस्य होत १७. त्यांत बाण ह्याच स्रुवा आणि रथाक्षसदृश शुभ

प्रतिप्रास्थानिकं कर्म वृषपर्वाकरोदिह । दीक्षितस्तत्र तु बलिस्तस्य पत्नी महाचमूः १९
शंबरस्तत्र शामित्रमकरोद्दितिनन्दनः । अतिरात्रे महाबाहुर्विततें यज्ञकर्मणि २० दक्षिणा-
स्तस्य यज्ञस्य कालनेमिर्महासुरः । वैताने कर्मणि विभो यः ख्यातो हव्यवाडिव २१ त्रिद-
शानां तु सैन्यस्य शरीरैर्गतजीवितैः । तस्मिन्यज्ञे तु सवनं वर्धतेदैत्यनिर्मितम् २२ देवानां
रुधिरं संख्ये पपुरुग्रा दितेः सुताः । नर्दमानाः प्रमुदिताः सोमपानं रणाध्वरे २३ यदा
बलिर्महादैत्यो विजेता समरे सुरान् । तदा ह्यवभृथो यज्ञे भविष्यति न संशयः २४ महा-
सुरेन्द्रपतयो यज्वानो भूरिदक्षिणाः । वेदवन्तो वृत्तवन्तः शूराः सर्वे तनुत्यजः २५ त्रैलो-
क्यहरणे सज्जा युद्धयज्ञाय दीक्षिताः । बद्धकृष्णाजिनाः सर्वे व्रतिनो मुञ्जधारिणः २६
एकनिश्चयकार्याश्च त्रैलोक्यजयकांक्षिणः । सुरदानवदैत्यानां शब्दः समभवन्महान् २७
नानायुधविहस्तानां त्वरितानां प्रधावताम् । क्ष्वेडितोत्कुष्टनिनदैर्गजबृंहितनिःस्वनैः २८
रथनेमिस्वनैर्घोरैस्तुमुलः सर्वतोऽभवत् । शंखदुंदुभिनिर्घोषैर्हयहेषितनिःस्वनैः २९ हयानां
हेषमाणानां दानवानां च गर्जताम् । क्ष्वेडितोत्कुष्टनिनदैः पाणिपादरवैस्तथा ३० दानवानां
परेषां च शस्त्रवन्ति महान्ति च । समरे भीमकर्माणि सैन्यानि प्रचकाशिरे ३१ ततो नागा
रथाश्चैव जांबूनदविभूषिताः । भ्राजमाना व्यराजन्त मेघा इव सविद्युतः ३२ ऋष्टिशक्ति-

---

धनुष्यकोटी, व धनुष्याच्या दोऱ्या ह्याच त्या महामखांतील स्रुचा होत १८. त्यांतील प्रतिप्रास्थानिक कर्म वृषपर्वा करता झाला. त्या यज्ञाचा दीक्षित यजमान बलि, व त्याची पत्नी महाचमू होती १९. महाबाहु दितिनंदन शंबरानें अतिरात्र विस्तृत यज्ञ कर्मामध्यें पशुमारण कर्म केलें २०. हे विभो, जो यज्ञकर्मामध्यें अग्नीसारखा विख्यात आहे तो महाबाहु महाअसुर कालनेमि त्या यज्ञाची दक्षिणा होता २१. त्या यज्ञांत देवांच्या प्राण निघून गेलेल्या सैन्याच्या शरीरांनीं दैत्यांनीं निर्माण केलेलें सवन नित्य वाढूं लागले २२. मोठा सिंहनाद करणारे व आतिशय आनंदित झालेले उग्र दितिपुत्र संग्रामांत देवांचें रक्त पिऊं लागले. तेंच रणयज्ञांतील सोमपान होय २३. जेव्हां महा दैत्य बलि समरांत देवांस जिंकील तेव्हां यज्ञांतील अवभृथ स्नान होईल, यांत कांहीं संशय नाहीं २४. यथाविधि यज्ञकरणारे, पुष्कळ दक्षिणा देणारे, वेदवेत्ते, सदाचारशील, शूर, सर्व शरीरत्याग करणारे, त्रैलोक्याचें हरण करण्यास सज्ज झालेले युद्धयज्ञाची दीक्षा घेतलेले, कृष्णाजिनें परिधान केलेले, सर्व ब्रह्मचारी व मुंज मेखळा धारण करणारे २५, २६, ज्यांचा एकाच कार्याविषयीं निश्चय झाला आहे, व त्रैलोक्याच्या विजयाची आकांक्षा करणारे, असे ते सर्व महा असुरेंद्रपति होते. नानाआयुधें घेऊन त्या विद्येंत निष्णात असलेल्या व त्वरेनें धांवणाऱ्या देव–दानव–दैत्यांचा मोठा कोलाहल झाला. वीरांचा सिंहनाद, पराभूतांचा आक्रोश, गजांचें बृंहित, घोड्यांचें खिंकाळणें, रथांच्या नेमीचा गडगडाट, शंख व दुंदुभि यांचा निर्घोष, यांच्या योगानें तो कोलाहल फारच तुमुल झाला २७–२९. खिंकाळणाऱ्या घोड्यांच्या व गर्जना करणाऱ्या दानवांच्या नानाप्रकारच्या नादांनीं व हातापायांच्या ध्वनींनीं तेथें मोठा कलकल माजला ३०. दानव व त्यांचे शत्रु देव यांचीं समरांत भीमकर्में करणारीं शस्त्रयुक्त मोठीं सैन्यें फार शोभलीं ३१. सोन्यानें अतिशय भूषित झालेले हत्ती, रथ विद्युयुक्त मेघांसारिखे चमकत होते ३२. शक्ति, ऋष्टि, गदा, तीक्ष्ण शूल व परशु यांनीं

गदास्तीक्ष्णशूलखड्ग परश्वधाः । चारु बभ्राजिरे तत्र तेष्वनीकेषु भागशः ३३ रथा बहुवि-
धाकाराः शतशोऽथसहस्रशः । हेमप्रच्छन्नशिखरा ज्वलन्त इव पावकाः ३४ दानवानां
सुराणां च समालोक्यन्त सैनिकाः । कांचनैः कवचैः सर्वे ज्वलितार्कसमप्रभैः ३५ सन्नद्धाः
समदृश्यन्त ज्योतींषि गगने यथा । उद्यतैरायुधैश्चित्रैस्तलबद्धाः कलापिनः ३६ ऋषभाक्षाः
सुरगणाश्चमूमुखगता बभुः । नानावर्णाः पताकाश्च ध्वजमालाश्च संयुगे ३७ युध्यतां रण-
शौण्डानां युद्धमासीत्सुदारुणम् । ध्वजालंकारवस्त्राणि कवचानि च रश्मिभिः ३८ भास-
यामास सर्वाणि रश्मिवर्णानि रश्मिवान् । सर्वेषामप्रमेयानां बलानां पादचारिणाम् ३९
रजः प्रच्छादयामास पत्रोर्णं पाण्डुरं दिशः । दिव्यायुधधराः सर्वे दीप्तायुधपरिच्छदाः ४०
प्रतितस्तंभिरेऽन्योन्यमनीकं प्रत्यनीकतः । गिरिकूटोच्छ्रयाः सर्वे तदा ते देवदानवाः ४१
अन्योन्यमभिनिघ्नंतो रणस्थाश्चित्रयोधिनः । बाणैः सुरुचिरैस्तीक्ष्णैः पत्रवाजैर्दुरासदैः ४२
मुद्गरैर्मुशलैः शूलैरयस्तुण्डैरुलूखलैः । वज्रैरशनिकल्पैश्च खड्गवृक्षादिभिस्तथा ४३ तथा-
प्रवर्तिते तेषां विमर्देऽद्भुतविक्रमे । सावित्रस्य वधं प्रेप्सुर्बाणो जग्राह कार्मुकम् ४४ शर-
जालेन दिव्येन च्छादयानः सुरोत्तमम् । मंत्रैर्हुत इवार्चिष्मान्संप्रजज्वाल तेजसा ४५
सागराभां महासेनां देवानां दैत्यपुंगवः । संशोषयति बाणौघैरर्कांशुभिरिवार्णवम् ४६ मारुतः

---

युक्त असलेले वीर त्या दोन्ही सैन्यामध्यें अगदीं पृथक्पणें चांगले शोभले ३३.
ज्यांचे आकार अनेक प्रकारचे आहेत असे शेंकडों व सहस्रावधि रथ, त्यांचीं शिखरें
सोन्यानें मढविलेली असल्यामुळें, जळणाऱ्या अग्नीसारखे दिसले ३४. दानव व देव
यांचे सर्व सैनिक ज्वलित सूर्याप्रमाणें ज्यांची प्रभा आहे अशा सोन्याच्या कवचांनीं
सज्ज झाले व त्यामुळें आकाशांतील उचललेल्या ज्योतींप्रमाणें विचित्र दिसले. आयुधांनीं
युक्त, तलबद्ध, कलापयुक्त व ऋषभाक्ष सुरगण सैन्याच्या अग्रभागीं उभे असतां फार
शोभले. त्या रणांगणांत नाना रंगांच्या पताका व ध्वजमाला रम्य दिसल्या ३५–३७. युद्ध
करणाऱ्या त्या रणपंडितांचें फार मोठें व दारुण युद्ध झालें. सर्व अप्रमेय पादचारी सैन्याचे
ध्वज, अलंकार, वस्त्रें व कवचें, या सर्वांस रश्मिमान् सूर्यानें आपल्या किरणांनीं किरणा-
सारख्या रंगानें युक्त असल्याप्रमाणें दाखविलें ३८,३९. त्यांच्या पायापासून उडालेल्या
व धौत पांढऱ्या रेशमी वस्त्रासारख्या शुभ्र धुळीनें दिशास आच्छादित करून सोडलें. ते
सर्व दिव्य आयुधें धारण करणारे, व ज्यांचीं सर्व सामग्री ( उपकरणें ) दीप्त आयुधमय
आहे असे होते ४०. प्रत्येक सैन्यांतील प्रत्येकास प्रत्येकानें परस्पर अडवून
ठेविलें. ते सर्व देव–दानव पर्वताच्या शिखरासारखे उंच होते ४१. रणांगणांत
स्थित असलेले व विचित्र युद्ध करणारे ते बुंधाकडील पिसांनीं वेगयुक्त व असह्य
झालेल्या तीक्ष्ण व सुंदर बाणांनीं एकमेकांस मारूं लागले ४२. मुद्गर, मुसळें, शूल,
ज्यांच्या तोंडास लोखंड बसविलें आहे अशीं लाकडी आयुधें, उखळें, अशनीसारखीं वज्रें,
खड्ग, वृक्ष इत्यादिकांनीं त्यांनीं परस्पर संहार चालविला ४३. अशा रीतीनें ज्यामध्यें
अद्भुत पराक्रम आहे, असा त्यांचा विमर्द चालला असतां सावित्राच्या वधाची इच्छा
करणाऱ्या बाणासुरानें धनुष्य घेतलें ४४. दिव्य शरसमूहानें त्या उदार देवास आच्छा-
दित करणारा बाण मंत्रांच्या योगानें होम केलेल्या ज्वालायुक्त अग्नीप्रमाणें तेजानें अति-
शय जळूं लागला ४५. सूर्य आपल्या किरणांनीं समुद्राला ज्याप्रमाणें सुकवितो त्याप्र-

सुमहावेगः सावित्रः शक्तिमुत्तमाम् । चिक्षेप बलिपुत्राय शक्रोऽशनिमिवाद्रये ४७ आप-
तन्ती च सा शक्तिर्महोल्का ज्वलिता इव । द्विधा छिन्ना क्षुरप्रेण बाणेनाद्भुतकर्मणा ४८
हतायामथ शक्त्यां तु सावित्रो देवसत्तमः । विश्वकर्मकृतं दिव्यं सुतीक्ष्णं दानवार्दनम् ४९
सुपीनधारं विमलं विपुलं चन्द्रवर्चसम् । अगृह्णान्निशितं खड्गमाशीविषमिवोरगम् ५०
तं गृहीत्वा रणमुखे प्रज्वलन्तं महाप्रभम् । बाणाभ्याशे महातेजाः खड्गपाणिरवस्थितः ५१
स तं स्थितमथालक्ष्य सावित्रं बलिनन्दनः । लोहिताक्षो महाकायश्चिक्षेप च ननाद
च ५२ ततोऽर्ककिरणाकारामशनिप्रतिमाञ्छितान् । संदधे चाशुबाणौघानाशीविषशिली-
मुखान् ५३ रुक्मपुंखान्प्रदीप्ताग्रानुग्रवेगानलंकृतान् । आकर्णपूरांश्चिक्षेप शरानुग्रान्समं-
ततः ५४ दृढचापप्रमुक्तास्ते शरा वैश्वानरप्रभाः । सावित्रं छादयामासुः कैलासमिवतो-
यदाः ५५ संच्छाद्यमानः शरौघैर्बाणेन बलिसूनुना । पराङ्मुखः सुवरः प्रयातः सरथ-
ध्वजः ५६ पराजित्य स सावित्रं बाणः परमहर्षितः । प्रगृह्य कार्मुकं घोरं गतः शक्ररथं
प्रति ५७ बलश्चाप्यसुरश्रेष्ठः प्रगृह्य महतीं गदाम् । ध्रुवाय वसवे मूर्ध्नि रौद्रां चिक्षेप
दानवः ५८ तस्य निर्मथितस्त्वंसो हेमचित्रं च वर्म वै । गदावेगेन भीमेन ध्रुवस्य समरे
तदा ५९ शेषाश्च वसवः सर्वे दिव्यास्त्रैर्घोरदर्शनैः । प्राच्छादयन्रणे दैत्यमादित्यमिव

---

माणें तो दैत्यश्रेष्ठ सागराप्रमाणें पसरलेल्या देवांच्या महासेनेस चुकवून सोडता झाला ४६.
पण महावेगवान् मारुत सावित्रानें, शक्र पर्वतावर जसें वज्र सोडतो त्याप्रमाणें, त्या
बलिपुत्रावर उत्तम शक्ति सोडिली ४७. परंतु अद्भुतकर्म करणाऱ्या बाणानें मोठ्या उल्के-
प्रमाणें जळत येणाऱ्या त्या महा शक्तीचे तीक्ष्ण अग्राच्या बाणानें दोन तुकडे केले ४८.
येणेंप्रमाणें शक्ति व्यर्थ झाली असतां देवोत्तम सावित्रानें विश्वकर्म्यानें केलेले, दिव्य, अति
तीक्ष्ण, दानवांचा नाश करणारें, ज्याचीं पाठ चांगली पुष्ट आहे असें, विमल, विपुल,
चंद्रासारखें चकचकीत व पाजळलेलें खड्ग विषारी सर्पाप्रमाणें, हातांत घेतलें ४९.
रणाच्या अग्रभागीं त्या दीप्त व अतितेजस्वी खड्गाला घेऊन तो महातेजस्वी खड्गपाणि
सावित्र बाणासमीप उभा राहिला ५०. जवळ येऊन उभ्या असलेल्या त्या सावित्रास
पाहून बलिपुत्र अतिशय रागावला. त्या महाशरीरी दैत्याचे डोळे गुंजेसारखे लाल झाले.
त्यानें अनेक सूर्य किरणासारखे, अशनितुल्य, तीक्ष्ण बाण त्याच्यावर सोडले व मोठा नाद
केला. त्यानें मोठ्या त्वरेनें विषारी सर्पासारखे घोर बाणांचे समूह धनुष्याच्या प्रत्यंचेशीं
जोडले ५१-५३. त्यांचे पुंखे सोन्याचे व अग्रें प्रदीप्त होतीं. त्यांचा वेग उग्र असून
ते चांगले अलंकृत होते. धनुष्याची दोरी आकर्ण ओढून त्यानें ते उग्र बाण समंततः
फेंकले ५४. दृढ चापापासून सोडलेले ते अग्नीसारखे प्रभावान् बाण, मेघ जसे कैलासास
त्याप्रमाणें, सावित्रास आच्छादित करते झाले ५५. पण अशारीतीनें बलिपुत्र बाणाकडून
आच्छादित केला जाणारा तो सुरश्रेष्ठ पराङ्मुख होऊन रथ व ध्वज यांसह परत गेला ५६.
सावित्राला पराभूत करून बाण अतिशय आनंदित झाला व घोर धनुष्य घेऊन इंद्राच्या
रथावर चाल करून गेला ५७. असुरश्रेष्ठ बलदानवानेंही आपली मोठी भयंकर गदा घेऊन
ध्रुव वसूच्या डोक्यावर मारली ५८. त्या गदेच्या असह्य वेगानें समरांत ध्रुवाचा खांदा
व सोन्याचें विचित्र कवच फुटलें ५९. त्याबरोबर मेघ सूर्याला जसे आच्छादित करितात
त्याप्रमाणें बाकीच्या सर्व वसूंनीं दिव्य व घोर दर्शन अस्त्रांनीं रणांत त्या दैत्यास झांकून

तोयदाः ६० ततः संमर्दितो बाणैर्बलो दानवसत्तमः । अवातरद्रथात्तस्माद्गदामुद्यम्य वेगवान् ६१ पातयामास शत्रूणां समाविध्य महासुरः । दिशः प्राद्रावयत्सर्वांस्त्रिदशान्सा महागदा ६२ इन्द्राशनिरिवेन्द्रेण प्रवृद्धा सुमहास्वना । तस्याः सविद्युद्घोषायास्तेन शब्देन वेपिताः ६३ व्यद्रवन्त परिभ्रष्टा रथेभ्यो रथिनस्तदा । तदुदीर्णं रथानीकं सूर्याभं मेघनिःस्वनम् ६४ देवानां शरधाराभिः समंतादभ्यवर्षत । क्षुरैर्विशिखैर्भल्लैर्वत्सदन्तैः शिलीमुखैः ६५ मुहुर्मुहुर्महातेजाः प्रत्यविध्यन्महासुरः । बलकस्तु गदापाणिर्व्यादितास्य इवान्तकः ६६ तडिद्गणार्कसदृशो वैश्वानर इवापरः । पिबन्निव शरौघांस्तान्देवचापसमुच्छ्रितान् ६७ अभ्यद्रवत दैत्येन्द्रो महार्णव इवापरः । अवस्फूर्जन्दिशः सर्वाः स्वेन वीर्येण दानवः ६८ अरुजंस्त्रिदशान्दैत्यः सिन्धुवेगान्नगा इव । अमृन्दात्तरसा देवान्वायुर्वृक्षानिवौजसा ६९ समर्यश्च महेष्वासावन्वसुभ्यां समसज्जत । आपश्चैवानिलश्चैव ववर्षतुररिन्दमौ ७० शरवर्षाणि दीप्तानि मेघाविव परंतपौ । क्षिप्तांस्तान्विशिखान्दीप्तानन्तरिक्षे स चिच्छिदे ७१ अमृष्यमाणस्तत्कर्म ध्रुवस्तमभिदुद्रुवे । तौ पृथक्शरवर्षाभ्यामन्योन्यमभिजघ्नतुः ७२ उत्तमाभिजनौ शूरौ देवदैत्यौ यशस्करौ । तौ नखैरिव शार्दूलौ दन्तैरिव महाद्विपौ ७३ रथशक्तिभिरन्योन्यं विशिखैश्चाप्यकृन्तताम् । निर्भिन्दन्तौ च गात्राणि विलिखन्तौ च सायकैः ७४

---

सोडलें ६०. तेव्हां त्या बाणांच्या योगानें ज्याला अतिशय पीडा झाली आहे, असा तो वेगवान् दानवश्रेष्ठ बल गदा घेऊन रथांतून खालीं उतरला ६१. व त्यानें ती गरगर फिरवून शत्रूंवर फेंकली. तेव्हां त्या महागदेनें सर्व देवांस दशादिशेंत पळावयास लाविलें. इंद्र इंद्राशनीला जसा फेंकतो त्यांप्रमाणें फेंकलेल्या फार मोठ्या गदेचा अति भयंकर नाद झाला. विजेनें युक्त असलेल्या मेघासारख्या तिच्या त्या अति घोर शब्दानें कांपूं लागलेले रथी भराभर रथांतून खालीं उड्या टाकून पळून जाऊं लागले. सूर्याप्रमाणें ज्याची कांति व मेघाप्रमाणें ज्याचा ध्वनि आहे अशा त्या उधळलेल्या देवांच्या रथसैन्यावर समंततः तीक्ष्ण बाण, भाले, वत्सदन्त व शिलीमुख—बाण यांचा त्यानें वर्षाव केला. ज्यानें आपलें तोंड उघडलें आहे अशा अंतकासारखा तो गदापाणि महातेजस्वी, महा असुर बल त्यांना वेध करीत सुटला ६२–६६. तडित्समूह व सूर्य यांसारखा आणि साक्षात् दुसरा अग्निच असा तो देवांच्या धनुष्यापासून सुटून येणारे बाण जणुं पीतच सुटला ६७. प्रति महासागराप्रमाणें तो दैत्येंद्र देवांवर धांवला. तो दानव आपल्या [वी]र्यानें सर्व दिशांस प्रकाशित करूं लागला ६८. सागराच्या वेगाला पर्वत जसे प्रति[बं]ध करितात त्याप्रमाणें तो दैत्य देवांस अडवून पीडा देऊं लागला वायु स्वबलानें वृक्षांस [ज]सा पीडतो त्याप्रमाणें त्यानें आपल्या वेगानें देवांचें मर्दन केलें ६९. तो मोठ्या धन[ु]ष्यास सज्ज करून दोघां वसूशीं भिडला. तेव्हां शत्रूंचें दमन करणारे ते दोघे आप व [अ]निल वसु त्याच्यावर वर्षाव करूं लागले ७०. मेघांप्रमाणें ते दोघे परंतप दीप्त बाणांची [वृ]ष्टि करूं लागले. पण त्यांनीं सोडलेल्या दीप्त बाणांस त्या असुरानें मध्येंच अंतराळीं [तो]डले ७१. पण तें त्याचें कर्म असह्य वाटल्यामुळें ध्रुव त्याच्यावर धांवला. ते दोघेही [पृ]थक् शरवृष्टि करून एकमेकांस मारूं लागले. ते दोघेही देव व दैत्य उत्तम कुळांतले [शू]र व यशस्कर होते. दोन सिंह जसे नखांनीं अथवा दोन हत्ती आपापल्या दातांनीं [प]रस्पर पीडतात त्याप्रमाणें त्या दोघांनीं रथशक्ति व बाण यांच्या योगानें एकमेकांस

स्तंभयन्तौ च बलिनौ प्रतुदन्तौ स्थितौ रणे । चरन्तौ विविधान्मार्गान्मण्डलानि च भागशः ७५ मुद्गरैर्जघ्नतुः क्रुद्धावन्योन्यमभिमानिनौ । असिभ्यां चर्मणी दिव्ये विपुले च शरासने ७६ गिरिकृत्याचलसंकाशौ बाहुयुद्धं प्रचक्रतुः । व्यूढोरस्कौ दीर्घभुजौ नियुद्धकुशलावुभौ ७७ बाहुभिः समसज्जेतामायसैः परिघैरिव । तयोरासीद्भुजाघातैर्निग्रहः प्रग्रहस्तथा ७८ अतीव भीमः संह्लादो वज्रपर्वतयोरिव । द्विपाविव विषाणाग्रैः शृंगैरिव महावृषौ ७९ अन्योन्यमभिसंरब्धौ मुहूर्तं पर्यकर्षताम् । ततः पराजितो देवो बलकेन तथा ध्रुवः। रथं त्यक्त्वा भयात्तस्य प्रणष्टः प्राङ्मुखो वसुः ८० [ २१८१ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामन प्रा० चतुःपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५४ ॥

वैशंपायन उवाच ॥ पुनरेव तु तत्रासीन्महायुद्धं सुदारुणम् । क्रुद्धस्य नमुचेश्चैव धरस्य च महात्मनः १ संरब्धौ च महाबाहू महेश्वासावरिन्दमौ । परस्परमुदैक्षेतां दहन्ताविव लोचनैः २ विस्फार्य च महाचापं हेमपृष्ठं दुरासदम् । संरंभात्स वसुश्रेष्ठस्त्यक्त्वा प्राणानयुध्यत ३ ससायकमयैर्जालैर्धरो दैत्यरथं प्रति । भानुमद्भिः शिलाधौतैर्भानोः प्राच्छादयत्प्रभाम् ४ ततः प्रहस्य नमुचिर्धरस्य च शिलाशितान् । असृजत्सायकान्दीप्तान्भीमवेगान्दुरासदान् ५ महातेजा महाबाहुर्महावेगो महारथः । विव्याधातिबलो दैत्यो नवभिर्निशितैः शरैः ६ स तोत्रैरिव मातंगो वार्यमाणः पतत्रिभिः । अभ्यधावच्च संक्रुद्धो नमुचिर्न-

---

छिन्न–भिन्न केलें. शरीरांचा निर्भेद करीत, बाणांनीं क्षतें पाडीत आणि एकमेकाचें स्तंभन करीत ते दोघे बलाढ्य वीर एकमेकांस पीडा देत रणांत उभे राहिले. ते नानाप्रकारच्या पवित्र्यावर मंडलें घेत चालले. होते ७२–७५ ते अभिमानी रागावून एकमेकांस मुद्गरांनीं मारीत सुटले. तरवारी, दिव्य ढाली व विपुल धनुष्यें यांच्या योगानें, ज्यांच्या भुजा दीर्घ आहेत, उरःस्थलें विपुल आहेत, जे युद्धांत अति कुशल आहेत व स्वतः पर्वताकार आहेत, असे ते दोघे शौर्यानें लढूं लागले ७६, ७७, लोखंडी परिघांसारख्या बाहूंनीं ते एकमेकांशीं भिडले. भुजांच्या आघातांनीं त्यांचा परस्पर निग्रह व प्रग्रह ( धरणें व सोडविणें ) सुरू झाला. ७८. वज्र व पर्वत यांचा संयोग झाला असतां जसा मोठा ध्वनि होतो. त्याप्रमाणें एकमेकींवर हापटणाऱ्या त्यांच्या भुजांचा मोठा ध्वनि झाला. दोन हत्ती जसे दातांच्या अग्रांनीं अथवा दोन बैल शिंगानीं एकमेकांस जर्जर करितात त्याप्रमाणें रागावलेले ते दोन घटका एकमेकास पीडा देत राहिले. शेवटीं बलदैत्यानें ध्रुव देवाचा पराभव केला तेव्हां तो वसु भयानें रथ सोडून व विमुख होऊन पळून गेला ७९, ८०. इति श्रीमहा० खि० हरि० भ० चौपन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५४. ॥

वैशंपायनः— पुनः तेथें क्रुद्ध झालेला नमुचि व महात्मा धर यांचें अति दारुण व फार मोठें युद्ध झालें ? ज्यांची धनुष्यें फार मोठीं आहेत असे महाबाहु शत्रुनाशक वीर अतिशय रागावले. नेत्रांनीं जणुं काय जाळीत असल्याप्रमाणें त्यांनीं परस्परांकडे पाहिलें १,२. आपलें दुर्धर्ष व ज्याला सोन्याची पाठ आहे असें महा चाप आकर्ण ओढून व प्राणांची आशा सोडून वसुश्रेष्ठ वेगानें लढूं लागला ३. तो धर शिळेवर पाजळलेल्या व म्हणूनच चमकणाऱ्या, बाणजालांनीं दैत्याच्या रथावरील सूर्याची प्रभा आच्छादित करता झाला ४. तेव्हां नमुचि हसून शिळेवर पाजळलेले, दीप्त, भयंकर वेगवान् व दुर्धर्ष बाण धरावर सोडूं लागला ५. तो महातेजस्वी, महाबाहु, महावेगवान्, व महारथ बल

सुसत्तमः ७ तमापतन्तं वेगेन संरंभान्नमुची रणे । दैत्यः प्रत्यसरद्देवं मत्तो मत्तमिव द्विपम् ८
ततः प्राध्मापयच्छंखं भेरीशतनिनादितम् । विक्षोभ्य तद्दलं हर्षादुद्धूतार्णवसप्रभम् ९
अश्वानृक्षसवर्णाभान्हंसवर्णैः सुवाजिभिः । मिश्रयन्समरे दैत्यो वसुं प्राच्छादयच्छरैः १०
समाश्लिष्टावथान्योन्यं वसुदानवयोरथौ । दृष्ट्वा प्राकंपत मुहुस्त्रिदशानां महद्बलम् ११
क्रोधसंरंभताम्राक्षौ प्रेक्षमाणौ मुहुर्मुहुः । गर्जन्ताविव शार्दूलौ प्रभिन्नाविव वारणौ १२
महामेघोपमं रौद्रमासीदायोधनं तयोः । रथाश्ववरसंबाधं मत्तवारणसंकुलम् १३ समाज-
मिव तं दृष्ट्वा प्रेक्षमाणा महारथाः । आशंसंतो जयं ताभ्यां योधा वै नैकसंश्रयाः १४
तयोः प्रेक्षन्त संरंभं सन्निकृष्टमहास्त्रयोः । सिद्धगन्धर्वमुनयो देवदानवयोस्तदा १५ तौ
च्छादयन्तावन्योन्यं समरे निशितैः शरैः । शरजालावृतं व्योम चक्रतुश्च महाबलौ १६
तावन्योन्यं जिघांसन्तौ शरैस्तीक्ष्णैर्महारथौ । प्रेक्षणीयतमावास्तां वृष्टिमन्ताविवांबुदौ १७
सुवर्णविकृतान्बाणान्प्रमुञ्चन्तावरिन्दमौ । भास्कराभं तदाकाशमुल्काभिरिव चक्रतुः १८
तयोः शराः प्रकाशन्ते देवदानवयोस्तदा । पंक्तयः शरदमत्तानां सारसानामिवांबरे १९

---

दैत्य नऊ तीक्ष्ण बाणांनीं त्याला वेध करिता झाला ६. चाबकांनीं जसा हत्ती त्याप्रमाणें बाणांच्या योगानें निवारण केला जाणारा तो उत्तम बसु रागावून नमुचीच्या सन्मुख धांवला ७. तेव्हां एक मत्त हत्ती दुसऱ्या मत्त गजावर जसा जातो त्याप्रमाणें नमुची दानव वेगानें धांवून येणाऱ्या त्या देवावर रागानें गेला ८. त्यानंतर त्यानें शेंकडों नगाऱ्यांच्या नादानें युक्त असलेला ( म्हणजे त्यांचा नाद होत असतांना ) शंख वाजविला. व हर्षानें क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें ज्याची प्रभा आहे अशा सैन्यास क्षुब्ध करून रीसाप्रमाणें ज्यांची कांति आहे अशा अश्वांस हंसाप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे अशा अश्वामध्यें मिसळून सांडीत, तो दैत्य रणांगणांत वसूला बाणांनीं आच्छादित करून सोडता झाला ९,१०. त्यानंतर तो वसु व दानव यांचे रथ एकमेकांस येऊन भिडले. तेव्हां तो देखावा पाहून देवांचें मोठें सैन्य चळचळ कांपूं लागलें ११. ज्याचे नेत्र क्रोधानें लाल झाले आहेत असे ते दोघे एकमेकांकडे वारंवार पाहत होते. ते दोघे गर्जना करणाऱ्या शार्दूलाप्रमाणें अथवा मदस्राव करणाऱ्या हत्तीप्रमाणें त्यावेळीं भासलें १२- महामेघांनीं व्याप्त झालेल्या आकाशाप्रमाणें त्यांची युद्धभूमि भयंकर झाली. त्यावेळीं रथ व उत्तम अश्व यांची तेथें मोठी गर्दी उडाली. तें स्थान मत्त हत्तींनीं व्यापलें १३. एकाद्या समाजाप्रमाणेंच युद्धस्थानाला पाहून त्यादोघां वीरांनाच पहात रहाणारे दोन्ही पक्षांतील महारथी त्यांच्या विजयाची आशा करूं लागले १४. ज्यांनीं आपलीं महा अस्त्रें बाहेर काढलीं आहेत अशा त्या दोघां देव–दानवांचा क्षोभ सिद्ध, गंधर्व व मुनि पहात राहिले १५. समरांत एकमेकांस तीक्ष्ण बाणांनीं आच्छादित करणाऱ्या त्या दोघां महाबलाढ्यांनीं आकाशास बाणसंघांनीं आच्छादित करून सोडलें १६. एकमेकांस तीक्ष्णबाणांनीं मारण्याची इच्छा करणारे ते दोघे महारथ वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें अतिशय प्रेक्षणीय झाले १७. त्यावेळीं सुवर्णाच्या योगानें सुंदर झालेल्या बाणांचा वर्षाव करणारे ते दोघे शत्रुनाशक आकाशास उल्कांनीं व सूर्यप्रभेनें युक्त असल्यासारखेंच जणुं काय करते झाले १८. त्या देव–दानवांचे बाण आकाशांत शरदृतुंत मत्त झालेल्या सारसांच्या पंक्तीप्रमाणें शोभले १९. नभस्तल जसें मेघांनीं झांकून जातें

त्रिदशाश्वगजानां हि शरीरैर्गतजीवितैः। क्षणेन संवृता भूमिर्मेघैरिव नभस्तलम् २० ततः सुधारं ज्वलितं सूर्यमण्डलसन्निभम्। धराय वसवे मुक्तं चक्रं नमुचिना रणे। पतताऽनेन चक्रेण धरस्य स्यन्दनोत्तमः २१ सध्वजः सायुधः साश्वो दग्धोऽर्ककिरणप्रभः। स त्यक्त्वा स्यन्दनं देवः प्रदीप्तं चक्रतेजसा २२ भयात्तस्यासुरेन्द्रस्य गतः स्वगृहमुत्तमम्। पराजित्य सुरं दैत्यो नमुचिर्बलगर्वितः २३ प्रयातः स्वेन सैन्येन भूयः सुरचमूं प्रति। यौ तौ मयश्च त्वष्टा च देवदैत्येषु विश्रुतौ २४ प्रवरौ विश्वकर्माणौ मायाशतविशारदौ। घोरस्तयोः संप्रहारः प्रावर्तत सुदारुणः २५ अन्योन्यस्पर्द्धिनोस्तत्र चिरात्प्रभृतिसंयुगे। त्वष्टा तु निशितैर्बाणैर्दैत्यं तु बलदर्पितम् २६ पराक्रान्तं पराक्रम्य विव्याधत्रिशतैः शरैः। मयस्तु प्रतिविव्याध त्वष्टारं निशितैः शरैः २७ सुघातैः सुप्रसन्नाग्रैः शातकुंभविभूषितैः। ननाददितिजश्रेष्ठो हतस्त्वष्टुः शरैर्मयः २८ संक्रुद्धो दैत्यसैन्यस्य विचिन्वन्निव जीवितम्। शक्तिं कनकवैडूर्यचित्रदण्डां महाप्रभाम् २९ देवो गृहीत्वा समरे दैत्येन्द्रं समपातयत्। भीमां सर्वायसीं दृष्ट्वा पुरंदर इवाशनिः ३० तां त्वष्टुर्भुजनिर्मुक्तामर्कवैश्वानरप्रभाम्। मयश्चिच्छेद तीक्ष्णाग्रैस्तूर्णं समभिराशुगैः ३१ ततः क्षुब्धन्निव प्राणांस्त्वष्टुः कोपान्महासुरः। प्रेषयामास संरब्धः शरान्बर्हिणवाससः ३२ चिच्छेद बाणांस्त्वष्टा तानुज्ज्वलितैर्नतपर्वभिः। दैत्यस्य सुमहावेगैः सुवर्ण-

---

त्याप्रमाणें देवांच्या मेलेल्या—हत्ती—घोडे इत्यादिकांच्या—शरीरांनीं भूमि क्षणांत आच्छादित झाली २०. त्यानंतर ज्याला उत्तम धार आहे व जें सूर्यमंडलासारखें दीप्त आहे, असें चक्र नमुचीनें रणांत धर—वसूवर सोडलें. पडणाऱ्या त्या चक्रानें धराचा उत्तम व सूर्यकिरणासारखी ज्याची प्रभा आहे अशा रथास ध्वज, आयुधें व घोडें यांसह जाळून टाकलें. तेव्हां तो देव चक्र तेजानें पेटलेल्या रथाला सोडून त्या असुरेंद्राच्या भयानें आपल्या उत्तम गृहास गेला. याप्रमाणें त्या देवाचा पराभव करून बलानें गर्वित झालेला नमुचि दैत्य आपल्या सैन्यासह पुनः देवचमूवर चालून गेला. देव व दैत्य यांमध्यें प्रख्यात असलेले जे श्रेष्ठ विश्वकर्मे त्वष्टा व मय, ते शेंकडों मायांमध्यें कुशल होते. त्यांचा घोर व अतिदारुण संग्राम सुरू झाला २१--२५. फार दिवसांपासून एकमेकांशीं स्पर्धा करीत असलेले ते त्या संग्रामांत भिडले. त्वष्टा पाजळलेल्या तीक्ष्ण बाणांनीं बलदर्पित दैत्यास मारूं लागला २६. पराक्रम करणाऱ्या त्या दैत्याला त्यानें अधिक पराक्रम करून तीनशें बाणांनीं वेध केला. तेव्हां मयानें प्रसन्न तीक्ष्ण शरांनीं त्वष्ट्याला उलट वेध केला २७. ज्यांचा प्रहार असह्य आहे, अग्रें प्रसन्न आहेत व जे सोन्यानें भूषित आहेत अशा बाणांनीं त्वष्ट्यास मारून मयासुर मोठ्यानें सिंहनाद करूं लागला २८. तेव्हां रागावलेला त्वष्टा दैत्यसैन्याचें जणुं काय जीवितच शोधीत, शक्ति घेता झाला. तिचा दंड सोनें व वैडूर्य यांच्या योगानें विचित्र केलेला होता. तिची प्रभा फार मोठी होती २९. पुरंदर, जसा अशनी फेंकतो त्याप्रमाणें तो देव त्या भयंकर लोखंडी गदेला नेम धरून समरांत दैत्यावर टाकता झाला ३०. पण त्वष्ट्याच्या हातांतून सुटलेल्या व सूर्य आणि अग्नि यांप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या गदेला मयानें ज्यांचीं अग्रें तीक्ष्ण आहेत अशा सात बाणांनीं सत्वर तोडून टाकलें ३१. त्यानंतर तो महाअसुर रागानें क्षुब्ध होऊन जणुं काय त्वष्ट्याचे प्राणच घेत असल्याप्रमाणें मोरांच्या पिसांनीं अलंकृत केलेल्या बाणांस सोडता झाला ३२. पण

विकृन्तैः शरैः ३३ तौ वृषाविव नर्दन्तौ बलिनौ वासितान्तरे । शार्दूलाविव चान्योन्यं प्रसक्तावभिजघ्नतुः ३४ अन्योन्यं प्रतियुध्यन्तावन्योन्यवधकांक्षिणौ । अन्योन्यमभिवीक्षन्तौ क्रुद्धावाशीविषा विव ३५ महागजाविवासाद्य विषाणाग्रैः परस्परम् । शरैः पूर्णायतोत्सृष्टैरन्योन्यमभिजघ्नतुः ३६ ततः सुविपुलां दीप्तां मयो रुक्मांगदो गदाम् । त्वष्टुरि प्राहिणोत्क्रुद्ध सर्वप्राणहरां रणे ३७ तया जघानातिरथस्त्वष्टुरुत्तमवाजिनः । गदया दानवः क्रुद्धो वज्रेणेन्द्र इवाचलान् ३८ ततः क्रुद्धो महादैत्यः क्षुराभ्यामथ संयुगे । पुनर्द्वाभ्यां शराभ्यां तु निशिताभ्यां महारणे ३९ ध्वजं त्वष्टूरथं च्छित्वा सूतं निन्ये यमक्षयम् । महाबलान्महावेगान्स्तदश्वान्गदयाहनत् ४० दृष्ट्वा त्वष्टा हतं सूतमश्वांश्च विनिपातितान् । हताश्वं रथमुत्सृज्य सूतं च पतितं भुवि ४१ विस्फारयन्महाचापं स्थितो भूमाविवाचलः । हताश्व सूतं विरथं दृष्ट्वा रिपुमवस्थितम् ४२ जयश्रिया सेव्यमानो दीप्यमान इवानलः । मयः कालान्तकप्रख्यश्चापपाणिरदृश्यत ४३ प्रादहद्देवसैन्यानि दावाग्निरिव काननम् । त्वष्टुः सोऽक्षिपतात्युग्रो नाराचांस्तिग्मतेजसः ४४ चतुर्दश शिलाधौतान्सायकान्विविधाकृतीन् । तेपपुस्तस्य सैन्यस्य शोणितं रुक्मभूषणाः ४५ आशीविषा इव क्रुद्धा भुजंगाः कालचोदिताः । ते क्षितिं समवर्तन्त शोभन्ते रुधिरोक्षिताः ४६ अर्धप्रविष्टाः संरब्धा बिलानीव महोरगाः । तं प्रत्यविध्यत्त्वष्टा

---

त्वष्ट्यानें दैत्याच्या त्या बाणांस ज्यांचीं टोकें वाकविलीं आहेत व ज्यांस सोन्यानें भूषित केलें आहे अशा महा वेगवान बाणांनीं तोडून टाकलें ३३. ते डुरकणाऱ्या दोघां बैलांप्रमाणें अथवा सिंहांप्रमाणें एकमेकांस मारण्याच्या उद्योगांत अगदीं निमग्न झाले ३४. एकमेकांस ठार करण्याची इच्छा करणारे ते दोघे रागावलेल्या सर्पांप्रमाणें एकमेकांकडे पाहूं लागले ३५. दांतांच्या अग्रांवर उचलून महागज जसे एकमेकांस मारतात त्याप्रमाणें ते दोघे आकर्ण ओढून सोडलेल्या बाणांनीं परस्परांस जर्जर करूं लागले ३६. त्यानंतर मयानें सोन्याची दीप्त गदा रागानें त्वष्ट्यावर सोडली. ती रणांत सर्वांचे प्राण हरण करणारी होती ३७. त्या गदेच्या योगानें त्या क्रुद्ध अतिरथानें त्वष्ट्याचे उत्तम घोडे मारून टाकले. इंद्र वज्रानें अचलांस जसें तोडतो तसेंच त्यानें तें कर्म केलें ३८. त्यानंतर क्रुद्ध झालेला महा दैत्य संग्रामांत पुनः पाजळलेल्या तीक्ष्ण दोन बाणांच्या योगानें त्वष्ट्याचा ध्वज मोडून त्याच्या सारथ्यास यमसदनीं पाठविता झाला. आणि त्यानें त्याच्या महाबलाढ्य, महावेगवान् सदश्वांस गदेनें मारलें ३९,४०. तेव्हां सारथ्याला मारून घोड्यांनाही यानें पाडलें आहे, असें पाहून ज्याचे घोडे व सारथि भूमीवर मरून पडले आहेत अशा रथास सोडून व आपलें महाचाप सज्ज करून, टणत्कार करीत, त्वष्टा भूमीवर उभा राहिला. पण ज्याच्या रथाचे घोडे व सारथि मेले आहेत अशा विरथ होऊन भूमीस्थित असलेल्या शत्रूस पाहून ४१,४२. जयश्री कडून सेविला जाणारा, अग्निप्रमाणें चमकणारा, व हातांत चाप घेतलेला मय कालान्तकासारखा दिसला ४३. दावाग्नि जसा अरण्याला जाळतो त्याप्रमाणें त्यानें देवांच्या सैन्याला जाळलें. त्वष्ट्यावरही त्या अति उग्र दैत्यानें तीक्ष्ण तेजस्वी बाण सोडले ४४. शिळेवर पाणी दिलेले व नाना आकाराचे चवदा बाण त्यानें देवांवर सोडले. सोन्यानें भूषित केलेल्या त्यांनीं त्यांच्या सैन्याचें रक्त प्राशन केलें. त्याच्या शरीरांतून बाहेर पडलेले व रक्तानें माखून भूमीवर लोळणारे ते बाण कालानें प्रेरणा केलेले जणुं काय क्रुद्ध विषारी सर्पच आहेत, असा भास झाला.

तु जांबूनदविभूषितैः ४७ चतुर्दशभिस्त्युग्रैर्नाराचैरभिदारयत् । ते तस्य दैत्यस्य भुजं सव्यं निर्भिद्य प्राणिणः ४८ विदार्य विविशुर्भूमिं पन्नगा इव वेगिताः । तेऽप्रकाशन्त नाराचाः प्रविशन्तो वसुन्धराम् ४९ अस्तं गच्छन्तमादित्यं प्रविशन्त इवांशवः । मयस्त्रिभिरथानर्च्छत्त्वष्टारं तु पतत्रिभिः ५० सुपर्णवेगैर्विकृतैर्ज्वलद्भिः प्राणनाशनैः । त्वष्टाथ मयनिर्मुक्तैः सायकैरर्दितः प्रभुः ५१ अपयातो रणं हित्वा व्रीडयाभिसमन्वितः । तं तत्र हतसूतं च भुजंग इव निर्विषम् ५२ त्वष्टारं विरथं कृत्वा मुदितः स तु दानवः । विस्फार्यमाणो रुचिरं चापं रुक्मांगदं दृढम् ५३ रणे व्यतिष्ठद्दैत्येन्द्रो ज्वलन्निव हुताशनः । पुलोमा तु बलश्लाघी दृप्तो दानवसत्तमः ५४ रणेश्वेतहयेनेह सार्द्धं युध्यति वायुना । सर्वेषामेव भूतानां यः प्राणः कथ्यते द्विजैः ५५ बलिना कालकल्पेन वायुना सह संगतः । पुलोम्नस्तत्र पवनः श्रुत्वा ज्यातलनिःस्वनम् ५६ नामृष्यत यथा मत्तो गजः प्रतिगजस्वनम् । दैत्यचापच्युतैर्बाणैः प्राच्छाद्यंत दिशो दश ५७ रश्मिजालैरिवार्कस्य विततं सांबरं जगत् । स ताम्रनयनः क्रुद्धः श्वसन्निव महोरगः ५८ वृतो दैत्यशतैर्वायू रश्मिवानिव भास्करः । दैत्यचापभुजोत्सृष्टाः शरा बर्हिणवाससः ५९ रुक्मपुंखाः प्रकाशन्त हंसाः श्रेणीकृता इव । चापध्वजपताकाभ्यश्छत्रादीषमुखायुगात् ६० प्रपतन्तश्च दृश्यन्ते दैत्यस्यायुतशः शराः । एवं सुतीक्ष्णान्खचराञ्छल-

---

भूमीमध्यें अर्धे रुतरलेले ते, रागावलेले महासर्प जणुं काय बिळांतच शिरत आहेत, असें वाटलें. असो; पण त्वष्ट्यानें सोन्यानें भूषित केलेल्या चवदा अति उग्र बाणांनीं त्या दैत्याला वेध करीत, त्यांचें प्रतिविधान केलें. ते बाण त्या दैत्याचा उजवा हात फोडून व त्याला फाडून वेगवान्, सर्पाप्रमाणें, भूमींत शिरले. पृथ्वींत प्रवेश करणारे ते बाण त्यावेळीं अस्त पावणाऱ्या आदित्यामध्यें प्रवेश करणाऱ्या किरणांप्रमाणें दिसले. पण इतक्यांत मयानें त्वष्ट्यावर तीन बाण सोडले ४५–५०. त्याचा वेग गरुडाच्या वेगाप्रमाणें असून आकार विक्राळ होता. दीप्तीनें जणुं काय जळणारे ते प्राणनाश करणारेच होते. तेव्हां मयानें सोडलेल्या त्या बाणांनीं पीडलेला प्रभु त्वष्टा अतिशय लज्जायुक्त होऊन व रण सोडून गेला. याप्रमाणें ज्याच्या सारथ्यास मारून विषरहित भुजंगाप्रमाणें केलें आहे अशा त्वष्ट्यास विरथ करून तो दानव अतिशय मुदित झाला. तो दैत्येंद्र जळणाऱ्या अग्नीप्रमाणें रणांत आपलें दृढ, सुंदर व सुवर्णभूषित धनुष्य सज्ज करून उभा राहिला. आपल्या बलाची श्लाघा करणारा दृप्त दानवश्रेष्ठ पुलोमा त्यावेळीं ज्याच्या रथाला पांढरे घोडे जोडले आहेत अशा वायूशीं लढूं लागला. ब्राह्मणांकडून जो सर्व भूतांचा प्राण म्हणून सांगितला जातो त्या बलाढ्य कालसदृश वायूशीं तो भिडला. त्या रणांत वायु पुलोम्याच्या धनुर्गुणाचा टणत्कार ऐकून, जसा गज प्रतिगजाच्या ध्वनीस सहन करूं शकत नाहीं त्याप्रमाणें त्याला सहन करूं शकला नाहीं. दैत्याच्या चापापासून सुटलेल्या बाणांनीं दश दिशा आच्छादित झाल्या ५१-५७. त्यामुळें जणुं काय सूर्याच्या किरणसमूहानेंच आकाशासह सर्वजग भरून गेलें. क्रुद्ध झाल्यामुळें ज्याचे नेत्र लाल झाले आहेत असा तो फुसकरणाऱ्या महासर्पासारखा भासला ५८. दैत्याच्या बाणांनीं आवृत झालेला वायु किरणवान् सूर्यासारखा दिसला. दैत्याच्या धनुष्यापासून बळकट भुजांनीं आकर्ण ओढून सोडलेले, पंखयुक्त व सोन्याच्या बुंध्याचे बाण ओळीनें जाणाऱ्या हंसांप्रमाणें दिसले. दैत्याचें चाप ध्वज पताका, छत्र, ईषामुख ( फाळ)

भानिव पावके ६१ सुवर्णविकृतान् चित्रान्मुमोच दितिजः शरान् । तमन्तकमिव क्रुद्धमा-पतन्तं स मारुतः ६२ त्यक्त्वा प्राणानतिक्रम्य विव्याध नवभिः शरैः । तस्य वेगमसंहार्यं दृष्ट्वा वायुः सनातनः ६३ उत्तमं जवमास्थाय व्यधमत्सायकव्रजान् । ततो विधम्य बल-वाञ्छरजालानि मारुतः ६४ विव्याध दैत्यं विंशत्या विशिखैर्नतपर्वभिः । मरुद्गणानां प्रवरा दश दिव्या महौजसः ६५ साधुसाध्विति वेगेन सिंहनादं प्रचक्रिरे । तस्मिन्समु-त्थिते शब्दे तुमुले लोमहर्षणे ६६ अभ्यधावन्त दितिजाः पौलोमाः क्रोधमूर्च्छिताः । ते समासाद्य पवनं समावृण्वन् शरोत्तमैः ६७ पर्वतं वारिधाराभिः प्रावृषीव बलाहकाः । ते पीडयन्तः पवनं क्रुद्धाः सप्त महारथाः ६८ प्रजासंहरणे घोराः सोमं सप्तग्रहा इव । ततो दक्षिणमक्षोभ्यं नानारत्नविभूषितम् ६९ करं गजकराकारमुद्यम्य युधि मारुतः । तेषां मूर्द्धसु दैत्यानां पातयामास वीर्यवान् ७० निहता वायुवेगेन तेन सप्त महारथाः । त्यक्त्वा प्राणान् पुलोमा तु विव्याध नवभिः शरैः ७१ प्रदर्पितमसंहार्यं दृष्ट्वा वायुं सनातनम् । असंचिंत्यं सुरौघांस्तानुज्ज्वलितांश्च पुलोमतः ७२ तेषां विदार्य तेजांसि दानवानां महात्मनाम् । शोणि-ताक्लिन्नमुकुटा गैरिकाक्ता इवाद्रयः ७३ ते भिन्नवर्मास्थिभुजाः पतन्तो भान्ति दानवाः । मातंगयूथसंभग्ना पुष्पिता इव पादपाः ७४ तेषां विदारितैर्देहैर्दानवानां महात्मनाम् । ततः

---

जूं इत्यादि सर्वांपासून लक्षावधि बाण भराभर निघून येत आहेत, असें दिसलें. याप्रमाणें अतिशय तीक्ष्ण सुवर्णभूषित व विचित्र बाण दितिज जेव्हां वायूवर सोडूं लागला तेव्हां आकाशचर पतंगच अग्नींत पडत आहेत असें भासलें. पण यमाप्रमाणें येत असलेल्या त्या क्रुद्ध दैत्याला पाहून वायु प्राण देण्याचा निश्चय करून व त्याचा अतिक्रम करून नऊ बाणांनीं त्याला वेध करता झाला. सनातन वायु त्याच्या वेगाला प्रतिबंध करतां येण्यासारखा ५९-६६, उत्तम वेग धारण करून त्याच्या बाणसमूहास उडवूं लागला. त्यानंतर बलवान् वायु शरसमूहास उडवून टोकें नमविलेल्या वीस बाणांनीं दैत्याला वेध करता झाला. तेव्हां मरुद्गणांचे श्रेष्ठ, दिव्य व महाबलाढ्य दहा वीर ‘ साधु साधु ’ असें ह्मणून वेगानें सिंहनाद करूं लागले. त्या समरांत तो रोमहर्षण तुमुल ध्वनि निघाला असतां क्रोधानें मूर्च्छित झालेले पुलोमपुत्र दैत्य सन्मुख धांवले. ते वायूपाशीं येऊन ह्मणजे वर्षाकाळीं मेघ जसे जलधारांनीं पर्वताला वेढतात त्याप्रमाणें त्याला उत्तमशरांनीं वेढून टाकिते झाले. प्रजेचा संहार करावयाचा असतां घोर सात ग्रह जसे सोमाला पीड-तात त्याप्रमाणें रागावलेले ते सात महारथी पवनाला पीडा देऊं लागले. तेव्हां क्षोभ न पावणारा, नानारत्नांनीं अतिशय भूषित, व गजाच्या सोंडेच्या आकाराचा आपला उजवा हात उंच उचलून वीर्यवान् वायूनें युद्धांत त्या दैत्यांच्या मस्तकांवर मारला. तेव्हां त्या वायुवेगानें ते सात महारथ मरण पावले. त्यानंतर सनातन वायु दर्पयुक्त व संहार न करतां येण्यासारखा आहे, असें पाहून पुलोमा दैत्यानें सर्व सामर्थ्य खर्च करून नऊ बाणांनीं त्याला वेध केला. पण पुलोम्याच्या त्या अति घोर व दीप्त बाणांचाही फारसा विचार न करतां ६७-७२. वायूनें त्या महात्म्या दानवांचीं तेजें हरण केलीं. तेव्हां ज्यांचे मुकुट रक्तानें भरले आहेत असे दैत्य गेरूनें युक्त असलेल्या पर्वताप्रमाणें दिसले. ज्यांचीं कवचें, हाडें व भुजा छिन्न-भिन्न झाल्या आहेत, असे भरभर पडणारे ते दानव हत्तींच्या कळपानें तोडून, फोडून, सोडलेल्या पुष्पित वृक्षाप्रमाणें भासले ७३, ७४. त्या महात्म्या

प्रावर्तत नदी रौद्ररूपा भयावहा ७५ प्रस्रवन्ती रणे रक्तं भीरूणां भयवर्द्धिनी । देवैर्दैत्यगणैश्चैव रुधिरौघपरिप्लुता ॥ रणभूमिरभूद्रौद्रा तत्र तत्र सहस्रशः ७६ संभूता गतसत्त्वैश्च यक्षराक्षसखेचरैः । सानुगैः सपताकैश्च सोपासंगरथध्वजैः ७७ शीर्णकुंभैस्तथा नागैर्घण्टाभिस्तु विभूषितैः । सुवर्णपुंखैर्ज्वलितैर्नाराचैस्तिग्मतेजसैः ७८ देवदानवनिर्मुक्तैः सविषैरुरगैरिव । प्रासतोमरनाराचैः शक्तिखड्गपरश्वधैः ७९ सुवर्णविकृतैश्चापि गदामुशलपट्टिशैः । कनकांगदकेयूरैर्मणिभिश्च सकुण्डलैः ८० तनुत्रैः सतलत्रैश्च हारैर्निष्कैश्च शोभनैः । हतैश्च दितिजैस्तत्र शस्त्रस्यन्दनवर्जितैः ८१ पतितैरपि विद्धैश्च शतशोऽथ सहस्रशः । निपातितध्वजरथो हतवाजिरथद्विपः ८२ विमर्दो देवदैत्यानां सदृशः कर्मणा बभौ । अथ दैत्यसहस्रेण पौलोमेन महारथः ८३ संवृतः पवनः श्रीमान्गदामुशलपाणिना ८४ ते जघ्नुः शतसाहस्राः पवनं दानवोत्तमाः । तैर्वध्यमानः स बभौ समंतादर्पितैः शरैः ८५ हत्वाष्टौ तत्र योधानां शतानि पवनः प्रभुः । कृत्वा मार्गं सुरश्रेष्ठो ननाद सुमहारथः ८६ अद्यापि च सुविस्तीर्णः पंथाः संदृश्यते दिवि । नाम्ना वायुरथो नाम सिद्धाः पश्यन्ति तं दिवि ८७ वैशंपायन उवाच ॥ हयग्रीवस्तु दितिजः पूषाणं प्रतिवीर्यवान् । ननाद सुमहानादः सिंहनादं महारथः ८८ विस्फार्य सुमहच्चापं हेमजालविभूषितम् । पूषाणं दितिजोऽपश्यत्क्रुद्धो

---

दानवांच्या विदीर्ण झालेल्या देहांनीं तें रणांगण भरून गेलें. त्यांच्या शरीरांपासून रक्ताची नदी वाहूं लागली. अति भयंकर रूप व भयावह असलेली ती नदी रणांतून रक्तरूपानें वहात असतांना भीरूंचें भय वाढवूं लागली. रक्ताच्या ओघानें भरलेली ती रणभूमि ठिकठिकाणचे सहस्रावधि देव व दैत्यगण यांच्या योगानें भयावह झाली. ज्यांचे प्राण निघून गेले आहेत अशा—अनुचर, पताका, सांगोपांग रथध्वज इत्यादिकांसह—यक्ष राक्षस खेचराच्या योगानें ती भूमि भयंकर झाली ७५–७७. ज्यांचीं गंडस्थळें फुटलीं आहेत व जे घंटांनीं अतिशय भूषित झाले आहेत अशा हत्तींनीं तिळा मोठी शोभा आणली. ज्यांचे पुंखे सोन्याचे आहेत व ज्यांचें तेज अति तीक्ष्ण आहे अशा देवदानवांनीं सोडलेल्या सविष सर्पांसारख्या ज्वलित बाणांनीं, प्रास, तोमर, बाण, शक्ति, खड्ग, परशु ७८, ७९, सोन्यांनीं भूषित केलेल्या गदा, मुसळें व पट्टे यांनीं, सोन्याचीं रत्नजडित बाहूभूषणें, कडीं, कुंडलें यांच्या योगानें ८०, तलत्राणांसह कवचें व सोन्याच्या नाण्यांचे सुंदर हार यांनीं, तेथें मरून पडलेल्या व शस्त्रें, रथ इत्यादिकांनीं रहित असलेल्या दैत्यांनीं आणि विद्ध होऊन पडलेल्या दुसऱ्याही शेंकडों व हजारों प्राण्यांनीं व्यापलेली ती भूमि अतिशय भयंकर झाली. ज्यामध्यें अनेक ध्वज व रथ पडले आहेत, घोडे-हत्ती व रथ मेले आहेत असा तो देव व दैत्य यांचा विमर्द त्यांच्या कर्माला शोभेलसाच झाला. असो; पुलोम्याच्या सहस्रावधि दैत्यांकडून वेढलेला महारथ श्रीमान् वायु रणांत उभा होता. दानवसैन्यांतील वीरांच्या हातांत गदा व मुसळें होतीं. ते सहस्रावधि उत्तम दानव वायूला मारते झाले. चोहों बाजूंनीं ज्याच्यावर बाणांचा वर्षाव होत आहे असा वायु त्यावेळीं फार शोभला ८१-८५. त्यावेळीं प्रभु वायूनें आठशें दैत्यांस मारून मार्ग केला व तो महारथ देवश्रेष्ठ सिंहनाद करूं लागला ८६. वायूनें केलेला तो मोठा विस्तीर्ण मार्ग आकाशांत अद्यापि दिसतो. वायुरथ असें त्याचें नांव असून सिद्ध त्याला आकाशांत पहातात ८७. वैशंपायनः— ( राजन्, याप्रमाणें वायूचा विजय झाला. ) नंतर वीर्यवान् हयग्रीव दैत्य

घोरेण चक्षुषा ८९ भुजाभ्यामाददानस्य संदधानस्य वै शरान् । मुंचतः कर्षतो वापि ददृशुस्तत्र नान्तरम् ९० अग्निचक्रोपमं दीप्तं मण्डलीकृतकार्मुकम् । तदासीद्दानवेन्द्रस्य सव्यदक्षिणमस्यतः ९१ रुक्मपुंखैस्ततस्तस्यचापमुक्तैः शितैःशरैः । प्राच्छाद्यंतशिलाधौतैर्दिशःसूर्यस्यचप्रभाः ९२ ततः कनकपुंखानां शराणां नवपर्वणाम् ९३ नभश्चराणां नभसि दृश्यन्ते बहवो व्रजाः । गिरिकूटनिभाच्चापात्प्रभवंतः शरोत्तमाः ९४ श्रेणीभूताः प्रकाशन्ते यान्तः श्येना इवांबरे । गृध्रपत्राञ्छिलाधौतान्कार्तस्वरविभूषितान् ९५ महावेगान्प्रशस्ताग्रान्मुमोच दितिजः शरान् । ततश्चापबलोद्भूताः शातकुंभविभूषिताः ९६ देहे समवकीर्यन्त पूष्णः सुनिशिताः शराः । ते व्योम्नि रुक्मविकृताः संप्रकाशन्त सर्वशः ९७ खद्योता इव घर्मान्ते खे चरन्तः समंततः । शिलाधौताः प्रसन्नाग्राः पूषाणं सिषिचुः शराः९८ पर्वतं वारिधाराभिर्यथा प्रावृषि तोयदाः । ततः प्रच्छादयामास पूषाणं शरवृष्टिभिः ९९ पर्वतं वारिधाराभिश्छादयन्निव तोयदः । ततः स पूष्णो देवस्य बलं वीर्यं पराक्रमम् १०० व्यवसायं च सत्वं च पश्यन्ति त्रिदशाद्भुतम् । तां समुद्रा दिवोद्भूतां शरवृष्टिंसमुत्थिताम् १ नाचिंतयत्तदा पूषा दैत्यं चाभ्यद्रवद्रणे । हेमपृष्ठं महानादं पूष्ण आसीन्महाधनुः २ विकृतं

---

पूषा देवावर गेला. त्या महारथानें फार मोठा सिंहनाद केला ८८. सोन्याच्या जाळीनें भूषित केलेले अतिशय मोठें धनुष्य सज्ज करून व ओढून क्रुद्ध झालेल्या दैत्यानें घोर दृष्टीनें पूषा-देवास पाहिलें ८९. दोन्ही हातांनीं बाण घेत असलेल्या, त्यांना दोरीशीं जोडीत असलेल्या, आकर्ण ओढीत असलेल्या व सोडीत असलेल्या त्याच्या क्रियेंतील अंतर कोणालाही दिसलें नाहीं ९०. उजव्या व डाव्या हातांनीं बाण सोडीत असलेल्या दानवेंद्राचें धनुष्य गोलाकार व अग्निचक्रासारखें अतिशय दीप्त दिसत होतें ९१. ज्यांना सोन्याचे बुंधे आहेत व ज्यांना शिळांवर पाजळलें आहे अशा त्याच्या धनुष्यापासून सुटलेल्या तीक्ष्ण बाणांनीं सर्व दिशा व सूर्याच्या प्रभा आच्छादित झाल्या ९२. त्यानंतर ज्यांना सोन्याचीं बुंधें आहेत ज्यांचीं अग्रें नमविली आहेत, व जे आकाशांतून जात आहेत अशा बाणांचे अनेक समूह दिसूं लागले पर्वताच्या शिखरासारख्या धनुष्यापासून निघालेले उत्तमशर आकाशांतून ओळीनें जाणाऱ्या श्येनपक्ष्यांप्रमाणें दिसले. तो दितिज ज्यांना गृध्रांचें पंख लाविले आहेत, धोंड्यावर पाज ळलें आहे व सोन्यानें अतिशय भूषित केलें आहे ९३–९५. अशा अतिवेगवान् व प्रशस्त अग्रांच्या बाणांस सोडूं लागला. त्यानंतर धनुष्याच्या शक्तीनें वर उडालेले व सोन्यानें अति भूषित झालेले, ९६. अतिशय तीक्ष्ण बाण पुषाच्या शरीरावर येऊन पडूं लागले असतां सर्व बाजूंनीं सोन्यानें सुंदर केलेले ते आकाशांत चमकत होते ९७. त्यामुळें ग्रीष्मऋतूच्या शेवटीं आकाशांत समंततः फिरणाऱ्या काजव्याप्रमाणें ते दिसले. असो; याप्रमाणें शिळांवर घासलेले व त्यामुळेंच ज्यांचीं अग्रें स्वच्छ आहेत असे शर पुषा—देवावर पडूं लागले ९८. वर्षतेंत मेघ जलधारांनीं पर्वताला जसें झांकून सोडतात त्याप्रमाणें तो पुषाला शरवृष्टीनें आच्छादित करता झाला ९९. त्यानंतर देव त्या पुषा देवाचें अद्भुत बल, वीर्य, पराक्रम, व्यवसाय, व सत्त्व पाहते झाले १००. आकाशांतून सतत होणाऱ्या जलवृष्टीला समुद्र जसें जुमानीत नाहींत त्याप्रमाणें पुषानें त्या दैत्याला व त्याच्या बाणवृष्टीला मुळींच जुमानिलें नाहीं. तर तो रणांत त्याच्यावर धांवला. ज्याला सोन्याची पाठ आहे व ज्याचा नाद

मंडलीभूतं शक्राशनिमिवापरम् । ततः शराः प्रादुरासन्पूरयन्त इवांबरम् ३ सुवर्णपुंखाः पूष्णस्ते प्रभवन्तः शरासनात् । मालेव रुक्मपुंखानां वितता व्योम्नि पत्रिणाम् ४ प्रादुरासीन्महाघोरा बृहती पूषकार्मुकात् । ततो व्योम्नि विभक्तानि शरजालानि सर्वशः ५ आहतानि व्यशीर्यन्त शरैः सन्नतपर्वभिः । ततः कनकपुंखानां शराणां कंकवाससाम् ६ पततां पात्यमानानां खमासीच्चावृतं रणे । पूषा प्रापूरयद्बाणैर्हयग्रीवं शिलाशितैः ७ नामांकैरर्कसदृशैर्दिव्यहेमपरिष्कृतैः । ततो व्यसृजदुग्राणि शरजालानि दानवः ८ अमर्षी बलवान् क्रुद्धो दिधक्षन्निव पावकः । पूष्णस्त्वा जौध्वजंचैवपताकांधनुरेवच ९ रश्मीन्योक्त्राणिचाश्वानां हयग्रीवोरणेच्छिनत् । अथाप्यश्वान्पुनर्हत्वाचतुर्भिः सायकोत्तमैः १० सारथिं सुमहातेजा रथोपस्थादपातयत् । कृतस्तु विरथः पूषा हयग्रीवेण संयुगे ११ पूषा तस्य रथाभ्याशात्सयौ तेन वै जितः । गतः शक्ररथाभ्याशं मुक्तो मृत्युमुखादिव १२ तत्राद्भुतमिदं भूयो युद्धं वर्तत दारुणम् । कृतप्रतिकृतं घोरं शंबरस्य भगस्य च १३ सप्तकिष्कुपरीणाहं द्वादशारत्निकार्मुकम् । चापं चाशनिनिर्घोषं दृढज्यं भारसाधनम् । विक्षिपन्नक्षसदृशान्व्यसृजत्सायकान्बहून् १४ क्रोधसंरक्तनयनः शंबरः सर्वयोगवित् । तेन विद्राव्यमानानि देवसैन्यानि सर्वशः १५ समकंपंत भीतानि सिन्धोरिव महोर्मयः । तमापतंतं संप्रेक्ष्य विरूपाक्षं

---

फार मोठा आहे असें त्या देवाचें महा धनुष्य होतें १, २. तें विक्राळ व मंडलाकार असल्यामुळें जणुं काय दुसरें इंद्राचें वज्रच होतें. त्याच्यापासून जणुं काय आकाशास भरून सोडीत असल्याप्रमाणें बाण निघत होते ३. पुषाच्या धनुष्यापासून सोन्याच्या बुंधांचे बाण भराभर निघूं लागले. त्यामुळें आकाशांत त्यांची माळच पसरली आहे असा भास झाला ४. सारांश पुषाच्या धनुष्यापासून अशी मोठी घोर शरवृष्टि उत्पन्न झाली. बाणसमूह आकाशांत पसरले. त्या नमलेल्या टोकांच्या बाणांच्या योगानें प्रतिबद्ध झालेलीं शत्रूंचीं अस्त्रें भराभर खालीं पडलीं. त्यानंतर ज्यांना सोन्याचे बुंधे आहेत व ज्यांस कंकपक्ष्यांचे पंख लाविले आहेत अशा पडलेल्या व पडत असलेल्या शरांच्या योगानें त्या रणांतील आकाश भरून गेलें. पुषा देवानें पाजळलेल्या बाणांनीं हयग्रीवाला भरून सोडलें. ५-७. त्यांवर त्याचें नामचिह्न होतें. दिव्य सोन्यानें भूषित केलेले ते बाण सूर्यासारखे चमकत होते. त्यानंतर जाळण्याची इच्छा करणाऱ्या अग्नीसारख्या, चिडून गेलेल्या क्रुद्ध व बलाढ्य दानवानेंही शत्रूवर उग्र शरसमूह सोडला. त्या हयग्रीवानें रणांत पुषादेवाचा ध्वज, पताका, धनुष्य, घोड्यांचे लगाम, व चाबुक यांस एकाच वेळीं तोडलें. नंतर चार उत्तम बाणांनीं त्याच्या घोड्यांस मारून त्या महातेजस्वी दैत्यानें सारथ्यास रथावरून खालीं पाडलें. याप्रमाणें हयग्रीवानें संग्रामांत पुषाला विरथ केलें. ८-११ तेव्हां त्याच्याकडून पराभूत झालेला पुषा त्याच्या रथापासून दूर निघून गेला. जणुं काय मृत्युमुखांतूनच सुटलेला तो इंद्राच्या रथापाशीं गेला १२. इतक्यांत तेथें पुनः शंबर व भग यांचें मोठें दारुण युद्ध सुरू झालें. त्यांत त्यांनीं एकमेकांच्या अस्त्रांचा प्रतीकार केला १३. ज्याचा विस्तार सात हात व लांबी बारा अरत्निप्रमाण आहे, ध्वनि अशनीच्या गडगडाटासारखा आहे, गुण अति दृढ आहे, व जें भार सहन करणारें आहे अशा धनुष्यास आकर्ण ओढून शंबर दानव अनेक बाणांस सोडूं लागला. सर्व युक्त्या जाणणाऱ्या त्याचे नेत्र त्यावेळीं क्रोधानें अतिशय लाल झाले होते. सागराच्या मोठ्या

विभीषणम् १६ भगः प्रस्फुरमाणोष्ठस्त्वरमाणो व्यदारयत् । ततो भगो महेष्वासो दिव्यं विस्फारयन् धनुः १७ अवाकिरन्दैत्यगणाञ्छरजालेन छादयत् । तमभ्यागाद्भगो दैत्यं तूर्णमस्यन्तमन्तिकात् १८ मातंगमिव मातंगो वृषं प्रति वृषो यथा । तौ प्रगृह्य महावेगौ धनुषी भारसाधने १९ प्रच्छादयेतामन्योन्यं तक्षमाणौ रणे शरैः । तयोःसुतुमुलं युद्धमासिद्धोरंमहारणे ११० भगशंबरयोर्भीममप्रमेयं महात्मनोः । अथ पूर्णायतोत्सृष्टैः शरैः सन्नतपर्वभिः २१ व्यदारयेतामन्योन्यं कार्ष्णैर्निर्भिद्य चर्मणी । तौ तु विकृतसर्वांगौ रुधिरेण समुक्षितौ २२ संप्रेक्षमाणौ रथिनावुभौ परमदुर्मदौ । तक्षमाणौ शितैर्बाणैर्नवीक्षितुमशक्नुताम् २३ अथ विद्याधसमरे त्वरमाणोऽसुरो भगम् । नाराचैः क्रोधताम्राक्षः कालान्तकयमोपमः २४ गरुत्मानिव चाकाशे पोथयानो महोरगम् । नाराचान्यपतन्देहे तूर्णं शंबरचोदिताः २५ तानतरिक्षे नाराचान्भगश्चिच्छेद पत्रिभिः । ज्वलंतमचलप्रेष्यंवैश्वानरसमप्रभम् २६ ततो भगं चतुःषष्ट्या विद्याधासुरसत्तमः । शिलीमुखैर्महावेगैर्जांबूनदविभूषितैः २७ तदा तत्सुचिरं कालं युद्धं समभिवाभवत् । शंबरस्य च मायाभिर्नादृश्यत ततोम्बरम् २८ दोर्भ्यां चिक्षिपतश्चाप रणे विष्टभ्य तिष्ठतः । श्रूयते

---

लाटा जशा कांपत असतात त्याप्रमाणें त्या दैत्यानें ज्यांस सर्वंशः भिवविलें आहे अशीं देवांचीं भ्यालेलीं सैन्यें चळवळ कांपूं लागलीं. पण विक्राळ नेत्रांचा अतिशय भयंकर दैत्य धांवून येत आहे असें पाहून ११४-११६ ज्याचे ओंठ स्फुरण पावत आहेत असा भग त्वरा करून त्याचें विदारण करिता झाला. त्यानतर ज्याचें धनुष्य फार मोठें आहे असा तो आपलें दिव्य धनुष्य सज्ज करून व त्याला आकर्ण ओढून दैत्यगणास बाणवृष्टीनें आच्छादित करिता झाला. हत्तीवर जसा हत्ती अथवा बैलावर बैल धांवून जातो त्याप्रमाणें भग देव लागलाच त्या बाण सोडीत असलेल्या दैत्यापाशीं आला. मोठा भार सहन करणारीं दोन धनुष्यें घेऊन ते दोघेही महावेगवान् वीर रणांत बाणांच्या योगानें एकमेकांस ताशींतच असल्याप्रमाणें अच्छादित करते झाले. भग व शंबर या महात्म्यांचें त्या मोठ्या रणांगणांत अति तुमुळ घोर भयंकर, व अप्रमेय युद्ध झालें. त्या दोघांनीं धनुष्याची दोरी आकर्ण ओढून सोडलेल्या नतपर्व पोलादी बाणांनीं एकमेकांची कवचें फोडून परस्परांस फाडलें. त्यामुळें त्यांचीं सर्वांगें विकृत झालीं. ते दोघेही रक्तानें माखले २२. ते दोघेही रथी अतिशय दुर्मद असून एकमेकांकडे पहात होते. एकमेकांची शरीरें तीक्ष्ण शरांनीं तासणाऱ्या त्यांच्याकडे कोणी पाहूं शकले नाहींत २३. असें घोर युद्ध चाललें असतां क्रोधानें ज्यांचे नेत्र लाल झाले आहेत व त्यामुळें जो कालांतक यमाप्रमाणें दिसत आहे असा असुर त्वरा करून भग देवाला युद्धांत वेध करता झाला २४. गरुड आकाशांत महा सर्पाला जसा मारीत असतो त्याप्रमाणें तो शत्रूला पीडा देऊं लागला. शंबरानें ज्यास प्रेरणा केली आहे असे बाण सत्वर भगाच्या देहांवर आदळूं लागले २५ पण भगानें त्यांतील बहुतेक बाणांस आपल्या बाणांनीं अंतरिक्षांतच तोडलें. तेव्हां पर्वताप्रमाणें अचल होऊन राहिलेल्या, दीप्त व त्यामुळेंच अग्नीप्रमाणें ज्याची प्रभा आहे अशा भगास असुरश्रेष्ठानें सोन्यानें अतिशय भूषित केलेल्या महावेगवान् व तीक्ष्ण साठ बाणांनीं वेध केला.२६-२७. त्याप्रसंगीं तें त्यांचें युद्ध फार वेळ झालें. इतक्यांत शंबराच्या मायांनीं आकाश दिसेनासें झालें २८. दोन्ही हातांनीं बाण फेकीत रणांत रथाचा आश्रय करून स्थित

धनुषः शब्दोः विस्फूर्जितनिवाशनिः २९ स भगस्य हयान्हत्वा सारथिं च महाहवे । अभ्यवर्षच्छरैरेनं पर्जन्य इव वृष्टिमान् १३० न तस्यासीदनिर्भिन्नं गात्रे द्व्यंगुलमंतरम् । भग देवस्य दैत्येन शंबरणास्त्रघातिना ३१ दैत्यस्य चाद्भुतं दिव्यमस्त्रमस्त्रेण वारयन् । मायायुद्धेन मायावी शंबरोस्तमयो भवत् ३२ अवंचयद्भगं दैत्यो मायाभिर्लाघवेन च । भगस्तस्य रथं साश्वं शरवर्षैरवाकिरत् ३३ सहस्रमायो द्युतिमान्देवसेनां निषूदयन् । अदृश्यत शरैश्छन्नः शंबरः शतशो रणे ३४ अदृश्यत्पतितो भूमौ गतचेता इवासुरः । अथ स्म युध्यते भूयः शतधा शैलसन्निभः ३५ दिशागजेंद्रमारूढो दृश्यते स पुनर्बली । प्रादेशमात्रश्च पुनः पुनर्भवति शैलवत् ३६ महामेघ इव श्रीमानूतिर्यगूर्ध्वं च सोऽभवत् । पुनः कृत्वा विरूपाणि विकृतानि च सर्वश ३७ सर्वां भीषयते सेनां देवानां भीमदर्शनः । ते भीताः प्रपलायन्ते सिंहं दृष्ट्वा मृगा यथा । ततः सोऽन्यं वरं देहं कृत्वा प्रांशुतरं पुनः ३८ गच्छत्यूर्ध्वगतिं घोरो दिशः शब्देन पूरयन् । नभस्तलगतश्चापि वर्षते वासवो यथा ३९ संवर्तकाम्बुदप्रख्यः पूरयन्पृथिवीतलम् । संवर्तकोऽनलश्चैव भूत्वा भीमपराक्रमः १४० शतवर्त्मा शतशिखो ददाह च पुनः सुरान् । मुहूर्ताच्च महाशैलः शतशीर्ष शतोदरः ४१ अदृश्यत दिवस्तंभ शतशृंग इवाचलः । येऽन्ये दैत्याश्च साध्याश्च ये च विश्वे च देवताः ४२ क्षिपंत्यस्त्राणि दिव्यानि

---

असलेल्या त्याच्या धनुष्याचा शब्द मात्र अशनीच्या गडगडाटाप्रमाणें ऐकूं येत होता २९. त्यानें भगाचे घोडे मारून त्या महा संग्रामांत सारथ्यालाही गतप्राण करून सोडलें, नंतर वृष्टि करणाऱ्या मेघाप्रमाणें त्यानें भगावर शरांचा वर्षाव केला १३०. अस्त्रांचा आघात करणाऱ्या शंबर दैत्यानें त्या भग देवाच्या शरीरावर दोन बोटें जागाही क्षतावाचून ठेवली नाहीं ३१. भगसूर्यानेंही दैत्याच्या अद्भुत दिव्य अस्त्राचें आपल्या अस्त्रानें निवारण केलें. पण मायावी शंबर मायायुद्धानें गुप्त झाला. माया व चपलता यांच्या योगानें दैत्यानें भगाला फसविलें. भगानेंहीं त्याच्या अश्वयुक्त रथावर शरवृष्टि केली ३२,३३. पण ज्याच्यापाशीं सहस्र माया आहेत असा द्युतिमान् व बाणांनीं आच्छादित झालेला शंबर देवसेनेचा संहार करीत आहे, असें दिसलें ३४. क्षणांत तो असुर गतप्राण होऊन भूमीवर पडला आहे असें आढळलें. इतक्यांत तो पर्वतासारखा होऊन पुनः शतधा युद्ध करीत आहे, असा भास झाला. पुनः तो बळी दिग्गजावर आरूढ झाला आहे, असें भासलें, तो एका क्षणांत टीचभर व लागलाच पर्वताकार होत असे ३५,३६. सारांश तो श्रीमान् महामेघाप्रमाणें तिरकस व उंच झाला. पुनः सर्वशः विक्राळ व विरूप दिसला ३७. याप्रमाणें तो भयंकर दैत्य देवांच्या सर्व सेनेला भिववूं लागला. सिंहाला पाहून पशु जसे पळतात त्याप्रमाणें देव त्याला पाहून पळूं लागले. तेव्हां तो घोर दैत्य पुनः दुसरा अति उंच, व श्रेष्ठ देह करून दिशांना आपल्या शब्दानें भरून सोडीत वर उडून गेला आणि आकाशांत स्थित होऊन इंद्रासारखा वृष्टि करूं लागला ३८, ३९. संवर्तक मेघांसारखा पृथ्वीतलास भरून सोडीत तो भयंकर पराक्रमी संवर्तक अग्नि झाला १४०. शंभर मार्ग व शंभर शिखा यांनीं प्रदीप्त झालेला तो देवांस जाळूं लागला. कांहीं वेळानें तो शंभर शिखरें व शंभर गुहा यांनीं भूषित महा पर्वत झाला ४१. तो शंभर शृंगांचा अचल त्यावेळीं आकाशस्तंभासारखा दिसला. दुसरे दैत्य, साध्य, व विश्वेदेव त्याच्यावर जीं दिव्य अस्त्रें फेंकीत

तानि सोऽग्रसतासुरः। युध्यमानश्च समरे सरथः सोऽसुरोत्तमः ४३ गन्धर्वनगराकारस्तत्रै-वान्तरधीयत। ते भीताः समुदीक्षन्त त्रिदशा भीमविक्रमाः ४४ सहस्रमायं समरे शंबरं चित्रयोधिनम्। स अग्नी भयसंत्रस्तो दानवेंद्रस्य संयुगे ४५ रथं त्यक्त्वा महाभागो महेन्द्रं शरणं गतः। पराजित्य तु तंदेवं दानवेन्द्रः प्रतापवान् ४६ गतो यत्र महातेजा जातवेदा महाप्रभः। स वह्निं वाग्भिरुग्राभिः क्रुद्धस्तर्जयते बली। भवाम्येष हि ते मृत्युरित्युक्त्वान्त-रधीयत ४७ वैशंपायन उवाच॥ एतस्मिन्नन्तरे चैव ब्राह्मणेन्द्रो महाबलः। जघान सोमः शीतास्त्रो दानवानां चमूं रणे ४८ कैलासशिखराकारो द्युतिमद्भिर्गणैर्वृतः। अवधीद्दानवान्दृष्ट्वा दण्डपाणिरिवान्तकः ४९ पोथयद्रथवृंदानि वाजिवृन्दानि वै प्रभुः। दैत्येषु विचरञ्छ्रीमान्युगान्ते कालवद्बली १५० सासर्षद्रिथजालानि उरुवेगेन चन्द्रमाः। ददाह दानवान्सर्वान्दावाग्निरिव चोदितः ५१ मृन्दन्रथेभ्यो रथिनो गजेभ्यो गजयोधिनः। सादिनश्चाश्वपृष्ठेभ्यो भूमौ चापि पदातिनः ५२ शीतेन व्यधमत्सर्वान्वायुर्वृक्षानिवौजसा। चन्द्रमाः सुमहातेजा दानवानां महाचमूम् ५३ तदस्त्रमभवत्तस्य प्रदिग्धं शत्रुशोणितैः। पिनाकमिव रुद्रस्य क्रुद्धस्याभिघ्नतः पशून् ५४ युगान्तकोपमः श्रीमान् दैत्येषु व्यचरद्बली। आवार्य महतीं सेनां आद्रवन्तीं पुनः पुनः ५५ चन्द्रं मृत्युमिवायान्तं दृष्ट्वा योधा विसिस्मयुः।

---

होते त्यांस तो उत्तम असुर रथारूढ होऊन, समरांत युद्ध करीत असतांना भराभर गिळून टाकूं लागला ४३. गंधर्वनगरासारखा तो तेथल्यातेथेंच गुप्त होत असे. भयंकर पराक्रम करणारे देव भयभीत होऊन ज्याच्यापाशीं सहस्रावधि माया आहेत अशा समरांत विचित्र युद्ध करणाऱ्या संबरासुराकडे पहात राहिले. त्या दानवेंद्राशीं संग्राम करतांना भयभीत झालेला महाभाग भग आपला रथ सोडून महेंद्राला शरण गेला. तेव्हां त्या देवाचा पराभव करून प्रतापवान् दानवेंद्र जेथें महाप्रभावान्, महातेजस्वी अग्नि होता तेथें गेला. बलाढ्य व क्रुद्ध झालेल्या त्यानें उग्र शब्दांनीं अग्नीची निर्भर्त्सना केली. हा पहा मी आतांच तुझा मृत्यु होतो, असें ह्मणून तो गुप्त झाला ४४-४७. वैशंपायनः—इतक्यांत महाबल शीतास्त्र व द्विजांचा राजा सोम दानवांच्या सेनेला रणांत मारूं लागला ४८. ज्याच्या हातांत दंड आहे अशा अंतकाप्रमाणें, ज्याचा आकार कैलास शिखरासारखा आहे, असा तेजस्वी गणांनीं वेष्टित झालेला चंद्र दानवांस पाहून मारूं लागला ४९. युगांतींच्या कालाप्रमाणें दैत्यांमध्यें संचार करणारा तो श्रीमान् प्रभु रथसमूह व अश्वसमूह यांस हापटून मारूं लागला १५०. दावाग्नीप्रमाणें क्रोधानें भडकलेला तो चंद्रमा मोठ्या वेगानें रथसंघ व सर्व दानव यांस जाळून टाकूं लागला ५१. रथावरून लढणाऱ्या रथीविरांस, गजांवरून युद्ध करणाऱ्या गजयोद्ध्यांस, घोड्यांच्या पाठींवरून हल्ला करणाऱ्या घोडेस्वारांस व पायानें रणभूमीवर चालून शत्रूंशीं भिडणाऱ्या पायदळांतील लोकांस त्यानें भूमींवर पाडविलें ५२ वायु वेगानें वृक्षांस जसा पाडवितो त्याप्रमाणें महातेजस्वी चंद्रमा दानवांच्या महाचमूस आपल्या शीतानें मारून टाकता झाला ५३. त्याचें शीत—अस्त्र, रागावून जीव पशूंस मारणाऱ्या रुद्राच्या पिनाकाप्रमाणें शत्रूंच्या रक्तानें भरलें ५४. युगान्तकाची ज्याला उपमा आहे, असा तो बलाढ्य श्रीमान् पुनः पुनः पळणाऱ्या मोठ्या सेनेला अडवून दैत्यांमध्यें संचार करूं लागला ५५. साक्षात् मृत्यूप्रमाणें येत असलेल्या चंद्राला पाहून

यतो यतः प्रक्षिपति शिशिरास्त्रं तमोनुदः ५६ ततस्ततो व्यशीर्यन्त दैत्यसैन्यानि संयुगे । व्यदारयत्स सैन्यानि स्वबलेनाभिसंवृतः ५७ ग्रसमानमनीकानि व्यादितास्यमिवान्तकम् । तं तथा भीमकर्माणं गृहीतास्त्रं महाहवे ५८ दृष्ट्वा शशांकमायान्तं दैत्यानां चन्द्रभास्करौ । तालमात्राणि चापानि कर्षमाणौ महाबलौ ५९ छादयेतां शरैश्चन्द्रं वृष्टिमन्ताविवांबुदौ । अथ विस्फार्यमाणानां कार्मुकाणां सुरासुरैः १६० अभवत्सुमहाशब्दो दिशः सन्नादयन्निव । विनदद्भिर्महानागैर्हेषमाणैश्च वाजिभिः ६१ भेरीशंखनिनादैश्च तुमुलं सर्वतोऽभवत् । युयुत्सवस्ते संरब्धा जयगृद्धा यशस्विनः ६२ अन्योन्यमभिगर्जंतो गोष्ठेष्विव महावृषाः । शिरसां पात्यमानानां समरे निशितैः शरैः ६३ अश्मवृष्टिरिवाकाशे ह्यभवत्सेनयोस्तयोः । कुण्डलोष्णीषधारीणि जातरूपस्रजांसि च ६४ पतितानि स्म दृश्यन्ते शिरांसि रणमूर्धनि । विशिखैर्मथितैर्गात्रैर्बाहुभिश्च सकार्मुकैः ६५ सहस्राभरणैश्चान्यैर्विच्छिन्नैरुधिरोक्षितैः । कवचैरावृतैर्गात्रैरुरुभिश्चन्दनोक्षितैः ६६ मुखैश्च चन्द्रसंकाशैस्तप्तकुण्डलभूषणैः । गजवाजिमनुष्याणां सर्वगात्रैः समंततः ६७ आसीत्सर्वा समाकीर्णा मुहूर्तेन वसुन्धरा । चापमेघाश्च विपुलाः शस्त्रविद्युत्प्रकाशिनः । वाहनानां च निर्घोषः स्तनयित्नुसमोऽभवत् ६८ स संप्रहारस्तुमुलः कटुकः शोणितोदकः । प्रावर्तत सुराणां च दानवानां च संयुगे १६९ [ २३५० ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनप्रादुर्भावे पंचपंचाशत्तमोऽध्यायः ॥५५॥

---

योद्धे विस्मित झाले. अंधकाराचा नाश करणारा तो जिकडून जिकडून शिशिरास्त्र फेंकीत होता, तिकडचीं तिकडचीं दैत्यसैन्यें संग्रामांत नाश पावत असत. स्वसैन्यानें सर्वतः परिवेष्टित झालेला तो शत्रूंच्या सैन्याचें विदारण करूं लागला ५६,५७. तोंड पसरलेल्या अंतकाप्रमाणें सैन्यांस ग्रासणारा, भयंकर कर्मे करणारा व अस्त्र धारण करणारा चंद्र महा संग्रामांत येत आहे, असें पाहून आपलीं ताडासारखीं उंच धनुष्यें आकर्ण ओढणारे व महाबलाढ्य दैत्यांचे चंद्र-सूर्य ५८,५९. शरांच्या योगानें वृष्टिमान् मेघांप्रमाणें चंद्रास झांकून सोडते झाले. देव व असुर यांच्याकडून आकर्ण ओढून सोडल्या जाणाऱ्या धनुष्यांचा फार मोठा शब्द झाला. त्यानें जणुं काय दिशांस नादित करून सोडलें. मोठा ध्वनि करणारे महागज व खिंकाळणारे घोडे, भेरी, शंख यांच्या नादानें सर्व तुमुल असल्यासारखें झालें. युद्धाची इच्छा करणारे. क्षुब्ध झालेले, जयाची इच्छा करणारे व यशस्वी असे ते सर्व गोठ्यांतील महावृषभांप्रमाणें एकमेकांवर गर्जना करीत चालले. समरामध्यें तीक्ष्ण शरांनीं पाडविल्या जाणाऱ्या शिरांची दोन्ही सैन्यावर आकाशांतून होणाऱ्या पाषाणवृष्टीसारखी वृष्टि झाली. कुंडलें व पागोटीं यांस धारण करणारीं व सुवर्णमालांनीं भूषित झालेलीं मस्तकें रणांगणांत पडलेलीं दिसलीं. बाणांच्या योगानें छिन्न-भिन्न झालेल्या गात्रांनीं, धनुष्ययुक्त बाहूंनीं ६०,६५, दुसऱ्याही अनेक आभरणांनीं भूषित झालेल्या व तुटलेल्या शरीरावयवांनीं, कवचांनीं आवृत झालेल्या व चंदनाच्या उटण्या लाविलेल्या पुष्ट गात्रांनीं, उंची सोन्याच्या कुंडलांनीं, भूषित झालेल्या चंद्रतुल्य मुखांनीं, गज, घोडे, मनुष्यें यांच्या सर्व अवयवांनीं सर्व पृथ्वी एका मुहूर्तांत व्याप्त होऊन गेली. त्या रणांत असंख्य चाप-मेघ असून, त्यांतील शस्त्रें विजेसारखीं प्रकाशमान होत होतीं. वाहनांचा निर्घोष मेघगर्जनेसारखा झाला ६६-६८ देव व असुर यांचा संग्रामांतील तो संप्रहार तुमुल, कडू व रक्त हेंच ज्यांत उदक वहात आहे, असा सुरू झाला १६९. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य प० वामनावतारासंबंधीं पंचावन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५५ ॥

वैशंपायन उवाच ॥ तस्मिन्महाहवे रौद्रे तुमुले लोमहर्षणे । ववर्षुः शरवर्षाणि संरब्धा देवदानवाः १ व्याक्रोशन्त गजास्तत्र शरघातप्रपीडिताः । अश्वाश्च पर्यधावन्त हतारोहा दिशो दश २ उत्पत्य निपतन्त्यन्ये शरवर्षप्रपीडिताः । देवानां दानवानां च गजाश्वरथिनां रणे ३ समरे तत्र शूराणामन्योन्यमभिधावताम् । धनुषां तलशब्देन न प्राज्ञायत किंचन ४ शरशक्तिगदाभिस्ते खड्गैश्चामिततेजसः । निजघ्नुर्महतीं सेनामन्योन्यस्य परंतप ५ बाहूनामुत्तमांगानां कार्मुकाणां च संयुगे । राशयस्तत्र दृश्यन्ते देवदैत्यसमागमे ६ अश्वानां कुंजराणां च रथानां च वरुथिनाम् । नांतं समभिगच्छन्ति निहतानां सुरासुरैः ७ गदाभिरसिभिः प्रासैर्भल्लैः सन्नतपर्वभिः । योधास्तत्राभ्यहन्यन्त हस्त्यश्वं चामितं बहु ८ प्रावर्तत नदी घोरा शोणितौघा तरंगिणी । तदा मध्ये तु सैन्यानां केशशैवलशाड्वला ९ हाहाकारो महाशब्दो योधानामभवत्तदा । दानवैर्हन्यमानानां त्रिदशानां महारणे १० वैशंपायन उवाच ॥ तेषां तदभवद्युद्धं देवानामसुरैः सह । बिभीषणं महारौद्रं विकृतं भीमदर्शनम् ११ विरोचनस्तु तत्रैव विष्वक्सेनं महाहवे । जघान रुधिराभाक्षं साध्यं परमधन्विनम् १२ तमायान्तमभिप्रेक्ष्य विष्वक्सेनः सुरैर्वृतः । अमेयात्मा सुरश्रेष्ठः प्रत्यविध्यत् स्तनान्तरे १३ स तस्य बाणाभिहतस्तोत्रार्दित इव द्विपः । विरोचनः प्रजज्वाल क्रोधेनाग्निरिवाध्वरे १४ स

---

वैशंपायनः—त्या भयंकर अंगावर कांटा उभा करणाऱ्या व तमुल महासंग्रामांत क्षुब्ध झालेले देव व दानव शरवर्षाव करते झाले १. बाणांच्या आघातांनीं पीडलेले गज तेथें आक्रोश करूं लागले. ज्यांच्यावरील स्वार मेले आहेत असे घोडे दशदिशेस पळत सुटले २. बाणवृष्टीनें अतिशय पीडित झालेलें दुसरें देव–दानवांचे गज, अश्व व रथी रणांत उडून पडले ३. त्या समरांत एकमेकांवर धांवणाऱ्या शूरांच्या धनुष्यांच्या टणत्कारांनीं कांहींच कळेनासें झालें ४. हे शत्रूंना ताप देणाऱ्या राजा, ते अमित तेजस्वी वीर बाण, शक्ति, गदा, खड्ग, इत्यादिकांच्या योगानें एकमेकांच्या सैन्यास मारूं लागले ५. देव व दैत्य यांच्या त्या समागमामध्यें तुटलेले बाहु व मस्तकें आणि धनष्यें यांच्या राशी दिसत होत्या ६. देव व असुर यांनीं मारलेल्या तेथील अश्वांची, हत्तींची, रथांची व सैन्याची संख्याच करतां येत नसे ७. त्या संग्रामांत योद्धे हत्ती, अश्व, रथ यांच्या अमित समूहास गदा, तरवारी प्रास, भाले व ज्यांचीं डोकें नमविलीं आहेत असे बाण यांच्या योगानें मारते झाले ८. तेथें मोठी नदी प्रवृत्त झाली. तिच्यामधून रक्ताचे ओघ वहात होते. तिच्यावर लाटा दिसत होत्या. सैन्याच्या मधून वाहणाऱ्या तिच्यामध्यें केंस हेंच शेवाळ व तीरावरील हिरवे गवत होतें ९ त्या महारणांत दानवांकडून मारल्या जाणाऱ्या देवांच्या योद्ध्यांचा मोठा आहाकार ध्वनि झाला १०. वैशंपायनः—असुरांशीं होत असलेलें तें देवांचें युद्ध अतिभयंकर, अति उग्र, व विकृत होतें. त्याचें नुसतें दर्शनही भयावह होतें ११. त्याच महासंग्रामांत विरोचन ज्याचे नेत्र रक्तासारखे लाल आहेत व ज्याच्या हातांत अति उत्कृष्ट धनुष्य आहे अशा विष्वक्सेन साध्यास मारता झाला १२. पण तो आपल्यावर चालून येत आहे, असें पाहून देवांकडून परिवेष्टित झालेला, अमेयात्मा, देवश्रेष्ठ विष्वक्सेनही त्याच्या उरांत बाण मारता झाला १३. पण त्या साध्याच्या बाणाचा ज्याला स्पर्श झाला आहे असा विरोचन चाबकानें प्रहार केलेल्या हत्तीप्रमाणें चिडला. यज्ञा-

कार्मुकविनिर्मुक्तैः शरैर्दानवसत्तमः । विष्वक्सेनं बिभेदाजौ दीप्तैः सप्तभिराशुगैः १५
सोऽतिविद्धो बलवता दानवेन सुरोत्तमः । मूर्च्छामभिजगामाशु ध्वजं चाप्याश्रयत्प्रभुः १६
ततः स पुनराश्वस्य साध्यो युद्धे मनो दधे । विस्फार्य च महाचापं दैत्यमध्ये व्यवस्थितः १७
विरोचनस्तु बलवानभ्ययुध्यत सर्वशः । क्षोभयन्सुरसैन्यानि समंताच्छिशितैः शरैः १८
ततस्तस्यासुरेन्द्रस्य युध्यमानस्य संयुगे । श्रूयते तुमुलः शब्दो जीमूतस्येव गर्जतः १९
जगर्ज च महाघोषो विनिघ्नन्देववाहिनीम् । चण्डवेगाश्मवर्षी च सविद्युत्स्तनयित्नु-
मान् २० दिशो विद्रावयामास शरवर्षेण दानवः । सर्वसैन्यानि देवानामुद्यतास्त्रो महा-
हवे २१ ते प्राद्रवन्त वित्रस्ता रथेभ्यो रथिनस्तदा । सादिनश्चाश्वपृष्ठेभ्यो भूमौ चापि
पदातयः २२ श्रुत्वा कार्मुकनिर्घोषं विस्फूर्जितमिवाशनेः । सर्वसैन्यानि भीतानि विव्य-
लीयन्त संयुगे २३ विरोचनभयत्रस्ता रथेभ्यो रथिनस्तदा । पदातीनां ययुः संघा यत्र देवः
शचीपतिः २४ विष्वक्सेनस्य साध्यस्य सर्वतः सुमहाबलः । पादे रक्षःसहस्राणि निज-
घान चतुर्दश २५ अश्ववृन्देषु नागेषु रथानीकेषु चाभिभूः । पदातीनां च संघेषु विनि-
घ्नन्प्रत्यदृश्यत २६ वितत्य श्येनवत्पक्षौ सर्वतः स वरूथिनीम् । भित्त्वा च्छित्त्वा महा-
बाहुः शिरांस्याजौ ह्यकृन्तत २७ सादिनश्च पदाताश्च हतशेषा रथास्तथा । विष्वक्सेनेन
सहिता विरोचनमथाद्रवन् २८ तेऽसिचर्मगदाशक्तिपरिघप्रासतोमरैः । तमेवानुप्रधावन्तः

---

तील अग्नीप्रमाणें तो क्रोधानें जळूं लागला १४. तो उत्तम दानव धनुष्यापासून सोड-लेल्या सात उत्तम, दीप्त व वेगवान् बाणांनीं विष्वक्सेनास प्रहार करता झाला १५. तेव्हां त्या बलवान् दानवाकडून फार मोठा प्रहार केला गेलेला तो प्रभु देवोत्तम मूर्च्छित झाला व लागलाच त्यानें ध्वजाचा आश्रय केला १६. पण तो साध्य सावध होऊन पुनः युद्ध करण्याचें मनात आणूं लागला. आपलें मोठें चाप सज्ज करून तो दैत्यांच्या मध्यभागीं स्थित झाला १७. पण बलवान् विरोचन तीक्ष्ण शरांनीं सर्व बाजूंनीं देवसैन्यास क्षुब्ध-करीत युद्ध करूं लागला १८. त्यानंतर रणांत युद्ध करीत असलेल्या त्या असुरेंद्राचा तुमुल शब्द गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें ऐकूं येऊं लागला १९. देवांच्या सैन्यास मार-णाऱ्या त्यानें महाघोष केला. भयंकर वेगानें पाषाणाचा वर्षाव करणारा तो विद्युयुक्त मेघाप्रमाणें भासला २०. संग्रामांत ज्यानें धनुष्य उचललें आहे असा तो दानव शरवृष्टि करून देवांच्या सर्व सैन्यास दश दिशांकडे पळविता झाला २१. भ्यालेले रथी रथ सोडून पळाले. घोडेस्वार घोड्यावरून उड्याटाकून व पदाति भूमीवरच भयभीत होऊन पळून जाऊं लागले २२ अशनीच्या गडगडाटाप्रमाणें धनुष्याचा निर्घोष ऐकून सर्व सैन्यें भयभीत होऊन संग्रामांत अतिशय लीन झालीं २३. विरो-चनाच्या भयानें भ्यालेले रथी रथ सोडून व पदाती लोकांचेही संघ जेथें देव शचीपति होता तेथें गेले. त्या महाबलवान् राक्षसानें विष्वक्सेन साध्याच्या समोर त्याचे चवदा सहस्र रक्षक मारले २४,२५. तो पराभव करणारा वीर अश्वसमूह, हत्ती, रथसैन्य व पायदळांतले लोक यांमध्यें विशेष रीतीनें मारीत असलेला दिसला २६. तो महाबाहु श्येनपक्ष्याप्रमाणें दोन्ही हात ( पंख ) पसरून व सेनेस छिन्न-भिन्न करून रणांगणात शिरें तोडून पाडता झाला २७ पण मरून राहिलेले घोडेस्वार, पदाति व रथी-वीर विष्वक्सेनासह विरोचनावर धांवले २८. ते तरवार, ढाल, गदा, शक्ति, परिघ, तोमर,

सिंहनादं प्रचक्रिरे २९ ततः सोसिं समुद्यम्य जवमास्थाय दानवः । चकर्त रथिनामाजौ शिरांसि च धनूंषि च ३० रथनागाश्ववृन्देषु बलवानरिसूदनः । विरोचनश्चरन्मार्गान्प्रकारानेकविंशतिम् ३१ भ्रान्तमुद्भ्रान्तमाविद्धमाप्लुतं विप्लुतं युगम् । संपातं समुदीर्णंच दर्शयामास दानवः ३२ केचिद्वरासिना रुग्णा दानवेन महात्मना । विनेदुश्छिन्नवर्माणो निपेतुश्च गतासवः ३३ छिन्नपृष्ठा हतारोहा दानवेन महात्मना । विद्रुताः स्वान्यनीकानि जघ्नुस्त्रिदशवारणाः ३४ निपेतुरुर्व्यामाकाशे निकृत्ता दृढधन्विना । विविधास्तोमराश्चापा महामात्रशिरांसि च ३५ प्रतीपमाहन्नागानश्वांश्च भृशविक्षतान् । आप्लुत्य रथिनः कांश्चित्परामृश्य महाबलः ३६ सूतांश्चिच्छेद खड्गेन रथानपि च दानवः । मुहुरुत्पततो दिक्षु धावतश्च यशस्विनः ३७ मार्गांश्चरतश्चित्रान्व्यस्मयन्त ततोऽसुराः । निजघान पद्मा कांश्चिदाक्षिप्यान्यानपोथयत् ३८ खड्गेन चान्यांश्चिच्छेद नादेनान्यांश्च भीषयन् । ऊरुस्तंभगृहीताश्च निपतंत्यपरे भुवि । अपरे दैत्यमालोक्य भयात्प्राणानवासृजन् ३९ तस्मिंस्तथावर्तमाने युद्धे महति दारुणे । रथौघगजपत्तीनां सुराणां च महाक्षये ४० कुजंभो दानवश्रेष्ठो ह्यंशुमादित्यमाहवे । योधयामास समरे वृषः प्रतिवृषं यथा ४१ जघनाचलसंकाशो मत्तवारणविक्रमः । स्फुरद्भिर्निशितैस्तीक्ष्णशरैर्बहुभिराशुगैः ४२ देवसैन्यसहस्राणि सर-

---

प्रास यांस घेऊन त्याच्याच मार्गे धावत असतांना सिंहनाद करूं लागले २९ तेव्हां तो दानव तरवार उजलून व वेग धारण करून संग्रामांत रथ्यांचीं मस्तकें व धनुष्यें कापून टाकता झाला ३०. तो बलवान् शत्रुनाशक विरोचन रथ, गज व अश्ववृंद यामध्यें एकवीस प्रकारच्या मार्गांनीं संचार करूं लागला ३१. त्या दानवानें भ्रांत ( गरगर फिरणें ) उभ्द्रान्त ( वर उड्या मारून फिरणें ) आविद्ध ( मध्येंच गतीला प्रतिबंध करणें ) आल्पुत विल्पुत, युग, संपात, समुदीर्ण इत्यादि अनेक युद्ध प्रकार दाखविले ३२. त्या महात्म्या दानवानें कित्येकांस महा तरवारीनें रुग्ण ( रोगी ) केलें. तेव्हां ज्यांचीं कवचें तुटलीं आहेत असें ते आक्रोश करून व गतप्राण होऊन पडले ३३. ज्यांच्या पाठी फुटल्या असून वरील आरूढ होणारे वीर मेले आहेत असे देवांचे हत्ती पळत सुटले व त्यांनीं आपल्याच सैन्याचा चूर केला ३४. त्या दृढ धनुर्धरानें वरच्यावर तोडलेले नानाप्रकारचे तोमर, चाप, व महातांचीं शिरें भूमीवर पडलीं ३५. हत्ती व घोडे यांस अतिशय क्षतयुक्त करून त्यानें परतविलें. त्या महाबलानें कित्येक रथस्थ वीरांस उडी मारून स्पर्श केला आणि त्यांस व त्यांच्या सारथ्यांस खड्गानें तोडलें. वारंवार सर्व दिशांमध्यें पळणाऱ्या, धांवणाऱ्या, यशस्वी व विचित्र मार्गांनीं संचार करणाऱ्या त्याला पाहून असुर आश्चर्यचकित झाले. त्यानें कित्येकांस लाथेनें मारिलें. कित्येकांस ओढून हापटलें ३६-३८. कित्येकांस खड्गानें तोडलें. कित्येकांस आपल्या भयंकर आक्रोशानें भिवविलें. दुसरे कित्येक मोठ्या स्तंभांस धरून भूमीवर पडूं लागले. दुसऱ्या कित्येकांनीं त्या दैत्यास पाहून भयानेंच प्राण सोडले ३९. याप्रमाणें तें मोठें दारुण युद्ध सुरू झालें असतां, रथसमूह, गज, पायदळांतील लोक व देव यांचा महाक्षय चालला असतां ४०, कुजंभ दानवश्रेष्ठ संग्रामांत अंशुआदित्यास आव्हान करिता झाला. एक बैल दुसऱ्या प्रतिस्पर्धी बैलाशीं जसा झुंजतो त्याप्रमाणें तो त्याच्याशीं रणांत झुंजु लागला ४१. पर्वतासारखा उंच व मत्त हत्तीसारखा पराक्रमी असा तो पाजळलेल्या चमकणाऱ्या अनेक तीक्ष्ण बाणांनीं

थानि महाहवे । तस्य बाणपथं प्राप्यनाभ्यवर्तंत सर्वशः ४३ प्रणेदुः सर्वभूतानि बभूवुस्तिमिरा दिशः । देवानामजयः क्रूरः प्रत्यपद्यत दारुणः ४४ अंशस्तु दानवेंद्रस्य जघानोत्तमविक्रमः । अनीकं दशसाहस्रं कुंजराणां तरस्विनाम् ४५ आपतन्तं गजानीकं कुजंभो वीक्ष्य दानवः । गदापाणिरवारोहद्रथोपस्थादरिंदमः ४६ अद्रिसारमयीं गुर्वीं प्रगृह्य महतीं गदाम् । अभ्यद्रवद्गजानीकं व्यादितास्य इवान्तकः ४७ स गजान्गदया निघ्नन्व्यचरत्समरे बली । कुजंभो दानवश्रेष्ठो गदापाणिर्बलाधिकः ४८ विशीर्णदंतांश्च बहून्भिन्नकुंभांश्च दारुणान् । अकरोद्दानवश्रेष्ठ उद्दिश्योद्दिश्य तान्बली ४९ विशीर्णदंता बहवो भिन्नकुंभास्तथापरे । कुजंभेनार्दिता नागा व्यद्रवन्तदिशो दश ५० कुजंभस्य च येऽमात्या दानवा घोरविक्रमाः । नाराचैर्विविधैस्तीक्ष्णैरपास्त गजयोधिनः ५१ क्षुरैः क्षुरप्रैर्भल्लैश्च दात्रैरंजालिकैः शितैः । चिच्छेद चोत्तमांगानि कुजंभो दानवोत्तमः ५२ शिरोभिः प्रपतद्भिस्तु गगनं प्रत्यपूर्यत । आश्मवृष्टिरिवाकाशे बाहुभिश्च सहांकुशैः ५३ कृत्तोत्तमांगाः स्कन्धेषु गजानां गजयोधिनः । अदृश्यन्त महाराज ताला विशिरसो यथा ५४ आपतंतंमहानागमंशस्यासुरसत्तमः । जघानैकेषुणा क्रुद्धस्ततः सविमुखोऽभवत् ५५ विगाह्येवं गजानीकं कुजंभो दानवोत्तमः । विनिघ्नन्प्रवरान्सैन्यान्गदया बलिनां वरः ५६ एकप्रहाराभिहतान्कुजंभेन महागजान् । अपश्यन्तः सुराः सर्वे पर्वतानिव पातितान् ५७ कुजंभस्य च मार्गेषु विशीर्णास्ते

---

आदित्याला मारूं लागला ४२. त्या महायुद्धांत रथांसह देवांचीं सहस्रावधि सैन्यें त्याच्या बाणांच्या टप्प्यांत येऊन सर्व प्रकारें त्याच्या समोर उभीं राहिलीं नाहींत ४३. सर्व भूतें मोठा आक्रोश करूं लागलीं. दिशा अंधकार मय झाल्या. देवांचा पराजय मोठा दारुण व क्रूर झाला ४४. ज्याचा विक्रम उत्तम आहे, असा अंश दानवेंद्राच्या वेगवान् हत्तींचें दहासहस्र सैन्य मारता झाला ४५. पण आपल्या गजसैन्याचा संहार होत आहे, असें पाहून कुजंभ दानव हातांत गदा घेऊन रथावरून उतरला ४६. पर्वताप्रमाणें जिच्यामध्यें सार आहे अशी जड व मोठी गदा घेऊन, तोंड पसरलेल्या अन्तकाप्रमाणें त्याच्या गजसैन्याकडे तो चालला ४७ तो महाबलवान् व गदापाणि दानवश्रेष्ठ कुजंभ समरांत गदेनें हत्तींना मारीत संचार करूं लागला ४८. पुष्कळांचे त्यानें दांत तोडले. कित्येकांचीं गंडस्थळें फोडलीं. त्या बलवानानें एकेक हत्तीवर नम धरून त्यांतील प्रत्येकास असें छिन्न-भिन्न केलें. ४९. तेव्हां दांत तोडून अथवा कुंभ फोडून कुजंभानें ज्यांस पीडलें आहे असे गज दशदिशांस पळत सुटले ५०. कुजंभाचे जे घोर विक्रम करणारे दानव अमात्य होते त्यांनीं विविध व तीक्ष्ण बाणांनीं गजयोद्ध्यांस नाहींसें केलें ५१. कुजंभनांवाच्या उत्तम दानवानें तीक्ष्ण भाल्यांनीं, पाजळलेल्या चकचकीत खड्गांनीं व बाणांनीं शत्रूंचीं उत्तमांगें तोडलीं ५२. उडणाऱ्या मस्तकांनीं व अंकुशयुक्त बाहूंनीं आकाशांतील पाषाणवृष्टीप्रमाणें गगन भरून गेलें ५३ ज्यांचीं उत्तम अंगें ( मस्तकें ) खांद्यांपासून कापलीं आहेत असे हत्ती व त्यावर बसणारे योद्धे, हे महाराज, शेंड्या वाचून असलेल्या ताल वृक्षाप्रमाणें दिसले ५४. अंशाचा महागज त्याच्या समोर येत होता. पण क्रुद्ध झालेल्या उत्तम दानवानें त्याला एक तीक्ष्ण बाण मारला. त्याबरोबर तो विमुख झाला ५५ याप्रमाणें गजसैन्यामध्यें संचार करून दानवोत्तम बलाढ्यांतील श्रेष्ठ कुजंभ गदेनें मुख्य मुख्य सैन्यपतींस मारूं लागला ५६. एकाच प्रहारानें कुजंभानें मारून पाडलेल्या महागजांस सर्व देव पाडवि-

महागजाः । वज्राहता इवेंद्रेण विशीर्णा इव पर्वताः ५८ अपश्यंस्त्रिदशाः सर्वे मूर्तिमन्तामिवान्तकम् । गजास्तथा व्यदीर्यन्त सिंहस्येवेतरे मृगाः ५९ स बभौ तां गदां बिभ्रत्प्रोक्षितां गजशोणितैः । व्यादितास्यो नदन्क्रुद्धो रौद्ररूपो भयानकः ६० यथा हि भगवान्क्रुद्धः प्रजानां संक्षये पुरा । विक्रीडमानो गदया रणमध्ये महासुरः ६१ गोपाल इव दण्डेन कालयत्स महागजान् । क्रुद्धं कालमिवाकाले दंडमुद्यम्य दानवम् ६२ अपश्यन्त सुराः सर्वे कुजंभं भीमविक्रमम् । हतारोहास्तु तत्रान्ये प्रभिन्ना वारणोत्तमाः ६३ ते हन्यमाना गदया बाणैश्च भृशविक्षताः । असहंतःकुजंभस्यगदावेगंमहाहवे ६४ स्वान्यनीकानि मृन्दन्तःप्राद्रवन्तः महागजाः । महावात इवाभ्राणि विधमन्गदया गजान् । अतिष्ठत्समरे दैत्यः कालः संवर्तको यथा ६५ [ ४४१५ ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० कुजंभोत्कर्षवर्णनं नाम षट्पंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५६ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः सर्वाणि सैन्यानि देवराजस्य शासनात् । अभ्यद्रवन्त दितिजान्नदन्तोभैरवान्रवान् १ तं बलौघमपर्यंतं देवानां सुदुरासदम् । रथनागाश्वकलिलं शंखदुंदुभिनिःस्वनम् २ आपतन्तं सुदुष्पारं रजसा सर्वतो वृतम् । दैत्यसागरमक्षोभ्यं समुद्रमिव पर्वणि ३ तदाश्चर्यमपर्यन्तम अश्रद्धेयमिवाद्भुतम् । उदीर्णां पृतनां सर्वां साश्वां सरथकुंजराम् ४ आवार्य समरेऽतिष्ठन्कुजंभस्तरसा बली । सैन्यार्णवंदेवतानांगिरिर्भैरुरिवा-

---

लेल्या पर्वताप्रमाणेंच पाहूं लागले ५७ कुजंभाच्या मार्गावर छिन्न–भिन्न होऊन पडलेले ते महागज इंद्रानें वज्रप्रहार करून पाडलेल्या पर्वतासारखे दिसले ५८. सर्व देव त्या दैत्याला मूर्तिमंत अंतकाप्रमाणेंच पाहूं लागले. सिंह हरणांना ज्याप्रमाणें मारून पाडतो त्याप्रमाणें त्यानें हत्तींना लोळविलें ५९. हत्तींच्या रक्तानें भिजलेली गदा धारण करणारा क्रुद्ध होऊन मोठा आक्राश करणारा, तोंड पसरलेला, भयानक व महारौद्र असा तो दानव पूर्वी प्रजेच्या संहाराच्या वेळीं क्रुद्ध झालेल्या भगवान् रुद्राप्रमाणें भासला. तो महा असुर रणामध्यें गदेनें जणुं काय क्रीडा करीत होता ६०,६१. गोपाल जसा गायींना त्याप्रमाणें तो महा गजांना पिटाळूं लागला. अकालीं दंड उचलून क्रुद्ध झालेल्या कालाप्रमाणें सर्व देव भयंकर पराक्रमी कुजंभास पहाते झाले. कित्येक हत्तीवरचे वीर मारले गेले. त्यामुळें ते उत्तम हत्ती पराभूत झाले ६२,६३. याप्रमाणें गदेनें मारले जाणारे व बाणांनीं अत्यंत क्षतयुक्त झालेले महा गज महासंग्रामात कुजंभाचा गदावेग सहन न झाल्यामुळें आपल्याच सैन्याचें मर्दन करीत, पळत सुटले. महावायु जसा अभ्रांना उडवितो त्याप्रमाणें तो प्रलयकालासारखा दैत्य, समरांत गजसैन्याला पिटाळीत उभा राहिला ६४,६५. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कुजंभोत्कर्षवर्णन नामक छपन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५६. ॥

वैशंपायनः -- त्यानंतर देवराज इंद्राच्या आज्ञेनें सर्व सैन्यें भयंकर गर्जना करीत राक्षसांवर चालून जाऊं लागलीं १. त्यांचें तें सैन्य अफाट, अजिंक्य, रथ व गज यांनीं भरलेलें होतें. त्या सैन्यांत शंख व दुंदुभि यांचा ध्वनि होत होता. सर्वतः धुळीनें आच्छादित झालेलें व दुष्पार असें तें येत असलेलें देवांचें सैन्य अक्षोभ्य दैत्य सैन्यावर चालून जात होतें. त्यामुळें तें पर्वाच्या दिवशीं वेलेकडे येणाऱ्या सागराप्रमाणें भासलें २,३. तें अंत न लागणारें आश्चर्य इतकें अद्भुत होतें कीं, त्याच्यावर विश्वास बसणेंच अशक्य

चलः ५ अनीकिनीं कुजंभस्तु गदया सन्यवारयत्। सा तथा वारिता सेना विह्वलाभून्निरुद्यमा ६ तस्मिंस्तथा वर्तमाने संप्रहारे सुदारुणे। असिलोमा तु बलवान्दानवो दानवाधिपः७ देवसैन्यस्य सर्वस्य धूमकेतुरिवोत्थितः। तमांस्यर्क इवाग्राह्यत्सुरसैन्यानि संयुगे ८ सहस्ररश्मिप्रतिमो दानवस्य रथोत्तमः। शरैर्मेघ इवावर्षद्देवानीकं प्रतापवान् ९ शरौघरश्मिभिर्दीप्तैः प्रतप्तो घोरविक्रम। रौद्रः क्रूरो दुराधर्षो दुरापो ध्वजिनीमुखे १० युध्यते दैवतैः सार्धं ग्रसमान इव प्रभुः। उग्रेषु रुग्रवदनः समारुह्य महागजम् ११ सुराणामुत्तमांगानि प्रचिनोति महाबलः। ग्रसन्दैवतसैन्यानि शरदंष्ट्रः प्रतापवान् १२ असिजिह्वश्चक्रहस्तश्चापव्यात्ताननोऽसुरः। परश्वधनखः श्रीमान्मृदंगापूरितध्वनिः १३ तिष्ठते दानवश्रेष्ठः संयुगे व्याघ्रवद्बली। मौर्वीघोष स्तनयित्नुः पृषत्कपृषतो महान् १४ धनुर्विद्युद्गणाटोपो महामेघ इवापरः। इष्वस्त्रसागरो घोरो बाहुग्राहो दुरासदः १५ कार्मुकोर्मितरंगौघे बाणावर्तमहाह्रदा। गदासिमकरो रौद्रो ज्याबेलः शिक्षयोद्धतः १६ पदातिमीनः सुमहान् गर्जितोत्क्रुष्टघोषवान्। हयान्गजान्पदातींश्च रथांश्च सहस्राबहून् १७ न्यमज्जयत समरे परवीरान्महारथान्। आप्लावय-

होतें. अश्व, रथ, कुंजर यांसह पुढें येणारी ती सेना पाहून ४ कुजंभानें मोठ्या वेगानें तिला प्रतिबंध केला आणि देवांच्या सैन्य सागरास प्रतिबंध करून तो मेरु-पर्वताप्रमाणें उभा राहिला ५ कुजंभानें त्या सेनेचें गदेनें निवारण केलें. तेव्हां त्यानें अशारीतीनें प्रतिबंध केला असतां ती सेना उद्यमरहित व विह्वल झाली ६. अशा प्रकारचा तो अति दारुण संग्राम चालला असतां बलवान् असिलोमा दानवाधिप सर्व देवसैन्याच्या धूमकेतूसारखाच उठला. सूर्य जसा अंधकाराला त्याप्रमाणें त्यानें संग्रामांत देवसैन्याला नाहींसें केलें ७, ८. त्या दानवाचा उत्तम रथ सूर्यासारखा होता. मेघांप्रमाणें त्या प्रतापवानानें देवसैन्यावर बाणांनीं वर्षाव केला ९. सेनेच्या अग्रभागीं असलेला तो दीप्त बाणसमूहाच्या किरणांनीं अतितप्त झाला. ज्याचा विक्रम घोर आहे असा तो भयंकर, क्रूर, दुर्धर्ष व दुष्प्राप्य होता १०. महागजावर बसून ज्याचें मुख उग्र आहे व बाणही उग्र आहेत असा तो प्रभु जणुं काय ग्रासच करीत असल्यासारखा देवांशीं लढूं लागला ११. तो महाबलवान् देवांचीं उत्तमांगेंच खुडीत होता. बाण ह्याच ज्याच्या दाढा आहेत असा तो प्रतापवान् देवतांच्या सैन्यास खावूं लागला १२. तरवार हीच त्याची जिह्वा, चक्र हेच हात, व चाप हेंच उघडलेलें तोंड होतें. परशु हींच ज्याचीं नखें आहेत असा तो श्रीमान् असुर आपल्या मृदंगासारख्या ध्वनीनें दश दिशांस भरून सोडीत उभा राहिला १३. तो बलाढ्य दानवश्रेष्ठ संग्रामांत व्याघ्रासारखा उभा राहिला. दोरीचा घोष हाच ज्याचा गडगडाट आहे, बाण हेच ज्यांच्यापासून निघणारे थेंब आहेत व धनुष्याची पाठ हाच ज्याचा विद्युत्समूह आहे असा तो दुसऱ्या महा मेघासारखाच होता. तो बाण व अस्त्रें यांचा घोर सागरच होता. त्याचे बाहू हेंच त्या सागरांतील नक्र असून त्यामुळें तो दुरासद झाला होता. धनुष्यें हींच त्यांतील तरंगपरंपरा असून बाण हेच मोठे भोंवरे व डोह होते. गदा व तरवारी याच मोठ्या सुसरी असून त्या भयंकर सागराची ज्या ( दोरी ) हीच वेला होती १४–१६. पदाति हेच त्यांतील मीन असून तो महादानवसागर गर्जना व आक्रोश हाच घोष करीत होता. त्यानें एकाएकीं घोडे, हत्ती, पदाति, अनेक रथ व महारथ शत्रुवीर समरांत निमग्न केलें. त्या दारुण दानवेश्वरानें

स्मदेवौघान् दारुणो दानवेश्वरः १८ अवर्तत युधि श्रीमान् युधि श्रेष्ठो युधिष्ठिरः । अपश्यं-स्त्रिदशाः सर्वे शुद्धजांबूनदप्रभम् १९ सन्नद्धं तत्र युध्यन्तं ज्वलन्तमिव पावकम् । मध्यंदि-नगतं सूर्यं ज्वलन्तमिव तेजसा २० न शेकुः सर्वभूतानि दानवं प्रसमीक्षितुम् । यथा प्ररूढं घर्मान्ते दहत्कक्षं हुताशनः २१ तथासुरवरान्दैत्यो दहति स्म सुतेजसा । देवानां दानवानां च बलं नर्दति दारुणम् २२ विमूढमभवत्सर्वमाकुलं च समंततः । शूराश्च ते बलो-दग्रा हस्त्यश्वरथधूर्गताः २३ आर्यां बुद्धिं समास्थाय न त्यजन्तिमहारणम् । तद्रुधिंजलकं युद्धमभवद्रोमहर्षणम् २४ देवदानवयोः संख्ये रुधिरस्रावकर्दमम् । न दिशः प्रत्यजानन्त भयग्राहनिपीडिताः २५ शस्त्रपातांश्च विविधान् दानवानां महारणे । अन्योन्यं मूढचित्तास्ते निजघ्नुर्व्याकुलीकृताः । स्वान्परान्नाभिजानन्ति विमूढाः शस्त्रपाणयः २६ शिरोरुहेषु संगृह्य कश्चिच्छूरस्य संयुगे । शूरश्छिनत्ति मूर्धानं संदष्टौष्ठपुटाननम् २७ बाहुभिर्मुष्टिभिश्चैव वज्र-कल्पैः सुदारुणैः । प्रहरन्ति रणे वीरा न्यस्तशस्त्राः परस्परम् २८ योधप्राणहरे रौद्रे स्वर्गद्वारे नृपावृते । संकुले तुमुले युद्धे वर्तमाने महाभये २९ हयो हयं गजो नागं वीरो वीरं महा-हवे । अभ्यद्रवज्जिघांसंतो ह्यसमंजसमाहवे । असुराश्च सुराश्चैव विक्रमाढ्या महारथाः ३० जुहुवुः समरे प्राणाञ्जिजघ्नुरितरेतरम् । मुक्तकेशा विकवचा विरथाश्छिन्नकार्मुकाः ३१

---

देवांच्या ओघांस त्यांत बुडाविलें १७,१८. युद्धांत स्थिर व श्रेष्ठ असलेला श्रीमान् दानव याप्रमाणें युद्ध करूं लागला असतां शुद्ध सोन्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे अशा त्याला सर्व देव पहाते झाले १९. तो सज्ज होऊन तेथें दीप्त अग्नीप्रमाणें युद्ध करीत होता. त्यावेळीं आपल्या तेजानें जाज्वल्य झालेल्या मध्यंदिन-गत सूर्याप्रमाणें त्या दानवास सर्व भूतें पाहूं शकलीं नाहींत. ज्याप्रमाणें अग्नि ग्रीष्म-ऋतूच्या शेवटीं उगवलेलें गवत जाळून टाकतो त्याप्रमाणें तो दैत्य आपल्या तेजानें देव-श्रेष्ठांस जाळूं लागला. देव व दानव यांचें सैन्य भयंकर आक्रोश व गर्जना करूं लागलें २०-२२ समंततः सर्व आकुल व मूढ झालें. जे बलाढ्य हत्ती, घोडे, रथ यांवर बसलेले शूर होते ते केवळ सर्वोत्तम बुद्धि धरूनच, महारण सोडून गेले नाहींत. वीरांच्या शरीरांस पिंजून टाकणारें तें युद्ध रोमहर्षण झालें २३,२४. त्या देवदानवांच्या युद्धांत रक्तस्राव होऊन चिखल झाला. भयरूपी मकरानें ज्यांस पीडलें आहे अशा त्या वीरांस दिशाही कळल्या नाहींत २५. दानवांच्या त्या महारणांत मूढ चित्त व व्याकुळ झालेले वीर नानाप्रकारचे शस्त्रपात एकमेकांवर करूं लागले. ज्यांच्या हातांत शस्त्रें आहेत अशा त्या विमूढांस आपला कोण व परका कोण हेंही कळेनासें झालें २६. कोणी शूर कोणा शूरांचे केंस धरून संग्रामांत दांत-ओंठ खात असलेलें शिर तोडता झाला २७. रणांत कित्येक शस्त्रें टाकून वज्रासारखे भयंकर बाहु व मुष्टी यांनीच वीरांस परस्पर मारूं लागले २८ हे राजन्; योद्ध्यांचे प्राण हरण करणारें, भयंकर, ज्यांत स्वर्ग-द्वार जणुं काय उघडलेंच आहे असें, संकुल, तुमुल व महाभयावह युद्ध सुरूं झालें असतां २९. घोड्यावर घोडा, गजाच्या अंगावर गज, व वीरावर वीर चालून गेला. त्या महासंग्रामांत शत्रूंस मारण्याची इच्छा करणारे वीर कांहीं विचार न करितां हल्ला करूं लागले. पराक्रमानें संपन्न व महारथ देव आणि असुर यांनीं समरांगणांत प्राणांचें हवन करून एकमेकांस मारलें. ज्यांचे केंस मोकळे सुटले आहेत, ज्यांचीं कवचें फुटलीं

हस्तैः पादैश्च युध्यन्ते दानवास्त्रिदशैः सह। हरिस्तु निशितं भल्लं प्रेषयामास संयुगे ३२ स तस्य धनुषः कोटिं छित्त्वा भूमाववपातयत्। पुनश्चापि पृषत्काणां शतानि नतपर्वणाम् ३३ प्राहिणोत्सहसा तस्य दानवेंद्रस्य संयुगे। तस्य देहविमुक्तास्ते मारुतेन समीरिताः ३४ मग्नार्धकाया विविशुः पन्नगा इव पर्वते। स तैर्निर्भिन्नगात्राङ्गैः क्षरद्भिरसृगावलीः ३५ बभौ दैत्यो महाबाहुर्मेरुर्धातुमिवोत्सृजन्। पुनश्चापि पृषत्काणां शतानि नतपर्वणाम् ३६ ततोऽसिलोमा संक्रुद्धः प्रगृह्यान्यन्महाधनुः। रुक्मपुंखांश्च निशितान् प्रेषयामास सायकान् ३७ तैस्तु मर्मसु विव्याध सर्पानलविषोपमैः गात्रं। संच्छादयामास महाभ्रैरिव पर्वतम् ३८ भूयः संधाय च शरं मुमोचान्तकसंनिभम्। सुपुंखं सूर्यसंकाशं बाणमप्रतिमं रणे ३९ तेन बाणप्रहारेण संयुगे भीमकर्मणा। मुमोह सहसा देवो भूमौ चापि पपात ह ४० ततो हाहाकृताः सर्वे देवे भूतलमाश्रिते। जगत्सदेवमाविग्नं यथार्कपतने तथा ४१ परिवारं तु समरे तस्य हत्वा महासुरः। एकत्रिंशत्सहस्राणि योधानां दानवोत्तमः ४२ जयश्रिया सेव्यमानो दीप्यमान इवाचलः। प्रगृह्य कार्मुकं घोरं गतः शक्ररथं प्रति ४३ तथैव तु महायुद्धे ससैन्यावश्विनावुभौ। प्रयुद्धौ सह वृत्रेण बलिना देवतारिणा ४४ बाणखड्गधनुष्पाणिः समरे त्यक्तजीवितः। आसाद्य सोऽश्विनौ दैत्यः स्थितो गिरिरिवाचलः ४५ ततः शंख-

---

आहेत, ज्यांचे रथ मोडले आहेत व धनुष्यें तुटलीं आहेत असे दानव देवांशीं हात व पाय यांनीं युद्ध करूं लागले. इंद्रानें संग्रामांत तीक्ष्ण बाण सोडला. तो दैत्याच्या धनुष्याचें अग्र तोडून, भूमीवर पाडविता झाला. पुनः नमलेल्या टोंकाचे शेंकडों बाण इंद्रानें समरांत दानवेंद्रावर सोडले. वायूनें ज्यांस प्रेरणा केली आहे, असे त्याच्या देहावर सोडलेले ते बाण त्याच्या शरीरांत अर्धेच रुतून राहिले. व त्यामुळें ते पर्वतामध्यें शिरणाऱ्या नागाप्रमाणें दिसले. त्या क्षतयुक्त झालेल्या व रक्तास्राव करणाऱ्या गात्रांनीं तो महाबाहु दैत्य धातूंचा स्राव करीत असलेल्या मेरूप्रमाणें शोभला. इंद्रानें पुनः पेरें नमलेल्या शंभर बाणांचा त्यावर वेध केला. तेव्हां असिलोमा रागावला. त्यानें दुसरें मोठें धनुष्यें घेतलें. त्यानें ज्यांचे बुंधे सोन्याचे आहेत असे पाजळलेले बाण इंद्रावर सोडले. सर्प, अग्नि किंवा विष यांचीच ज्यांना उपमा आहे अशा बाणांनीं त्यानें देवाच्या मर्मांवर वेध केला व महा अभ्रांनीं पर्वताला जसें झांकून सोडावें त्याप्रमाणें त्याच्या शरीरास झांकून टाकलें ३०–३८. असिलोम्यानें पुनः रणांत ज्याचा बुंधा चांगला आहे व जो सूर्यासारखा चकचकीत आहे, असा निरुपम, अंतकासारखा शर जोडून इंद्रावर सोडला ३९. तेव्हां त्या भयंकर कर्म करणाऱ्या बाणाचा प्रहार झाला असतां देव एकाएकीं मोहित होऊन भूमीवर पडला ४०. देवानें भूतलाचा आश्रय केला असतां सर्व हाहाकार करूं लागले. सूर्याचा पात झाला असतां जसें, तसें इंद्रपात होतांच सर्व जग उद्विग्न झालें ४१. नंतर त्याच्या सर्व परिवारास मारून जयश्री सेवा करूं लागली असतां तो दानव दीप्यमान पर्वताप्रमाणें शोभला. त्या उत्तम दनुपुत्रानें तीस सहस्र योध्यांना मारलें. नंतर घोर धनुष्य घेऊन तो इंद्राच्या रथावर चालून गेला ४२,४३. त्याचप्रमाणें त्या महायुद्धांत दोघे आश्विनीकुमार सैन्यासहवर्तमान देवतांचा बलाढ्य शत्रु जो वृत्र त्याच्याशीं घोर युद्ध करूं लागले ४४. तेव्हां ज्याच्या हातांत बाण, खड्ग व धनुष्य आहे व ज्यानें आपल्या जिविताची आशा

मुपाध्माय द्विषतां लोमहर्षणम् । ज्याघोषतलशब्दैश्च सर्वभूतान्यवेजयत् ४६ ततः संहृष्टरोमाणः शंखशब्दं विशुश्रुवुः । यक्षराक्षसदेवौघा वृत्रस्यापि च निःस्वनम् ४७ गदातोमरनिस्त्रिंशशूलशक्तिपरश्वधाः । प्रगृहीता व्यराजन्त यक्षराक्षसबाहुभिः ४८ तैः प्रमुक्तान्महाकायैः शूलशक्तिपरश्वधान् । भल्लैर्वृत्रः प्रचिच्छेद भीमवेगरवैस्तथा ४९ अन्तरिक्षचराणां च भूमिस्थानां च गर्जताम् । शरैर्विव्याध गात्राणि देवानां प्रियदर्शिनाम् ५० वृत्रासुरभुजोत्सृष्टैर्बहुधा यक्षराक्षसाम् । निकृन्तान्येव दृश्यन्ते शरीराणि शिरांसि च ५१ अथ रक्तमहावृष्टिरभ्यवर्षत मेदिनीम् । गदापरिघभिन्नानां देवानां गात्रसंभवा ५२ प्रच्छाद्यमानं देवौघैर्वृत्रं भीमपराक्रमम् । ददृशुः सर्वभूतानि भानुमन्तमिवांशुभिः ५३ तीक्ष्णरश्मिरिवादित्यः प्रतपन्सर्वदेवताः । अविध्यद्बलवान्क्रुद्धः सायकैर्मर्मभेदिभिः ५४ नदतो विविधान्नादानर्दितस्यापि सायकैः । न मोहमसुरेन्द्रस्य ददृशुस्त्रिदशा रणे ५५ तेऽसिचर्मगदाभिश्च परिघप्रासतोमरैः । परश्वधैश्च शूलैश्च ववर्षुर्महारथाः ५६ ततो वृत्रः सुसंक्रुद्धस्तैस्तदाभ्यर्दितो बली । अभ्यवर्षच्छितैर्बाणैस्तान्सर्वान्सत्यविक्रमः ५७ तेन वित्रासिता देवा विप्रकीर्णमहायुधाः । घोरमार्तस्वरं चक्रुर्वृत्रासुरभयार्दिताः ५८ उत्सृज्यते गदाशक्तिशूलर्ष्टिपरिघाशनीन् । उत्तरां दिशमाजग्मुस्त्रासिता दृढधन्विना ५९ शूलशक्तिगदापाणिर्व्यूढोरस्को-

---

सोडली आहे असा दैत्य संग्रामांत अश्विनीकुमारांपुढें येऊन पर्वताप्रमाणें निश्चल उभा राहिला ४५. त्यानंतर शत्रूंच्या अंगावर कांटा उभा करणारा शंख वाजवून प्रत्यंचेच्या व तळहाताच्या घोषानें त्यानें सर्व भूतांस कांपविलें ४६. तेव्हां ज्यांचीं अंगें रोमांच युक्त झालीं आहेत असे यक्ष, राक्षस व देव यांच्या संघांनीं शंखाचा ध्वनि व वृत्रासुराचाही सिंहनाद ऐकला ४७ यक्ष व राक्षस यांच्या बाहूंनीं ज्यांस धारण केलें आहे अशीं गदा, तोमर, निस्त्रिंश, शूल, शक्ति, परशु, इत्यादि प्रहरणें फार शोभलीं ४८. ज्यांचीं शरीरें फार मोठीं आहेत अशा यक्षादिकांनीं सोडलेल्या शूल, शक्ति व परशु यांस वृत्रानें भयंकर वेग व शब्द यांनीं तोडलें ४९. गर्जना करणाऱ्या अंतरिक्षचर व भूमिस्थ प्रियदर्शन देवांच्या शरीरांस त्यानें शरांनीं वेध केला ५०. वृत्रासुराच्या हातांतून सुटलेल्या बाणांनीं यक्ष व राक्षस यांचीं शरीरें व शिरें बहु प्रकारें कांपलेलींच दिसूं लागलीं ५१. गदा व परिघ यांच्या योगानें फुटलेल्या देवांच्या गात्रापासून झालेल्या रक्ताच्या महावृष्टीनें पृथ्वीला भिजविलें ५२. देवांच्या समूहाकडून वेढला जाणाऱ्या भयंकर पराक्रमी वृत्रास सर्व भूतें किरणांनीं वेष्टित झालेल्या सूर्याप्रमाणें पाहतीं झालीं ५३ ज्याचें किरण तीक्ष्ण आहेत अशा आदित्याप्रमाणें अतिशय संतप्त होणारा तो सर्व देवांस क्रुद्ध होऊन तीक्ष्ण व मर्मभेदी बाणांनीं वेध करता झाला ५४. पण विविध आक्रोश करणाऱ्या व बाणांनीं पीडल्या जाणाऱ्या अशाही त्या असुरश्रेष्ठाला रणांत मूर्च्छा आल्याचें देवांनीं पाहिलें नाहीं ५५. ते सर्व महारथ तरवार, ढाल, गदा, परिघ, प्रास, तोमर, परशु, शूल इत्यादिकांचा वर्षाव त्याच्यावर करीत सुटले ५६. त्यामुळें त्या बलाढ्य वृत्राला, पीडा दिल्याकारणानें, अतिशय क्रोध आला. ज्याचा पराक्रम सत्य आहे असा तो त्या सर्व देवांवर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव करीत होता ५७. त्यामुळें देव भ्याले. त्याच्या हतांतलीं आयुधें गळलीं आणि वृत्रासुराच्या भयानें पीडलेले देव घोर आर्त स्वर करूं लागले ५८. त्या दृढधन्व्यानें ज्यांस त्रास दिला आहे असे ते गदा, शक्ति, शूल, ऋष्टि,

महाभुजः । प्रावर्तत रणे वृत्रस्त्रासयानश्चराचरान् ६० तत्रैकस्तु महाबाहुरसि शूलधरः प्रभुः । अभ्यधावत दैत्येन्द्रं वृत्रमप्रतिमं रणे ६१ तमापतन्तं संप्रेक्ष्य निर्भिन्नमिव वारणम् । वत्सदन्तैस्त्रिभिः पार्श्वे विव्याध सुरसत्तमम् ६२ सोऽतिविद्धो महेष्वासः शरैरमितविक्रमः । गदां जग्राह बलवान् गदायुद्धविशारदः ६३ तां प्रगृह्य महाभीमामयःसारमयीं दृढाम् । अश्विनं सहसागम्य ताडयामास वीर्यवान् ६४ दीप्यमानं ततः शूलमश्वी सुविपुलं दृढम् । प्रासृजद्वृत्रदैत्याय सहसा रोमहर्षणम् ६५ भंक्त्वा शूलं गदाग्रेण गदायुद्धविशारदः । अश्विनं सहसाभ्यचर्य गरुत्मानिव पन्नगम् ६६ सोंतरिक्षात्समुत्पत्य विधूय महतीं गदाम् । नामत्यायापरि चिक्षेप गिरिशृंगोपमां बली ६७ गदयाभिहतः सोश्वि त्यक्त्वा शूलमनुत्तमम् । प्रयातः सहसा तत्र यत्र युध्यति वासवः ६८ पराजित्य तु संग्रामे आश्विनं भीमविक्रमम् । जयश्रिया सेव्यमानो वृत्रो युद्धे व्यवस्थितः ६९ [ २४८४ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० वृत्रासुरोत्कर्षोत्कर्षवर्णनं नाम सप्तपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५७ ॥

वैशंपायन उवाच ॥ तत्रैव तु महायुद्धे रणाजिर्देवसत्तमः । युध्यते सह दैत्येन एकचक्रेण धीमता १ प्रच्छाद्य रथपंथा मुक्तोशंश्च महाबलः । एकचक्रस्य सैन्यं तच्छरवर्षैरवाकिरत् २ महासुरा महावीर्या महापट्टिशयोधिनः । शूलानि च भुशुंडीश्च क्षिपन्ति स्म महारणे ३ तच्छूलवर्षं सुमहद्गदाशक्तिसमाकुलम् । अविशद्दितिजैर्मुक्तं दुर्निवार्यं चरा-

---

परिघ, अशनि, यांस सोडून उत्तर दिशेंस आले ५९. नंतर शूल, शक्ति व गदा यांस हातांत घेऊन, ज्याचा उर विस्तृत आहे, व भुजा मोठ्या आहेत असा चराचरांस भयभीत करणारा वृत्र रणांत संचार करूं लागला ६०. पण इतक्यांत त्या दोन देवांतील एक तरवार व शूल धारण करणारा महाबाहु प्रभु रणांत अप्रतिम ठरलेल्या वृत्रासुरावर धावला ६१. मदस्राव करणाऱ्या गजाप्रमाणें येणाऱ्या त्याला पाहून तीन वत्सदंतांनीं दैत्यानें त्या उत्तम देवाच्या कुशीवर प्रहार केला ६२. त्यांचा त्या महाधनुर्धराला भयंकर वेध झाला. नंतर तो अमित विक्रमी, बलवान्, व गदायुद्ध विशारद दैत्य गदेचें ग्रहण करता झाला ६३. लोखंडाची, सारमय, दृढ व अति भयंकर गदा घेऊन व एकाएकीं आश्विनीकुमारावर येऊन तो त्यांस ताडण करूं लागला ६४. त्यानंतर अश्वीनें अति विपुल, दृढ, रोमहर्षण, व दीप्यमान शूल एकाएकीं वृत्रासुरावर सोडला ६५ पण त्या गदायुद्धांत निपुण असलेल्या वृत्रानें गदेच्या अग्रानें शूलाला तोडलें व तो एकाएकीं अश्वीवर गेला. गरुड जसा सर्पावर झडप घालतो त्याप्रमाणें अंतरिक्षांतून खालीं उतरून, आपली मोठी गदा हालवून, त्या बलवानानें ती पर्वताच्या शिखरासारखी अश्विनीकुमारावर सोडली ६६,६७. तिचा प्रहार झाला असतां अश्वी अत्युत्तम शूल सोडून जेथें इंद्र युद्ध करीत होता तेथें सहसा गेला ६८. याप्रमाणें भयंकर पराक्रम करणाऱ्या अश्विनीकुमाराला संग्रामांत पराभूत करून जयश्रीकडून सेवा केला जाणारा वृत्र युद्धामध्यें स्थिर उभा राहिला ६९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वृत्रासुरोत्कर्षवर्णन नामक सत्तावन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५७ ॥

वैशंपायनः— त्याच महायुद्धांत रणाजिनामक उत्तम देव बुद्धिमान एकचक्र दैत्याशीं युद्ध करूं लागला १. रथमार्गांस आच्छादित करून मोठा सिंहनाद करणारा तो महाबल एकचक्राच्या सैन्यावर शरवृष्टि करता झाला २. महावीर्यवान् महा पट्ट्यांनीं युद्ध करणारे, महा असुर त्या महारणांत शूल व भुशुंडी फेंकूं लागले ३. गदा व शक्ति

चरैः ४ अन्योन्यमभिवर्तन्ते देवासुरगणा युधि । महाद्रिशिखराकारा वीर्यवन्तो महाबलाः ५ तुरंगमाणां तु शतं युक्तं तस्य महारथे । महासुरवरस्येव हिरण्यकशिपोर्युधि ६ तेषां चरणपातेन चक्रनेमिस्वनेन च । तस्य बाणनिपातैश्च हता वै शतशः सुराः ७ ततः सलघुभिश्चित्रैः शरैः सन्नतपर्वभिः । सायुधानच्छिनत्क्रुद्धः शतशोऽथ सहस्रशः ८ वध्यमानाः शरैस्तीक्ष्णै रथद्विरदवाजिनः । गमिताः प्रक्षयं केचित्रिदशैर्दानवा रणे ९ ततः प्रक्षीयमाणांस्तानुपप्रेक्ष्य दितेः सुताः । त्यक्त्वा बाणान्न्यवर्तन्त प्रगृहीतवरायुधाः १० ते दिशो विदिशश्चैव प्रतिरुध्य प्रहारिणः । अभ्यघ्नन्निशितैः शस्त्रैर्देवान्दितिसुता रणे ११ रणाजिज्ज्वलितं घोरं परमं तिग्मतेजसम् । मुमोचास्त्रं महाबाहुर्मथनं नाम संयुगे १२ ततः शस्त्राणि शूलानि निशितानि सहस्रशः । अतिवीर्येण महता दितिजः संप्रचिच्छिदे १३ छित्त्वा शूलेन तान्सर्वानेकचक्रो महासुरः । अभ्यविध्यत तं सार्धं दशभिर्निशितैः शरैः १४ अस्त्रवेगेन हत्वैव सोऽस्त्रैस्तस्यानुसैनिकान् । ज्वलितैरपरैः शीघ्रैस्तानविध्यत्सहस्रशः १५ तेषां छिन्नानि गात्राणि विसृजन्ति स्म शोणितम् । प्रावृषीवांबुवृष्टीनि शृंगाणि धरणीभृताम् १६ इंद्राशनिसमस्पर्शैर्निपतद्भिरजिह्मगैः । दितिजैर्वध्यमानास्ते विव्येसुः सुरसत्तमाः १७ एकचक्रो रथेतिष्ठन्नपश्यद्गजयूथपान् । वराभरणनिर्ह्रादान्समुद्रस्वननिःस्वनान् १८ मत्ता-

---

यांनीं व्याकुळ झालेला व दैत्यांनीं सोडलेला तो फार मोठा शूलवर्षाव देवांवर पडला. तो चराचरांस दुर्निवार्य होता ४. याप्रमाणें ते देव व दैत्य यांचे गण युद्धांत एकमेकांच्या सन्मुख चालले. ते सर्व महा पर्वतांच्या शिखरासारखें उंच आकाराचे, वीर्यवान् व महाबल होते ५. त्यांच्या महारथांस शंभर घोडे जोडले होते. त्यामुळें महाअसुरश्रेष्ठ हिरण्यकशिपूच्या रथाप्रमाणें ते सर्व युद्धांत दिसत होते ६. घोड्यांच्या पायांच्या ध्वनीनें, चक्रांच्या नेमींच्या स्वनानें आणि असुरसंघाच्या बाणांच्या आघातानें शेंकडों देव मेले ७. त्यानंतर रागावलेला व आयुधवान् एकचक्र वेगानें जाणाऱ्या, विचित्र व पेरें नेमलेल्या बाणांनीं शेंकडों व हजारों शत्रूंना तोडूं लागला ८. तीक्ष्ण शरांनीं रथ, हत्ती व घोडे मारिले गेले. देवांनींही रणांत कांहीं दानवांचा क्षय केला ९. तेव्हां आपले वीर शत्रूकडून मारले जात आहेत असें पाहून दितीचे पुत्र बाण टाकून व श्रेष्ठ आयुधें घेऊन परतले १०. ते दितिज देवांना रणांत, प्रत्येक दिशा व विदिशा यांस रोध करून, तीक्ष्ण शरांनीं मारीत सुटले ११. महा पराक्रमी रणाजीनें ज्वलित, घोर, परम व तीक्ष्ण तेजस्वी मथन नांवाचें अस्त्र संग्रामांत सोडलें १२. त्याच्यापासून हजारों तीक्ष्ण अस्त्रें व शूल निघाले. पण दितिज एकचक्र त्या सर्वांस मोठ्या अतिवीर्यानें तोडता झाला १३. एकचक्र महा असुर त्या सर्वांस शूलानें तोडून दहा निशित शरांनीं रणाजीस वेध करिता झाला १४. अस्त्रवेगानें त्याला मारूनच दुसऱ्या अस्त्रांनीं व दुसऱ्या शीघ्र जाणाऱ्या जाज्वल्य बाणांनीं त्याच्या अनुचर सैन्यास सहस्रशः वेध करता झाला १५. त्यांचीं छिन्न झालेलीं गात्रें रक्तस्राव करूं लागलीं. त्यामुळें पावसाळ्यांत जलस्राव करणाऱ्या पर्वताच्या शिखरांसारखीं तीं दिसलीं १६. दैत्यांकडून इंद्राच्या अशनीप्रमाणें ज्यांचा स्पर्श आहे अशा सरळ जाणाऱ्या व अंगावर येऊन आदळणाऱ्या बाणांनीं मारले जाणारे उत्तम देव अतिशय भयभीत झाले १७. एकचक्र उथावर उभा राहून गजयूथपांस पाहता झाला. त्यांच्या अंगांवरील आभरणें श्रेष्ठ असून ध्वनीही भयंकर होता. समुद्राच्या स्वना-

न्सुविहितान्दृप्तान्महामात्रैरधिष्ठितान् । कुलीनान्वीर्यसंपन्नान्प्रतिद्विरदघातिनः १९ शिक्षि-
तान्गजशिक्षाया मैरावतसमान्युधि । न्यहनत्सुरसैन्यस्य गजान् गज इवासुरः २०
विक्षरन्तो महानागान्भीमवेगांस्त्रिधा मदन् । मेघस्तनितनिर्घोषान्महाद्रीनिव चोत्थितान् २१
सहस्रसंमितान्दिव्याञ्जांबूनदपरिष्कृतान् । सुवर्णजालैर्विततांस्तरुणादित्यवर्चसः २२ एकचक्रो
गदापाणिर्बलवान्गदिनांवरः । उत्सारयामास गजान्महाभ्राणीव मारुतः २३ निहत्य गदया
सर्वांस्तान्गजान्गजमर्दनः । भूयोऽश्वसंघान्स बली निरैक्षत महासुरः २४ शुकवर्णानृक्षवर्णा-
न्मयूरसदृशांस्तथा । पारावतसवर्णांश्च हंसवर्णांस्तथैव च २५ मल्लिकाक्षान्विरूपाक्षान्क्रौं-
चवर्णान्मनोजवान् । अश्वसैन्यं महाबाहुस्तदप्रतिमपौरुषः २६ निषूदयामास बली गदया
भीमविक्रमः । रणाजिस्तस्य समरे कर्म दृष्ट्वासुरद्विषः २७ अचिन्त्यविक्रमः श्रीमानभ्य-
याद्देववाहिनीम् । गदायुद्धेषु कुशलो रथेन रथयूथपः २८ हृष्टसैन्यो महाबाहुः प्रस्थितः
शक्रसन्निधौ । त्रिंशच्छतसहस्राणि रथानां विनिहत्य सः २९ रणेऽतिष्ठत दैत्येन्द्रो विधूम
इव पावकः । तस्मिन्नेव तु संग्रामे बलोनाम महासुरः ३० मृगव्याधं महात्मानं योधयत्य-
जितं रणे । मृगव्याधस्य रुद्रस्य महापारिषदास्तथा ३१ समुत्पेतुर्बलं दृष्ट्वा हुताग्निसमते-
जसः । गजैर्मत्तैरथैर्दिव्यैर्वाजिभिश्च महाजवैः ३२ अस्त्रैश्च निशितैर्बाणैः शरैश्चानलसन्निभैः ।

---

सारखा त्यांचा स्वन होता १८. मत्त, उत्तमप्रकारें सजविलेले, दृप्त, ज्यांच्यावर महात बसले आहेत असे, कुलीन, वीर्यसंपन्न, विरुद्ध पक्षाच्या हत्तींवर आघात करणारे, गज शिक्षेमध्यें उत्तम शिक्षित, युद्धांत ऐरावतासारखे अशा हत्तींना पाहून गजासारखाच असुर देव सैन्यांतील गजांस मारता झाला १९,२०. तीन द्वारांनीं मदस्राव करणाऱ्या, भयंकर वेगवान्, मेघाच्या गडगडाटाप्रमाणें ज्यांची गर्जना आहे, महा पर्वताप्रमाणेंच जणुं काय उठलेल्या, सहस्रावधि, दिव्य, सुवर्णभूषित, सोन्याच्या जाळ्यांनीं आच्छादित व बाल सूर्याप्रमाणें तेजस्वी अशा महा गजांस तो गदावानांतील श्रेष्ठ, बलवान्, गदा-पाणि एकचक्र. वायू जसा महा मेघांस उडवितो त्याप्रमाणें दूर पळविता झाला २१–२३. याप्रमाणें गजांचें मर्दन करणारा तो बली महा असुर गदेनें त्या सर्वांस मारून पुनः घोड्यांच्या संघास पाहता झाला २४. ज्याचा पौरुष अति निरुपम आहे असा तो महा-बाहु पोपटाप्रमाणें ज्यांचा रंग आहे, आस्वलाप्रमाणें ज्यांची अंगकांति आहे, मयूराप्र-माणें ज्यांचीं शरीरें विचित्र आहेत, पारव्यांप्रमाणें ज्यांचा वर्ण आहे, हंसाप्रमाणें जे सर्वतः शुभ्र आहेत, मल्लिकाक्षाप्रमाणें ज्यांचे नेत्र आहेत. क्रौंचपक्ष्याप्रमाणें ज्यांचें तेज आहे अशा मनासारख्या वेगवान् अश्वांस व दैवांच्या सैन्यास पाहता झाला २५,२६. नंतर ज्याचा पराक्रम भयंकर आहे, अशा त्या बलवानानें गदेनें त्यांचा संहार केला. तेव्हां रणाजि त्या देवशत्रूचें समरांतील तें घोर कर्म पाहून परत फिरला व तो श्रीमान् अचिंत्य पर-क्रमी होता तरी देवसैन्यांत गेला. तेव्हां गदायुद्धांत कुशल असलेला रथयूथपति, महाबाहु व ज्याचें सैन्य हृष्ट झालें आहे असा तो एकचक्र इंद्राकडे जावयास निघाला. तीन लक्ष रथीवीरांस मारून तो दैत्येंद्र धूमरहित अग्नीप्रमाणें रणांतच उभा राहिला. त्याच संग्रामांत बल या नांवाच्या महासुरानें रणांत अजिंक्य असलेल्या महात्म्या मृगव्याधाशीं युद्ध करावयास आरंभ केला. तेव्हां मृगव्याध रुद्राचे महापारिषद गण बलास पाहून नुकत्याच हवन केलेल्या अग्नीसारखे लाल झाले. ते मत्त गज, दिव्य रथ, महावेगवान् घोडे २७–३२,

ददृशुस्ते ततो वीरा दीप्यमानं महासुरम् ३३ रश्मिवन्तमिवोद्यन्तं सुतेजोरश्मिमालिनम् । संग्रामस्थं महावेगं महासत्त्वं महाबलम् ३४ महामतिं महोत्साहं महाकायं महारथम् । समीक्ष्य तं महायोधं दिक्षु सर्वास्ववस्थितम् ३५ ततः प्रहरणैर्घोरैरभिपेतुः समततः । तस्य सर्वायसास्तीक्ष्णाः शराः पीतमुखाः शिताः ३६ शिरस्यद्रिप्रतीकाशे मृगव्याधेन पातिताः । तैश्च समभिराविष्ट शरैः शिरसि चार्पितैः ३७ उत्पपात तदा व्योम्नि दिशो दश निनादयन् । ततस्तं त्रिदशो वीरः सरथः सज्जकार्मुकः ३८ अनुवव्राज संहृष्टः खे तदा स महाबलः । असुरं च्छादयामास तं व्योम्नि शरवृष्टिभिः ३९ वृष्टिमानिव जीमूतो निदाघान्ते धराधरम् । अर्द्यमानस्ततस्तेन मृगव्याधेन दानवः ४० चकार निनदं घोरमंबरे जलदो यथा । सदूरं सहसोत्पत्य मृगव्याधरथं प्रति ४१ निपपात महावेगः पक्षवानिर्गिरिर्यथा । बभंज च ततो दैत्यो भग्नेषाकूबरं रथम् ४२ मृगव्याधः परित्यज्य स्थितो भूमौ महाबलः । विरथं प्रेक्ष्य रुद्रं तु तस्य पारिषदाः शुभाः ४३ उत्थिता घोररक्ताक्षा व्योम्नि मुद्गरपाणयः । स तु तैः सहसोत्थाय वेष्टितो विमलेंबरे ४४ मुद्गरैरर्दितोभर्गैर्वृक्षःपरशुभिर्यथा । तेषां वेगवतां वेगं निहत्य स महारथः ४५ निपपात पुनर्भूमौ सुपर्णसमविक्रमः । स शालवृक्षमुत्पाट्य महाशाखं महाबलः ४६ सर्वान्पारिषदान्संख्ये सूदयामास दानवः । स तैर्र्गोजितदेहस्तु रुधिरी-

---

अस्त्रें, तीक्ष्ण बाण, अग्नीसारखे शर, यांस घेऊन त्याच्यावर गेले. त्या वीरांनीं दीप्यमान् महा असुरास पाहिलें ३३ अतिशय चकचकीत रश्मींची ज्याला माला आहे अशा नुकत्याच उगवलेल्या सूर्याप्रमाणें तो दिसला. संग्रामांत स्थित असलेल्या, महावेगवान्, महाबलवान्, महाधैर्यवान्, महामतिवान्, महोत्साही, महाशरीरी व महारथ अशा त्या सर्व दिशांमध्यें स्थित असलेल्या महा योद्ध्यास पाहून ३४, ३५ ते सर्व रुद्रगण घोर प्रहरणें उचलून समंततः धावून आले. मृगव्याधानें त्या दानवाच्या पर्वतासारख्या मस्तकावर सर्व लोखंडी, तीक्ष्ण, चीतमुख व पाजळलेले शर मारले ३६. त्यांतील डोक्यावर मारलेले सात बाण आंत शिरले असतां तो दानव चवताळून दश दिशांस नर्दित करीत आकाशांत उडाला. तेव्हां तो वीर महाबल देवही रथासह धनुष्य सज्ज करून मोठ्या हर्षानें आकाशांत त्याच्या मागोमाग गेला. व त्या असुरास आकाशांतच बाणांना आच्छादित करून सोडता झाला ३७-३९. पावसाळ्यांत वृष्टि करणारा मेघ पर्वतास जसा झांकून सोडतो त्याचप्रमाणें मृगव्याधानें बलास झांकून टाकिलें. य रीतीनें दानवाला त्यानें पीडलें असतां तो आकाशांतच मेघाप्रमाणें घोर गर्जना करूं लागला. तो अकस्मात् फार दूर उडून जाऊन मोठ्या वेगानें मृगव्याधाच्या रथावर येऊन आदळला. व त्यामुळें पक्षवातांनीं पर्वत जसा फुटतो त्याप्रमाणें रुद्राचा रथ मोडला. तेव्हां ज्याचें जूं, दांडी इत्यादि सर्व मोडलें आहे अशा रथाला सोडून महाबलाढ्य मृगव्याध भूमीवरच ( खालीं ) उभा राहिला. तो विरथ झाला आहे, असें पाहून त्याचे शुभ पारिषद हातांत मुद्गर घेऊन व नेत्र लाल करून आकाशांत उठले. त्यांनीं अकस्मात् येऊन शुद्ध आकाशांत त्या दैत्याला वेढलें ४०-४४. आणि भयंकर परशूंनीं वृक्षाला जसें तोडतात त्याप्रमाणें भयंकर मुद्गरांनीं त्याला पीडलें. पण त्या वेगवानांच्या वेगास प्रतिबंध करून तो गरुडासारखा पराक्रमी महारथ पुनः भूमीवर गेला. आणि ज्याला मोठ्याला शाखा आहेत असा एक सालवृक्ष उपटून घेऊन

यपरिप्लुतः ४७ शुशुभे दानवश्रेष्ठो बालसूर्य इवोदितः । अथोत्पाट्य गिरेः शृंगं समृगव्या-लपादपम् ४८ जघान तान्पारिषदान्त्समरे दानवेश्वरः । ततस्तेषु च भग्नेषु महापारिषदेषु वै ४९ बलं तदवशेषं तु नाशयामास वीर्यवान् । अश्वैरश्वान्गजैर्नागान्योधान्योधैरथा-न्रथैः ५० दानवः सूदयामास युगांतेऽन्तकवत्प्रजाः । हतैरश्वैश्च नागैश्च भग्नाक्षैश्च महारथैः ५१ त्रिदशैश्चाभवद्भूमौ रुद्धमार्गा समंततः । एवं बलः स दैत्येन्द्रो मृगव्याधश्च वीर्यवान् ५२ युधि प्रवृद्धौ बलिनौ प्रभिन्नाविव वारणौ ५३ वैशंपायन उवाच ॥ तत्रैव युध्यते रुद्रो द्वितीयो राहुणा सह । विश्रुतस्त्रिषु लोकेषु क्रोधात्मा ह्यज एकपात् ५४ तयथा सुमहद्युद्धं तुमुलं लोमहर्षणम् । आसात्प्रतिभयं रौद्रं वीराणां जयमिच्छताम् ५५ देवदानवदेहैस्तु दुस्तरा केशशाड्वला । शरीरसंघातवहा प्रसृता लोहितापगा ५६ आजघानाथ संक्रुद्धो रुद्रो रौद्राकृतिः प्रभुः । राहुं शतमुखं युद्धे शत्रुसैन्यनिवारणम् ५७ तस्य कांचनचित्रांगं रथं साश्वं ससारथिम् । जघान समरे श्रीमान् क्रुद्धो दैत्यस्य सायकैः ५८ तस्य पारिषदस्त्वेको शरशक्त्या महाबलः । बिभेद समरे हृष्टो दानवं तं स्तनांतरे ५९ स भिन्नगात्रो रुद्रेण तथा पारिषदैरपि । रुद्रस्य रथमायान्तं स राहुर्दानवोत्तमः ६० प्रममाथतलेनाशु सहसा क्रोधमूर्च्छितः । भिन्नगात्रैः शरैस्तीक्ष्णैः स रुद्रममितौजसम् ॥

---

त्यानें तो महाबलवान् दानव संग्रामांत सर्व पारिषदांस झोडपूं लागला. रुद्रगणांनीं ज्याच्या देहास वेढलें आहे व प्रहारामुळें ज्याचें शरीर रक्तानें माखलें आहे असा तो दानवश्रेष्ठ नुकत्याच उदय पावलेल्या बालसूर्याप्रमाणें दिसूं लागला. नंतर तो दानवेश्वर पशु, सर्प व वृक्ष यांसह पर्वताचें शिखर उपटून समरांत त्या सर्व पारिषदांस मारता झाला. त्यानंतर ते महा पारिषद् पराभूत होऊन पळून गेले असतां त्या वीर्यवानानें त्यांचें बाकी राहिलेलें सैन्य मारून टाकलें युगांतीं अंतक जसा प्रजांचा संहार करितो त्याप्रमाणें तो दानव अश्वांनीं अश्वांस, गजांनीं गजांस, योध्यांच्या योगानें योद्धयांस व रथांनीं रथांस नाहींसें करूं लागला. मेलेले घोडे, हत्ती, मोडलेले महारथ व पडलेले देव यांच्या योगानें भूमीवरील मार्ग समंततः बंद झाले. याप्रमाणें दैत्येंद्र बल व वीर्यवान् मृगव्याध असे ते दोघेही अतिशय बलाढ्य व उत्कर्ष पावलेले वीर मदस्राव करणाऱ्या हत्तींप्रमाणें युद्धांत झुंजले ४५-५३. वैशंपायनः— त्याच संग्रामांत दुसरा रुद्र राहूशीं लढत होता. तो क्रोधात्मा, अज, एकपात् तिन्हीं लोकांत प्रख्यात आहे. त्यांचें तुमुल व रोमहर्षण युद्ध झालें. जयाची इच्छा करणाऱ्या वीरांचें तें युद्ध अति भयंकर होतें ५४, ५५. त्यामुळें देव व दानव यांच्या देहांनीं दुस्तर झालेली व केंस हेंच जिच्यातील शेवाळ आहे अशी शरीरसंघातास वाहणारी रक्ताची नदी पसरली ५६. ज्याची आकृति अतिशय भयंकर आहे असा प्रभु रुद्र अतिशय रागावला व त्यानें युद्धांत शत्रुसैन्याचें निवारण करणाऱ्या शतमुख राहूवर अस्त्रांचा प्रहार केला ५७. त्या दैत्याच्या बाणांच्या योगानें क्रुद्ध झालेला श्रीमान् रुद्र समरांत ज्याचें अंग सोन्यानें विचित्र केलें आहे अशा त्याच्या रथास घोडे व सारथि यांसह नाहींसें करता झाला ५८. त्याच्या एका बलाढ्य व हृष्ट पारिषदानें शरशक्तिनें त्याच्या उरावर वेध केला ५९. तेव्हां रुद्रानें व पारिषदांनींही ज्याच्या शरीरावर क्षत केलें आहे असा तो दानवोत्तम राहु अतिशय चिडला. क्रोधानें देहभान विसरून त्यानें अकस्मात् येत असलेल्या रुद्राच्या रथास एका

रुद्रपारिषदांश्चापि अधानाशुपराक्रमी ६१ हतैर्दानवमुख्यैस्तु रुद्रेणामिततेजसा । रुद्रपारिषदान्सर्वान्निजघान महासुरः ६२ वर्तमाने महाघोरे संग्रामे लोमहर्षणे । रुधिरौघा महावेगा महानयः प्रसुस्रुवुः ६३ दानवं समरे रुद्रो नीलांजनचयोपमम् । निर्बिभेद शरैस्तीक्ष्णैर्मेरुं सूर्य इवांशुभिः ६४ हतैर्दानवमुख्यैश्च शक्तिशूलपरश्वधैः । पतितैः पर्वताभैश्च दानवैः कामरूपिभिः ६५ वर्तमाने महाघोरे संग्रामे लोमहर्षणे । महाभेरीमृदंगानां पणवानां च निःस्वनः ६६ शंखवेणुस्वनोन्मिश्रः संबभूवाद्भुतोपमः हतानां स्वनतां तत्र दैत्यानां चापि निःस्वनः ६७ देवानां च तथा तत्र शुश्रुवे दारुणो महान् । तुरंगमखुरोत्कीर्णं रथनेमिसमुत्थितम् ६८ रुरोध मार्गं योधानां चक्षूंषि च धरारजः । शस्त्रपुष्पोपहारा सा तत्रासीद्युद्धमेदिनी ६९ दुर्दर्शा दुर्विगाह्या च मांसशोणितकर्दमा । भग्नैःखड्गैर्गदाभिश्च शक्तितोमरपट्टिशैः ७० अपाविद्धैश्च भग्नैश्च रथैः सांग्रामिकैर्हतैः । निहतैः कुंजरैर्मत्तैस्तथा त्रिदशदानवैः ७१ चक्राक्षयुगशस्त्रैश्च भग्नैरवनिपातितैः । बभूवायोधनं घोरं पिशिताशनसंकुलम् ७२ उत्पेतुश्च कबंधानि दिक्षु सर्वासु संयुगे । अन्योन्यबद्धवैराणां दैत्यानां जयगृद्धिनाम् ७३ संप्रहारस्तथा युद्धे वर्ततेति भयंकरः । सैन्यानां सं प्रयुद्धानां शूराणामनिवर्तिनाम् ७४

---

थपडेनेंच तोडून टाकलें. नंतर तीक्ष्ण शरांनीं ज्याचें गात्र फुटलें आहे असा तो पराक्रमी दैत्य अमित बलवान् रुद्रास व त्याच्या पारिषदांस सत्वर प्रहार करता झाला ६०,६१. अमित पराक्रमी रुद्रानें मारलेल्या मुख्य दानवाकडे पाहून रागावलेल्या महाअसुरानें सर्व रुद्रपारिषदांस मारिलें ६२. तें महाघोर रोमहर्षण युद्ध चाललें असतां रक्ताचे मोठे वेगवान् पाट वाहिले. महा नद्या वाहूं लागल्या ६३. मेरुला सूर्य जसा आपल्या किरणांनीं वेध करतो त्याप्रमाणें रुद्र काळ्याकुट्ट काजळाच्या ढिगासारख्या त्या दानवास समरांत तीक्ष्ण शरांनीं छिन्न-भिन्न करून सोडता झाला ६४. मुख्य दानवांनीं शक्ति, शूल, परशु इत्यादिकांच्या योगानें मारलेल्या देवांच्या शरीरांनीं व देवांच्या हातून मरून पडलेल्या दानवांच्या पर्वताकार व कामरूपी शरीरांनीं रणभूमि भरून गेली ६५. याप्रमाणें तो महा घोर, लोमहर्षण संग्राम चालला असतां मोठे नगारे, मृदंग, पणव यांचा शब्द ६६, शंख, व वेणु यांच्या ध्वनीनें मिश्रित झाला असतां अति अद्भुत भासला. मारले गेलेल्या व ह्मणूनच आक्रोश करणाऱ्या दैत्यांचा ध्वनि व तशाच आर्त देवांचाही फार मोठा दारुण आक्रोश ऐकूं येऊं लागला. घोड्यांच्या खुरांपासून वर उठलेलें व रथांच्या चाकामुळेंही उधळलेलें पृथ्वीवरील रज (धूळ) योद्ध्यांच्या नेत्रमार्गास आच्छादित करतें झालें. ती युद्धभूमि शस्त्रें हाच जिचा पुष्पोहार आहे अशी झाली ६७-६९. तिच्यामध्यें मांस व रक्त यांचा चिखल झाल्यामुळें ती दुर्दशा व दुष्प्रवेश्या (पहाण्यास व प्रवेश करण्यास अयोग्य) झाली. तुटलेलीं खड्गें, गदा, शक्ति, तोमर, प्रास, पट्टे, मोडलेले व फोडलेले सांग्रामिक रथ, मारलेले मत्त हत्ती तसेच मेलेले देव व दानव, चक्रं, अक्ष, जूं व मोडून पडलेलीं शस्त्रें. यांच्या योगानें तें रणांगण (किंवा युद्ध) घोर झालें. तें मांस खाणाऱ्या प्राण्यांच्या योगानें भरून गेलें ७०-७२. त्या संग्रामांत समंततः सर्व दिशांमध्यें परस्पर वैर बांधलेल्या व जयाची इच्छा करणाऱ्या दैत्यांची (व देवांचीं) कबंधें उठलीं ७३. उत्तम युद्ध करणाऱ्या सैन्यांचा व रणांतून न परतणाऱ्या शूरांचा तो संप्रहार युद्धांत अति भयंकर सुरू झाला ७३,७४. एकपाद अज व महात्मा राहु यांचें घोर युद्ध

अजस्य चैकपादस्य राहोश्चैव महात्मनः। तेषां तु तत्र पततां क्रुद्धानामतिनिः स्वनः ७५
उद्वर्त तामन्तकाले समुद्राणां तु शुश्रुवे। तत्रैकस्तु सुधूम्राक्षः श्रीमान्रुद्रो महाबलः ७६
बिभेद केशिनं शक्त्या गदापरिघशूलभृत्। नानाप्रहरणा घोरा भीमाख्या भीमविक्रमाः ७७
निष्पेतू रुद्रदयिता महापारिषदास्तथा। रथमास्थाय च श्रीमांस्तप्तकांचनकुंडलः ७८
दानवैः संवृतः केशी युध्यते युद्धदुर्जयैः। तस्य संग्रामशौण्डस्य संग्रामाग्रे युयुत्सतः ७९
निष्पेतुरुग्रवीर्यस्य ज्वालाःप्रविततां मुखात्। स तु सिंहर्षभस्कन्धः शार्दूलसमविक्रमः ८०
महाजलदसंकाशो मृदंगध्वनिनिः स्वनः। तस्य निष्पातमानस्य दानवैः संवृतस्यच ८१
बभूव सुमहानादः क्षोभयंस्त्रिदिवं यथा। तेन शब्देन वित्रस्ता त्रिदशानां महाचमूः ८२
द्रुमशैलप्रहरणा योद्धुमेवाभ्यवर्तत। तेषां च देवदैत्यानां युयुत्सूनां परस्परम्॥ सान्निपातः
सुतुमुलो रौद्रो लोकभयावहः ८३ तेषां युद्धं महाघोरं संजज्ञे लोमहर्षणम्। देवदानवसं-
घानां प्राणांस्त्यक्त्वा महाहवे। सर्वे ह्यतिबलाः शूराः सर्वे पर्वतसन्निभाः ८४ सर्वे सर्वा-
स्त्रविद्वांसः सर्वे सर्वायुधोद्यताः। त्रिदशा दानवाश्चैव परस्परजिघांसवः। तेषां वै नदतां
शब्दः संयुगे मेघनिः स्वनः ८५ शुश्रुवेऽतिमहाघोरश्चरस्थावरकंपनः। रेणुश्चारुणसंकाशो
भीमः स समपद्यत ८६ उद्धूतो देवदैत्यौघैः संरुरोध दिशो दश। अन्योन्यं रजसा तेन
कौशेयारुणपांडुना ८७ संवृता बहुरूपेण ददृशुर्न च किंचन। न ध्वजो न पताकाश्च नवर्म

---

चालले. क्रुद्ध होऊन युद्धांत धावणाऱ्या त्या सर्व शूरांचा सिंहनाद, भूतांचा विनाश-काल असतां होणाऱ्या समुद्रांच्या गर्जनेप्रमाणें ऐकूं येऊं लागला. इतक्यांत तेथें एक सुधूम्राक्ष या नांवाचा श्रीमान् व महाबलवान् रुद्र केशी दैत्यास शक्तीनें वेध करता झाला. त्या रुद्रानें आपल्या हातांत गदा, परिघ व शूल यानाही धारण केले होते. त्याच्या मागोमाग त्याचे नाना आयुधें घेतलेले, घोर भयंकर पराक्रम करणारे भीम संज्ञक रुद्र-प्रिय पारिषद् शत्रूंवर चाल करून निघाले. ज्यांच्या कानांत लाल सोन्यांचीं कुंडलें आहेत असा श्रीमान् केशी दैत्य युद्धामध्यें दुर्जय असलेल्या दानवांकडून परिवेष्टित होत्साता रथावर बसून युद्ध करूं लागला. संग्रामाच्या अग्रभागीं युद्ध करणाऱ्या संग्रामकुशल व उग्र वीर्यवान् केशीच्या तोंडांतून फार मोठाल्या ज्वाला निघाल्या. सिंह व वृषभ यांच्या खांद्यासारखें त्या दैत्याचें खांदे होते. शार्दूलासारखा विक्रम होता ७५–८० त्या वेगानें चालून येणाऱ्या व दुसऱ्या अनेक दानवाकडून वेष्टित झालेल्या दानवाचा महामेघासा-रखा अथवा मृदंगध्वनीसारखा फार मोठा, त्रिभुवनास क्षुब्ध करणारा नाद झाला. त्या महा शब्दानें देवांची मोठी सेना भयभीत झाली ८१,८२. तथापि वृक्ष व पाषाण हींच ज्यांचीं आयुधें आहेत असे ते सर्व युद्धासच प्रवृत्त झाले. परस्पराशीं युद्ध करण्याची इच्छा कर-णाऱ्या त्या देव–दैत्यांचा संग्रामप्रसंग अतितुमुल रौद्र व लोकभयावह झाला ८३. महा-संग्रामांत प्राणांची आशा सोडून लढणाऱ्या देवदानव संघांचें महाघोर व रोमहर्षण युद्ध झालें. परस्परास मारण्याची इच्छा करणारे ते सर्व देव व दानव अति बलाढ्य, शूर, पर्वत सदृश सर्व सर्वास्त्रवेत्ते व सर्व, सर्व आयुधें उचलून सज्ज झालेले होते. रणांगणांत घनघोर सिंहनाद करणाऱ्या त्यांचा मेघांच्या गडगडाटासारखा महाघोर व स्थावर–जंगमास कांपविणारा ध्वनि ऐकूं येऊं लागला. अरुणासा-रखी लाल पण भयंकर धूळ वर उडाली ८४-८६. देव व दैत्य यांनीं उडविलेल्या

तुरगोऽपि वा ८८ आयुधं स्यन्दनो वापि दृश्यते नैव सारथिः । स शब्दस्तुमुलस्तेषामन्योन्यं समधावताम् ८९ श्रूयते तुमुलः शब्दो न रूपाणि चकाशिरे ९० दानवास्तत्र संक्रुद्धा-दानवानेव जघ्निरे । त्रिदशा त्रिदशांश्चैव निजघ्नुस्तुमुले तदा ९१ न परांश्च विनिघ्नन्तः स्वांश्च युद्धे महासुराः । रुधिरार्द्रां तथा चक्रुर्मेदिनीं च महासुराः ९२ ततस्तु रुधिरौघेण संसिक्तमुदितं रजः । शरीरशतसंकीर्णं बभूव धरणीतलम् ९३ शूलशक्तिगदाखड्ग परिघप्रासतोमरैः । त्रिदशा दानवाश्चैव जघ्नुरन्योन्यमाहवे ९४ बाहुभिः परिघाकारैर्निघ्नन्तः परिघैस्तथा । रुद्रपारिषदान्सर्वान्सूदयन्ति स्म दानवाः । रुद्रपारिषदाश्चैव महाद्रुममहाश्मभिः ९५ विदारयन्नतिक्रम्य शस्त्रैश्चादित्यसंनिभैः । एतस्मिन्नन्तरे क्रुद्धः केशी दानवसत्तमः ९६ संग्राममर्षी घोरः स स्वान्यनीकानि हर्षयन् । तेषां परमसंक्रुद्धो वज्रमस्त्रमुदीरयत् ९७ वज्रेणास्त्रेण दिव्येन शस्त्रेण च महात्मना । महापारिषदाः सर्वे निहता युधि दुर्जयाः ९८ वज्रास्त्रपीडिता भ्रान्ता रुद्रपारिषदा युधि । विप्रकीर्णद्रुमाः पेतुः शैला वज्रहता इव ९९ एवं सुतुमुलं युद्धमभवल्लोमहर्षणम् । केशिनः सह रुद्रेण तदद्भुतमिवाभवत् १०० [ २५८४ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनप्रदुर्भावे केशिरुद्रयुद्धकथनं नामाष्टपंचाशत्तमोऽध्यायः ॥ ५८ ॥

वैशंपायन उवाच ॥ वृषपर्वा तु दैत्येन्द्रो विश्वमद्भुतदर्शनम् । निष्कुंभं योधयामास

---

त्या धुळीनें दश दिशांस व्यापलें. दोन्ही सैन्यांतील वीरांच्या पायांपासून उडालेल्या त्या रेशमी लाल व शुभ्र वस्त्रासारख्या बहुरूपी रजानें व्यापल्यामुळें कांहीं दिसेनासें झालें. ध्वज नाहीं; पताका नाहीं, कवच नाहीं, घोडाही नाहीं ८७, ८८, आयुध नाहीं, रथ नाहीं व सारथीही दिसत नाहीं, असें झालें. एकमेकांवर धावणाऱ्या त्यांचा तो तुमुल शद्ब मात्र ऐकूं येत होता पण रूप दिसेनासें झालें ८९, ९०. त्यावेळीं रागावलेले दानव दानवांसच मारूं लागले व कांहीं एक दिसत नसल्यामुळें देव देवांसच मारूं लागले ९१. शत्रूंना न मारतां आपल्या लोकांनाच मारणाऱ्या महा दानवांनीं पृथ्वीला रक्तानें लाल करून सोडलें ९२. त्या रक्ताच्या ओघानें उडणारी धूळ खालीं बसली. धरणीतल शेंकडों मृत शरीरांनीं भरून गेलें ९३. देव व दानव युद्धांत शूल, शक्ति, गदा, खड्ग, परिघ, प्रास, तोमर यांनीं एकमेकांस मारलें ९४. दानव परिघांच्या आकारांचें बाहू व परिघ यांनीं सर्व रुद्रपारिषदांस मारूं लागले व रुद्रपारिषदही उलट महा वृक्ष व महा पाषाण यांनीं दानवांस मारीत सुटले ९५. सूर्यासारख्या शस्त्रांनीं त्यांनीं परस्परांचें आक्रमण करून विदारण केलें. इतक्यांत दानवोत्तम केशी क्रुद्ध झाला ९६. संग्रामाची ज्याला अतिशय हौस आहे अशा घोर दैत्यानें आपल्या सैन्यांस हर्षयुक्त करीत शत्रूंवर अतिशय रागावून वज्र अस्त्र सोडलें ९७. त्या महात्म्यानें वज्रास्त्रानें व दुसऱ्या दिव्य शस्त्रानें सर्व दुर्जय महा पारिषदांना युद्धांत मारलें ९८. वज्रास्त्रानें पीडित व त्यामुळें भ्रान्त झालेले रुद्राचे पारिषद वज्राच्या आघातानें ज्यावर वृक्ष भरले आहेत— अशा अस्ताव्यस्त होऊन पडलेल्या पर्वताप्रमाणें युद्धांत पडले ९९. याप्रमाणें केशीचें रुद्राशीं अति तुमुल व लोमहर्षण युद्ध झालें. खरोखर तें एक मोठें अद्भुतच होतें १००. इति श्रीमहा. खि. हरि. भवि. वामन. केशिरुद्रयुद्ध कथन नामक अठावन्नावा अध्याय समाप्त झाला ॥ ५८ ॥

वैशंपायनः— वृषपर्वा दैत्येंद्र ज्याचें दर्शन अद्भुत आहे व लालसूर्यासारखी अंग-

लोहितार्कसमद्युतिम् १ क्रोधमूर्छितवक्त्रस्तु धुन्वन्परमकार्मुकम् । धनूंषि प्रेक्ष्य शत्रूणां सारथिं त्वरितोऽब्रवीत् २ अत्रैव तावत्त्वरितं नय मे सारथे रथम् । एते देवाश्च सहिता घ्नन्ति नः समरे बलम् ३ एतानिहन्तुमिच्छामि समरश्लाघिनो रणे । एतैर्हि दानवानीकं कृतच्छिद्रमिदं महत् ४ ततः प्रजविताश्वेन रथेन रथिनांवरः । अरीनभ्यहनत्क्रुद्धः शरजालैर्महासुरः ५ न स्थातुं देवताः शक्ताः किं पुनर्योद्धुमाहवे । वृषपर्वेषुनिर्भिन्नाः सर्व एवाभिदुद्रुवुः ६ तान्मृत्युवशमापन्नान्वैवस्वतवशंगतान् । समीक्ष्य निहतान्ज्ञातीनवतस्थे महासुरः ७ दृष्ट्वा तं तत्र निष्कुंभं सर्वे ते त्रिदशोत्तमाः । समेत्य सहिताः सर्वे द्रुतं तं पर्यवारयन् ८ व्यवस्थितं तु निष्कुंभं दृष्ट्वा त्रिदशसत्तमम् । बभूवुर्बलवन्तो वै तस्यास्त्रबलतेजसा ९ वृषपर्वा तु शैलाभं निष्कुंभं समरे स्थितम् । महेन्द्र इव धाराभिः शरवर्षैरवाकिरत् १० अचिन्तयित्वा तु शरान्छरीरे पतितान्बहून् । स्थितश्च प्रमुखे श्रीमान्ससैन्यः समहाबलः ११ संप्रहस्य महातेजा वृषपर्वाणमाहवे । अभिदुद्राव वेगेन कंपयन्निव मेदिनीम् १२ तस्य त्वायाऽऽमानस्य दीप्यमानस्य तेजसा । बभूव रूपं दुर्धर्षं दीप्तस्येव विभावसोः १३ रथं त्यक्त्वा महातेजाः सक्रोधः समपद्यत । वृक्षमुत्पाटयामास महातालं महोच्छ्रयम् १४ ततश्चिक्षेप तं वृक्षं निष्कुंभो वृषपर्वणः । तं गृहीत्वा महावृक्षं पाणिनैकेन दानवः १५ विनद्य

---

कांति आहे अशा विश्वेदेवांशीं युद्ध करूं लागला १ ज्याचें तोंड क्रोधानें उग्र झालें आहे असा तो दैत्य आपलें मोठें धनुष्य हालवीत शत्रूंचीं धनुष्यें पाहून मोठ्या त्वरेनें सारथ्यास म्हणाला २. " सूता, येथेंच माझा रथ सत्वर ने. कारण हे देव एकत्र जमून आमच्या सैन्यास युद्धांत मारीत आहेत ३. रणांगणांत समराची श्लाघा करणाऱ्या यांना मारण्याची मी इच्छा करीत आहे. कारण यांनींच हे मोठें दानवांचें सैन्य छिद्रयुक्त केलें आहे " ४. त्यानंतर सारथ्यानें ज्यांस वेगानें चालविलें आहे अशा रथानें तो रथ्यांतील श्रेष्ठ व क्रुद्ध महाअसुर शरजालांनीं त्यांस मारूं लागला ५. देव त्याच्यापुढें नुस्ते उभे राहण्यासही समर्थ नव्हते मग युद्ध करण्यास कोठून समर्थ असणार ? वृषपर्व्याच्या बाणांनीं ज्यांचीं अंगें फुटलीं आहेत असें सर्वच देव पळाले ६. तेव्हां आपल्या ज्ञातीचे बरेच लोक मृत्युवश होऊन सूर्यपुत्र यमाच्या अधीन झाले आहेत व त्यांस दैत्यांनीं मारलें आहे असें पाहून निष्कुंभ महादेव रणांत उभा राहिला ७. तो एकटाच तेथें आहे, असें पाहून ते सर्व उत्तम देव जमून सत्वर त्याच्या सभोंवार येऊन उभे राहिले ८. याप्रमाणें उत्तम देव निष्कुंभ व्यवस्थित होऊन राहिला आहे, असें पाहून ते सर्व त्याच्या अस्त्रबलतेजानें बलवान् झाले ९. पण वृषपर्वा समरांत उभ्या राहिलेल्या पर्वततुल्य निष्कुंभास पाहून महेंद्र जसा धारांनीं वृष्टि करतो त्याप्रमाणें शरवृष्टि करूं लागला १०. तथापि शरीरावर येऊन आदळत असलेल्या अनेक शरांकडे लक्ष्य न देतां तो महाबलवान् व श्रीमान् देव सैन्यासह सन्मुख उभा राहिला ११. तो महातेजस्वी वीर हंसून युद्धांत पृथ्वीस जणुं काय कांपवितच वेगानें वृषपर्व्यावर धांवला १२. धांवत येणाऱ्या व तेजानें दीप्त होणाऱ्या त्याचें रूप दीप्त सूर्याप्रमाणें दुर्धर्ष झालें १३. रागावलेल्या त्या महातेजानें रथाचा त्याग करून मोठा उंच महाताल वृक्ष उपटून घेतला १४ आणि तो त्या वृषपर्व्यावर सोडला. तेव्हां त्या वीर्यवान् दानवानें एका हातानें त्या महावृक्षास धरून मोठा भयंकर नाद करून व त्याला

सुमहानादं भ्रामयित्वा च वीर्यवान् । स गजान्सगजारोहान्सरथान्रथिनस्तथा १६
जघान दानवस्तेन शाखिना त्रिदशांस्तदा । तमन्तकमिव क्रुद्धं समरे प्राणहारिणम् १७
वृषपर्वाणमासाद्य त्रिदशा विप्रदुद्रुवुः । तमापतन्तं संक्रुद्धं त्रिदशानां भयावहम् १८
आलोक्य धन्वी निष्कुंभश्चुक्रोध च ननाद च । स तत्र निशितैर्बाणैस्त्रिंशद्भिर्मर्मभेदिभिः १९
निर्बिभेद महावीर्यो निष्कुंभो दानवाधिपम् । शरशक्तिभिरुग्राभिर्दैत्यानामधिपं प्रभुम् २०
विद्धः समरमध्यस्थो रुधिरं प्रास्रवद्बहुः । उद्विग्ना मुक्तकेशास्ते भग्नदर्पाः पराजिताः २१
श्वसन्तो दुद्रुवुः सर्वे भयाद्वै वृषपर्वणः । अन्योन्यं प्रममन्थुस्ते त्रासिता वृषपर्वणा २२ पृष्ठ-
वक्त्राः सुसंविग्नाः प्रेक्ष्यमाणा मुहुर्मुहुः । त्यक्तप्रहरणाः सर्वे कृतास्ते वृषपर्वणा २३ संग्रामे
युद्धशौण्डेन तदा निष्कुंभसैनिकाः । तत्रैव तु महावीर्यः प्रह्लादः कालमाहवे २४ योधया-
मास रक्ताक्षो हिरण्यकशिपोः सुतः । तस्य दानववीरस्य युद्धकाले जयक्रियाः २५
चकार त्वरया युक्तो भार्गवो विजयावहाः । हुताशनं तर्पयतो ब्राह्मणांश्च नमस्यतः २६
आज्यगन्धप्रतिवहो मारुतः सुरभिर्ववौ । स्रजश्च विविधाश्चित्रा जयार्थमभिमंत्रिताः २७
प्रह्लादस्य शुभे मूर्द्धन्याबबन्धोशनाः स्वयम् । कालेन सह संग्रामे प्रयुद्धस्य महात्मनः २८
प्रह्लादस्यातिवीर्यस्य शान्तिं चक्रे स भार्गवः । दश शिष्यसहस्राणि भार्गवस्य महा-
त्मनः २९ यानि दानववीराणां जेपुः शान्तिमनुत्तमाम् । अथर्वाणमथो दिव्यं ब्रह्मसंस्तव-

---

गरगर फिरवून गज, गजावरील वीर, रथांसह रथी, व इतर देव यांस त्याच वृक्षानें झोडपून काढलें. यमाप्रमाणें रागावलेल्या व समरांत प्राण हरण करणाऱ्या १६, १७, त्या वृषपर्व्यास प्राप्त होऊन देव पळूं लागले. देवांना भयावह असलेला तो येत आहे, असें पाहून धनुर्धर निष्कुंभ रागावला व सिंहनाद करूं लागला. तो महावीर्यवान् देव त्यावेळीं तीस मर्मभेदक तीक्ष्ण बाणांनीं दानवाधिपास वेध करता झाला. उग्र शरशक्तींनीं त्यानें दैत्यांच्या अधिप प्रभूस पीडलें १८–२० तेव्हां विश्वेदेवाकडून विद्ध झालेला तो दैत्य समरांत उभा राहूनच पुष्कळ रक्तस्राव करूं लागला. पण त्याला पाहून देव उद्विग्न झाले. त्यांचा सर्व दर्प भग्न झाला. ते सर्व पराभव पावले आणि केंस मोकळे सोडून धापा टाकीत वृषपर्व्याच्या भयानें पळत सुटले. त्या दैत्यानें ज्यांना भिवविलें आहे असे ते पळतां पळतां आपसांतच एकमेकांस मारूं लागले. २१, २२ अतिशय उद्विग्न झालेले देव पळत असतांना वारंवार तोंडें फिरवून मागें पहात होते. वृषपर्व्यानें त्या सर्वांना आयुध-रहित केलें. याप्रमाणें युद्धांत निष्णात असलेल्या दैत्यानें निष्कुंभाच्या सैनिकास पराभूत केलें. तेथेंच हिरण्यकशिपूचा महावीर्यवान् पुत्र प्रल्हाद डोळे लाल करून संग्रामांत कालाशीं भिडला. त्या दानववीरांच्या युद्धकालीं भार्गवानें मोठ्या त्वरेनें युक्त होऊन विजयावह जयक्रिया केल्या. त्यानें अग्नीला तृप्त करून ब्राह्मणांना नमस्कार केले. अग्नींत होम केलेल्या वायु आज्याचा सुंदर गंध वाहून नेऊं लागला. विजयाकारितां नानाप्रकारच्या विचित्र पुष्पमाळा अभिमंत्रित केल्या २३–२७. व शुक्राचार्यानें स्वतः त्या प्रल्हादाच्या शुभ मस्तकावर बांधिल्या. रणांगणांत कालाशीं घनघोर युद्ध करणाऱ्या अतिवीर्यवान् महात्म्या प्रल्हादाची भार्गवानें शांति केली. महात्म्या भार्गवाचे दहासहस्र शिष्य होते २८, २९. त्या सर्व शिष्यांनीं दानववीरांची अत्युत्तम शांति जपली. वेदसूक्तांनीं सांगितलेलें दिव्य, अथर्वाण, रणप्रवेशास

चोदितम् ३० रणप्रवेशसदृशं कर्म वैजयिकं कृतम् । ततः सर्वास्त्रविदुषः समरेष्वनिवर्तिनः ३१ विद्यया तपसा युक्ताः कृतस्वस्त्ययनक्रियाः । धनुर्हस्ताः कवचिनो वेगेनाप्लुत्य दानवाः । बलिमभ्यर्च्य राजानं प्रन्हादं पर्यवारयन् ३२ आस्थाय परमं दिव्यं रथं पररथारुजम् । नानाप्रहरणाकीर्णं सचक्रमिव पर्वतम् ३३ तद्बभूव मुहूर्तेन क्ष्वेडितास्फोटिताकुलम् । मेरोः शिखरमाकीर्णं यौरिवांबुधरागमे ३४ स्रजः पद्मपलाशानामामुच्य सुविभूषिताः । बान्धवान्संपरित्यज्य निपतन्ति रणप्रियाः ३५ महायुधधरः श्रीमाञ्छुभवर्मधरः प्रभुः । सतनुत्रशिरस्त्राणो धन्वी परमदुर्जयः ३६ सिंहशार्दूलदर्पाणां नदतां किंकिणीकिनाम् । तस्य दैत्यसहस्राणि प्रयान्त्यग्रे महारणे ३७ सैन्यपक्षगतास्तस्य रथाः परमदुर्जयाः । सप्ततिर्वै सहस्राणि गजास्तावन्त एव च ३८ मध्ये व्यूहोदरस्थस्तु कालनेमिर्महासुरः । धनुर्विस्फारयामास ननाद प्रजहास च ३९ तस्मिञ्छतसहस्राणि पुरो यान्ति महाद्युतेः । दानवानां बलवतां शक्रप्रतिमतेजसाम् ४० स समं वर्द्धमानस्तु पक्षाभ्यां विस्तृतो महान् । अभवद्दानवव्यूहो दुर्भेयः सर्वदैवतैः ४१ षष्टी रथसहस्राणि दानवानां धनुर्भृताम् । नानाप्रहरणानां च परिमाणं न विद्यते ४२ गदापरिघनिस्त्रिंशैः शूलमुद्गरपट्टिशैः । प्रगृहीतैर्व्यराजन्त दानवाः पर्वतोपमाः ४३ गर्जन्तो विनदन्तश्च विक्रोशन्तः पुनः पुनः । अक्षुभ्यन्त

---

साजेसें व विजयप्रद कर्म त्यांनीं केलें. त्यानंतर सर्व अस्त्रांस जाणणारे, समरांत न परतणारे ३०,३१. विद्या व तप यांनीं युक्त, ज्यांनीं स्वस्त्ययन क्रिया केली आहे असे धनुर्धर, व कवचें घातलेलें असे दानव वेगानें वर उडी मारून आपला राजा जो बलि त्याचें अर्चन करून प्रन्हादाच्या सभोंवार येऊन उभे राहिले ३२. चक्रयुक्त पर्वतासारख्या शत्रूंच्या रथांस पीडा देणाऱ्या, नानाप्रहरणांनीं युक्त असलेल्या, दिव्य व परमरथावर प्रन्हाद बसला होता ३३. दोन घटिकांमध्येंच तें रणांगण वीरांचें सिंहनाद व बाहु मांड्या इत्यादिकांवरील तलप्रहार यांच्या नादानें आकुल झालें. वर्षासमयीं ढग आले असतां मेरूचें शिखर जसें व्याप्त होतें त्याप्रमाणें तेथील आकाश रजादिकांनीं भरून गेलें ३३,३४. कमलांच्या पाकळ्यांच्या माळा घालून अतिशय भूषित झालेले रणप्रिय वीर आपल्या बांधवांस सोडून रणांत चालले ३५. त्यांच्यामध्यें महा आयुधें धारण करणारा, श्रीमान्, शुभ कवच घातलेला, तनुत्र व शिरस्त्राण युक्त, धन्वी व परमदुर्जय प्रभु प्रन्हाद होता ३६. त्याच्यापुढें महारणांत सिंह व शार्दूल यांच्याप्रमाणें ज्यांचा दर्प आहे असे सहस्रावधि दैत्य जात होते. त्याच्या वाहनाकर लावलेल्या क्षुद्र घंटा वाजत होत्या ३७. सैन्य पक्षामध्यें असलेले त्याचे परम दुर्जय सत्तर सहस्र रथ व तितकेच गज होते ३८. व्यूहाच्या मध्यभागीं कालनेमि महाअसुर होता. तो आपल्या धनुष्यास सज्ज करून मोठा सिंहनाद करूं लागला. व अतिशय हसला ३९. त्या महा तेजस्वी दैत्याच्या सैन्यांत इंद्रासारखें अप्रतिम तेजस्वी व बलाढ्य एकलक्ष दानव होते ४०. एकसारखा दोन्ही बाजूंनीं वाढणारा तो दानवांचा मोठा विस्तृत व्यूह सर्व देवतांस दुर्भेद्य होता ४१. धनुष्यें धारण करणाऱ्या दानवांचे रथ साठ सहस्र होते. ज्याच्यापाशीं नानाप्रकारचीं प्रहरणें आहेत अशा वीरांची तर गणनाच करितां येत नसे ४२. पर्वतोपम दानव हातांत घेतलेल्या गदा, परिघ, निस्त्रिंश, शूल, मुद्गर, पट्टे इत्यादिकांच्या योगानें फारच शोभले ४३. गर्जना करणारे, सिंहनाद करणारे, पुनः पुनः आक्रोश

महावीर्याः समरेष्वनिवर्तिनः ४४ तत्र तूर्यसहस्राणि भेरीशंखरवाणि च । हयानां च गजानां च गर्जतामतिवेगिनाम् ४५ दुंदुभीनां च निर्घोषः पर्जन्यनिनदोपमः । शुश्रुवे शंखशब्दश्च पटहानां च निः स्वनः ४६ तेन शंखनिनादेन भेरीतूर्यरवेण च । निर्घोषेण रथानां च क्रोशतीव नभस्तलम् ४७ सागरप्रतिमौघेन बलेन महतावृतः । प्रन्हादोऽयुध्यत रणे कालान्तकयमोपमः ४८ तस्य नादेन रौद्रेण घोरेणाप्रतिमौजसः । विनेदुःसर्वभूतानि त्रैलोक्यविकृतैः स्वनैः ४९ अन्तरिक्षात्पपातोल्का वायुश्च परुषो ववौ । वमन्त्यः पावकं घोरं शिवाश्चैव ववाशिरे ५० प्रन्हादस्तु महावीर्यः प्रहसन्युद्धदुर्मदः । उवाच वचनं श्रीमांस्तत्कालक्षममुत्तमम् ५१ अद्याहं दर्शयिष्यामि स्वबाहुबलमूर्जितम् । अद्य मद्बाणनिहतान्देवान्द्रक्षथ संयुगे ५२ बान्धवा निहता येषां त्रिदशैरिह संयुगे । अद्य निर्वर्तयिष्यन्ति शत्रुमांसानि दानवाः ५३ इममद्य समुद्भूतं रेणुं समरमूर्धनि । अहं तु शमयिष्यामि शत्रुशोणितविस्रवैः ५४ तिमिरौघहतार्कं तु सैन्यरेण्वरुणीकृतम् । आकाशं संपतिष्यन्ति खद्योता इव मे शराः ५५ हृष्टाः संप्रमोदध्वं देवेभ्यस्त्यज्यतां भयम् । अद्याहं निहनिष्यामि कालेन्द्रं धनुषा रणे ५६ तोषयिष्यामि राजानं बलिं बलवतां वरम् । त्रिदशान्सगणान्हत्वा बाणैरन्तकसन्निभैः ५७अक्षयाः सन्ति मे तूणाः शराश्चाशिविषोपमाः । स्थातुं मे पुरतः शक्ताः के रणे जीवितेप्सवः ५८ हत्वा रिपुगणांस्तुष्टिरनुरागश्च राजसु । हतस्य त्रिदिवे वासो नास्ति युद्ध-

---

करणारे व युद्धांतून परत न फिरणारे महावीर्यवान् दानव युद्ध करूं लागले ४४. त्यावेळीं सहस्रावधि मंगल वाद्यें, भेरी व शंख यांचे नाद, गर्जना करणाऱ्या अति वेगवान् गजांचा व घोड्यांचा ध्वनि यांचा एकच कोलाहल झाला ४५. पर्जन्याच्या निर्घोषाप्रमाणें दुंदुभींचा निर्घोष, शंखांचा शब्द, व पटहादि वाद्यांचा गंभीर नाद ऐकूं येऊं लागला ४६. त्या शंखनिनादानें, भेरी व तूर्यवाद्यें यांच्या रवानें व रथांच्या घोषानें जणुं काय नभस्तलच आक्रोश करीत आहे, असें वाटलें ४७. सागराच्या ओघासारख्या मोठ्या वेगवान् सैन्यानें परिवेष्टित झालेला कालान्तकतुल्य प्रन्हाद रणांत युद्ध करूं लागला ४८. त्या अप्रतिमबलाढ्य दैत्याच्या घोर व भयंकर सिंहनादानें प्रेरित झालेलीं सर्व भूतें त्रैलोक्यास विकाळ वाटणाऱ्या स्वरांनीं आक्रोश करूं लागलीं. ४९. अंतरिक्षांतून उल्का पडली. वायु कठोर वाहूं लागला. भालू तोंडातून घोर अग्नि ओकीत भयंकर रीतीनें ओरडूं लागल्या ५०. इतक्यांत युद्धदुर्मद व महावीर्यवान् श्रीमान् प्रन्हाद त्या कालास शोभेसें हंसत असें उत्तम वचन बोलला ५१. आज मी आपलें उर्जित बाहुबल दाखवीन. आज संग्रामांत माझ्या बाणांनीं मेलेल्या देवांस तुझी पहा ५२. देवांनीं असल्याच संग्रामांत ज्यांच्या बांधवांस मारलें आहे ते दानव आज आपापल्या मृतांस उद्देशून शत्रूंचें मांस समर्पण करतील ५३. समरांगणांत उडालेल्या या धुळीला मी आज शत्रूंच्या रक्तस्रावानें शांत करीन ५४. अंधकाराच्या योगानें ज्याच्यांतील सूर्य दिसेनासा झाला आहे व सैन्याच्या योगानें उडालेल्या धुळीनें जें लाल झालें आहे अशा आकाशांत माझे बाण खद्योतासारखे उडतील ५५. तुम्ही आतां अतिशय आनंदित होऊन यथेच्छ सुखी व्हा. देवांचें भय सोडा. आज मी या धनुष्यानें रणांत यमाला मारीन ५६. यमतुल्य बाणांनीं गणांसह देवांस मारून मी आज बलवानांतील श्रेष्ठ जो बलि राजा त्याला संतुष्ट करीन ५७. मजजवळ अक्षय भाते व सर्पासारखे भयंकर बाण

ममा गतिः ५९ तद्भयं पृष्ठतः कृत्वा रणे दानवसत्तमाः । निहत्येमानरीन्सर्वान्मोदध्वं नन्दने वने ६० एवमुक्त्वा महत्सैन्यं प्रह्लादो दानवोत्तमः । कालसैन्यं महारौद्रं तरसामर्दतासुरः ६१ सर्वास्त्रविद्वान्वीरश्च नित्यं चाप्यपराजितः । युद्धे ह्यभिमुखो नित्यं स्वबाहुबलदर्पितः ६२ षष्टिं रथसहस्राणि विविधायुधधारिणाम् । प्रह्लादस्यातिवीर्यस्य येतस्य तनया निजाः ६३ तैस्तु क्रतुशतैरिष्टं विपुलैराप्तदक्षिणैः । क्षान्ता धर्मपरा नित्यं सत्यव्रतपरायणाः ६४ दातारः प्रियवक्तारो वक्तारः शास्त्रवस्तुषु । स्वदारनिरता दान्ता ब्रह्मण्याः सत्यसंगराः ६५ यष्टारः क्रतुभिर्नित्यं नित्यं चाध्ययने रताः । इष्वस्त्रकुशलाः सर्वे बहुशो दृढविक्रमाः ६६ मत्तवारणविक्रान्ताः शत्रुसैन्यप्रमर्दकाः । दारयन्तः पदाक्षेपैः सुघोरान्वातरेचकान् ६७ युद्धोत्सुकधिया नित्यं क्रोधसंरञ्जितलोचनाः।संदष्टौष्ठपुटा दैत्या विनेदुर्भीमविक्रमाः क्ष्वेडितास्फोटितरवैरन्योन्यं समहर्षयन् ६८ वेणुशंखरवैश्चैव सिंहनादैश्च पुष्कलैः । आप्लुत्याप्लुत्य सहसा रणे बबृरुरनेकशः ६९ तालमात्राणि चापानि विकृष्य सुमहाबलाः । अमृष्यमाणाः सहसा दानवाश्चापपाणयः ७० सुरासुरैरप्यजितं योधयन्ति रणेन्तकम् । प्रतप्तहेमाभरणाः सर्वे ते

---

आहेत. मग मजपुढें जिवंत राहाण्याची इच्छा करणारे कोण उभे राहण्यास समर्थ आहेत ? ५८. युद्धासारखी उत्तम गति दुसरी कोणतीही नाहीं. कारण त्यांत शत्रुगणांना मारल्यानें संतोष होतो. राजांचें प्रेम संपादन करितां येतें. व कदाचित् रणांत सन्मुख मेल्यास स्वर्गलोकीं निवास घडतो ५९. यास्तव सर्व भय बाजूस सारून हे दानवश्रेष्ठांनो, या सर्व शत्रूंस मारून नंदनवनांत सुख भोगा " ६०. दानवोत्तम प्रल्हाद असें त्या मोठ्या सैन्यास बोलून वेगानें महाभयंकर कालाच्या सैन्याचें मर्दन करीत सुटला ६१. तो सर्व अस्त्रांस जाणणारा, वीर, नित्य अपराजित, युद्धामध्यें नेहमीं सन्मुख लढणारा व आपल्या बाहुबलानें दर्पित झालेला होता ६२. त्या अति वीर्यवान् प्रल्हादापाशीं नानाप्रकारचीं आयुधें धारण करणाऱ्या वीरांचे साठ सहस्र रथ होते. त्याचें जे औरस पुत्र होते त्यांनीं विपुल व पूर्ण दक्षिणा देऊन शेंकडों यज्ञ केले होते. ते क्षमावान्, धर्मपरायण, व सतत सत्यव्रततत्पर होते ६३,६४. ते दानें देणारे, प्रिय भाषण करणारे, शास्त्रविषयांमध्यें भाषण करणारे, स्वस्त्रीच्या ठायींच निरत असलेले, दमनशील, ब्राह्मणप्रिय, सत्यप्रतिज्ञ ६५. नित्य नानाप्रकारच्या क्रतूंनीं यजन करणारे, नित्य अध्यायनांत रत असणारे, बाण व अस्त्रें यांच्या प्रयोगांत निष्णात, सर्व बहुशः दृढ विक्रम संपन्न, मत्त हत्तीप्रमाणें विक्रम गाजविणारे, शत्रुसैन्याचें मर्दन करणारे, पायांच्या आघातांनीं पंख्यांप्रमाणें घोर वारा घालूं लागलेल्या ( ह्म. आतिशय हालूं लागलेल्या ) वृक्षांचें विदारण करणाऱ्या ६६,६७. युद्धाविषयींच्या अति उत्सुक बुद्धीनें ज्यांचे नेत्र सतत क्रोधानें लाल झाले आहेत असे, व ज्यांनीं दांत ओंठ खाल्ले आहेत असे ते सर्व दैत्य भयंकर पराक्रमी असून मोठा सिंहनाद करूं लागले. सिंहनाद व भुजामांड्या इत्यादिकांस थोपटणें यांच्या नादांनीं ते परस्परांस अतिशय हर्ष देऊं लागले ६८. वेणु व शंख यांच्या रवांनीं व भयंकर सिंहनादांनीं एकाएकीं उड्या मारमारून ते रणांत आपापले प्रतिस्पर्धी ठरवून घेऊं लागले. ( मी याच्याशीं लढतों; तूं त्याच्याशीं भीड. इत्यादि रीतीनें त्यांनीं आपले अनेक भिडू ठरवून घेतले ) ६९ तालासारखीं धनुष्यें आकर्ण ओढून ते अति महाबल धनुष्पाणि दानव सहसा अतिशय रागावले. ( त्यांना

श्वेतवाससः ७१ दानवा मानिनः सर्वे सर्वे स्वर्गाभिकांक्षिणः। सर्वे जयैषिणो वीराः सर्वे शत्रुवधोद्यताः ७२ शुशुभे साचमूर्दीप्ता पताकाध्वजमालिनी। गजाश्वरथसंबाधा स्वर्गमार्गाभिकांक्षिणी ७३ ततः कालस्तु निर्यातो भीमो भीमपराक्रमः। निनदन् सुमहाकायो व्याधिभिर्बहुभिर्वृतः ७४ ददर्श महतीं सेनां दानवानां बलीयसाम्। अभिसंजातहर्षाणां कालं समभिगर्जताम् ७५ तदायान्तं तदानीकं दानवानां तरस्विनाम्। प्रतिलोमं चकाराशु व्याधिभिः सहितोऽन्तकः ७६ प्रविश्य ध्वजिनीं चैषां पातयामास दानवान्। कालो रुधिररक्ताक्षः स्वेनानीकेन संवृतः ७७ प्रह्लादबलमत्युग्रंप्रह्लादंचमहाबलम्। आजघान रणे कालो दण्डमुद्गरपट्टिशैः ७८ शरशक्त्यृष्टिखड्गाश्च शूलानि मुशलानि च। गदाश्च परिघाश्चैव विचित्राश्च परश्वधाः ७९ धनूंषि च विचित्राणि शतघ्नीश्च स्थिरायसीः। पातयन्ते व्याधिभिर्युद्धे दानवानां चमूमुखे ८० बहवो व्याधयो युद्धे बहूनसुरपुंगवान्। व्याधीनपि च दैत्यौघा निजघ्नुर्बहवो बहून् ८१ शूलैः प्रमथिताः केचित्केचिच्छिन्नाः परश्वधैः। परिघैराहताः केचित्केचिच्च परमायुधैः। केचिद्द्विधाकृताः खड्गैः स्फुरंतः पतिता भुवि ८२ व्याधयो दानवैरेव नानाशस्त्रैर्विदारिताः। ते चापि व्याधिभिः सर्वे विविधैरायुधोत्तमैः ८३ खड्गैश्च मुश-

---

क्रोध आवरतां येईनासा झाला.) ७०. देव व असुर या दोघांनींही रणांत अजिंक्य असलेल्या अंतकाशीं ते युद्ध करूं लागले. ते सर्व अतिशय उंची सोन्याचीं आभरणें घालून शुभ्र वस्त्रें नेसले होते ७१. ते सर्व दानव मोठे मानी, सर्व स्वर्गाची आकांक्षा करणारे, सर्व जयाची इच्छा करणारे वीर व सर्व शत्रूंच्या वधाविषयीं उद्युक्त झालेले होते ७२. पताका व ध्वज यांची जिला मालाच आहे अशी ती दीप्त सेना फार शोभली. तिच्यामध्यें गज, अश्व, रथ यांची मोठी गर्दी उडाली होती. ती स्वर्गमार्गाची आकांक्षा करीत होती ७३. त्यानंतर स्वयं भयंकर, भयंकर पराक्रम करणारा, महाशरीरी, व अनेक व्याधींनीं परिवेष्टित झालेला काल पुढें यावयास निघाला. तो मोठा सिंहनाद करीत होता ७४. त्यानें बलाढ्य दानवांची मोठी सेना पाहिली. ते सर्व आनंदित झालेले असून कालावर मोठी गर्जना करीत होते ७५. पण त्यावेळीं येत असलेल्या त्या वेगवान् दानवांच्या सैन्यास व्याधींसह अंतकानें सत्वर पराङ्मुख करून सोडलें ७६. नंतर आपल्या सैन्यानें वेष्टित झालेला व ज्याचे नेत्र रक्तासारखे लाल आहेत असा काल त्यांच्या सैन्यांत घुसून दानवांस मारून पाडूं लागला ७७. कालानें दंड, मुद्गर व पट्टे यांच्या योगानें रणांत महाबलाढ्य प्रल्हाद व त्याचें अत्युग्र सैन्य या दोघांनाही मारलें ७८. व्याधि शर, शक्ति, ऋष्टि; खडग, शूल, मुसळें, गदा, परिघ, विचित्र परशु ७९, विचित्र धनुष्यें, दृढ लोखंडी शतघ्नी, इत्यादि आयुधें दानवांच्या सैन्यावर टाकूं लागले ८०. अनेक असुरश्रेष्ठांस युद्धांत अनेक व्याधि मारीत सुटले व व पुष्कळ व्याधींना असंख्य दैत्यौघांनीं नाहींसें केलें ८१. कित्येक शूलांच्या योगानें चुरडून टाकले गेले. कित्येक परशूंनीं तोडले गेले. कित्येक परिघांच्या योगानें मारले गेले. कित्येकांस उत्तम आयुधांनीं तोडलें. कित्येकांचे खड्गांनीं दोन तुकडे केले. व त्यामुळें ते हात-पाय झाडींत भूमीवर पडले ८२. सारांश दानवांनीं नानाशस्त्रांच्या योगानें व्याधींना तोडलें व उलट व्याधींनींही सर्व दानवांना नानाप्रकारच्या उत्तम आयुधांनीं मारलें. तीक्ष्ण खड्गें, मुसळें, प्रास, तोमर, मुद्गर, व परशु यांच्या योगानें व्याधींनीं सर्व

शैस्तीक्ष्णैः प्रासतोमरमुद्गरैः । भिन्नाश्च दानवाः सर्वे निकृत्ताश्च परश्वधैः ८४ मुद्गरैः पट्टिशैश्चैव व्याधिभिश्च महाबलैः । कृत्वा शस्त्रैरनेकैश्च मुष्टिभिश्च हता भृशम् ८५ वेमुः शोणितमन्योन्यं विष्टब्धदशनेक्षणाः । आर्तस्वरं च नदतां सिंहनादं च गर्जताम् ८६ बभूव तुमुलः शब्दः संग्रामे लोमहर्षणे । मुष्टिभिश्चोत्तमांगानि तलैर्गात्राणि चासकृत् ८७ सादितानि महीं जग्मुस्तिष्ठतामेवसंयुगे । वस्त्रफेना ध्वजावर्ता छिन्नबाहुमहोरगा ८८ शूलशक्तिमहामत्स्या चापग्राहसमाकुला । रथेषूपलसंबंधा ध्वजद्रुमलतावृता ८९ सशब्दघोरविस्तारा लोहितोदाभवन्नदी । स्वधनुः शक्रधनुषौ कांचनांगदविद्युतौ ९० तौ दैत्यकालजलदौ शरधारां विमुंचताम् । तौ महामेघसंकाशौ रथानागगतौ तदा ९१ बभूवतुरभिक्रुद्धौ सांबुगर्भाविवांबुदौ । तप्तकांचनसन्नाहौ दिव्यहारविभूषितौ ९२ तौ विरेजतुरायत्तौ सूर्यवैश्वानरोपमौ । तौ महाचलसंकाशावन्योन्यस्य चमूं तदा ९३ शक्राशनिसमस्पर्शैर्बाणैर्जघ्नतुराहवे । परस्परं समासाद्य तयोर्युधि दुरासदम् ९४ नाशं सन्त तदा योधा जीवितान्यपि संयुगे । शरैर्विभिन्नसर्वांगा युधि प्रक्षीणबांधवाः । निपेतुर्योधमुख्यास्तु रुधिरोक्षितवक्षसः ९५ पतितैर्निष्पतद्भिश्च पात्यमानैश्च संयुगे । बभूव भूः समाकीर्णा योधैरुद्धृतजीवितैः ९६ न गृह्णतोः शरान्घोरान्

---

दानवांस क्षतयुक्त केलें व तोडलें ८३,८४. महाबलाढ्य व्याधींनीं मुद्गर, पट्टे व अनेक शस्त्रें, यांच्या योगानें दानवांस फाडून सोडलें व मुष्टींनीं अतिशय व्याकुळ केलें ८५. तेव्हां एकमेकांवर दांत खाऊन व डोळे वटारून ते रक्त ओकूं लागले. आर्तस्वर करणाऱ्या व सिंहनादांची गर्जना करणाऱ्या त्यांचा तो शब्द तुमुल झाला. तो संग्रामही रोमहर्षण होता. युद्धांत उभ्या असलेल्या त्यांचीं, मुष्टींनीं मस्तकावर व तळहातांनीं इतर गात्रांवर भयंकर प्रहार झाला असतां, तीं मस्तकें व गात्रें मात्र भूमीवर पडून ते वीर तसेच उभे राहिले. त्यावेळीं रक्त हेंच जिच्यांतील जल आहे अशी नदी वाहूं लागली. तिच्यामध्यें वस्त्रें हाच फेंस, ध्वज हेच भोंवरे, तुटलेले बाहु हेच मोठे सर्प, शूल, शक्ति इत्यादि आयुधें हेच मोठे मत्स्य होते. धनुष्यें याच मोठ्या मकरांनीं ती नदी आकुळ झाली होती. रथाचे इषु हेच तिच्यांतील पाषाणसंबंध होते. ध्वज याच वृक्ष व वेली यांनीं ती नदी परिवेष्टित झाली होती ८६–८९. सारांश घोरशब्दासह मोठ्या विस्तारानें युक्त असलेली ती नदी वाहूं लागली. दैत्य व काल असे ते दोघे मेघ शरधारा सोडते झाले. त्यांचीं धनुष्यें हीं इंद्रधनुष्यें व त्यांचीं सोन्यांचीं बाहुभूषणें ह्याच चमकणाऱ्या विजा होत. रथरूपी हत्तीवर बसलेले ते दोघे महामेघासारखे दिसले. ज्यांच्या उदरांत जल आहे अशा मेघांप्रमाणें ते अतिशय क्षुब्ध झाले. त्यांचीं कवचें उंची सोन्याचीं होतीं. ते दोघेही दिव्यहारांनीं अतिशय भूषित झाले होते ९०-९२. सूर्य व अग्नि यांची ज्यांना उपमा आहे असे ते दोघे परस्परांकडून पीडले जाणारे वीर रणांत फार शोभले. ते दोघे महापर्वतांसारखे होते. त्यावेळीं ते एकमेकांच्या सैन्यास इंद्राच्या अशनीप्रमाणें ज्यांचा स्पर्श आहे अशा बाणांनीं मारूं लागले. त्यांच्या त्या भयंकर युद्धामध्यें परस्परांच्या सन्मुख आल्यावर योध्यांनीं आपल्या जीविताचीही आशा धरली नाहीं. शरांनीं ज्यांचीं सर्व अंगें छिन्न–भिन्न झाली आहेत, युद्धामध्यें ज्यांचें सर्व बांधव क्षीण झाले आहेत, व ज्यांचीं वक्षःस्थळें रक्तानें भरलीं आहेत असे मुख्य योद्धे भराभर रणांत पडूं लागले ९३–९५. ज्यांचें जीवित

च संदधतोस्तयोः । अंतरं ददृशे कश्चित्प्रयत्नादपि संयुगे ९७ लघुत्वाच्च महाबाहू युद्धशौण्डौ महाबलौ । मंडलीभूतधनुषौ सकृदेव बभूवतुः ९८ प्रन्हादस्य च बाणौघैर्द्रावान्तकवाहिनी । उह्यमाना बलवता वायुनेवाभ्रमण्डलम् ९९ हतदर्पं तु विज्ञाय प्रन्हादः काल-माहवे । अपयातं च समरे द्विषन्तं संप्रतर्क्य तम् १०० मत्वा वशगतं चैव प्रन्हादो युद्धदुर्मदः । तत्रैवान्यां चमूं भूयः संममर्द महासुरः १ कालप्रन्हादयोर्युद्धमभवद्यादृशं पुरा । तादृशं सर्वलोकेषु न भूतं न भविष्यति २ एवमद्भुतवीर्यौजा महारणकृतव्रणः । प्रन्हादस्त्वथवृद्धोऽत्र कालस्त्वपसृतो रणात् [ २६८७ ] १०३ इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कालप्रन्हादयुद्धे एकोनषष्टितमोऽध्यायः ॥ ५९ ॥

वैशंपायन उवाच ॥ धनाध्यक्षमनुन्हादः प्रन्हादस्यानुजो बली । ससैन्यं योधयामास क्षोभयन्यक्षवाहिनीम् १ महता च बलौघेन त्वनुन्हादोऽसुरोत्तमः । अर्दयामास संक्रुद्धो धनाध्यक्षं प्रतापवान् २ अमृष्यमाणस्त्रिदशानाहवस्थानुदायुधान् । चकार कदनं घोरं धनुष्पाणिर्महासुरः ३ आवर्त इव संजज्ञे बलस्य महतो महान् । क्षुभितस्याप्रमेयस्य सागरस्येव संप्लवः ४ त्रिदशानां शरीरैस्तु दानवानां च मेदिनी । बभूव निचिता घोरैः पर्वतैरिव संप्लवे ५

---

नष्ट झालें आहे आशा पडलेल्या, पडणाऱ्या व पाडल्या जाणाऱ्या योद्ध्यांच्या योगानें भूमि व्याप्त झाली ९६ संग्रामांत घोर शरांस हातांत घेणाऱ्या व त्यांस प्रत्यंचेशीं जोडणाऱ्या त्या दोघांच्या या दोन क्रियांमधील अंतर कोणालाही, मोठ्या प्रयत्नानें सुद्धां, कळलें नाहीं ९७. कारण ते दोघेही महाबाहु फार चपल, युद्धांत निष्णात व महाबलाढ्य होते. त्या दोघांनीं एकदांच जणुं काय आपल्या धनुष्यांना मंडलाकार केलें होते ९८. बलवान् वायूकडून उडवून नेल्या जाणाऱ्या अभ्रमंडलाप्रमाणें प्रन्हादाच्या बाणोघांनीं यमाची सेना पळविली ९९. नंतर काल संग्रामांत हतदर्प झाला आहे, असें जाणून, तो शत्रु युद्ध सोडून निघूनच गेला आहे, असा तर्क करून व तो आतां आपल्या अधीन झाला आहे, असें समजून युद्धदुर्मद प्रन्हाद महा असुर पुनः तेथेंच असलेल्या त्याच्या दुसऱ्या सेनेचे यथेच्छ मर्दन करूं लागला १००,१०१. काल व प्रन्हाद यांचें हें जसें पूर्वी युद्ध झालें तशाप्रकारचें युद्ध सर्व लोकांमध्यें मागें कधीं झालें नाहीं व पुढें होणार नाहीं २. याप्रमाणें शेवटीं अद्भुत वीर्यवान् व आजस्वी प्रन्हाद महारणांत व्रणयुक्त होऊन, विजयाच्या योगानें वृद्धि पावला व काल रणांतून निघून गेला ३. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० काल प्रन्हाद युद्धाविषयीं एकूणसाठावा अध्याय समाप्त झाला. ॥ ५९. ॥

वैशंपायनः— प्रन्हादाचा अनुज बलाढ्य अनुन्हाद ससैन्य कुबेराशीं लढूं लागला. त्यानें यक्षांच्या सैन्यास क्षुब्ध करून सोडलें १. प्रतापवान् व अतिशय रागावलेल्या अनुत्तमानें मोठ्या सैन्याच्या ओघानें धनाध्यक्षास पीडलें २. ज्यानें आपल्या हातांत धनुष्य घेतलें आहे अशा त्या महा असुरानें, हातांत आयुधें उचलून देव युद्धांत उभे आहेत हें सहन न झाल्यामुळें घोर कदन केलें ३. क्षुब्ध झालेल्या व अप्रमेय सागराच्या मोठ्या पुराप्रमाणें त्या मोठ्या सैन्यांत जणुं काय मोठाथोरला भोंवराच उठला ४. प्रलयसमयीं घोर पर्वतांच्या योगानें जशी, तशीच पृथ्वी देवांच्या व दानवांच्या शरीरांनीं भरून गेली ५. वैशाखांत सर्वतः फुललेल्या किंशुक वृक्षाप्रमाणें रक्तानें माखलेलें मेरुपृष्ठ रंगित

मेरुपृष्ठं तु रक्तेन रंजितं संप्रकाशते । सर्वतो माधवे मासि पुष्पितैरिव किंशुकैः ६ हतैर्वीरैर्गजैरश्वैः प्रावर्तत महानदी । शोणितौघा महाघोरा यमराष्ट्रविवर्धिनी ७ शकृन्मेदोमहापंका संप्रकीर्णान्त्रशैवला । छिन्नकायशिरोमीना अंगावयवशाड्वला ८ गृध्रहंससमाकीर्णा कंकसारसनादिता । वसाफेनसमाकीर्णा प्रोत्क्रुष्टस्तनितस्वरा ९ तां कापुरुषदुस्तारां युद्धभूमौ महानदीम् । नदीमिवातपापाये हंससंघोपशोभिताम् १० त्रिदशादानवाश्चैव तेरुस्ते दुस्तरां नदीम् । यथापद्मरजोध्वस्तां नलिनीं गजयूथपाः ११ ततः सृजन्तं बाणौघाननुह्रादं रथे स्थितम् । ददर्श तरसा देवो निघ्नन्तं यक्षवाहिनीम् १२ क्रुद्धस्ततो दैत्यबलं सूदयामास वित्तपः । विक्षिपन्निव खेवायुर्महाभ्रपटलं बलात् १३ समीक्ष्य तुमुलं युद्धमनुह्रादश्च वीर्यवान् । रथेनादित्यवर्णेन कुबेरमभिदुद्रुवे १४ स धनुर्धन्विनां श्रेष्ठो विकृष्य रणमूर्धनि । उत्ससर्ज शितान्बाणान्वित्तेशस्य महात्मनः १५ कुबेरं प्राप्य ते बाणा निर्भिद्य सुसमाहिताः । अपरान्पृष्ठतो जघ्नुर्व्यासक्तान्यक्षराक्षसान् १६ देवःशरैरभिहतोनिशितैर्ज्वलनोपमैः । अनुह्रादं प्रत्युदियात्संक्रुद्धः परमाहवे १७ ततो वैश्रवणो राजा क्रुद्धो यक्षगणैः सह । ववर्ष शरवर्षाणि दानवं प्रति वीर्यवान् १८ तद्यथाशारदंवर्षंगोवृषः शीघ्रमागतम् । अपारयन्वारयितुं प्रतिगृह्णन्निमीलितः १९ एवमेव कुबेरस्य शरवर्षं महासुरः । निमीलिताक्षः सहसा

---

होऊन शोभूं लागलें ६. मेलेल्या वीरांच्या, हत्तींच्या व घोड्यांच्या योगानें महानदी प्रवृत्त झाली. त्या महा घोर नदींत रक्ताचे ओघ वहात होते. ती यमाच्या राष्ट्राची वृद्धि करणारी होती ७. विष्ठा व मेद हाच तिच्यांतील मोठा चिखल व गुंतलेलीं आंतडीं हेंच शेवाळ होतें. तोडलेलीं शरीरें व मस्तकें हेंच तिच्यांतील मत्स्य असून, अंगावयव हेंच हिरवें गवत होय ८. ती गृध्ररूपी हंसांनीं व्याप्त होती. कंकपक्षी याच सारसांनीं नादित झाली होती. वसारूपी फेंसानें भरून गेली होती. आर्तलोकांचे आक्रोश हाच तिचा घोर नाद होता ९. ग्रीष्मऋतूच्या शेवटीं हंससंघांनीं सुशोभित झालेल्या एकाद्या खऱ्या नदीस जसे धीर पुरुष धरून जातात त्याप्रमाणें क्षुद्र पुरुषांस दुर्धर्ष असलेल्या त्या युद्धभूमींतील महानदीस ते देव व दानव तरून गेले. पण ती नदी दुस्तर होती. ज्याप्रमाणें गजयूथपति कमलरजानें ध्वंस पावलेल्या नलिनीस उल्लंघून जातात त्याचप्रमाणें ते वीर रक्तनदीचें अति क्रमण करते झाले १०,११. त्यानंतर बाण समूहांस सोडीत रथावर स्थित असलेल्या अनुऱ्हादास देवानें पाहिलें. तो वेगानें यक्षांच्या सेनेस मारीत होता १२. पण त्यामुळें रागावलेला धनरक्षक, वायु बलात्कारानें अभ्रसमूहास जसा आकाशांत उडवून देतो त्याप्रमाणें दैत्याच्या सैन्यास उडविता झाला १३. तें तुमुल युद्ध पाहून वीर्यवान् अनुऱ्हाद सूर्यासारख्या चकचकीत रथानें कुबेरावर चाल करून गेला १४. तो धनुर्धरांतील श्रेष्ठ रणांगणांत धनुष्य आकर्ण ओढून महात्म्या वित्तेशावर तीक्ष्णबाण सोडता झाला १५. ते बाण कुबेरापर्यंत येऊन व त्याच्या शरीरास वेध करून, अगदीं शांतपणें पुढें जाऊन, मागच्या बाजूनें इतरांशीं युद्ध करण्याऱ्या यक्षराक्षसांस प्रहार करते झाले १६. पण त्या तीक्ष्ण व अग्नीसारख्या बाणांचा असह्य प्रहार झाला असतां अतिशय रागावलेला देव महा युद्धांत अनुऱ्हादावर चालून गेला १७. त्यानंतर यक्षगणांसह रागावलेल्या त्या वीर्यवान् राजा वैश्रवणानें दानवांवर भयंकर शरवर्षाव केला १८. रग शरद्दतूंतील अकस्मात् आलेल्या वृष्टीला, तिचें निवारण करण्यास

दैत्यः सउ्राति दारुणम् २० रोषितः शरवर्षेण धनदेन महासुरः । इन्द्रकेतुप्रतीकाशमभितोऽपश्यत द्रुमम् २१ प्रवृद्धशाखाविटपं तरुणांकुरपल्लवम् । उत्पाट्य कुपितो दैत्यस्तरुं फलसमन्वितम् २२ निजघान हयाञ्छ्रेष्ठान्कुबेरस्य महात्मनः । तस्य कर्ममहाघोरं दृष्ट्वा सर्वे महासुराः २३ सिंहनाद नदन्ति स्म अनुन्हादप्रहर्षिताः । तयोस्तु तुमुलं युद्धं संजज्ञे देवदैत्ययोः २४ ततस्तौ क्रोधरक्ताक्षावन्योन्यवधकांक्षिणौ । अन्योन्यं विविधैः शस्त्रैर्घोरैर्जघ्नतुराहवे २५ त्रिदशा दानवान्सर्वे मथित्वा प्रणदंस्तदा । दानवैस्त्रिदशाश्चापि क्रुद्धैर्भुवि निपातिताः २६ दानवास्त्वथ संक्रुद्धास्त्रिदशान्निशितैः शरैः । विव्यधुर्वज्रसंकाशैः कंकपत्रैरजिह्मगैः २७ विदार्यमाणा दैत्यैस्त्रिदशास्तु महाबलाः । अमर्षिततराश्चक्रुर्युद्धकर्माण्यभीतवत् २८ ते गदाभिः सुभीमाभिः पट्टिशैः शूलमुद्गरैः । परिघैश्च सुतीक्ष्णाग्रैर्दानवाः पीडिताः शरैः २९ शरनिर्भिन्नगात्राश्च खड्गविच्छिन्नवक्षसः । जगृहुस्ते शिलाश्चैव द्रुमांश्चासुरसत्तमाः ३० ते भीमवेगा दितिजा नर्दमानाः पुनः पुनः । ममन्थुस्त्रिदशान्वीर्याच्छतशोऽथ सहस्रशः ३१ ततस्तु तुमुलं युद्धं तेषां समभिवर्तत । शिलाभिर्विपुलाभिश्च शतशश्चैव पादपैः ३२ परिघैः पट्टिशैर्भल्लैर्भिंदिपालैः परश्वधैः । केचिच्छिन्नकृत्तशिरसः केचिच्च विदली कृताः ३३ केचिद्विनिहता भूमौ रुधिरार्द्राः सुरासुराः । केचिद्रणाजिराद्भ्रष्टाः

---

असमर्थ असलेला बैल जसा डोळे मिटून सहन करतो त्याप्रमाणेंच कुबेराच्या आकस्मिक व दारुण शरवृष्टीस तो महा असुर दितिपुत्र डोळे मिटून सहन करता झाला २०. पण त्या शरवृष्टीनें कुबेरानें त्या महा असुरास चिडविलें. तेव्हां त्यानें आपल्याजवळच एक इंद्रकेतूसारखा वृक्ष पाहिला. त्याच्या शाखा व पल्लव पुष्कळ मोठाले होते. त्याला कोंवळी पालवीही फुटलेली होती. त्या वृक्षाला फळेंही लागलीं होतीं. असो; रागावलेल्या दैत्यानें तो वृक्ष उपटून घेतला २१,२२ व त्यानेंच महात्म्या कुबेराच्या श्रेष्ठ घोड्यांस मारिलें. तें त्याचें महत्कर्म पाहून सर्व महा असुर सिंहनाद करूं लागले. कारण अनुन्हादानें त्यांना अतिशय आनंद दिला होता. त्या देव-दैत्यांचें भयंकर युद्ध सुरू झालें २३,२४. त्यानंतर ज्यांचे नेत्र क्रोधानें लाल झाले आहेत असे ते दोघे एकमेकांच्या वधाची इच्छा करीत होते. म्हणून संग्रामांत विविध व घोर शस्त्रांनीं त्यांनीं एकमेकांस मारिलें २५. सर्व देव दानवांचें मंथन करून त्यावेळीं मोठी गर्जना करूं लागले. क्रुद्ध झालेल्या दानवांनींही देवांना भूमीवर पाडविलें २६. अतिशय चिडलेल्या दानवांनीं देवांना पाजळलेल्या वज्रासारख्या सरळ जाणाऱ्या कंकपत्रसंज्ञक बाणांनीं वेध केले २७. परंतु दैत्यांघाकडून विदीर्ण केले जाणारे महाबल देव अतिशय रागावून निर्भयपणें युद्धकर्में करूं लागले २८. त्यांच्या अतिशय भयंकर गदांनीं, पट्ट्यांनीं, शूल व मुद्गर यांच्या योगानें, ज्यांचीं अग्रें अतिशय तीक्ष्ण आहेत अशा बाणांनीं व परिघांनीं पीडलेले ते दानव व्याकुळ झाले २९. त्यांचीं गात्रें बाणांनीं छिन्न-भिन्न झालीं. खड्गाच्या योगानें वक्षःस्थळें तुटलीं. तेव्हां त्या उत्तम असुरांनीं शिला उचलल्या ३०. ते भयंकर वेगवाले दितिज पुनः पुनः गर्जना करीत आपल्या वीर्यानें देवांना शतशः व सहस्रशः पीडूं लागले ३१. त्यानंतर शेंकडों वृक्ष व मोठाल्या शिला यांच्या योगानें त्यांचें तुमुल युद्ध सुरू झालें ३२. परिघ, पट्टे, भाले, गोफणी, परशु, यांच्या योगानें कित्येकांचीं मस्तकें तुटलीं. कित्येकांचे दोन उभे विभाग झाले ३३ व कित्येक देव

परस्परवधार्दिताः ३४ विभिन्नहृदयाः केचिच्छिन्नपादाश्च शेरते । विदारितास्त्रिशूलैश्च केचित्तत्र गतासवः ३५ तत्सुभीमं महद्युद्धं देवदानवसंकुलम् । बभूव तुमुलं युद्धं शिलापादपसंकुलम् ३६ धनुर्ज्यातंत्रिमधुरं हिक्कातालसमन्वितम् । आर्तस्तनितघोषाढ्यं युद्धं गान्धर्वमाबभौ ३७ कुबेरः स धनुष्पाणिर्दानवान्रणमूर्धनि । दिशो विद्रावयामास संक्रुद्धः शरवृष्टिभिः ३८ कुबेरेणार्दितं सैन्यं विद्रुतं प्रेक्ष्य दानवः । अभ्यद्रवदनुन्हादः प्रगृह्य महतीं शिलाम् ३९ क्रोधाद्द्विगुणरक्ताक्षः पितृतुल्यपराक्रमः । शिलां तां पातयामास कुबेरस्य रथोत्तमे ४० आपतंतीं शिलां दृष्ट्वा गदापाणिर्धनाधिपः । रथादाप्लुत्य वेगेन वसुधायां व्यतिष्ठत ४१ सं चक्रकूबरहयं सध्वजं सशरासनम् । भंक्त्वा रथोत्तमं तस्य निपपात शिला भुवि ४२ विमथ्य तु कुबेरस्य प्रन्हादस्यानुजो रथम् । शूराणां कदनं चक्रे सस्कन्धविटपैर्द्रुमैः ४३ निर्भिन्नशिरसो भग्नास्त्रिदशाः शोणितोक्षिताः । द्रुमप्रव्यथिताङ्गाश्च निपेतुर्धरणीतले ४४ विद्राव्य विपुलं सैन्यमनुन्हादो महासुरः । गिरिशृंगं गृहीत्वा तु कुबेरमभिदुद्रुवे ४५ तमापतन्तं धनदो गदामुद्यम्य वीर्यवान् । विनदित्वाह्वयामास दानवेन्द्रं महाबलम् ४६ तस्य दैत्यस्य संक्रुद्धो गदां तां बहुकण्टकाम् । न्यपातयत वित्तेशो दानवस्योरसि प्रभो ४७ दैत्यः संक्रोधताम्राक्षस्तं प्रहारमचिन्तयन् । वित्तेशस्योपरि तदा गिरिशृंगमपा-

---

आणि असुर भूमीवर रक्तानें आर्द्र होऊन पडले. एकमेकांच्या प्रहारानें पीडित झालेले कित्येक रणांगणांतून निघून कोठें नाहींसे झाले ३४. कित्येकांचीं हृदयें फुटलीं व कित्येकांचे पाय तुटले. कित्येक त्रिशूलानें विदीर्ण व गतप्राण होऊन भूमीवर निजून राहिले ३५. तें अतिशय भयंकर व फार मोटें युद्ध देवदानवांनीं संकुल झालें. शिला व वृक्ष यांच्या योगानें आतिशय भयंकर झालेलें तें युद्ध फार घोर झालें. तें युद्ध उत्तम संगीताप्रमाणेंच भासलें. धनुष्यांच्या दोऱ्या याच त्यांतील तारा असून त्यांच्या योगानें मधुर झालें होतें. हिक्का ह्मणजे श्वास याच तालानें तें युक्त होतें. आर्तांचा व्याकुळ ध्वनि हाच त्या संगीतास साहाय्य करणारा स्वर होय ३६,३७. असो; धनुष्पाणि कुबेर आतिशय क्रुद्ध होऊन रणांगणांत शरवृष्टीच्या योगानें दानवांस दशदिशांकडे पळविता झाला ३८. पण कुबेरानें पीडलेलें सैन्य पळत सुटलें आहे असें पाहून दानव अनुन्हाद एक मोठी शिला घेऊन त्याच्यावर धांवला ३९. त्याचें नेत्र क्रोधानें दुप्पट लाल झाले. तो आपल्या पित्यासारखाच पराक्रमी होता. त्यानें ती शिला कुबेराच्या उत्तम रथावर टाकिली. ४०. पण गदापाणि कुबेर ती शिला येत आहे असें पाहून वेगानें रथावरून खालीं उडी मारून भूमीवर उभा राहिला ४१. ती शिला चाकें, दांडी, घोडे, ध्वज, धनुष्य, यांसह त्याच्या उत्तम रथास मोडून भूमीवर पडली ४२. याप्रमाणें प्रऱ्हादाच्या अनुजानें कुबेराच्या रथाचें मंथन करून स्कंध-शाखायुक्त वृक्षांनीं शूरांचें कदन केलें ४३. ज्यांचीं मस्तकें फुटलीं आहेत, असे रक्तानें माखलेले व पराभूत झालेले देव वृक्षांच्या योगानें ज्यांचीं अंगें व्यथित झालीं आहेत असे होऊन भूतळावर पडले ४४. नंतर महाअसुर अनुन्हाद देवांच्या विपुल सैन्यास पळवून व एक पर्वतशिखर घेऊन कुबेराच्या सन्मुख चालला ४५. तेव्हां वीर्यवान् धनदही आपली गदा उचलून व मोठा सिंहनाद करून येणाऱ्या महाबलाढ्य दानवेंद्रास आह्वान करता झाला ४६. हे प्रभो, क्रुद्ध झालेल्या वित्तेशानें दानवाच्या उरावर ती आपली अनेक कांट्यांनीं युक्त असलेली

तयत् ४८ सविह्वलितसर्वांगो गिरिशृंगेण ताडितः । पपात सहसा भूमौ विशीर्ण इव पर्वतः ४९ वित्तेशं विह्वलं दृष्ट्वा सर्वे ते यक्षराक्षसाः । परिवार्य महात्मानं ररक्षुर्भीमविक्रमाः ५० मुहूर्तं विह्वलो भूत्वा पुनर्विश्रवसः सुतः । उपतस्थे च सहसा धनदः क्रोधमूर्च्छितः ५१ स ननाद महानादं त्रैलोक्यमभिनादयन् । जनयन्निव निर्घोषं विधमन्निव पर्वतान् ५२ तमवध्यं तु विज्ञाय निहन्तुं पुनरुत्थितम् । प्रेक्ष्य पिंगाक्षमायान्तं दानवा विप्रदुद्रुवुः ५३ तांस्तु विद्रवतो दृष्ट्वा ह्यनुह्रादो ह्यसुरोऽब्रवीत् । कालनेमिं दानवं च वीर्यदर्पसमन्वितम् ५४ आत्मानं चैव वीर्यं च विस्मृत्याभिजनं तथा । क्व गच्छथ भयत्रस्ताः प्राकृता इव दानवाः ५५ निवर्तध्वं महावीर्याः किं प्राणान् परिरक्षथ । नालं युद्धाय यक्षोऽयं महतीयं विभीषिका ५६ एतां विभीषिकामद्य दानवानां समुत्थिताम् । विक्रम्य विधमिष्यामि निवर्तध्वं महासुराः ५७ तेऽसुराः सन्निवृताश्च समदा इव कुंजराः । निजघ्नु परमक्रुद्धा देवसैन्यं महासुराः ५८ क्षीणप्रहरणाः केचिन्महामेघनिभस्वनाः । दर्पोत्कटा भुजैरेव संप्रहारं प्रचक्रिरे ५९ पांशुभिश्चैव काष्ठैश्च शिलाभिश्च महाबलाः । बाहुभिश्च तथान्योन्यमाक्षिपन्ति स्म वेगिताः ६० मुष्टिभिश्च तलैश्चैव नखपातैर्महाबलाः । पादपैश्च महाशाखैरयुध्यन्त रणा-

---

गदा मारली ४७. त्यामुळें दैत्याला अतिशय राग आला. त्याचे नेत्र लाल झाले. त्या प्रहाराला त्यानें मुळींच जुमानिलें नाहीं व त्यानें लागलेंच वित्तेशाच्या उरावर एक पर्वतशिखर टाकलें ४८. तेव्हां त्या गिरिशृंगानें ताडण केल्यामुळें ज्याचें सर्व अंग विह्वलित झालें आहे असा तो देव फुटलेल्या पर्वताप्रमाणें एकाएकीं भूमीवर पडला ४९. वित्तेश विह्वल झाला आहे असें पाहून ते सर्व भयंकर पराक्रमी यक्ष-राक्षस त्या महात्म्यास सर्वतः वेढून त्याचें रक्षण करूं लागले ५०. क्षणभर विह्वल होऊन, लागलाच तो विश्रवसपुत्र धनद क्रोधानें देहभानही विसरून अकस्मात् उठून उभा राहिला ५१. सर्व त्रैलोक्यास प्रतिध्वनियुक्त करीत त्यानें महासिंहनाद केला. त्यावेळीं तो जणुंकाय मेघाचा गडगडाटच उत्पन्न करीत आहे अथवा पर्वतांनाच उडवीत आहे असा भास झाला ५२. तेव्हां तो अवध्य आहे असे जाणून व आपल्याला मारण्याकरितां तो पुनः वर उठला आहे, आणि पिंगट नेत्राचा तो येत आहे असें पाहून दानव धूम पळूं लागले ५३. पण ते सर्व पळत आहेत असें पाहून असुर अनुऱ्हाद वीर्य व दर्प यांनीं युक्त असलेल्या कालनेमि दानवास ह्मणाला ५४. " स्वतःला वीर्याला व कुलाला विसरून व भयभीत होऊन हे दानवहो प्राकृत पुरुषांप्रमाणें तुह्मी कोठें जातां ? ५५. अहो महावीर्यवानांनो, परता. प्राणांना कशाला राखतां ! हा यक्ष युद्ध करावयास समर्थ नाहीं. ही नुस्ती मोठी भीति आहे. ! अहो महाअसुरांनो, दानवांची ती उद्भवलेली मोठी भीति मी आज मोठा पराक्रम करून नाहींशी करीन. तुह्मी परता " ५६,५७. अनुऱ्हादाचें हें भाषण ऐकून सर्व पळणारे असुर मदोन्मत्त कुंजराप्रमाणें परतले. ते महा असुर आतिशय क्रुद्ध होऊन देवसैन्यास मारीत सुटले ५८. त्यांतील कित्येकांची प्रहरणें तीक्ष्ण झाली. कित्येकांचे ध्वनि महामेघासारखे होते. पण दर्पानें उत्कट झालेले ते भुजांनींच प्रहार करीत सुटले ५९. ते महाबलवान् उंच काष्ठांनीं, शिलांनीं व बाहूंनीं मोठ्या वेगानें युक्त होऊन एकमेकांस पीडा देऊं लागले ६०. ते बलाढ्य वीर मुष्टि, तळहात, नखें, व महाशाखांनीं संपन्न असलेले वृक्ष यांच्या योगानें रणांगणांत युद्ध करूं लागले. भडकलेला अग्नि जसा वनाला जाळून टाकतो त्याप्रमाणें

जिरे ६१ अनुन्हादस्तु संक्रुद्धो देवतानां महाचमूम् । ममन्थ परमायत्तो वनान्यग्निरिवो-त्थितः ६२ रुधिरार्द्रास्तु बहवः शेरते योधसत्तमाः । विकृताः पतिता भूमौ ताम्रपुष्पा इव द्रुमाः ६३ अनुन्हादस्य विक्रान्तो देवस्त्वाशीविषोपमान् । युध्यमानस्य समरे व्यसृजत्त्नि-शितान्छरान् ६४ धनाधिपेन विद्धस्य अनुन्हादस्य संयुगे । अंगारमिश्राः क्रुद्धस्य मुखाद्ग्नि-श्चेरुरार्चिषः ६५ अथ बाणसहस्रेण वित्तेशं दानवोत्तमः । विव्याध स शरैः क्रुद्धो दण्डपा-णिरिवान्तकः ६६ कुबेरस्तु शरैर्भिन्नः समंतात्क्षतजोक्षितः । रुधिरं परिसुस्राव गिरिप्रस्रव-णैरिव ६७ लब्ध्वा स तु पुनः संज्ञां रोषरक्तेक्षणः सुरः । गदामथ समासाद्य भीमां भीम-पराक्रमः । चिक्षेप दैत्यमुद्दिश्य बलात्क्रोधेन मूर्च्छितः ६८ अप्राप्तामन्तरे सोथ तां गदां गद-यासुरः बभंज विनदन्क्रुद्धस्तदाश्चर्यमभूत्तदा ६९ प्रगृह्य तु गदां भूयो ह्यभिदुद्राव दानवम् । तमापतंतं दृष्ट्वैव अनुन्हादो महाबलः७० गिरिशृंगमिवोत्पाट्य कैलासाचलसन्निभम् । धना-धिपं प्रदुद्राव व्यादितास्य इवान्तकः ७१ तमन्तकमिवायान्तमजेयं सकलैः सुरैः । ग्रसत-मिव तं दैत्यं त्रैलोक्यमखिलं रुषा ७२ तमालोक्य तथाभूतं धनाध्यक्षो रणं भयात् । अप-हाय ययौ तत्र यत्र शक्रः सुराधिपः ७३ तस्य चापि महत्कर्म दृष्ट्वा वित्तपतिस्तदा । जगाम भयसंत्रस्तो यत्र देवः शचीपतिः ७४ [ २७६१ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे अनुन्हादकुबेरयुद्धवर्णनं नाम षष्टितमोऽध्यायः ॥ ६० ॥

---

परम स्वाधीन असलेला व अतिशय रागावलेला अनुन्हाद देवांच्या महासेनेचें मंथन करता झाला ६१,६२ अनेक उत्तम योद्धे रक्तानें आर्द्र होऊन व विक्राळ देह धारण करून भूमीवर पडून राहिले असतां पडलेल्या तांबड्या पुष्पांच्या वृक्षाप्रमाणें दिसूं लागले ६३. पराक्रमी देव कुबेर समरांत युद्ध करणाऱ्या अनुन्हादावर सर्पासारखे भयंकर व तीक्ष्ण बाण सोडता झाला ६४. समरांत धनाधिपानें ज्याला वेध केला आहे अशा क्रुद्ध झालेल्या अनुन्हा-दाच्या मुखांतून किटाळांनीं युक्त अशा अग्निज्वाला निघाल्या ६५. नंतर क्रुद्ध झाल्या-मुळें दंडपाणि अंतकाप्रमाणें दिसणारा तो उत्तम दानव वित्तेशाला सहस्रावधि बाणांनीं वेध करिता झाला ६६. तेव्हां त्याच्या शरांनीं ज्याचें सर्व अंग फाटलें आहे व जो रक्तानें माखला आहे असा कुबेर पर्वतावरून वहाणाऱ्या झऱ्याप्रमाणें रक्ताचा स्राव करूं लागला ६७. थोड्याच वेळानें तो पुनः सावध झाला. त्याचे नेत्र क्रोधानें लाल झाले. त्या भयंकर पराक्रम करणाऱ्या देवानें भयंकर गदा घेतली व क्रोधानें देहभान विसर-लेल्या त्यानें ती मोठ्या बलानें दैत्यावर नेम धरून फेंकली ६८. पण असुरानें ती जवळ येण्यापूर्वीं, मध्येंच आपल्या गदेनें फोडून उडविली व रागावलेला तो मोठा सिंहनाद करूं लागला. खरोखरच त्यावेळीं ते मोठें आश्चर्य झाले ! ६९. तथापि कुबेर पुनः दुसरी गदा घेऊन दानवावर धावला. पण तो येत आहे असें पाहूनच महाबलाढ्य अनुन्हाद ७०. कैलास शिखरासारखें पर्वताचें एक शिखर उपटून घेऊन तोंड उघडलेल्या यमाप्रमाणें कुबेरावर धावला ७१. तेव्हां अंतकाप्रमाणें येणाऱ्या, सर्व देवांस अजिंक्य असलेल्या व रोषानें जणुं काय सर्व त्रैलोक्याचा ग्रास करीत असलेल्या त्या तसल्या भयावह दैत्याला पाहून धनाध्यक्ष भयानें रण सोडून जेथें देवाधिप शक्र होता तेथें गेला ७२,७३. सारांश त्या दानवाचें तें महत्कर्म पाहून भयभीत झालेला वित्तपति जेथें देवशचीपति होता, तेथें गेला ७४. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० वामन० अनुन्हाद–कुबेर–युद्धवर्णन नामक साठावा अध्याय समाप्त झाला ॥ ६० ॥

वैशंपायन उवाच ॥ विप्रचित्तिस्तु वरुणं दैत्यानामादिरव्ययम् । जघानेषुगणैः क्रुद्धो दीप्तैरिव महोरगैः १ स दह्यमानो दैत्येन दीप्तैः शरगभस्तिभिः । नाभ्यजानत कर्तव्यं संग्रामे स जलेश्वरः २ सर्वलोकेश्वरस्येव परमेष्ठी प्रजापतिः । न शक्नोत्यग्रतः स्थातुं विप्रचित्तेर्जलाधिपः ३ वज्रो नाम महाव्यूहो निर्भयः सर्वतोमुखः । तं व्यूह्य प्रत्यदृश्यन्त दानवा देववाहिनीम् ४ वह्निज्वालातमं तत्र रविमण्डलसन्निभम् । मुखमाभातिदैत्यस्य विप्रचित्तेर्महात्मनः ५ वरुणस्तु महातेजा विप्रचित्तिं महासुरम् । प्रदहन्निव तेजोभिर्जिगीषुः प्रत्यवैक्षत ६ स्रग्दाममालाभरणः केयूरांगदभूषणः । जग्राह परिघं दैत्यः कैलास शिखरोपमम् ७ पिनद्धं कांचनैः पट्टैर्हेममालिनमायसम् । यमदण्डोपमं घोरं दैत्यानां भयनाशनम् ८ भ्रामयासास संक्रुद्धो महाशक्रध्वजोपमम् । विननाद विवृत्तास्यो विप्रचित्तिर्महासुरः ९ स कण्ठस्थेन निष्केण भुजस्थैरपि चांगदैः । कुंडलाभ्यां विचित्राभ्यां स्रजाचैव विचित्रयात् १० दानवो भूषणैर्भाति परिघेणायसेन च । यथेन्द्रधनुषा मेघः सविद्युत्स्तनयित्नुमान् ११ स्फोटयपरिघास्त्रेण वातस्कन्धां महास्वनः । जज्वाल च सधूमार्चिः संघर्षजनितोऽनलः १२ विद्याधरगणैः सार्धं गन्धर्वनगरैरपि । सह चैवामरावत्या सिद्धलोकैस्तथा सह १३ गृहनक्षत्ररचितं सार्कचन्द्रविभूषितम् । दैत्येन्द्रपरिघोद्धूतं भ्रमतीव नभस्तलम् १४ दुरासदः सुमंजशे परिघाभरणः प्रभुः । सुरेन्धनोऽसुरेंद्राग्निर्युगान्ताग्निरिवोत्थितः १५

---

वैशंपायनः— दैत्यांचा मुख्य विप्रचित्ति रागावून अव्यय कुबेराला महासर्पासारख्या दीप्त शरसमूहांनीं मारूं लागला १. तेव्हां दीप्त शरकिरणांनीं दैत्याकडून जाळला जाणारा तो जलेश्वर संग्रामांत आतां काय करावें हें जाणेनासा झाला २. सर्व लोकेश्वराच्यापुढें जसा परमेष्ठी प्रजापति त्याप्रमाणें विप्रचित्तीच्या पुढें जलाधिप उभा राहण्यास समर्थ नव्हता ३. वज्र या नांवाचा एक महाव्यूह असून तो सर्वतोमुख ( ज्याला सर्वतः मुखें आहेत असा ) व निर्भय आहे. यास्तव तो व्यूह रचून दानव देवसैन्यास पाहूं लागले ४. त्या महात्म्या विप्रचित्तीचें तोंड त्यावेळीं अग्नीच्या ज्वालेसारखें अथवा सूर्यमंडलासारखें शोभत होतें ५. त्याला जिंकण्याची इच्छा करणारा महातेजस्वी वरुण आपल्या तेजांनीं विप्रचित्ति महा असुरास जाळीत असल्यासारिखा दिसला ६. पुष्पांच्या माळा हींच ज्याचीं आभरणें आहेत व केयूर आणि बाहुभूषणें हीं ज्यांचीं भूषणें आहेत असा तो दैत्य कैलासशिखरोपम परिघ घेता झाला ७. तो सोन्याच्या पट्ट्यांनीं आच्छादित केलेला होता. त्याच्यावर सोन्याच्या वेलबुट्टीच्या ओळी होत्या. तो लोखंडी परिघ यमाच्या दंडासारखा घोर व दैत्यांचें भय नाहींसें करणारा होता ८. महा शक्रध्वजाचीच ज्याला उपमा आहे अशा त्याला गरगर फिरवून फारच रागावलेला विप्रचित्ति महा असुर तोंड पसरून फार मोठा सिंहनाद करता झाला ९. तो दानव कंठस्थ हारानें, भुजांतील बाहुभूषणांनीं, विचित्र दोन कुंडलांनीं, तशाच विचित्र रचनायुक्त पुष्पमाळेनें, इतर भूषणांनीं व लोखंडी परिघानें, मेघ इंद्रधनुष्य विद्युत् व गडगडाट यांच्या योगानें जसा शोभतो, तसाच शोभला १०, ११. परिघअस्त्रानें वातस्कंधास फोडून भयंकर घर्षणामुळें उत्पन्न झालेला अग्नि धूम, ज्वाला व महाध्वनि यांसह पेटूं लागला १२. विद्याधरगण, गंधर्वनगरें, अमरावती, व सिद्धांचे लोक यांसह १३. ग्रह नक्षत्ररचित, सूर्यासह चंद्राच्या योगानें भूषित झालेलें नभस्तल दैत्याच्या त्या परिघानें जणुं काय वर उडविल्याप्रमाणेंच भ्रमण करीत आहे असा भास झाला १४

त्रिदशा वरुणश्चैव नशेकुः स्पन्दितुं भयात् । तत्रासीन्निर्भयस्त्वेकः कौशिको वासवः प्रभुः ।
भास्करप्रतिमं घोरं परिघं रौद्रदर्शनम् १६ पातयामास सेनायां जलेशस्य स दानवः । पतता
तेन संग्रामे जलेशस्य महात्मनः १७ भूतानां शतसाहस्रं परिघेण समाहतम् । तेषां गात्राणि
चासाद्य व्यशीर्यन्त सहस्रशः १८ विशीर्यमाणं त्रिबभावुल्काशतमिवांबरे । भूयश्चैनं तदा-
भ्राम्य वरुणाय न्यपातयत् १९ पात्यमाने तदा तस्मिञ्छरीरे वारुणे तदा । संभिन्नपरिघो-
घोरो देवगात्रे व्यशीर्यत २० शीर्यमाणस्य चूर्णानि खद्योता इव चांबरे । स तु तेन प्रहारेण न
चचाल जलाधिपः २१ परिघेण हतः संख्ये यथा वज्रहतोऽचलः । स्वसैन्येष्वपि भग्नेषु भिन्न-
देहेषु चाहवे २२ मुहूर्तमगमत्क्षोभमर्षा पतिरमर्षणः । सोमर्षं च समापन्नो वरुणोऽमितवि-
क्रमः २३ सर्वसंहारमकरोत्स्वपक्षस्थोऽरिमर्दनः । स सागरैश्चतुर्भिश्च वृतोदीप्तैश्च पन्नगैः २४
शंखमुक्तामणिचितौबिभ्रत्तोयमयं वपुः । पांडुरोद्धूतवसनो नानारत्नविभूषितः २५ वरुणः
पाशधृक् श्रीमान्कूर्ममीनसमाकुलः । वरुणस्तु तदा क्रुद्धस्तान्निरीक्ष्य स्वसैनिकान् २६
उवाच दृष्ट्वा युध्यध्वं दानवानां जिघांसया । अहमेनं हनिष्यामि भयं मुक्त्वानुयुध्यत २७
ततस्ते पन्नगाः सर्वे महार्णवजलाश्रयाः । जग्मुर्दैत्यान्रणमुखे नदन्तो जयगृद्धिनः २८

---

युगांतसमयींच्या अग्नीप्रमाणें उठलेला तो असुरेंद्राग्नि अतिशय असह्य झाला. देव हेंच ज्याचें इंधन आहे असा तो प्रभु परिघरूपी भूषणानें भूषित झाला होता १५. त्यावेळीं देव व वरुण भयानें श्वास सोडण्यासही धजले नाहींत. त्यावेळीं तेथें एक कौशिक वासव ( इंद्र ) प्रभु मात्र निर्भयपणें उभा होता. असो. ज्याचें दर्शन भयंकर आहे, असा तो घोर सूर्यासारिखा परिघ त्या दानवानें सेनेमध्यें जलेशावर फेंकला. तेव्हां संग्रामांत महात्म्या जलेशावर पडणाऱ्या परिघानें एक लक्ष प्राण्यांना मारलें. त्यांच्या गात्रांवर त्याचा आघात झाला असतां तीं सहस्रशः छिन्न–भिन्न झालीं १६–१८. त्यामुळें अंतरिक्षांत शेंकडों उल्काच फुटत आहेत असा भास झाला. त्या दैत्यानें पुनः त्या परिघाला गरगर फिरवून वरुणावर टाकलें १९. तेव्हां पण वरुणाच्या शरीरावर पडत असतां तो घोर परिघ मध्येंच फुटला. तथापि तो देवाच्या अंगावर येऊन आदळला. आणि त्यामुळें अधिक फुटलेल्या त्याचें चूर्ण आकाशांत उडणाऱ्या काजव्याप्रमाणें दिसूं लागलें. पण त्या परिघाच्या प्रहारानें वरुण चंचल झाला नाहीं. तर परिघाच्या योगानें ताडित झालेला तो वज्रानें ताडित झालेल्या पर्वताप्रमाणें निश्चळ उभा राहिला. नंतर संग्रामांत आपलें सर्व सैन्य पराभूत झालें आहे व त्याचे देह छिन्न–भिन्न झालें आहेत असें पाहून क्रोधी वरुण क्षणभर क्षुब्ध झाला. याप्रमाणें रागावलेला अमित पराक्रमी व शत्रूंचें मर्दन करणारा वरुण आपल्या पक्षामध्येंच स्थित होऊन सर्व संहार करता झाला. तो चारी सागरांनीं व दीप्त नागांनीं आवृत झालेला २०–२४, शंख, मोत्यें, मणी यांनीं व्यापलेला, जळमय शरीर धारण करणारा, पांढरें शुभ्र वस्त्र नेसलेला, नानावस्त्रांनीं अतिशय भूषित झालेला, पाश धारण करणारा श्रीमान् कूर्म व मीन यांनीं व्याप्त झालेला वरुण त्या आपल्या सैनिकांस पाहून त्यावेळीं अतिशय रागावला २५, २६; आणि त्यांच्याकडे पाहून दानवांना मारण्याच्या इच्छेनें म्हणाला, वीरांनो; लढा. भय सोडून युद्ध करा. मी याला मारीन २७. त्यानंतर महा सागराच्या जळाचा आश्रय करून रहाणारे ते सर्व सर्प जयाच्या इच्छेनें मोठा घोष करीत रणांगणांत

ते तु नालीकनाराचैर्गदाभिर्मुशलैस्तथा । अभ्यघ्नन्दानवान्हृष्टा मुदिता वरुणानुगाः २९ विप्रचित्तिस्तु संक्रुद्धो महाबलपराक्रमः । पन्नगानां शरीराणि व्यधमद्युद्धदुर्मदः ३० गारुडेनापि चास्त्रेण पन्नगान्दानवोत्तमः । समरे घातयामास गरुडैः पन्नगाशनैः ३१ स शरैः सूर्यसंकाशैः शातकुंभविभूषितैः । पन्नगान्समरे वीरः प्रममाथ सुदुर्जयान् ३२ समरे भिन्नगात्रास्ते पन्नगाः शरपीडिताः । पेतुर्मथितसर्वांगा गजा इव महागजैः ३३ तं तपन्तमिवादित्यं दीप्तैर्बाणगभस्तिभिः । अभ्यधावत संक्रुद्धः समरे वरुणः प्रभुः ३४ ततस्तु दानवास्तत्र भिन्नदेहाः सहस्रशः । व्यथिता विद्रवन्ति स्म दिशो दश विचेतसः ३५ इन्द्रस्यार्थे पराक्रम्य वरुणस्त्यक्तजीवितः । विनर्दमानो युयुधे समरे पाशभृद्वरः ३६ वरुणः पन्नगाश्चैव मुष्टिभिः समरोत्कटाः । अभ्यवर्तन्त समरे विप्रचित्तिं महासुरम् ३७ ततोऽस्त्रैश्च शिलाभिश्च प्राहरत्स बलोत्कटान् । व्यपोहत महातेजा विप्रचित्तिर्महासुरः ३८ ततः पावकसंकाशैः सुमुक्तैः शीघ्रगामिभिः । वरुणस्य महावेगान्बिभेद समरे हयान् ३९ कर्मणा तेन महता विप्रचित्तेर्महात्मनः । अग्नेराज्याहुतस्येव तेजः समभिवर्धत ४० स शरैः सूर्यसंकाशैः सुमुक्तैः शीघ्रगामिभिः । वारुणीं तां महासेनां निर्ममन्थ महाबलः ४१ क्षीणास्त्रां सायकाक्रान्तां शरजालेन मोहिताम् । शूलशक्त्यृष्टिभिर्भिन्नां च चकार रुधिरोक्षिताम् ४२ अभिद्रुतोऽथ दैत्येन ससैन्यः सलिलाधिपः । महेन्द्रं शरणं प्राप्तो विप्रचित्तेर्भयार्दितः ४३ [ २८०४ ]

---

दैत्यांना मारूं लागले २८. ते हृष्ट व मुदित झालेले वरुणाचे अनुयायी नालीक, नाराच, गदा, मुसळें, यांच्या योगानें दानवांस मारीत सुटले २९. पण त्यामुळें युद्धदुर्मद, महाबल पराक्रम विप्रचित्त अतिशय रागावला. व त्यानें सर्पांच्या शरीरास तोडून टाकण्याचा सपाटा चालविला. तो उत्तम दानव गारुड अस्त्राचा प्रयोग करून सर्पांस खाणाऱ्या गरुडाच्या द्वारां समरांत त्यांस मारवूं लागला ३०,३१. तो वीर सुवर्ण भूषित सूर्यसदृश बाणांनीं समरांगणांत दुर्जय सर्पांस मारीत सुटला ३२. तेव्हां समरांत ज्यांचीं गात्रें फुटलीं आहेत व ज्यांचीं सर्व अंगें ठेंचलीं आहेत असे ते शरपीडित सर्प महागजांनीं पराभूत केलेल्या गजांप्रमाणें भूमीवर पडले ३३. दीप्त बाणरूपी किरणांच्या योगानें त्या तापत असलेल्या आदित्या-सारख्याच प्रखर दैत्यावर वरुणप्रभु रागावून धावला ३४. तेव्हां ज्यांचे देह फुटले आहेत असे मोहित व व्यथित झालेले सहस्रावधि दानव दशदिशांस पळून जाऊं लागले ३५. पाश धारण करणारांतील श्रेष्ठ व समरांत जीविताचा त्याग करण्याचा ज्यानें निश्चय केला आहे, असा वरुण मोठा सिंहनाद करीत इंद्रासाठीं मोठा पराक्रम गाजवीत लढत होता ३६. वरुण व समरामध्यें उत्कट झालेले सर्प मुष्टींच्या योगानें विप्रचित्ति महाअसुरास पीडा देऊं लागले ३७. पण महा तेजस्वी विप्रचित्ति महा असुर अस्त्रांनीं व शिलांनीं बलानें उत्कट झालेल्या त्यांस मारूं लागला ३८. शेवटीं अग्नीसारख्या, शीघ्रगामी व धनुष्यापासून सोडलेल्या बाणांनीं त्यानें वरुणाच्या महावेगवान् घोड्यांस मारलें ३९. त्या मोठ्या कर्माच्या योगानें महात्म्या विप्रचित्तीचें तेज आज्याचें हवन केलेल्या अग्नीप्रमाणें अतिशय वाढलें ४०. त्या महाबल दैत्यानें आकर्ण ओढून सोडलेल्या शीघ्रगामी सूर्यसंकश शरांनीं त्या वारुणी महासेनेचें यथेच्छ मर्दन केलें ४१. त्यानें तिला जिचीं अस्त्रें क्षीण झालीं आहेत, जी बाणांनीं व्याप्त झाली आहे, शरसमूहानें मोहित झाली आहे, शूल, शक्ति व ऋष्टि यांच्या योगानें छिन्न-भिन्न झाली आहे, आणि त्यामुळें

इति श्रीम० खि० हरि० भवि० वामने विप्रचित्तियुद्धं नामैकषष्टितमोऽध्यायः ॥ ६१ ॥

वैशंपायन उवाच ॥ पराजयं तु देवानां दृष्ट्वाग्निर्देवसत्तमः । चकार बुद्धिं दैत्यानां वधे
ब्रह्मर्षिभिः स्तुतः १ स्वयंप्रभायाः शाण्डिल्यायः पुत्रो हव्यवाहनः । हिरण्यरेताः पिंगाक्षो
देवहूतो हुताशनः २ रोहितो लोहितग्रीवो हर्ता दाता हविः कविः । पावको विश्वभुग्देवः
सर्वदेवाननः प्रभुः ३ सुब्रह्मात्मा सुवर्चस्कः सहस्रार्चिर्विभावसुः । कृष्णवर्त्मा चित्रभानुर्दे-
वानामपि देवराट् ४ लोकसाक्षी द्विजहुतः सदार्चिष्मान्वषट्कृतः । हव्यभक्षः शमीगर्भः-
स्वयोनिः सर्वकर्मकृत् ५ पावनः सर्वभूतानां त्रिदशानां तपोनिधिः । शमनः सर्वपापानां
लेलिहानस्तपोमयः ६ प्रदक्षिणावर्तशिखः शुचिरोमा मखाकृतिः । हव्यभुक्भूतभव्येशो
यज्ञभागहरो हरिः ७ सोमपः सुमहातेजा भूतेशः सुमहातपाः । अधृष्यः पावको भूति-
र्भूतात्मा वै स्वधाधिपः ८ स्वाहापतिः सामगीतः सोमपूताशनोऽद्रिधृक् । देवदेवो महा-
क्रोधो रुद्रात्मा ब्रह्मसंभवः ९ लोहिताश्वं वायुचक्रं रथमास्थाय भूतधृक् । धूमकेतुर्धूम-
शिखो नीलवासाः सुरोत्तमः १० उद्यम्य दिव्यमाग्नेयं शस्त्रं देवो रणे महान् । दानवानां
सहस्राणि प्रयुतान्यर्बुदानि च ११ ददाह भगवान्वह्निः संक्रुद्धः प्रलये यथा । प्राणो यः

---

जिच्यावर रक्ताचा वर्षाव झाला आहे अशी केलें ४२. तेव्हां विप्रचित्तीच्या भयानें पीडित झालेला जलाधिप, दैत्यानें अशी दुर्दशा करून पळावयास लाविलें असतां, सैन्यासह महेंद्राला शरण आला ४३. इति श्रीमद्ध. खि. हरि. भवि. वामन विप्रचित्ति-वरुण-युद्ध-वर्णननामक एकसष्ठावा अध्याय समाप्त झाला ॥ ६१ ॥

वैशंपायनः—याप्रमाणें देवांचा पराभव झालेला पाहून महर्षींकडून स्तुति केला जाणारा उत्तम देव अग्नि दैत्यांच्या वधाविषयीं निश्चय करता झाला १ शांडिली स्वयंप्रभेचा पुत्र, हव्यांस देवांकडे नेऊन पोचविणारा, सुवर्ण हें ज्याचें रेत आहे, ज्याचे नेत्र पिंगट वर्णाचे आहेत, देवांनींही ज्याचें हवन केलें आहे. घृतादि हवन केलेल्या पदार्थांना खाणारा २, लालरंगाचा ज्याचा कंठ रक्तवर्ण आहे, पापांचें हरण करणारा, भक्तांस इष्ट वर देणारा, हविरूप, कवि, सर्वांस पावन करणारा, सर्व भक्षक, प्रकाशमान, सर्व देवांचें मुख, प्रभु, सुब्रह्मरूप. अतिशय तेजस्वी, सहस्र ज्वालावान्, प्रभा हेंच ज्याचें धन आहे, ज्याचा मार्ग कृष्णवर्ण आहे, ज्याचें किरण विचित्र आहेत, देवांचाही जो देव-राज आहे ३,४, लोकसाक्षी, ब्राह्मणाकडून हवन केला जाणारा, सदां ज्वालावान्, वषट्कृत, हव्यभक्षक, शमीच्या उदरांत रहाणारा, स्वतःच उद्भव पावणारा, सर्व कर्मे करणारा ५, सर्व भूतांस पावन करणारा, देवांतील तपोनिधि सर्व पापांचें शमन करविणारा, ज्वालांच्या योगानें सर्वांचा ग्रास करणारा, तपोमय, ज्याच्या ज्वाला प्रदक्षिण व वर्तुळ पेटत आहेत, ज्याचा धूम पवित्र आहे, यज्ञाकृति, हव्यभोक्ता, भूत व भावि जीवांचा ईश, यज्ञभागांस हरण करणारा, हरि ६,७, सोमपान करणारा, अतिशय महातेजस्वी, भूतांचा ईश, अति महातपस्वी, पराभव न पावणारा, पावक, ऐश्वर्यरूप, भूतात्मा, स्वधासंज्ञक पितृभोज्याचा अधिपति ८, स्वाहापति, सामगायन केलेला, सोम हेंच जिचें पवित्र अशन आहे, पर्वताचें धारण करणारा, देवदेव, महाक्रोध, रूद्रात्मा ब्रह्मसंभव ९ ज्याला जोडलेले घोडे लाल आहेत व वायु हींच ज्याचीं चाकें आहेत अशा रथावर बसून भूतांचें धारण करणारा, धूम हाच ज्याचा ध्वज आहे, धूम हीच ज्याची शिखा

सर्वभूतानां देहे तिष्ठति पंचधा १२ यन्ता यश्चहुताशस्यसखा च प्रभुरीश्वरः । प्रभंजने यो लोकानां युगान्ते सर्वनाशनः १३ सप्तस्वरगता यस्य योनिर्गीर्भिरुदीर्यते । यो ह्याकाशमयो देवो दूरगः सर्वसंभवः १४ यश्च कर्ता विकर्ता च गतिर्गतिमतां प्रभुः । वेदकर्ता समो लोके ब्रह्मणा यः सनातन १५ अमूर्तिमन्तं यं प्राहुर्महाभूतं महत्तरम् । सोग्निं समीरयामास शमीगर्भं समीरणः १६ त्रिदिवारोहिभिर्ज्वालैर्जृंभमाणो दिशो दश । दानवानामभावाय युगान्ताग्निरिवोत्थितः १७ मेदो मज्जामहापंकां केशशैवलशालिनीम् । योधशीर्षोपलवहां मृतद्विपतटोत्कटाम् १८ शोणितोदां रणे दृष्ट्वा संग्रामसरितं विभुः । वह्निः प्रस्कन्दयामास दैत्यानां भयवर्धनः १९ ततोऽग्निर्दितिजान्सर्वान्प्रन्हादप्रमुखांस्तथा । पराजयानः स विभुः क्रोशमानो महामृधे २० केचित्प्रदीप्तैर्मुकुटैः केचिद्दीप्तैः शिरोरुहैः । केचित्प्रदीप्तवसनैः केचिद्दीप्तैर्भुजाननैः २१ केचित्प्रदीप्तैरुरुभिः केचिच्छत्रैर्ध्वजैरथैः । असुरास्तत्र दृश्यन्ते प्रदीप्तेनाग्निनावृताः २२ त्यक्त्वायुधानिसर्वाणिसध्वजांश्चरथोत्तमान् । प्रयान्ति समरे भीताः पावकेन पराजिताः २३ न च पश्यन्ति ते वह्निं प्रदीप्तध्वजिनीमुखे । दिशः खंगं च मेघांश्च दीप्ता-

---

आहे, ज्याचें वस्त्र नीलवर्ण आहे असा देवोत्तम अग्नि महादेव दिव्य आग्नेय अस्त्र उठवून रणांत सहस्रावधि, किंबहुना प्रयुत व अर्बुद दानव मारता झाला ११. ज्याप्रमाणें प्रलयसमयीं त्याचप्रमाणें भगवान् अग्नि अतिशय क्रुद्ध होऊन दानवांस जाळूं लागला. जो सर्व भूतांच्या शरीरांत प्राण होऊन पांच प्रकारें रहातो व जो या हुतभक्षकाचा सारथि, सखा, प्रभु व ईश्वर आहे, जो युगांतीं सर्वांचा नाश करणारा व लोकांमध्यें प्रभंजन या नांवानें प्रख्यात आहे, ज्याची योनि सात स्वरांमध्यें असून ( ह्म० आकाशरूप असून ), ज्याचें वर्णन वाणींनीं केलें जातें, जो देव आकाशमय, दूर गमन करणारा, सर्वांचा उद्भव करणारा १३,१४ जो कर्ता, विविध सृष्टिकर्ता, प्रभु, गतिमान पदार्थांची गति, वाणीच्या उच्चारास कारण होणाऱ्या स्थानादिकांचा हेतु असल्यामुळें वेदकर्ता, व त्यामुळेंच जो सनातन वायु यालोकीं ब्रह्मदेवासारखा आहे १५. ज्या महाभूतास व अतिशय मोठ्या तत्त्वास अमूर्तिमान् ( आकारशून्य ) ह्मणतात तो समीरण ( वायु ) शमीच्या उदरांतून निघालेल्या अश्वत्थापासून उत्पन्न झालेल्या अग्नीला प्रेरणा करता झाला १६. त्यामुळें स्वर्गापर्यंत जाऊन भिडणाऱ्या ज्वालांनीं दशदिशांना व्यापणारा अग्नि दानवांच्या अभावाकरितां युगांतींच्या अग्नीप्रमाणें उठला १७. मेद व मज्जा यांचा ज्यामध्यें मोठा चिखल झाला आहे, केंसरूपी शेवाळानें जी शोभत आहे, योद्ध्यांच्या मस्तकरूपी पाषाणांना जी वाहून नेत आहे, मेलेल्या गजरूपी तटांनीं जी उत्कट झाली आहे व जिच्यामध्यें रक्त हेंच जल आहे अशी ती रणांतील संग्रामनदी पाहून दैत्यांचें भय वाढविणारा विभु अग्नि शत्रूंचा नाश करता झाला १८,१९. त्यानंतर तो विभु अग्नि प्रन्हादप्रभृति सर्व दितिजांस पराभूत करून महा संग्रामांत मोठा आक्रोश करूं लागला २०. अग्नीनें ज्यास आवृत करून सोडलें आहे अशा दैत्यांतील कित्येक प्रदीप्त मुकुटांनीं, कित्येक पेटलेल्या केंसांनीं, कित्येक जळणाऱ्या वस्त्रांनीं, कित्येक दीप्त भुजा व मुखें यांनीं २१, कित्येक पेटलेल्या, मांड्यांनीं कित्येक जळणार ध्वज, छत्रें, व रथ यांनीं व्याकुळ झाले आहेत, असें दिसलें २२. तेव्हां सर्व आयुधें व ध्वजांसह उत्तम रथ यांस टाकून पावकाच्या हातून पराभूत झालेले व रणांत भ्यालेले दानव भराभर जाऊं

न्पश्यन्ति दानवाः २४ ध्रुवं स्वयंभुवा सृष्टो युगान्तस्तोययोनिना । इत्येवं दानवाः सर्वे मेनिरे त्रस्तचेतसः २५ मयश्च शंबरश्चैव महामायाधरौ तदा । पर्जन्यवारुणे माये सृजतां वारिविक्षरे २६ ताभ्यां वह्निः स मायाभ्यां सिच्यमानः समंततः । तोयौघैः पर्वतनिभैर्मृदुर्चिरभवद्रणे २७ शम्यमाने तु समरे पावके दैत्यनाशिनि । बृहत्कीर्तिर्बृहत्तेजा वह्निमाह बृहस्पतिः २८ गुरुरुवाच ॥ हिरण्यरेतः सुशिख ज्वलनाक्षय सर्वभुक् । सप्तजिह्वानलक्षाम लेलिहान महाबल २९ आत्मा वायुस्तव विभो शरीरं सर्ववीरुधः । योनिरापश्च ते प्रोक्ता योनिस्त्वमसि चांभस ३० ऊर्ध्वं चाधश्च गच्छन्ति संचरन्ति च पार्श्वतः । अर्चिषस्ते महाभाग सर्वतः प्रभवन्ति च ३१ त्वमेवाग्ने सर्वमसि त्वयि सर्वमिदं जगत् । त्वं धारयसि भूतानि भुवनं त्वं बिभर्षि च ३२ त्वमग्ने हव्यवाडेकस्त्वमेव परमं हविः । यजन्ति च सदा संतस्त्वामेव परमाध्वरे ३३ त्वमन्नं प्राणिनां भुंक्षे जग्धपीताशितं प्रभो । त्वयि प्रवृत्तो विजयस्त्वयि लोकाः प्रतिष्ठिताः ३४ सर्वांल्लोकांस्त्रीनिमान्हव्यवाहप्राप्ते काले त्वं पचस्येव दीप्तः । त्वमेवैकस्तपसे जातवेदो नान्यस्तप्ता विद्यते गोषु देव ३५ वृषकपिः सिन्धुपतिस्त्वमग्ने महामखेष्वग्र्यहरस्त्वमेव । विश्वस्य भूम्नस्त्वमसि प्रसूतिस्त्वं च प्रतिष्ठा भगवन्प्रजानाम् ३६ सृजस्यपो रश्मिभिर्गा-

---

लागले २३. प्रदीप्त सेनेच्या अग्रभागीं त्यांनीं अग्नीला पाहिलेंच नाहीं. केवळ दिशा, आकाश, पृथ्वी व मेघ यांस त्यांनीं प्रदीप्त झालेलें पाहिलें २४. खाचित् या जलाच्या कारणभूत स्वयंभू अग्नीनें युगांतच केला आहे, असें ते सर्व त्रस्तचित्त दानव मानूं लागले २५. तेव्हां महामाया धारण करणारे मय व शंबर हे दोन दैत्य जलस्राव करणाऱ्या पर्जन्य व वारुण या नांवाच्या माया उत्पन्न करते झाले २६. त्या दोन मायांच्या योगानें समंततः सेक केला जाणारा अग्नि पर्वतासारख्या जलौघांनीं रणांत मृदुज्वालावान् झाला. ( ह्मणजे त्याच्या ज्वालांचा जोर कमी झाला ) २७. तेव्हां समरांत दैत्यांचा नाश करणारा अग्नि शांत केला जात आहे असें पाहून मोठा कीर्तिमान् व मोठा तेजस्वी बृहस्पति अग्नीला असें ह्मणाला २८. गुरुः—हे हिरण्यरेत, सुशिखावान्, हे ज्वलन, हे अक्षय, हे सर्वभुक्, हे सप्तजिह्व, हे अनल, हे क्षाम, हे ग्रास करणाऱ्या, हे महाबल, व हे विभो, वायु हा तुझा आत्मा आहे; सर्व वेली हें शरीर व जल हें तुझें उत्पत्तिस्थान सांगितलेलें आहे. त्याचप्रमाणें तूं जलाचें कारण आहेस २९,३०. हे महाभाग, तुझ्या ज्वाला वर, खालीं जातात; बाजूंस संचार करितात व सर्वतः पसरतात ३१. हे अग्ने, तूंच सर्व आहेस. तुझ्यामध्येंच हें सर्व जगत् आहे तूं सर्व भूतांस धारण करतोस. तूं भुवनाला धारण करतोस ३२ हे अग्ने, तूंच एक हव्यवाह आहेस. तूंच परम हवि आहेस. संत परम यज्ञामध्यें सदा तुझेंच पूजन करीत असतात ३३ प्रभो, तूंच प्राण्यांचें खाल्लेलें, प्यालेलें व चोखलेलें अन्न भोगतोस. तुझ्याठायींच विजय प्रवृत्त झाला आहे. तुझ्यामध्येंच सर्व लोक प्रतिष्ठित झाले आहेत ३४. हे हव्यास नेणाऱ्या देवा, काल प्राप्त झाला असतां दीप्त झालेला तूंच या सर्व तिन्ही लोकांस पचवितोस. हे जातवेदा, तूंच एक तप करतोस अथवा सूर्यरूपी होऊन तप्त होतोस. किरणमंडलामध्यें तुजवाचून दुसरा कोणी तापविणारा नाहीं ३५. हे अग्ने, वृषाकपि व सिंधुपति तूंच. महामखांमध्यें मुख्य भागास हरण करणारा तूंच. या विस्तृत विश्वाची प्रसूति ( निर्माणस्थान ) तूंच आहेस. आणि हे भगवन्, प्रजांची प्रतिष्ठा तूंच आहेस ३६. हे जातवेदा, तूं किरणांच्या योगानें

त्वं वेदस्तथौषधीरोषधीनां रसांश्च। विश्वं त्वमादाय युगान्तकाले स्रष्टा भवस्यानल सर्गकाले ३७ त्वमग्ने सर्वभूतानां योनिर्वेदेषु गीयसे। त्वया देवहितार्थाय निहता दानवा रणे ३८ स्वयोनिस्ते महातेजस्तोयं मखशतार्चितम्। तां स्वयोनिं समासाद्य किं विषीदसि पावक ३९ त्रायस्व समरे देवान्दैत्येभ्यः सुरसत्तम। पिंगाक्ष लोहितग्रीव कृष्णवर्त्मन्हुताशन ४० [ २८४४ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनेऽग्निस्तवो नाम द्विषष्टितमोऽध्यायः ॥ ६२ ॥

वैशंपायन उवाच ॥ बृहस्पतेस्तु वचनं श्रुत्वा सत्यं समीरितम्। प्रजज्वाल रणे वह्निर्हविषेव महामखे १ हतास्तु माया दैत्यानां प्रदीप्तेनाग्निना रणे। हतमाया हतबला बलिं ते समुपस्थिताः २ पराजितेषु दैत्येषु वह्निनाद्भुतकर्मणा। प्रह्लादस्तूत्तमं वाक्यमाह दैत्यपतिं बलिम् ३ भवानग्निश्च वायुश्च भास्करः सलिलं शशी। नक्षत्राणि दिशो व्योम भूश्च दानवसत्तम ४ भविष्यं चैव भूतं च भवच्चासुरसत्तम। दत्तं चैतद्भगवता वरदेन स्वयंभुवा ५ इंद्रत्वं चामरत्वं च युद्धे चाप्यपराजयः। ईशित्वं च वशित्वं च बलं चैवामितं शुभम् ६ सर्वभूतेश्वरत्वं च दैत्यराज सदा तव। महायोगीश्वरत्वं च शूरत्वं च महामृधे ७ अणिमा लघिमा चैव ये चान्ये सात्विका गुणाः। तत्पराजित्य दैत्येन्द्र देवान्सर्वांश्च सानुगान् ८ यथोक्तं ब्रह्मणा राजंस्तत्तथा न तदन्यथा। तस्य तद्वचनं श्रुत्वा प्रह्लादस्य महात्मनः। बलिः परमसंहृष्टः प्रायाच्छक्ररथं प्रति ९ ततः प्रयान्तं त्रिदशेन्द्रसन्निधौ महासुरेंद्रं बलिमुत्त-

---

जलाला निर्माण करतोस. त्याचप्रमाणें ओषधि व ओषधींचे रस उत्पन्न करतोस. युगांतसमयीं तूं विश्व घेऊन ( आपल्या स्वरूपांत त्याचा लय करून ) हे अनला, तूं सर्वकालीं स्रष्टा होतोस ३७. हे अग्ने, वेदांमध्यें तूं सर्व भूतांची योनि आहेस, असें ह्मणून वर्णन केला जातोस. तूं देवांच्या हिताकरितां रणांत दानवांना मारिलें आहेस ३८. हे महातेजस्वी शेंकडों यज्ञांनीं संपादन केलेलें जलही तुझी स्वयोनि आहे. तेव्हां हे पावका, त्या आपल्या योनीला प्राप्त होऊनच तूं असा खिन्न कां होतोस ? ३९. हे उत्तम देवा, हे पिंगाक्ष, हे रक्तकंठ, हे कृष्णवर्त्म, व हे हुताशन, तूं समरांत दैत्यांपासून देवांचें रक्षण कर ४०. इति श्रीम० खि० हरि० भवि० वामना० अग्निस्तव बासष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६२ ॥

वैशंपायनः—बृहस्पतीनें बोललेलें तें सत्य वचन ऐकून अग्नि, महायज्ञांत हवींच्या योगानें जसा, तसाच रणांत अतिशय प्रज्वलित झाला १. रणांत प्रदीप्त झालेल्या अग्नीनें दैत्यांच्या मायेचा नाश केला. तेव्हां ज्यांचे बल व माया ह्या दोघांनाही प्रतिबंध झाला आहे, असे सर्व दैत्य बलीपाशीं जाऊन उभे राहिले २. याप्रमाणें अद्भुत कर्म करणाऱ्या अग्नीनें दैत्यांचा पराभव केला असतां प्रह्लाद दैत्यपति बलीला असें उत्तम वाक्य बोलला ३. " हे राजन् दानव सत्तमा, तूंच अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, जल, नक्षत्रें, दिशा, व्योम, भूमि ४, भविष्य, भूत, व वर्तमान आहेस. हे दैत्यराज, वरद भगवान् स्वयंभूनें तुला इंद्रत्व, अमरत्व, युद्धांत अपराजय, ईशित्व, वशित्व, शुभ व अमित बल आणि सर्वभूतेश्वरत्व, सदां दिलें आहे. त्यानें तुला महायोगीश्वरत्व, महा संग्रामांत शूरत्व ५–७, अणिमा, लघिमा, व असेच दुसरे सात्विक गुण दिले आहेत. यास्तव हे दैत्येंद्रा, अनुगांसह सर्व देवांस पराजित करून विजयी हो ८. हे राजन्, ब्रह्मदेवानें जसें सांगितलें आहे तें तसेंच आहे. विपरीत कधींही नव्हे. ?? महात्म्या प्रह्लादाचें तें वचन

मश्रियम् । तमंजसा जग्मुरभिप्रदक्षिणं द्विजाश्च पुण्याः पशवश्च सत्तमाः १० महाजटाभारधरास्तपस्विनस्तदा तमाहुर्विधिमंत्रमंगलैः । अभिष्टुवन्तः कवयः स्वलंकृतं बालिं प्रयान्तं रणमूर्धनि स्थिताः ११ प्रतप्तजांबूनदचित्रभूषणैर्दिव्यैश्च रत्नैर्विविधैरलंकृतः । विराजमानः परमेण वर्चसा रणे विभात्यग्निशिखेव दानवः १२ स वै तदा शत्रुबलार्दितं बलं बलिर्ददर्शोत्तमसत्त्ववीर्यवान् । जलागमे श्रीमदिवाभ्रमण्डलं विशीर्यमाणं नभसीव वायुना १३ ततो ददर्शाथ बलानि सर्वतो रणे प्रगुप्तानि हुताशनेन वै । समुच्छ्रितान्युग्रतराणि तत्र वै समुद्रवेगानिव पर्वसंधिषु १४ स शूलशक्त्यृष्टिगदासिसायकान्क्षिपन्रिपूणां समरे महात्मनाम् । ननाद सिंहर्षभमत्तनागवज्जलागमे तोयदवच्च वीर्यवान् १५ दिव्यास्त्रधूमो भुजवेगवायुर्महाबलः पौरुषविक्रमेन्धनः । प्रजादिधक्षन्निव कालवह्निः सुघोररूपो विबभौ रणे बली १६ [ १८६० ] इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे त्रिषष्टितमोऽध्यायः ॥ ६३ ॥

वैशंपायन उवाच ॥ बलिना तु सुराः सर्वे वर्जयित्वा सुराधिपम् । रणे शरशतैर्भिन्नाः ससैन्या वै पराजिताः १ विमुखा याति दैत्येन्द्रैर्वध्यमाना महाचमूः । जितास्तु बलिना देवाः शक्रमाहुर्महाबलम् २ देवा ऊचुः ॥ भवानिन्द्रश्च धाता च लोकानां प्रभुरव्ययः । त्वमप्रतिमकर्मा च तथैवानुपमद्युतिः ३ विद्रुतानीह सैन्यानि सहास्माभिः सुरेश्वर ।

---

ऐकून अतिशय आनंदित झालेला बलि इंद्राच्या रथावर चालून गेला ९. त्यानंतर देवेंद्रासन्निध जात असलेल्या त्या उत्तम श्रीमान् महा असुरेंद्र बलीस पुण्यवान् द्विज व उत्तम पशु साक्षात् सर्वतः प्रदक्षिणा घालूं लागले १०. त्यावेळीं महा जटाभार धारण करणारे तपस्वी व कवि रणांगणांत स्थित होऊन उत्तमप्रकारें अलंकृत झालेल्या व रणांत जाणाऱ्या त्या बलीची विधिमंत्रमंगलांनीं स्तुति करूं लागले ११. लाल सोन्याच्या विचित्र व दिव्य भूषणांनीं आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं अलंकृत झालेला व परमतेजानें विराजमान होणारा दानव रणांत अग्निशिखेसारखा शोभूं लागला १२. उत्तम सत्त्व व धैर्य यांनीं संपन्न असलेला बलि त्यावेळीं शत्रुसैन्याकडून पीडलेल्या आपल्या सैन्यास वर्षासमयीं आकाशांत वायूच्या योगानें छिन्न-भिन्न झालेल्या श्रीमान् अभ्रमंडलाप्रमाणें पाहता झाला १३. त्यानंतर त्यानें रणांत अग्नीनें सर्वतः उत्तमप्रकारें रक्षिलेलीं सैन्यें पाहिलीं. पर्वसंधींतील सागराच्या वेगांप्रमाणें तीं अतिशय उत्कर्ष पावलेलीं व अतिशय उग्र होतीं १४. रणांगणांत महात्म्या शत्रूंवर शूल, शक्ति, ऋष्टि, गदा, असि व बाण फेंकणारा तो वीर्यवान् सिंह, ऋषभ, किंवा मत्त गज यांप्रमाणें अथवा पावसाळ्यांतील मेघांप्रमाणें गर्जना करूं लागला १५ महाबलवान् बलि प्रजेला जाळण्याची इच्छा करणाऱ्या अति घोररूप कालाग्निप्रमाणें रणांत शोभला. दिव्य अस्त्रें हाच त्याचा धूम, भुजांचा वेग हाच वायु, आणि पौरुष व विक्रम हेंच त्याचें इंधन होय १६ इति श्रीम० खि० हरि भवि० वामन त्रेसष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६३ ॥

वैशंपायनः—बलीनें देवेंद्रास सोडून बाकीच्या सर्व देवांस जिंकलें. रणांत त्या सर्वांस शेंकडों बाणांनीं छिन्न--भिन्न करून सोडलें व त्यांस सैन्यासह पराभूत केलें १. तेव्हां दैत्येंद्राकडून मारली जाणारी महाचमू विमुख झाली. व बलीनें ज्यांस जिंकलें आहे असे देव महाबळ इंद्रास असें ह्मणाले २. देवः—तूं इंद्र, धाता, लोकांचा अव्यय प्रभु,

रथचक्रध्वजाक्षाणि विभिन्नानि महासुरैः ४ रथहस्त्यश्वयोधाश्च पदाताश्च सहस्रशः । भिन्नाश्छिन्नाश्च शतशो गदामुशलपट्टिशैः ५ महाभैरवरूपं हि दैत्येन्द्रेण कृतं रणे । किमुपेक्षसि दैत्येन्द्रैर्हन्यमानां महाचमूम् ६ त्रायस्व त्रिदशश्रेष्ठ शरण्यः शरणागतान् । श्रुत्वा तु वचनं तेषां देवानाममराधिपः ७ संवर्ताग्निसमः क्रुद्धः सर्वान्दहति दानवान् । दिवाकरकराकारं किरीटं धारयन्प्रभुः ८ वैडूर्यवर्णसंकाशो नानारत्नाचितांगदः । मयूररोमा रक्ताक्षः शतबाहुः सहस्रदृक् ९ हरिरेको हरिश्मश्रुर्नागकेतुर्महाबलः । वज्रप्रहरणः श्रीमान्योगी शतशिरोधरः १० सधनुर्बद्धसन्नाहः शतादित्यसमप्रभः । देवगन्धर्वयक्षौघैरनुयातः सहस्रशः ११ सामगैःसजपैश्चापि स्तूयमानो महर्षिभिः । शतपर्व महारौद्रं स्फोटनं सर्वतोमुखम् १२ प्रगृह्य रुचिरं वज्रं दीप्तं रौद्राट्टहासिनम् । दैत्यानयोधयत्सर्वान्महेन्द्रः पाकशासनः १३ अधृष्यः सर्वभूतानामदित्या दयितः सुतः । ततः प्रवृत्तः संग्रामो बलिवासवयोस्तदा १४ उभाभ्यां देवदैत्याभ्यामचिरान्महदद्भुतः । अतिवीर्यबलोदग्रस्तुमुलो लोमहर्षणः १५ प्रह्लादेन स्तुतिशतैः कर्मभिर्जयसंमतैः । प्रबोधितो दैत्यपतिरग्निरिद्ध इवाबभौ १६ सुरासुरेन्द्रयोर्दृष्ट्वा संग्रामं लोमहर्षणम् । देवानां दानवानां च भूयो युद्धमभू-

---

अप्रतिम कर्म करणारा, त्याचप्रमाणें अनुपम कांतिमान् आहेस ३. हे सुरेश्वरा, आमच्या सहवर्तमान आमचीं सैन्यें रणांतून पळून आलीं आहेत. रथांचीं चक्रें, ध्वज, अक्ष इत्यादि महादैत्यांनीं मोडून टाकलीं आहेत ४. त्यांनीं गदा, मुसळें, पट्टे, यांच्या योगानें रथ, अश्व व हत्ती यांवरील योद्धे आणि सहस्रावधि पायदळ यांस छिन्न-भिन्न करून सोडलें आहे. दैत्येंद्रानें रणांत महा भयंकर रूप धारण केलें आहे. तर्‍हां दैत्येंद्रांकडून मारल्या जाणार्‍या महा सेनेची उपेक्षा कां करतोस ? ५,६. हे देवांच्या देवा, तूंच आमचा शरण्य आहेस. आम्हां शरणांगतांचें रक्षण कर. देवांचें ते भाषण ऐकून अमराधिप प्रलयकाळच्या अग्नीसारखा क्रुद्ध झाला व सर्व दानवांस जाळूं लागला. सूर्यकिरणांसारखा ज्याचा आकार आहे असा किरीट धारण करणारा प्रभु ७,८, वैडूर्यवर्णासारखा होता. त्याचीं बाहुभूषणें नानारत्नांनीं खचित होतीं. मोराच्या पिसाऱ्यासारखे त्याचे केंस होते. नेत्र लाल होते. त्याला शंभर बाहु व सहस्र नेत्र होते ९ तो एकच खरा इंद्र होय. त्याची श्मश्रु हरिद्वर्ण होती. त्या महाबलाढ्याचा केतु नागाचा होता. त्याचें आयुध वज्र होतें. तो श्रीमान् योगी शंभर मस्तकांनीं युक्त होता १०. त्यानें हातांत धनुष्य घेतलें होतें. कवच घातलें होतें. शंभर सूर्यांप्रमाणें त्याची प्रभा होती. सहस्रावधि देव, गंधर्व व यक्ष यांचे ओघ त्याच्यामागून चालले होते ११. सामगान करणाऱ्या व जप करणाऱ्या महर्षींकडून तो स्तविला जात होता. ज्याला शंभर पर्वें आहेत असें महा भयंकर, सर्वांस फोडून सोडणारें, सर्वतोमुख, दीप्त, जणुं काय भयंकर अट्टहास्यच करणारें, व सुंदर वज्र घेऊन पाकशासन महेंद्र सर्व दैत्यांशीं लढूं लागला १२, १३. सर्व भूतांस अधृष्य असलेला तो अदितीचा प्रिय पुत्र होता. असो; त्यानंतर बलि व इंद्र यांचा संग्राम सुरू झाला १४. दोन्ही देव-दैत्यांच्या योगानें तत्काल तो संग्राम अति अद्भुत अतिवीर्य व बल यांनीं उदय, तुमुल व रोमहर्षण झाला १५. प्रल्हादानें शेंकडों स्तुति व जयप्रद कर्में यांच्या योगानें प्रबोधित ( सावध, जाग्रत ) केलेला दैत्यपति पेटलेल्या अग्नीप्रमाणें भासला १६. सुरेश्वर व असुरेश्वर यांचा तो रोमहर्षण तुमुल संग्राम पाहून देव व दानव यांचीं ही

तदा १७ ततोऽविध्यन्महेन्द्रस्तं बलिमस्त्रैर्महाबलम् । तान्यस्त्राणि महाबाहुश्चिच्छेद शतधा-
रणे १८ ततः क्रुद्धः पुनस्तत्र सोऽस्त्रं दुर्वारणं महत् । आग्नेयमथ शत्रुघ्नं चिक्षेपेन्द्रो महाबलः।
तत् दृष्ट्वा खे समागच्छत्प्रलयानलसन्निभम् १९ पातयामास तच्चैंद्रं वारुणास्त्रेण धीमता ।
संक्रुद्धो मघवा वज्रमगृह्णात्पर्वतोपमम् २० हंतुकामो रणश्लाघी बलिं दैत्याधिपं रणे । ततः
शुश्राव देवेन्द्रः कौशिको हरिवाहनः २१ अशरीरां शुभां वाणीं तस्मिन्महति वैशसे ।
निवर्तस्व महाबाहो सुराणां नन्दिवर्धन २२ पुरंदर सुरश्रेष्ठ न जेष्यसि रणे बलिम् । तप-
सात्युत्तमो दैत्यो वरदानेन चाधिकः २३ स्वयंभूपरितोषाच्च सत्यधर्माच्च वासव । नैष
शक्यस्त्वया जेतुं त्रिदशैर्वा सुरेश्वर २४ यो ह्यस्य जेता भगवांस्तं शृणुष्व समाहितः ।
ब्रह्मणः स हि सर्वस्वं देवानां चैव सा गतिः २५ परं रहस्यं धर्मस्य परस्य च परा गतिः ।
परात्परतरः श्रीमान्परावरगतिः प्रभुः २६ सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । शंखच-
क्रगदापाणिः पीतवासाः सुरारिहा २७ जेता जेयोः जयः श्रीमान्सोऽस्य जेता भविष्यति ।
श्रुत्वा दिव्यां तु मधुरां वाणीं तामशरीरिणीम् २८ अपयातो रणाच्छक्रः सार्धं सर्वैः सुरो-
त्तमैः । अपयाते तु देवेन्द्रे कौशिके हरिवाहने २९ सिंहनादो महानासीद्दानवानां महामृधे ।

---

युद्धें फिरून जुंपलीं १७. त्यानंतर महेंद्रानें अस्त्रांच्या योगानें त्या महाबलवान् बलीस वेध केला. पण त्या महाबाहूनें त्यांस रणांत शतधा तोडून टाकलें. १८. त्यानंतर क्रुद्ध झालेल्या महाबलाढ्य इंद्रानें पुनः दुर्निवार्य, मोठें, व शत्रूंचा नाश करणारें आग्नेय अस्त्र त्याच्यावर सोडलें १९. प्रलयाग्नीसारख्या त्या अस्त्रास पाहून बलि आकाशांत उडी मारून आला व त्या बुद्धिमानानें वारुणास्त्रानें तें इंद्राचें अस्त्र प्रतिबद्ध करून खालीं पाडलें तेव्हां रागावलेल्या इंद्रानें पर्वतोपम वज्र उचललें २०. त्या रणश्लाघी देवानें रणांत त्या दैत्याधिप बलीस मारण्याच्या इच्छेनेंच तें हातांत घेतलें होतें. पण इतक्यांत कौशिक हरिवाहन देवेंद्रानें त्या भयंकर हिंसा प्रचुरस्थानीं अशी आकाशवाणी ऐकली. “ हे देवांचा आनंद वाढविणाऱ्या महाबाहो, हे पुरंदरा, हे देवश्रेष्ठा, युद्धांतून परत फीरें. तूं रणामध्यें बलीला जिंकूं शकणार नाहींस. हा दैत्य तपाच्या योगानें उत्तम असून वर-दानानें तर अधिकच झाला आहे. हे वासवा सुरेश्वरा, स्वयंभूच्या संतोषामुळें व सत्य धर्मामुळें हा तुला किंवा देवानांही जिंकतां येणें शक्य नाहीं २१–२४. आतां याला जिंकणारा कोण आहे ह्मणून विचारशील तर भगवान् याचा जेता आहे. त्याचें वर्णन शांत चित्तानें ऐक. तो ब्रह्माचें ( ब्रह्मदेवाचें अथवा वेदाचें ) सर्वस्व आहे. देवांची तीच परम गति आहे २५. तें धर्माचें परम रहस्य आहे. ती पराचीही परागति आहे. तो श्रीमान् परात्परतर, परावर वस्तूंची गति व प्रभु आहे २६. तो पुरुष सहस्र मस्तकांनीं भूषित आहे. त्याला अनंत नेत्र व असंख्य पाद आहेत. त्याच्या हातांत शंख, चक्र व गदा आहे; त्यांचीं वस्त्रें पिवळीं आहेत; तो देवांच्या शत्रूंचें हनन करीत असतो २७. तो सर्वांचा जेता. पण भक्तांस जेय असलेला; स्वतः जय व श्रीमान् आहे तो याला जिंकील. ’ ही दिव्य व मधुर आकाशवाणी ऐकून इंद्र सर्व उत्तम देवांसह रणांतून पळून गेला. तो कौशिक, हरि वाहन देवेंद्र निघून गेला असतां त्या महा संग्रामांत दानवांचा मोठा सिंहनाद उठला. त्याच्या मागोमाग मोठा कलकल उडाला. वीरांच्या आरोळ्या व भुजा-मांड्या इत्यादि-कांस थोपटण्याचें आवाज ऐकूं येऊं लागले २८–३०. शंखांचा घोष, योद्ध्यांचा वल्गित

ततः किलकिलाशब्दः क्ष्वेडितास्फोटितस्वनः ३० शंखानां निनदश्चात्र योधानां वल्गितस्वनः । वादित्राणां च निर्घोषस्तुमुलश्चाभवत्तदा ३१ जयशब्दरवाश्चैव देवानां तु पराजये । ससैन्यो दैत्यराजस्तु स्तूयमानः सुहृद्गणैः । बलीन्द्रो विबभौ दैत्यो हिरण्यकशिपुर्यथा ३२ [ २८९२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामने देवासुरसंग्रमो नाम चतुःषष्टितमोऽध्यायः ॥ ६४ ॥

वैशंपायन उवाच ॥ निष्प्रयत्नेषु देवेषु त्रैलोक्ये दैत्यपालिते । जये बलेर्बलवतो मयशंबरयोस्तथा १ शुद्धासु दिक्षु सर्वासु प्रवृत्ते धर्मकर्मणि । अपावृत्ते ऽधर्मपथे अयनस्थे दिवाकरे २ प्रन्हादशंबरमयैरनुन्हादेन चैव हि । दिक्षु सर्वासु गुप्तासु गगने दैत्यपालिते ३ दैत्येषु मखशोभाश्च स्वर्गार्थं दर्शयत्सु च । प्रकृतिस्थे तदा लोके वर्तमाने च सत्पथे ४ अभावे सर्वपापानां भावे चैव तथास्थिते । भावे तपति सिद्धानां सर्वत्राश्रमरक्षिषु ५ चतुष्पादे स्थिते धर्मे अधर्मे पादविग्रहे । प्रजापालनयुक्तेषु भ्राजमानेषु राजसु । स्वधर्मसंप्रयुक्तेषु सर्वाश्रमनिवासिषु । अभिषिक्तोऽसुरैः सर्वैर्दैत्यराजः बलिस्तदा ७ हृष्टेष्वसुरसंघेषु नदत्सु मुदितेषु च । अथाभ्युपगता लक्ष्मीर्बलिं पद्मासने स्थिता ८ पद्मोद्यतकरा देवी वरदासुरमोहिनी । श्रीरुवाच ॥ बले बलवतां श्रेष्ठ महाराज महाद्युते ९ प्रीतास्मि तव भद्रं ते देवतानां पराजये । यस्त्वया युधि विक्रम्य देवराजः पराजितः १० दृष्ट्वा ते परमं सत्त्वं ततोऽहं स्वयमागता । नाश्चर्यं दानवश्रेष्ठ हिरण्यकशिपोः कुले ११ प्रसूतस्यासुरेन्द्रस्य तव कर्मेदमीदृशम् ।

---

ध्वनि, व वाद्यांचा तुमुल ध्वनि त्यावेळीं उठला. देवांचा पराजय झाला असतां जयजयकार शब्दांचा महाध्वनि ऐकूं येऊं लागला. सुहृद्गणांकडून स्तुति केला जाणारा ससैन्य दैत्यराज बलि इंद्र होऊन हिरण्यकशिपुदैत्याप्रमाणें शोभला ३१,३२. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वामन० देवासुर संग्रामनामक चवसष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६४. ।

वैशंपायनः— याप्रमाणें देव प्रयत्नशून्य झाले असतां, दैत्यांनीं त्रैलोक्याचें पालन केलें असतां, बलाढ्य बलीचा व मय आणि शंबर यांचा विजय झाला असतां १, सर्व दिशा शुद्ध झाल्या असतां, धर्मकर्में प्रवृत्त झालीं असतां, अधर्ममार्ग बदलून गेला असतां, सूर्य अयनामध्यें स्थित असतां २, प्रन्हाद, शंबर, मय, व अनुन्हाद यांनीं सर्व दिशांचें संरक्षण केलें असतां, गगनाचें पालन दैत्यानें केलें असतां, दैत्य स्वर्गाकरितां यज्ञशोभा दाखवूं लागले असतां, सर्व लोक स्वस्थ झाला असतां, सन्मार्ग प्रवृत्त झाला असतां ३,४. सर्व पापांचा अभाव होऊन पुण्याची स्थिर स्थिति झाली असतां, सिद्धांचें तप चालूं होऊन सर्वत्र आश्रमांचें संरक्षण होऊं लागलें असतां ५, धर्म चतुष्पाद स्थित होऊन अधर्म चतुर्थांश राहिला असतां, राजे प्रजापालनामध्यें तत्पर होऊन चमकूं लागले असतां व सर्व आश्रमांत निवास करणारे लोक स्वधर्मतत्पर झाले असतां, सर्व असुरांनीं दैत्यराज बलीला अभिषेक केला ६,७. नंतर असुरांचे संघ हृष्ट होऊन मोठी गर्जना करूं लागले असतां व अतिशय मुदित झाले असतां पद्मासनावर स्थित असलेली जिनें आपल्या हातांत कमल उचलून धरलें आहे अशी वर देणारी व असुरांस मोह पाडणारी देवी लक्ष्मी बलीपाशीं आली. श्रीः—हे बलवानांतील श्रेष्ठ, महाराज, महा द्युतिमान बले, देवतांचा पराजय केल्यामुळें मी तुजवर अतिशय प्रसन्न झालें आहे तुझें कल्याण होवो. कारण तूं युद्धामध्यें मोठा पराक्रम करून देवराजाचा पराभव केला आहेस ८—१०. तुझें सर्वो—

विशेषतस्त्वया राजन्दैत्येंद्रः प्रपितामह १२ येन भुक्तं हि निखिलं त्रैलोक्यमिदमव्ययम् । विशेषतस्तव विभो सर्वो धर्मः स्थितः पार्थ १३ तेन त्रैलोक्यमक्षय्यं भोक्ष्यस्यमितविक्रम । एवमुक्त्वा तु सा देवी लक्ष्मीर्दैत्यपतिं बलिम् १४ प्रविष्टा वरदा सौम्या सर्वभूतमनोरमा । शिष्टाश्च देव्यः प्रवरा ह्रीः कीर्तिर्द्युतिरेव च १५ प्रभा धृतिः क्षमा भूतिर्नीतिर्विद्या दया मतिः । स्मृतिर्लज्जा तथा मेधा लक्ष्मीरीहागतिस्तथा १६ श्रुतिः प्रीतिरिला कान्तिः शान्तिः पुष्टिः क्रिया तथा । सर्वाश्चाप्सरसो दिव्या नृत्यगीतविशारदाः १७ उपतस्थुर्महासत्त्वं बलिमिन्द्रं महारथम् । प्रतिपन्नं तु दैतेयैस्त्रैलोक्यं सचराचरम् । प्राप्तमैश्वर्यमखिलं बलिना ब्रह्मवादिना १८ [ २९१० ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनप्रादुर्भावे पंचषष्टितमोऽध्यायः ॥ ६५ ॥

जनमेजय उवाच ॥ पराजिताः सुरा दैत्यैः किमकुर्वत वै मुने । कथं च त्रिदिवं लब्धं भूयो देवैर्द्विजोत्तम १ वैशंपायन उवाच ॥ श्रुत्वा वाणीं तु तां दिव्यां सह देवैः सुराधिपः । प्राग्दिशं प्रस्थितः श्रीमानदित्यालयमुत्तमम् २ प्राप्यादित्यालयं शक्रः कथयामास तां गिरम् । अदित्यै या तदा युद्धे तेन दिव्या पुरा श्रुता ३ अदितिरुवाच ॥ यद्येवं पुत्र युष्माभिर्न शक्यो हन्तुमाहवे । बलिर्विरोचनसुतः सर्वैश्चैव मरुद्गणैः ४ सहस्रशिरसा हंतुं केवलं शक्यतेऽसुरः । तेनैकेन सहस्राक्ष न ह्यन्येन शतक्रतो ५ तद्वः पृच्छस्व पितरं कश्यपं सत्यवादिनम् । पराजयार्थं

---

स्पष्ट सत्य पाहून मी स्वतः तुजपाशीं आलें आहें. हे दानवश्रेष्ठा, हिरण्यकशिपूच्या कुळांत उत्पन्न झालेल्या तुज असुरेंद्राचें हें असलें कर्म असणें यांत कांहीं आश्चर्य नाहीं. हे राजन्, विशेषतः तुला तर तें मुळींच अशक्य नाहीं. कारण, तो तुझा प्रपितामह दैत्यांचा इंद्र होता. हे विभो, त्यानें या सर्व अव्यय त्रैलोक्याचा उपभोग घेतला. हे राजन् विशेषतः तुझा सर्व धर्म मार्गामध्यें स्थित आहे. त्यामुळें हे अमित पराक्रमी वीरा, तूंही या अक्षय्य त्रैलोक्याचा उपभोग घेशील. त्या दैत्यपति बलीला असें बोलून ती वरदा, सौम्य व सर्व भूतमनोरमा देवी लक्ष्मी त्याच्यामध्यें प्रविष्ट झाली. तशाच बाकीच्याही सर्वोत्तम देवी-ह्री, कीर्ति, द्युति ११-१५, प्रभा, धृति, क्षमा, भूति, नीति, विद्या, दया, मति, स्मृति, लज्जा, तशीच मेधा लक्ष्मी, ईहागति १६, श्रुति, प्रीति, इलानामक श्रौतक्रिया, कांति, शांति, पुष्टि, तशीच क्रिया आणि नृत्य व गीत यांमध्यें विशारद असलेल्या दिव्य अप्सरा त्या महासत्त्व, महारथ बलिरूपी इंद्रापाशीं हात जोडून उभ्या राहिल्या. याप्रमाणें दैतेयांनीं सचराचर त्रैलोक्य मिळविलें. ब्रह्मवादी बलीनें तर अमित ऐश्वर्य संपादन केलें १७,१८. इति श्रीमहा. खि. हरिभवि० वामनावतारापैकीं पासष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६५ ॥

जनमेजयः—हे मुने, दैत्यांकडून पराजित झालेले देव काय करते झाले ? हे उत्तम द्विज, देवांनीं स्वर्ग पुनः कसा प्राप्त करून घेतला १. वैशंपायनः—वर सांगितलेली ती दिव्यवाणी ऐकून देवांसह तो देवांचा श्रीमान् अधिप पूर्वेस अदितीच्या उत्तम गृहाकडे निघाला २. अदितीच्या येथें जाऊन इंद्रानें पूर्वी युद्धामध्यें जी दिव्य वाणी ऐकली होती तीच तुला सांगितली ३. अदितिः—पुत्रा, असें जर आहे, विरोचनपुत्र बलि तुझ्या सर्व देवगणांकडून संग्रामांत मरणें जर शक्य नसेल तर तो असुर केवल सहस्र मस्तकयुक्त पुरुषाकडूनच मरणें शक्य आहे. हे सहस्राक्ष, शतक्रतो, त्याच एकट्याच्या हातून तो मरेल. दुसऱ्या-

दैत्यस्य बलेस्तस्य महात्मनः ६ ततोऽदित्या सह सुराः संप्राप्ताः कश्यपान्तिकम् । अपश्यन्कश्यपं तत्र मुनिं दिव्यतपोनिधिम् ७ आद्यं देवगुरुं दिव्यं क्लिन्नं त्रिषवणांबुभिः । तेजसा भास्कराकारं गौरमग्निशिखाप्रभम् ८ न्यस्तदण्डं तपोयुक्तं बद्धकृष्णाजिनोत्तरम् । वल्कलाजिनसंवीतं प्रदीप्तं ब्रह्मवर्चसा ९ हुताशमिव दीप्यन्तमाज्यमंत्रपुरस्कृतम् । स्वाध्यायनिरतं नित्यं वपुष्मन्तमिवानलम् १० तं ब्रह्मवादिनां श्रेष्ठं सुरासुरगुरुं प्रभुम् । प्रतपन्तमिवादित्यं मारीचं दीप्ततेजसम् ११ यः स्रष्टा सर्वभूतानां प्रजानां पतिरुत्तमः । आत्मभावविशेषेण तृतीयो यः प्रजापतिः १२ ततः प्रणम्य ते वीराः सहादित्याः सुरर्षभाः । ऊचुः प्रांजलयः सर्वे ब्रह्माणमिव मानसाः १३ तच्छ्रुतं युधि शक्रेण सरस्वत्या समीरितम् । अजेयस्त्रिदशैः सर्वैर्बलिर्दानवसत्तमः १४ श्रुत्वा तु वचनं तेषां पुत्राणां कश्यपस्तदा । चकार गमने बुद्धिं ब्रह्मलोकाय लोककृत् १५ कश्यप उवाच ॥ गच्छाम ब्रह्मसदनं ब्रह्मघोषनिनादितम् । यथाश्रुतं च तत्रैव ब्रह्मणे वदतानघाः १६ वैशंपायन उवाच ॥ ततोऽदित्या सह सुरा यान्तं कश्यपमन्वयुः । प्रस्थितं ब्रह्मसदनं देवर्षिगणसेवितम् १७ ते मुहूर्तेन संप्राप्ता ब्रह्मलोके दिवौकसः । दिव्यैः कामगमैर्यानैर्महार्हैः सुमनोहरैः १८ दिदृक्षवस्ते ब्रह्माणं तपसो राशिमव्ययम् । अभ्यगच्छन्त विस्तीर्णां ब्रह्मणः परमां सभाम् १९ षट्पदोद्गीतनिनदां सामगी-

---

कोणाकडूनही नाहीं ४,५. वास्तव त्या महात्म्या बलि दैत्याच्या पराजयाकरितां आपल्या सत्यवादी कश्यप पित्यास विचारा ६. त्यानंतर अदिती सहवर्तमान देव कश्यपापाशीं आले तेथें त्यानीं दिव्य तपोनिधि कश्यपास पाहिलें ७ तो आद्य देवगुरु होता. तो दिव्य व त्रिकाल स्नान जलानें नेहमीं आर्द्र होणारा होता. तेजानें तो भास्कराकार होता. अग्नीच्या शिखेप्रमाणें ज्याची प्रभा आहे असा तो गौरवर्ण होता ८. त्यानें दंडाचा त्याग केला होता. तपोयुक्त असलेल्या त्या मुनीनें कृष्णाजिनरूपी उत्तरीय बांधलें होतें; वल्कल व अजिन यांनीं त्याचें शरीर आच्छादित झालें होतें. तो ब्रह्मतेजानें प्रदीप्त होता. आज्य व मंत्र यांनीं पुरस्कृत केलेल्या अग्नीप्रमाणें तो दीप्त होता. नित्य स्वाध्यायांत निरत असलेला तो मूर्तिमान् अग्निच आहे, कीं काय असा भास होत असे ९.१०. तो श्रेष्ठ ब्रह्मवादी, सुरासुरांचा गुरु, प्रभु, अतिशय तळपत असलेल्या सूर्याप्रमाणें दीप्त व अतितेजस्वी मरिचीपुत्र मुनि त्याच्या दृष्टीं पडला ११. जो सर्व भूतांचा स्रष्टा, प्रजांचा उत्तम पति ब्रह्मा त्याच्या पुत्रभाव विशेषानें जो तिसरा प्रजापति त्याला देवांनीं प्रणाम केला १२. अदितीसह ते सर्व देवश्रेष्ठ वीर अभिवादन करून, ब्रह्मदेवापाशीं मानसपुत्र जसे बोलतात त्याप्रमाणें, हात जोडून त्यास असें ह्मणाले १३. “ हे प्रभो, युद्धामध्यें शक्रानें सरस्वतीनें सांगितलेलें हें वाक्य ऐकलें. दानवसत्तम बलि सर्व देवांना अजेय आहे, असें ती ह्मणाली १४. त्या पुत्रांचें हें भाषण ऐकून त्या लोककर्त्या कश्यपानें ब्रह्मलोकास जाण्याचा निश्चय केला १५. कश्यपः— हे निष्पाप पुत्रांनो, आपण आतां वेदघोषानें नादित झालेल्या ब्रह्मलोकास जाऊं या. व तेथें तुह्मी जसें ऐकलें आहे तसें ब्रह्मदेवाला सांगा १६, वैशंपायनः—त्यानंतर देव व ऋषि यांच्याकडून सेवा केल्या जाणाऱ्या ब्रह्मसदनास जाण्यास निघाल्या. कश्यपाच्या मागून अदितीसह सर्व देव चालले १७. ते स्वर्गवासी दिव्य, कामनेप्रमाणें गमन करणाऱ्या, महामूल्यवान् व अति मनोहर यानांनीं एका मुहूर्तानें ब्रह्मलोकास पोचले १८. तपाची अक्षय रासच अशा

तानिमिश्रिताम् । श्रेयस्करीममित्रघ्नीं दृष्ट्वा संजहृषुर्मुदा २० ब्राह्मणैश्च महाभागैर्वेदवेदाङ्गपारगैः । ऋचो बह्वृचमुख्यैश्च प्रेर्यमाणपदाक्षराः २१ शुश्रुवुस्तेऽमरव्याघ्रा विततेषु च कर्मसु । यज्ञवेदाङ्गविदुषां पदक्रमविदां तथा २२ घोषेण परमर्षीणां सा बभूव निनादिता । यज्ञसंस्तवविद्भिश्च शिक्षाविद्भिस्तथा द्विजैः २३ शब्दनिर्वचनार्थज्ञैः सर्वविद्याविशारदैः । मीमांसाहेतुवाक्यज्ञैः सर्ववादविशारदैः २४ हृष्टपुष्टस्वरैस्तत्र द्विजेन्द्रैर्वल्गुवादिभिः । नादितं ब्रह्मसदनं प्रवरं देवसद्मवत् २५ ते तत्र समनुप्राप्य शृण्वन्तो वै ध्वनिं सुराः । पूतान्यात्मशरीराणि मेनिरे तु न संशयः २६ तूष्णीं भूता एकचित्ता ब्रह्मण्यगतमानसाः । विस्मयोत्फुल्लनयना निरीक्षन्तः परस्परम् २७ नमस्कुर्वन्ति च पुनर्गुरुं लोकगुरुं प्रभुम् । मनसैव सुरश्रेष्ठाः पुरस्कृत्य तु कश्यपम् २८ पुनः संघुष्टं परमं वेदोच्चारणनिःस्वनम् । गंभीरोदारमधुरं सुस्वरं हंसगद्गदम् २९ ऐक्यनानात्वसंयोगसमवायविशारदैः । लोकायतिकमुख्यैश्च शुश्रुवुः स्वनमीरितम् ३० तत्र तत्र च विप्रेन्द्रान्नियतान्संशितव्रतान् । जपहोमपरान्मुख्यान्ददृशुः कश्यपात्मजाः ३१ तस्यां सभायामास्ते स्म ब्रह्मा लोकपितामहः । सुरासुरगुरुः श्रीमान्विदधद्देवमायया ३२ उपासते च तत्रैनं प्रजानां पतयः प्रभुम् । दक्षः प्रचेताः पुलहो मरीचिश्च द्विजोत्तमः ३३ भृगुरत्रिर्वसिष्ठश्च गौतमो नारदस्तथा । मनुर्द्यौरंतरिक्षं च वायु-

---

ब्रह्मदेवाचें दर्शन घेण्याची इच्छा करणारे ते ब्रह्मदेवाच्या विस्तीर्ण व उत्कृष्ट सभेस प्राप्त झाले १९. ती भ्रमरांच्या गायनानें दुमदुमून गेली होती. त्या ध्वनीमध्यें सामगायनाचा ध्वनि मिसळून गेला होता. त्या श्रेयस्कर व शत्रुनाशक सभेला पाहून देवांना अतिशय आनंद झाला ते अतिशय हृष्ट झाले २०. वेद–वेदांगपारग व महाभाग ऋग्वेदी ब्राह्मणांकडून उच्चारल्या गेलेल्या ऋचा २१ त्या देवश्रेष्ठांनीं ऐकल्या. कर्मे चाललीं असतां त्यांतील वेद–वेदांगवेत्त्या व पद–क्रम जाणणाऱ्या परम ऋषींच्या घोषानें ती सभा गर्जून गेली होती. यज्ञाच्या स्तुतीला जाणणाऱ्या, शिक्षासंपन्न, शब्दांचें निर्वचन व अर्थ यांस जाणणाऱ्या सर्व विद्याविशारद, मीमांसा व हेतुवाक्यें यांस जाणणाऱ्या, सर्व वादांमध्यें विशारद असलेल्या, ज्यांचा स्वर हृष्ट व पुष्ट आहे अशा आणि मंजुळ भाषण करणाऱ्या श्रेष्ठ द्विजांनीं तें देवगृहासारखें उत्कृष्ट ब्रह्मसदन नादित करून सोडलें होतें २२,२५. ते देव तेथें प्राप्त होऊन व तो ध्वनि ऐकून आपल्या शरीरास पवित्र मानूं लागले. यांत कांहीं संशय नाहीं २६. ते एकचित्त होऊन मुकाट्यानें बसले. त्यांचें मन ब्रह्मामध्येंच तल्लीन झालें. ज्यांचे नेत्र विस्मयानें प्रफुल्लित झाले आहेत असे ते परस्परांकडे पहातच राहिले २७. त्यांनीं कश्यपास पुढें करून मनानेंच पुनः लोकगुरु, गुरु प्रभूला वंदन केलें २८. त्यांनीं पुनः ऐक्य, नानात्व, संयोग समवाय इत्यादिकांमध्यें विशारद असलेल्या लोकायतिकादिशास्त्रकारांसह तेथें गंभीर, उदार, मधुर सुस्वर, हंसाप्रमाणें गद्गदध्वनियुक्त अशा उच्चारलेल्या उत्कृष्ट वेदघोषास ऐकलें २९, ३०. त्या कश्यपपुत्रांनीं ठिकठिकाणीं नियमपरायण व तीक्ष्ण व्रतसंपन्न मुख्य ब्राह्मण जप होमामध्यें तल्लीन झाले आहेत, असें पाहिलें ३१. असो; त्या सभेमध्यें श्रीमान् सुरासुरगुरु, लोकपितामह ब्रह्मा, देवमायेनें सर्व प्रपंच रचीत राहिला होता ३२. तेथें प्रजांचे पति त्या प्रभूची उपासना करीत होते. दक्ष, प्रचेता, पुलह, मरीचि, द्विजोत्तम भृगु, अत्रि, वसिष्ठ, गौतम, नारद, मनु, स्वर्ग, अंतरिक्ष, वायु, तेज, जल, पृथ्वी ३३,३४, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, प्रकृति, विकार, दुसरें

स्तेजो जलं मही ३४ शब्दस्पर्शौ च रूपं च रसो गंधस्तथैव च प्रकृतिश्च विकाराश्च । यच्चान्यत्कारणं महत् ३५ सांगोपांगाश्चतुर्वेदाः सरहस्यपदक्रमाः । क्रियाश्च क्रतवश्चैव संकल्पः प्राण एव च ३६ एते चान्ये च बहवः स्वयंभुवमुपस्थिताः । अर्थो धर्मश्च कामश्च द्वेषो दर्पश्च नित्यशः ३७ शक्रो बृहस्पतिश्चैव संवर्तो बुध एव च । शनैश्चरोऽथ राहुश्च ग्रहाः सर्वे ह्यशेषतः ३८ मरुतो विश्वकर्मा च नक्षत्राणि च भारत । दिवाकरश्च सोमश्च ब्रह्माणं समुपासते ॥ सावित्री दुर्गतरणी वाणी सप्तविधा तथा ३९ सर्वाणि श्रुतिशास्त्राणि गाथाश्च नियमास्तथा । भाष्याणि सर्वशास्त्राणि देहवन्ति विशांपते । क्षणालवामुहूर्ताश्च दिवारात्रिश्च भारत ४० अर्धमासाश्च मासाश्च ऋतवः षट् तथैव च । संवत्सराश्चतुर्युगं सन्ध्यारात्रिश्चतुर्विधा ४१ कालचक्रं च यद्दिव्यं नित्यगं ध्रुवमव्ययम् । एते चान्ये च बहवः स्वयंभुवमुपस्थिताः ४२ ते प्रविष्टाः सभां दिव्यां ब्रह्मणः सर्वकामदाम् । कश्यपस्त्रिदशैः सार्धं पुत्रैर्धर्मविशारदैः ४३ सर्वतेजोमयीं दिव्यां ब्रह्मर्षिगणसेविताम् । ब्राह्म्या श्रिया दीप्यमानमचिन्त्यं विगतक्लमम् ४४ ब्राह्मणं वीक्ष्य ते सर्वे आसीनं परमासने । जग्मुर्मूर्ध्ना शुभौ पादौ ब्रह्मणस्ते दिवौकसः ४५ शिरोभिः स्पृश्य चरणौ तस्य ते परमेष्ठिनः । विमुक्ताः सर्वपापेभ्यः शान्ता विगतकल्मषाः ४६ दृष्ट्वा तु तान्सुरान्सर्वान्कश्यपेन सहागतान् । आह ब्रह्मा महातेजा देवानां प्रभुरीश्वरः ४७ [ २९१७ ] इति श्रीमहाभारते खिलेषुह० भ० वामनप्रादुर्भावे षट्षष्टितमोऽध्यायः ॥ ६६ ॥

ब्रह्मोवाच ॥ यदर्थमिह संप्राप्ता भवन्तः सर्व एव हि । विजानाम्यहमव्यग्र एतत्सर्वं महाबलाः १ भविष्यति च वः सोऽर्थः कांक्षितो यः सुरोत्तमाः । बलेर्दानवमुख्यस्य यो विजेता

---

महत् या नांवाचें कारण ३५, उपनिषदें, पदें, क्रम यांसह सांगोपांग चार वेद, क्रिया, क्रतु, प्राण, संकल्प, हे व असेच दुसरे पुष्कळ स्वयंभूची उपासना करीत त्याच्यापाशीं उभे होते. धर्म, अर्थ, काम, द्वेष, दर्प, इंद्र, बृहस्पति, संवर्त, बुध, शनैश्वर, राहु तसेच दुसरे सर्व ग्रह ३६-३८, मरुत ( वायु ), विश्वकर्मा, नक्षत्रें, व हे जनमेजया, सूर्य व सोम ब्रह्मदेवाची उपासना करीत होते. संकटांतून पार करणारी सावित्री, तशीच सात प्रकारची वाणी ३९, सर्व शरीरसंपन्न श्रुतिशास्त्रें, गाथा, नियम, भाष्यें, सर्व शास्त्रें, क्षण, लव, मुहूर्त, व हे राजन् जनमेजया, दिवस, रात्र, अर्धमास ( पक्ष ), मास, सहा ऋतु, संवत्सर, चार युगें, चारप्रकारची संध्या रात्र, दिव्य, नित्य, ध्रुव व अव्यय कालचक्र, हे व असेच दुसरेही अनेक मुर्तिमान् पदार्थ स्वयंभूची उपासना करीत होते ४०-४२. असो; नंतर ते सर्व ब्रह्मदेवाच्या सर्व कामना पूर्ण करणाऱ्या दिव्य सभेंत गेले. कश्यप धर्मविशारद देवपुत्रांसह सर्व तेजोमय, दिव्य, ब्रह्मर्षिगणसेवित सभेंत प्रविष्ट झाला. त्या सभेंत ब्राह्मी श्रीनें दीप्यमान, अचिन्त्य, क्लेशशून्य, व परम आसनावर बसलेल्या ब्रह्मदेवास पाहून ते सर्व देव त्याच्या शुभचरणांवर आपलीं मस्तकें ठेविते झाले ४३-४५. त्या परमेष्ठीच्या चरणांस मस्तकांनीं स्पर्श करून देव सर्व पापांपासून मुक्त, शांत व निर्मल झाले ४६. कश्यपासह आलेल्या त्या सर्वांस पाहून देवांचा ईश्वर, प्रभु महातेजस्वी ब्रह्मा असें बोलूं लागला ४७. इति श्रीम० खि० हरि० भवि० वामनावताराचा सासष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६६ ॥

ब्रह्माः— हे महाबलाढ्यांनो, तुह्मी सर्वच येथें कशासाठीं आला आहां, हें सर्व मी

भविष्यति २ न खल्वसुरसंघानामेको जेता स विश्वकृत् । त्रैलोक्यस्यापि जेतासौ देवानामपि चोत्तमः ३ धाता चैव हि लोकानां विश्वयोनिः सनातनः । पूर्वजं यं सदा प्राहुर्हेमगर्भनिदर्शनम् ४ आत्मा देवेन विभुना कृतोऽजेयो महात्मना । बलेरसुरमुख्यस्य विश्वस्य जगतस्तथा ५ प्रभवः स हि सर्वेषामस्माकमपि पूर्वजः । अचिंत्यः स हि विश्वात्मा योगयुक्तः परंतप: ६ तं देवापि महात्मानं न विदुः कोऽप्यसाविति । देवानस्मांश्च विश्वश्च सवेत्ति पुरुषोत्तमः ७ तस्यैव तु प्रसादेन प्रवक्ष्येऽहं परांगतिम् । यत्र योगं समास्थाय तपश्चरति दुश्चरम् ८ क्षीरोदस्योत्तरे कूले उदीच्यां दिशि देवताः । अमृतं नाम परमं स्थानमाहुर्मनीषिणः । भवंतस्तत्र वै गत्वा तपसा संशितव्रताः ९ अमृतं स्थानमासाद्य तपश्चरत दुश्चरम् । तत्र श्रोष्यथ विस्पष्टां स्निग्धगंभीरनिःस्वनाम् १० उष्णागे तोयपूर्णस्य तोयदस्य समस्वनाम् । युक्ताक्षरपदां स्निग्धां रम्यामभयदां शिवाम् ११ वाणीं परमसंस्कारां वरदां ब्रह्मवादिनीम् । दिव्यां सरस्वतीं सत्यां सर्वकिल्बिषनाशिनीम् १२ सर्वदेवाधिदेवस्य भाषिता भावितात्मनः । तस्य व्रतसमाप्तौ तु यावद्व्रतविसर्जनम् १३ अमोघस्य तु देवस्य विश्वरूपा महात्मनः । स्वागतं वः सुरश्रेष्ठा मत्सकाशमिहागताः १४ कस्य किं वा वरं देवा ददामि वरदः स्थितः । तं कश्यपोदितिश्चैव वरं गृह्णीत वै ततः १५ प्रणम्य शिरसा पादौ तस्मै योगात्मने तदा । भवानेव च नः पुत्रो भवत्विति न संशयः १६ उक्तश्च परया भक्त्या तथास्त्विति

---

अव्यग्र मनानें पूर्वीच जाणलें आहे १. हे सुरोत्तमांनो, तुमचा कांक्षित अर्थ सिद्ध होईल. दानवमुख्य बलीचा जो विजेता होईल तो एक असुरसंघाचाच मात्र विजेता होणार आहे असें नाहीं तर तो विश्वकर्ता त्रैलोक्याचाही विजता व देवांमध्येंही श्रेष्ठ होईल २,३. तो लोकांचा धाता, सनातन व विश्वाचें उत्पत्तिस्थान आहे. ज्याला सदां पूर्वज असें ह्मणतात, हिरण्यगर्भ ही ज्याची प्रतिमा आहे. त्या महात्म्या विभु देवानें आपला आत्मा अतुल वीर्यवान् बलि व सर्व विश्व यांस अजेय केला आहे ४,५. तो सर्वांचें उत्पत्तिस्थान आहे. आमचाही पूर्वज आहे. तो विश्वात्मा, योगयुक्त. परंतप अचिंत्य आहे ६. त्या महात्म्याला देवही पूर्णपणें जाणत नाहींत. हा कोणसा आहे एवढेंच जाणतात. तो पुरुषोत्तम मात्र देवांस आह्मांला व त्या विश्वाला यथार्थपणें जाणतो ७. त्याच्याच प्रसादानें मी परम गति सांगेन. जेथें तो चित्तवृत्ति निरोध करून दुश्चर तप करीत आहे त्या उत्तर दिशेंतील क्षीरसागराच्या उत्तर तीरावर अमृत नांवाचें परम स्थान आहे, असें विद्वान् सांगतात. हे देवहो, तुह्मी तेथें जाऊन तपानें सुतीक्ष्ण व्रतसंपन्न व्हा ८,९. त्या अमृत स्थानाला जाऊन पोंचल्यावर दुश्चर तप करा. ह्मणजे तेथें तुह्मांला अगदि स्पष्ट, ग्रीष्मर्तूंतील स्निग्ध व गंभीर ध्वनियुक्त जलपूर्ण मेघाच्या ध्वनीसारखी, युक्त अक्षरें व पदें यांनीं स्निग्ध, रम्य, अभय देणारी, शिव, परमसंस्कारयुक्त, वरद, ब्रह्मवादिनी, दिव्य. सत्य व सर्व किल्बिषनाशिनी सरस्वती वाणी ऐकाल १०-१२. भावितात्मा व सर्व देवाधिदेव यानेंच व्रतसमाप्ति झाली असतां उच्चारिलेली ती वाणी होय. यास्तव व्रतविसर्जनापर्यंत तुह्मी तेथेंच स्थिरचित्तानें रहा १३. त्या महात्म्या अमोघ देवाची ती विश्वरूप वाणी अशी असेल--येथें मजपाशीं आलेल्या हे श्रेष्ठ देवांनो तुमचें स्वागत असो १४. अहो देवांनो मी वर द्यावयास तयार होऊन राहिलों आहे. तेव्हां कोणाला काय देऊं तें सांगा. असें त्यानें ह्मटलें ह्मणजे कश्यप व अदिति यांनीं त्याच्यापासून, त्या योगात्म्याच्या चरणांवर मस्तक ठेवून, असा वर मागून घ्यावा.

सवक्ष्यति । देवा ब्रुवन्तु ते सर्वे भ्राता नस्त्वं भवेति ह १७ तथास्त्विति च स श्रीमान्वक्ष्यते सर्वलोककृत् । तस्मादेवं गृहीत्वा तु वरं त्रिदशसत्तमाः १८ कृतकृत्याः पुनः सर्वे गच्छध्वं स्वं स्वमालयम् । तथास्त्विति सुराः सर्वे कश्यपोऽदितिरेव च १९ वन्दित्वा ब्रह्मचरणौ गताः सौम्यां दिशं प्रति । तेऽचिरेणैव संप्राप्ताः क्षीरोदस्योत्तरं तटम् २० यथोद्दिष्टं भगवता ब्रह्मणा ब्रह्मवादिना । तेऽतीत्यसागरान्सर्वान्पर्वतांश्च बहून्क्षणात् २१ नद्यश्च विविधा दिव्याः पृथिव्यां सुरसत्तमाः । पश्यन्ति च सुघोरां वै सर्वसत्त्वविवर्जिताम् २२ अभास्करा-ममर्यादां तमसा संवृतां दिशम् । अमृतं स्थानमासाद्य कश्यपेन सुरैः सह २३ दीक्षिताः कामदं दिव्यं व्रतं वर्षसहस्रकम् । प्रसादार्थं सुरेशाय तस्मै योगाय धीमते । नारायणाय देवाय सहस्राक्षाय धीमते २४ ब्रह्मचर्येण मौनेन स्थानवीरासनेनच । दमेन च सुराः सर्वे तपो दुश्चरमास्थिताः २५ कश्यपस्तत्र भगवान्प्रसादार्थं महात्मनः । उदीरयति वेदोक्तं यमाहुः परमं स्तवम् २६ [ २९८३ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वामनप्रादुर्भावे सप्तषष्टितमोऽध्यायः ॥ ६७ ॥

कश्यप उवाच ॥ नमोऽस्तु ते देवदेवेश एकशृंग वराह वृषार्चिष वृषसिन्धो वृषाकपे सुरवृ-षभसुरनिर्मित अनिर्मित भद्रकपिल १० विष्वक्सेन ध्रुव धर्म धर्मराज वैकुंठ त्रेतावर्त अनादि-मध्यनिधन धनंजय शुचिश्रवः आग्निज २० वृष्णिज अज अजय मृतेशय सनातन विधातस्त्रि-

---

'तूंच आमचा पुत्र व्हावें; हाच निःसंशय वर आह्मांस दे !' असें परम भक्तीनें ह्मटलें असतां तो 'तथास्तु' असें बोलेल. सर्व देवांनींही तूं आमचा भ्राता हो असें ह्मणावें १५-१७. ह्मणजे त्यांनाही तो श्रीमान् सर्वलोककर्ता तथास्तु' असेंच प्रत्युत्तर देईल. हे उत्तम देवांनो, त्याच्यापासून असा वर संपादन करून तुह्मी सर्व कृतकृत्य होत्साते पुनः आपापल्या स्थानीं जा. त्यावर सर्व देव, कश्यप व आदिति 'बरें आहे' असें ह्मणून व ब्रह्मदेवाच्या चरणांवर मस्तकें नम्र करून सौम्य ( उत्तर ) दिशेस गेले. भगवान् वेदवादी ब्रह्मदेवानें जसें सांगितलें होतें त्याप्रमाणेंच ते सर्व, सागर, सर्व पर्वत, व पृथ्वीवरील आणि दिव्य विविध नद्या यांचें क्षणांत उल्लंघन करून थोड्याच अवकाशांत क्षीरसागराच्या उत्तर तटावर जाऊन पोंचले. त्या उत्तम देवांनीं अति घोर, सर्व प्राणिरहित, सूर्यशून्य, मर्यादाशून्य व अंधकारानें व्याप्त अशी उत्तर दिशा पाहिली, असो; याप्रमाणें कश्यपानें देवांसह अमृतस्थानास प्राप्त होऊन १८-२३, दिव्य सहस्र वर्षें चालणारें कामद व्रत सुरू केलें. त्या धीमान् योगरूपी सुरेशाच्या प्रसादाकरितां त्यांनीं त्या दीर्घ व्रताची दीक्षा घेतली. सहस्राक्ष, धीमान् नारायण देवास ब्रह्मचर्य, मौन, स्थिरवीरासन व दम यांच्या योगानें प्रसन्न करावयाकरितां सर्व देव दुश्चर तप करूं लागले २४, २५. भगवान्, कश्यप त्या महात्म्याच्या प्रसादाकरितां ज्याला परम स्तव ह्मणून ह्मणतात तो वेदोक्त उत्तम स्तव तोंडानें ह्मणूं लागला २६. इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० वामन० सदुसष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६७. ॥

कश्यपः—हे देवदेवेश, हे एकशृंग, वराह, वृषार्चिष ( धर्मज्वालावान् ) वृषसिंधो (धर्म-सागर ) वृषाकपे सुरश्रेष्ठ, सुरनिर्मित, अनिर्मित, भद्रकपिला १०, विष्कवसेन, ध्रुव, धर्म, धर्मराज, वैकुंठ, त्रेतावर्त ( श्रौतकर्मानें अभिमुख होणारा ) अनादि–मध्य–निधन, धनंजय, शुचिश्रवः, आग्निज २०, ( कुमारस्वामी ) वृष्णिज, अज, अजय, मृतेशय, सनातन

कामत्रिधाम त्रिककुत् ककुद्मिन् ३० दुंदुभे महानाभ लोकनाभ पद्मनाभ विरिंचे वरिष्ठ बहुरूप विरूप विश्वरूप क्षयाक्षय ४० सत्याक्षर हंसाक्षर हव्यभुक् खण्डपरशो शुक्र मुंजकेशो हंस महाहंस महदक्षर हृषीकेश ५० सूक्ष्म परसूक्ष्म तुराषाट् विश्वमूर्ते सुराग्रज नील निस्तमो विरजस्तमोरजःसत्वधाम सर्वलोकप्रतिष्ठ ६० शिपिविष्ट सुतपस्तपोग्र अग्र अग्रज धर्मनाभ गभस्तिनाभ धर्मनेमे सत्यधाम ७० सत्याक्षर गभस्तिनेमे विपाप्मन् चन्द्ररथ विपाप्मन् त्वमेव समुद्रवासाः अजैकपात् सहस्रशीर्ष सहस्रसंमित महाशीर्ष ८० सहस्रदृक् सहस्रपात् अधोमुख महामुख महापुरुष पुरुषोत्तम सहस्रबाहो सहस्रमूर्ते सहस्रास्य सहस्राक्ष ९० सहस्रभुज सहस्रभुव सहस्रशस्त्वामाहुर्वेदाः विश्वेदेव विश्वसंभव सर्वेषामेव देवानां सौभग आद्गो गतिः विश्वं त्वमाप्यायनः विश्वं त्वमाहुः पुष्पहास परमवरदस्त्वमेव त्वमेव वौषट् ओंकारं वषट्कार त्वामेकमाहुरग्र्यं मखभागप्राशिनम् १०० शतधार सहस्रधार भूर्द भुवर्द स्वर्द भूर्भुवः स्वर्द त्वमेव भूतं भुवनं त्वं स्वधा त्वमेव ब्रह्मशय ११० ब्रह्ममय ब्रह्मादिस्त्वमेव द्यौरसि पृथिव्यसि पूषासि मातरिश्वासि धर्मोसि मघवासि होता पोता १२० नेता हंता मंता होम्यहोता परात्परस्त्वम् होम्यहोतात्वमेव आपोसि विश्ववाक् धात्रा परमेण धाम्ना त्वमेव दिग्भ्यः स्रुक् स्रुग्भाण्ड त्वं गण इष्टोऽसि १३० इज्योसि ईड्योसि त्वष्टात्वमसि समिद्धस्त्वमेव गतिर्गतिमतामसि मोक्षोसि योगोसि गुह्योसि

---

त्रिधातः, त्रिकाम, त्रिधाम त्रिकुकुत (धर्मज्ञान व वैराग्य हे ज्याचे स्कंध आहेत) ककुद्मान् ३०, दुंदुभे (विजयावह ध्वने) हे महानाभ, हे लोकनाभ, हे पद्मनाभ, हे विरिंचे, हे वरिष्ठ, हे बहुरूप, विरूप, विश्वरूप, क्षयाक्षय ४०, सत्याक्षर, हंसाक्षर (अजय मंत्र) हव्यभुक, खंडपरशो, शुक्र, मुंजकेश, हंस, महाहंस, महदक्षर, हृषीकेश ५०, हे सूक्ष्म, हे परसूक्ष्म हे तुराषाड, हे विश्वमूर्ते, हे सुराग्रज, हे नील, हे निस्तम, हे विरज, हे तमो-रजःसत्त्व धाम, हे सर्व लोकप्रतिष्ठ ६०, हे शिपिविष्ठ, हे सुतपः, हे तपोग्र, हे अग्र, हे अग्रज, हे धर्मनाभ, हे गभस्तिनाभ, हे धर्मनेमे, हे सत्यधाम, हे सत्याक्षर ७०, हे गभस्तिनेमे, हे विपाप्मन् व हे चंद्ररथ, तुला नमस्कार असो. हे निष्पाप, तूंच समुद्रामध्ये वास करणारा, अज, एकपाद, सहस्रशीर्ष, सहस्रसंमित, महाशीर्ष ८०, सहस्रनयन, सहस्रपाद, अधोमुख, महामुख, महापुरुष, पुरुषोत्तम, आहेस. हे सहस्रबाहो, हे सहस्रमूर्ते, हे सहस्रमुख, हे सहस्राक्ष इंद्र ९०, सहस्रभुज, हे सहस्रभुव, तुला वेद सहस्रशः सांगत असतात. हे विश्वेदेव, हे विश्वसंभव, हे सौभग, तूं सर्व देवांची आदि गति आहेस. सर्व विश्व तूं अप्यायन (तृप्त करणारा) तूं. तुलाच विश्व असें ह्मणतात. हे पुष्पहास तूंच परम वरद आहेस. तूंच वौषट, तुज एका मुख्यालाच ओंकार व वषट्कार ह्मणतात. तूंच यज्ञभागाचे प्राशन करणारा आहेस; १०० हे शतधार, हे सहस्रधार, हे भूर्द (भूलोकास देणारा) हे भुवर्द, हे स्वर्द, हे भूर्भुवःस्वर्द, तूंच भूत, तूंच भुवन, तूंच स्वधा, ब्रह्मशय ११० ब्रह्ममय व ब्रह्मादि तूंच आहेस. तूंच स्वर्ग आहेस पृथ्वी आहेस, पूषा आहेस, वायु आहेस, धर्म आहेस, इंद्र आहेस, होता, पोता १२० नेता, हंता, मंता, होम्य पदार्थांचा होता, (हवन करणारा) परात्पर होम्य होता तूंच आहेस. तूं आप आहेस, विश्ववाक् आहेस, परम यज्ञाकरितां अग्नीच्या उद्देशानें दिशांतून आणलेली स्रुक् तूंच आहेस. स्रुगादि यज्ञोपकरण तूंच आहेस. तूं इष्ट गण आहेस १३०. तूं पूज्य आहेस, तूं स्तुत्य आहेस, तूं

सिद्धोसि धन्योसि १४० धातासि परमोसि यज्ञोसि सोमोसि यूपोसि दक्षिणासि दीक्षासि विश्वमसि स्थविष्ठ स्थविर १५० विश्वतुराषाट् हिरण्यगर्भ हिरण्यनाभ हिरण्यनारायण नारायणांतर नृणामयन आदित्यवर्ण आदित्यतेजः महापुरुष सुरोत्तम १६० आदिदेव पद्मनाभ पद्मेशय पद्माक्ष पद्मगर्भ हिरण्याग्रकेश शुक्रविश्वदेव विश्वतोमुख विश्वाक्ष विश्वसंभव १७० विश्वभुक्त्वमेव भूरिविक्रम चक्रक्रम त्रिभुवन सुविक्रम स्वर्विक्रम बभ्रु सुविभुः प्रभाकरः शंभुः १८० स्वयंभूश्च भूतादिः भूतात्मन् महाभूत विश्वभुक्त्वमेव विश्वगोप्तासि विश्वंभर पवित्रमसि हविर्विशारद हविःकर्मा १९० अमृतेंधन सुरासुरगुरो महादिदेव नृदेव ऊर्ध्वकर्मन् पूतात्मन् अमृतेश दिवस्पृक् । विश्वस्यपते घृताच्यसि अनंतकर्मन् २०८ द्रुहिणवंश स्ववंश त्रिश्वपास्त्वं त्वमेव विश्वं बिभर्षि वरार्थिनो नस्त्रायस्वेति २१३ [ ३१९६ ] इति श्रीमहाभारते खिले० हरि० भविष्यपर्वणि वामनप्रादुर्भावे अष्टषष्टितमोऽध्यायः ॥ ६८ ॥

वैशंपायन उवाच ॥ नारायणस्तु भगवांछ्रुत्वैतत्परमं स्तवम् । ब्रह्मज्ञेन द्विजेंद्रेण कश्यपेन समीरितम् १ स्निग्धगंभीरनिर्घोषं जीमूतस्वननिःस्वनम् । मनसा प्रीतियुक्तेन विबुधानां महात्मनाम् २ उवाच वचनंसम्यग्गृष्टपुष्ट पदाक्षरम् । आकाशाच्छ्रुश्रुवे शब्दो दर्शनं नोपलभ्यते । श्रीमान् प्रीतमना देवः प्रोवाचप्रभुरीश्वरः ३ विष्णुरुवाच ॥ प्रीतोऽस्मि वः सुरश्रेष्ठाः सर्वे भद्रो विनिश्चयम् । वरं वृणुत भद्रं वो वरदोऽस्मि सुरोत्तमाः ४ कश्यप उवाच ॥

---

त्वष्टा आहेस, तूं समिद्ध आहेस, तूंच गतिमानांची गति आहेस, तूं मोक्ष आहेस, योग आहेस, गुह्य आहेस, सिद्ध आहेस, धन्य आहेस १४०, धाता आहेस, परम आहेस, यज्ञ आहेस, सोम आहेस, यज्ञांतील यूप (पशुबंधनस्तंभ) आहेस, दक्षिणा आहेस, दीक्षा आहेस, विश्व आहेस, अतिशय स्थूल आहेस, वृद्ध आहेस, १५०, विश्वाचा वेग सहन करणारा आहेस, हे हिरण्यगर्भ, हे हिरण्यनाभ हे हिरण्यनारायण, हे नारायणान्तर, हे नरांच्या अयना, हे आदित्यवर्ण, आदित्यतेज, हे महापुरुष, हे देवोत्तम १६०, हे आदिदेव, हे पद्मनाभ, हे पद्मेशय, हे पद्मनयन, हे पद्मगर्भ, हे हिरण्याग्रकेश, हे शुक्रविश्वेदेव, हे विश्वतोमुख, हे विश्वाक्ष, हे विश्वसंभव १७०, तूंच विश्वभुक आहेस, हे अतिशय ज्ञानसंपन्न, हे चक्रक्रम, हे त्रिभुवन, हे सुविक्रम, हे स्वरविक्रम, हे बभ्रु, हे सुविभु, प्रभाकर, शंभु १८० स्वयंभू भूतादि, भूतात्मन्, महाभूत व विश्वभुक् तूंच आहेस. तूं विश्वगोप्ता आहेस, विश्वंभर आहेस, पवित्र आहेस, हविर्विशारद आहेस, हविःकर्मा आहेस १९० अमृतेंधन आहेस, सुरासुरगुरु आहेस, महा आदिदेव आहेस, नृदेव आहेस, हे ऊर्ध्वकर्मन्, हे पूतात्मन्, हे अमृतेश, हे दिवस्पृक्, हे विश्वपते, तूं घृताची आहेस २०० हे अनंत कर्मन्, द्रुहिणवंश, स्ववंश, तूं विश्वपालक आहेस, तूंच विश्वाचें भरण करतोस. वराची इच्छा करणाऱ्या आमचें रक्षण कर. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वामन० अडुसष्टावा अध्याय समाप्त झाला ॥ ६८ ॥

वैशंपायनः— ब्रह्मज्ञ द्विजेंद्र कश्यपानें तोंडांतून उच्चारलेला हा सर्वोत्तम स्तव ऐकून भगवान् नारायण प्रीतियुक्त मनानें महात्म्या देवांस मेघाच्या स्निग्ध व गंभीर निर्घोषासारख्या गंभीर व स्निग्ध ध्वनीनें ज्यांतील पदें व अक्षरें स्पष्ट व मोठ्यानें उच्चारिलीं आहेत, असें वचन बोलला. पण आकाशांत त्याचा शब्द मात्र ऐकूं आला. दर्शन कांहीं झालें नाहीं. तो श्रीमान् प्रभु ईश्वर देव संतुष्ट मनानें ह्मणाला, १–३. विष्णुः— हे श्रेष्ठ देवांनो, मी तुह्मावर संतुष्ट झालों आहे, हे उत्तम सुरहो तुमचें कल्याण होवो. मी वर

यदैव भगवान् प्रीतः सर्वेषाममरोत्तमः । तदैव कृतकृत्याः स्म त्वं हि नः परमा गतिः ५
यदि प्रसन्नो भगवान् दातव्यो वा वरो यदि । वासवस्यानुजो भ्राता ज्ञातीनां नन्दिवर्धनः ६
अदित्यां वामनः श्रीमान् भगवानस्तु वै सुरः । वैशंपायन उवाच ॥ अदितिर्देवमाता च
एतमेवार्थमुत्तमम् । पुत्रार्थे वरदं प्राह भगवन्तं वरार्थिनी ७ अदितिरुवाच ॥ याचे त्वां
पुत्रकामा वै भवान्पुत्रो भवत्विति । निःश्रेयसाय सर्वेषां देवानां हि महात्मनाम् ८ देवा
ऊचुः ॥ भ्राता भर्ता च दाता च शरणं च भवस्वनः । अदित्याः पुत्रतां याते त्वयि देवाः
सवासवाः । देवशब्दं वहिष्यन्ति कश्यपस्यात्मजो भव ९ वैशंपायन उवाच ॥ ततस्तान-
ब्रवीद्विष्णुर्देवान्कश्यपमेव च । एवं भवतु भद्रं वो यथेष्टं काममाप्नुत । सर्वेषामेव युष्माकं
ये भविष्यन्ति शत्रवः १० मुहूर्तमपि ते सर्वे न स्थास्यन्ति ममाग्रतः । हत्वासुरगणान्स-
र्वान्ये चान्ये देवशत्रवः ११ करिष्ये देवताः सर्वा यज्ञभागाग्रभोजिनः । हव्यादांश्च सुरा-
न्सर्वान्कव्यादांश्च पितॄनपि १२ करिष्ये विबुधश्रेष्ठाः पारमेष्ठ्येन कर्मणा । यथागतेन
मार्गेण निवर्तध्वं सुरोत्तमाः १३ देवमातुस्तथादित्याः कश्यपस्यामितात्मनः । यथामनी-
षितं कर्ता गच्छध्वं स्वं स्वमालयम् १४ वैशंपायन उवाच ॥ एवमुक्ते तु वचने विष्णुना
प्रभविष्णुना । देवाः प्रहृष्टमनसः पूजयन्ति स्म सर्वशः १५ विश्वे देवा महात्मानः कश्य-
पोऽदितिरेव च । साध्यामरुद्गणाश्चैव शक्रश्चैव महाबलः ॥ नमस्कृत्य सुरेशाय तस्मै देवाय
रंहसे १६ प्रयाताः प्राग्दिशं दिव्यं विपुलं कश्यपाश्रमम् । गत्वा त आश्रमं तत्र ब्रह्मर्षि

---

देणार आहे. यास्तव तुह्मी मजपासून वर मागून घ्या ४. कश्यपः— तूं उत्तम अमर जर आह्मांवर प्रसन्न झाला आहेस तर आह्मी सर्व आपल्याला कृतकृत्य समजत आहों. तूंच आमची परम गति आहेस ५. भगवान् जर प्रसन्न झाला असेल, व तुला वर जर अवश्य द्यावयाचाच असेल तर ज्ञानी पुरुषांच्या आनंदास वाढविणारा इंद्राचा कनिष्ठ भ्राता हो. अदितीच्या ठायीं तूं श्रीमान् भगवान् वामन देव हो. वैशंपायनः— देवांची माता व वराची इच्छा करणारी आदिति पुत्रासाठीं हाच उत्तम अर्थ वरद भगवानास बोलली ६,७. अदितिः— पुत्राची कामना करणारी मी तुजपाशीं प्रार्थना करते कीं सर्व महात्म्या देवांच्या परम कल्याणाकरितां तूं माझा पुत्र हो ८. देवः— आमचा भ्राता, भर्ता, दाता व शरण (आश्रय) हो. तूं अदितीच्या पुत्रत्वास प्राप्त झालास ह्मणजे इंद्रासह आह्मी सर्व देव, देव या शद्बास वाहूं लागूं. यास्तव प्रभो, तूं कश्यपाचा आत्मज हो ९. वैशंपायनः— त्यानंतर विष्णु त्या देवांस व कश्यपास ह्मणाला, "तथास्तु. तुमचें कल्याण होवो. यथेष्ट कामास प्राप्त व्हा. तुह्मांसर्वांचे जे शत्रु असतील ते माझ्यापुढें एक क्षणभरही उभे राहणार नाहींत. सर्व असुरगणांस मारून व दुसरेही जे देवशत्रु असतील त्यांचें निवारण करून मी सर्व देवांना यज्ञाच्या अग्रभागांचे भोक्ते करीन. सर्व देवांना हव्यभक्षक व पितरांना कव्यभक्षक करीन १०-१२. हे श्रेष्ठ देवांनो, हें सर्व मी पारमेष्ठ्य कर्मानें करीन. तुह्मी आतां आल्या-मार्गानें परत जा. १३ देवमाता अदिति व अमितात्मा कश्यप यांचें इष्ट मीं पूर्ण करीन. आतां तुह्मी आपापल्या स्थानीं जा १४. वैशंपायनः— प्रभविष्णु विष्णूनें असें ह्मटलें असतां देव आनंदित झाले. व ते सर्व त्याची पूजा करूं लागले १५. महात्मे विश्वेदेव, अदिति, कश्यप, साध्य, मरुद्गण, महाबल इंद्र, त्या वेगवान् सुरेशाला नमस्कार करून पूर्व दिशेंतील विपुल व दिव्य कश्यपाश्रमास गेले. ब्रह्मर्षिगणांनीं सेवित अशा त्या आश्र-

गणसेवितम् । चेरुः स्वाध्यायनिरता अदित्या गर्भमीप्सवः १७ अदितिर्देवमाता च गर्भं दधेऽतितेजसम् । भूतात्मानं महात्मानं दिव्यं वर्षसहस्रकम् १८ पूर्णे वर्षसहस्रे तु प्रसूता गर्भमुत्तमम् । सुराणां शरणं देवमसुराणां विनाशनम् १९ गर्भस्थेन तु देवेन परित्राताः सुरास्तदा । आददानेन तेजांसि त्रैलोक्यस्य महात्मना २० तस्मिन् जाते तु देवेशे त्रैलोक्यस्य सुखावहे । भयदे दैत्यसंघानां सुराणां नन्दिवर्धने २१ [ ३२१७ ] इति श्रीमहा० खिले० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे एकोनसप्ततितमोऽध्यायः ॥ ६९ ॥

वैशंपायन उवाच ॥ प्रजानां पतयः सप्त सप्त चैव महर्षयः । तस्य देवस्य जातस्य नमस्कारं प्रचक्रिरे १ भारद्वाजः कश्यपो गौतमश्च विश्वामित्रो जमदग्निर्वसिष्ठः । यश्चोदितो भास्करे संप्रणष्टे सोऽप्यत्रात्रिर्भगवानाजगाम २ मरीचिरंगिराश्चैव पुलस्त्यः पुलहः क्रतुः । दक्षप्रजापतिश्चैव नमस्कारं प्रचक्रिरे ३ और्वो वसिष्ठपुत्रश्च स्तंबःकाश्यप एव च । कपीवानकपीवांश्च दत्तो निश्च्यवनस्तथा ४ वसिष्ठपुत्राः सप्तासन्वासिष्ठा इति विश्रुता । हिरण्यगर्भस्य सुता और्वजाताः सुतेजसः ५ गार्ग्यः पृथुस्तथैवाग्र्यो जन्यो वामन एव च । देवबाहुर्यदुध्रश्च पर्जन्यश्चैव सोमजः ६ हिरण्यरोमा वेदशिराः सप्तनेत्रस्तथैव च । विश्वोऽतिविश्वश्च्यवनः सुधामा विरजास्तथा ७ अतिनामा सहिष्णुश्च नमस्कारमकुर्वत । उद्योतमाना वपुषा सर्वाभरणभूषिताः ८ उपनृत्यन्ति देवेशं विष्णुमप्सरसां वराः । ततो गन्धर्वतूर्येषु प्रणदत्सु विहायसि ९ बहुभिः सह गन्धर्वैः प्रागायत च तुंबुरुः । महाश्रुतिश्चित्रशिरा ऊर्णायुरनघस्तथा १० गोमायुः सूर्यवर्चाश्च

---

मास जाऊन ते सर्व तेथेंच अदितीच्या गर्भाची इच्छा करीत स्वाध्यायामध्यें निरत होऊन राहिले १६,१७. कांहीं दिवसांनीं देवमाता अदितीनें अतितेजस्वी गर्भास धारण केलें. त्या महात्म्या भूतात्म्यास तिनें दिव्य सहस्रवर्षें पोटांत वागविलें. सहस्रवर्षें पूर्ण झालीं असतां ती उत्तम गर्भास प्रसवली. तोच देवांचा रक्षक देव व असुरांचा विनाशक होय १८-१९. त्यावेळीं त्या गर्भस्थ महात्म्या देवानें, सर्व त्रैलोक्याचें तेज आकर्षण करून घेऊन देवांचें रक्षण केलें २०. त्रैलोक्यास सुखावह, दैत्यसंघांस भयद व देवांचा आनंदवर्धक असा तो देवेश उत्पन्न झाला असतां त्रिभुवन निस्तेज झाले २१. इति श्रीमहा. खि. हरि. भावि. वामना. एकुणसत्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ६९ ॥

वैशंपायनः–सात प्रजापति व सात महर्षी त्या उत्पन्न झालेल्या देवाला नमस्कार करते झाले १. भारद्वाज, कश्यप, गौतम, विश्वामित्र, जमदग्नि, वसिष्ठ व भास्कर प्रनष्ट झाला असतां जो उदय पावला होता तो भगवान् अत्रिही तेथें आला २. मरीचि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु व दक्षप्रजापति त्यास नमस्कार करते झाले ३. वसिष्ठपुत्र और्व कश्यप स्तंब, कपीवान् व अकपीवान्, दत्त, निश्च्यवन ४, वसिष्ठ या नांवानें प्रख्यात असलेले सात वसिष्ठाचे पुत्र हिरण्यगर्भाचे और्वापासून झालेले अति तेजस्वी पुत्र ५ गार्ग्य पृथु, तसाच सर्वोत्तम जन्य, वामन, देव बाहु, यदुध्र, पर्जन्य, सोमज ६, हिरण्यरोमा, वेदशिरा, सप्तनेत्र, विश्व, अतिविश्व, श्च्यवन, सुधामा, विरजा ७, अतिनामा व सहिष्णु या सर्वांनीं येऊन त्या देवाला नमस्कार केला. शरीरानें अतिशय प्रकाशमान होणाऱ्या, सर्व भूषणांनीं भूषित झालेल्या श्रेष्ठ अप्सरा त्या देवेशा विष्णूपाशीं नृत्य करूं लागल्या. त्यानंतर आकाशांत गंधर्वांचीं वाद्यें वाजूं लागलीं असतां

सोमवर्चाश्च सप्तमः । युगपस्तृणपः कार्ष्णिर्नंदिश्च त्रिशिरास्तथा ११ त्रयोदशः शालिशिरा पर्जन्यश्च चतुर्दशः । कलिः पंचदशश्चात्र तत्रैव तु महीपते १२ दश पंचस्विमे प्रोक्ता नारदश्चैव षोडशः । हाहाहूहूश्च गंधर्वौ हंसश्चैव महाद्युतिः १३ सर्वे ते देवगन्धर्वा उपगायन्ति केशवम् । तथवाप्सरसो हृष्टाः सर्वालंकारभूषिताः १४ वपुष्मंतः सुजघनाः सर्वांगशुभदर्शनाः । ननृतुश्च महाभागा जगुश्चायतलोचनाः १५ सुमध्याश्चारुमध्याश्च प्रियमुख्या वरानना: । अनूकाथ तथा जामी मिश्रकेशी त्वलंबुषा १६ मरीचिशुचिकाश्चैव विद्युत्पर्णा तिलोत्तमा । अद्रिका लक्षणा चैव रंभा तद्वन्मनोरमा १७ असिता च सुबाहुश्च सुप्रिया सुभगा तथा । उर्वशी चित्रलेखा च सुग्रीवा च सुलोचना १८ पुंडरीका सुगंधा च सुरथा च प्रमाथिनी । नन्दा शारद्वती चैव तथान्यास्तत्र संघशः १९ मेनका सहजन्या च पर्णिका पुंजिकस्थला । एताश्चाप्सरसोन्याश्च प्रनृत्यन्ति सहस्रशः २० धातार्यमा च मित्रश्च वरुणोंशो भगस्तथा । इन्द्रो विवस्वान् पूषा च त्वष्टा च सविता तथा २१ कथितो विष्णुरित्येवं काश्यपेयो गणस्तथा । इत्येतेद्वादशादित्या ज्वलन्तः सूर्यवर्चसः २२ चक्रुस्तस्य सुरेशस्य नमस्कारं महात्मनः । मृगव्याधश्च सर्पश्च निर्ऋतिश्च महाबलाः २३ अजैकपादहिर्बुध्न्यः पिनाकी चापराजितः । दहनोऽथेश्वरश्चैव कपाली च विशांपते २४ स्थाणुर्भगश्च भगवान्रुद्रास्तत्रावतस्थिरे । अश्विनौ वसवश्चाष्टौ मरुतश्च महाबलाः २५ विश्वेदेवाश्च साध्याश्च तस्य प्रांजलयः स्थिताः । शेषानुजा महाभागा वासुकिप्रमुखास्तथा २६ कच्छ-

---

पुष्कळ गंधर्वांसहवर्तमान तुंबुरु गायन करूं लागला. महाश्रुति, चित्रशिरा, ऊर्णायु, अनघ ८—१०, गोमायु, सूर्यवर्चा व सातवा सोमवर्चा, युगप, तृणप, कार्ष्णि, नंदि, त्रिशिरा ११, तेरावा शालिशिरा, चवदावा पर्जन्य आणि त्याचप्रमाणें हे राजन्, त्यांतच पंधरावा कलि १२, हे सांगितलेले पंधरा व सोळावा नारद, हाहा व हूहू हे दोघे गंधर्व, महा द्युतिमान् हंस १३, इत्यादि ते सर्व देवांचे गंधर्व केशवापाशीं येऊन गावूं लागले. त्याचप्रमाणें अतिशय हृष्ट, सर्व आभरणांनीं भूषित, सुंदर शरीरसंपन्न, सुंदर जघनप्रदेशयुक्त, ज्याच्या सर्व अंगांचें दर्शन शुभ आहे अशा महाभागा अप्सरा नाचूं लागल्या. ज्यांचे नेत्र दीर्घ आहेत अशा त्या गावूंही लागल्या १४, १५. त्या सर्वजणींचा कटिभाग सुंदर व रमणीय होता. त्यांना मुख्य पदार्थ, प्रिय वाटत होते व त्यांचीं तोंडें फार उत्तम होतीं. असो; अनुका जामी, मिश्रकेशी, अलंबुषा १६, मरीची, शुचिका, विद्युत्पूर्णा, तिलोत्तमा, अद्रिका, लक्षणा, रंभा, मनोरमा १७, असिता, सुबाहु, सुप्रिया, सुभगा, उर्वशी, चित्रलेखा, सुग्रीवा, सुलोचना १८, पुंडरीका, सुगंधा, सुरथा, प्रमाथिनी, नंदा, शारद्वती, तशाच दुसऱ्या अप्सरा तेथें संघशः आल्या होत्या १९. मेनका, सहजन्या, पर्णिका, पुंजिकस्थला, या व दुसऱ्याही सहस्रावधि अप्सरा नाचत होत्या २०. धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंश, भग, इंद्र, विवस्वान्, पूषा, त्वष्टा, सविता, व विष्णू अशा प्रकारचा हा काश्यपेय गण सांगितलेला आहे. हे बारा सूर्यासारखे तेजस्वी व दीप्त आदित्य त्या महात्म्या सुरेशाला नमस्कार करते झाले. मृगव्याध, सर्प, महाबल निर्ऋति २१—२३, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पराजित न होणारा पिनाकी, त्याचप्रमाणें हे राजन्, दहन ईश्वर कपाली २४. स्थाणु, भग व भगवान् रुद्र तेथें येऊन राहिले. अश्विनीकुमार, आठवसु, महाबल मरुत्, विश्वेदेव, व साध्य, हात जोडून उभे राहिले. शेषाचे अनुज महाभाग वासुकिप्रभृति नाग २५, २६. कच्छप-

पश्चापहर्ता च तक्षकश्च महाबलः । अधृष्टास्तेजसा युक्ता महाक्रोधा महाबलाः २७ एते नागा महात्मानस्तस्मै प्रांजलयः स्थिताः । तार्क्ष्यश्चारिष्टनेमिश्च गरुडश्च महाबलः २८ अरुणश्चारुणिश्चैव वैनतेया ह्युपस्थिताः । पितामहश्च भगवान्स्वयमागम्य लोककृत् । प्राह चैवं गुरुः श्रीमान्सह सर्वैर्महात्मभिः २९ ब्रह्मोवाच ॥ यस्मात्प्रसूयते लोकः प्रभविष्णुः सनातनः । तस्माल्लोकेश्वरः श्रीमान्विष्णुरेव भवत्वयम् ३० एवमुक्त्वा तु भगवान्सार्धं देवर्षिभिः प्रभुः । नमस्कृत्वा सुरेशाय जगाम त्रिदिवं पुनः ३१ स तु जातः सुरेशानः कश्यपस्यात्मजः प्रभुः । नवदुर्दिनमेघाभो रक्ताक्षो वामनाकृतिः ३२ श्रीवत्सेनोरसि श्रीमान् रोमजातेन राजता । उत्फुल्ललोचनाः सर्वाः पश्यन्त्यप्सरसस्तदा ३३ दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भा सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ३४ सुरर्षिप्रतिमः श्रीमान्भूर्भुवो भूतभावनः । शुचिरोमा महास्कन्धः सर्वतेजोमयः प्रभुः ३५ या गतिः पुण्यकीर्तीनामगतिः पापकर्मणाम् । योगसिद्धमहात्मानो यं विदुर्योगमुत्तमम् ३६ यस्याष्टगुणमैश्वर्यं यमाहुर्देवसत्तमम् । यं प्राप्य शाश्वतं विप्रा नियतामोक्षकांक्षिणः ३७ जन्मनो मरणाच्चैव मुच्यंते भवभीरवः । यदेतत्तप इत्याहुः सर्वाश्रमनिवासिनः ३८ सेवन्ते यं यताहारा दुश्चरं व्रतमास्थिताः । योऽनन्त इति नागेषु सेव्यते सर्वभोगिभिः ३९ सहस्रमूर्धा रक्ताक्षः शेषादिभिरनुत्तमैः । यो यज्ञ इति विप्रेंद्रैरिज्यते स्वर्गलिप्सुभिः ४० नानास्थानगतः श्रीमानेकः कविरनुत्तमः । यं

---

अपहर्ता, महाबल तक्षक हे तेजानें युक्त, अधृष्ट, महाक्रोधी व महा बलाढ्य, महात्मे नाग त्याच्यापाशीं येऊन हात जोडून उभे राहिले. तार्क्ष्य, अरिष्टनेमि, महाबल गरुड २७,२८. अरुण व आरुणि हे विनतापुत्र त्याच्यापाशीं येऊन उभे राहिले. स्वतः श्रीमान् लोककर्ता भगवान् पितामह गुरु सर्व महात्म्यासह येऊन असें ह्मणाला २९. ब्रह्माः—ज्याअर्थीं उत्पन्न होण्याची इच्छा करणारा सनातन लोक याच्यापासून त्याअर्थीं हा लोकेश्वर श्रीमान् विष्णुच होवो ३०. देवर्षींसह असें बोलून तो भगवान् प्रभु सुरेशास नमस्कार करून पुनः स्वर्गास गेला ३१. असो; याप्रमाणें तो सुरेशान प्रभु कश्यपाचा पुत्र झाला. त्याची अंगकांति नूतन जलधरासारखी होती. नेत्र रक्तवर्ण होते. व आकृति ऱ्हस्व होती ३२. श्रीवत्सलांछनाच्या योगानें तो श्रीमान् झाला होता. शोभणाऱ्या रोमावर्तानें त्याला फारच शोभा आली होती. त्यावेळीं त्याला सर्व अप्सराप्रफुल्लित नेत्रांनीं पहात होत्या ३३. अंतरिक्षांत एकाच वेळीं सहस्र सूर्यांची कांति जर उत्पन्न झाली तर ती कदाचित् त्या महात्म्याच्या कांतीसारखी होईल. तो श्रीमान् देवर्षितुल्य भूः व भुवर्लोकमय, भूतांचें कारण, ज्याचे रोम पवित्र आहेत, स्कंध मोठे आहेत, जो प्रभु सर्व तेजोमय आहे ३४,३५. जी पुण्यकीर्तिमानांची गति व पापकीर्तिमानांची अगति, योगसिद्ध महात्म्याचा जो उत्तम योग ३६. ज्याचें अष्टगुण ऐश्वर्य आहे, ज्याला देवसत्तम ह्मणतात, संसारास भिणारे व मोक्षाची इच्छा करणारे नियमयुक्त विप्र ज्या शाश्वतास प्राप्त होऊन जन्म व मरण या पासून मुक्त होतात, सर्व आश्रमांत निवास करणारे ज्याला तप ह्मणून ह्मणतात, दुश्चर व्रत धरून व नियत आहार करून व्रती ज्याची सेवा करितात, शेषादिसर्व अत्युत्तम सर्पांकडून जो सहस्रमूर्धा व रक्ताक्ष सेवला जातो, ज्याला अनंत असें ह्मणतात, स्वर्ग प्राप्त करून घेण्याची इच्छा करणारे ब्राह्मण श्रेष्ठ ज्याला यज्ञ असें नांव देऊन पूजतात जो नानास्थानगत आहे, जो श्रीमान्, एक, सर्वज्ञ व अनुत्तम, आहे, ज्या

वेदा गान्ति वेत्तारं यज्ञभागप्रदायिनम् ४१ वृषार्चिश्चन्द्रसूर्याक्षं देवमाकाशविग्रहम्। स प्राह त्रिदशान्सर्वान्वाचा वै परया विभुः ४२ जानन्नपि महातेजा गतो योगेन बालताम्। किं करोमि सुरश्रेष्ठाः कं वरं च ददामि वः ४३ यत्कांक्षितं वै सर्वेषां तद्वै ब्रूत मुदा युताः। तस्य तद्वचनं श्रुत्वा वामनस्य महात्मनः ४४ सर्वे ते हृष्टमनसो देवाः कश्यपनन्दनम्। ऊचुः प्रांजलयो विष्णुं सुराः शक्रपुरोगमाः ४५ ब्रम्हणो वरदानेन हृतं नो निखिलं जगत्। तपसा महता चैव विक्रमेण दमेन च ४६ बलिना दैत्यमुख्येन सर्वज्ञेन महात्मना। भवध्यः किल सोऽस्माकं सर्वेषां देवसत्तम ४७ भवान्प्रभवते तस्य नान्यः कश्चन सुव्रत। यत्प्रपद्यामहे सर्वे भवंतं शरणार्थिनः। शरण्यं वरदं देवं सर्वदेवभयापहम् ४८ ऋषीणां च हितार्थाय लोकानां च सुरेश्वर। प्रियार्थं च तथादित्याः कश्यपस्य तथैव च ४९ कव्यं पितॄणामुचितं सुराणां हव्यमुत्तमम्। प्रवर्तेत महाबाहो यथापूर्वं सुरोत्तम ५० आनृण्यार्थं सुरेशस्य वासवस्य महात्मनः। प्रत्यानय महेंद्रस्य त्रैलोक्यमिदमव्ययम् ५१ क्रतुना वाजिमेधेन यजते स हि दानवः। यत्प्रत्यानयनं युक्तं लोकानां तद्विचिन्तय ५२ वैशंपायन उवाच॥ एवमुक्तस्तदा देवैर्विष्णुर्वामनरूपधृक्। प्रहर्षयन्नुवाचाथ सर्वान्देवानिदं वचः ५३ विष्णुरुवाच॥ तस्य यज्ञसकाशं मां महर्षिर्वेदपारगः। बृहस्पतिर्महातेजा नयत्वांगिरसः सुतः ५४ तस्याहं समनुप्राप्तो यज्ञवाटं सुरोत्तमाः। विचरिष्ये यथा युक्तं त्रैलोक्यहरणाय वै ५५

---

सर्वज्ञ व यज्ञभाग प्रदान करणाऱ्या देवाला उद्देशून वेद स्तुति गातात ३७–४१. धर्म हीच ज्याची ज्योति आहे, चंद्र व सूर्य ज्याचे नेत्र आहेत, व आकाश हीच ज्याची मूर्ति आहे, त्या देवाचें वर्णन वेदांत सर्वत्र आहे. असो; असा तो विभु देव, स्वतः सर्व जाणत असूनही योगानें बालभावास प्राप्त होऊन परावाणीनें सर्व देवांस ह्मणाला, ‘ हे श्रेष्ठ देवांनो, मी काय करूं ? मी तुह्मांला कोणता वर देऊं ? ४२,४३. तुह्मां सर्वांना जें इष्ट असेल तें आनंदयुक्त होऊन मला सांगा. त्या महात्म्या वामनाचें तें वचन ऐकून सर्व देव हृष्टचित्त झाले. आणि इंद्रादि ते सर्व हात जोडून कश्यपनंदन विष्णूस ह्मणाले, ‘ हे उत्तम देवा, दैत्यांचा सर्वज्ञ व महात्म्या राजा जो बलि त्यानें ब्रह्मदेवापासून वर मिळवून मोठें तप, पराक्रम, दम, इत्यादिकांच्या योगानें आमचें सर्व जग हरण केलें. आह्मां सर्वांना तो असुर अवध्य आहे ४४ ४७. हे सुव्रता, तूंच त्याला जिंकण्यास समर्थ आहेस. दुसरा कोणी नाहीं. यास्तव आह्मी शरणार्थी तुज शरण्य, वरद, सर्व देवांचें भय हरण करणाऱ्या देवास शरण आलों आहों ४८. हे सुरेश्वरा, ऋषींच्या व लोकांच्या हिताकरितां, अदिति व कश्यप यांच्या संतोषाकरितां ४९. पितरांचें उत्तम कव्य व देवांचें उचित हव्य पूर्वीप्रमाणें त्यांस मिळूं लागेल असें, हे महाबाहो, सुरेश्वरा, तूं कर ५०. महात्म्या देवेंद्र वासवाच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां त्याला हें अव्यय त्रैलोक्य पुनः परत मिळवून दे ५१. तो दानव यावेळीं अश्वमेध यज्ञ करीत आहे. यास्तव ज्या उपायानें सर्व लोक परत आणतां येतील त्याचें चिंतन कर ’ ५२. वैशंपायनः—देवांकडून असें बोलला गेलेला वामनरूपधारी विष्णु सर्व देवांस हर्षयुक्त करीत असें वचन बोलला ५३. विष्णुः—वेदपारंग, महातेजस्वी, अंगिरामुनीचा पुत्र महर्षि बृहस्पति मला त्याच्या यज्ञापाशीं नेवो ५४. हे देवांनो, बलीच्या यज्ञशाळेपाशीं जाऊन पोंचल्यावर

वैशंपायन उवाच ॥ ततो बृहस्पतिर्धीमाननयद्वामनं प्रभुम् । यज्ञवाटं महातेजा दानवेन्द्रस्य धीमतः ५६ मौंजी यज्ञोपवीती च च्छत्री दण्डी ध्वजी तथा । वामनो धूम्ररक्ताक्षो भगवान्बालरूपधृक् ५७ तं गत्वा यज्ञवाटं च ब्रह्मर्षिगणसंकुलम् । आत्मना चैव भगवान्वर्णयामास तं क्रतुम् ५८ लोकेश्वरेश्वरः श्रीमान्सुरैर्ब्रह्मपुरोगमैः । अध्यास्यमानो भगवानवृद्धोऽप्यथ वृद्धवत् ५९ दानवाधिपतेस्तस्य बलेर्वैरोचनस्य च । यज्ञवाटमचिन्त्यात्मा जगाम सुरसत्तमः ६० पालितोऽपि हि दैतेयैः सांग्रामिकपरिच्छदैः । द्वारे दानवसंबाधे सहसैव विवेश ह ६१ ऋषिभिश्चैव मंत्राढ्यैः सर्वतः परिवारितम् । दैत्यदानवराजेंद्रमुपतस्थे बलिं बली ६२ वर्णयित्वा यथान्यायं यज्ञं यज्ञसनातनः । विस्तरेण नरश्रेष्ठ प्रयोगैर्विविधैस्तथा ६३ शुक्रादीनृत्विजश्चापि यज्ञकर्मविचक्षणान् । सर्वानेव निजग्राह चकार च निरुत्तरान् ६४ आराद्थ बलेस्तस्य ऋत्विजामभितस्तथा । यज्ञमात्मानमेवासौ हेतुभिः कारणं विभुः ६५ वैदिकैरप्रकाशैश्च पुनरप्यथ भारत । प्रत्यक्षमृषिसंघानां वर्णयामास चित्रगुः ६६ ततो निरुत्तरान्दृष्ट्वा सोपाध्यायानृषींश्च तान् । अवृद्धेनापि वृद्धांस्तान्वामनेन महौजसा ६७ अद्भुतं चापि मेने स विरोचनसुतो बली । मूर्ध्ना कृतांजलिश्चेदमब्रवीद्विस्मितो वचः ६८ कुतस्त्वं कोऽसि कस्यासि किं तेहास्ति प्रयोजनम् । नैवं विधः परिज्ञातो दृष्टपूर्वो

---

मी त्रैलोक्याचें हरण करण्यास जें योग्य दिसेल तें करीन ५५. वैशंपायनः—त्यानंतर बुद्धिमान् व महातेजस्वी बृहस्पति वामन प्रभूला त्या धीमान् दानवप्रभूच्या यज्ञशाळेजवळ घेऊन गेला ५६. ज्यानें मुंजा तृणाची मेखला घातली आहे, गळ्यांत यज्ञोपवीत आहे, हातांत छत्र, दंड व ध्वज आहे, ज्याचा आकार ऱ्हस्व आहे, नेत्र धूम्रवर्ण व रक्तवर्ण आहेत, असा तो बालरूप धारण करणारा भगवान् ५७, ब्रह्मर्षिगणांनीं भरलेल्या त्या यज्ञवाटास जाऊन स्वतः त्यानें त्या यज्ञास पाहिलें ५८. लोकेश्वरांचा ईश्वर, श्रीमान्, ब्रह्मप्रभृति देवांकडून अधिष्ठित झालेला, समग्र ऐश्वर्यादि सहा भगांनीं युक्त, अवृद्ध असूनही वृद्धासारखा ज्ञानी व ज्याचें स्वरूप अचिंत्य आहे असा तो सुरसत्तम दानवाधिपति विरोचनपुत्र बलीच्या यज्ञवाटास गेला ५९,६०. त्या यज्ञभूमीचें रक्षण संग्रामसंबंधीं सामग्रीनें युक्त असलेल्या दैत्यांकडून केलें जात होतें. असो; दानवांची जेथें मोठी गर्दी उडाली आहे अशा द्वारामध्यें तो एकाएकीं प्रविष्ट झाला ६१. तो यज्ञवाट मंत्राढ्य ऋषींकडून सर्वतः व्याप्त झाला होता. तेथें अनेक दैत्य, दानव व राजेंद्र जमले होते. असो; अशा त्या यज्ञशाळेंतील बलीपाशीं तो बलाढ्य जाऊन उभा राहिला ६२. त्या यज्ञरूपी सनातन देवानें यथान्याय यज्ञाचें वर्णन करून त्याचप्रमाणें हे नरश्रेष्ठा जनमेजया, विविध प्रयोगांच्या योगानें यज्ञकर्मामध्यें अतिशय निष्णात असलेल्या शुक्रादि ऋत्विजांचेंही विस्तारपूर्वक वर्णन करून त्या सर्वांचा त्यानें निग्रह केला. त्यानें त्यांना निरुत्तर केलें ६३,६४. बलीच्या समीप, व त्या सर्व ऋत्विजांच्या समोर, त्या विभूनें यज्ञरूपी स्वतःचेंच, अनेक वैदिक व अप्रसिद्ध हेतूंनीं, कांहीं गूढ कारणास्तव, ऋषिसंघांच्या डोळ्या देखत, पुनः वर्णन केलें ६५,६६. त्यानंतर उपाध्यायासह सर्व ऋषि निरुत्तर झाले आहेत असें पाहून, अवृद्ध असलेल्याही त्या महा ओजस्वी वामनानें त्या वृद्धांस गप्प केलें आहे, असें जाणून विरोचन बलि तें मोठें आश्चर्य मानूं लागला. आणि अतिशय चकित झालेला तो मस्तक नम्र करून व हात जोडून असें वचन बोलला ६७,६८.

मया द्विजः ६९ बालो मतिमतां श्रेष्ठो ज्ञानविज्ञानकोविदः । शिष्टवाग्रूपसंपन्नो मनोज्ञः प्रियदर्शनः ७० नेदृशाः सन्ति देवानां ऋषीणामपि सूनवः । न नागानां न यक्षाणां नासुराणां न रक्षसाम् ७१ न पितॄणां न सिद्धानां गन्धर्वाणां तथैव च । योसिसोऽसि नमस्तेस्तु ब्रूहि किं करवाणि ते ७२ वैशंपायन उवाच ॥ उक्त एवं ह्यचिंत्यात्मा बलिना वामनस्तदा । प्रोवाचोपायतत्त्वज्ञः स्मितपूर्वमिदं वचः ७३ [ ३२९० ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० वामनावतारे सप्ततितमोऽध्यायः ॥ ७० ॥

विष्णुरुवाच ॥ अहो यज्ञोऽसुरेशस्य बहुभक्षः सुसंस्कृतः । पितामहस्येव पुरा यजतः परमेष्ठिनः १ सुरेशस्य च शक्रस्य यमस्य वरुणस्य च । विशेषितस्त्वया यज्ञो दानवेन्द्रमहाबल २ यजता वाजिमेधेन क्रतूनां प्रवरेण तु । सर्वपापविनाशाय त्वया स्वर्गप्रदर्शिना ३ सर्वकाममयो ह्येषः संमतो ब्रह्मवादिनाम् । क्रतूनां प्रवरः श्रीमानश्वमेध इति श्रुतिः ४ सुवर्णश्रृंगो हि महानुभावो लोहक्षुरो वायुजवो महारयः । स्वर्गेक्षणः कांचनगर्भगौरः सविश्वयोनिः परमो हि मेध्यः ५ आस्थाय वै वाजिनमश्वमेधमिष्ट्वा नरा दुष्कृतमुत्तरन्ति । आहुश्च यं वेदविदो द्विजेन्द्रा वैश्वानरं वाजिनमश्वमेधम् ६ यथाश्रमाणां प्रवरो गृहाश्रमो यथा नराणां प्रवरा द्विजातयः । यथासुराणां प्रवरो भवानिह तथा क्रतूनां प्रवरो-

---

तूं कोठून आलास ? कोण आहेस, तूं कोणाचा ? तुझें येथें काय प्रयोजन आहे ? तुझ्यासारखा असलीं द्विज मीं कधीं पूर्वीं ऐकला किंवा पाहिला नाहीं ६९. तूं बालक असूनही मतिमानांमध्यें श्रेष्ठ, ज्ञान व विज्ञान यांमध्यें निष्णात, उत्कृष्ट भाषण करणारा, रूपसंपन्न, सुंदर व ज्याचें दर्शन अति प्रिय आहे असा आहेस ७०. ऋषि व देव यांचेही पुत्र अशा प्रकारचे तेजस्वी नसतात. नाग, यक्ष, असुर, राक्षस, पितर, सिद्ध व तसेच गंधर्व यांतील कोणाचेही पुत्र असे नसतात. तूं जो कोणी असशील तो अस. तुला नमस्कार असो, मी तुझें कोणतें कार्य करूं ? ७१,७२. वैशंपायनः—बलीकडून तो अचिन्त्यस्वरूपी वामन असें बोलला गेला असतां उपायांचें तत्त्व जाणणारा तो अगोदर किंचित् हसून असें बोलला ७३. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्यपर्व. वामनावतारांतील सत्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७० ॥

विष्णुः—वाहवारे असुरेश्वराचा यज्ञ ! यांत विपुल अन्नसंतर्पण व उत्तम संस्कार होत आहेत. पूर्वीं यज्ञ करणाऱ्या परमेष्ठी पितामहाच्या यज्ञाप्रमाणेंच हा यज्ञ चालला आहे १. देवेश इंद्राच्या, यमाच्या व वरुणाच्या यज्ञांहून, हे महाबल दानवेंद्रा, तूं आपला यज्ञ विशेष उत्तम केला आहेस २. सर्व पापांच्या शांतीकरितां स्वर्गाकडे लक्ष्य ठेवणाऱ्या तूं सर्व यज्ञांतील श्रेष्ठ अशा अश्वमेध यज्ञाचें यजन केलें आहेस ३. हा यज्ञ सर्व काममय आहे. त्यामुळें तो ब्रह्मवेत्त्यांस संमत आहे. तो श्रीमान् अश्वमेध यज्ञांतील श्रेष्ठ यज्ञ आहे अशी श्रुति आहे ४. ज्याला सुवर्णशृंगें आहेत, जो महाप्रभावशाली आहे, ज्याचे खुर लोखंडासारखे कठिण आहेत, जो वायूप्रमाणें महावेगवान् आहे, महावेगयुक्त आहे, स्वर्ग हेच ज्याचे नेत्र आहेत, कांचनाच्या आंतील भागाप्रमाणें जो गौर आहे, तो मेध्य यज्ञ अतिश्रेष्ठ व विश्वयोनि आहे ५. मानव अश्वमेध यज्ञ करून व घोड्यावर बसून पापाचें उल्लंघन करितात. त्या अश्वमेधीय घोड्याला वेदवेत्ते ब्राह्मण वैश्वानर असें ह्मणतात ६. ज्याप्रमाणें आश्रमामध्यें गृहस्थाश्रम उत्तम आहे; मनुष्यांमध्यें ब्राह्मण श्रेष्ठ आहेत, व असुरांमध्यें तूं वरिष्ठ आहेस त्याप्रमाणें सर्व यज्ञांमध्यें अश्वमेध यज्ञ

ऽश्वमेधः ७ वैशंपायन उवाच ॥ एतच्छ्रुत्वा तु वचनं वामनेन समीरितम् । मुदा परमया
युक्तः प्राह दैत्यपतिर्बलिः ८ बलिरुवाच ॥ कस्यासि ब्राह्मणश्रेष्ठ किमिच्छसि ददामि ते ।
वरं वरय भद्रं ते यथेष्टं काममाप्नुहि ९ वामन उवाच । न राज्यं न च यानानि न रत्नानि
न च स्त्रियः । कामये यदि तुष्टोऽसि धर्मे च यदि ते मतिः १० गुर्वर्थं मे प्रयच्छस्व पदानि
त्रीणि दानव । त्वमग्निशरणार्थाय एष मे प्रवरो वरः । वामनस्य वचः श्रुत्वा प्राह दैत्यप-
तिर्बलिः ११ बलिरुवाच ॥ त्रिभिः किं तव विप्रेंद्र पदैः प्रवदतां वर । शतं शतसहस्राणां
पदानां मार्गतां भवान् १२ शुक्र उवाच ॥ मा ददस्व महाबाहो न त्वं वेत्सि महासुर ।
एष मायाप्रतिच्छन्नो भगवान्प्रवरो हरिः १३ वामनं रूपमास्थाय शक्रप्रियहितेप्सया । त्वां
वंचयितुमायातो बहुरूपधरो विभुः १४ एवमुक्तः स शुक्रेण चिरं संचिंत्य वै बलिः । प्रह-
र्षेण समायुक्तः किमतः पात्रमिष्यते १५ प्रगृह्य हस्ते संभ्रांतो भृंगारं कनकोद्भवम् । बलि-
रुवाच ॥ विप्रेंद्र प्राङ्मुखस्तिष्ठ स्थितोऽस्मि कमलेक्षण १६ प्रतीच्छ देहि किं भूमिं का
मात्रा भोः पदत्रयम् । दत्तं च पातयजलं नैव मिथ्या भवेद्गुरुः १७ शुक्र उवाच ॥ भो न
देयं कुतो दैत्य विज्ञातोयं मया ध्रुवम् । कोऽयं विष्णुरहो प्रीतिर्वंचितस्त्वं न वंचितः १८
बलिरुवाच ॥ कथं सनाथोऽयं विष्णुर्यज्ञे स्वयमुपस्थितः । दास्यामि देवदेवाय यद्यदिच्छ-
त्ययं विभुः १९ को वान्यः पात्रभूतोऽस्माद्विष्णोः परतरो भवेत् । एवमुक्त्वा बलिः शीघ्रं

---

उत्तम आहे ७. वैशंपायनः—वामनानें सांगितलेलें हें वचन ऐकून परम आनंदानें युक्त झालेला दैत्यपति बलि ह्मणाला ८. बलिः— हे उत्तम ब्राह्मणा, तूं कोणाचा आहेस? तूं काय इच्छितोस? मी तुला हवें तें देतों. वर माग व यथेष्ट कामनेस प्राप्त हो ९. वामनः— दानवा, राज्य, यानें, रत्नें, स्त्रिया, यांतील कशाचीही मला इच्छा नाहीं. तूं जर संतुष्ट झाला असशील व धर्मामध्यें जर तुझी मति असेल तर गुरुकरितां मला तीन पावलें भूमि दे. अग्निकुंड घालण्याकरितां मला ती पाहिजे आहे. हाच मला अतिशय इष्ट वर आहे. वामनाचें तें वचन ऐकून दैत्यपति बलि ह्मणाला १०,११. बलिः— हे ब्राह्मण-श्रेष्ठा, हे वक्त्यांतील उत्तमा, तीन पावलांनीं काय होणार? तूं एक कोटी पावलें भूमी मागून घे १२. शुक्रः— हे महाभागा, देऊं नको. हे महा असुरा, तूं जाणत नाहींस. हा मायेनें आच्छादित झालेला भगवान् हरि आहे १३. हा श्रेष्ठ व बहुरूपें धारण करणारा विभु इंद्राचें प्रिय करण्याच्या इच्छेनें वामनरूप घेऊन तुला फसविण्यासाठीं आला आहे १४. शुक्रानें ज्याला असें सांगितलें आहे, असा तो बलि बराच वेळ विचार करून व प्रहर्षानें युक्त होऊन याहून आणखी दुसरें उत्तम पात्र कोणतें मिळणार? असें बोलून ज्याच्या मनास भ्रम झाला आहे, असा बलि हातांत सोन्याची झारी घेता झाला. बलिः—हे ब्राह्मणश्रेष्ठा, प्राङ्मुख होऊन बैस. हे कमलनयना, मी दान देण्यास तयार आहें १५. सांग. मी तुला किती भूमि देऊं? तीन पावलें ही केवढीशी जागा आहे? मी दिलेलें जल भूमीवर पाडीव ह्मणजे गुरु मिथ्या होणार नाहीं १६,१७. शुक्रः— अरे राजा, देऊं नकोस. कारण हे दैत्या, मी याला पूर्णपणें ओळखलें आहे. हा विष्णु कोण? व तो फसविला जाणार कसा? तूंच फसविला जात आहेस? १८. बलिः— काय, हा नाथ विष्णु आहे. व तो माझ्या यज्ञांत स्वतः आला आहे? तर मग हा प्रभु जें जें मागेल तें तें मी याला देईन १९. या विष्णूहून अधिक पात्रभूत दुसरा कोण मिळ-

पातयामास वै जलम् २० वामन उवाच ॥ पदानि त्रीणि दैत्येंद्र पर्याप्तानि ममानघ ॥ यन्मया पूर्वमुक्तं हि तत्तथा न तदन्यथा २१ वैशंपायन उवाच ॥ इत्येतद्वचनं श्रुत्वा वामनस्य महौजसः । कृष्णाजिनोत्तरीयं स कृत्वा वैरोचनिस्तदा २२ एवमस्त्विति दैत्येशो वाक्यमुक्त्वारिसूदनः । ततो वारि समापूर्णं भृंगारं स परामृशत् २३ वामनो ह्यसुरेंद्रस्य चिकीर्षुः कदनं महत् । क्षिप्रं प्रसारयामास दैत्यक्षयकरं करम् २४ प्राङ्मुखश्चापि दैत्येशस्तस्मै सुमनसा जलम् । दातुकामः करे यावत्तावत्तं प्रत्यषेधयत् २५ तस्य तद्रूपमालोक्य ह्यचिंत्यं च महात्मनः । अभूतपूर्वं च हरेर्जिहीर्षोः श्रियमासुरीम् २६ इंगितज्ञोऽग्रतः स्थित्वा प्रह्लादस्त्वब्रवीद्वचः । प्रह्लाद उवाच ॥ मा ददस्व जलं हस्ते बटोर्वामनरूपिणः २७ स त्वसौ येन ते पूर्वं निहतः प्रपितामहः । विष्णुरेष महाप्राज्ञस्त्वां वंचयितुमागतः २८ बलिरुवाच ॥ हंत तस्मै प्रदास्यामि देवायैमं प्रतिग्रहम् । अनुग्रहकरं देवमीदृशं जगतः प्रभुम् २९ ब्रह्मणोऽपि गरीयांसं पात्रं लप्स्यामहे वयम् । अवश्यं चासुरश्रेष्ठ दातव्यं दीक्षितेन वै ३० इत्युक्त्वासुरसंघाना मध्ये वैरोचनिस्तदा । देवाय प्रददौ तस्मै पदानि त्रीणि विष्णवे ३१ प्रह्लाद उवाच ॥ दानवेश्वर मा दास्त्वं विप्रायास्मै प्रतिग्रहम् । नेमं विप्रशिशुं मन्ये नेदृशो भवति द्विजः ३२ रूपेणानेन दैत्येन्द्र सत्यमेवं ब्रवीमि ते । नारसिंहमहं मन्ये तमेव पुनरागतम् ३३ एवमुक्तस्तदा तेन प्रह्लादेनामितौजसा । प्रह्लादमब्रवीद्वाक्यमिदं निर्भर्त्सयन्निव ३४ बलिरुवाच ॥ देहीति याचते यो हि प्रत्याख्याति च योऽसुर । उभयोरप्यलक्ष्म्या

---

णार ? असें बोलून बलीनें दानोदक त्याच्या हातावर पाडविलें २०. वामनः—हे निष्पाप दैत्येंद्रा, मला तीन पावलेंच पुरे आहेत. कारण, मी जें एकदां बोललों तें तसेंच होणार. अन्यथा कधींही व्हावयाचें नाहीं २१. वैशंपायनः—महाबलाढ्य वामनाचें हें वचन ऐकून लागलाच तो विरोचनपुत्र शत्रुनाशक दैत्येंद्र बलि कृष्णाजिनाचें उत्तरीय करून बरें आहे; असें होवो; असें बोलला. नंतर जलानें परिपूर्ण झालेली झारी त्यानें हातांत घेतली २२,२३. वामनानेंही असुरेंद्राचें मोठें कदन करण्याच्या इच्छेनें लागलाच आपला दैत्यक्षय करणारा हात पसरला २४. तेव्हां पूर्वेकडे तोंड करून बसलेल्या दैत्येशानेंही त्याला निर्मल मनानें जल देण्याच्या इच्छेनें हातांत पात्र घेतलें. पण इतक्यांत असुरांच्या लक्ष्मीचें हरण करण्याची इच्छा करणाऱ्या त्या महात्म्या हरीचें तें अपूर्व रूप पाहून इंगितज्ञ प्रल्हाद पुढें होऊन व त्याचा निषेध करून, असें वचन बोलला. प्रल्हादः—— या वामनरूपी बटूच्या हातावर जल देऊं नको. ज्यानें पूर्वी तुझ्या प्रपितामहाला मारलें तोच हा. हा महाप्राज्ञ विष्णु तुला फसवावयास आला आहे २५-२८. बलिः—— वा, असें असेल तर फारच चांगलें. मी त्या देवालाच प्रतिग्रह देईन. मी या अनुग्रह करणाऱ्या असल्या जगाच्या प्रभूलाच हें दान देईन २९. त्यामुळें आह्मांला ब्रह्मदेवाहूनही अधिक चांगलें पात्र मिळेल. हे असुरश्रेष्ठा, यज्ञ दीक्षा घेतलेल्या पुरुषाला अवश्य दान दिलें पाहिजे ३०. असुरांच्या समूहामध्यें असें बोलून विरोचन पुत्रानें त्यावेळीं त्या विष्णु देवाला तीन पदें दिलीं ३१. प्रल्हादः—— दानवेश्वरा, तूं या विप्राला प्रतिग्रह देऊं नकोस. हा ब्राह्मणपुत्र आहे, असें मला मुळींच वाटत नाहीं. ब्राह्मणाचा बालक असा कधींही नसतो ३२. हे दैत्येंद्रा, याच्या या रूपावरूनच मी तुला सत्य सांगत आहे. पुनः तोच हा नारसिंह आला आहे, असें मी समजतों ३३.

वै भागस्तं विशते नरम् ३५ प्रतिज्ञाय तु यो विप्रे न ददाति प्रतिग्रहम् । स याति नरकं पापी मित्रगोत्रसमन्वितः ३६ अलक्ष्मीभयभीतोऽहं ददाम्यस्मै वसुन्धराम् । प्रतिग्रहीता चाप्यन्यः कश्चिदस्माद्द्विजोऽथ वै ३७ नाधिको विद्यते यस्मात्तद्ददामि वसुंधराम् । हृदयस्य च मे तुष्टिः परा भवति दानव ३८ दृष्ट्वा वामनरूपेण याचन्तं द्विजपुंगवम् । एष तस्मात्प्रदास्यामि न स्थास्यामि निवारितः ३९ भूयश्च प्राब्रवीद्देवं वामनं विप्ररूपिणम् । स्वल्पैः स्वल्पमते किं ते पदैस्त्रिभिरनुत्तम ४० कृत्स्नां ददामि ते विप्र पृथिवीं सागरैर्वृताम्। वामन उवाच ॥ न पृथ्वीं कामये कृत्स्नां संतुष्टोऽस्मि पदैस्त्रिभिः । एष एव रुचिष्यो मे वरो दानवसत्तम ४१ वैशंपायन उवाच ॥ तथास्त्विति बलिः प्रोच्य स्पर्शयामास दानवः । पदानि त्रीणि देवाय विष्णवेऽमिततेजसे ४२ तोये तु पतिते हस्ते वामनोऽभूदवामनः । सर्वदेवमयं रूपं दर्शयामास वै विभुः ४३ भूःपादौ द्यौः शिरश्चास्य चन्द्रादित्यौ च चक्षुषी । पादांगुल्यः पिशाचाश्च हस्तांगुल्यश्च गुह्यकाः ४४ विश्वेदेवाश्च जानुस्था जंघे साध्याः सुरोत्तमाः । यक्षा नखेषु संभूता लेखाश्चाप्सरसस्तथा ४५ तडित्दृष्टिः सुविपुला केशाः सूर्यांशवस्तथा । तारका रोमकूपाणि रोमाणि च महर्षयः ४६ बाहवो विदिशश्चास्य दिशः श्रोत्रे तथैव च । अश्विनौ श्रवणौ चास्य नासा वायुर्महाबलः ४७ प्रसादश्चंद्रमा-

---

अमित ओजस्वी प्रऱ्हादानें असें ज्यास सांगितलें आहे असा बलि त्या वृद्धाची जणुं काय निर्भर्त्सनाच करीत असें वचन बोलला ३४ बलिः—असुरा, जो 'दे' असें ह्मणून मागतो व जो त्याला 'नाहीं' असें ह्मणतो त्या दोघांच्याही अलक्ष्मीचा भाग नाहीं असें ह्मणणाऱ्या पुरुषामध्यें शिरतो ३५. ब्राह्मणाला देतों असें ह्मणून जो दान देत नाहीं, तो पापी मित्र गोत्रासह नरकास जातो ३६. मी अलक्ष्मीच्या भयानें भ्यालों आहें. मी याला सर्व पृथ्वीही देईन. याहून दुसरा कोणी प्रतिग्रह करणारा योग्य द्विजही मला दिसत नाहीं ३७ आणि ज्याअर्थी याच्यापेक्षां दुसरा कोणी अधिक सत्पात्र आढळत नाहीं त्या अर्थी मी याला सर्व पृथ्वी देईन. वामनरूपानें याचना करण्याऱ्या या द्विजश्रेष्ठास पाहून, बा दानवा, माझ्या मनाला अतिशय संतोष होत आहे. यास्तव हा मी त्याला आतां दान देत आहे. कोणी कितीही जरी निवारण केलें तरी मी थांबणार नाहीं ३८,३९. प्रऱ्हादाला असें सांगून तो पुनः विप्ररूपी वामनाला ह्मणाला. "बा अत्युत्तम स्वल्पमते, तुझ्या या एवढ्याशा स्वल्प तीन पावलांनीं काय होणार ? ४०. बा विप्रा, समुद्रांनीं आवृत झालेली सर्व पृथ्वी मी तुला देतों. वामनः—बा श्रेष्ठ दानवा, मी सर्व पृथ्वीची कामना करीत नाहीं. मी तीन पदांनींच संतुष्ट होत आहे. हाच वर मला अतिशय आवडत आहे ४१. वैशंपायनः— 'तथास्तु' असें ह्मणून दानव बलीनें अमित तेजस्वी विष्णु देवाला तीन पावलें भूमि दान दिली ४२. पण हातावर पाणी पडतांच जो वामन होता तो अवामन झाला. त्या विभूनें तेथल्या लोकांना सर्व देवमय रूप दाखविलें ४३. भूमि हे पाय, आकाश ( स्वर्ग ) मस्तक, चंद्र व सूर्य हे नेत्र, पिशाचें ह्या पायांच्या अंगुली व गुह्यक ह्या हातांच्या अंगुली ४४. विश्वेदेव ज्याच्या गुडघ्याचे ठायीं स्थित आहेत, जंघेमध्यें देवोत्तम साध्य आहेत, यक्ष नखांचे जागीं आहेत, अप्सरा ह्या ज्याच्या अंगावरील रेखा आहेत ४५. विद्युत् हीच ज्याची फार विस्तृत दृष्टि आहे, तसेच सूर्यकिरण हे ज्याचे केस आहेत, तारका हींच ज्याचीं रोमरंध्रें आहेत, व महर्षि रोम आहेत ४६. ( असें रूप त्यानें त्यांस

श्चैव मनो धर्मस्तथैव च । सत्यमस्याभवद्वाणी जिह्वा देवी सरस्वती ४८ ग्रीवादितिर्महादेवी तालुः सूर्यश्च दीप्तिमान् । द्वारं स्वर्गस्य नाभिर्वै मित्रस्त्वष्टा च वै भ्रुवौ ४९ मुखं वैश्वानरश्चास्य वृषणौ तु प्रजापतिः । हृदयं भगवान्ब्रह्मा पुंस्त्वं वै कश्यपो मुनिः ५० पृष्ठेऽस्य वसवो देवा मरुतः पादसन्धिषु । सर्वच्छंदांसि दशना ज्योतींषि विमलाः प्रभाः ५१ ऊरू रुद्रो महादेवो धैर्यं चास्य महार्णवः । उदरे चास्य गंधर्वा भुजगाश्च महाबलाः ५२ लक्ष्मीर्मेधा धृतिः कान्तिः सर्वविद्या च वै कटिः । ललाटमस्य परमं स्थानं च परमात्मनः ५३ सर्वज्योतींषि यानीह तपःशक्रस्तु देवराट् । तस्य देवाधिदेवस्य तेजो ह्याहुर्महात्मनः ५४ स्तनौ कक्षौ च वेदाश्च ओष्ठौ चास्य मखाः स्थिताः । इष्टयः पशुबन्धाश्च द्विजानां चेष्टितानि च ५५ तस्य देवमयं रूपं दृष्ट्वा विष्णोर्महासुराः । अभिसर्पन्त संक्रुद्धाः पतंगा इव पावकम् ५६ [ ३३४६ ] इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० वामनप्रादुर्भावे एकसप्ततितमोऽध्यायः ॥ ७१ ॥

वैशंपायन उवाच ॥ शृणु नामानि सर्वेषां रूपाण्यभिजनानि च । आयुधानि च मुख्यानि दानवानां महात्मनाम् १ विप्रचित्तिः शिबिः शंकरयः शंकुस्तथैव च । अयःशिरा अश्वशिरा हयग्रीवश्च वीर्यवान् २ वेगवान्केतुमानुग्रः सोग्रव्यग्रो महासुरः । पुष्करः पुष्कलश्चैव साऽश्वो श्वपतिरेव च ३ प्रह्लादोऽश्वशिराः कुंभः संह्लादो गगनप्रियः । अनुन्हादो हरिहरौ वाराहः संहरोऽरुजः ४ वृषपर्वा विरूपाक्षो अतिचन्द्रः सुलोचनः । निष्प्रभः

---

दाखविलें. ) विदिशा ( आग्नेयादि उपदिशा ) हेच त्याचे बाहु होते. त्याचप्रमाणें दिशा हें त्याचें श्रवणेंद्रिय, अश्विनीकुमार हेच कान; महाबलवान् वायु हेंच नाक ४७. चंद्रमा हाच प्रसाद, धर्म हेंच मन, व सत्य हीच याची वाणी झाली. देवी सरस्वती हीच त्याची जिह्वा ४८. महादेवी अदिति ही ग्रीवा, दीप्तिमान् सूर्य ही तालु, स्वर्गाचें द्वार हीच नाभि, व मित्र आणि त्वष्टा या दोन भुवया होत ४९. त्याचें वैश्वानर हेंच मुख, प्रजापति हे वृषण, भगवान् ब्रह्मा हें हृदय, व कश्यपमुनि हें पुरुषत्व होय ५०. त्याच्या पृष्ठभागीं वसुदेव होते. पादसंधीमध्यें मरुत् होते. सर्व छंद हेंच त्याचे दांत होत. ज्योति याच त्याच्या विमलप्रभा ५१. महादेव व रुद्र याच ज्याच्या मांड्या व महासागर हेंच धैर्य होतें, त्याच्या उदरांत गंधर्व व महाबल भुजंग होते ५२. लक्ष्मी, मेधा, धृति, कांति व सर्व विद्या ही त्याची कटी होय. परम स्थान हेंच या परमात्म्याचें ललाट होय. येथें ज्या ज्योति दिसत आहेत तेंच तप, व देवराज इंद्र हेंच त्या देवाधिदेवाचें तेज होय, असें महात्मे ह्मणतात ५३,५४. वेद हेच त्याचे स्तन व खांदे आहेत. मख हे त्याचे ओष्ठ होऊन राहिले आहेत. इष्टि, पशुबंध, व ब्राह्मणांच्या चेष्टा हे सुद्धां त्याचे मुखसंबंधीं भागच आहेत ५५. असो; अशाप्रकारचें तें विष्णूचें देवमय रूप पाहून अतिशय क्रुद्ध झालेले महाअसुर, अग्नीवर जसे पतंग, त्याप्रमाणें त्याच्या अंगावर धांवले ५६. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वामनप्रा० एकहत्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७१ ॥

वैशंपायनः—त्याच्या अंगावर धावून गेलेल्या सर्व महात्म्या दानवांचीं नांवें, कुळें, रूपें व मुख्य आयुधें मी सांगतों तीं ऐक १. विप्रचित्ति, शिबि, शंकु, अयःशंकु, अयःशिरा, अश्वशिरा, वीर्यवान् हयग्रीव २, उग्र व वेगवान् केतुमान्, महाअसुर सोग्रव्यग्र, पुष्कर, पुष्कल, साश्व, अश्वपति ३, प्रन्हाद, अश्वशिरा, कुंभ, संन्हाद, गगन-

सुप्रभः श्रीमांस्तथैव च निरूदरः ५ एकवक्रो महावक्रो द्विवक्रः कालसंनिभः । शरभः शलभश्चैव कुणपः कुलपः क्रथः ६ बृहत्कीर्तिर्महागर्भः शंकुकर्णो महाध्वनिः । दीर्घजिह्वोऽर्कवदनो मृदुबाहुर्मृदुप्रियः ७ वायुर्गविष्टो नमुचिः शंबरो विक्षरो महान् । चन्द्रहन्ता क्रोधहन्ता क्रोधवर्धन एव च ८ कालकः कालकाक्षश्च वृत्रः क्रोधो विमोक्षणः । गरिष्टश्च हविष्टश्च प्रलंबो नरकः पृथुः ९ इन्द्रतापनवातापी केतुमान्बलदर्पितः । असिलोमा पुलोमा च बाष्कलः प्रमदो मदः १० शृगालवदनश्चैव करालः केशिरेव च । एकाक्षश्चैकबाहुश्च तुहुण्डः सृमलः सृपः ११ एते चान्ये च बहवः क्रममाणं त्रिविक्रमम् । उपतस्थुर्महात्मानं विष्णुं दैत्यगणास्तदा १२ प्रासोद्यतकराः केचिद्व्यादितास्याः खरस्वनाः । शतघ्नी चक्रहस्ताश्च वज्रहस्तास्तथापरे १३ खड्गपट्टिशहस्ताश्च परश्वधधराः परे । प्रासमुद्गरहस्ताश्च तथापरिघपाणयः १४ महाशनिव्यग्रकरा मौशलास्तु महाबलाः । महावृक्षोद्यतकरास्तथैवचधनुर्धराः १५ गदाभुशुंडिहस्ताश्च वज्रहस्तास्तथापरे । महापट्टिशहस्ताश्च तथा परिघपाणयः १६ असिकंपनहस्ताश्च दानवा युद्धदुर्मदाः । नानाप्रहरणा घोरा नानावेषा महाबलाः १७ कूर्मकुक्कुटवक्राश्च हस्तिवक्रास्तथा परे । खरोष्ट्रवदनाश्चैव वराहवदनास्तथा १८ भीमा मकरवक्राश्च शिशुमारमुखास्तथा । मार्जारशुकवक्राश्च दीर्घवक्राश्च दानवाः १९ मरु-

---

प्रिय, अनुऱ्हाद, हरि व हर, वाराह, संहर, अरुज ४, वृषपर्वा, विरूपाक्ष, अतिचंद्र, सुलोचन, निष्प्रभ, सुप्रभ, श्रीमान्, तसाच निरूदर ५, एकवस्त्र, महावस्त्र, द्विवस्त्र, कालसंनिभ, शरभ, शलभ, कुणप, कुलप, क्रथ ६, बृहत्कीर्ति, महागर्भ, शंकुकर्ण, महाध्वनि, दीर्घजिह्व, अर्कवदन, मृदुबाहु, मृदुप्रिय ७, वायु, गविष्ठ, नमुचि, शंबर, विक्षर, महान्, चंद्रहंता, क्रोधहंता, क्रोधवर्धन ८, कालक, कालकाक्ष, वृत्र, क्रोध, विमोक्षण, गरिष्ठ, हविष्ठ, प्रलंब, नरक, पृथु, इंद्रतापनवातापी, केतुमान्, बलदर्पित, असिलोमा, पुलोमा, बाष्कल, प्रमद, मद ९,१०, शृगालवदन, कराल, केशि, एकाक्ष, एकबाहु, तुहुंड, सृमल, सृप ११, हे व असेच दुसरेही अनेक दानव तीन पावलें चालून जाणाऱ्या त्या महात्या विष्णूच्या समीप येऊन उभे राहिले १२. त्यांतील कित्येकांनीं आपल्या हातांत प्रास उठविले होते. कित्येकांनीं आपापलीं तोंडें पसरलीं होतीं. त्यांचें आवाज गाढवांच्या स्वनासारखे कर्कश होते. कित्येकांच्या हातांत शतघ्नी व चक्रें होतीं. त्याचप्रमाणें दुसऱ्या कित्येकांनीं आपल्या हातांत वज्रें घेतलीं होतीं १३. कांहीं आपल्या हातांत खड्ग व पट्टे घेतलेले, दुसरे कित्येक परशु धारण करणारे, प्रास, मुद्गर, परिघ यांनीं ज्यांचे हात भूषित झाले आहेत१४ ज्यांचे हात महा अशनींनीं व्यग्र झाले आहेत, ज्या महाबलाढ्यांनीं मुसळें उचललीं आहेत, ज्यांनीं आपल्या हातांत मोठाले वृक्ष उचलले आहेत, तसेच धनुर्धर १५, गदा, भुशुंडी, वज्र, महापट्टे, परिघ इत्यादि ज्यांच्या हातांत आहेत व युद्धांचा ज्यांना दुर्मद आहे, असे अनेक दानव हातांत तरवारी घेऊन त्यांच्यासह हात हालवीत त्यांच्या सभोंवार जमले. त्यांच्या हातांत अनेक प्रकारचीं आयुधें होतीं. ते घोर, नाना वेष घेतलेले व महाबलवान् होते १६,१७. त्यांतील कित्येकांचीं तोंडें कूर्म व कुक्कुट यांच्या तोंडासारखीं होतीं. कित्येकांचीं हत्तींच्या तोंडासारखीं, कित्येकांचीं गाढव व उंट यांच्या तोंडासारखीं व वराहांच्या तोंडासारखीं तोंडें होतीं १८. कित्येक भयंकर दानवांचीं तोंडें मकराच्या व शिशुमार माशांच्या तोंडासा-

ङाननाःखड्गमुखामयूर वदनास्तथा । अश्ववक्त्रा बभ्रुवक्त्रा घोरा मृगमुखास्तथा २०
उष्ट्रशल्यकवक्त्राश्च दीर्घवक्त्राश्च दानवाः । नकुलस्येव वक्त्राश्च पारावतमुखास्तथा २१
चक्रवाकमुखाश्चैव गोधावक्त्रास्तथापरे । तथा मृगाननाः शूरा गोजादिमहिषाननाः २२
कृकलासमुखाश्चैव व्याघ्रवक्त्रास्तथापरे । ऋक्षशार्दूलवक्त्राश्च सिंहवक्त्रास्तथापरे २३ गजें-
द्रचर्मवसनास्तथा कृष्णाजिनांबराः । चीरसंवृतगात्राश्च तथा फलकवाससः २४ उष्णी-
षिणो मुकुटिनस्तथा कुंडलिनोऽसुराः । किरीटिनो लंबशिखाः कंबुग्रीवाः सुवर्चसः २५
नानावेषधरा दैत्या नानामाल्यानुलेपनाः । स्वान्यायुधानि दीप्तानि प्रगृह्यासुरसत्तमाः २६
क्रममाणं हृषीकेशमुपतिष्ठन्त दानवाः । प्रमथ्य सर्वान्दैतेयान्पादहस्ततलैः प्रभुः २७ रूपं
कृत्वा महाकायं जहाराशु स मेदिनीम् । त्रैलोक्यं क्रममाणस्य द्युतिरादित्यसंभवा २८
तस्य विक्रमतो भूमिं चंद्रादित्यौ स्तनान्तरे । नभः प्रक्रममाणस्य सक्थिदेशे व्यवस्थितौ ॥
परं विक्रममाणस्य जानुदेशे व्यवस्थितौ २९ ।विष्णोरमितवीर्यस्य वदंत्येवं द्विजातयः ।
जित्वा लोकत्रयं कृत्स्नं हत्वा चासुरपुंगवान् ३० ददौ शक्राय वसुधां हरिर्लोकनमस्कृतः ।
सुतलं नाम पातालमधस्ताद्वसुधातले ३१ बलेर्दत्तं भगवता विष्णुना प्रभविष्णुना । तदवा-

---

रखीं होतीं. कित्येकांचीं तोंडें मांजरासारखीं होतीं, पोपटांसारखीं होती व कांहीं दानवांचीं आननें फार लांब होतीं १९. कांहीं दैत्यांचीं तोंडें गरुडासारखीं होतीं, कांहींचीं गेंड्यांसारखीं होतीं, कित्येक मयूरमुख होते. कित्येक अश्वमुख, बभ्रुमुख, घोर मृगमुख २०, उष्ट्रमुख, शल्यमुख, व दीर्घमुख दानव होते २१. त्यांतील कित्येकांचीं मुखें मुंगुसासारखीं, पारव्यासारखीं, चक्रवाक पक्ष्यांच्या मुखासारखीं, घोरपडीसारखीं, हरिणासारखीं, गायी, म्हशी व बकऱ्या यांसारखीं २२. सरड्यांसारखीं, व्याघ्रांसारखीं, अस्वलें व सिंह यांच्या तोंडासारखीं होतीं २३. कित्येकांनीं मोठ्या हत्तीचें चर्म नेसलें होतें. कित्येकांनीं कृष्णाजिनें परिधान केलीं होतीं. कांहीं दैत्यांनीं लंगोटे घातले होते. व कांहींनीं लांकडांच्या पातळ फळ्यांनींच लज्जेचें संरक्षण केलें होतें २४. कांहीं असुरांनीं मस्तकावर पागोटीं घातलीं होतीं. मुकुट घातले होते. व कानांत कुंडलें घातलीं होतीं. कित्येकांनीं केंसांचेच बांधून मुकुट केले होते. व कांहींनीं ते पाठीवर लोंबत सोडले होते. कित्येकांच्या ग्रीवा शंखासारख्या आवर्तयुक्त असून ते सर्व अतिशय तेजस्वी होते २५. सर्व उत्तम दैत्य नानावेष धारण करणारे, नानाप्रकारच्या माळा व अनुलेपन यांनीं भूषित झालेले, व आपापलीं दीप्त आयुधें हातांत घेतलेलें होते २६. ते पावलें टाकणाऱ्या हृषीकेशापाशीं त्याला प्रतिबंध करण्याच्या इच्छेनें आले; पण पाय व तळहात यांनीं सर्व दैत्यांचें मंथन करून व आपलें रूप फारच मोठें करून त्या प्रभूनें पृथ्वीचें हरण केलें. त्रैलोक्यामध्यें पावलें टाकीत जाणाऱ्या त्याची कांति आदित्यासारखी प्रखर झाली २७,२८ चंद्र व सूर्य भूमीवर पाऊल ठेवणाऱ्या अमित वीर्यवान् विष्णूच्या उरःस्थलापाशीं पोंचत होते. पण भुवर्लोकांत दुसरें पाऊल टाकणाऱ्या त्याच्या मांड्यापर्यंत ते आले. व तेच दोघे देव स्वर्गलोकांत तिसरें पाऊल टाकतांना त्याच्या गुडघ्याला लागले, असें ब्राह्मण सांगतात. सारांश याप्रमाणें सर्व त्रिभुवनास जिंकून व असुरश्रेष्ठांस मारून लोकांकडून नमस्कार केला गेलेला हरि इंद्राला पृथ्वी देता झाला. पृथ्वीच्या खालीं सुतल या नांवाचें पाताल आहे २९–३१. प्रभु, होण्याची इच्छा करणाऱ्या भगवान् विष्णूनें तें बलीला दिलें. तें

प्यासुरश्रेष्ठश्चकार मतिमुत्तमाम् ३२ रसातलतले वासमकरोदसुराधिपः । तत्रस्थश्च महातेजा ध्यानं परममास्थितः ३३ उवाच वचनं धीमान्विष्णुं लोकनमस्कृतम् । किं मया देव कर्तव्यं ब्रूहि सर्वमशेषतः ॥ ततो दैत्याधिपं प्राह देवो विष्णुः सुरोत्तमः ३४ विष्णुरुवाच ॥ ददामि ते महाभाग परितुष्टोऽस्मि तेऽसुर ॥ वरं वरय भद्रं ते यथेष्टं काममाप्नुहि ३५ मा च शक्रस्य वचनं प्रतिहासीः कथंचन । अहमाज्ञापयामि त्वां श्रेयश्चैवमवाप्स्यसि ३६ अथ दैत्याधिपं प्राह विष्णुर्देवाधिपानुजः । वाचा परमया देवो वरेण्यः प्रभुरीश्वरः ३७ यत्त्वया सलिलं दत्तं गृहीतं पाणिना मया । तस्मात्ते दैत्य देवेभ्यो नास्ति जातु भयं क्वचित् ३८ सुतलं नाम पातालं तत्र त्वं सानुगो वस । सर्वदैत्यगणैः सार्धं मत्प्रसादान्महासुर ३९ न च ते देवदेवस्य शक्रस्यामिततेजसः । शासनं प्रतिहंतव्यं स्मरता शासनं मम ४० देवताश्चापि ते सर्वाः पूज्या एव महासुर । भोगांश्च विविधान्सम्यक्यज्ञांश्च सहदक्षिणान् ४१ प्राप्स्यसे च महाभाग दिव्यान्कामान्यथेप्सितान् । इह चामुत्र चाक्षय्यान्विविधांश्च परिच्छदान् ४२ दैत्याधिपत्यं च सदा मत्प्रसादादवाप्स्यसि । यदा चैतां मया प्रोक्तां मर्यादां चालयिष्यसि । बधिष्यन्ति तदा हि त्वां नागपाशैर्महाबलाः ४३ नमस्कार्याश्च ते नित्यं महेंद्राद्या दिवौकसः । मम ज्येष्ठः सुरश्रेष्ठः शासनं प्रतिगृह्यताम् ४४ बलिरुवाच ॥ देवदेव महाभाग शंखचक्रगदाधर । सुरासुरगुरो श्रेष्ठ सर्वलोकमहेश्वर । तत्रासतो मे पाताले भागं ब्रूहि सुरोत्तम ४५ समान्नमशनं देव प्राशनार्थमरिंदम । तद्दस्व सुरश्रेष्ठ तृप्तिर्येन ममा-

---

घेऊन असुरश्रेष्ठानें उत्तम मति केली ३२. त्या असुरेश्वरानें रसातळाच्या तळावर वास केला. तेथें राहून त्या महातेजस्वी दैत्यानें परम ध्यान केलें ३३. त्यानंतर महा प्राज्ञ दैत्यराज बलि लोकनमस्कृत विष्णूला ह्मणाला, ' देवा, मी आतां काय करावें, तें पूर्णपणें मला सांग. ' त्यावर देवांतील उत्तम देव विष्णु त्या दैत्याधिपास असें बोलला ३४. विष्णुः—हे महाभाग्या, बा असुरा, मी तुजवर प्रसन्न आहें. यास्तव इष्ट वर माग. मी तो देतों. तुझें कल्याण होवो. यथेष्ट कामनेस प्राप्त हो ३५. इंद्राचें वचन कांहीं झालें तरी मोडूं नको ही मी तुला आज्ञा करितों. असें केल्यानें तुझें कल्याण होईल ३६. नंतर पुनरपि सर्वांस सेवा करण्यास योग्य असलेला प्रभु, ईश्वर, देव, देवेंद्राचा अनुज विष्णु दैत्याधिपास परम वाणीनें ह्मणाला ३७. ' बा दैत्या, ज्याअर्थी तूं मला जल दिलेंस व मीं आपल्या हातानें घेतलें त्याअर्थी तुला देवांपासून केव्हांही भय नाहीं ३८. सुतल या नांवाचें जें पाताल आहे त्यांत तूं आपल्या अनुयायांसह रहा. हे महा असुरा, माझ्या कृपेनें तूं तेथें सर्व दैत्यगणांसह सुखानें रहाशील ३९. माझ्या आज्ञेचें स्मरण ठेवून तूं अमित तेजस्वी देवाधिदेव इंद्राचें आज्ञावचन उल्लंघूं नयेस ४०. हे महा असुरा, तुला सर्व देवता पूज्यच आहेत. नानाप्रकारचे भोग, दक्षिणायुक्त उत्तम यज्ञ, व यथेष्ट दिव्य काम तुला प्राप्त होतील ४१. ऐहिक व पारलौकिक अक्षय्य नानाप्रकारचीं उपकरणें, आणि दैत्यांचें आधिपत्य माझ्या अनुग्रहामुळें तुला सदा प्राप्त होईल. मी घालून दिलेली ही मर्यादा जेव्हां तूं तोडशील तेव्हां महाबलाढ्य देव तुला नागपाशांनीं मारतील ४२,४३. महेंद्रादि सर्व देव तुला नेहमीं नमस्कार करण्यास योग्य आहेत. तो सुरश्रेष्ठ तर माझ्याहूनही ज्येष्ठ आहे. यास्तव हें माझें शासन तूं मान्य कर ४४. बलिः—हे देवदेवा, महाभागा, शंख–चक्र–गदाधरा, हे सुरासुर गुरो,

क्षया ४६ श्रीभगवानुवाच ॥ अश्रोत्रियं श्राद्धमधीतमव्रतमदक्षिणं यज्ञमनृत्विजाहुतम् । अश्रद्धया दत्तमसंस्कृतं हविरेते प्रदत्तास्तव दैत्य भागाः ४७ पुण्यं मद्द्वेषिणां यच्च मद्भक्तद्वेषिणां तथा । क्रयविक्रयसक्तानां पुण्यं यच्चाग्निहोत्रिणाम् ४८ अश्रद्धया च यद्दानं ददतां यजतां तथा । तत्सर्वं तव दैत्येन्द्र मत्प्रसादाद्भविष्यति ४९ वैशंपायन उवाच ॥ एतच्छ्रुत्वा तु वचनं बलिर्विष्णोर्महात्मनः । एवमस्त्विति तं प्रोक्त्वा पातालमसुरोत्तमः ५० प्रविवेश महाभागो देवाज्ञां प्रतिपालयन् । भगवानपि राज्यस्य प्रविभागांश्चकार ह ५१ ददौ पूर्वां दिशं चैन्द्रीं शक्रायामिततेजसे । याम्यां यमाय देवाय पितृराज्ञे महात्मने ५२ पश्चिमां तु दिशं प्रादाद्वरुणाय महात्मने । उत्तरां च कुबेराय यक्षाधिपतये दिशम् ५३ अधःस्थां नागराजाय सोमायोर्ध्वां दिशं ददौ । एवं विभज्य त्रैलोक्यं विष्णुर्बलवतां वरः ५४ जगाम त्रिदिवं देवः पूज्यमानो महर्षिभिः । वामनः सर्वभूतेशः प्रतिष्ठाप्य च वासवम् ५५ तस्मिन्प्रयाते दुर्धर्षे वामनेऽमिततेजसि । सर्वे मुमुदिरे देवाः पुरस्कृत्य शतक्रतुम् ५६ वैशंपायन उवाच ॥ गते तु त्रिदिवं कृष्णे बध्वा वैरोचनिं बलिम् । नागैः सप्तशिरोभिश्च कंबलाश्वतरादिभिः ५७ नागबन्धनदुःखार्तं बलिं वैरोचनिं ततः । यदृच्छयाऽसौ देवर्षिर्नारदः प्रत्यपद्यत ५८ स तं कृच्छ्रगतं दृष्ट्वा कृपयाभिपरिप्लुतः । उवाच दानवश्रेष्ठं मोक्षोपायं ददामि

---

हे श्रेष्ठा, हे सर्व लोक महेश्वरा, हे उत्तम देवा, तेथें पाताळांत रहाणाऱ्या माझा भाग कोणता तें सांग. हे सुरश्रेष्ठा, देवा, हे शत्रूंचें दमन करणाऱ्या, माझें खावयाचें अन्न, व प्राशन करावयास योग्य पेय कोणतें तें मला सांग. ह्मणजे त्याच्या योगानें माझी अक्षय तृप्ति होईल ४५,४६. श्रीभगवान्:– हे दैत्या, श्रोत्रियावाचून अर्पण केलेलें श्राद्ध, व्रतावाचून केलेलें अध्ययन, दक्षिणारहित यज्ञ, ऋत्विज नसलेल्या पुरुषानें हवन केलेलें द्रव्य, अश्रद्धेनें दिलेलें दान, व संस्कार न केलेला हवि, हे भाग मी तुला दिले आहेत ४७. माझा द्वेष करणारांचें व माझ्या भक्तांचा द्वेष करणारांचें जें पुण्य, क्रय— विक्रयामध्यें आसक्त असलेल्या अग्निहोत्र्यांचें जें पुण्य, दानें देणाऱ्या व यज्ञ करणाऱ्या लोकांचें अश्रद्धेनें केलेलें जें दान व यजन तें सर्व माझ्या प्रसादानें तुला प्राप्त होईल ४८,४९. वैशंपायनः— महात्म्या विष्णूचें हें वचन ऐकून असुरोत्तम बलि ‘ बरें आहे ’ असें ह्मणून पातालांत गेला ५०. तो महाभाग देवांच्या आज्ञेचें प्रतिपालन करीत पातालांत प्रविष्ट झाला. नंतर भगवानानेंही राज्याचे विभाग केले ५१. त्यानें इंद्राची पूर्व दिशा अमिततेजस्वी इंद्राला परत दिली. दक्षिणदिशा पितृराज महात्म्या यमदेवाला अर्पण केली ५२. पश्चिमदिशा महात्म्या वरुणाच्या स्वाधीन केली. उत्तरदिशा यक्षाधिपति कुबेराच्या हवालीं केली ५३. त्यानें अधःस्थ दिशा नागराजाला व ऊर्ध्वदिशा सोमाला दिली. याप्रमाणें त्रैलोक्याचा विभाग करून बलवानांतील श्रेष्ठ विष्णु देव महर्षींकडून पूजला जात स्वर्गास गेला. इंद्राची त्रैलोक्याच्या राज्यावर स्थापना करून सर्व भूतांचा ईश वामन स्वलोकीं गेला. अतितेजस्वी दुर्धर्ष वामन निघून गेला असतां इंद्राला पुढें करून ( ह्म० इंद्रासह ) सर्व देव अतिशय आनंदित झाले ५४–५६. वैशंपायनः—येणेंप्रमाणें ज्यांना सात मस्तकें आहेत अशा कंबल अश्वतरादिनागांनीं वैरोचनि बलीला बांधवून कृष्ण स्वर्गाला गेला असतां एकेदिवशीं नारद महर्षि सहज भ्रमण करितां करितां नागबंधनांनीं दुःखित झालेल्या त्या विरोचनपुत्र बलीपाशीं आला ५८. तो मोठ्या संकटांत

ते ५९ स्तवंदेवाधिदेवस्यवासुदेवस्यधीमतः । अनादिनिधनस्यास्य अक्षयस्याव्ययस्य च ६०
तमधीष्वाथ दैत्येन्द्र विशुद्धेनान्तरात्मना । तद्गतस्तन्मना भूत्वा द्रुतं मोक्षमवाप्स्यसि ६१
ततो विरोचनसुतः प्रयतः प्रांजलिः शुचिः । मोक्षविंशकमव्यग्रो नारदात्समधीतवान् ६२
तमधीत्य स्तवं दिव्यं नारदेन समीरितम् । पृथिवी चोद्धृता येन तं जजाप महासुरः ६३
ॐनमोस्त्वनन्तपतये अक्षयाय महात्मने । जलेशयाय देवाय पद्मनाभाय विष्णवे ६४
सप्तसूर्यवपुःकृत्वा त्रीँलोकान् क्रान्तवानसि । भगवान्काळकालस्त्वं तेन सत्येन मोक्षय ६५
नष्टचंद्रार्कगगने क्षीणयज्ञतपःक्रिये । पुनश्चिंतयसे लोकांस्तेन सत्येन मोक्षय ६६ ब्रह्मरु-
द्रेंद्रवाय्वग्निसरिद्भुजगपर्वताः । त्वत्स्था दृष्टा द्विजेंद्रेण तेन सत्येन मोक्षय ६७ मार्कंडेन पुरा-
कल्पे प्रविश्य जठरं तव । चराचरगतं दृष्टं तेन सत्येन मोक्षय ६८ एको विद्यासहायस्त्वं
योगी योगमुपागतः । पुनस्त्रैलोक्यमुत्सृज्य तेन सत्येन मोक्षय ६९ जलशय्यामुपासीनो
योगनिद्रामुपागतः । लोकांश्चिन्तयसे भूयस्तेन सत्येन मोक्षय ७० वाराहं रूपमास्थाय
वेदयज्ञपुरस्कृतम् । धरा जलोद्धृता येन तेन सत्येन मोक्षय ७१ उद्धृत्य दंष्ट्रया यज्ञांस्त्रीन्-
पिंडान्कृतवानसि । त्वं पितॄणामपि हरे तेन सत्येन मोक्षय ७२ प्रदुद्रुवुः सुराः सर्वे हिर-
ण्याक्षभयार्दिताः । परित्रातास्त्वया देव तेन सत्येन मोक्षय ७३ दीर्घवक्त्रेण रूपेण हिरण्या-

---

पडला आहे असें पाहून त्या मुनीच्या मनांत कृपेचा प्रादुर्भाव झाला व तो त्या श्रेष्ठ दानवाला ह्मणाला, " मी तुला यांतून सुटण्याचा उपाय सांगतों. देवाधिदेव, धीमान्, आदि-अंतरहित, अक्षय व अव्यय वासुदेवाचा स्तव ( स्तुति, स्तोत्र ) करणें हाच या संकटांतून मुक्त होण्याचा उपाय आहे ५९,६०. यास्तव, मी आतां सांगतों त्या स्तवाचें हे दैत्येंद्रा, सर्व मनोवृत्ति त्याच्या ठिकाणीं लावून अतिशय शुद्ध चित्तानें अध्ययन कर. ह्मणजे तूं सत्वर मुक्त होशील " ६१. नारदाचें हें भाषण होऊन विरोचन पुत्र पवित्र झाला व हात जोडून शुद्ध व अव्यग्र मनानें नारदापासून मोक्षविंशक नांवाचा स्तव शिकला ६२ नारदानें सांगितलेल्या त्या दिव्य स्तवाचें अध्ययन करून ज्यानें पृथ्वीचा उद्धार केला त्याला उद्देशून महाअसुरानें त्या स्तवाचा जप केला ६३. ॐ, अनंतपति, अक्षय, महात्म्या, जलेश, पद्मनाभ, विष्णुदेवास नमस्कार असो ६४. सात सूर्यासारखें शरीर करून तूं तीन लोकांचें आक्रमण केलें आहेस. तूं भगवान् कालकाल आहेस. यास्तव त्याच सत्यानें मला सोडीव ६५. आकाश चंद्र व सूर्य यांनीं रहित झालें असतां, यज्ञ-क्रिया व तपःक्रिया क्षीण झाल्या असतां, तूं पुनः लोकांचें चिंतन करतोस त्या सत्यानें मला सोडीव ६६. ब्रह्मा, रुद्र, इंद्र, वायु, अग्नि, नदी, भुजंग, पर्वत इत्यादि सर्व तुझ्या ठिकाणींच स्थित आहेत, असें ब्राह्मणश्रेष्ठ ब्रह्मदेवानें पाहिलें. त्या सत्यानें मला सोडीव ६७. पूर्वकल्पामध्यें मार्कंडेयानें तुझ्या जठरांत प्रवेश करून चराचर पदार्थ पाहिले. त्या सत्यानें मला सोडीव ६८. ज्याला विद्येचें सहाय आहे तो एक योगी पुनः त्रैलोक्याचा त्याग करून योगास प्राप्त झाला. या सत्यानें मला मुक्त कर ६९. जलशय्येवर पडून योगनिद्रेस प्राप्त झालेला तूं वारंवार लोकांचें चिंतन करितोस. त्या सत्यानें मला सोडीव ७०. वेद व यज्ञ यांनीं पुरस्कृत असें वाराहरूप घेऊन ज्याच्या योगानें जलांत असलेल्या पृथ्वीचा तूं उद्धार केलास त्या सत्यानें मला सोडीव ७१. हे हरे, तूं दंष्ट्रेनें यज्ञांचा उद्धार करून पितरांचे तीन पिंड नियत केले आहेस. त्या सत्यानें मला मुक्त कर ७२. हे देवा, सर्व

क्षस्य संयुगे । शिरो जहार चक्रेण तेन सत्येन मोक्षय ७४ भग्नमूर्द्धास्थिमस्तिष्को हिरण्यकशिपुः पुरा । हुंकारेण हतो दैत्यस्तेन सत्येन मोक्षय ७५ दानवाभ्यां हृता वेदा ब्रह्मणः पश्यतः पुरा । परित्रातास्त्वया देव तेन सत्येन मोक्षय ७६ कृत्वा हयशिरोरूपं हत्वा तु मधुकैटभौ । ब्रह्मणे तेऽर्पितावेदास्तेन सत्येन मोक्षय ७७ देवदानवगन्धर्वा यक्षसिद्धा महोरगाः । अन्तं तव न पश्यन्ति तेन सत्येन मोक्षय ७८ अपांतरतमा नाम जातो देवस्य वै सुतः । कृताश्च तेन वेदार्थास्तेन सत्येन मोक्षय ७९ वेदयज्ञाग्निहोत्राणि पितृयज्ञहवींषि च । रहस्यं तव देवस्य तेन सत्येन मोक्षय ८० ऋषिर्दीर्घतमा नाम जात्यन्धो गुरुशापतः । त्वत्प्रसादाच्च चक्षुष्मांस्तेन सत्येन मोक्षय ८१ ग्राहग्रस्तं गजेन्द्रं च दीनं मृत्युवशं गतम् । भक्तं मोक्षितवांस्त्वं हि तेन सत्येन मोक्षय ८२ अक्षयश्चाव्ययश्चैव ब्रह्मण्यो भक्तवत्सलः । उच्छ्रितानां नियन्तासि तेन सत्येन मोक्षय ८३ शंखं चक्रं गदां पद्मं शार्ङ्गं गरुडमेव च । प्रसादयामि शिरसा ते बन्धान्मोक्षयन्तु माम् ८४ शंखचक्रगदातूणशार्ङ्ग च गरुडादयः । प्रसादयामासुर्हरिं बलिं मोक्षय बन्धनात् ८५ ततः प्रसन्नो भगवानादिदेश खगेश्वरम् । गरुडं नागहन्तारं बलिं मोक्षय बन्धनात् ८६ ततोविक्षिप्यगरुडःपक्षावतुलविक्रमः । जगाम वसुधामूलं यत्रास्ते संयतो बलिः ८७ आगमं तस्य विज्ञाय नागा मुक्त्वा महासुरम् । ययुः

---

देव हिरण्याक्षाच्या भयानें व्याकुळ होऊन पळाले. पण तूं त्यांचें त्राण केलेंस. त्या सत्यानें मला सोडीव ७३. ज्याचें मुख दीर्घ आहे अशा रूपानें तूं संग्रामांत आपल्या चक्रानें हिरण्याक्षाचें मस्तक तोडलेंस. त्या सत्यानें मला सोडीव ७४. पूर्वी तूं नुसत्या हुंकारानेंच ज्याचें मस्तक, हाडें व मस्तिष्क फुटला आहे अशा हिरण्यकशिपु दैत्याला मारलेंस, त्या सत्यानें माझी सुटका कर ७५. पूर्वी त्या दोघां दानवांनीं ब्रह्मदेवाच्या समक्ष वेदांचें हरण केलें. पण हे देवा, तूं त्यांचें परिरक्षण केलेंस. त्या सत्यानें मला सोड ७६. हयग्रीवरूप करून तूं मधुकैटभ दैत्यांना मारलेंस. व वेद ब्रह्मदेवाला परत दिलेस. त्या सत्यानें मला सोडीव ७७. देव, दानव, गंधर्व, यक्ष, सिद्ध, महोरग, तुझा अंत जाणत नाहींत. त्या सत्यानें मला सोडीव ७८. अपान्तरतमा नामक देवाचा पुत्र झाला. त्यानें वेदांचा अर्थ केला. त्या सत्यानें तूं मला सोड ७९. वेद, यज्ञ, अग्निहोत्रें, पितृयज्ञ व हवी हें तुज देवाचें रहस्य आहे. त्या सत्यानें मला सोडीव ८०. दीर्घतमा नांवाचा ऋषि गुरूच्या शापामुळें जात्यन्ध ( जन्मतः अंध ) झाला. पण तुझ्या प्रसादानें तो नेत्रवान् झाला. यास्तव, त्या सत्यानें तूं मला सोडीव ८१. नक्रानें ज्याला ग्रासलें आहे अशा दीन व मृत्युवश झालेल्या गजेंद्रास, तो तुझा महाभक्त होता ह्मणून तूं सोडविलेंस. त्याच सत्यानें मलाही सोडीव ८२. तूं अक्षय, अव्यय, ब्राह्मणप्रिय, भक्तवत्सल व दृप्त लोकांचा नियन्ता आहेस. त्या सत्यानें माझें रक्षण कर ८३. शंख, चक्र, गदा, पद्म, शार्ङ्ग व गरुड यांना मी मस्तक नम्र करून प्रसन्न करितों. ते मला बंधांतून सोडवोत ८४. तेव्हां शंख, चक्र, गदा, तूणीर, शार्ङ्ग व गरुडादिक 'बलीला बंधनांतून मुक्त कर,' अशी हरीची प्रार्थना करूं लागले ८५. त्यानंतर प्रसन्न झालेला भगवान् नागांचा नाश करणाऱ्या पक्षीश्वर गरुडास, 'बलीला बंधनांतून सोडीव' अशी आज्ञा करिता झाला ८६. त्याबरोबर अतुल पराक्रमी गरुड आपले पंख हालवीत जेथें बलि प्रतिबद्ध होऊन राहिला होता तेथें भूमीच्या खालीं गेला ८७. त्याचें आगमन कळ-

पुरीं भोगवतीं वैनतेयभयार्दिताः ८८ मुक्तं कृष्णप्रसादेन चिन्तयानमधोमुखम् । भ्रष्टश्रियमुवाचेदं गरुत्मान्पन्नगाशनः ८९ गरुड उवाच ॥ दानवेंद्र महाबाहो विष्णुस्त्वामब्रवीत्प्रभुः । मुक्तो निवस पाताले सपुत्रजनबान्धवः ९० इतस्त्वया न गंतव्यं गव्यूतिमपि दानव । समयं यदि भिंद्यास्त्वं मूर्धा ते शतधा भवेत् ९१ पक्षींद्रवचनं श्रुत्वा दानवेंद्रोऽब्रवीदिदम् । स्थितोऽस्मि समये तस्य अनन्तस्य महात्मनः ९२ जीवोपायं तु भगवान्मम किंचित्करोतु सः । इहस्थोऽहं सुखासीनो येनाप्यायै खगेश्वर ९३ बलेस्तु वचनं श्रुत्वा गरुत्मानिदमब्रवीत् । पूर्वमेव कृतस्तेन जीव्योपायो महात्मना ९४ वर्तयिष्यन्ति ये यज्ञा विधिहीना नऋत्विजः । प्रायश्चित्तमजानन्तो यज्ञभागस्ततस्तव ९५ न तेषां यज्ञभागं वै प्रतिगृह्णन्ति देवताः । अनेनाप्यायितबलः सुखमत्रनिवत्स्यसि ९६ वैशंपायन उवाच ॥ संदेशमेतं भगवान्दत्तवान्कश्यपात्मजः । दानवेंद्रं महाबाहो विष्णुस्त्रैलोक्यभावनः ९७ इमंस्तवमनन्तस्य सर्वपापप्रमोचनम् । यः पठेत नरो भक्त्या तस्य नश्यति किल्बिषम् ९८ गोहत्यायाः प्रमुच्येत ब्रह्मघ्नो ब्रह्महत्यया । अपुत्रो लभते पुत्रं कन्याचैवेप्सितं पतिम् ९९ सद्यो गर्भात्प्रमुच्येत गर्भिणी जनयेत्सुतम् । ये च मोक्षैषिणो लोके योगिनः सांख्यकापिलाः १०० स्तवेनानेन गच्छन्ति श्वेतद्वीपमकल्मषाः । सर्वकामप्रदो ह्येषस्तवोऽनंतस्य कीर्त्यते १ यः पठेत्प्रातरुत्थाय शुचिः प्रयतमानसः । सर्वान्कामानवाप्नोति मानवो नात्र संशयः २ एष

---

तांच त्या विनतासुताच्या भयानें व्याकुळ झालेले नाग महा असुरांस सोडून भोगवती नगरीस गेले ८८. तेव्हां कृष्णाच्या प्रसादानें मुक्त झालेला व ऐश्वर्यभ्रष्ट झाल्यामुळें खालीं मान घालून कांहीं चिंतन करणारा जो बलि त्याला सर्पभक्षक गरुड असें बोलूं लागला ८९. गरुडः—हे महाबाहो, दानवेंद्रा, प्रभु विष्णु तुला ह्मणाला आहे कीं, तूं मुक्त होऊन पुत्र, आप्त व बांधव यांसह पातालांत रहा ९०. हे दानवा, तूं येथून दोन कोशही कोठें जाऊं नयेस. हा नियम जर तूं मोडलास तर तुझ्या मस्तकाचे शतधा तुकडे होतील ९१. पक्षिश्रेष्ठाचें हें वचन ऐकून दानवेंद्र ह्मणतोः— त्या महात्म्या अनंताच्या आज्ञेंत मी स्थित आहें ९२. पण तो भगवान् माझा कांहीं जीवोपाय करो. हे खगेश्वरा, येथें असलेला मी ज्याच्या योगानें सुखानें राहीन असें कर ९३. बलीचें तें वचन ऐकून गरुड ह्मणाला, " त्या महात्म्यानें तुझ्या जीवनाचा उपाय पूर्वींच केला आहे ९४. जे ऋत्विज नसलेले व प्रायश्चित्त न जाणणारे लोक विधिहीन यज्ञ करितील त्यांच्यांतून सर्व यज्ञभाग तुझा मिळेल ९५. कारण त्यांचा यज्ञभाग देवता स्वीकारीत नाहींत. असल्या यज्ञभागानें ज्याचें बल वाढलें आहे असा तूं येथें सुखानें रहाशील " ९६. वैशंपायनः— हे महाबाहो जनमेजया, कश्यपपुत्र भगवान् गरुडानें दानवेंद्राला हा संदेश सांगितला. भगवान् विष्णु त्रैलोक्याचें कारण आहे ९७. जो नर मोठ्या भक्तीनें अनंताचा हा सर्व पापापासून सोडविणारा स्तव पढतो त्याचें पाप नष्ट होतें ९८. गोघ्न गोहत्येपासून मुक्त होतो, ब्रह्मघ्न ब्रह्महत्येपासून सुटतो. ज्याला पुत्र नसतो त्याला तो होतो. कन्येला इष्ट पति मिळतो ९९. महा भक्त तत्काळ जन्मांतून मुक्त होतो. गर्भिणी स्त्रीला पुत्र होतो. या लोकीं जे मोक्षाची इच्छा करणारे योगी व सांख्य कापिल असतात ते या स्तवाच्या पाठानें पापरहित होऊन श्वेतद्वीपास जातात. हा अनंताचा स्तव सर्व कामना पूर्ण करणारा आहे, असें सांगितलें जातें १००,१ जो प्रातःकाळीं उठून पवित्र

वै वामनो नाम प्रादुर्भावो महात्मनः । वेदविद्भिर्द्विजैरेव पठ्यते वैष्णवं यशः ३ यस्त्विमं वामनं दिव्यं प्रादुर्भावं महात्मनः । शृणुयान्नियतो भक्त्या सदा पर्वसु पर्वसु ४ पराञ्जिजयते राजा यथा विष्णुमहाबलः । यशो विमलमाप्नोति विपुलं चाश्नुते वसु ५ प्रियो भवति भूतानां सर्वेषां वामनो यथा । पुत्रपौत्राश्च वर्धन्ते आरोग्यं गुणसंपदः ६ प्रीयते पठतश्चास्य देवदेवो जनार्दनः । सर्वकामयुतश्चैव कृष्णद्वैपायनोऽब्रवीत् १०७ [ ३४५३ ]
इति श्रीमहा० खिले० हरि० भवि० वामनप्रादुर्भावो नाम द्विसप्ततितमोऽध्यायः ॥ ७२ ॥

जनमेजय उवाच ॥ किमर्थं भगवान्विष्णुर्देवदेवो जनार्दनः । गतः कैलासशिखरमालयं शंकरस्य च १ नारदाद्यैस्तपोवृद्धैर्मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः । तत्र दृष्टो महादेवः शंकरो नीललोहितः २ केशवेन पुरा विप्र कुर्वता तप उत्तमम् । अर्चितो देवदेवेन शंकरश्चेति नः श्रुतम् ३ देवौ तत्र जगन्नाथौ दृष्टवन्तौ पुरातनौ । अर्चयां चक्रिरे देवा इन्द्राद्याः शंकरं हरिम् ४ तौ हि देवौ महादेवावेकीभूतौ द्विधा कृतौ । एकात्मानौ जगद्योनी सृष्टिसंहारकारकौ ५ परस्परसमावेशाज्जगतः पालने स्थितौ । तयोस्तत्र यथावृत्तं कैलासे पर्वतोत्तमे ६ ऋषयः किमचेष्टन्त दृष्ट्वा तौ पुरुषोत्तमौ । एतत्सर्वमशेषेण वक्तुमर्हसि सत्तम ७ यथा गतोहरिर्विष्णुः कृष्णो जिष्णुः पुरातनः । तथा च शंकरः साक्षात्कृतवान्नागभूषणः । एत-

---

व शुद्धचित्त होऊन याचा पाठ करतो त्या मानवाला सर्व कामभोग प्राप्त होतात यांत संशय नाहीं २. हा त्या महात्म्याचा वामन नांवाचा अवतार आहे. वेदवेत्त्या द्विजांकडूनच विष्णूचें यश गायलें जातें ३. जो राजा महात्म्या भगवानाचा हा दिव्य वामनावतार सदा प्रत्येक पर्वाच्या वेळीं भक्तीनें व नियतचित्तानें ऐकतो तो त्या महाबलवान् विष्णूप्रमाणेंच शत्रूंना जिंकतो. त्याला निर्मल यश व विपुल धन मिळतें ४,५. जसा वामन तसाच तो सर्व भूतांना प्रिय होतो. त्याचे पुत्र–पौत्र, आरोग्य, गुणसंपत्ति इत्यादि वृद्धि पावतात ६. याचा पाठ करणाऱ्या पुरुषावर देवाधिदेव जनार्दन प्रसन्न होतो व तो सर्व मनोरथसंपन्न होतो, असें कृष्णद्वैपायनानें सांगितलें आहे ७ इति श्रीमहा० खि० हरि० भवि० वामनावतार नामक बाहत्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७२ ॥

जनमेजयः—देवाधिदेव भगवान् विष्णु जनार्दन शंकराचें वसतिस्थान अशा कैलासशिखरास कशासाठीं गेला ? * १ नारदादि तपोवृद्ध व तत्त्वदर्शी मुनींनीं महादेव नीललोहित शंकरदेवास तेथें पाहिलें २. हे विप्रा, पूर्वी उत्तम तप करणाऱ्या देवाधिदेव केशवानें शंकराचें पूजन केलें, असें आह्मीं ऐकलें आहे ३. तेथें ते दोघेही पुरातन जगन्नाथ देव एकमेकांस भेटलें. इंद्रादिदेवांनींही शंकर व हरि यांची पूजा केली ४. ते दोघेही महादेव एकच असून कांहीं कार्याकरितां द्विधाभूत झाले आहेत. ते दोघेही एकरूप, जगत्कारण व सृष्टि–संहार करणारे आहेत ५. एकमेकांमध्यें समावेश करून तर ते जगाच्या पालनामध्यें स्थित आहेत. यास्तव त्या दोघांचें कैलासनामक उत्तम पर्वतावर कसें काय वर्तमान झालें ? ६ त्या दोघां पुरुषोत्तमांस पाहून ऋषि काय करते झाले ? हे उत्तमा, हे सर्व सांगण्यास तूं योग्य आहेस. हरि, विष्णु, कृष्ण, जिष्णु, पुरातन देव कसा गेला व नाग हींच ज्याचीं भूषणें आहेत अशा शंकरानें त्याला साक्षात् कसें जाणलें,

---

* अनुशासन पर्वांत–कृष्ण शंकराराधनेकरितां कैलासास गेला– असें ह्मटलें आहे. त्याला उद्देशून जनमेजय येथें प्रश्न करीत आहे.

त्सर्वं विप्रवर्य ब्रूहि तत्त्वेन यत्नतः ८ वैशंपायन उवाच ॥ शृणुष्वावहितो राजन्यथाकृष्णो गतो नगम् । यथा च दृष्टो देवेशः शंकरो वृषवाहनः ९ यथा चचार स तपो यथा ते मुनयो गताः । एवं तयोर्यथावृत्तं तथा शृणु नरोत्तम १० द्वैपायनोऽथ भगवान्यथा प्रोवाच मां तथा । नमस्कृत्य प्रवक्ष्यामि केशवं खगवाहनम् ११ यथाशक्ति यथाप्रज्ञं शृणु यत्नेन सुव्रत । न चाशुश्रूषवेऽवाच्यं नृशंसायातपस्विने १२ नानधीताय वक्तव्यं पुण्यं पुण्यवतां सदा । स्वर्ग्यं यशस्यं धन्यं च बुद्धिशुद्धिकरं सदा १३ ध्येयं पुण्यात्मनां नित्यमिदं वेदार्थनिश्चितम् । अनेकारण्यसंयुक्तं सेवन्ते नित्यमीदृशम् १४ मुनयो वेदनिरता नारदाद्यास्तपोधनाः । अत्यद्भुतं महापुण्यं वृत्तं कैलासपर्वते १५ शिवयोर्देवयोस्तत्र हरेश्चैव भवस्य ह । हतेष्वसुरसंघेषु नरकादिषु भूमिप १६ हतेष्वथ नृपेष्वेवं किंचिच्छिष्टेषु शत्रुषु । शासति स्म सदा विष्णुः पृथिवीं पुरुषोत्तमः १७ द्वारवत्यां जगन्नाथो वसन्वृष्णिभिरीश्वरः । रुक्मिण्या संगतो देवो वसंस्तत्र पुरे हरिः १८ कदाचिच्च तयासार्धंशेतेरात्रौजगत्पतिः । विहरंश्च यथायोगं प्रीतः प्रीतियुजा तया १९ अथोवाच तदा देवी रुक्मिणी रुक्मभूषणा । पुत्रमिच्छामि देवेश त्वत्तो माधवनन्दनम् २० बलिनं रूपसंपन्नं त्वय्येव सदृशं प्रभो । वृष्णीनामपि नेतारं वीर्यवन्तं तपोनिधिम् २१ सर्वशास्त्रार्थकुशलं राजविद्यापुरस्कृतम् । एवमादिगु-

---

हें सर्व, हे विप्रा, मला तत्त्वतः व प्रयत्नपूर्वक सांग ७,८. वैशंपायनः—हे राजा, कृष्ण कैलास पर्वतास कसा गेला व त्यानें देवेश शंकर वृषभवाहनाचें दर्शन कसें घेतलें तें ध्यान देऊन ऐक ९. त्यानें तप कसें केलें, ते मुनि कसे गेले, इत्यादि त्यांचें वृत्त जसें झालें, तसेंच हे नरोत्तमा, तूं ऐक १०. भगवान् द्वैपायनानें मला जसें सांगितलें आहे तसेंच मी गरुडवाहन केशवास प्रणाम करून यथाशक्ति व यथामति सांगेन. हे सुव्रता, तूंही मोठ्या यत्नानें ऐक. पण हें जो ऐकण्याची इच्छा किंवा गुरूची सेवा करीत नसेल, जो तपस्वी नसेल व जो निर्दय असेल त्याला कधींही सांगूं नये ११,१२ जो अनधीत असेल त्यालाही हें सांगूं नये. कारण हें सर्व पुण्यवान् पदार्थांतील पुण्यकारक आहे, स्वर्ग देणारें, यश वाढविणारें, धन देणारें, व सदा बुद्धीला शुद्ध करणारें आहे १३. पुण्यात्म पुरुषांच्या ध्यानास हें सदा योग्य आहे. हें वेदार्थ निश्चित आहे. अनेक आरण्याध्यायांत याचेंच प्रतिपादन केलें आहे. वेदांमध्यें अत्यंत रत असलेले व तपोधन नारदादि मुनी कैलास पर्वतावर घडलेल्या महापुण्य व अत्यद्भुत असल्या या वृत्ताचेंच सतत सेवन करीत असतात १४,१५. तेथें हरि व शंकर या दोघा कल्याणकर देवांचें असें वर्तमान घडलें. हे भूमिपाला, नरकादि असुरसंघ मारले गेले असतां १६, दुष्ट राजांचाही संहार झाला असतां व कांहीं थोडेसेच शत्रु अवशिष्ट राहिले असतां पुरुषोत्तम विष्णु सतत पृथिवीचें पालन करीत होता १७. तो ईश्वर जगन्नाथ वृष्णींसहवर्तमान द्वारवतींत राहत होता. तो हरिदेव रुक्मिणीसह तेथें वास करीत असे १८. एके दिवशीं रात्रीं प्रीतियुक्त अशा तिच्यासहवर्तमान यथासंभव विहार करून संतुष्ट चित्त झालेला तो जगत्पति तिच्यासह शय्येवर पडला असतां १९. त्यावेळीं सुवर्णभूषणसंपन्न रुक्मिणी देवी त्याला ह्मणाली, “ हे देवेशा, तुजपासून मी पुत्राची इच्छा करतें. तुज माधवास आनंद देणारा २०. बलाढ्य, हे प्रभो, तुजसारखाच रूपसंपन्न, यादवांचाही नायक, वीर्यवान्, तपोनिधि २१. सर्व शास्त्रार्थामध्यें कुशल, राजविद्या संपन्न, इत्यादि गुणांनीं युक्त असा

णैर्युक्तं दातुमर्हसि सत्तम २२ त्वयि सर्वस्य दातृत्वं नित्यमेव प्रतिष्ठितम् । त्वं हि सर्वस्य कर्ता च दाता भोक्ता जगत्पतिः २३ विशेषतस्तु भृत्यानां शुश्रूषानियतात्मनाम् । वक्तव्यं किंनु देवेश यदि भक्तास्मि केशव २४ अनुग्रहो यदि स्यान्मे देवदेव जगत्पते । दातुमर्हसि पुत्रं त्वं वीर्यवन्तं जनार्दन २५ वैशंपायन उवाच ॥ इत्युक्तो देवदेवेशः प्रियया प्रीयमाणया। तया महिष्या रुक्मिण्या रुक्मिशत्रुर्यदूद्वहः २६ प्रोवाच वचनं काले रुक्मिणीं यादवेश्वरः । दातास्मि तादृशं पुत्रं यं त्वमिच्छसि भामिनि २७ नित्यं भक्तासि मे देवि नात्र कार्या विचारणा। अवश्यं तव दास्यामि पुत्रं शत्रुनिबर्हणम् २८ पुत्रेण लोकाञ्जयतिसतां कामदुघा हि ये । नरक पुदिति ख्यातं दुःखं च नरकं विदुः २९ पुत्त्राणात्ततः पुत्रमिहेच्छति परत्र च। अनन्ताः पुत्रिणो लोकाः पुरुषस्य प्रिये शुभाः ३० पतिर्जायां प्रविशति गर्भो भूत्वा स मातरम्। तस्यां पुनर्नवो भूत्वा दशमे मासि जायते ३१ पुत्रवन्तं बिभेतीन्द्रः किन्नु तेनाजितं भवेत् । नापुत्रो विन्दते लोकान्कुपुत्राद्वन्ध्यता वरा ३२ कुपुत्रो नरके यस्मात्सुपुत्रास्स्वर्ग एव हि । तस्माद्विनीतं सत्पुत्रं श्रुतवन्तं दयापरम् ३३ विद्यया विनयो यस्माद्विद्यायुक्तं सुधार्मिकम् । इच्छेत्पुत्रं पुत्रकामः पुरुषो यत्नवान्बुधः ३४ तस्माद्दास्यामि ते पुत्रं विद्यावन्तं सुधार्मिकम् । एष गच्छामि पुत्रार्थं कैलासं पर्वतोत्तमम् ३५ तत्रोपास्य महादेवं शंकरं

---

पुत्र, हे सत्तमा, तूं मला देण्यास योग्य आहेस २२. सर्व दातृत्व तुझ्या ठिकाणींच नित्य प्रतिष्ठित आहे. तूंच सर्वांचा कर्ता, दाता, भोक्ता व जगत्पति आहेस २३. विशेषेंकरून शुश्रूषेच्या योगानें ज्यांचा आत्मा नियत झाला आहे अशा भृत्यांवर उपकार करणारा तूंच एक आहेस. यास्तव हे देवेशा, मी स्वतःच आपल्या शुश्रूषेविषयीं काय सांगावें ? हे केशवा, मी जर तुझी भक्ता असेन व हे देवदेव जगत्पते, तुझा मजवर जर अनुग्रह असेल तर हे जनार्दना, तूं मला वीर्यवान् पुत्र दे." २४,२५. वैशंपायनः— पतीवर प्रेम करणाऱ्या व प्रिय अशा त्या रुक्मिणी राणीनें रुक्मिशत्रु यदुवंशज देवदेव कृष्णास असें ह्मटलें असतां तो यादवेश्वर त्यावेळीं रुक्मिणीस असें वचन बोलला, " हे सुंदरि, तूं जशा पुत्राची इच्छा करीत आहेस तसलाच पुत्र मी तुला देईन २६,२७. कारण हे देवि, तूं माझी नित्य भक्ता आहेस. तेव्हां त्याविषयीं कांहीं विचारच करावयास नको. अवश्य मी तुला शत्रुनाशक पुत्र देईन २८. पुरुष पुत्राच्या योगानें उत्तम लोकांस जिंकतो. पुत्र सज्जनांच्या कामना पूर्ण करणारे आहेत. पुद् या नांवाचा नरक आहे. दुःखालाच नरक ह्मणतात. त्या पुद्—नरकापासून रक्षण केल्यामुळें पुरुष या लोकीं व परलोकीं पुत्राची इच्छा करतो. प्रिये, पुत्रवान् पुरुषाला अनंत व शुभ लोक प्राप्त होतात २९, ३०. पति गर्भ होऊन जायेच्या ( भार्येच्या ) उदरांत प्रवेश करतो. तो तिला माता करतो व तिच्या गर्भाशयांत पुनरपि नवा होऊन तो दहाव्या महिन्यांत उत्पन्न होतो ३१. पुत्रवान् पुरुषास पाहून हा माझें पद घेईल कीं काय ? असें ह्मणून इंद्रही त्याला भितो. ज्याला पुत्र नसतो त्याला उत्तम लोक मिळत नाहींत. कुपुत्रापेक्षां वंध्यता बरी ३२. कुपुत्र नरकांत पाडीत असतो. व सुपुत्राच्या योगानें स्वर्गच मिळतो. यास्तव नम्र, सुशिक्षित व दयावान्, सत्पुत्राची इच्छा करावी. ज्याअर्थीं विद्येच्या योगानें नम्रता येते त्याअर्थीं पुत्रेच्छु पुरुषानें व यत्नवान् शहाण्यानें विद्यायुक्त व अति धार्मिक पुत्राची इच्छा करावी ३३,३४. यास्तव मीही तुला विद्यावान् व अतिशय धार्मिक पुत्र देईन. हा मी

नीललोहितम् । ततो लब्धास्मि पुत्रं ते भवाद्भूतहिते रतात् ३६ तपसा ब्रह्मचर्येण भवं शंकरमव्ययम् । तोषयित्वा विरूपाक्षमादिदेवमजं विभुम् ३७ गमिष्याम्यहमद्यैव द्रष्टुं शंकरमव्ययम् । स च मे दास्यते पुत्रं तोषितस्तपसा मया ३८ तत्र गत्वा महादेवं नमस्कृत्य सहोमया । प्रविश्य बदरीं पुण्यां मुनिजुष्टां तपोमयीम् ३९ अग्निहोत्राकुलां दिव्यां गंगाम्बुप्लावितां सदा । मृगपक्षिसमायुक्तां सिंहद्विपशताकुलाम् ४० बदरीफलसंपूर्णां वानरक्षोभितद्रुमाम् । वेत्रारूढमहावृक्षां कदलीखण्डमण्डिताम् ४१ मुनिभिर्वेदतत्त्वार्थविचारनिपुणैः सदा । वेदनिश्चिततत्त्वार्थैः प्रमाणकुशलैर्युताम् ४२ इदमेकमिदं तत्त्वमिति निश्चितमानसैः । उपास्यमानामन्यत्रासिद्धैः सिद्धार्थतत्परैः ४३ इतिहासपुराणज्ञैः सेव्यमानां महर्षिभिः । गच्छद्भिः स्वर्गनिलयं परित्यज्य कलेवरम् ४४ प्रसिद्धां महतीं देवीं यास्यामि सुकृतालयाम् । इत्युक्त्वा विररामैव देवदेवो जनार्दनः ४५ [ ३४९८ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां त्रिसप्ततितमोऽध्यायः ॥ ७३ ॥

वैशंपायन उवाच ॥ प्रभातायां तु शर्वर्यां गन्तुमैच्छज्जनार्दनः । हुताग्निः कृतकल्याणः समाप्तवरदक्षिणः १ गाश्च दत्वाथ विप्रेभ्यो नमस्कृत्य द्विजोत्तमान् । आस्थानमण्डपं कृष्णः प्रविवेश जगत्पतिः २ आसनं महदास्थाय वृष्णीनाहूय सर्वशः । बलभद्रं शिनेः पुत्रं हार्दिक्यं शुकसारणौ ३ उग्रसेनं महाबुद्धिमुद्धवं नीतिमत्तरम् । यस्य बुद्धिं समाश्रित्य

---

पुत्राकरितां पर्वतश्रेष्ठ कैलासास जातों ३५. तेथें महादेव शंकर नीललोहित देवाची उपासना करून त्या भूतांच्या हितामध्यें रत असलेल्या भवापासून तुला मी पुत्र मिळवून देईन ३६. त्या विरूपाक्ष, आदिदेव, अज, विभु, अव्यय व शंकर भवाला तप व ब्रह्मचर्य यांच्या योगानें संतुष्ट करून मी पुत्र संपादन करीन ३७ मी आजच त्या अव्यय शंकराचे दर्शन घ्यावयास जातों. मीं तपानें ज्याला संतुष्ट केलें आहे असा तो मला पुत्र देईल ३८. तेथें जाऊन उमेसह महादेवास नमस्कार करून मुनींनीं सेविलेल्या, तपोमय, पुण्य बदरीमध्यें प्रवेश करून मी हें इष्ट साधीन ३९. ती बदरी अग्निहोत्रांनीं आकुल, दिव्य, सदा गंगाजलानें भिजविली जाणारी, मृग–पक्षियुक्त, शेंकडों सिंह व व्याघ्र यांनीं आकुल ४०, बदरी फळांनीं ( बोरांनीं ) परिपूर्ण, जिच्यांतील वृक्षांस वानरांनीं क्षुब्ध केलें आहे, जिच्यांतील महावृक्षांवर वेतांच्या वेली चढल्या आहेत, वेदतत्त्वार्थ विचारांत सदा निपुण असलेल्या, वेदांचा निश्चित तत्त्वार्थ जाणणाऱ्या, व प्रमाणामध्यें कुशल असलेल्या मुनींनीं युक्त, हेंच एक असेंच तत्त्व आहे असें ज्याचें निश्चित मानस आहे, अशा मंत्रतः सिद्ध, सिद्धार्थतत्पर व इतिहास-पुराणज्ञ महर्षींनीं उपासना केलेली, शरीर सोडून स्वर्गस्थानास जाणाऱ्या महर्षींकडून सेविली जाणारी व पुण्याचें जणूं काय माहेरघरच अशा मोठ्या व प्रसिद्ध बदरी देवीस मी जाईन. असें बोलून देवांचा देव जनार्दन गप्प बसला ४१–४५. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलासयात्रेविषयीं त्र्याहात्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७३. ॥

वैशंपायनः— रात्र संपून दिवस उगवला असतां कैलासास जाण्याची इच्छा करणाऱ्या जनार्दनानें अग्नीमध्यें हवन केलें. सर्व कल्याणाचरण केलें. उत्तम दक्षिणा देऊन प्रस्थानकर्म केलें १. ब्राह्मणांस गायी देऊन व द्विजोत्तमांस नमस्कार करून जगत्पति कृष्ण आस्थान मंडपांत प्रविष्ट झाला २. मोठ्या आसनावर बसून त्यानें सर्व यादवांस

जीवन्ते यदवः सुखम् ४ नेता च यदुवृष्णीनां स तु धर्मपरः सदा । यस्य बिभ्यन्ति देवाश्च नीतिस्तस्य महात्मनः ५ यस्य बुद्धिवशाद्विष्णुः शशास पृथिवीं सदा । तं च वृष्णिवरं वीरमुद्धवं देवसुप्रभम् ६ अन्यानपि यदून्सर्वानुवाच भगवान् हरिः । शृण्वन्तु मम वाक्यानि यादवाः सर्व एव हि । शृणु चापि वचो मह्यं पितुरुद्धव मे सखे ७ बाल्यात्प्रभृति यो यत्नो मम दुष्टनिबर्हणे । प्रत्यक्षं भवता दृष्टं पूतनानिधनं नृप ८ केशी च निहतो बाल्ये मया बालेन यादवाः । गोवर्धनो धृतः शैलो गावश्च परिपालिताः ९ अभिषिक्तोऽस्मि शक्रेण देवानामग्रतः स्थितः । कंसोऽपि निधनं नीतो मया चाणूरमुष्टिकौ १० उग्रसेनोऽभिषिक्तश्च कृता द्वारवती मया । अन्ये चापि नृपा राजन्बलिनो निहता मया ११ योऽपि वीरो जरासन्धो निगृहीतो बलान्मया । भीमेन बलिना राजन्नयेन मम यादवाः १२ शृगालो निहतः संख्ये गोमन्ताद्गच्छता मया । योपि विरो दुरात्मासौ दानवो नरको हतः १३ निष्कण्टकमिमं लोकं कृतवान्राजसत्तमाः । किं तु वीरो नृपो जज्ञे सखा भौमस्य यादवाः १४ पौंड्रो वीर्यवतां नेता द्वेष्टा चासौ सदा मम । शिष्यो द्रोणस्य राजेन्द्रो बली ब्रह्मास्त्रवित्कृती १५ शास्त्रज्ञो नीतिमान्साक्षान्नेता सर्वस्य यत्नवान् । योद्धा युद्धप्रियो राजा जामदग्न्य इवापरः १६ एकान्तशत्रुरस्माकं छिद्रान्वेषी सदा मम । बाधिष्यते पुरीं योद्धा छिद्रं यदि लभेत सः १७ न ह्यल्पसाध्यो बलवान् पुण्ड्रस्येशो नृपोत्तमः । यत्ता भवन्तस्तिष्ठन्तु प्रगृहीतशरा-

---

बोलाविलें. बलभद्र, शिनीचा पुत्र सात्यकि, हार्दिक्य, शुक व सारण, उग्रसेन, महाबुद्धिमान्, अतिशय नीतिमान्, ज्याच्या बुद्धिबलाचा आश्रय करून यदुवीर सुखानें रहातात, यदुवृष्णींचा नेता, सदा धर्मपरायण, ज्या महात्म्याच्या नीतीला देवही भितात, ज्याच्या बुद्धिसामर्थ्यानेंच विष्णु सदा पृथ्वीचें पालन करतो व ज्याची कांति देवांप्रमाणें अगदीं सौम्य आहे अशा वृष्णिश्रेष्ठ वीर उद्धवास आणि दुसऱ्याही सर्व यादवांस बोलावून भगवान् हरि ह्मणाला, " सर्वही यादव माझें भाषण ऐकोत. त्याचप्रमाणें बा उद्धवा, माझ्या व माझ्या पित्याच्या मित्रा, माझें वचन ऐक ३-७. बालपणापासून दुष्टांचा निग्रह करण्यासाठीं मी कसा यत्न केला तें तुह्मांला ठाऊक आहेच. हे राजा, पूतनेचें मरण तूं प्रत्यक्ष पाहिलें आहेस. अहो यादवांनो, बालपणीं मीं बालानेंच केशी दैत्याला मारलें. गोवर्धन पर्वत उचलून धरला. गायींचें रक्षण केलें ८,९. त्यामुळें इंद्रानें मला अभिषेक केला. मी देवाच्या अग्रभागीं स्थित झालों. मी कंस व चाणूर—मुष्टिक यांना मारलें १०. उग्रसेनाला राज्यावर अभिषेक केला. मी द्वारवती नगरी बसाविली. हे राजन्, मी दुसऱ्याही बलाढ्य राजांना मारलें ११. अहो यादवांनो, जो वीर जरासंध त्याचा मी बलात्कारानें निग्रह केला. हे राजन्, माझ्या नीतीनें बलाढ्य भीमानें त्याला मारलें १२. गोमंताहून जाणाऱ्या मी युद्धांत शृगालाला मारलें. जो दुरात्मा दानव नरक त्यालाही यमसदनीं पाठविलें १३. हे उत्तम वीरांनो, मीं यालोकास आतां निष्कंटक केलें आहे. पण हे यादवांनो, भौमासुराचा एक मित्र वीर राजा निपजला आहे. तो पौंड्र वीर्यवानांतील श्रेष्ठ आहे. व तो सदा माझा द्वेष्टा आहे. तो राजेंद्र द्रोणाचा शिष्य आहे. तो बलाढ्य, ब्रह्मास्त्रवेत्ता, कृतकृत्य १४,१५. शास्त्रज्ञ, नीतिमान्, सर्वांचा साक्षात् नेता, मोठा यत्नवान्, योद्धा, युद्धप्रिय, राजा जणुकाय दुसरा जामदग्न्यच १६. आमचा एकान्तशत्रु व सदा माझें छिद्र पाहत बसलेला आहे. त्याला जर आमचें थोडेंसेंही छिद्र

सनाः १८ यथा न बाधते राजा पुरीं यदुकुलाश्रयाम् । अहं तु यास्ये कैलासं कुतश्चित्कारणान्नृपाः १९ शंकरं द्रष्टुकामोऽस्मि भूतभावनभावनम् । यावदागमनं मह्यं तावद्यत्ता भवन्त्विह २० मया विरहितां चेमां यदि जानाति पुण्ड्रकः । आगमिष्यति राजेन्द्रो योत्स्यते च पुरीमिमाम् २१ इमां निर्यादवीं कर्तुं शक्नोतीति च मे मतिः । यत्ता भवत राजेन्द्राः खड्गैः पाशैः परश्वधैः २२ पाषाणैः कर्षणीयैश्च सन्नद्धा भवत स्वकैः । पिधाय च कपाटानि महाद्वाराणि यत्नतः २३ एक एव महाद्वारो गमनागमने सदा । मुद्रया सह गच्छन्तु राज्ञो ये गन्तुमीप्सवः २४ न चामुद्र प्रवेष्टव्यो द्वारपालस्य पश्यतः । यावदागमनं मह्यं तावदेवं भविष्यति २५ मृगया नात्र कर्तव्या न च क्रीडा बहिःपुरात् । ज्ञातव्याश्च परे स्वे च गमनागमने सदा २६ एवमादिक्रियाकार्या यावदागमनं मम । इत्युक्त्वा यादवान्सर्वान् सात्यकिं पुनराह च २७ [ ३५२५ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां चतुः सप्ततितमोऽध्यायः ॥ ७४ ॥

श्रीभगवानुवाच ॥ सात्यके शृणु मद्वाक्यं यत्तो भव युधांवर । त्वं तु खड्गी गदी भूत्वा चापपाणि तनुत्रवान् १ तिष्ठ यत्नेन रक्षस्व पुरीं बहुनृपाश्रयाम् । न च निद्रा त्वया कार्या रात्रौ यदुवृष प्रभो २ न च व्याख्या त्वया कार्या शास्त्राणां शास्त्रतत्पर । न च वादस्त्वया

---

मिळालें तर तो योद्धा या नगरीस खचित बाधा करील १७. तो पुंड्रदेशाचा ईश्वर उत्तम राजा व फार बलवान् आहे. यास्तव तो अल्प उपायानें साध्य होणार नाहीं. करितां तुह्मी सर्व अगदीं सावध होऊन व धनुष्यें घेऊनच सज्ज रहा १८. व तो राजा, यदुकुलानें जिचा आश्रय केला आहे अशा या पुरीस पीडा न देईल असें करा. कारण हे राजांनो, मी कांहीं कारणानें कैलासास जातों. भूतांचें कारण अव्यक्त व त्याचेंही जो कारण शंकर त्याचें दर्शन घेण्याची मला इच्छा झाली आहे. यास्तव मी परत येई तों येथें सज्ज होऊन रहा १९,२०. या नगरींत मी नाहीं, असें जर त्याला समजलें तर पुंड्रक राजा येईल व तो राजेंद्र या पुरीशीं संग्राम करील २१. तो हिला यादवरहित करण्यास समर्थ आहे, अशी माझी समजूत आहे. यास्तव हे राजेंद्रांनो, खड्ग, पाश, परशु, २२ पाषाण, कर्षणीय, इत्यादि आपापल्या आयुधांनीं सज्ज होऊन रहा. कपाटें व वेशी यत्नतः बंद करा २३. सदा जाण्या–येण्यासाठीं एकच महाद्वार मोकळें ठेवा. ज्यांना जाण्याची इच्छा असेल ते राजाच्या लेखी आज्ञेनेंच जाऊं शकोत २४. राजाच्या सहि–शिक्यावाचून पाहारा करणाऱ्या द्वारपालानें कोणालाही आंत सोडूं नये. मी येईपर्यंत असें करा २५. मृगया करूं नका. नगराच्या बाहेर जाऊन क्रीडा करूं नका. आंत येतांना व बाहेर जातांना आपला कोण आहे व परकीय कोण आहे याचा सदा विचार करावा २६. मी परत येई तों तुह्मी अशाप्रकारचा बंदोबस्त करावा. सर्व यादवांस असें सांगून तो सात्यकीस पुनः असें ह्मणाला २७. इति श्रीमहा खिल० हरि० भवि० कैलासयात्रासंबंधीं चवऱ्याहात्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७४ ॥

श्रीभगवान्:— सात्यके, मी काय सांगतो तें ऐक. हे योद्ध्यांतील श्रेष्ठा, नेहमीं सज्ज होऊन रहा. तूं तर खड्गयुक्त, गदायुक्त, धनुष्पाणि व कवचयुक्त होऊन मोठ्या प्रयत्नानें रहा, अनेक राजांनीं जिचा आश्रय केला आहे अशा या नगरीचें रक्षण कर. प्रभो, यदुश्रेष्ठा, रात्रीं तूं निजूं नयेस १,२. हे शास्त्रतत्पर विद्वाना, तूं शास्त्रांची व्याख्या

कार्यो वादिभिः सह वृष्णिप ३ त्वं हि योद्धा बलिर्ज्ञाता धनुर्वेदाख्यवेदवित् । तथा कुरु यथा वीर नोपहास्या भवेदियम् ४ सात्यकिरुवाच ॥ करिष्यामि वचस्तुभ्यं यथाशक्ति जनार्दन । आज्ञा तव जगन्नाथ धार्या यत्नेन मे सदा ५ भृत्यवत्प्रचरिष्यामि कामपालस्य माधव । यावदागमनं तुभ्यं तावत्स्थास्यामि यत्नतः ६ प्रसादस्तव गोविन्द यदि स्यान्मयि माधव । किं नाम मे च दुःसाध्यं शत्रूणां निग्रहे रणे ७ यदि शक्रं यमं वापि कुबेरमपि पाशिनम् । सर्वानेतान्विजेष्यामि किमु पौण्ड्रं नृपोत्तमम् ८ गच्छ कार्यं कुरुष्वेदं यत्तोऽहं सततं हरे । उद्धवं पुनराहेदं कृष्णः पद्मनिभेक्षणः ९ शृणूद्धव त्वं वाक्यं मे कुर्यास्त्वेतत्प्रयत्नवान् । रक्ष्या नयेन राजेंद्र पुरी द्वारवती त्वया १० यत्तोभवसदा तात कुरु साहाय्यमत्र नः । लज्जा मम समुत्पन्ना वदतस्तव सांप्रतम् ११ त्वं हि नेता समस्तस्य विद्यापारस्य सर्वतः । को नु शक्ष्यति मेधावी वक्तुं विद्यावतः पुरः १२ यत्कार्यं तद्भवान्वेत्ति ह्यकार्यं वापि सर्वतः । अतोऽहं विरमे तात वक्तुं संप्रति वृष्णिप १३ उद्धव उवाच ॥ किमिदं तव गोविन्द वर्तते मां प्रति प्रभो । अहो प्रसन्नता मह्यं किंतु प्रीतिरियं तव १४ जानाम्यहं जगन्नाथ प्रसादस्यैष विस्तरः । यस्य प्रसन्नो भवसि तस्य किं नास्ति केशव १५ त्वं हि सर्वस्य जगतः कर्ता हर्ता प्रधानतः । प्रभवः सर्वकार्याणां वक्ता श्रोता प्रमाणवित् १६

---

करूं नयेस. हे वृष्णींच्या पालका, वाद्यांशीं तूं वाद करूं नयेस ३. कारण तूं योद्धा, बलाढ्य, ज्ञाता, व धनर्वेदाख्य वेदाला जाणणारा आहेस. यास्तव हे वीरा, ही नगरी दुसऱ्यांच्या उपहासास पात्र होणार नाहीं असें तूं कर ४. सात्यकिः— हे जनार्दना, मी तुझें वचन यथाशक्ति करीन. कारण हे जगन्नाथा, मला तुझी आज्ञा सदा मोठ्या यत्नानें धारण केली पाहिजे ५. माधवा, मी बलरामाच्या सेवकाप्रमाणें त्याच्याशीं आचरण करीन. तुझें आगमन होई तों मी मोठ्या यत्नानें राहीन ६. हे माधवा, हे गोविंदा, तुझा अनुग्रह जर मजवर असेल तर रणांत शत्रूंच्या निग्रह प्रसंगीं मला दुःसाध्य काय असणार ? ७. मी इंद्र, यम, वरुण, कुबेर, या सर्वांनाही जिंकीन. मग या एका नृपोत्तम पौंड्राची कथाच काय ? ८. जा. हें आपलें कार्य कर. हे हरे, मी सतत सज्ज राहीन. त्यानंतर कमलनयन कृष्ण उद्धवाला पुनः असें ह्मणाला ९. " उद्धवा, तूं माझें बोलणें ऐक. व त्याप्रमाणें मोठ्या यत्नानें कर. हे राजेंद्रा, या पुरी द्वारवतीचें रक्षण तुला नीतीनें केलें पाहिजे १०. बाबारे, सतत सज्ज होऊन रहा. यावेळीं आह्मांस साहाय्य कर. तुला हें सांगावयाचीही मला यावेळीं मोठी लाज वाटत आहे ११. कारण तूं सर्वविद्यापारंगत व लोकांचा सर्वप्रकारें नेता आहेस. तेव्हां विद्यावानाच्या पुढें बोलण्यास कोणता शहाणा समर्थ होणार आहे ? १२. काय करणें उचित आहे व काय करणें अनुचित आहे हें तूंच जाणतोस. यास्तव बाबा यादवरक्षका, मी आतां अधिक बोलत नाहीं. तर थांबतो १३. उद्धवः— प्रभो, गोविन्दा, तूं हें मला भलतेंच काय बोलत आहेस ? मजवर तुझा केवढा मोठा प्रसाद हा ! पण मी ही तुझी प्रीति जाणतों १४. हे जगन्नाथा, मी जाणतों कीं, तुझ्या प्रसादाचा हा विस्तार आहे. हे केशवा, ज्याच्यावर तूं प्रसन्न होतोस त्याला काय नसतें ( सर्व कांहीं त्याला प्राप्त असतें ) १५. तूंच सर्व जगाचा मुख्यतः कर्ता व हर्ता आहेस. तूं सर्व कार्यांचा प्रभव ( उगम, ) वक्ता,

ध्याता ध्यानमयो ध्येय इति ब्रह्मविदो विदुः । जेता देवरिपूणां च गोप्ता नाकसदां भवान् १७ त्वंनाथा वयमेवेति जीवामो निहतद्विषः । इयं नीतिरहं मन्ये नेता नीतेर्यतो भवान् १८ को नु नाम नयो वेद त्वांविना सांप्रतं वद । नीतिस्त्वं सर्वकार्याणामिति मे निश्चिता मतिः १९ दुर्गाढो नयमार्गोयमित्याहुस्तद्विदो जनाः । चतुर्धा प्रोच्यते नीतिः सामदाने जनार्दन २० दण्डो भेदो मनुष्याणां निग्रहावग्रहे सदा । दण्ड्येषु दण्डमिच्छन्ति सामान्यं तु नये हरे २१ बलवत्स्वथ दानं तु त्रयाणामप्यगोचरे । प्रयोक्तव्यो महाभेद इति नीतिमतां मतम् २२ तेषु तेष्वथ सर्वेषु प्रमाणं त्वां विदुर्बुधाः । किमत्र बहुनोक्तेन सर्वं त्वयि समन्वितम् २३ वैशंपायन उवाच ॥ इत्युक्त्वा विररामैव उद्धवो नीतिमत्तरः । ततः स भगवान्विष्णुरेवमेव नृपोत्तम २४ कामपालं महाबाहुमुवाच यदुसंसदि । उग्रसेनं नृपं राजंस्तथा हार्दिक्यमेव च २५ कामपालं पुनर्विष्णुरिदं प्रोवाच तत्ववित् । न प्रमादस्त्वया कार्यः सर्वदा यत्नवान्भव २६ स्थिते त्वयि महाबाहो का पीडा जगतो भवेत् । गदी भव सदा त्वार्य न क्रीडा सर्वदा भवेत् २७ रक्ष त्वं सर्वदा यत्नात्पुरीं द्वारवतीं प्रभो । नोपहास्या यथा स्यामस्तथा कुरु गदी भव २८ उत्साहः सर्वदा कार्यो निरुत्साहो न यत्नतः । बाढमित्यब्रवीद्रामः कृष्णं वृष्णिकुलोद्भवम् २९ वृष्णयः सर्व एवैते स्वं स्वं सद्म समाययुः ।

---

श्रोता, व प्रमाणवेत्ता आहेस १६. तूंच ध्याता, ध्यानमय व ध्येय आहेस, असें ब्रह्मवेत्ते जाणतात. तूं देवशत्रूंना जिंकणारा, व स्वर्गवासिजनांचा रक्षक आहेस १७. तूं ज्यांचा नाथ आहेस, असे आह्मी आहों. ह्मणूनच शत्रूंस मारून आह्मी जिवंत राहिलों आहों. हीच खरी नीति आहे, असें मी समजतों. कारण नीतीचा नेताही स्वयं आपणच आहेस १८. तुजवाचून दुसरा कोण बरें यावेळीं नीति जाणत आहे ? सर्व कार्यांची नीति तूं आहेस, अशी माझी निश्चित मति आहे. नीतिवेत्ते जन हा मार्ग दुर्गाढ आहे असें जाणतात. हे जनार्दना, नीति चार प्रकारची सांगितली जाते. साम, दान, दंड व भेद हे चार उपाय मनुष्यांच्या निग्रह व अवग्रहाविषयीं सदा उक्त आहेत. हे हरे, जे दण्ड्य ( दंडास पात्र ) आहेत त्यांनाच दंड देण्याची इच्छा करावी हें नीतीचें सामान्य तत्त्व आहे १९-२१. जे बलवान् असतील ते इतर तीन उपायांचे विषय होण्यासारखे नसल्यास त्यांना द्रव्य द्यावें, असें सांगितलें आहे. जेथें भेद ( आपसांत फूट ) पडणें शक्य असेल तेथें तो ( भेद ) उत्पन्न करावा, असें नीतिवेत्त्यांचें मत आहे २२. पण त्या त्या सर्व उपस्थित कार्यांमध्यें ज्ञानी लोक तुला प्रमाण समजतात. याविषयीं उगीच अधिक बोलण्यांत काय अर्थ आहे. सर्व तुझ्याठिकाणीं स्थित आहे २३. वैशंपायनः—असें बोलून नीतिमत्तर उद्धव मुकाट्यानें बसला. त्यानंतर हे उत्तम राजा, भगवान् विष्णु यादवांच्यामध्यें महाबाहु बलरामास असेंच सांगता झाला. उग्रसेन राजा व हार्दिक्य यांनाही त्यानें तसेंच सांगितलें २४,२५. नंतर तो तत्त्ववेत्ता विष्णु कामपालास पुनः असें ह्मणाला, ' तूं मुळींच प्रमाद करूं नकोस. सर्वदा यत्नवान् होऊन रहा २६. कारण हे महाबाहो, तूं स्थित असतांना जगाला पीडा कसली होणार ? हे आर्या, सर्वदा गदावान् हो. सर्वदा क्रीडाच करूं नको २७. हे प्रभो, तूं सर्वदा मोठ्या प्रयत्नानें द्वारवती पुरीचें रक्षण कर. सारांश, आह्मी लोकांच्या उपहासास कारण होणार नाहीं, असें कर. गदा घेऊन सज्ज होऊन रहा २८. सर्वदा उत्साह धर, निरुत्साह प्रयत्नानें सोड. ' त्यावर

गन्तुमैच्छज्जगन्नाथः कैलासं पर्वतोत्तमम् ३० [ ३६५५ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां पंचसप्ततितमोऽध्यायः ॥ ७५ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः संचिन्तयामास गरुडं पक्षिपुंगवम्। आगच्छ त्वरितं तार्क्ष्य इति विष्णुर्जगत्पतिः १ ततः स भगवांस्तार्क्ष्यो वेदराशिरिति स्मृतः। बलवान्विक्रमी योगी शास्त्रनेता कुरूद्वह २ यज्ञमूर्तिः पुराणात्मा साममूर्धा च पावनः। ऋग्वेदपक्षवान्पक्षी पिंगलो जटिलाकृतिः ३ ताम्रतुण्डः सोमहरः शक्रजेता महाशिराः। पन्नगारिः पद्मनेत्रः साक्षाद्विष्णुरिवापरः ४ वाहनं देवदेवस्य दानवीगर्भकृन्तनः। राक्षसासुरसंघानां जेता पक्षबलेन यः ५ प्रादुरासीन्महावीर्यः केशवस्याग्रतस्तदा। जानुभ्यामपतद्भूमौ नमो विष्णो जगत्पते ६ नमस्ते देवदेवेश हरे स्वामिन्निति ब्रुवन्। पस्पर्श पाणिना कृष्णः स्वागतं तार्क्ष्यपुंगव ७ इत्युवाच तदा तार्क्ष्य यास्ये कैलासपर्वतम्। शूलिनं द्रष्टुमिच्छामि शंकरं शाश्वतं शिवम् ८ बाढमित्यब्रवीत्तार्क्ष्य आरुरोहैनं जनार्दनः। तिष्ठध्वमिति होवाच यादवान्पार्श्ववर्तिनः ९ ततो ययौ जगन्नाथो दिशं प्रागुत्तरां हरिः। रवेण महता तार्क्ष्यस्त्रैलोक्यं समकंपयत् १० सागरं क्षोभयामास पक्षाभ्यां पक्षी व्रजंस्तदा। पक्षेण पर्वतान्सर्वान्वहन्देवं जनार्दनम् ११ ततो देवाः सगन्धर्वा आकाशेऽधिष्ठितास्तदा। तुष्टुवुः पुण्डरीकाक्षं वाग्भिरिष्टाभिरीश्वरम् १२ जय

---

'बरें आहे,' असें राम वृष्णिकुलोद्भव कृष्णाला ह्मणाला. नंतर सर्वही वृष्णि आपापल्या घरास निघून गेले. आणि जगन्नाथ कैलास-पर्वतास जाण्याची इच्छा करता झाला २९, ३०. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलासया० पंचाहात्तरावा अध्याय समाप्त झाला ॥७५॥

वैशंपायनः—त्यानंतर जगत्पति विष्णूनें 'हे तार्क्ष्या, सत्वर ये, असें ह्मणून पक्षिश्रेष्ठ गरुडाचें चिंतन केलें १. त्याबरोबर हे कुरुकुलोद्भवा, वेदराशी ह्मणून ह्मटला गेलेला बलवान्, विक्रमी, योगी शास्त्रनेता, २ यज्ञमूर्ति, पुराणात्मा, साम हेंच ज्याचें मस्तक आहे, पावन, ऋग्वेद हेच ज्याचे पंख आहेत असा पक्षी, पिंगल, जटिल आकारवान् ३, ज्याचें तोंड तांबडें आहे, सोमाचें हरण करणारा, इंद्राला जिंकणारा, ज्याचें मस्तक फार मोठें आहे, सर्पांचा शत्रु, कमलाप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत, साक्षात् दुसऱ्या विष्णूप्रमाणेंच असणारा, देवाधिदेवाचें वाहन, ज्याला पाहतांच दानवस्त्रियांचे गर्भ गळून पडतात, जो पंखांच्या बलानें राक्षस व असुर यांच्या संघांस जिंकणारा आहे, असा तो महावीर्यवान् भगवान् गरुड तत्काल केशवाच्या अग्रभागीं येऊन उभा राहिला. तो दोन्ही गुडघे टेंकून तोंडानें 'हे जगत्पते, विष्णो, तुला नमस्कार असो. हे हरे, हे स्वामिन्, हे देवदेवेश, तुला मी नमस्कार करतों, असें ह्मणत भूमीवर नम्र झाला. तेव्हां कृष्णानें त्याला हस्तस्पर्श केला, व गरुडा, तुझें स्वागत असो, असें बोलून तो पुनः लागलेंच ह्मणाला, "गरुडा, मी कैलास पर्वतास जाणार आहे. शूलवान् व सर्वांचें कल्याण करणारा, असा जो शाश्वत शिव त्याचें दर्शन घेण्याची मला इच्छा झाली आहे" ४-८. तें ऐकतांच बरें आहे, असें गरुड ह्मणाला. लागलाच जनार्दन त्याच्यावर आरूढ झाला. जवळ असलेल्या यादवांस तुह्मी येथेंच रहा, असें तो बोलला ९. व तो जगन्नाथ हरि ईशान्य दिशेकडे निघाला. त्यावेळीं पंखांच्या मोठ्या ध्वनीनें गरुड त्रैलोक्यास कांपविता झाला १०. त्यावेळीं जाणारा पक्षी आपल्या दोन्ही पंखांनीं सागरास क्षुब्ध करता झाला. जनार्दन देवास वाहून नेतांना त्यानें पंखांच्या योगानें सर्व पर्वतांस हालवून सोडलें ११.

देव जगन्नाथ जय विष्णो जगत्पते । जयाजेय नमो देव भूतभावनभावन १३ नमः परमसिंहाय दैत्यदानवनाशन । जयाजेय हरे देव योगिध्येय परागते १४ नारायण नमो देव कृष्ण कृष्ण हरे हरे । आदिकर्तः पुराणात्मन् ब्रह्मयोने सनातन १५ नमस्ते सकलेशाय निर्गुणाय गुणात्मने । शक्तिप्रियाय शक्ताय नमो दानवनाशन १६ अचिंत्यमूर्तये तुभ्यं नमस्ते सकलेश्वर । इत्यादिभिस्तदा देवं वाग्भिरीशानमव्ययम् १७ तुष्टुवुर्देवगन्धर्वा ऋषयः सिद्धचारणाः । शृण्वन्नेव जगन्नाथः स्तुतिवाक्यानि तानि च १८ ययौ सार्धं सुरगणैर्मुनिभिर्वेदपारगैः । यत्र पूर्वं स्वयं विष्णुस्तपस्तेपे सुदारुणम् १९ लोकवृद्धिकरः श्रीमाँल्लोकानां हितकाम्यया । वर्षायुतं तपस्तप्तं विष्णुना प्रभविष्णुना २० यत्र विष्णुर्जगन्नाथस्तपस्तप्त्वा सुदारुणम् । द्विधाकरोत्स्वमात्मानं नरनारायणाख्यया २१ गंगा यत्रसरिच्छ्रेष्ठा मध्मे धावति पावनी । यत्र शक्रः स्वयं हत्वा वृत्रं वेदार्थतत्त्वगम् २२ ब्रह्महत्या विनाशार्थं तपो वर्षायुतं चरत् । यत्र सिद्धाश्च सिद्धाः स्युर्ध्यात्वा देवं जनार्दनम् २३ यत्र हत्वा रणे रामो रावणं लोकरावणम् । एतच्छासनमिच्छंश्च तपो घोरमतप्यत २४ देवाश्च मुनयश्चैव सिद्धिं यान्ति शुचिव्रताः । यत्र नित्यं जगन्नाथः साक्षाद्वसति केशवः २५ यत्र यज्ञाः प्रवर्तन्ते नित्यं मुनिगणैः सह । यस्याः स्मरणमात्रेण नरः स्वर्गं गमिष्यति २६ स्वर्गसोपानमिच्छन्तियां पुण्यां मुनिसत्तमाः । शत्रवो मित्रतां यान्ति यत्र नित्यं नृपोत्तम २७ यामाहुः पुण्यशीलानां

---

तेव्हां गंधर्वासह देव आकाशामध्यें अधिष्ठित झाले. व इष्ट वाणींनीं पुंडरीकाक्ष ईश्वराची स्तुति करूं लागले १२. हे देवा, जगन्नाथा, तुझा जयजकार असो. हे जगत्पते विष्णो, तुझा विजय होवो. हे अजेय, हे देव, भूत-भावन-भूतेश, तुला नमस्कार असो १३. हे दैत्य–दानवांचा नाश करणाऱ्या, तुज परमसिंहाला नमस्कार असो. हे अजेय, हे हरे, हे देव, हे योग्यांच्या ध्येया, हे श्रेष्ठ गतिरूपा, तुझा सर्वांहून अधिक उत्कर्ष झाला आहे १४. हे नारायणा, देवा, हे कृष्णा, हे कृष्णा, हे हरे, हे हरे, हे आदिकर्त्या, हे पुराणरूपा, हे सनातन ब्रह्मयोने, तुला नमस्कार असो १५. हे दानवशत्रो, तुज सकलेशास, गुणरूपास, निर्गुणास, ज्याला शक्तिप्रिय आहे, अशा देवास व समर्थास नमस्कार असो १६. हे सकलेश्वरा, तुज अचिन्त्यमूर्तीस नमस्कार असो. इत्यादि वाणींनीं त्यावेळीं देव, गंधर्व, ऋषि, सिद्ध व चारण त्या ईशान व अव्यय देवाची स्तुति करूं लागले. तेव्हां जगन्नाथ तीं स्तुतिवाक्यें ऐकतच वेदपारंगत मुनि व सुरगण यांसह जेथें पूर्वी स्वतः विष्णूनें अतिशय दारुण तप केलें होतें तेथें गेला १७-१९. तो लोकांची वृद्धि करणारा श्रीमान् लोकांच्या हिताच्या इच्छेनें तेथें गेला. प्रभु होण्याची इच्छा करणाऱ्या विष्णूनें तेथें दशसहस्र वर्षें तप केलें २०. जेथें जगन्नाथ विष्णूनें अति दारुण तप करून आपल्या स्वरूपाला नर-नारायण रूपानें द्विधा केलें २१. ज्याच्या मधून श्रेष्ठ नदी गंगा सर्व स्थानास पावन करीत वेगानें धांवत असते, जेथें वृत्रासुराला मारून स्वतः शक्र ब्रह्महत्येच्या विनाशार्थ अयुत वर्षें वेदार्थतत्त्वगत तप करीत राहिला होता, जेथें जनार्दन देवाचें ध्यान करूनच सिद्ध सिद्धिमान् होतात, जेथें लोकांना पीडा देणाऱ्या रावणाला रणांत मारून राम या शासनाची इच्छा करीत घोर तप करितां झाला २२-२४, जेथें पवित्र व्रतसंपन्न देव व मुनि सिद्धीस प्राप्त होतात, जेथें जगन्नाथ केशव नित्य साक्षात् वास करतो २५. जेथें सतत मुनिगणांसह यज्ञ प्रवृत्त होतात, जिच्या केवळ स्मरणानेंच नर स्वर्गास जातो,

स्थानमुत्तमधर्मिणाम् । यत्र विष्णुं समाराध्य देवाः स्वर्गं समाययुः २८ सिद्धक्षेत्रमिदं प्राहुऋषयो वीतमत्सराः । विशालां बदरीं विष्णुस्तां द्रष्टुं सकलेश्वरः २९ सायाह्ने चामरगणैर्मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः । प्रविवेश महापुण्यमृषिजुष्टं तपोवनम् ३० अग्निहोत्राकुले काले पक्षिव्याहारसंकुले । नीडस्थेषु विहंगेषु दुह्यमानासु गोषु च ३१ ऋषिष्वप्युपतिष्ठत्सु मुनिवीरेषु सर्वतः । समाधिस्थेषु सिद्धेषु चिन्तयत्सु जनार्दनम् ३२ अधिश्रितेषु हविःषु ज्वाल्यमानेषु चाग्निषु । हूयमानेषु तत्रैव पावकेषु समंततः ३३ अतिथौ पूज्यमाने च सन्ध्याविष्टे जगन्मये । स तस्यामथ वेलायां देवैः सह जनार्दनः ३४ विवेश बदरीं विष्णुर्मुनिजुष्टां तपोमयीम् । आश्रमस्याथ मध्यं तु प्रविश्य हरिरीश्वरः ३५ गरुडादवरुह्याथ दीपिकादीपिते तदा । प्रदेशे पुण्डरीकाक्षः स्थितस्तावत्सहामरैः ३६ [ ३५११ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां षट्सप्ततितमोऽध्यायः ॥ ७६ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततो मुनिगणा दृष्ट्वा देवदेवमुपस्थितम् । समाप्य चाग्निहोत्राणि संपूज्यातिथिसत्तमान् १ मुनयो दीर्घतपसः समाधौ कृतनिश्चयाः । जटिनो मुण्डिनः केचिच्छिराधमनिसंतताः २ निर्मज्जा नीरसाः केचिद्वेताला इव केचन । अश्मकुट्टाशनपराः पर्णभक्षास्तथापरे ३ वेदविद्याव्रतस्नाता निराहारा महातपाः । स्मरन्तः सर्वदा विष्णुं तद्भक्ता-

---

मुनिश्रेष्ठ ज्या पुण्यवतीला स्वर्गाची शिडी समजतात, हे उत्तम नृपा, जेथें शत्रु नित्य मित्रतेस प्राप्त होत असतात, जिला उत्तमधर्मवान् पुण्यशीलांचें स्थान ह्मणून ह्मणतात, जेथें विष्णूची उत्तमप्रकारें आराधना करून देव स्वर्गास जातात २६-२८, त्या बदरीला, त्या स्थानाला मत्सरशून्य ऋषि हें सिद्धक्षेत्र आहे असें ह्मणतात. सर्वांचा ईश्वर विष्णु त्या विशाल बदरीला पाहण्यासाठीं २९ सायंकाळीं अमरगण, व तत्त्वदर्शी मुनि यांसहवर्तमान ऋषींनीं सेवन केलेल्या महा पुण्यवान् तपोवनांत शिरला. अग्निहोत्रांच्या योगानें आकुळ झालेल्या व पक्ष्यांच्या किलबिलाटांनीं संकुल झालेल्या वेळीं, सर्व पक्षी घरट्यांमध्यें बसूं लागले असतां, गायींची धार काढूं लागले असतां, ऋषी उपस्थान करूं लागले असतां, मुनिवीर सर्वतः समाधीमध्यें स्थित झाले असतां, सिद्ध जनार्दनाचें चिन्तन करूं लागले असतां ३०–३२. हवि शिजविण्यासाठीं अग्नीवर ठेवले असतां, कुंडांतील अग्नि पेटवूं लागलें असतां, त्याच अग्नींत समंततः हवन सुरू झालें असतां ३३, अतिथींचें पूजन होत असतां, सर्व जग संध्येमध्यें प्रविष्ट झालें असतां त्यावेळीं तो जनार्दन विष्णु देवांसह मुनिसेवित तपोमय बदरींत प्रविष्ट झाला. ईश्वर हरि आश्रमाच्या मध्यभागीं प्रवेश केल्यावर गरुडावरून खालीं उतरला. आणि दीपिकांनीं दीपित केलेल्या प्रदेशीं पुंडरीकाक्ष अमरांसह प्रथम राहिला ३४–३६. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलासयात्रे० शाहात्तरावा अध्याय समाप्त झाला ॥ ७६. ॥

वैशंपायनः— त्यानंतर मुनिगण देवाधिदेव आला आहे, असें पाहून, अग्निहोत्रें संपवून, श्रेष्ठ अतिथींचें पूजन करून, त्याचें स्वागत करूं लागले १. दीर्घतप करणारे व समाधी विषयीं ज्यांनीं दृढनिश्चय केला आहे असें ते सर्व मुनि होते. त्यांतील कित्येक जटा धारण करणारे होते. कित्येकांनीं मुंडन केलें होतें, कित्येक शिरा व धमनि यांची जाळीं ज्यांच्या त्वचेंतून स्पष्ट दिसत आहेत असे होते २. कित्येकांच्या शरीरांतील मज्जा अगदींच सुकून गेली होती. कित्येक अगदीं नीरस दिसत होते. कित्येक वेताळासारखे

स्तत्परायणाः ४ आसन्नमुक्तयः केचित्केचिद्ध्यानैकतत्पराः । ध्यानेन मनसा विष्णुं दृष्टवन्तस्तपोधनाः ५ संवत्सराशिनः केचित्केचिज्जलविचारिणः । शक्रस्य भयदातारः श्रुतिस्मृतिपरायणाः ६ वसिष्ठो वामदेवश्च रैभ्यो धूम्रस्तथैव च । जाबालिः कश्यपः कण्वो भरद्वाजोऽथ गौतमाः ७ अत्रिरश्वशिरा भद्रः शंखः शंखनिधिः कुणिः । पाराशर्यः पवित्राक्षो याज्ञवल्क्यो महामनाः ८ कक्षीवानंगिराश्चैव मुनिर्दिप्ततपास्तथा । असितो देवलस्तात वाल्मीकिश्च महातपाः ९ एते चान्ये च मुनयो द्रष्टुमीश्वरमव्ययम् । आदायार्घ्यं यथायोग्यमुटजात्स्वात्समाययुः १० ते च गत्वा हरिं कृष्णं विष्णुमीशं जनार्दनम् । भक्तिनम्रास्तदा देवं प्रणेमुर्भक्तवत्सलम् ११ नमोऽस्तु कृष्ण कृष्णेति देवदेवेति केशव । प्रणवात्मन् जगन्नाथ नताः स्म शिरसा हरे १२ कृष्ण विष्णो हृषीकेश केशवेति च सर्वदा । प्रणामप्रवणा विप्राः प्राहुरित्थं जगत्पतिम् १३ इदमर्घ्यमिदं पाद्यमिदं विष्टरमेव च । कृतार्थाः सर्वदा देव प्रसन्नो नो जगत्पतिः १४ किं कुर्मः किं नु नः कृत्यं कश्चिद्दोषः प्रभो हरे । इति प्रांजलयः सर्वे प्राहुर्देवस्य पश्यतः १५ कृष्णोऽपि तद्यथायोगमुपयुज्य सहामरैः । कृतं सर्वं मुनिवरा वर्धतां तप उत्तमम् १६ इति ब्रुवन् पुराणात्मा प्रतिस्तेन गरुत्मता । आसनं लंभयामास तत्रौ देवो जनार्दनः १७ कुशलं पृष्टवान् भूयो मुनीनां भावितात्मनाम् । अग्नि-

---

भयंकर दिसत होते. कित्येक अन्न दगडावर कुटून खाणारे होते. दुसरे कित्येक पर्णभक्षण करीत होते ३. कित्येक वेदविद्याव्रतस्नात होते. कित्येक महातपस्वी कांहींच खात नव्हते. कांहीं सर्वदा विष्णूचें स्मरण करणारे, त्याचे भक्त, तत्परायण असणारे होते ४. कित्येक ज्यांची मुक्ति अगदीं समीप आली आहे असे, कित्यक केवल ध्यानामध्येंच तत्पर, व कित्येक तपोधन ज्यांनीं मनानें ध्यानानेंच विष्णूस साक्षात् जाणलें आहे असे ५, कित्येक सर्व संवत्सरांत एकदा जेवणारे, कित्येक जल प्राशन करूनच रहाणारे, कित्येक आपल्या घोर तपाच्या योगानें इंद्राला भयभीत करणारे, श्रुति–स्मृतिपरायण ६, असे वसिष्ठ, वामदेव, रैभ्य, धूम्र, जाबालि, कश्यप, कण्व, भरद्वाज, गौतम ७, अत्रि, अश्वशिरा, भद्र, शंख, शंखनिधि, कुणि, पराशरपुत्र, पवित्राक्ष, महा मनाचा याज्ञवल्क्य ८. कक्षीवान्, अंगिरा, मुनि दीप्ततप, असित, देवल, महातपस्वी वाल्मीकि, हे व असेच दुसरे मुनि अव्यय ईश्वराचें दर्शन घेण्यासाठीं उचित अर्घ्य घेऊन आपापल्या पर्णशालेंतून बाहेर आले ९,१०. त्यानंतर ते भक्तीनें नम्र होऊन पापांचें हरण करणाऱ्या, अज्ञानाचें कर्षण करणाऱ्या, सर्व जगास व्यापणाऱ्या, जनांकडून याचना केल्या जाणाऱ्या, ईश व भक्तवत्सल देवास प्रणाम करते झाले ११. हे कृष्णा, कृष्णा, देवा, देवा, केशवा, तुला नमस्कार असो. हे प्रणवरूपी जगन्नाथा, हरे, आह्मी तुला मस्तकानें नमस्कार करतों १२. प्रणाम करावयासाठीं नम्र झालेले ब्राह्मण त्या जगत्पतीला हे कृष्णा, हे विष्णो, हे हृषीकेशा, व हे केशवा, असें सदा ह्मणत होते १३. हे देवा, हें अर्घ्य, हें पाद्य, व हें आसन; हे देवा, आह्मी सर्वदा कृतार्थ झालों आहों. आमच्यावर जगत्पति प्रसन्न झाला आहे. हे हरे, हे प्रभो, आह्मी काय करावें, आमचें कोणतें उचित कृत्य आहे ? आमच्या हातून कांहीं दोष झाला आहे कीं काय ? असें ते सर्व हात जोडून देव पहात असतांना ह्मणाले १४,१५. कृष्णही देवांसह अर्घ्यादिकांचा यथासंभव उपयोग करून " हे मुनिवरांनो, तुह्मी सर्व केलें आहे. तुमचें तप उत्तमप्रकारें वाढो. " असें ह्मणणारा तो पुरा-

होत्रेषु तपासि तथाभृत्येषु सर्वतः १८ एवमादिजगन्नाथः पृष्टवानीश्वरस्तदा । सर्वत्र कुशलं
तत्र ब्रूयुः कृष्णस्य सर्वतः १९ आतिथ्यं चक्रिरे ते नु नीवारैः फलमूलकैः। देवानामथ सर्वेषां
विष्णोः कृष्णस्य यत्नतः । आतिथ्यमुपयुंजानस्ततः प्रीतोऽभवद्धरिः २० [ ३७११ ] इति
श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां सप्तसप्ततितमोऽध्यायः ॥ ७७ ॥
वैशंपायन उवाच ॥ ततः स भगवान्विष्णुर्दुर्विज्ञेयगतिः प्रभुः । यत्र पूर्वं तपस्तप्तमात्मना
यादवेश्वरः १ गंगायाश्चोत्तरे तीरे देशं द्रष्टुमुपागतः । स्वयमेव हरिः साक्षात्प्रविवेश तपो-
वनम् २ प्रविश्य सुचिरं देशं ददर्श च मनोरमम् । निषसाद ततस्तस्मिन्नाश्रमे पुण्यवर्धनः ३
समाधौ योजयामास मनः पद्मनिभेक्षणः । किमप्येष जगन्नाथो ध्यात्वा देवेश्वरः स्थितः ४
स्थिते देवगुरौ तत्र समाधौ दीपवद्धरौ । तत्र शब्दो महाघोरः प्रादुरासीत्समंततः ५ खाद
खादत मोदत यात यात मृगानिमान्। भेषयेह शुनः सर्वान्प्रसादाच्छार्ङ्गधन्वनः ६ एष विष्णुरयं
कृष्णो हरिरीश इतोच्युतः । नमोस्तु विष्णो देवेश स्वामिन्माधव केशव ७ इत्यादिशब्दः
सुमहानाविरासीत्तदा निशि । ततश्च सुमहानादः सिंहानां मृगविद्विषाम् ८ धावतां च शुनां
राजन्मृगाननुविनर्दताम् । मृगाणां भीतियुक्तानामृक्षाणां द्वीपिनां तथा ९ गजानां नदतां
राजन्बृंहितं च ततस्ततः । महावातसमुद्भूतक्षुभितस्येव वारिधेः १० नादस्त्रैलोक्यवित्रासः
प्रादुरासीत्तदा निशि । श्रुत्वा शब्दं हरिर्देवस्तादृशं तत्र धिष्ठितः ११ समाधिक्षोभमासाद्य

---

ण्यात्मा अतिशय संतुष्ट झाला. त्यानें गरुडाकडून आसनपरिग्रह करविला. नंतर रात्रीं
त्या जनार्दन देवानें ज्यांचें चित्त अतिशय सुसंस्कृत झालें आहे अशा मुनींना पुनः अग्नि-
होत्र, तप व भृत्यवर्ग यांविषयीं कुशल विचारिलें १६–१८. तेव्हां त्या जगन्नाथ ईश्व-
रानें असें विचारिलें असतां ते सर्वजण सर्वांविषयींचें सर्वप्रकारें कुशल कृष्णाला सांगते
झाले १९. त्यांनीं नीवारधान्य, फळें, मुळें, इत्यादिकांच्या योगानें त्या व्यापी कृष्णाचें व
सर्व देवांचें मोठ्या यत्नानें आतिथ्य केलें. त्यांच्या आतिथ्याचा स्वीकार करतांना हरि
फार प्रसन्न झाला २०. इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० कैलासया० सत्त्याहात्तरावा
अध्याय समाप्त झाला ॥ ७७. ॥
वैशंपायनः— त्यानंतर ज्याची गति दुर्विज्ञेय आहे असा यादवेश्वर भगवान् प्रभु
विष्णु पूर्वीं स्वतः जेथें तप केलें होतें १ तेथें गंगेच्या उत्तर तीरावर चांगली भूमि पहा-
ण्यासाठीं गेला. तो साक्षात् हरि स्वतःच तपोवनांत शिरला २. त्यांत जाऊन पुष्कळवेळ
तो मनोहर देश पहात होता. नंतर तो पुण्यवर्धन त्या आश्रमांत बसला ३. त्या कमल-
नयनानें समाधीमध्यें आपलें मन नियुक्त केलें. तो देवेश्वर जगन्नाथ कांहींसें ध्यान करीत
बसला ४. तेथें तो देवगुरु हरि समाधीमध्यें निवात दीपज्योतीप्रमाणें स्थित असतांना
तेथें समंततः असा महाघोर शब्द व्यक्त झाला ५. खा, तुझी खा; आनंद करा, जा जा
या मृगांवर जा. येथें शार्ङ्गधनुर्धराच्या प्रसादानें सर्व कुत्र्यांस पाठीव ६. हा विष्णु, हा
कृष्ण, हा येथें हरि, ईश व अच्युत आहे. हे विष्णो, देवेशा, स्वामिन्, माधवा,
केशवा, तुला नमस्कार असो ७. असा मोठा शब्द त्यावेळीं रात्रीं तेथें प्रादुर्भूत झाला.
त्यानंतर पशूंच्या सिंहसंज्ञक शत्रूंचा, मृगाच्या मागून गुरगुरत व धांवत जाणाऱ्या
कुत्र्यांचा, भीतियुक्त पशूंचा, आस्वलांचा, व्याघ्रांचा, गुड्गुड् असा बृंहित
शब्द करणाऱ्या गजांचा, महावातांनीं क्षुब्ध करून सोडलेल्या समुद्राच्या ध्वनीप्रमाणें,

विश्वस्य च जगत्पतिः। ततः संचिन्तयामास कोऽयमेष महास्वनः १२ कस्यायमीदृशः शब्दः स्तुतियुक्तो मम त्विति । अहोऽस्मिन्मृगयाशब्दः शुनां संचारतां वने १३ मृगाणामथ सर्वेषां नादश्च सुमहानयम् । व्यामिश्रस्तुतियुक्ताभिर्वाग्भिर्मम समंततः १४ इति संचिन्त्य मनसा दिशो विप्रेक्ष्य सर्वतः । तत आस्ते हरिस्तत्र ज्ञातुं तस्य समुद्भवम् १५ ततो मृगाः समाधावन्यत्र तिष्ठति केशवः । तांश्चैवानुचरो राजन्सगणः समपद्यत १६ अथ वै दीपिका राजञ्छतशोऽथ सहस्रशः । ततस्तमोऽपि व्यनशद्दिवेव समपद्यत १७ ततोऽनु भूतसंघाश्च समदृश्यन्त तत्र ह । पिशाचाश्च महाघोरा नदन्तोबहुविस्वनम् १८ भक्षयन्तोऽथ पिशितं पिबन्तो रुधिरं बहु । प्रादुरासन्महाघोराः पिशाचा विकृताननाः १९ हन्यमाना हता राजन्पतन्तः पतिता मृगाः । इतश्चेतश्च धावन्तो बाणैर्विद्धा मृगा द्विपाः २० ततो मृगसहस्राणि समुदीर्णानि भारत । यत्रासौ तिष्ठते देवस्तत्र यातानि भारत २१ अन्तरीकृत्य देवेशं स्थितानीत्यनुशुश्रुमः । पिशाच्यो विकृताकाराः करालारोमहर्षणाः २२ पुत्रवत्यः समापेतुर्यत्र तिष्ठति केशवः । श्वगणस्तत्र राजेंद्र चरत्येवं ततस्ततः २३ ततः स भगवान्विष्णुः सर्वमालोक्य विष्ठितः । विस्मयं परमं गत्वा पश्यन्नास्ते स्म केशवः २४ कस्यैष विस्तृतो नादः कस्य कार्यं

---

फारच मोठा नाद तेथें झाला. त्यावेळीं रात्रीं त्रैलोक्यास भिवविणारा तो नाद प्रादुर्भूत झाला. तेथें बसलेल्या विश्वपति व जगत्पति देव हरीची तो तशा प्रकारचा शब्द ऐकून, समाधि तुटली. त्याचें चित्त क्षुब्ध झालें. त्यानंतर त्यानें मनांत म्हटलें, ‘ कोण हा महाध्वनि ? ८-१२. हा असला ध्वनि कोणाचा आहे ? हा माझ्या स्तुतियुक्त आहे. ’ ( कांहींवेळ थांबून ) ‘ हां, समजलों. पण काय आश्चर्य आहे, या वनांतही मृगयेचा शब्द ऐकूं येतो ! अरण्यांत संचार करणाऱ्या कुत्र्यांचा व दुसऱ्या सर्व पशूंचा हा अति मोठा नाद आहे. तो समंततः माझ्या स्तुतियुक्त वाणींनीं मिश्रित झाला आहे ’ १३,१४. असा मनानें विचार करून व सर्व दिशांकडे पाहून हरि तेथें त्या महानादाचा उद्गम कसा व कोणापासून होत आहे तें पहात राहिला १५. इतक्यांत केशव जेथें राहत होता तेथें सर्व पशु धांवत आले. राजा, त्यांच्या मागोमाग गणांसह त्यांचा अनुचरही आला १६. जनमेजया, त्याच्यापाशीं शेंकडों व हजारों दीपिका ( मशाली ) होत्या. त्यामुळें त्या तपोवनांतील अंधकारही नाहींसा झाला. दिवसासारखा जिकडे तिकडे प्रकाश पडला १७. त्याच्या मागून तेथें भूतसंघ दिसले. अतिशय विक्राळ ओरडणारे महाघोर पिशाच पुष्कळ मांस खात व रक्त पीत आपापलीं विक्राळ तोंडें पुढें करून तेथें प्रकट झाले १८,१९. राजन्, त्यांनीं बाणांच्या योगानें जर्जर केलेले पशु व हत्ती इतस्ततः पळत सुटले. कांहीं मारले जाणारे पशु पडत होते व कांहीं मारले गेलेले भूमीवर पडले होते २०. हे भारता, इतक्यांत भयभीत झालेलीं सहस्रावधि जनावरें जेथें तो देव होता तेथें गेलीं व त्या देवेशाला आपल्या आड करून उभीं राहिलीं, असें आम्ही ऐकलें आहे. ज्याचा आकार अतिशय विक्राळ आहे अशा भयंकर, अंगावर रोमांच उभे करणाऱ्या पुत्रवाल्या पिशाच स्त्रियाही जेथें केशव होता तेथें आल्या. हे राजेंद्रा, तसाच कुत्र्यांचा समुदायही तेथेंच येऊन इतस्ततः फिरूं लागला २१-२३. तेव्हां तेथें विशेषरीतीनें स्थित असलेला भगवान् सर्वव्यापी केशव तें सर्व पाहून व आतिशय विस्मित होऊन त्या सर्वा-

जनोऽपतत् । को नु मां स्तौति भक्त्या वै भविष्ये प्रीतिमानहम् २५ कस्य मुक्तिः समायाता प्रीते मयि सुदुर्लभा । इति संचिन्त्य भगवानास्ते प्राकृतवद्धरिः २६ [ ३७३७ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि अष्टसप्ततितमोऽध्याय. ॥ ७८ ॥

वैशंपायन उवाच ।। तेषामनु महाघोरौ पिशाचौ विकृताननौ । प्रांशुपिंगलरोमाणौ दीर्घजिह्वौ महाहनू १ लंबकेशौ विरूपाक्षौ हीहीहाहेति वादिनौ । खादन्तौ मांसपिटकं पिबन्तौ रुधिरं बहु १ आन्त्रवेष्टितसर्वांगौ दीर्घौ कृशकृतोदरौ । लंबमानमहाप्रान्तशूलप्रोतशिरोधरौ ३ कर्षन्तौ शवयूथानि बाहुभ्यां तत्र तत्र ह । हसन्तौ विविधं हासं स्वजातिसदृशं नृप ४ वदन्तौ बहुरूपाणि वचांसि प्राकृतानि च । कंपयन्तौ महावृक्षान्रुपादपघट्टनैः५ सृक्किणी लेलिहन्तौ च दन्तान्कटकटायिनौ । अस्थिस्नायुसमाकीर्णौ धमनीरज्जुसंततौ ६ वदन्तौ कृष्ण कृष्णेति माधवेति च संततम् । कदा नु द्रक्ष्यते विष्णुः स इदानीं क्व तिष्ठति ७ स्वामिनः कुत्र वसतिः कुतो द्रष्टुं यतामहे । अत्र वा कुत्र देवेशः कुतो नु स्थास्यते हरिः ८ कुतः पद्मपलाशाक्षः साक्षादिन्द्रानुजो हरिः । यमाहुः पुण्डरीकाक्षं ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ९ तमजं पुरुषं विष्णुं द्रष्टुमभ्युद्यता वयम् । अन्तकाले जगन्नाथं प्रविवेश जगत्रयम् १० तमजं विश्वकर्तारं कुतो द्रक्ष्याम सांप्रतम् । यस्य विस्तार एवैष लोकः प्राणि-

---

कडे पहातच राहिला २४. हा कोणाचा विस्तृत नाद आहे ? हा कोणाचा लोकसमुदाय येथें आला आहे ? माझें स्तवन मोठ्या भक्तीनें कोण करीत आहे ? कोणावर मी संतुष्ट व्हावें ? मी प्रसन्न झालों असतां कोणाची अति दुर्लभ मुक्ति समीप आली आहे ? इत्यादि विचार करीत भगवान् हरि एकाद्या प्राकृताप्रमाणें तेथें राहिला २६. इति श्रीमहा. खि. हरि. भवि. अठ्याहात्तरावा अध्याय समाप्त झाला. ॥ ७८ ॥

वैशंपायनः--त्या सर्वांच्या मागून दोन महाघोर, विक्राळ तोंडाचे, ज्यांचे रोम उंच उभारलेले व पिंगलवर्ण आहेत, ज्यांच्या जिह्वा लांब व हनवट्या मोठ्या आहेत १, केंस लांब आहेत, नेत्र विरूप आहेत, जे ही–ही–हा–हा–असें म्हणत आहेत, जे दोघेही जणूं काय मांसाच्या पेट्याच अशीं दुसऱ्यांचीं शरीरें खात आहेत, पुष्कळ रक्त पीत आहेत २, ज्यांचीं सर्व अंगें आंतड्यांनीं वेष्टित झालेलीं आहेत, जे दीर्घ असून ज्यांचीं उदरें मात्र कृश आहेत, ज्यांनीं लांब व मोठ्या पात्यांच्या शूलास मस्तकें टोंचून घेतलीं आहेत ३, जे ठिकठिकाणीं शवांच्या समूहांस आपल्या बाहूंनीं बरोबर ओढून आणीत आहेत. हे राजा, जे आपल्या जातीला साजेल असें नानाप्रकारचें हास्य करीत आहेत ४, जे नानाप्रकारचीं प्राकृत भाषणें करीत आहेत, जे आपल्या मांड्यांच्या धक्यांनीं मोठमोठ्या वृक्षांनाही कांपवीत आहेत ५, जे जिभल्या चाटीत असून दांत कडकड खात आहेत, जे अस्थि व स्नायु यांनीं व्याप्त असून, धमनीरूपी रज्जूंनीं बांधले गेले आहेत ६, जे सतत कृष्ण, कृष्ण, माधव, असें तोंडानें म्हणत आहेत, व जे 'विष्णु केव्हां बरें दृष्टीं पडेल. यावेळीं तो कोठें बरें असेल ७. त्या स्वामीची वसति कोठें बरें आहे ? आह्मी त्याला कोठें पहाण्याचा प्रयत्न करावा बरें ? तो देवेश हरि येथें कोठेंसा आहे ? साक्षात् इंद्रानुज, पद्मपत्राक्ष हरि कोठें आहे ? ज्या पुंडरीकाक्षाला ब्रह्मवेत्ते जन ब्रह्म असें ह्मणतात तो कसा भेटेल ? ८,९. त्या अज विष्णु पुरुषास पहावयास आह्मी उद्यत झालों आहों. कारण अंतकाळीं जगत्रय त्या जगन्नाथामध्यें प्रविष्ट होत असतें १०. त्या

निवासिनः ११ तं द्रष्टुं देवमीशानं यतामः सांप्रतं हरिम् । दशा घोरतमा लोके विद्विष्टा सर्वजन्तुभिः १२ पैशाचीयं समुत्पन्ना कथं नौ प्राविशद्बलात् । नरमांसास्थिकलुषा सर्वभीतिप्रदायिनी १३ अहो नो दुष्कृतं कर्म प्राक्तने कर्मसंचये । अत्रैव महती प्रीतिर्वर्तते सर्वदा तथा १४ यावन्नौ दुष्कृतं कर्म तावत्स्थास्यति तादृशी । दशा सा सर्वविद्विष्टा प्राणिपीडनकारिणी १५ सर्वथा दुष्कृतं कर्म बहुभिर्जन्मसंचयैः । तस्माद्धि तत्फलं घोरमद्यापि न निवर्तते १६ यतावः स्म प्राणिनो हन्तुं श्वगणैः सह सांप्रतम् । तथा हि प्राणिनो लोके बाल्यमादौ समास्थिताः १७ अज्ञानावृतचित्ताश्च कृत्याकृत्यं न जानते । तथा यौवनिनो भ्रान्ता विषयैर्बहुलीकृताः १८ यतन्ते श्रेयसे नैव ततो विषयसंस्थिताः । विषयाविष्टचित्ता हि मनुष्या न विजानते १९ तथा च वृद्धभावे तु व्याधिभिर्बहुभिर्वृताः । ज्वरादिभिर्महाघोरैर्नानादुःखविधायिभिः २० यतन्ते न हि वै श्रेयो विनष्टेन्द्रियगोचराः । ततो मृता गर्भवासे वसन्ति सततं नराः २१ विण्मूत्रकलिले घोरे दुःखैर्बहुभिराचिताः । च्यवन्ते तु ततो घोराद्गर्भात्संसारमण्डले २२ परस्परं विहिंसन्तः कुर्वन्तः कर्मसंचयम् । महत्येवं सदा घोरे संसारे दुःखसंकुले २३ पापानि बहुरूपाणि कुर्वतेऽज्ञानतस्तदा । संसारस्यैष महिमा विस्तृतः सर्व-

---

अज विश्वकर्त्याला सांप्रतकालीं आह्मी कोठें पहावें. ज्या देवाचा हा प्राणियुक्त लोक ह्मणजे विभूति विस्तार आहे त्या ईशान हरि देवास पाहण्याकरितां आह्मी सांप्रतकालीं प्रयत्न करीत आहों. या लोकांतील सर्व प्राण्यांनीं जिचा द्वेष केला आहे अशी ही अतिशय घोर पैशाची दशा उद्भवली आहे. ती बलात्कारानें आमच्यामध्यें कशी प्रविष्ट झाली ? ही दशा नरमांस व अस्थि यांनीं कलुषित झाली आहे. ती सर्वांस भीति देणारी आहे ११-१३. हाय हाय ! प्राक्तन पापसंचयामध्यें केवढें हें दुष्कर्म ! पण आमची याच कर्मामध्यें सदा मोठी प्रीति असते १४. व जोंपर्यंत तें आमचें पाप आहे तोंपर्यंत ती सर्वांच्या द्वेषास कारण होणारी व सर्व प्राण्यांस पीडा देणारी दशा तशीच रहाणार. सारांश, आह्मी अनेक जन्मांमध्यें सर्वथा दुष्कर्मच केलें होतें. ह्मणून त्याचें घोर फल अद्यापि निवृत्त होत नाहीं १५,१६. सांप्रतकाळीं आह्मी कुत्र्यांच्या समूहासहवर्तमान प्राण्यांना मारावयास सज्ज झालों आहों. त्याचप्रमाणें या लोकांतील प्राणी प्रथम बाल्याचा आश्रय केलेले व ज्यांचें चित्त अज्ञानानें आवृत झालें आहे असें असतात. त्यामुळें कृत्य व अकृत्य जाणत नाहींत. तसेच ते तरुण झाले असतां भ्रांत होतात. विषय त्यांना परवश करितात. त्यामुळें विषयानिष्ठ झालेले ते आपल्या कल्याणासाठीं मुळींच यत्न करीत नाहींत. कारण ज्यांच्या चित्तांत विषयांनीं प्रवेश केला आहे असे मानव आपलें हित जाणत नाहींत १७-१९. पुढें तें वृद्धभावास प्राप्त झाले असतां ज्वरादि महा घोर व नाना दुःखदायी अनेक व्याधींनीं परिवेष्टित होतात २०. नंतर ते इंद्रियांच्या असामर्थ्यामुळें विषयभोगशून्य झालेले असले तरी आपल्या कल्याणाविषयींही प्रयत्न करूं शकत नाहींत. त्यानंतर मरून गेलेले ते नर सतत विष्ठा व मूत्र यांनीं मलिन झालेल्या घोर गर्भवासांत रहातात. शेवटीं अनेक दुःखांनीं व्याप्त झालेले ते घोर गर्भांतून संसारमंडलांत पडतात २१,२२. नंतर परस्परांची भयंकर हिंसा करणारे ते कर्मांचा संचय करतात. याप्रमाणें सदा घोर व दुःखांनीं व्याप्त अशा मोठ्या संसारांत ते अडकून पडतात २३. त्यावेळीं अज्ञानतः ते अनेक प्रकारचीं पापें करितात. सर्व प्राण्यांमध्यें हा

जन्तुषु २४ अच्छेद्यः शस्त्रसंपातैरुपायैर्बहुभिः सदा । एतस्मान्न निवर्तन्ते मर्त्याः प्राकृतबुद्धयः २५ इमं हत्वा मनुष्येन्द्र मिदमस्माद्धराम्यहम् । चोरयित्वा धनमिदं हरिष्याम्यादराम्यहम् २६ निर्भर्त्स्यैनमिमं शांतं हरिष्यामि धनं बली । इत्यादि व्याकुला मूर्खा यतन्ते प्राणिपीडनम् २७ अस्यैव दुःखमूलस्य संसारस्य सदा हरिः । भेषजं सर्वथा देवः शंखचक्रगदाधरः २८ आदिदेवः पुराणात्मा आत्मा ब्रह्मविदां सदा । ते वयं सर्वयत्नेन द्रक्ष्यामः सर्वथा हरिम् । इत्थं पिशाचौ भाषन्तौ प्रादुरास्तां हरेः पुरः २९ [ ३७६६ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायामेकोनाशीतितमोऽध्यायः ॥ ७९ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः स भगवान्विष्णुः पिशाचौ मांसभक्षकौ । ददर्शाथ महाघोरौ दीपिकाधारिणौ हरिः १ विलोकयांचक्रतुस्तौ पिशाचौ देवकीसुतम् । स्थितं सुखासने विष्णुं दृष्ट्वा लोकेश्वरेश्वरम् २ तौ च गत्वा समुद्देशं पिशाचौ केशवस्य ह । ततस्तावूचतुर्विष्णुमन्तरीकृत्य केशवम् ३ को भवान्कस्य वा मर्त्यः कुतश्चागम्यते त्वया । किमर्थमिह संप्राप्तो वने घोरे मृगाकुले ४ निर्मनुष्ये द्वीपिवृते पिशाचगणसेविते । श्वापदैः सेव्यमाने च विपिनेव्याघ्रसंकुले ५ सुकुमारोऽनवद्यांगः साक्षाद्विष्णुरिवापरः । पद्मपत्रेक्षणः श्यामः पद्माभः श्रीपतिः स्वयम् ६ अस्मत्प्रीतिकरः साक्षात्प्राप्तो विष्णुरिवापरः । देवो वा यदि यक्षो वा गन्धर्वः किन्नरोऽपि वा ७ इंद्रो वा धनदो वापि यमोऽथ वरुणोऽपि वा ।

---

संसाराचा विस्तृत महिमा आहे २४. शस्त्रांच्या घावांनीं व त्याचप्रमाणें अनेक उपायांनीं तो सदा अच्छेद्य ( न तोडतां येण्यासारखा ) आहे. याच्यापासून प्राकृतबुद्धि मर्त्य निवृत्त होत नाहींत २५. या श्रेष्ठ मनुष्यास मारून मी त्याच्यापासून हें हरण करीन. मी हें धन चोरून नेईन. हें याला देईन २६. मी बलवान् आहें. यास्तव या शांत व दुर्बल मनुष्याला भिवनून मी त्याचें धन लांबवीन. इत्यादि विचारांनीं व्याकुळ झालेले मूर्ख प्राण्यांना पीडा देण्याविषयींच सतत प्रयत्न करीत असतात २७. याच दुःखमूळ संसाराचें सर्वथा उत्तम औषध सदा शंख-चक्र-गदाधर देव विष्णु आहे २८. तो आदिदेव, पुराणात्मा व सदा ब्रह्मवेत्त्यांचा आत्मा आहे. यास्तव असले हे आह्मी सर्व प्रयत्नानें सर्वथा हरीला पाहूं.' असें आपसांत भाषण करणारे ते दोघे पिशाच हरीच्या अग्रभागीं प्रकट झाले २९. इति श्रीम० खि० हरि० भवि० कैला० एकूणऐंशीवा अध्याय समाप्त झाला. ॥ ७९ ॥

वैशंपायनः—त्यानंतर भगवान् विष्णु हरीनें त्या मांसभक्षक, महाघोर व दिवट्या धारण करणाऱ्या दोघां पिशाचांस पाहिलें १. त्या पिशाचांनींही लोकेश्वराचा ईश्वर जो विष्णु देवकीपुत्र त्याला सुखासनावर बसलेलें पाहिलें २. तेव्हां ते दोघे केशव जेथें होता तेथें जाऊन व तो केशव नव्हेच असें समजून त्या विष्णूला ह्मणाले, ' तूं कोण, व कोणाचा मानव आहेस ? तूं कोठून येत आहेस ? या पशूंनीं भरलेल्या घोर वनांत कशाकरितां आला आहेस ? ३,४. ज्याच्यामध्यें मनुष्यें मुळींच नाहींत, व्याघ्रांनीं व्याप्त, पिशाच गणांनीं सेवित, श्वापदांनीं सुसेवित, व हत्तींनीं भरलेल्या अशा या अरण्यांत ज्याचें अंग सुकुमार आहे व शरीर निर्दोष आहे, असा साक्षात् दुसऱ्या विष्णूप्रमाणेंच, तूं कोण आला आहेस ? कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत असा, श्यामवर्ण व कमलाप्रमाणें ज्याची अंगकांति आहे असा तूं स्वतः श्रीपतीच आहेस कीं, काय ? ५,६. जणूं काय आमच्या मनाला संतोष देणारा तूं साक्षात् विष्णूच येथें प्राप्त झाला आहेस.

एकाकी विपिने घोरे ध्यानार्पितमना इव ८ ब्रूहि मर्त्य यथा तत्त्वं ज्ञातुमिच्छामि मानद ।
एवं पृष्टः पिशाचाभ्यामाहाविष्णुरुरुक्रमः ९ क्षत्रियोऽस्मीति मामाहुर्मनुष्याः प्रकृतिस्थिताः ।
यदुवंशे समुत्पन्नः क्षात्रं वृत्तमनुष्ठितः १० लोकानामथ पातास्मि शास्ता दुष्टस्य सर्वदा ।
कैलासं गंतुकामोऽस्मि द्रष्टुं देवमुमापतिम् ११ इत्येवं मम वृत्तान्तः कथ्यतां कौ युवामिति।
युवामिह समायातौ किमर्थं ब्राह्मणाश्रमम् १२ एषा हि महती पुण्या नानाविप्रनिषेविता।
बदरीयं समाख्याता न क्षुद्रैराश्रिता क्वचित् १३ तपस्विभिस्तपोयुक्तैर्जुष्टा सिद्धनिषेविता ।
श्वगणा नात्र दृश्यन्ते पिशाचा मांसभोजनाः १४ न हन्तव्या मृगाश्चात्र मृगया नात्र वर्तते।
न तु क्षुद्रैः प्रवेष्टव्या न कृतघ्नैर्न नास्तिकैः १५ अहमस्य तु देशस्य रक्षिता नात्र संशयः ।
व्यतिक्रमो यदि भवेत्तस्य शास्तास्मि यत्नतः १६ कौ भवन्तौ क्व नु युवां कस्येयं महती
चमूः । नातः परं प्रवेष्टव्यमृषयस्तत्र संस्थिताः १७ विघ्नस्तत्र प्रवर्तेत तपःसु च तपस्विनाम्।
इहैव स्थीयतां तावद्वक्तव्यं च ततः सुखम् १८ अन्यथाहं निषेद्धा स्यां बलद्वाक्यैस्तथैव च ।
वैशंपायन उवाच ॥ एवं पृष्टौ पिशाचौ तु वक्तुमेवोपचक्रतुः १९ तयोरेको महाघोरः
पिशाचो दीर्घबाहुकः । उवाच वचनं तत्र यथा हृदि समर्पितम् २० पिशाच उवाच ॥

---

तूं कोणी यक्ष आहेस, कीं देव आहेस, कीं गंधर्व आहेस, कीं किन्नर आहेस; इंद्र आहेस कीं कुबेर आहेस ? कीं यम आहेस, कीं वरुण आहेस ? कारण तूं एकटाच या घोर वनांत ध्यानांत मन तल्लीन करून बसला आहेस. यास्तव हे मर्त्या, हे मानदा, काय असेल तें खरें सांग. तें जाणण्याची आह्मांला इच्छा झाली आहे.' त्या दोघां पिशाचांकडून असें विचारलें गेलेला अति पराक्रमी विष्णु ह्मणतो-प्रकृतींत स्थित असलेले लोक मी क्षत्रिय आहें, असें मला ह्मणतात. कारण यदुवंशांत उत्पन्न होऊन मी क्षात्रवृत्ताचें अनुष्ठान करीत असतों ७–१०. मी लोकांचा पालक आहे. दुष्टांचा सदा शास्ता आहे. उमापति देवाचें दर्शन घेण्यासाठीं मी कैलासास जाण्याची इच्छा करीत आहे ११. हा माझा वृत्तान्त आहे. आतां तुह्मी दोघे कोण तें सांगा. तुह्मी उभयतां या ब्राम्हणांच्या आश्रमास कशासाठीं आला ? १२. कारण ही बदरी या नांवानें प्रख्यात असलेली मोठी पुण्यवती भूमि अनेक ब्राह्मणांकडून निषेवित ( सेवन केली गेलेली ) आहे. क्षुद्रांकडून हिचा केव्हांही आश्रय केला जात नाहीं १३. तपोयुक्त तपस्व्यांकडून हिचें सेवन केलें जातें. ही सिद्ध निषेवित आहे. हिच्यामध्यें कुत्र्यांचें समुदाय व मांसभक्षक पिशाच आढळत नसतात १४. येथील पशूंना मारीत नाहींत. येथें मृगया करितां येत नाहींत. कृतघ्न, नास्तिक व क्षुद्र यांच्याकडून ही प्रवेश केली जाण्यासही योग्य नाहीं १५. मी या प्रदेशाचा रक्षक आहे, यांत कांहीं संशय नाहीं. येथें जर कोणी मर्यादेचें उल्लंघन केलें तर मी त्याला मोठ्या यत्नानें शासन करीन १६. यास्तव तुह्मी दोघे कोण ? कोठें जातां ? ही मोठी सेना कोणाची आहे ? आतां याच्यापुढें तुह्मी जाऊं नये. कारण तेथें यति रहात असतात १७. तुह्मी पुढें गेलात तर तपस्व्यांच्या तपांत मोठें विघ्न येईल. यास्तव तुह्मी अगोदर येथेंच रहा. तुमचा अभिप्राय खुशाल सांगा १८. नाहींतर मी जसा वाक्यांनीं तसाच स्वबलानें तुह्माला प्रतिबंध करीन. वैशंपायनः— याप्रमाणें केशवाकडून विचारले गेलेले ते दोघेही त्यास उलट बोलूं लागले १९. त्यांतील एक महाघोर व दीर्घबाहु पिशाच त्यावेळीं जणूं काय हृदयामध्यें

श्रूयतामभिधास्यामि समाहितमना भव । नमस्कृत्य जगन्नाथं हरिं कृष्णं जगत्पतिम् २१ आदिदेवमजं विष्णुं वरेण्यमनघं शुचिम् । वक्ष्यामि सकलं यद्वत्तथा शृणु यदीच्छसि २२ घण्टाकर्णोऽस्मि नाम्नाहं पिशाचो घोरदर्शनः । मांसादो विकृतो घोरः साक्षान्मृत्युरिवापरः २३ धनदस्यानुगताहं साक्षाद्रुद्रसखस्य च । ममायमनुजः साक्षादन्तकस्यान्तकोऽप्यहम् २४ मृगयेयं सुमहती विष्णोः पूजार्थमित्युत । ममेयं वर्तते सेना श्वगणोपि ममैव तु २५ आगतोऽहं महाशैलात्कैलासाद्भूतसेवितात् । अहं पिशाचवेषेण संविष्टः पापकर्मकृत् २६ सततं दूषयन्विष्णुं घण्टामाबध्य कर्णयोः । मम न प्रविशेन्नाम विष्णोरिति विचिन्तयन् २७ अहं कैलासनिलयमासाद्य वृषभध्वजम् । आराध्य तं महादेवमस्तुवं सततं शिवम् २८ ततः प्रसन्नो मामाह वृणीष्वेति वरं हरः । ततो मुक्तिर्मया तत्र प्रार्थिता देवसन्निधौ २९ मुक्तिं प्रार्थयमानं मां पुनराह त्रिलोचनः । मुक्तिप्रदाता सर्वेषां विष्णुरेव न संशयः ३० तस्माद्गत्वा च बदरीं तत्राराध्य जनार्दनम् । मुक्तिं प्राप्नुहि गोविन्दान्नरनारायणाश्रमे ३१ इत्युक्तो देवदेवेन शूलिना ज्ञातवानहम् । तमेव परमं मत्वा गोविन्दं गरुडध्वजम् ३२ तस्मात्प्रार्थयमानः सन्मुक्तिदेशमहं गतः । अन्यच्च शृणु मे कार्यं यदि कौतूहलं तव ३३ पुरी द्वारवती नाम पश्चिमस्योदधेस्तटे । यदुवृष्णिसमाकीर्णा सागरोर्मिसमाकुलाम् ३४ अध्यास्ते स हरिर्विष्णुस्तां पुरीं पुरुषोत्तमः । द्रष्टुं लोकहितार्थाय वसन्तं द्वारकापुरे ३५ निर्गताः सांप्रतं

---

टोंचेल, असेंच भाषण करूं लागला २०. पिशाचः—ऐक. मी सांगेन. शांतचित्त हो. जगन्नाथ, हरि, जगत्पति, आदिदेव, अज, विष्णु, सेवनीय, निष्पाप व पवित्र कृष्णाला नमस्कार करून सर्व जसेंच्या तसेंच सांगतों. तुझी इच्छा असेल तर ऐक२१,२२. मी घंटाकर्ण या नांवाचा घोरदर्शन, मांसभक्षक, विक्राळ व घोरमुख साक्षात् दुसरा मृत्युच असा पिशाच आहें २३. प्रत्यक्ष रुद्राचा मित्र, अशा कुबेराचा मी अनुचर आहें. हा माझा अनुज आहे. मी प्रत्यक्ष अंतकाचाही अंतक आहें २४. विष्णूच्या पूजेकरितां मी ही फार मोठी मृगया करीत आहें. ही सेना व हा कुत्र्यांचा समुदायही माझाच आहे २५. भूतांनीं ज्याचें सेवन केलें आहे अशा कैलास महाशैलाहूनच मी आलों आहे. मी पापकर्में करणारा आहें ह्मणून या पिशाच वेषांत शिरलों आहे. मी सतत विष्णूला दूषण देत होतो. विष्णूचें नांव माझ्या कानांत शिरेल या भीतीनें मी सदा आपल्या कानांशीं घंटा बांधीत होतो २६,२७. नंतर मी कैलासावर राहणाऱ्या वृषभध्वजापाशीं गेलों. त्या महेश्वराची आराधना करून सतत त्या शिवाची स्तुति केली २८. तेव्हां प्रसन्न झालेला हर मला ह्मणाला, ‘ वर माग ’ तें ऐकून मी त्या देवापाशीं मुक्ति मागितली २९. तेव्हां मुक्तीविषयीं प्रार्थना करणाऱ्या मला त्रिलोचन पुनः ह्मणाला, ‘ सर्वांना मुक्ति देणारा एक विष्णुच आहे, यांत कांहीं संशय नाहीं ३०. यास्तव बदरींत जाऊन तेथें नर-नारायणांच्या आश्रमांत विष्णूची आराधना करून त्या गोविंदापासूनच मुक्ति मिळीव. ’ ३१. त्या शूलवान् देवदेवानें असें सांगितलें असतां मला हें कळलें. त्याच गरुडध्वज गोविंदाला श्रेष्ठ समजून त्याच्यापाशीं मुक्तीची प्रार्थना करावयासाठीं मी या प्रदेशीं आलों आहे. तुला कौतुक वाटत असेल तर माझें दुसरेंही एक कार्य ऐक ३२,३३. पश्चिम समुद्राच्या तीरीं द्वारवती या नांवाची नगरी आहे. सागराच्या लाटांनीं अतिशय आकुल होणारी ती यादव व वृष्णि यांनीं भरलेली आहे. तो हरि, विष्णु, पुरुषोत्तम सांप्रतकालीं त्या नगरींत

मर्त्य वयमेतैः सहानुगैः । विष्णुः सर्वेश्वरः साक्षाद्द्रष्टव्योऽस्माभिरथ वै ३६ लोकानां प्रभवः पाता कर्ता हर्ता जगत्पतिः । आदिः स हि समस्तस्य प्रभवः कारणं हरिः ३७ कर्ता समस्तस्य हरिः पुरातनः प्रभुः प्रभूणामपि यः सदात्मकः । तमादिदेवं वरदं वरेण्यं द्रष्टुं हरिं संप्रति संयता स्मः ३८ यस्य प्रसादाज्जगदेवमासीत्स्वप्राणिगन्धर्वमहोरगौघम् । देवं जगद्योनिमज जनार्दनं द्रष्टुं हरिं संप्रति संयता स्मः ३९ यस्योदराद्विश्वमिदं प्रभूतं लयं च तस्मिन्समुपैति कल्पे । तस्यैव साक्षाद्वशवर्ति विश्वं द्रक्ष्याम देवं पुरुषोत्तमं हरिम् ४० स्रष्टा च योऽसौ सकलस्य देवः पाता च हर्ता च हरिः स एव । द्रक्ष्याम नित्यं भुवनेश्वरं हरिं पुराणमाद्यं प्रभविष्णुमव्ययम् ४१ अजस्य कर्ता भुवनस्य गोप्ता भुवश्च कर्ता हरिरेक एव । तं योगिनो योगविशुद्धबुद्धिं लभेम तेनैव मतिः समाकुला ४२ निगीर्य विश्वं सकलं जगत्पतिः शेते शिशुत्वं समवाप्य साक्षात् । वटस्य पत्रे जगतां निवासः पादौ च विक्षिप्य करौ विधुन्वन् ४३ यस्योदरे देवमुनिः पुरातनो ददर्श लोकानखिलान्स मायया । प्रविश्य विश्वं सकलं यथावद्बहिर्यथाभूतमभूदिदं महत् ४४ निगीर्य विश्वं जगदादिकाले शेते महात्मा जलधेर्जलौघे । देव्या श्रिया चामरलोलहस्तया निषेव्यमाणः पुरुषोत्तमस्तदा ४५ नाभेश्च यस्याविरभूत्सपत्रं पद्मं महत्कांचनसप्रभं प्रभोः । जन्मास्पदं लोकगुरोर्यदासीद्विस्तारि पद्मं

---

आहे. लोकांच्या हिताकरितां द्वारकापुरामध्यें रहाणाऱ्या त्याला भेटण्यासाठीं आम्ही यावेळीं आपल्या या अनुगांसह निघालों आहों. हा मनुष्या, सर्वेश्वर विष्णु आज आम्हांला साक्षात् पहावयाचा आहे ३४-३६. तो सर्व लोकांचा उगम, पालक, कर्ता, हर्ता व जगत्पति आहे. तो हरि समस्त वस्तूंचा आदि पुरुष, उगमस्थान व कारण आहे ३७. समस्त वस्तूंचा कर्ता, पापांचा हर्ता, पुरातन, प्रभूंचाही प्रभु, व सद्रूप अशा त्या आदिदेव, वरद, वरेण्य, हरीला पहाण्यास यावेळीं आम्ही उद्युक्त झालों आहों ३८. ज्याच्या प्रसादामुळें अनेक प्रकारचे प्राणि, गंधर्व, महासर्प इत्यादिकांच्या समूहानें भरलेलें हें असलें जगत् होतें त्या जगाच्या कारणरूप, प्रकाशमान, अज, जनार्दन हरीचें दर्शन घ्यावयास आम्ही तयार झालों आहों ३९. ज्याच्या उदरांतून हें समस्त विश्व प्रकट होतें व कल्पसमाप्तीचे वेळीं ज्यामध्यें लीन होतें. त्याच्याच वशवर्ति हें सर्व विश्व आहे. त्या पुरुषोत्तम हरि देवास आम्ही आज साक्षात् बघूं ४०. जो देव या सर्वांचा स्रष्टा, पाता व हर्ता आहे तोच हरि होय. त्या भुवनेश्वर, हरि, पुराण, आद्य, प्रभविष्णु व अव्यय नित्याला आम्ही पाहूं ४१. ब्रह्मदेवाचा कर्ता, भुवनाचा रक्षक, व भूमीचा कर्ता एक हरिच. त्या योग्यांच्या योगविशुद्धबुद्धीला आम्ही प्राप्त होऊं. त्याच्या प्राप्तीच्या आशेनेंच आमची बुद्धि अतिशय आकुल झाली आहे ४२. तो जगत्पति जगाचा निवास (जगन्निवास) देव सर्व विश्व गिळून साक्षात् शिशुत्वास प्राप्त होऊन वटपत्रावर पायावर पाय ठेवून दोन्ही हात हालवीत शयन करतो ४३. तो पुरातन मार्कंडेय ज्याच्या उदरामध्यें प्रवेश करून मायेनें सर्व लोकांस व सर्व विश्वास, तें जसें बाहेर महत्परिमाणानें पसरलें आहे तसेंच, आंत पहाता झाला ४४. तो महात्मा देव पुरुषोत्तम जगाच्या आरंभसमयीं सर्व जग आपल्या उदरांतून बाहेर काढून समुद्राच्या जलौघांत, चामरामुळें हिचा हात चंचल झाला आहे, अशा देवी श्रीकडून सेविला जात, शयन करतो ४५. ज्या प्रभूच्या नाभिकमलापासून पाकळ्यांसह सोन्याप्रमाणें ज्याची प्रभा आहे असें मोठें कमळ

जगदादि सृष्टौ ४६ दधार यो भूतपतिर्महान्महीं दंष्ट्राग्रसंस्थापितरूढमूलाम्। नदन्महामेघ इवादिकाले कुर्वन्वराहो मुनिगीतमूर्तिः ४७ हरिः पुराणः पुरुषोत्तमः प्रभुः कर्ता समस्तस्य समस्तसाक्षी। यज्ञात्मको यज्ञपतिर्जगत्पतिर्द्रष्टुं तमीशं वयमुद्यतास्मः ४८ केचिद्बहुत्वेन वदन्ति देवमेकात्मना केचिदिमं पुराणम्। वेदान्त संस्थापितसत्वयुक्तं द्रष्टुं तमीशं वयमुद्यतास्मः ४९ अनेकमेकं बहुधा वदन्ति श्रुतिस्मृतिन्यायनिविष्टचित्ताः। आहुर्यमात्मानमजं पुराविदो द्रष्टुं तमीशं वयमुद्यतास्मः ५० यं प्राहुरीड्यं वरदं वरेण्यमेकान्ततत्वं मुनयः पुरातनाः। यं सर्वगं देवमजं जनार्दनं द्रष्टुं हरिं संप्रति संयता स्मः ५१ यस्मिन्विश्वमिदं प्रोतमादिकाले जगत्पतौ। तं द्रष्टुमभिसंवृत्ताः कं नु वक्ष्याम सांप्रतम् ५२ गच्छामो वयमन्यत्र गच्छ त्वं काममन्यतः। यदि ते रोचते मर्त्य यथेष्टं गच्छ सांप्रतम् ५३ रात्रिमध्यमनुप्राप्तं नात्र कार्या विचारणा। इत्युक्त्वा घोररूपोऽसौ पिशाचो विकृताननः ५४ तस्मिन्नेव समे देशे पीत्वा च रुधिरं बहु। भक्षयित्वा यथाकामं मांसराशिं विचक्षणः ५५ अपः संस्पृश्य तत्रैव पार्श्वे संस्थाप्य साधनम्। आंत्रपाशं महाघोरं संस्थाप्य विपुलं महत् ५६ आसनं कुशसंयुक्तं कृत्वा चाभ्युक्ष्य वारिणा। उत्सार्य श्वगणान्सर्वान्यत्नेन महता तदा ५७ सुखासनं समास्थाय समाधौ यतते

---

जगाच्या पहिल्या सृष्टींत प्रकट झालें. तें विस्तृत कमल लोकगुरूचें जन्मस्थान झालें ४६. जो महाभूतपति आदिकाळीं मुनींनीं ज्याची कीर्ति गायली आहे असें वाराह रूप करून महामेघांसारखी गर्जना करीत दाढेच्या अग्रभागीं स्थापिल्यामुळें जिचें मूळ रूढ झालें आहे अशा पृथ्वीला धारण करिता झाला ४७. तो पुराण, पुरुषोत्तम, प्रभु, कर्ता, सर्व वस्तूंचा सर्व साक्षी, यज्ञात्मक, यज्ञपति, जगत्पति आह्मांस पहावयाचा आहे. त्या ईशाला पहावयास आह्मी उद्यत झालों आहों ४८. कोणी त्या देवाला बहुत्वानें बोलतात, कित्येक त्या आदि व पुराणपुरुषास एकरूपानें बोलतात. पण आह्मी त्या वेदान्तसिद्धान्ताप्रमाणें सिद्ध केलेल्या सत्वयुक्त ( प्रत्यगात्मरूप ) ईशास पाहण्याची इच्छा करतों. व त्याकरितां आह्मी उद्यत झालों आहों ४९. पुराणवेत्ते व श्रुति-स्मृति-न्यायांमध्यें आपलें चित्त ठेवणारे पुरुष ज्या अज आत्म्यास एक, अनेक इत्यादि अनेक प्रकारें वर्णितात त्या ईशास पहावयास आह्मी उद्यत झालों आहों ५०. पुरातन मुनि ज्याला स्तुत्य, वरद, भजन करण्यास योग्य व अव्यभिचारी तत्त्वरूप ह्मणतात व ज्याला स्वर्गगामी, प्रकाशरूप, जन्मशून्य, जनार्दन ह्मणतात त्या हरीला सांप्रतकालीं आह्मी पहाण्यास उद्युक्त झालों आहों ५१. आदिकालीं ज्याच्यामध्यें हें विश्व ओवलेलें आहे त्या जगत्पतीला पहाण्यास आह्मी सर्व प्रयत्नानें सज्ज झालों आहों. पण आतां आह्मी हें कोणाला सांगावें ५२. असो; आह्मी दुसरीकडे जातों; तूंही आपल्या इच्छेप्रमाणें अन्यत्र जा. अरे मर्त्या, तुला जर आवडत असेल तर तूं आतां वाटेल तिकडे जा ५३. मध्यरात्र झाली आहे, ह्मणून कांहीं विचार करण्याचें कारण नाहीं. असें बोलून ज्याचें मुख विक्राळ आहे असा तो घोररूप पिशाच त्याच समप्रदेशीं पुष्कळ रक्त पिऊन यथेच्छ मांसराशी खाऊन जलस्पर्श करून, तेथें बाजूलाच पानसाधन ठेवून, विपुल, मोठा व महाघोर आंतड्याचा पाश लावून ५४-५६, कुशसंयुक्त आसन करून, त्याच्यावर पाणी शिंपडून मोठ्या यत्नानें त्यावेळीं सर्व कुत्र्यांच्या समूहास घालवून, व सुखासनावर बसून तो शहाणा कुत्र्यांचा स्वामी समाधीविषयीं प्रयत्न करूं लागला. त्यावेळीं एकाचित्त होऊन व

श्वपः । एकचित्तस्तदा भूत्वा नमस्कृत्य च केशवम् । इमं मंत्रं पठन्घोरः पिशाचो भक्तव-
त्सलम् ५८ नमो भगवते तस्मै वासुदेवाय चक्रिणे । नमस्ते गदिने तुभ्यं वासुदेवाय धीमते ५९
ओं नमो नारायणाय विष्णवे प्रभविष्णवे । मम भूयान्मनः शुद्धिः कीर्तनात्तव केशव ६०
जन्मेदमीदृशं घोरं मा भून्मम दुरासदम् । देवदूतो भविष्यामि स्मरणात्तव गोपते ६१ तव
चक्रप्रहारेण कायो नश्यतु मामक । मम भूयो भवो मा भूदेषा मे प्रार्थना विभो ६२
अर्थिनां कल्पवृक्षोऽसि दाता सर्वस्य सर्वदा । यत्र यत्र भवेज्जन्म तत्र तत्र भवान्हृदि ६३
वर्ततां मम देवेश प्रार्थनैषा ममापरा । नमस्तुभ्यं नमस्तुभ्यं भवत्वेवं सदा मम ६४
निर्विघ्ना प्रार्थना देव नमस्तेऽस्तु सदा मम । यदा मे मरणं भूयात्तदा मा भूत्स्मृतिभ्रमः ६५
दिने दिने क्षणं चित्तं त्वयि संस्थं भवत्विति । एवं प्रेरय मां देव मा भूत्ते चित्तमीदृशम् ६६
नृशंसोऽयं पिशाचोऽयं दयास्मिन्काभवेदिति । एवं चिन्तय मा देव भृत्यो मह्यमिति प्रभो ६७
परपीडा न मत्तोस्तु नमस्ते भगवन्प्रभो । इंद्रियाणींद्रियार्थेषु मा भूवन्सांप्रतं हि मे ६८
अन्तकाले ममाप्येवं प्रसादात्तव केशव । पृथिवी यातु मे घ्राणं रसनां यातु मे पयः ६९
सूर्यश्च यातु मे चक्षुः स्पर्शं यातु च मारुतः । श्रोत्रमाकाशमप्येतु मनः प्राणं च गच्छतु ७०
जलं मां रक्षतां नित्यं पृथिवी रक्षतां हरे । सूर्यो मां रक्षतां विष्णो नमस्ते सूर्यतेजसे ७१
वायुर्मां रक्षतां दुःखादाकाशं च जनार्दन । न मनः सर्वगं देव रक्षतां विषयान्तरे ७२ मनो

---

केशवास नमस्कार करून तो घोर पिशाच भक्तवत्सल देवास उद्देशून हा मंत्र ह्मणूं लागला ५७,५८. त्या चक्रधर भगवान् वासुदेवाला नमस्कार असो. तुज गदावान् व बुद्धिमान् वासुदेवाला नमस्कार असो. नारायणाला, व्यापकाला, प्रभु होण्याची इच्छा करणाराला ॐनमः । हे केशवा, तुझ्या नामादि कीर्तनामुळें माझ्या मनाची शुद्धि होवो ५९,६०. माझा अशाप्रकारचा दुर्धर्ष व घोर जन्म पुनः न होवो. हे इंद्रियांच्या ईशा, तुझ्या स्मरणानें मी देवदूत होईन ६१. तुझ्या चक्राच्या प्रहारानें माझें शरीर नष्ट होवो. हे विभो, माझा पुनर्जन्म न होवो, हीच माझी प्रार्थना आहे ६२. हे देवेशा, तूं याचकांचा कल्पवृक्ष आहेस. तूं सर्व वस्तूंचा सर्वदा दाता आहेस. जेथें जेथें जन्म होईल तेथें तेथें तूं माझ्या हृदयांत रहावेंस, ही माझी दुसरी प्रार्थना आहे. तुला नमस्कार असो; तुला नमस्कार असो; माझें सदा असें होवो. ६३,६४. हे देव, माझी प्रार्थना निर्विघ्नपणें सिद्ध होवो. तुला माझा सदा नमस्कार असो. जेव्हां मला मरण येईल तेव्हां माझ्या स्मृतीला भ्रम न होवो. ६५. प्रतिदिवशीं प्रतिक्षणीं माझें चित्त तुझ्या ठायीं स्थिर होवो. हे देवा, मला अशीच प्रेरणा कर. तुझें चित्त माझ्याविषयीं कठोर न होवो. हा निर्दय आहे, हा पिशाच आहे, याच्यावर काय दया करावयाची आहे, असें ह्मणूं नको. हे प्रभो, हे देवा, मी तुझा भृत्य आहें, असें समज ६६,६७. हे विभो, हे भगवन्, तुला नमस्कार असो. माझ्या हातून परपीडा न होवो. आतांच ( ह्मणजे या साधक अथवा जीवत्–अवस्थेंत ) माझी इंद्रियें शब्दादि विषयांमध्यें आसक्त न होवोत ६८. हे केशवा, तुझ्या कृपेनें अन्तकालीं माझेंही असें होवो. पृथ्वी माझ्या घ्राणास प्राप्त होवो. जल रसनेस, सूर्य माझ्या नेत्रास, मारुत स्पर्शेंद्रियास व आकाश श्रोत्रेंद्रियास प्राप्त होवो. मन प्राणामध्यें प्रवेश करो. नंतर हे हरे, जल मला सतत रक्षो. पृथ्वी माझें रक्षण करो. हे विष्णो, सूर्याप्रमाणें ज्याचें तेज आहे अशा तुला नमस्कार असो. सूर्य मला सुरक्षित करो ६९-७१. वायु व हे जनार्दना, आकाश माझें दुःखापासून रक्षण करो. परमात्म्यामध्यें

विपर्यये घोरे पुरुषान्हन्ति नित्यशः । पापेषु योजयेत्पुंसः परपीडात्मकेषु च ७३ मनस्तव-क्षतां देव भूयो भूयो जनार्दन । माभून्मनसि कालुष्यं मनो मे निर्मलं भवेत् ७४ कलुषं तस्य यच्चित्तं नरके पातयत्यमुम् । बाह्यानि निर्मलान्येवमिन्द्रियाणि भवंत्युत ७५ न तानि कार्यवन्तीह मनश्चेत्कलुषं भवेत् । नांगानि मुष्टिना मेध्यं गृहीत्वा यो व्यवस्थितः ७६ बहिः प्रक्षालनं कुर्वन्किंभवेत्तस्य केशव । व्यर्थो हि केवलं तस्य प्रग्रहो बाह्यगोचरः ७७ तस्मात्सर्वप्रयत्नेन चित्तं रक्ष जनार्दन । बलवानिन्द्रियग्रामो वारयैनं जनार्दन ७८ परीवा-दाज्जगन्नाथ वाचंरक्ष दुरुद्वहाम् । परद्रव्यान्मनो रक्ष परदाराज्जनार्दन । सर्वत्र मे दया भूयात्प्रसादात्तव केशव ७९ त्वय्येव भक्तिरचला भूयाद्भूतेषु मे दया । बहुनात्र किमुक्तेन श्रृणुष्वेदं वचो मम ८० सुखे दुःखे च रागे च भोजने गमने तथा । जाग्रत्स्वप्नेषु सर्वत्र त्वय्येव रमतां मनः ८१ मामकं देवदेवेश नमस्तेऽस्तु जनार्दन । इति ब्रुवन्घोरतमो जात्याहीनो न चित्रकः ८२ पिशाचो भगवद्भक्तः समाधिं समपद्यत । दृढं बध्वात्मनः कामसांत्रपाशेन मांसपः ८३ निश्चलेनैव मनसा सुखमास्ते स्म संयतः । ध्यायन्हरिं जगद्योनिं विष्णुं पीतां-बरं शिवम् ८४ मुकुन्दमादिपुरुषमेकाकारमनामयम् । नित्यं शुद्धं ज्ञानगम्यं कारणं सर्व-देहिनाम् ८५ नासिकाग्रं समालोक्य पठन् ब्रह्म सनातनम् । निर्वातस्थो यथा दीपः प्रोज्ज्व-

---

तल्लीन झालेलें मन, हे देवा, विषयोन्मुख व भेदबुद्धि उत्पन्न करणारें न होवो ७२. कारण हें मनच नित्यशः पुरुषांस घोर विपरीत भावनेंत पाडून मारतें. परपीडात्मक पापामध्यें नियुक्त करतें ७३. यास्तव हे देवा, जनार्दना, वारंवार पुनः पुनः त्या मनाचें सुसंरक्षण होवो. माझ्या मनांत कालुष्य न होवो. तें निर्मल राहो ७४. पुरुषाचें कलुषित चित्त त्याला नरकांत पाडीत असतें. बाह्य इंद्रियें जरी निर्मल असलीं तरी, मन जर कलुषित असेल, तर तीं कांहीं कामाचीं नाहींत. हे केशवा, जो मुठीमध्यें अमंगल वस्तु घेऊन बसतो व बाहेरून मात्र सर्व अंगें धुवीत सुटतो, त्याला कोणता लाभ होणार ? बाह्य अंगांस शुद्ध करण्याविषयींचा त्याचा आग्रह व्यर्थच आहे ७५–७७. यास्तव, हे जना-र्दना, सर्व प्रयत्नानें चित्ताचें रक्षण कर. हे वासुदेवा, इंद्रियसमूह मोठा बलवान् आहे. त्याचें निवारण कर ७८. जिचा निग्रह करणें फार कठिण आहे अशा वाणीचें हे जना-र्दना, तूं निंदेपासून निवारण कर. हे जगन्नाथा, परद्रव्य व परस्त्री यांपासून मनाचें रक्षण कर. हे केशवा, तुझ्या प्रसादानें मी सर्वत्र दया करावी ७९. तुझ्या ठिकाणींच माझी अचल भक्ति रहावी. मी भूतमात्रांवर दया करावयास लागावें. उगीच अधिक बोलून काय करावयाचें आहे. हें माझें वचन ऐक ८०. सुख, दुःख, राग, भजन, गमन, जाग्रत्, स्वप्न, इत्यादि सर्व क्रिया व अवस्था यांमध्यें माझें मन तुझ्या ठिकाणींच रममाण होवो. हे देवदेवेश जनार्दन, तुला नमस्कार असो. असें बोलणारा तो घोरतम, जातीनें हीन व अनन्यचित्त भगवद्भक्त पिशाच समाधीस प्राप्त झाला. आपल्या कामास आंतड्याच्या पाशांनीं दृढ बांधून संयमित झालेला तो मांसभक्षक निश्चल मना-नेंच जगत्कारण, विष्णु, पीतांबरधारी व कल्याणरूप अशा हरीचें ध्यान करीत सुखानें राहिला ८१-८४. मुकुंद, आदिपुरुष, एकाकार, अनामय, नित्य, शुद्ध, ज्ञानगम्य व सर्व देहवानांचें कारण अशा देवाचें तो चिंतन करूं लागला ८५. आपल्या नासिकाग्रा-कडे दृष्टी ठेवून, सनातन ब्रह्माचा पाठ करीत, वातरहित दीपाप्रमाणें निश्चलचित्त होऊन,

रन्प्रणवं सदा ८६ प्रणवं वाचकं मत्वा वाच्यं ब्रह्मेति निश्चितः । एकाग्रं सततं कृत्वा चित्तं विष्णौ समर्पितम् ८७ विकल्परहितं चित्तं हृदिमध्ये न्यवेशयत् । पुण्डरीके शुभदले समावेश्य जगत्पतिम् ८८ आस्ते सुखं महायोगी पिशिताशस्तदा महान् । त्रिधामानं जपंस्तत्र स्मरन्विष्णुं सनातनम् ८९ [ ३८१५ ] इति श्रीमहाभारते खिले० हरि० भवि० कैलासयात्रायां घण्टाकर्णचित्तसमाधिर्नामाशीतितमोऽध्यायः ॥ ८० ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः स भगवान्विष्णुः पिशाचं दृष्टवांस्तदा । चिन्तयन्तं स्वमात्मानं शुद्धिबुद्धिसमन्वितम् १ आत्मन्यवस्थितं साक्षात्पठन्तं प्रणवं सकृत् । प्रार्थयन्तं स्वमात्मानमेकान्ते नियतं हरिः २ अचिन्तयज्जगन्नाथः कारणं पुण्यसंचये । ध्यात्वा तु सुचिरं विष्णुः कारणं पुण्यकर्मणः ३ धनदस्योपदेशेन पठन्सुबहुशः क्षितौ । वासुदेवेति कृष्णेति माधवेति च मां सदा ४ जनार्दन हरे विष्णो भूतभावन भावन । नराकार जगन्नाथ नारायण परायण ५ इति मां नामभिर्नित्यं पठत्येव दिवानिशम् । स्वपन् जाग्रंस्तथा तिष्ठन् भुंजन् गच्छंस्तथा वदन् ६ भक्षयन्मांसपिंडकं पिबञ्छोणितमेव वा । बाधमानं च सुचिरं हत्वा चापि मृगान्बहून् ७ हनने भोजने चैव जाग्रत्स्वप्ने तथैव च । सर्वेष्वपि च कार्येषु कर्ताहमिति मन्यते ८ एतस्य कर्मणः पाक एष घोरस्य कर्मणः । निश्चित्यैवं जगन्नाथः प्रीतस्तस्य बभूव ह ९ अदर्शयत्स्वमात्मानमनन्यस्य जगत्पतिः । शुद्धेन्तःकरणे तस्य पिशाचस्यापि

---

सदा प्रणवाचा उच्चार करीत, प्रणवास वाचक समजून ब्रह्म त्याचें वाच्य आहे, अशाविषयीं निश्चित झालेला तो विष्णूमध्यें समर्पण केलेलें चित्त सतत एकाग्र करून विकल्परहित झालेल्या त्याला हृदयामध्यें स्थिर करता झाला. पुंडरीक कमलाच्या शुभ दलावर जगत्पतीला बसवून तो महामांसभक्षक महायोगी त्रिधामरूप मंत्राचा जप करीत व सनातन विष्णूचें स्मरण करीत सुखानें राहिला ८६-८९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलास० घंटाकर्णचित्तसमाधिनामक ऐशींवा अध्याय समाप्त झाला. ॥ ८० ॥

वैशंपायनः—त्यानंतर तो भगवान् विष्णु शुद्धबुद्धीनें युक्त होऊन आपल्याच स्वरूपाचें ध्यान करीत असलेल्या त्या पिशाचास पाहता झाला १. साक्षात् आपल्याच ठिकाणीं अवस्थित असलेल्या, प्रणवाचा उच्चार करणाऱ्या, स्वात्म्याची प्रार्थना करणाऱ्या व एकान्तांत नियत झालेल्या त्या घंटाकर्णाला पाहून जगन्नाथ हरि त्याच्या पुण्यसंचयाचें कारण काय बरें असावें, असें ह्मणून विचार करूं लागला. बराच वेळ त्याच्या पुण्यकर्माच्या कारणाविषयीं विचार करून २, ३ कुबेराच्या उपदेशानें वासुदेव, कृष्ण, माधव, इत्यादि बहुतप्रकारें माझें नाम घेत हा भूमीवर संचार करीत आहे ४. त्याचप्रमाणें हे जनार्दना, हे हरे, हे विष्णो, भूतप्रकृतीच्या कारणा, हे नराकारा, हे जगन्नाथा, हे नारायणा, हे श्रेष्ठ आश्रया, ५ इत्यादि नांवांनीं तो मला नित्य अहोरात्र स्मरत आहे. पण शय्येवर शयन करीत असतांना, जात असतांना, त्याचप्रमाणें उभा असतांना, भोजन करीत असतांना, फिरत असतांना, त्याचप्रमाणें भाषण करतांना ६, मांसाचे गोळे खात असतांना, किंवा रक्त पीतांना, दीर्घकाल प्राण्यांस बाधा करितांना, अनेक पशूंस मारून त्यांना खातांना व साक्षात् हिंसा करतांना, जाग्रत्कालीं व स्वप्नांत सर्व कार्यांच्या वेळीं हा मी कर्ता, असें समजत असे ७, ८. त्या घोर कर्माचा हा परिणाम आहे. असा निश्चय करून जगन्नाथ त्याच्यावर प्रसन्न झाला ९. आपल्याशीं

भूमिप १० स च घोरः पिशाचोऽपि ददर्शात्मनि केशवम् । पीतकौशेयवसनं पद्माक्षं श्यामलं हरिम् ११ शंखिनं चक्रिणं विष्णुं स्रग्विणं गदिनं विभुम् । किरीटिनं कौस्तुभिनं श्रीवत्साच्छादितोरसम् १२ नीलमेघनिभं कान्तं गरुडस्थं प्रभंजनम् । चतुर्भुजं शुभगिरं निश्चलं सर्वगं शिवम् १३ अनादिनिधनं नित्यं मायाविनममायिनम् । सत्ययुक्तं सदा शुद्धं सिद्धिगम्यं सदामलम् १४ मनस्येवं जगन्नाथं दृष्ट्वा विष्णुमनेकधा । अनुमील्यैव नयने कृतार्थोऽस्मीत्यमन्यत १५ अथ दृष्टो हरिर्विष्णुः साक्षात्सर्वत्रगः शुभः । प्रसन्नो हि हरिर्मह्यं तेनाहं दृष्टवान्हरिम् १६ सिद्धं मे जन्मनः कृत्यं किमतः कृत्यमस्ति मे । ग्रन्थयो मम निर्भिन्ना वश्यान्येवेन्द्रियाणि मे १७ प्रायेण जितमित्येव मनो मन्ये स्मृते हरौ । ईषणा च निरस्ता मे प्रसन्नोऽहं तथाभवम् १८ एतेभ्योऽपि पिशाचेभ्यो निर्मुक्तः सांप्रतं तथा । योऽसौ ममानुजः साक्षात्स च भक्तस्तथा हरौ १९ कालेन चैव निर्मुक्तो विष्णोः सायुज्यमाप्नुयात् । इत्येवं चिन्तयित्वा स आंत्रपाशं विभिद्य च २० क्रमेण प्राणानुन्मुच्य विलोक्य चतुर्दिशस्तथा । शरीरं सुगमं कृत्वा प्राविशत्स सुखेन ह २१ [८७६] इति श्रीमहा०खिले० हरि० भवि० कैलासयात्रायांपिशाचस्यविष्णुसाक्षात्कारोनाम एकाशीतितमोऽध्यायः ॥८१॥

---

अनन्य झालेल्या त्याला जगत्पतीनें आपलें स्वरूप दाखविलें. हे राजा, त्या पिशाचाच्याही शुद्ध अंतःकरणांत हरीनें आपलें स्वरूप प्रकट केलें १०. तो घोर पिशाचही आपल्या अंतःकरणांत केशवास पाहता झाला. ज्याचें पिवळें रेशमी वस्त्र आहे, कमलासारखे नेत्र आहेत, वर्ण काळा आहे, ज्यानें हातांत शंख व चक्र घेतलें आहे, गदा घेऊन माळ घातली आहे, मस्तकावर किरीट आहे, उरःस्थळावर कौस्तुभ आहे व श्रीवत्सानें हृदयप्रदेश आच्छादित झाला आहे ११-१२. नीलमेघाप्रमाणें कान्त, गरुडावर बसलेला, भक्तांच्या संसाराचा नाश करणारा, चतुर्भुज, ज्याची वाणी शुभ आहे, निश्चल, सर्वगामी, शिवस्वरूप, आदि–अंत–शून्य, नित्य, मायावी, स्वतः सत्यस्वरूप, सत्ययुक्त, सदा शुद्ध, सिद्धीच्या योगानें ज्ञात होणारा, सदा मलरहित, अशा हरि–विष्णूला त्यानें पाहिलें १३,१४. याप्रमाणें मनामध्यें अनेकप्रकारें जगन्नाथ विष्णूला पाहून नेत्र न उघडतांच तो मी कृतार्थ आहे, असें समजूं लागला १५ ( तो ह्मणाला ) सर्वत्र असणारा शुभ हरि विष्णु मी साक्षात् पाहिला. हरि मजवर प्रसन्न झाला आहे ह्मणूनच मीं त्याला पाहिलें १६. माझ्या जन्माचें कृत्य सिद्ध झालें. आतां यापुढें मला आणखीं काय कर्तव्य असणार ? माझ्या हृदयग्रंथी तुटल्या आहेत. इंद्रियें माझ्या अधीन झालीं आहेत. हरीचें स्मरण करितांच प्रायः माझ्या मनाला मी जिंकलेंच आहे, असें मला वाटतें. माझी इच्छा पार निघून गेली आहे. त्यामुळें मी प्रसन्न झालों आहें. तसाच मी यावेळीं या पिशाचापासूनही मुक्त झालों आहें. हा जो माझा अनुज ( धाकटा भाऊ ) आहे तोही मजप्रमाणेंच हरीचा मोठा भक्त आहे १७-१९. तोही कांहीं कालानें मुक्त होऊन विष्णूच्या सायुज्यास प्राप्त होईल. असा पुष्कळ विचार करून, आंतड्याचा पाश सोडून, क्रमानें प्राणांना मोकळें करून, सर्व दिशांकडे एकदा दृष्टि फेंकून व शरीर हवें तेथें जाईल असें सुगम करून तो अनायासानें हरीमध्यें प्रविष्ट झाला २०, २१. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० कैलास० पिशाचाचा विष्णुसाक्षात्कारनामक एक्यायशींवा अध्याय समाप्त झाला. ॥ ८१ ॥

वैशंपायन उवाच ॥ पिशिताशो जगन्नाथं ददर्शाथ जगद्गुरुम् । समाधौ च यथादृष्टं भूमौ चापि तथा हरिम् १ अयं विष्णुरयं विष्णुरित्यूचे पिशिताशनः। समाधौ च यथा दृष्टः सोऽयमत्रापि दृश्यते । इत्युवाच पुनर्नृत्यन्नृत्यन्निव हसन्निव २ अयं स चक्री शरशार्ङ्गधन्वा गदी रथी सध्वजतूणपाणिः । सहस्रमूर्धा सकलामरेशो जगत्प्रसूतिर्जगतां निवासः ३ विष्णुर्जिष्णुर्जगन्नाथः पुराणः पुरुषोत्तमः । विश्वात्मा विश्वकर्ता यः सोऽयमेष सनातनः ४ अस्यैव देवस्य हरेस्तनान्तरे विराजते कौस्तुभरत्नदीपः । यस्य प्रसादाज्जगदेतदादौ विराजते चन्द्रमसेव रात्रिः ५ योऽसौ पृथ्वीं दधाराशु दंष्ट्रया जलसंचयात् । सोऽयमेव हरिः साक्षाद्वाराहं वपुरास्थितः ६ बध्वा तदा दानवमुग्रपौरुषं ददौ च शक्राय ततोऽनुराज्यम् । बलिं बलादेष हरिः सवामनः स्तुतश्च भक्त्या मुनिभिः पुरातनैः ७ दंष्ट्राकरालान्सुमदान् हत्वा यो दानवान्रणे । निःशोकमखिलं लोकं चकारासौ जनार्दनः ८ आदौ दधारैकभुजेन मंदरं निर्जित्य सर्वानसुरान्महार्णवे । ददौ च शक्राय सुधामयं महान्स एष साक्षादिह मामवस्थितः ९ यः शेते जलधौ नागे देव्या लक्ष्म्या सुखावहे । हत्वा तौ दानवौ घोरौ मधुकैटभसंज्ञितौ १० यमाहुराद्यं विबुधा जगत्पतिं सर्वस्य धातारमजं जनित्रम् । अणोरणीयांसमतिप्रमाणं स्थूलात्स्थविष्ठं हरिमेव विष्णुम् ११ यत्रास्थितमिदं सर्वं प्राप्ते लोकस्य नाशने । आदौ यस्मात्समुत्पन्नं सोऽयं विष्णुरिति स्थितः १२ यस्येच्छया सर्वमिदं प्रवृत्तं

---

वैशंपायनः—त्या मांसभक्षकानें जगद्गुरु जगन्नाथास समाधीमध्यें जसें पाहिलें होतें तसाच तो हरि त्याला बाहेर भूमीवर दिसला १. त्या मांसाहाऱ्यानें हा विष्णु, हा विष्णु, असें ह्मटलें. तो समाधींत जसा दिसला होता तसाच हा येथें दिसत आहे, असें बोलून तो नृत्य करीत असल्याप्रमाणें व हसत असल्याप्रमाणें पुनः ह्मणाला २. ‘ हा तो चक्रवान्, शरसहित शार्ङ्ग धनुष्य धारण करणारा, गदावान्, रथयुक्त, ध्वजयुक्त, तूणीर हातांत घेणारा, ज्याला सहस्र मस्तकें आहेत असा, सर्व देवांचा ईश, जगाचें कारण, जगाचा आधार ३, सर्व व्यापी, जयनशील, जगन्नाथ, पुराण, पुरुषोत्तम, विश्वात्मा, विश्वकर्ता व तोच हा सनातन होय ४. याच हरिसंज्ञक देवाच्या स्तनांमध्यें कौस्तुभरत्नदीप विराजमान होत असतो. चंद्रमाच्या योगानें जशी रात्री त्याप्रमाणें त्याच्या प्रसादानेंच आरंभीं हें जग विराजमान होतें ५. ज्यानें जलसंचयांतून काढलेली पृथ्वी आपल्या दाढेवर धरली तोच हा वराहाचें रूप धारण करणारा हरि साक्षात् पुढें उभा आहे ६. या वामनरूपी हरीनें ज्याचा पौरुष उग्र आहे अशा बलिदानवाला बलात्कारानें बांधून इंद्राला त्याचें राज्य दिलें. यास्तव पुरातन मुनि भक्तीनें त्याची स्तुति करूं लागले ७. दाढांच्या योगानें अतिशय भयंकर झालेल्या व मदयुक्त दानवांस रणांत मारून या जनार्दनानें सर्व लोकांस निःशोक केलें ८. सर्व असुरांना जिंकून प्रथमारंभीं महासागरांत ज्यानें एका बाहूनें मंदर धरिला व इंद्राला सुधामय धाम दिलें तो हा महा पुरुष येथें माझ्या पुढें साक्षात् उभा आहे ९. जो घोर मधुकैटभसंज्ञक दानवांस मारून क्षीरसागरामध्यें सुखावह नागावर लक्ष्मीसह शयन करतो १०, ज्ञानी देवादि ज्याला आद्य, जगत्पति, सर्वांचा धाता, अज, जनक, अणूहून अतिशय अणु, प्रमाणातीत, स्थूलाहून अतिशय स्थूल, हरि व विष्णु असें ह्मणतात ११, लोकांचा विनाशकाल ( प्रलय ) जवळ आला असतां हें सर्व जेथें राहतें व आरंभीं हें सर्व ज्याच्यापासून उत्पन्न झालें आहे तो हा भगवान् विष्णु

प्रवर्तते चापि जनार्दनस्य। अयं स विष्णुः पुरुषोत्तमः शिवः प्रवर्तते मामिह यादवेश्वरः १३
भृगोर्वंशे समुत्पन्नो जामदग्न्य इति श्रुतः। शिष्यत्वं समवाप्यैव मृगव्याधस्य यः स्थितः १४
जघान वीर्याद्बलिनं महारणे कुठारशस्त्रेण गिरीशशिष्यः। सहस्रबाहुं कृतवीर्यसंभवं हयैर्ग-
जैश्चैव रथैश्च निर्गतम् १५ कुरुक्षेत्रं समासाद्य यश्चकार पितृक्रियाम्। निःक्षत्रियमिमं
लोकं कृतवानेकविंशतिः १६ दशरथकुले जातो रामो नाम जनार्दनः। सीतया च श्रिया युक्तो
लक्ष्मणानुचरः कृती १७ कृत्वा च सेतुं जलधौ जनार्दनो हत्वा च रक्षःपतिमाशुगैः शरैः।
दत्त्वा च राज्यं सबिभीषणाय दशाश्वमेधैरयजच्च योऽसौ १८ वसुदेवकुलेजातो वासुदेवेति
शब्दितः। गोकुले क्रीडते योऽसौ संकर्षणसहायवान् १९ उत्तानशायी शिशुरूपधारी पीत्वा
स्तनं पूतनिकाप्रदत्तम्। व्यसुं चकाराशु जनार्दनस्तदा दनोः सुतां तामवसत्सुखं हरिः २०
पयःपानं तथाकुर्वन्भक्षयन्दधिपिण्डकम्। दाम्ना बद्धोदरो विष्णुर्मात्रा रुषितया दृढम् २१
ततश्च दाम्ना सुदृढेन बद्धो जघान योऽसौ यमलार्जुनौ च। क्रीडन्हरिर्गोकुलवासवासी
गोपीभिरास्वाद्य मुखं स्तनं च २२ वृन्दावने वसन्विष्णुर्गोभिर्गोकुलवासिभिः। तत्र हत्वा हयं
राजन्विरराजांशुमानिव २३ यः क्रीडते नागफणे जनार्दनो निषेव्यमाणः सह गोपदा-
रकैः। महाह्रदे नागपतिं जगत्पतिर्ममर्द वीर्यातिशयं प्रदर्शयन् २४ यो धेनुकं तालवने
तत्फलैः सममच्छिनत्। हत्वा दानवमुग्रं तं गोपान्विस्मापयत्यसौ २५ दधार यो गोधरमुग्र-

---

येथें साक्षात् येऊन उभा राहिला आहे १२. ज्या जनार्दनाच्या इच्छेनें हें सर्व प्रवृत्त झालें आहे व प्रवृत्त होत आहे तो हा कल्याणरूप यादवेश्वर पुरुषोत्तम विष्णु येथें येऊन राहिला आहे. जो भृगूच्या वंशांत उत्पन्न झाला व जामदग्न्य या नांवानें प्रसिद्धीस आला. जो मृगव्याधाचें शिष्यत्व प्राप्त करून घेऊनच राहिला १३, १४, ज्या गिरिशशिष्यानें स्ववीर्यानें घोडे, गज, व रथ यांसह महारणांत निघून आलेल्या बलाढ्य कृतवीर्यपुत्र सहस्रबाहूला कुठारशस्त्रानें मारलें १५ आणि कुरुक्षेत्रास जाऊन ज्यानें पितृक्रिया केली, ज्यानें या पृथ्वीला एकवीस वेळां निःक्षत्रिय केलें, जो धन्य जनार्दन राम या नांवानें दशरथ कुलांत सीतासंज्ञक लक्ष्मीनें युक्त होऊन लक्ष्मण अनुचरासह उत्पन्न झाला १६,१७. नंतर ज्या जनार्दनानें समुद्रावर सेतु बांधवून वेगयुक्त बाणांनीं रक्षःपतीस मारून व त्याचें राज्य बिभीषणास देऊन दशाश्वमेधयज्ञ केले १८, वसुदेवाच्या कुलांत झालेल्या ज्याला वासुदेव असें ह्मणत असतात तो हा संकर्षण-( बलराम ) युक्त देव गोकुलांत क्रीडा करीत असतो १९. उताणा निजणारा व शिशुरूप धारण करणारा, जो जनार्दन हरि पूतनिकेनें दिलेलें स्तनपान करून त्या दनूच्या कन्येला गतप्राण करता झाला व नंतर सुखानें राहिला २०. त्याचप्रमाणें दूध पिऊन दह्याचे गोळे खाणारा विष्णु रागावलेल्या मातेकडून दाव्यानें पोटाशीं घट्ट बांधला गेला २१. नंतर दाव्यानें घट्ट बांधलेल्या त्यानें यमळार्जुनांस मारलें. तो गोकुलामध्यें निवास करणारा हरि गोपींच्या मुखादि अवयवांचा स्वाद घेत त्यांच्याशीं खेळत राहिला होता २२. वृंदावनांत राहणाऱ्या ज्यानें गोकुळवासी गोपांशींही क्रीडा केली. हे राजन्, त्या वनांत हय दानवास मारून जो प्रभु सूर्यासारखा विराजमान झाला २३. गोपपुत्रांकडून सेवन केला जाणारा जो जनार्दन नागाच्या फणांवर क्रीडा करूं लागला व यमुनेच्या महा डोहांत आपलें अतिशय वीर्य व्यक्त करीत ज्या जगत्पतीनें कालेय नागपतीचें मर्दन केलें २४. जो तालवनांत धेनुक नांवाच्या उग्र दानवास तालफळांनीं मारून

पौरुषान्महामतिर्मेघसमागमे सति । विडंबयञ्छक्रबलं प्रमोदयन्गोपांश्च गोपींश्च सगोकुले हरिः २६ गोपीनां स्तनमध्ये तु क्रीडते कामंमीश्वरः । योऽसौ पिबंस्तदधरं मायामानुषदेहवान् २७ गोपीभिरास्वाद्यमुखं विविक्ते शेते स्म रात्रौ सुखमेव केशवः । स्तनांतरेष्वेव तदा च तासां कामी च कान्ताधरपल्लवं पिबन् २८ अक्रूरेण समाहूतस्तेन गच्छन्हि यामुने । जले योऽह्यर्चितस्तेन नागलोके स एव हि २९ ततश्च गच्छन्बलवान् जनार्दनो हत्वा तमुग्रं रजकं बलात्पथि । हत्वा च वस्त्राणि यथेष्टमीश्वरो ययौ सरामो मथुरां पुरीं हरिः ३० लब्ध्वा च दामानि बहूनि कामदो दत्वा वरं माल्यकृते महान्तम् । लब्ध्वानुलेपं सुरभिं च यादवः कुब्जां चकाराशु महार्हरूपाम् ३१ योऽसौ चापं समादाय मध्ये छित्वा महद्धनुः । सिंहनादं महांश्चक्रे कल्पान्ते जलदो यथा ३२ हत्वा गजं घोरमुदग्ररूपं विषाणमादाय ततोऽनु केशवः । ननर्त रंगे बहुरूपमीश्वरः कंसस्य दत्वा भयमुग्रवीर्यः ३३ योऽसौ हत्वा महामल्लं चाणूरं निहतद्विषम् । यादवेभ्यो ददौ प्रीतिं कंसस्यैव तु पश्यतः ३४ जघान कंसं रिपुपक्षघातिनं पितृद्विषं यादवनामधेयम् । संस्थाप्य राज्ये हरिरुग्रसेनं सांदीपिनं काश्यमुपागतो यः ३५ विद्यामवाप्य सकलां दत्वा पुत्रं महामुनेः । साग्रजोऽथ जगामाशु मथुरां यादवीं पुरीम् ३६ हत्वा निशुंभं नरकं महामतिः कृत्वा सुघोरं कदनं जनार्दनः । ररक्ष विप्रान्मुनिवीरसंघान्देवांश्च सर्वान् जगतो जगत्पतिः ३७ स एष भगवान्विष्णुरय दृष्टो

---

गोपास विस्मय उत्पन्न करिता झाला २५. ज्या महामति हरीनें इंद्र महावृष्टि करूं लागला असतां उग्र पौरुषानें पर्वतास उचलून धरून इंद्राचें सामर्थ्य कुंठित केलें व सर्व गोकुलासह गोप व गोपी यांस आनंद दिला २६, जो ईश्वर गोपींच्या हृदयांत यथेच्छ क्रीडा करीत रहातो, जो हा मायामानुषदेहवान् केशव गोपींच्या मुखांचा स्वाद घेऊन अधरपान करीत रात्रीं एकांतांत सुखानें शयन करतो, जो कामी त्यावेळीं त्या गोपींच्या हृदयांत कांताधरपल्लव पीत राहतो२७,२८, अक्रूरानें बोलाविल्यामुळें त्याच्याबरोबर जाणारा जो हरिच त्याच्याकडून जलांत शिरून नागलोकीं पूजिला गेला २९. ( तो मला आज साक्षात् दिसला आहे. ) त्यानंतर पुढें जाणारा तो हा बलाढ्य जनार्दन हरि मार्गामध्यें बलात्कारानें उग्र रजकास मारून व वस्त्रें हरण करून रामासह मथुरानगरींत यथेष्ट शिरला ३०. तेथील माळ्यापासून पुष्कळ पुष्पें घेऊन व त्याला फार मोठा वर देऊन कुब्जेपासून अतिशय सुवासिक उटी घेऊन व तिचे रूप सर्वोत्कृष्ट करून ( तो देव पुढें गेला ) ३१. त्या देवानें चाप घेऊन व त्या महा धनुष्याला मध्यें तोडून कल्पांतींच्या जलदाप्रमाणें मोठा सिंहनाद केला ३२. त्यानंतर ईश्वर केशव घोर व अति उग्ररूप गजाला मारून व त्याचा दांत हातांत उपटून घेऊन कंसाला उग्र भय देत रंगभूमींत बहुरूपी नृत्य करूं लागला ३३. ज्यानें शत्रूंस मारलें आहे अशा चाणूरसंज्ञक महामल्लास कंसाच्या समक्ष मारून यादवांस मोठा संतोष दिला ३४. रिपुपक्षाचा घात करणाऱ्या व साक्षात् पित्याशींही वैर करणाऱ्या यादवनांवाच्या कंसाला मारून ज्यानें राज्यावर उग्रसेनाची स्थापना केली, नंतर काशीच्या सांदीपनी ब्राह्मणापाशीं जाऊन सर्व विद्या संपादन केली, त्या महामुनीच्या पुत्राला मृत्यूपासून सोडवून परत आणून दिलें आणि त्यानंतर अग्रजासह जो तत्काल यादवांच्या मथुरापुरीस गेला ३६, ज्या महामति जगत्पति जनार्दनानें निशुंभ नरकास मारून व अति घोर कदन करून जगांतील विप्र, मुनिवीरांचा

जनार्दनः । कृतकृत्योस्मि संजातो सायुज्यं प्राप्तवाहनम् ३८ येन दृष्टो हरिः साक्षात्तस्य मुक्तिः करे स्थिता । सोयमेष हरिः साक्षात्प्रत्यक्षमिह वर्तते ३९ नूनं जन्मान्तरे पूर्वं धर्मः संचित एव मे । यस्य पाकः समुत्पन्नो येनासौ दृश्यते मया ४० सर्वथा पुण्यवानस्मि नष्टसंसारबन्धनः । किमस्मै दीयते वस्तु किं नु वक्ष्यामि सांप्रतम् । करिष्ये किमहं विष्णो वदस्वाद्य यथेप्सितम् ४१ वैशंपायन उवाच ॥ इत्युक्त्वा विस्तरं नादं ननर्द बहुशस्तदा । जहास विकृतं भूयो ननर्त पिशिताशनः ४२ नमो नमो हरे कृष्ण यादवेश्वर केशव । प्रत्यक्षं च हरेस्तत्र ननर्त विविधं नृप ४३ [ ३११९ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां घण्टाकर्णस्तुतिर्नाम द्व्यशीतितमोध्यायः ॥ ८२ ॥

वैशंपायन उवाच ॥ विहस्य विकृतं भूयः प्रनृत्य च यथाबलम् । ब्राह्मणस्य हतस्याथ शवमादाय सत्वरः १ द्विधा कृत्य महाघोरं पिशितं केशशाड्वलम् । ततः खंडं समादाय अद्भिरभ्युक्ष्य यत्नतः २ निधाय पात्रे सुशुभे नमस्कृत्य जनार्दनम् । इदं प्रोवाच देवेशं प्रांजलिः प्रणतः स्थितः ३ गृहाण मे जगन्नाथ भक्ष्यं योग्यं तव प्रभो । भवादृशैर्जगन्नाथ ग्राह्यं सर्वात्मना हरे ४ भक्तिनम्रा वयं विष्णो नात्र कार्या विचारणा । दत्तं यद्भक्तिनम्रेण ग्राह्यं तत्स्वामिना हरे ५ नवं सुसंस्कृतं भक्ष्यं ब्रह्मण्यं शवमुत्तमम् । अस्माकं पिशिताशानां शास्त्रे नियतमेव हि ६ तस्माद्गृहाण भगवन्यदि दोषो न विद्यते । इत्युक्त्वा विकृतं भूयो

---

संघ व सर्व देव यांस संतुष्ट केलें ३७, तो हा जनार्दन भगवान् विष्णु आज मीं पाहिला. मी कृतकृत्य झालों आहे. मला आतां सायुज्य मिळालें आहे. ज्यानें हरीला साक्षात् पाहिलें आहे त्याच्या हातांत मुक्ति स्थित असते. असो; तो हा साक्षात् हरि आज येथें माझ्यापुढें प्रत्यक्ष उभा आहे ३८,३९. खचित पूर्वीं जन्मांतरीं मी मोठा धर्मसंचय केला होता त्याचा हा परिपाक आज झाला आहे. त्यामुळें हा मला दिसला ४०. मी कांहीं झालें तरी मोठा पुण्यवान् आहें. माझें संसारबंधन नष्ट झालें आहे. मजकडून याला कोणती वस्तु दिली जाणार ? मी आतां काय सांगूं ? हे विष्णो, आतां तुझी जशी इच्छा असेल तसें मला सांग ४१. वैशंपायनः— असें बोलून त्यानें त्यावेळीं विस्तृत नाद केला. तो मांसाशन करणारा घंटाकर्ण मोठ्यानें खो, खो, खो, करून हसला व पुनः पुष्कळ नाचूं लागला ४२. हे हरे, कृष्ण, हे यादवेश्वर, हे केशव, तुला नमस्कार असो; नमस्कार असो. असें बोलून हे राजा, तो हरीच्या समक्ष तेथें नानाप्रकारें नाचूं लागला ४३. इति श्रीम० खि० हरि० भवि० कैला० घंटाकर्णस्तुतिनामक ब्यायशींवा अध्याय समाप्त झाला ॥ ८२ ॥

वैशंपायनः— नंतर फिरून विकृत हास्य करून व यथाशक्ति नृत्य करून मारलेल्या ब्राह्मणाचें शव सत्वर घेऊन व त्याचे दोन तुकडे करून त्यानें केसांनीं युक्त महा घोर मांस तयार केलें. नंतर त्यांतील एक तुकडा घेऊन मोठ्या यत्नानें त्याच्यावर पाणी शिंपडून, तें शुभ पात्रांत ठेवून व जनार्दनास नमस्कार करून, हात जोडून अति नम्र झालेला तो देवेशास असें बोलला १–३. " हे देवेशा, प्रभो, जगन्नाथा, मी अर्पण केलेलें हें योग्य भक्ष्य घे. हे हरे जगन्नाथा, तुमच्या सारख्यांनीं याचा सर्व प्रकारें स्वीकार करावा ४. हे विष्णो, आह्मी भक्तिनम्र झालों आहों. याविषयीं आपण कांहीं विचार करूं नये. हे हरे, भक्तीनें नम्र झालेल्या भक्तानें अर्पण केलेलें सर्व कांहीं स्वामीनें घ्यावें ५. ( असा नियम आहे. ) आह्मां मांसभक्षकांच्या शास्त्रांत ताजें व उत्तम संस्कार केलेलें, ब्राह्मणाचें

विहस्य स तु कामतः ७ दातुमैच्छत्तदा खण्डमस्पृश्यं तु शवस्य ह। ततः प्रीतोऽभवत्तस्मै मनसा पूजयच्च तम् ८ अहोऽस्य स्नेहकारुण्यं मयि सर्वत्र वर्तते। इति संचिन्त्य मनसा प्रोवाच यदुपुंगवः ९ अलमेतेन सर्वत्र पिशाच पिशिताशन। अस्पृश्यं मादृशैरेतद्ब्रह्मण्यशवमुत्तमम् १० ब्राह्मणः सर्वथा पूज्यो जन्तुभिर्धर्मकांक्षिभिः। पिशाचा घोरकर्माणो यतन्ते ब्रह्महिंसने ११ न हन्तव्याः सदा विप्रास्तद्धिंसा नरकावहा। तस्मादस्पृश्यमस्माभिर्नात्र कार्या विचारणा १२ भक्त्या प्रीतोऽस्मि भद्रं ते मनोनिर्मलता यया। मनः शुद्धिं यदापन्नं ततः प्रीतोऽस्मि मांसप १३ अस्मात्संकीर्तनाच्छश्वच्छुद्धं हि करणं तव। अतीव मनसा प्रीत इत्युक्त्वा भगवान्हरिः १४ पस्पर्शांगं तदा विष्णुः पिशाचस्याथ सर्वतः। करेण मृदुना देवः पापान्निर्मोचयद्धरिः १५ ततस्तस्याभवद्रूपं कामरूपसमप्रभम्। दीर्घकुंचितकेशाढ्यो दीर्घबाहुः सुलोचनः १६ समांगुलिः समनखः समवक्त्रः समुन्नसः। पद्माक्षः पद्मवर्णाभः पद्मकेसरभूषणः १७ केयूरी चांगदी चैव कौशेयवसनस्तदा। ज्ञानवान्सत्त्वसंपन्नः साक्षादिन्द्रइवापरः १८ गन्धर्व इवगायंस्तु सिद्धः सिद्ध इव स्वयम्। साक्षात्स्पृष्टं तदा विष्णोः करेण मृदुपूर्वकम् १९ न नूनं तादृशं रूपमासीत्कालान्तरेष्वपि। अद्यापि नैव मुनयो लभन्ते

---

शव उत्तम भक्ष्य ह्मणून नियत केलें आहे ६. यास्तव हे भगवन्, जर कांहीं दोष नसला तर तूं याचें ग्रहण कर." असें बोलून व पुनः विकृत हसून तो घंटाकर्ण आपल्या कामनेप्रमाणें त्याच वेळीं देवाला अस्पृश्य मांसखंड देण्याची इच्छा करूं लागला. तेव्हां त्यामुळें भगवान् संतुष्ट झाला. त्यानें मनानें त्याचें अभिनंदन केलें ७, ८. तो ह्मणाला, "आहाहा, माझ्या ठिकाणीं याचें सर्व वस्तूविषयीं स्नेहकारुण्य आहे," असें मनानें चिंतन करून यदुपुंगव उघड ह्मणाला, " हे पिशाचा, हें मांसाशन करणाऱ्या, तें मला नको. कारण ब्राह्मणाचें उत्तम शवही माझ्या सारख्यांना अस्पृश्य आहे ९, १०. धर्माची आकांक्षा करणाऱ्या पुरुषांस ब्राह्मण सर्वथा पूज्य आहे. घोर कर्में करणारे पिशाच ब्रह्महिंसा करण्यामध्यें नेहमीं तत्पर असतात ११. पण ब्राह्मणांना कधींही मारूं नये. त्यांची हिंसा नरकावह आहे. यास्तव आह्मांला हें मांस अस्पृश्य आहे. याविषयीं कांहीं विचार करूं नकोस १२. मी तुझ्या भक्तीनें प्रसन्न झालों आहे. तुझें कल्याण होवो. त्या भक्तीनेंच मन निर्मळ होत असतें. हे मांसभक्षका, ज्याअर्थीं तुझें मन शुद्धीस प्राप्त झालें आहे त्याअर्थीं मी तुजवर प्रसन्न झालों आहे १३. या माझ्या संकीर्तनामुळें तुझें अंतःकरण नित्य शुद्ध झालें आहे." मनांतून अतिशय प्रसन्न झालेला हरि त्यास असें बोलून १४ त्याच्या सर्व अंगभर तो विष्णु त्यावेळीं स्पर्श करता झाला. त्या हरिसंज्ञक देवानें मृदुहस्तानें त्या पिशाचास स्पर्श करून पापापासून सोडविलें १५. त्यामुळें त्याचें रूप मदनाच्या स्वरूपाप्रमाणें प्रभावान् झालें; त्याचे केंस लांब व कुरळे झाले; बाहू लांब झाले; नेत्र फारच सुंदर बनले १६; त्याच्या हाताच्या अंगुलि एकसारख्या झाल्या; नखेंही समप्रमाण झालीं; तोंड वाकडें होतें तें सम झालें; नांक उंच व सरळ झालें; नेत्र कमलासारखे बनले; त्याची अंगकांति कमलवर्ण झाली; त्याचीं भूषणें कमलकेसराप्रमाणें पिवळीं बनलीं १७. ज्याच्या हातांत बाहुभूषणें आहेत, कडीं आहेत व ज्यानें रेशमी वस्त्र नेसलें आहे, असा तो पिशाच ज्ञानवान्, धैर्यसंपन्न व साक्षात् दुसऱ्या इंद्रासारखाच होता १८. गंधर्वाप्रमाणें गायन करणारा तो स्वतः सिद्धाप्रमाणें सिद्ध झाला. कारण

तादृशं वपुः २० कृत्वा सुबहुशो घोरं तपः परमदारुणम् । यच्च लब्धं तदा तेन पिशाचेन नृपोत्तम २१ को नु नाम जगन्नाथमाश्रितः सीदते नृप । स हि सर्वत्र कल्याणो यो हि नित्यं जनार्दनम् २२ ध्यायन्पठन्नुजपन्वापि तस्य किं नास्ति भूपते । ततः प्रोवाच भगवान् स्थितं काममिवापरम् २३ अक्षयः स्वर्गवासस्ते यावदिन्द्रो वसिष्यति । तावत्स्वर्गी भवानस्तु शासनान्मम नान्यतः २४ नष्टे शक्रे ततः स्वर्गात्सायुज्य मम गच्छतु । योऽयं भ्राता तव स्वर्गी यावदिन्द्रो भवेत्तदा २५ वरं वरय भद्रं ते यस्ते मनसि वर्तते । दातास्मि सर्वं सर्वत्र नात्र कार्या विचारणा २६ घंटाकर्ण उवाच ॥ यश्चेमं संगमं देव संस्मरन्नियतात्मवान् । भक्तिस्तस्याचला देव त्वयि भूयाज्जनार्दन २७ मनः शुद्धिर्भवेत्तस्य मा भूत्कलुषता हरे । कालुष्यं मनसस्तस्य मा भूदेष वरो मम २८ एवमस्त्विति देवेशः स्वर्गं गच्छेति केशवः । इन्द्रातिथिर्भवानस्तु त्वां प्रतीक्ष्य हरिः स्थितः २९ इत्युक्त्वा भगवान् कृष्ण उत्थाप्य ब्राह्मणं तदा । तेन स्तुतो जगन्नाथः पूजयित्वा च तं द्विजम् ३० ततो विसृज्य गोविन्दस्तस्माद्देशादुपागमत् । यत्र ते मुनयः सिद्धा अग्निहोत्रसमन्विताः ३१ स च स्वर्गी ततः स्वर्गमाज्ञया केशवस्य ह । तस्मात्पठ सदा राजन् मनःशुद्धिं यदीच्छसि । मनश्च शुद्धं भवति पठतस्ते जगत्पते ३१ [ ३९५१ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि घण्टाकर्णभुक्तिप्रदानं नाम त्र्यशीतितमोऽध्यायः ॥ ८३ ॥

---

त्यावेळीं विष्णूच्या हस्तानें त्याला साक्षात् मृदु स्पर्श केला होता १९. खरोखर भगवानाचें तसलें रूप कालांतरीही नव्हतें. तसलें रूप मुनींना अद्यापि पहावयास मिळत नाहीं. हे उत्तम राजा, पुष्कळ परम दारुण व घोर तप करून त्या पिशाचानें पाहिलेलें तें शरीर अद्यापि कोणाला दिसलेलें नाहीं २०,२१. राजन्, जगन्नाथाचा आश्रय केलेला कोणता पुरुष क्लेश भोगतो ? ( कोणी नाहीं ) कारण तो नित्य कल्याण आहे. जो जनार्दनाचें नित्य ध्यान करतो, त्याच्या कीर्तनरूप शास्त्रांचा पाठ करतो व त्याच्या नामाचा जप करतो त्याला काय मिळत नाहीं ? त्यानंतर साक्षात् कामाप्रमाणें स्थित असलेल्या त्याला भगवान् ह्मणाला, " माझ्या शासनानें तुला अक्षय स्वर्गवास घडो. जोंवर इंद्र स्वर्गांत राहील तोंवर तूं स्वर्गवासी हो २२--२४. त्यानंतर इंद्र नष्ट झाला असतां माझ्या सायुज्यास प्राप्त हो. हा जो तुझा भ्राता आहे तो इंद्र असे तों स्वर्गवान् होवो. हे घंटाकर्णा, तुझें कल्याण होवो. तुझ्या मनांत जें असेल तें वररूपानें मागून घे. मी तें तुला सर्व,सर्वत्र देईन. याविषयीं तूं कांहीं विचार करूं नकोस " २५,२६. घंटाकर्णः— हे देवा, जो पुरुष चित्ताचें नियमन करून या आमच्या समागमाचें स्मरण करील त्याची भक्ति, हे जनार्दना, तुझ्या ठायीं अचल होवो. २७. हे हरे, त्याच्या मनाची शुद्धि होवो. त्याच्या मनामध्यें कलुषता कधींही न येवो. त्याच्या मनाला कालुष्य न स्पर्श करो; हाच माझा इष्ट वर आहे २८. तेव्हां देवेश केशव ह्मणाला, " बरें; असें होवो, तूं आतां स्वर्गास जा. इंद्राचा अतिथि हो. तो हरि तुझी वाट पहात बसला आहे. " असें बोलून भगवानानें त्या ब्रह्मवेत्त्याला तत्काल तेथून उठविलें. नंतर त्याच्याकडून पूजा व स्तुति केली गेलेला भगवान् गोविंद त्याचें विसर्जन करून त्या देशांतून निघाला आणि जेथें ते सिद्ध अग्निहोत्रयुक्त मुनी होते तेथें आला २९—३१. तो स्वर्गप्राप्ति करून घेणारा पिशाचही केशवाच्या आज्ञेनें स्वर्गास

वैशंपायन उवाच ॥ ततः स भगवान्विष्णुर्मुनिभ्यस्तत्त्वमादितः । कथयामास यद्वृत्तं पिशाचस्य महात्मनः १ तच्छ्रुत्वा मुनयः सर्वे विस्मयं परमं गताः । अहोऽस्य कर्मणः पाकस्तव संदर्शनादिति २ अर्चितो मुनिभिः सर्वैः प्रीतः प्रीतिमतां प्रियः । ततः प्रभाते विमले सूर्ये चाभ्युदिते सति ३ आरुह्य गरुडं विष्णुर्ययौ कैलासमुत्तमम् । भवद्भिस्तत्र गन्तव्यमित्युक्त्वा मुनिसत्तमान् ४ यत्र विश्वेश्वराः सिद्धास्तपस्यन्ति यतव्रताः । यत्र वैश्रवणः साक्षादुपास्ते शंकरं शिवम् ५ यत्र तन्मानसं नाम सरो हंसालयं महत् । यत्र भृंगीरिटिर्देवमुपास्ते शंकरं शिवम् ६ गाणपत्यमवाप्याथ हरपार्श्वचरः सदा । यत्र सिंहावराहाश्च द्विपद्वीपिमृगैः सह ७ क्रीडन्ति वन्यरतयः परस्परहिते रताः । यत्र नद्यः समुत्पन्ना गंगाद्याः सागरं गमाः ८ यत्र विश्वेश्वरः शंभुरच्छिनद्ब्रह्मणः शिरः । यत्रोत्पन्ना महावेत्रा भूतानां दण्डतां ययुः ९ उमया यत्र सहितः शंकरो नीललोहितः । ऋषिभिः प्रार्थितः पूर्वं ददौ यत्र गिरिः सुताम् १० शंकराय जगद्धात्रे शिवाय जगतीपते । यत्र लेभे हरिश्चक्रमुपास्य बहुभिर्दिनैः ११ पुष्करैः शतपत्रैश्च वेत्रेण च जगत्पतिम् । गुहां यत्र समाश्रित्य क्रीडन्ते सिद्धकिन्नराः १२ प्रियाभिः सह मोदन्ते पिबन्ते मधु चोत्तमम् । यमुद्धृत्य भुजैः सर्वैः पौलस्त्यो विरराम ह १३ तमा-

---

गेला. यास्तव, हे राजन्, मनःशुद्धीची जर तुला इच्छा असली तर हरीच्या या चरित्राचा नित्य पाठ कर. ह्मणजे हे जगत्पते, त्याचा पाठ करणाऱ्या तुझें मन शुद्ध होईल ३२. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० घंटाकर्णमुक्तिप्रदाननामक त्र्यायशींवा अध्याय समाप्त झाला ॥ ८३ ॥

वैशंपायनः— त्यानंतर त्या भगवान् विष्णूनें माहात्म्या पिशाचाचें घडलेलें वृत्त प्रथमपासून मुनींना सांगितलें १. तें ऐकून सर्व मुनि अतिशय विस्मित झाले. " अहाहा ! भगवाना, तुझ्या दर्शनामुळें याच्या कर्मांचा पाक किती चमत्कारिक झाला हा ! " २. असें बोलून त्या सर्व मुनींनीं प्रीतिमानांचा प्रिय अशा त्या भगवानाची पूजा केली. त्यानंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं स्वच्छ उजाडून सूर्याचा उदय झाला असतां विष्णु गरुडावर आरूढ होऊन व तुह्मीही तेथें जावें असें उत्तम मुनींना सांगून तो स्वतः उत्कृष्ट कैलासास गेला ३,४. जेथें विश्वाचे साक्षात् ईश्वरच असें सिद्ध नियत व्रतसंपन्न होऊन तप करीत असतात, जेथें साक्षात् विश्रवणपुत्र कल्याणरूप शिवाची उपासना करतो, जेथें हंसांचें मोठें घरच, असें मानस नांवाचें सरोवर आहे, जेथें गणपतित्वास प्राप्त होऊन सदा हराच्या बरोबर जाणारा भृंगीरिटि गण कल्याणमय शंकराची उपासना करीत असतो, जेथें सिंह, वराह इत्यादि क्रूर व वन्य पदार्थांवर निर्वाह करणारे पशु हत्ती, चित्ते व हरणें यांच्याशीं परस्परांच्या हितामध्यें रत होऊन क्रीडा करितात, जेथें सागरास जाऊन मिळणाऱ्या गंगादि नद्या उत्पन्न झाल्या आहेत, जेथें विश्वेश्वर शंभूनें ब्रह्मदेवाचें पांचवें मस्तक तोडलें, जेथें उत्पन्न झालेले महावेत्र ( मोठाले वेत ) भूतांच्या दंडतेस प्राप्त होतात ५,९. जेथें उमेसह नीललोहित शंकर वास करतो, जेथें ऋषींनीं प्रार्थना केली असतां पूर्वीं हिमालयपर्वतानें आपली कन्या हे पृथ्वीपते, जगद्धात्या कल्याणमय शंकराला दिली. जेथें पुष्कळ दिवस कमलें, शतपत्रें वेत्र यांनीं उपासना केल्यावर जगत्पति विष्णूला चक्र मिळालें १०-१२. जेथें सिद्ध व किन्नर गुहांचा आश्रय करून आपल्या प्रियांसहवर्तमान आनंदित होतात व उत्तम मद्य प्राशन करितात, ज्याला

रुह्य महाशैलं देवकीनन्दनो हरिः । मानसस्योत्तरं तीरं जगाम यदुनन्दनः १४ तपश्चर्तुं किल हरिर्विष्णुः सर्वेश्वरः शिवः । जटी चीरी जगन्नाथो मानुषं वपुरास्थितः १५ तपसे धृतचित्तस्तु शुचौ भूमावुपाविशत् । अवरुह्य ततो यानाद्गरुडाद्वेदसंमितात् १६ द्वादशाब्दं तपश्चर्तुं मनो दध्रे ततो हरिः । फाल्गुनेन तु मासेन समारेभे जगत्पतिः १७ शाकभक्षः कृतजपो वेदाध्ययनतत्परः । किमुद्दिश्य जगन्नाथस्तपश्चरति मानवः १८ तं न विद्मो यथाकामं दुर्ज्ञेयेश्वरचिन्तनात् । तपस्यति तदा विष्णौ पर्वते भूतसेविते १९ गरुडः कश्यपसुत इन्धनानि समाचिनोत् । होमार्थं वासुदेवस्य चरतस्तप उत्तमम् २० चक्रराजोऽथ पुष्पाणि संचिनोति तदा हरेः । दिक्षु सर्वासु सर्वत्र ररक्ष जलदस्तदा २१ खड्ग आहृत्य यत्नेन कुशान्सुबहुशस्तदा । गदा कौमोदकी चैव परिचर्यां चकार ह २२ धनुःप्रवरमत्युग्रं शार्ङ्गं दानवभीषणम् । स्थितं हि पुरतस्तस्य यथेष्टं भृत्यवत्स्वयम् २३ जुहोति भगवान्विष्णुरेधोभिर्बहुभिः सदा । आज्यादिभिस्तदा हव्यैरग्निं संपूज्य माधवः २४ समार्चिषः समाप्तिं च समस्तव्यस्ततः कृती । एकस्मिन्नेकदा मासे भुंजानो नियतात्मवान् २५ द्वितीये त्वथपर्याये भुंजन्नेकेन केशवः । एकस्मिन्वत्सरे भुंजंस्तथैवेकेन कनचित् २६ समाप्य तत्तपः सर्वमेवमेव जगत्पतिः । द्वादशाब्दे तथा पूर्णे ऊनमासे जगत्पतिः २७ जुह्वन्नग्निं समाध्याय-

---

आपल्या सर्व भुजांनीं वर उचलून पौलस्त्य ( रावण ) विराम पावला ( थकला ) १३. त्या महा शैलावर चढून देवकीनंदन, हरि, यदुनंदन मानससरोवराच्या उत्तर तीरास गेला १४. तेथें तप करण्याकरितां कल्याणमय सर्वेश्वर, हरि, विष्णु, जगन्नाथ, मानुषशरीर धारण करून जटावान् व चीर नेसणारा झाला १५. तपाविषयीं ज्यानें दृढनिश्चय केला आहे असा तो वेदतुल्य गरुडवाहनांवरून खालीं उतरून शुचि भूमीमध्यें बसला. हरीनें बारावर्षें तप करण्याचा निश्चय केला होता. त्या जगत्पतीनें फाल्गुनमहिन्यापासून तपाला आरंभ केला १६,१७. नुस्ती शाक भक्षण करून जप करणारा तो भगवान् वेदाध्ययनांत तत्पर झाला. तो जगन्नाथ मानवाप्रमाणें कोणत्या उद्देशानें तप करतो तें आह्मांला कांहीं कळत नाहीं. कारण आपल्या कामनेप्रमाणें ईश्वराचा संकल्प दुर्ज्ञेय असतो. असो, भूतांनीं ज्याचें सेवन केलें आहे अशा पर्वतावर त्यावेळीं विष्णु तप करूं लागला असतां १८,१९. उत्तम तपश्चरण करणाऱ्या वासुदेवाच्या होमाकरितां कश्यपपुत्र गरुड इंधनें ( लाकडें ) गोळा करता झाला २०. उत्कृष्ट चक्र त्यावेळीं हरीच्या पूजेकरितां पुष्पें आणूं लागलें. शंखानें त्याचें सदा सर्व दिशांमध्यें रक्षण केलें २१. खड्ग मोठ्या यत्नानें पुष्कळ दर्भ आणतें झालें. कौमोदकी गदेनें त्याची परिचर्या केली २२. दानवांस भयंकर वाटणारें व धनुष्यांतील श्रेष्ठ शाङ्‌र्ग धनुष्य त्याच्या पुढें स्वतः भृत्याप्रमाणें इच्छानुरूप सेवा करण्यासाठीं उभें राहिलें २३. नंतर भगवान् विष्णु माधव आज्यादि हव्यांनीं अग्नीचें पूजन करून पुष्कळ समिधांनीं सदा हवन केलें. अग्नीच्या हवनाची समाप्ति समस्त व व्यस्त आहुतींनीं त्या कुशल देवानें केली. ज्याचें चित्त व शरीर नियमित आहे असा तो एका महिन्यांत एकदा भोजन करीत असे २४,२५. याप्रमाणें अनुष्ठानाचा एक पर्याय संपला असतां तो दुसऱ्या पर्यायाचे वेळीं प्रति अयनांत ( ह्मणजे दर सहा महिन्यांनीं ) एकदा भोजन करूं लागला. पुढें एका वर्षांत कोणत्या तरी एकाच अयनांत भोजन करण्याचा निश्चय त्यानें केला २६. याप्रमाणेंच तें सर्व तप संपवून बारावें वर्ष पुरें व्हावयास एकच

न्पठन्मंत्रं जनार्दनः । आरण्यके पठान्विष्णुः साक्षात्सर्वेश्वरो हरिः । आस्ते ध्यानपरस्तत्र पठन्प्रणवमुत्तमम् २८ [ ३९७९ ] इति श्रीमहाभारते खिले० हरि० भविष्य० कैलासयात्रायां कृष्णतपोवर्णनं नाम चतुरशीतितमोऽध्यायः ॥ ८४ ॥

वैशंपायन उवाच ॥ तत इन्द्रः स्वयं तत्र आरुह्य गजमुत्तमम् । द्रष्टुं सर्वेश्वरं विष्णुं तपस्यन्तं समाययौ १ ततो यमस्तु भगवानारुह्य महिषं वरम् । किंकरैश्च स्वयं साक्षादाययौ नगमुत्तमम् २ प्रचेता हंसमारुह्य वारुणैश्च समन्वितः । श्वेतच्छत्रसमायुक्तः श्वेतव्यजनवीजितः ३ ययौकैलासशिखरंद्रष्टुंकेशवमंजसा । अन्येचापि तथा देवा आदित्या वसवस्तथा ४ रुद्राश्चैव तथा राजन्द्रष्टुं केशवमाययुः । सिद्धाश्च मुनयश्चैव गन्धर्वा यक्षकिन्नराः ५ सर्वाश्चाप्सरसो राजन्नृत्यगीतविशारदाः । ततो देवगणाः सर्वे कैलासं समपद्यत ६ पर्वतो नारदश्चैव तथाऽन्ये मुनिसत्तमाः । विस्मयस्थितलोलाक्षाः सर्वदेवगणास्तथा ७ आश्चर्यं खलु पश्यध्वं न भूतं न भविष्यति । योगिध्येयः स्वयं कृष्णो यत्तप्यति गुरुः स्वयम् ॥ कोन्वत्र समयो भूयादिति ते मेनिरेगणाः ८ ततः समाप्ते सकले जगत्पतेर्व्रते समूले सकलेश्वरः शिवः । द्रष्टुं हरिं लोकहितैषिणं प्रभुं ययौ भवान्या सह भूतसंघैः ९ सार्धं कुबेरेण सगुह्यकेन सख्या प्रियेण प्रभुरीश्वरः शिवः । स्वयं जटी भूतपिशाचसंवृतः शरी च खड्गी शशिखण्डशेखरः १० करेण बिभ्रत्सहदर्भकुण्डिकां करेण साक्षादपरेण दीपिकाम् । अन्येन बिभ्रन्महतीं सडिंडिमां शूलं

---

महिना राहिला असतां तो जगत्पति जनार्दन अग्नीमध्यें हवन करीत, उत्तम प्रकारें ध्यान करीत, मंत्रपाठ करीत, आरण्यकाची आवृत्ति करीत, उत्तम प्रणवाचा उच्चार करीत, तो साक्षात् सर्वेश्वर हरि तेथें ध्यानपरायण होऊन राहिला २८. इति श्रीमहा. खि. हरि. भविष्य. कैलासयात्रा. कृष्णतपोवर्णननामक चवऱ्यायशींवा अध्याय समाप्त झाला ॥ ८४ ॥

वैशंपायनः—त्यानंतर स्वतः इंद्र उत्तम ऐरावतावर आरूढ होऊन तप करीत असलेल्या सर्वेश्वर विष्णूला पाहण्याकरितां आला १. त्याच्या मागोमाग भगवान् यम आपल्या श्रेष्ठ महिष ( रेडा ) वाहनावर आरूढ होऊन आपल्या सर्व दूतांसह साक्षात् स्वयं त्या उत्तम पर्वतावर आला. प्रचेता हंसावर आरूढ होऊन वारुणगणांसहवर्तमान केशवास साक्षात् पाहण्यासाठीं कैलासशिखरावर गेला. त्यावेळीं तो श्वेतछत्रानें युक्त असून त्याचे भृत्य त्याच्यावर श्वेतवर्ण पंख्यांनीं वारा घालीत होते. हे राजन् तसेच दुसरेही देव आदित्य, वसु २–४, रुद्र, इत्यादि सर्व केशवास पहावयास आले. सिद्ध, मुनि, गंधर्व, यक्ष किन्नर ५, नृत्य व गीत यांमध्यें अतिशय निपुण असलेल्या सर्व अप्सरा व त्यांच्या मागोमाग सर्व देवगण कैलासास प्राप्त झाले ६. पर्वत, नारद, तसेच आणखी दुसरे मुनिश्रेष्ठ तेथें आले, त्यांचे व सर्व देवगणांचे नेत्र विस्मयानें लोल होऊन राहिले ७. ते गण ‘ अहो पूर्वीं न झालेलें व पुनः न होणारें हें आश्चर्य पहा. हा योग्यांचा ध्येय कृष्ण गुरु स्वतः तप करीत आहे. याचा त्यांत काय बरें उद्देश असावा ? ’ असें ह्मणूं लागले ८. त्यानंतर जगत्पतीचें तें सर्व समूल व्रत समाप्त झालें असतां सकलेश्वर शिव भवानी व भूतसमूह यांसह लोकांच्या हिताची इच्छा करणाऱ्या प्रभु हरीस पहावयास आला ९. सखा व प्रिय असा जो गुह्यकयुक्त कुबेर त्याच्यासहवर्तमान जटावान्, भूत—पिशाच परिवेष्टित, शरयुक्त, व चंद्रशेखर प्रभु ईश्वर शिव तेथें स्वतः आला १०. एका हातानें दर्भकुंडिका, दुसऱ्या हातानें

च बिभ्रत्परेण बाहुना ११ गुणान्स रुद्राक्षकृतान्समुद्वहन्जटाभिरापिंगलताम्रमूर्तिः । विराजमानः प्रभुरिन्दुशेखरो वृषेण युक्तःससितेन शंकरः १२ उमास्तनद्वंद्वसमर्पिताननस्तया-समाश्लिष्यानि पीडिताधरः । गंगांबुविक्षालितचन्द्रशेखरस्तां चापि वीक्षन्बहुशस्तदा शिवः १३ भस्मांगरागैरनुलेपिताननो महोरगैर्बद्धजटः सनातनः । शिरःकपालैः परिशोभितस्तदा द्रष्टुं हरिं केशवमभ्ययाच्छिवः १४ यमाहुरग्र्यं पुरुषं महान्तं पुरातनं सांख्यनिबद्धदृष्टयः । यस्यापि देवस्य गुणान्समग्रांस्तत्त्वांश्चतुर्विंशतिमाहुरेके १५ यमाहुरेकं पुरुषं पुरातनं कणादनामानमजं महेश्वरम् । दक्षस्य यज्ञं विनिहत्य यो वै विनाश्य देवानसुरान्सनातनः १६ यं विदुर्भूततत्त्वज्ञं भूतेशं भूतभावनम् । वामदेवं विरूपाक्षमाहुस्तत्त्वविदो जनाः १७ महादेवं सहस्राक्षं कालमूर्तिंचतुर्भुजम् । रुद्रं रोदननामानमाहुर्विश्वेश्वरं शिवम् १८ अप्रमेयमनाधारमाहुर्माहेश्वरा जनाः । नग्नं नग्नपरीतं तु नागिनं त्वग्निवर्चसम् १९ आहुर्विश्वेश्वरं शान्तं शिवमादिं सनातनम् । तस्य मूर्तीरिमाः सर्वा धरायाः सकला नृप २० भूमिरापोऽनलो वायुः खं सूर्यश्च तथा शशी । अग्निश्च यजमानश्च प्रकृतिश्चैवमष्टधा २१ महादेवो महायोगी गिरीशो नीललोहितः । आदिकर्ता महाभर्ता शूलपाणिरुमापतिः ॥ द्रष्टुं विश्वेश्वरं विष्णुं भूतसंघैः समाययौ २२ [ ४००१ ] इति श्रीमहा० खिले० हरि० भवि० कैलासयात्रायां शिवागमनकथनं नाम पंचाशीतितमोऽध्यायः ॥ ८५ ॥

---

साक्षात् दीपिका, तिसऱ्या हातानें मोठा डमरू व चवथ्या हातानें त्रिशूल धारण करणारा तो ११ रुद्राक्षकृत गुणांस धारण करणारा व जटांच्या योगानें ज्याची मूर्ति पिंगट व ताम्रवर्ण झाली आहे असा शंकर प्रभु चंद्रशेखर शुभ्र वृषभानें ( नंदीनें ) युक्त विराजमान होत्साता तेथें आला १२. उमेच्या स्तनयुग्मावर त्यानें आपलें मुख टेकलें होतें; तिनें आलिंगन देऊन त्याच्या अधरोष्ठाला दंश केला होता. गंगेच्या जलानें त्याचा चंद्रशेखर प्रक्षालित झाला होता. व तो शिव तिलाही पुष्कळ वेळां पहात होता १३. त्याच्या मुखास भस्मांगरागानें अनुलेप केलेला होता. त्या सनातन देवानें महा सर्पांच्या योगानें जटा बांधल्या होत्या. तो शिरःकपालांनीं अतिशय सुशोभित झाला होता. तो शिव अशा स्वरूपानें केशव हरीला पाहावयास आला १४. ज्याची दृष्टि ज्ञानामध्यें निबद्ध आहे असे सिद्ध ज्याला अग्र्य ( मुख्य ) महापुरुष व पुरातन ह्मणतात, सांख्यसंज्ञक दुसरे कित्येक विवेकी ज्या देवाचे समस्त गुण व तत्त्वें चोवीस आहेत असें ह्मणतात, ज्या कणादनामक अज महेश्वरास एक पुराणपुरुष असें आणखी कांहीं ह्मणतात, जो सनातन देव दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करून देव व असुर यांचाही नाश करता झाला १५,१६. व तत्त्वज्ञजन ज्याला भूततत्त्वज्ञ, भूतेश, भूतभावन, वामदेव, विरूपाक्ष, इत्यादि ह्मणतात १७. त्या शिवाला महादेव, सहस्राक्ष, कालमूर्ति, चतुर्भुज, रोदननामा रुद्र, व विश्वेश्वर असेंही ते ह्मणतात १८. माहेश्वर ( शैव ) जन त्याला प्रमाणांना गोचर न होणारा, कोणाचाही आधार न घेणारा, नग्न, उघड्या शरीरानें इतस्ततः फिरणारा, नागभूषण, अग्नीसारखा तेजस्वी, विश्वेश्वर, शांत, शिव, सर्वांचें कारण, सनातन, इत्यादि नांवें देतात. हे राजा, पृथिव्यादि या सर्व त्याच्या मूर्ति आहेत १९,२०. भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, सूर्य, चंद्र, व यजमान या आठ प्रकारची त्याची प्रकृति आहे २१. महादेव, महायोगी, गिरीश, नीललोहित, आदिकर्ता, महाभर्ता व शूलपाणि उमापति

वैशंपायन उवाच ॥ तस्याग्रे समपद्यन्त भूतसंघाः सहस्रशः । घंटाकर्णो विरूपाक्षः कुंडधारः समुद्वहः १ दीर्घरोमा दीर्घभुजो दीर्घबाहुर्निरंजनः । उरुनेत्रः शतमुखः शतग्रीवः शतोदरः २ कुण्डोदरो महाग्रीवः स्थूलजिह्वो द्विबाहुकः । पार्श्ववक्त्रः सिंहमुख उन्नतांसो महाहनुः ३ त्रिबाहुः पंचबाहुश्च व्याघ्रवक्त्रः सिताननः । एते चान्ये च बहवो दीर्घास्या दीर्घलोचनाः ४ नृत्यन्तः प्रहसन्तश्च स्फोटयन्तः परस्परम् । तथान्ये घोररूपाश्च तथान्ये विकृताननाः ५ प्रेतभक्षाः प्रेतवाहा मांसशोणितभोजनाः । शवानि सुबहून्याशु भक्षयन्तस्ततस्ततः ६ पिबन्तो रुधिरं घोरं खण्डयन्तः शवान्बहून् । कराला विततो दीर्घधमनिस्नायुसंतताः ७ नानाविधाः सुवीराश्च शूलाग्रप्रोतमानुषाः । शिरामालावृताः केचिदान्त्रपाशावपाशिताः ८ डिण्डिमैरट्टहासैश्च नादयन्तोवसुन्धराम् । कपालिनो भैरवाश्च जटिला मुण्डिनस्तथा ९ एवं बहुविधा घोराः पिशाचा विकृताननाः । तथान्ये मुनिवीराश्च ध्यायन्तः परमेश्वरम् १० पठन्तो वेदवाक्यानि साङ्गानि विविधानि च । कुण्डिकास्थकराः केचित्केचित्कुशविचीरिणः ११ कौपीनवसनाः केचित्केचित्कार्पाससंवृताः । स्तुवन्तः शंकरं भक्त्या स्तोत्रैर्माहेश्वरैस्तथा १२ एकत्र ते मुनिगणा अपरत्र गणास्तथा । अन्यत्र सिद्धगन्धर्वाः प्रियाभिः सह संगताः १३ नृत्यन्ति नृत्यकुशला गायन्ति स्म च कन्यकाः । विद्या-

---

भूतांच्या संघांसह विश्वेश्वर विष्णूस पहावयास आला २२. इति श्रीमहा. खि. हरि. भवि० कैलासयात्रेंतील शिवागमनकथननामक पंचायशींवा अध्याय समाप्त झाला. ॥ ८५ ॥

वैशंपायनः— त्या देवाच्या पुढें सहस्रावधि भूतसंघ उत्पन्न झाले. घंटकर्ण, विरूपाक्ष, कुंडधार, समुद्वह १, दीर्घरोमा, दीर्घभुज, दीर्घबाहु, निरंजन, उरुनेत्र, शतमुख, शतग्रीव, शतोदर, कुंडोदर, महाग्रीव, स्थूलजिह्व, द्विबाहु, पार्श्ववस्त्र, सिंहमुख, उन्नतांस, महाहनु २,३, त्रिबाहु, पंचबाहु, व्याघ्रवक्त्र, सितानन हे व असेच दुसरेही ज्यांचीं मुखें लांब आहेत व नेत्र दीर्घ आहेत असे भूतगण नाचत, हसत, एकमेकांस ओढीत, ढकलीत, दंड ठोकीत, त्याच्यापुढें चालले होते. तसेंच आणखी अनेक घोररूप, विक्राळमुखसंपन्न ४,५, प्रेतें खाणारे, प्रेतांस वाहणारे, मांस खाऊन रक्त पिणारे, मिळतील तेथें पुष्कळ शवें तत्काल भक्षण करणारे, घोर रक्त पिणारे, पुष्कळ शवांस तोडणारे, कठोर, पुष्ट, दीर्घ धमनी व स्नायु यांनीं बांधले गेलेले ६,७, नाना प्रकारचे, अतिवीर, ज्यांनीं शूलाग्रांवर मनुष्यांस टोंचून घेतलें आहे, जे शिरारूपी मालांनीं आवृत झाले आहेत असे गण त्याच्याबरोबर होते. कित्येकांनीं आपले अवयव आंतड्यांच्या पाशांनीं आवळून बांधले होते ८. डिंडिम व अट्टहास यांच्या योगानें त्यांनीं पृथ्वीला नादित करून सोडलें होतें. त्या पिशाचगणांनीं गळयांत कपालमाला घातल्या होत्या. ते सर्व भयंकर, जटावान् अथवा मुंडन केलेले होते ९. अशाप्रकारचे नानाविध, घोर व विक्राळमुखाचे पिशाच त्याच्याबरोबर आले होते. त्याचप्रमाणें परमेश्वराचें ध्यान करणारे दुसरे मुनिवीर १०, सांग व विविध वेदवाक्यें ह्मणणारे ब्राह्मण, ज्यांच्या हातांत कुंडिका आहेत असें कित्येक, व कित्येक कुश नेसलेले विरक्त तपस्वी होते ११. त्यांतील कित्येकांनीं लंगोट्या घातल्या होत्या, कित्येकांनीं कापसाचीं वस्त्रें गुंडाळलीं होतीं. तसेंच कित्येक माहेश्वर स्तोत्रांनीं मोठ्या भक्तीनें शंकराची स्तुति करीत होते १२. शंकराच्या एके बाजूस ते सर्व मुनिगण व दुसरीकडे गण, व तिसरीकडे आपापल्या प्रियांसह सिद्ध व

धरास्तथान्यत्र स्तुवन्तः शंकरं शिवम् १४ ननृतुस्तस्य पुरतो गच्छन्तोऽप्सरसां गणाः। एव-
मेतैर्महाघोरैः पिशाचैर्भूतकिन्नरैः १५ मुनिभिश्चैव प्रमथैः समं शर्वः समाययौ। यत्र विश्वे-
श्वरो विष्णुस्तपस्तेपे सुदारुणम् १६ यत्र ते लोकपालाश्च तिष्ठन्ति स्म दिदृक्षया। उमया
लोकभाविन्या गंगया चन्द्रशेखरः १७ ससर्वलोकप्रभवो भवो विभुर्जटी च साक्षात्प्रणवा-
त्मकः कृती। द्रष्टुं हरिं विष्णुमुदारविक्रमो ययौ यथेष्टं पिशिताशनैर्वृतः १८ [ ४०१९ ]
इति श्रीम० खि० हरि० भवि० कैलासयात्रायां महादेवागमने षडशीतितमोऽध्यायः॥ ८६॥

वैशंपायन उवाच॥ एवं बहुविधैर्भूतैः पिशाचैरुरगैः सह। आगत्य भगवान्रुद्रः शंकरो
वृषवाहनः १ ददर्श विष्णुं देवेशं तपन्तं तप उत्तमम्। जुह्वानमग्निं विधिवद्द्रव्यैर्मेध्यैर्जग-
त्पतिम् २ गरुडाहृतकाष्ठं तु जटिलं चीरवाससम्। चक्रेणानीतकुसुमं खड्गानीतकुशं
तथा ३ गदाकृतसमाचारं देवदेवं जनार्दनम्। इन्द्राद्यैर्देवसंघैश्च वृतं मुनिगणैः सह ४
आचिन्त्यं सर्वभूतानां ध्यायन्तं किमपि प्रभुम्। अवरुह्य वृषाच्छर्वो भगवान् भूतभावनः ५
ततः प्रीतः प्रसन्नात्मा ललाटाक्ष उमापतिः। ततो भूतपिशाचाश्च राक्षसा गुह्यकास्तथा ६
मुनयो विप्रवर्याश्च जयशब्दं प्रचक्रिरे। जय देव जगन्नाथ जय रुद्र जनार्दन ७ जय
विष्णो हृषीकेश नारायण परायण। जय रुद्र पुराणात्मन् जयदेव हरेश्वर ८ आदिदेव

---

गंधर्व उभे होते १३. एकत्र जमलेले नृत्यकुशल सिद्धादिक नाचत होते. कन्यका गात होत्या. त्याचप्रमाणें तेथें विद्याधर शंकर शिवाची स्तुति करीत होते १४. त्या देवाच्या पुढें जाणाऱ्या अप्सरांचे संघ नाचत होते. सारांश, अशा प्रकारच्या महाघोर पिशाचांसह व भूत, किन्नर १५, मुनि, आणि प्रमथगण यांसह शर्व जेथें विश्वेश्वर विष्णु अतिशय भयंकर तप करीत होता तेथें आला १६. जेथें त्याला पाहण्याच्या इच्छेनें ते सर्व लोकपाल येऊन उभे होते तेथेंच तो चंद्रशेखर उमा व लोककर्त्री गंगा यांसह आला १७. मांसभक्षक पिशाचादिकांनीं आवृत झालेला सर्व लोकांचा जनक, विभु, जटावान्, कुशल, उत्तम पराक्रमी व साक्षात् प्रणवात्मक भव ( शंकर ) हरीला पहावयास आला १८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलास महादेवाच्या आगमनाविषयीं शायशींवा अध्याय समाप्त झाला. ॥ ८६ ॥

वैशंपायनः—याप्रमाणें नानाप्रकारचीं भूतें, पिशाचें, उरग यांसह वृषभवाहन शंकर रुद्र येऊन उत्तम तप करणाऱ्या, पवित्र हवनीय द्रव्यांनीं यथाशास्त्र अग्नीमध्यें हवन करणाऱ्या देवेश विष्णूस अवलोकन करिता झाला १, २. त्याला लागणारीं काष्ठें गरुड आणून देत होता. त्यानें जटा राखून लंगोटी नेसली होती. चक्र त्याला फुलें आणून देत होतें. खड्ग दर्भ आणून देत होतें. गदा त्याची परिचर्या करीत होती. मुनिगणांसह इंद्रादि देवसंघांनीं आवृत झालेल्या त्या देवाधिदेव जनार्दनास शंकरानें पाहिलें ३, ४. तो प्रभु सर्व भूतांस अचिंत्य असलेल्या कोणत्याशा अनिर्वाच्य तत्त्वाचें ध्यान करीत होता. त्याला पाहिल्यावर ज्याच्या ललाटावर नेत्र आहे असा भगवान् उमापति अतिशय संतुष्ट व प्रसन्नचित्त होऊन नंदीवरून खालीं उतरला. तेव्हां भूतसंघ, पिशाच, राक्षस, गुह्यक, मुनि व ब्राह्मणवर्य जयजयकार करूं लागले. "हे देवा, जगन्नाथा, तुझा जयजयकार असो. हे रुद्रा, जनार्दना, तुझा विजय असो ५–७. हे विष्णो, हे हृषीकेशा, नारायणा, परायणा, तुझा जयजयकार असो. हे पुराणात्मन् रुद्रा, तुझा जयजयकार असो. हे देवा, हे हरा, ईश्वरा, तुझा विजय होवो ८. हे आदिदेवा, हे शंकरा, हे जग-

जगन्नाथ जय शंकर भावन । जय कौस्तुभदीप्तांग जय भस्मविराजित ९ जय चक्रगदा-
पाणे जय शूलिंस्त्रिलोचन । जय मौक्तिकदीप्तांग जय नागविभूषण १० इति ते मुनयः
सर्वे प्रणामं चक्रिरे हरिम् । तत उत्थाय भगवान्दृष्ट्वा देवमवस्थितम् ११ वृषध्वजं विरू-
पाक्षं शंकरं नीललोहितम् । ततो हृष्टमना विष्णुस्तुष्टाव हरमीश्वरम् १२ श्रीभगवानुवाच ॥
नमस्ते शितिकण्ठाय नीलग्रीवाय वेधसे । नमस्ते शोचिषे अस्तु नमस्ते उपवासिने १३
नमस्ते मीढुषे अस्तु नमस्ते गदिने हर । नमस्ते विश्वतनये वृषाय वृषरूपिणे १४
अमूर्ताय च देवाय नमस्तेऽस्तु पिनाकिने । नमः कुब्जाय कूपाय शिवाय शिवरूपिणे १५
नमस्तुण्डाय तुष्ट्याय नमस्तुटितुटाय च । नमः शिवाय शान्ताय गिरिशाय च ते नमः १६
नमो हराय हिप्राय नमो हरिहराय च । नमो घोराय घोराय घोरघोरप्रियाय च १७
नमो घण्टाय घण्टाय नमो घटिघटाय च । नमः शिवाय शान्ताय गिरिशाय च ते नमः १८
नमो विरूपरूपाय पुराय पुरहारिणे । नम आद्याय बीजाय शुचयेऽष्टस्वरूपिणे १९ नमः
पिनाकहस्ताय नमः शूलासिधारिणे । नमः खट्वांगहस्ताय नमस्ते कृत्तिवाससे २०
नमस्ते देवदेवाय नम आकाशमूर्तये । हराय हरिरूपाय नमस्ते तिग्मतेजसे २१
भक्तप्रियाय भक्ताय भक्तानां वरदायिने । नमोऽस्तु मूर्तये देव जगन्मूर्तिधराय च २२ नम-

---

न्नाथा, हे कारणात्मन्, ज्याचें अंग कौस्तुभानें दीप्त झालें आहे अशा हे विष्णो, व ज्याचें अंग भस्मानें विराजित झालें आहे अशा हे शंभो, तुम्हां दोघांचाही जयजयकार असो ९. हे चक्र-गदा-पाणे, व शूलधर त्रिलोचना, हे मौक्तिकदीप्तांग ( मोत्यांनीं ज्याचें अंग दीप्त झालें आहे. ) व हे नागभूषण, तुझा विजय होवो " १०. असें बोलून त्या सर्व मुनींनीं हरीला प्रणाम केला. तेव्हां शंकरदेव आला आहे असें पाहून भगवान् उठला ११. आणि वृषध्वज, विरूपाक्ष, नीललोहित, शंकर, व ईश्वर हराची तो व्यापी देव हृष्टमनानें स्तुति करूं लागला १२. श्रीभगवान्:— तुज विषकंठास नमस्कार असो. नीलग्रीव व वेधा अशीं नांवें धारण करणाऱ्या तुला मी प्रणाम करतों. तुज दीप्तिमानास नमस्कार असो. उपवासी, मीढुष, व गदावान् अशा तुला नमस्कार असो. हे हरा, विश्वमूर्ति, धर्मरूप, व वृषस्वरूप अशा तुला मी वंदन करतों १३,१४. तुज अमूर्त देवास नमस्कार असो. पिनाक धनुष्य धारण करणारास मी वंदन करतो. कुब्ज, कूप, शिव, शिवरूपि अशा शंकराला माझा प्रणाम असो १५. त्या सर्वभक्षक देवाला, त्या संतुष्टाला, व त्या महा हिंसकाला नमस्कार असो. कल्याणमय, शांत व पर्वतावर शयन करणाऱ्या तुला मी प्रणाम करतों १६. हर, हिप्र, हरिहर, घोर, अघोर, अति घोर व घोरप्रिय अशा तुला मी वंदन करितों १७. अघंट, घंट, घटिघट, शिव, शांत व गिरिश अशा तुला नमस्कार असो १८. ज्याचें रूप विरूप आहे, अशा पुरसंज्ञक देवाला, त्रिपुरसंहारकाला, आद्य बीजाला, शुचि देवाला, आठ स्वरूपांनीं युक्त असणाराला माझा नमस्कार असो १९. ज्याच्या हातात पिनाक आहे अशा महादेवाला नमस्कार असो. शूल व खड्ग यांस धारण करणारास नमस्कार असो. ज्याच्या हातांत खट्वांग आहे अशा वृषभवाहनाला मी वंदन करितों. गजचर्मपरिधान करणारास मी नमस्कार करितों २०. तुज देवदेवांस नमस्कार असो; आकाश हीच ज्याची एक मूर्ति आहे अशा तुला माझा प्रणाम असो. ज्याचें तेज तीक्ष्ण आहे अशा हरिरूप हराला नमस्कार असो २१.

श्चन्द्राय देवाय सूर्याय च नमो नमः । नमः प्रधानदेवाय भूतानां पतये नमः २३ करालाय च मुंडाय विकृताय कपर्दिने । अजाय च नमस्तुभ्यं भूतभावनभावन २४ नमोस्तु हरिकेशाय पिंगलाय नमो नमः । नमस्ते भीषुहस्ताय भीरुभीरुहराय च २५ हराय भीतिरूपाय घोराणां भीतिदायिने । नमो दक्षमखघ्नाय भगनेत्राय हारिणे २६ उमापते नमस्तुभ्यं कैलासनिलयाय च । आदिदेवाय देवाय भवाय भवरूपिणे २७ नमः कपालहस्ताय मनोजमथनाय च । त्र्यंबकाय नमस्तुभ्यं त्र्यक्षाय च शिवाय च २८ वरदाय वरेण्याय नमस्ते चन्द्रशेखर । नम इध्माय हविषे ध्रुवाय च कुशाय च २९ नमस्ते शक्तियुक्ताय नागपाशप्रियाय च । विरूपाय सुरूपाय मद्यपानप्रियाय च ३० श्मशानरतये नित्यं जयशब्दप्रियाय च । खरप्रियाय खर्वायखरायखररूपिणे ३१ भद्रप्रियाय भद्राय भद्ररूपधराय च । विरूपाय सुरूपाय महाघोराय ते नमः ३२ घंटायघंटभूषाय घंटभूषणभूषिणे । तीव्राय तीव्ररूपाय तीव्ररूपप्रियाय च ३३ नग्नाय नग्नरूपाय नग्नरूपप्रियाय च । भूतावास नमस्तुभ्यं सर्वावास नमो नमः ३४ नमः सर्वात्मने तुभ्यं नमस्ते भूतिदायक । नमस्ते वामदेवाय महादेवाय ते नमः ३५ ननु वाक्स्तुतिरूपा ते कोऽनु स्तोतुं प्रशक्नुयात् । कस्य वा स्फुरते जिह्वा स्तुतौ स्तुतिमतां वर ३६ क्षमस्व भगवन्देव भक्तोऽहं त्राहि मां हर । सर्वात्मन्सर्वभू-

---

हे देवा, ज्याला भक्त प्रिय आहेत, जो स्वतः भक्तांचा भक्त आहे, जो भक्तांना वर देणारा आहे, ज्यानें जगत् हीच मूर्ति धारण केली आहे, अशा तुज मूर्तिमानाला नमस्कार असो २२. चंद्र देवाला, व तुज सूर्याला नमस्कार असो, नमस्कार असो. प्रधान देवाला नमस्कार असो. भूतपतीला नमस्कार असो २३. हे भूतोत्पादक प्रकृतीच्या आश्रयभूत देवा, कराळ, मुंड, विकृत, कपर्दी व अज, अशा तुला नमस्कार असो २४. किरण किंवा इंद्रियें केंसाप्रमाणें ज्याच्या स्वरूपांत अंतर्गत व बाहेरही पसरलेलीं आहेत अशा तुला नमस्कार असो. पिंगलाला नमस्कार असो. हातांत अभीषु ( घोड्याचे लगाम ) घेऊन अर्जुनाचें सारथ्य करणाऱ्या तुला व आतिशय संहारकास नमस्कार असो २५. भीतिरूप हर, घोर प्राण्यास भय देणारा, दक्षाच्या यज्ञाचा ध्वंस करणारा, भगनेत्र व संहर्ता अशा तुज देवाला नमस्कार असो २६. हे उमापते, कैलासावर घर करून राहणाऱ्या तुला नमस्कार असो. आदिदेव, प्रकाशमय, भव व भवरूपी अशा तुज शंकराला मी वंदन करतों. ज्याच्या हातांत कपाल आहे अशा मन्मथनाशकास नमस्कार असो. त्रिनेत्र व शिव अशा तुज त्र्यंबकाला नमस्कार असो २७, २८. हे चंद्रशेखरा, वरद व सेवनीय अशा तुला मी वंदन करतों. इध्म, हवि, ध्रुव, व कुश एतद्रूप तुला नमस्कार असो २९. तुज शक्तियुक्तास मी वंदन करतों. ज्याला नागपाश प्रिय आहेत व मद्यपानही प्रिय आहे अशा विरूप व सुरूप शंकराला नमस्कार असो ३०. ज्याची रति श्मशानांत आहे, ज्याला जय हा शब्द प्रिय आहे अशा खरप्रिय, सर्व, तीक्ष्ण, व क्रूरस्वरूप अशा देवाला मी प्रणाम करतों ३१. भद्रप्रिय, भद्र, भद्ररूपधर, विरूप, सुरूप, व महाघोर अशा तुला नमस्कार असो ३२. घंट, घंटभूषण, घंटारूपी भूषणांनीं भूषित, तीव्र, तीव्ररूप, तीव्ररूपप्रिय ३३, नग्न, नग्नरूप, नग्नरूपप्रिय, अशा हे भूतांच्या निवासस्थानभूत देवा, तुला नमस्कार असो. हे सर्वाधार, तुला मी वंदन करितों ३४. तुज सर्वात्म्यास नमस्कार असो. हे ऐश्वर्यदायका, तुला नमस्कार असो. वामदेवसंज्ञक तुला नमस्कार असो. तुज महादेवास नमस्कार असो ३५. खरोखर कोण-

तेश त्राहि मां सततं हर ३७ रक्ष देव जगन्नाथ लोकान्सर्वात्मना हर । त्राहि भक्तान्सदा देव भक्तप्रिय सदा हर ३८ [ ४०५७ ] इति श्रीम० खि० हरि० भविष्यपर्वणि कैलासयात्रायां विष्णुकृतईश्वरस्तुतिर्नाम सप्ताशीतितमोऽध्यायः ॥ ८७ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततो वृषध्वजो देवः शूली साक्षादुमापतिः । करं करेण संस्पृश्य विष्णोश्चक्रधरस्य ह १ प्रोवाच भगवानुरुद्रः केशवं गरुडध्वजम् । शृण्वतां सर्वदेवानां मुनीनां भावितात्मनाम् २ किमिदं देवदेवेश चक्रपाणे जनार्दन । तपश्चर्या किमर्थं ते प्रार्थना तव का विभो ३ स्वयं विष्णुर्भवान्नित्यं तपस्त्वं तपसां हरे । पुत्रार्थं यदि ते देव तपश्चर्या जनार्दन ४ पुत्रो दत्तो मया देव पूर्वमेव जगत्पते । शृणु तत्रापि भगवन्कारणं कारणात्मक ५ तपश्चर्तुं प्रवृत्तोऽहं कुतश्चित्कारणाद्धरे । वर्षायुतं महाघोरं पुरा कृतयुगे तदा ६ भवानी तत्र मे देव परिचर्तुं तदाभवत् । पित्रा नियुक्ता देवेश उमैषा वरवर्णिनी ७ भीत इंद्रस्तदा देव मारं मां प्रेषयत्तदा । मधुना सह संयुक्तो मारो मामागतस्तदा ८ लक्ष्यं मामकरोत्तत्र बाणस्य प्रेषितस्य ह । एषा मां सेवते तत्र दानात्पुष्पादिनां हरे ९ ततः क्रुद्धोहमभवं दृष्ट्वा मारं तथाविधम् । क्रुध्यतो मम देवेश नेत्रादग्निः पपात ह १० सोऽयमग्निस्तदा मारं भस्मसात्कृतवान्हरे । अचिन्तयंतदा विष्णो शक्रस्यैतच्चिकीर्षितम् ११ ततः प्रभृति देवेश दया तं प्रति वर्तते ।

---

तीही वाणी तुझ्या स्तुतिरूप आहे. तुझी स्तुति करण्यास कोण समर्थ होणार आहे ? हे स्तुतिमानांतील श्रेष्ठा, कोणाची जिह्वा तुझी स्तुति करण्यास प्रवृत्त तरी होणार आहे ? ३६. हे भगवन्, हे देव, मी तुझा भक्त आहें. हे हरा, माझें रक्षण कर. हे सर्वात्मन्, हे सर्व भूतेश, हे हर, माझें सतत त्राण कर ३७. हे देवा, जगन्नाथा, हरा, लोकांचें सर्वप्रकारें रक्षण कर. हे भक्तांस प्रिय असलेल्या हर देवा, भक्तांचें सदा सतत रक्षण कर ३८. इति श्रीमहा. खि० हरि. भविष्य. कैलास. विष्णुकृत ईश्वरस्तुतिनामक सत्यायशींवा अध्याय समाप्त झाला ॥ ८७. ॥

वैशंपायनः— त्यानंतर वृषध्वज, शूली, साक्षात् उमापति चक्रधर विष्णूच्या हातास आपल्या हस्तानें स्पर्श करून १ त्यानंतर तो भगवान् रुद्र गरुडध्वज, सर्व देव व ज्यांना आत्मसाक्षात्कार झाला आहे असे मुनि ऐकत असतांना, केशवास ह्मणाला, " हे देवदेवेश, चक्रपाणे, जनार्दन, हें काय ? तुझी ही तपश्चर्या कशा करितां आहे ? हे विभो, तुझी इच्छा काय आहे ? २-३. तूं स्वतः नित्य विष्णु आहेस. हे हरे, तूंच तपस्व्यांचें तप आहेस. हे जनार्दना, तुझी ही तपश्चर्या पुत्राकरितां जर असेल तर हे जगत्पते, मी तुला तो पूर्वींच दिला आहे. हे कारणात्मक देवा, त्याचेंही कारण तूं ऐक ४-५. हे हरे, पूर्वी कृतयुगामध्यें मी कांहीं कारणानें तप करण्यास प्रवृत्त झालों. मी तें महाघोर तप दशसहस्र वर्षें केलें ६. त्यावेळीं हे देवा, वराची इच्छा करणारी ही पार्वती उमा, तिच्या पित्यानें तिला त्या कामांत नियुक्त केल्यामुळें तेथें माझी परिचर्या करूं लागली ७. त्याचवेळीं भयभीत झालेल्या इंद्रानें मजकडे मदनाला पाठविलें. तेव्हां वसंतासहवर्तमान तो मार मजकडे आला. त्यानें सोडलेल्या आपल्या बाणाचें लक्ष्य मला केलें. हे हरे, ही गौरी मला पुष्पादिक देऊन माझी सेवा करीतच होती ८. पण मार मजवर शरप्रहार करीत आहे, असें पाहून मला मोठा क्रोध आला. हे देवेशा, रागावलेल्या माझ्या नेत्रांतून अग्नि निघाला ९, १०. हे हरे, त्या अग्नीनें तत्काल मदनाचें भस्म करून सोडलें. तेव्हां हे विष्णो, हें सर्व इंद्राचें इष्ट कृत्य आहे, असें माझ्या मनांत आलें ११, आणि त्यामुळें त्या दिवसापासून निरपराधी कामा-

ब्रह्मणा च नियुक्तोऽस्मि प्रीतस्तत्र जनार्दन १२ नियुक्तः पुत्ररूपेण स ते देव जगत्पते । ज्येष्ठस्तव सुतो देव प्रद्युम्नेत्यभिविश्रुतः १३ स्मरं तं विद्धि देवेश नात्र कार्या विचारणा । इत्युक्त्वा पुनराहेदं याथात्म्यं दर्शयन्निव १४ मुनीनां श्रोतुकामानां याथात्म्यं तत्र सत्तमः । अंजलिं संपुटं कृत्वा विष्णुमुद्दिश्य शंकरः १५ उमया सार्धमीशानो याथात्म्यं वक्तुमैहत । हरे कुर्वति तत्रैवमंजलिं कुरुसत्तम १६ मुनयो देवगंधर्वाः सिद्धाश्च सहकिन्नराः । अंजलिं चक्रिरे विष्णौ देवदेवेश्वरे हरौ १७ महेश्वर उवाच ॥ यत्तत्कारणमाहुस्तत्सांख्याः प्रकृतिसंज्ञकम् । ततो महान्समुत्पन्नः प्रकृतिर्यस्य कारणम् १८ त्रिधाभूतं जगद्योनिं प्रधानं कारणात्मकम् । सत्वं रजस्तमो विष्णो जगदण्डं जनार्दन १९ तस्य कारणमाहुस्त्वां सांख्यप्रकृतिसंज्ञकम् । तद्रूपेण भवान्विष्णो परिणम्याधितिष्ठति २० तस्मात्तु महतो घोरादहंकारो महानभूत् । सत्वमादौ जगन्नाथ परिणामस्तथा हि सः २१ अहंकारात्प्रभो देव कारणानि महान्ति च । तन्मात्राणि तथा पंच भूतानि प्रभवन्त्युत २२ तानि त्वामाहुरीशानं भूतानीह जगत्पते । पृथिवी वायुराकाशमापोज्योतिश्च पंचमम् २३ चक्षुर्घ्राणं तथा स्पर्शो रसनं श्रोत्रमेव च । मनः षष्ठं तथा देव प्रेरकं तत्र तत्र ह २४ कर्मेन्द्रियाणि चान्यानि वागादीनि जनार्दन । त्वमेव तानि सर्वाणि करोषि नियतात्मवान् २५ स्वेषु स्वेषु जगन्नाथ विषयेषु तथा हरे । निवेशयसि देवेश योग्यामिन्द्रियपद्धतिम् २६ यदा त्वं रजसा

---

विषयीं माझ्या मनांत दया उत्पन्न होऊन राहिली. नंतर हे जनार्दना, मदनावर संतुष्ट झालेल्या मला ब्रह्मदेवानें प्रेरणा केली असतां मीही त्याला तुझा पुत्र होण्याविषयीं सांगितलें. हे देवा, प्रद्युम्न या नांवानें प्रख्यात असलेला जो तुझा ज्येष्ठ पुत्र तोच स्मर आहे, असें जाण. त्याविषयीं संशय बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं, असें बोलून पुनः जणु काय आपलें याथात्म्य (:यथार्थ स्वरूप ) व्यक्त करीतच तो असें ह्मणाला १२-१४. त्या उत्तमानें तेथें जमलेल्या व ईश्वराचें याथात्म्य श्रवण करण्याची इच्छा करणाऱ्या मुनींना तें कळावें ह्मणूनच असें भाषण केलें. उमेसह शंकरानें विष्णूला उद्देशून हात जोडून असें त्याचें याथात्म्य सांगण्यास आरंभ केला. पण हे कुरुश्रेष्ठा, त्या हरानें हात जोडले असतां मुनि, देव, गंधर्व, सिद्ध, किन्नर इत्यादिकही देवाधिदेव हरि, ईश्वर विष्णूपुढें हात जोडते झाले १५–१७. महेश्वरः—ज्याला सांख्य प्रकृतिसंज्ञक कारण असें म्हणतात. त्याच्यापासून महत्तत्व उत्पन्न झालें. प्रकृति हें त्याचें कारण आहे १८. तें कारणात्मक प्रधान त्रिधा भिन्न होऊन जगाचें उत्पत्तिस्थान झालें आहे. हे विष्णो, जनार्दना, सत्व, रज, तम, जगत् व ब्रह्मांड यांचें सांख्यप्रकृतिसंज्ञक तूंच कारण आहेस, असें ह्मणतात हे विष्णो, तूं त्यांच्या रूपानें परिणाम पावून त्यांचा अधिष्ठाता होऊन राहतोस १९, २०. त्या घोर महत्तत्त्वापासून मोठा अहंकार झाला. हे जगन्नाथ, प्रथम सत्त्व व नंतर त्याचा तसाच परिणाम २१. हे प्रभो, देवा, अहंकारापासून मोठीं कारणें, तन्मात्रें व तशींच पंचभूतें उत्पन्न होतात २२. तीं भूतेंही तूंच आहेस, असें तुज ईशाला ह्मणतात. पृथिवी, आप्, ज्योति, वायु व आकाश, हीं तीं पांच भूतें आहेत २३. नेत्र, घ्राण, त्वक्, रसन व श्रोत्र आणि सहावें मन हीं इंद्रियें आहेत. हे देवा, तें मन प्रत्येक क्रियेमध्यें प्रेरणा करणारें आहे २४. हे जनार्दना, दुसरीं वागादि कर्मेंद्रियें आहेत. नियतचित्त असा तूंच त्या सर्वांना उत्पन्न करितोस २५. हे जगन्नाथा, हरे, हे देवेशा,

युक्तस्तदा भूतानि सृष्टवान् । यदा च सत्त्वयुक्तोऽसि तदा पाता जगत्त्रयम् २७
यदा त्वं तमसाकृष्टस्तदा संहरसे जगत् । त्रिभिरेव गुणैर्युक्तः सृष्टिरक्षाविनाशने २८ वर्तसे
त्रिविधां भूतिमादाय नियतात्मवान् । इन्द्रियाणींद्रियार्थेषु नियोजयसि माधव २९ प्राणि-
नामुपभोगार्थमन्तः स्थित्वा जगद्गुरो । तस्मात्सर्वत्र भूतेषु वर्तसे सर्वभोगवान् ३० ब्रह्मा
त्वं सृष्टि काले तु स्थितौ विष्णुरसि प्रभो । संहारे रुद्रनामासि त्रिधामा त्वमसि प्रभो ३१
भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च । एताः प्रकृतयो देव भिन्नाः सर्वत्र ते हरे ३२
सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । सहस्रधारः साहस्री सहस्रात्मा दिवस्पतिः ३३
भूमिं सर्वामिमां प्राप्य सप्तद्वीपां ससागराम् । अणुः सर्वत्रगो भूत्वा अत्यतिष्ठद्दशांगु-
लम् ३४ त्वमेवेदं जगत्सर्वं यद्भूतं यच्च भविष्यति । त्वत्तो विराट्प्रादुरभूत्सम्राट् चैव जना-
र्दन ३५ तव वक्त्राज्जगन्नाथ ब्राह्मणो लोकरक्षकः । प्रादुरासीत्पुराणात्मन्षट्कर्मनिरतः
सदा ३६ राजन्यस्तु तथा बाह्वोरासीत्संरक्षणे रतः । ऊर्वोर्वैश्यस्तथा विष्णोः पादाच्छूद्र
उदाहृतः ३७ एवं वर्णा जगन्नाथ तव देहाज्जनार्दन । मनसस्तव देवेश चन्द्रमाः समप-
द्यत ३८ सुखकृत्सर्वभूतानां शीतांशुरमितप्रभः । अक्ष्णोः सूर्यः समुत्पन्नः सर्वप्राणिविलो-
चनः ३९ यस्य भासा जगत्सर्वं भासते भानुमानसौ । मुखादिन्द्रश्च अग्निश्च प्राणाद्वायुर-
जायत ४० नाभेरभूदन्तरिक्षं तव देव जनार्दन । द्यौरासीत्तु महाघोरा शिरसस्तव गोपते ४१

---

योग्य इंद्रिय पद्धतीस तूं आपापल्या विषयांमध्यें प्रविष्ट करतोस २६. जेव्हां तूं रजोयुक्त असतोस तेव्हां भूतांस उत्पन्न करतोस आणि जेव्हां सत्त्वयुक्त होतोस तेव्हां त्रिभुवनाचें पालन करतोस २७. जेव्हां तूं तमोगुणानें आकृष्ट होतोस तेव्हां जगाचा संहार करतोस. याप्रमाणें तीनही गुणांनीं युक्त होऊनच तूं जगाची सृष्टि, रक्षा व विनाश यांत तत्पर होतोस २८. हे माधवा, त्रिविध ऐश्वर्य घेऊन नियतस्वरूप झालेला तूं इंद्रियांस विषयामध्यें नियुक्त करतोस २९. हे जगद्गुरो, प्राण्यांच्या उपभोगार्थ आंत राहून तूं हें सर्व करीत असतोस. यास्तव सर्व भूतांमध्यें सर्व भोगवान् होऊन तूं राहतोस ३०. सृष्टिकालीं ब्रह्मा, स्थितिकालीं विष्णु व संहारप्रसंगीं तूं रुद्रनामा आहेस. हे प्रभो, याप्रमाणें तूं त्रिधामा आहेस ३१. हे देवा, हरे, भूमि, जल, अग्नि, वायु, आकाश, मन, व बुद्धि या तुझ्या सर्वत्र भिन्न प्रकृति आहेत ३२. ज्याला अनंत मस्तकें, नेत्र व पाय आहेत, जो अनंत धारावान्, सर्व, अनंतरूप, सहस्रात्मा व दिवस्पति आहे तो पुरुष तूंच ३३. सप्तद्वीपयुक्त, सागरांसह या सर्व भूमीस प्राप्त होऊन अणु व सर्वव्यापी होऊन तो परमात्मा दहा अंगुळें अवशिष्ट राहिला आहे ३४. तूंच हें सर्व भूत व भविष्यत् जगत् आहेस. हे जनार्दना, तुझ्यापासून विराट् व सम्राट उत्पन्न झाला ३५. हे पुराणात्मन् जगन्नाथा, तुझ्या मुखापासून लोकरक्षक व सदा षट्कर्मनिरत ब्राह्मण प्रादुर्भूत झाला. संरक्षणांत रत असलेला क्षत्रिय दोन्ही बाहूमध्यें उद्भवला. विष्णूच्या ऊरूंपासून वैश्य झाला आणि पायांपासून शूद्र झाल्याचें सांगितलें आहे ३६,३७. हे जनार्दना, हे जगन्नाथा, याप्रमाणें सर्व वर्ण तुझ्या देहापासून झाले आहेत. हे देवेशा, तुझ्या मनापासून चंद्रमा उत्पन्न झाला. तो सर्व भूतांस सुख देणारा शीतांशु अमित तेजस्वी आहे. सर्व प्राण्यांचा नेत्रच असा सूर्य दोन्ही नेत्रांपासून उत्पन्न झाला ३८,३९. ज्याच्या प्रकाशानें सर्व जगत् प्रकाशमान होतें तो हा भानुमान् होय. मुखापासून इंद्र व अग्नि आणि

पद्भ्यां भूमिः समुत्पन्ना दिशः श्रोत्राज्जगत्पते । एवं सृष्ट्वा जगत्सर्वं व्याप्य सर्वं व्यवस्थितः ४२ व्याप्य सर्वानिमाँल्लोकान्स्थितः सर्वत्र केशव । ततश्च विष्णुनामासि धातोर्व्याप्तेश्च दर्शनात् ४३ नारा आपः समाख्यातास्तासामयनमादितः । यतस्त्वं भूतभव्येश तन्नारायणशब्दितः ४४ हरसि प्राणिनो देव ततो हरिरिति स्मृतः । शंकरोसि सदा देवः ततः शंकरतां गतः ४५ बृहत्त्वाद्बृंहणत्वाच्च तस्माद्ब्रह्मेति शब्दितः । मधुरिन्द्रियनामेतिततोमधुनिषूदनः ४६ हृषीकाणींद्रियाण्याहुस्तेषामीशो यतो भवान् । हृषीकेशस्ततो विष्णो ख्यातो देवेषु केशव ४७ क इति ब्रम्हणो नाम ईशोऽहं सर्वदेहिनाम् । आवां तवांगसंभूतौ तस्मात्केशव नामवान् ४८ माविद्या च हरे प्रोक्ता तस्या ईशो तयो भवान् । तस्मान्माधवनामासि धवः स्वामीति शब्दितः ४९ गौरेषा तु यतो वाणी तां च वेद यतो भवान् । गोविंदस्तु ततो देव मुनिभिः कथ्यते भवान् ५० त्रिरित्येव त्रयो वेदाः कीर्तिता मुनिसत्तमैः । क्रमते तांस्तथा सर्वांस्त्रिविक्रम इति श्रुतः ५१ अणुर्वामननामासि यतस्त्वं वामनाख्यया । मननान्मुनिरेवासि यमनाद्यतिरुच्यते ५१ तपश्चरसि यस्मात्त्वं तपस्वीति च शब्दितः । वसन्ति त्वयि भूतानि भूतावासस्ततो हरे ५३ ईशस्त्वं सर्वभूतानामीश्वरोऽसि ततो हरे ।

---

प्राणापासून वायु झाला ४०. हे देवा, जनार्दना, तुझ्या नाभीपासून अंतरिक्ष झालें. हे इंद्रियपते, तुझ्या मस्तकापासून अतिशय घोर आकाश उत्पन्न झालें ४१. जगत्पते, पायांपासून भूमि उत्पन्न झाली. श्रोत्रापासून दिशा झाल्या. याप्रमाणें सर्व जग निर्माण करून व सर्व व्यापून तूं व्यवस्थित होऊन राहिला आहेस ४२. हे केशवा, या सर्व लोकांस व्यापून तू सर्वत्र स्थित आहेस. त्यामुळें तुला विष्णु हें नांव प्राप्त झालें आहे. कारण त्या नांवांतील विष् या धातूचा व्याप्ति असा अर्थ शब्दशास्त्रज्ञांनीं सांगितला आहे ४३. जलाला नारा असें ह्मणतात. त्यांमध्यें आरंभीं तुझें अयन होतें; किंवा तूं आरंभीं त्याचें अयन ( आधार ) होतास. यास्तव, हे भूत–भव्येशा, तूं नारायण या नांवानें प्रसिद्ध झाला आहेस ४४. हे देवा, तूं प्राण्यांचा संहार करतोस. ह्मणून तुला हरि असें ह्मटलें आहे. हे देवा, तूं सर्वांचें कल्याण करितोस ह्मणून शंकरतेस प्राप्त झाला आहेस ४५. तूं स्वतः अति मोठा आहेस व दुसऱ्यांनाही मोठा करीत असतोस ह्मणून तुला ब्रह्म ह्मणतात. मधु हें इंद्रियांचें नांव आहे. यास्तव तूं मधुसूदन ४६. हृषीकें ह्मणजे इंद्रियें त्यांचा ज्याअर्थीं तूं ईश आहेस त्याअर्थीं हे केशवा, तूं हृषीकेश या नांवानें प्रख्यात झाला आहेस ४७. क हें ब्रह्मदेवाचें नांव आहे. मी सर्व देहवानांचा ईश आहें. आह्मी दोघेही तुझ्या अंगापासून उत्पन्न झालों आहों, एवढ्यासाठीं तूं केशवनामवान् आहेस ४८. हे हरे, अविद्येला मा असें ह्मटलें आहे. ज्याअर्थीं तिचा तूं ईश आहेस. त्याअर्थीं तूं माधवनामक झाला आहेस. धव ह्मणजे स्वामी असें सांगितलें आहे ४९. या वाणीला गौ ( गाय ) असें ह्मणतात. तिला ज्याअर्थीं तूं जाणतोस त्याअर्थीं हे देवा, मुनि तुला गोविंद असें ह्मणतात ५०. त्रिः ह्मणजे तीन वेद, असें श्रेष्ठ मुनींनीं सांगितलें आहे. त्या सर्वांचें तूं आक्रमण करतोस ह्मणून तुला त्रिविक्रम असें ह्मटलें आहे ५१. तूं अणु आहेस. ह्मणून तुला वामन असें ह्मणतात. मननामुळें तुला मुनि म्हणतात. नियमनामुळें तुला यति ह्मणतात ५२. ज्याअर्थीं तूं तप करीत असतोस त्याअर्थीं तपस्वीसंज्ञक आहेस. हे हरे, तुझ्यामध्यें भूतें राहतात, ह्मणून तूं भूतावास आहेस ५३. हे हरे, तूं ईश आहेस. ह्मणून सर्व भूतांचा ईश्वर.

प्रणवः सर्ववेदानां गायत्री छंदसां प्रभो ५४ अक्षराणामकारस्त्वं स्फोटस्त्वं वर्णसंश्रयः। रुद्राणामहमेवासि वसूनां पावको भवान् ५५ अश्वत्थो वृक्षजातीनां ब्रह्मा लोकगुरुर्भवान्। मेरुस्त्वं पर्वतेन्द्राणां देवर्षीणां च नारदः ५६ दानवानां भवान्दैत्यः प्रह्रादो भक्तवत्सलः। सर्पाणामेव सर्वेषां भवान्वासुकिसंज्ञितः ५७ गुह्यकानां च सर्वेषां भवान्धनद एव च। वरुणो यादसां राजा गंगात्रिपथभाग्भवान् ५८ आदिस्त्वं सर्वभूतानां मध्यमन्तस्तथा भवान्। त्वत्तः समभवद्विश्वं त्वयि सर्वं प्रलीयते ५९ अहं त्वं सर्वगो देव त्वमेवाहं जनार्दन। आवयोरंतरं नास्ति शब्दैरर्थैर्जगत्पते ६० नामानि तव गोविन्द यानि लोके महान्ति च। तान्येव मम नामानि नात्र कार्या विचारणा ६१ त्वदुपासा जगन्नाथ सैवास्तु मम गोपते। यश्च त्वां द्वेष्टि देवेश स मां द्वेष्टि न संशयः ६२ त्वद्विस्तारो यतो देव अहं भूतपतिस्ततः। न तदस्ति विना देव यत्ते विरहितं हरे ६३ यदासीद्वर्तते यच्च यच्च भावि जगत्पते। सर्वं त्वमेव देवेश विना किंचित्त्वया न हि ६४ स्तुवन्ति देवाः सततं भवन्तं स्वैर्गुणैः प्रभो। ऋक् त्वं यजुरेवासि सामासि सततं प्रभो ६५ किंमुच्यते मया देव सर्वं त्वं भूतभावन। नमः सर्वात्मना देव विष्णो माधव केशव ६६ नमस्करोमि सर्वात्मन्नमस्तेऽस्तु सदा हरे। नमः पुष्करनाभाय वंदे त्वामहमीश्वर ६७ [ ४१२४ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० कैलासयात्रायां शिवकृतविष्णुस्तुतिर्नामाष्टाशीतितमोऽध्यायः॥ ८८॥

---

हे प्रभो, सर्व वेदांचें सार असा जो प्रणव तो तूं आहेस. छंदांतील गायत्री तूं ५४. अक्षरांतील अकार तूं. वर्णाच्या आश्रयानें राहणारा स्फोट तूं. रुद्रांतील मी शंकर तूंच आहेस. वसूंतील पावक तूं आहेस ५५. वृक्षजातींतील उत्तम अश्वत्थ तूं. लोकगुरु ब्रह्मा तूं आहेस. श्रेष्ठ पर्वतांतील मेरु तूं. देवर्षींतील नारद तूं ५६. दानवांतील दैत्य तूं. भक्तवत्सल प्रऱ्हाद तूंच. सर्व सर्पांतील तूं वासुकिसंज्ञक नागराज आहेस ५७. सर्व गुह्यकांतील तूं धनद ( कुबेर ) आहेस. जळजंतूंचा राजा वरुण व तीन मार्गांचें सेवन करणारी गंगा तूं आहेस ५८. तूं सर्व भूतांचा आदि, तसाच मध्य व अंत आहेस. तुझ्यापासून विश्व झालें. तुझ्यामध्यें सर्व लीन होतें ५९. हे देवा, मीच सर्वगामी तूं आहेस. व तूंच मी आहें. हे जगत्पते, शब्द व अर्थ या दोन्ही दृष्टीनें जरी पाहिलें तरी तुझ्यामध्यें व माझ्यामध्यें थोडेंसुद्धां अंतर नाहीं ६०. हे गोविंदा, तुझीं जीं या लोकांमध्यें मोठालीं नांवें आहेत तींच माझींही आहेत, यांत कांहीं संशय नाहीं ६१. हे इंद्रियांच्या ईशा, जगन्नाथा, तुझी जी उपासना तीच माझी. हे देवेशा, जो तुझा द्वेष करतो तो माझाच करतो, यांत कांहीं संशय नाहीं ६२. हे देवा, ज्याअर्थी मी भूतपति तुझा विस्तार आहें त्याअर्थी, हे हरे, देवा, तुजवाचून असें या जगांत कांहींएक नाहीं ६३. हे जगत्पते, जे मागें होतें, हल्लीं आहे व पुढें असेल तें सर्व हे देवेशा, तूंच आहेस. तुजवाचून दुसरें कांहीं नाहीं ६४. प्रभो, सर्व देव आपल्या गुणांनीं तुझी सतत स्तुति करीत असतात. हे स्वामिन्, तूं सतत ऋक्, यजु व साम आहेस ६५. हे भूतभावन देवा, काय सांगावें ? तूं सर्व आहेस. हे देवा, माधवा, केशवा, विष्णो, तुला अनन्यभावनेनें मी नमस्कार करतों ६६. हे सर्वात्मन्, मी तुला नमस्कार करतों. हे हरे, तुला सदा नमस्कार असो. तुज कमलनाभास नमस्कार असो. हे ईश्वरा, मी तुला वंदन करितों ६७. इति श्रीमहा. खि. हरि. भवि. कैला. शिवकृत विष्णुस्तुतिनामक अठ्यायशींवा अध्याय समाप्त झाला ॥ ८८. ॥

वैशंपायन उवाच ॥ इत्युक्त्वा देवदेवेशं मुनीनाह पुनः शिवः । एवं जानीत हे विप्रा ये भक्ताद्द्रष्टुमागताः १ एतदेव परं वस्तु नैकस्मात्परमस्ति वः । एतदेव विजानीध्वमेतद्वः परमं तपः २ एतदेव सदा विप्रा ध्येयं सततमानसैः । एतद्वः परमं श्रेय एतद्वः परमं धनम् ३ एतद्वो जन्मनः कृत्यमेतद्वस्तपसः फलम् । एष वः पुण्यनिलय एष धर्मः सनातनः ४ एष वो मोक्ष दाता च एष मार्ग उदाहृतः । एष पुण्यप्रदः साक्षादेतद्वः कर्मणां फलम् ५ एतदेव प्रशंसन्ति विद्वांसो ब्रह्मवादिनः । एष त्रयीगतिर्विप्राः प्रार्थ्या ब्रह्मविदां सदा ६ एतदेव प्रशंसन्ति सांख्ययोगसमाश्रिताः । एष ब्रह्मविदां मार्गः कथितो वेदवादिभिः ७ एवमेव विजानीत नात्र कार्या विचारणा । हरिरेकः सदा ध्येयो भवद्भिः सत्वमास्थितैः ८ नान्यो जगति देवोऽस्ति विष्णोर्नारायणात्परः । ओमित्येवं सदा विप्रा पठत ध्यात केशवम् ९ ततो निःश्रेयसप्राप्तिर्भविष्यति न संशयः । एवं ध्यातो हरिः साक्षात्प्रसन्नो वो भविष्यति १० भवनाशमयं देवः करिष्यति दृढं हरिः । सदा ध्यात हरिं विप्रा यदीच्छा प्राप्तुमच्युतम् ११ एष संसारविभवं विनाशयति वो गुरुः । स्मरध्वं सततं विष्णुं पठध्वं त्रिशरीरिणम् १२ मनःसंयमनं विप्राः कुरुध्वं यत्नतः सदा । शुद्धेन्तःकरणे विष्णुः प्रसीदति तपोधनाः १३ ध्यात्वा मां सर्वयत्नेन ततो जानीत केशवम् । उपास्योऽहं सदा विप्रा उपास्येऽस्मिन्हरौ स्मृतः १४ उपायोयं मया प्रोक्तो नात्र संदेह इत्यपि । अयं मायी सदा विप्रा

---

वैशंपायनः— देवाधिदेवास असें बोलून शिव पुनः मुनींना ह्मणाला, "येथें याचें दर्शन घ्यावयास आलेल्या हे भक्त ब्राह्मणांनो, तुह्मी असें समजा १. हीच उत्कृष्ट वस्तु आहे. तुह्मांला यापेक्षां अधिक उपास्य कोणतेंही नाहीं. याळाच तुह्मी साक्षात् जाणा. हेंच तुमचें परम तप आहे २. हे ब्राह्मणहो, तुह्मी संतत चित्तानें याचेंच ध्यान करा. हेंच तुमचें परम श्रेय व परम धन आहे ३. हेंच तुमच्या जन्माचें कृत्य, हेंच तुमच्या तपाचें फल, हाच तुमच्या पुण्याचा सांठा व हाच तुमचा सनातन धर्म होय ४. हा तुह्माला मोक्ष देणारा आहे. हाच मार्ग ह्मणून ह्मटलें आहे. हा साक्षात् पुण्यप्रद आहे. हें तुमच्या कर्माचें फळ आहे ५. ब्रह्मवादी विद्वान् याचीच प्रशंसा करीत असतात. हे ब्राह्मणहो, हा वेदगति असून तीच ब्रह्मवेत्त्यांस सदा प्रार्थना करण्यास योग्य आहे ६. सांख्य व योग यांचा आश्रय केलेले सर्व याचीच प्रशंसा करितात. वेदवेत्त्यांनीं हा ब्रह्मज्ञांचा मार्ग सांगितला आहे ७. तुह्मी असेंच जाणा. याविषयीं कांहीं विचार करूं नका. सत्त्वामध्यें सदा स्थित असलेल्या तुह्मी एका हरीचेंच ध्यान करावें. या जगांत या नारायण विष्णूहून श्रेष्ठ दुसरा देव नाहीं. हे विप्रांनो, सदा ओं असें पठण करा व केशवाचें ध्यान करा ८,९. ह्मणजे तुह्मांला निश्रेयसप्राप्ति होईल, यांत संशय नाहीं. याप्रमाणें ध्यान केला गेलेला हरि साक्षात् तुह्मांवर प्रसन्न होईल. हा हरिदेव खचित तुमच्या संसाराचा नाश करील. ब्राह्मणांनो, अच्युतास प्राप्त होण्याची जर तुमची इच्छा असेल तर सतत हरीचें ध्यान करा. हा तुमचा गुरु संसार—ऐश्वर्य नाहींसें करील. सतत विष्णूचें स्मरण करा. ओंकाराचें पठण करा १०–१२. हे ब्राह्मणांनो, तुह्मी सदा मोठ्या यत्नानें मनःसंयमन करा. हे तपोधनहो, अंतःकरण शुद्ध झालें असतां विष्णु प्रसन्न होतो १३. सर्व यत्नानें माझें ध्यान करून नंतर केशवाला जाणा. हे विप्रहो, या उपास्य हरीमध्यें मी सदा उपासना करण्यास योग्य आहें, असें सांगितलें आहे " १४. हा

यतध्वमघनाशने १५ यथा वो बुद्धिरखिला शुद्धा भवति यत्नतः । तथा कुरुत विप्रेंद्रा यथा देवः प्रसीदति १६ वैशंपायन उवाच ॥ एवमुक्तास्ततः सर्वे मुनयः पुण्यशीलिनः । यथावदुपगृह्णाना निरसन्संशयं नृप १७ एवमेवेति तं विप्राः प्राहुः प्रांजलयो हरम् । छिन्नो नः संशयः सर्वो गृहीतोर्थः स तादृशः १८ एतदर्थं समायाता वयमद्य तवालयम् । संगमादुभयोः सर्वो नष्टो मोहो महानिह १९ यथा वदसि देवेश तथा नः श्रेयसे परम् । यथाह भगवान्रुद्रो यतामः सततं हरौ । इति ते मुनयः प्रीताः प्रणेमुः केशवं हरिम् २०

[ ४१३४ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० कैलासयात्रायां नवाशीतितमोऽध्यायः ॥ ८९ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः स भगवान्रुद्रः सर्वान्विस्मापयन्निव । स्तुत्या प्रचक्रमे स्तोतुं विष्णुं विश्वेश्वरं हरिम् । अर्थ्याभिस्तु तदा वाग्भिर्मुनीनां शृण्वतां तथा १ महेश्वर उवाच॥ नमो भगवते तुभ्यं वासुदेवाय धीमते । यस्य भासा जगत्सर्वं भासते नित्यमच्युत २ नमो भगवते देव नित्यं सूर्यात्मने नमः । यः शीतयति शीतांशुर्लोकान्सर्वानिमान्विभुः ३ नमस्ते विष्णवे देव नित्यं सोमात्मने नमः । यः प्रजाः प्रीणयत्येको विश्वात्मा भूतभावनः ४ नमः सर्वात्मने देव नमो वागात्मने हरे । यो दधार करेणासौ कुशचीरादि यत्सदा ५ दधार वेदान्सर्वांश्च तुभ्यं ब्रह्मात्मने नमः । सर्वान्संहरते यस्तु संहारे विश्वकृत्सदा ६ क्रोधा-

---

उपाय मी सांगितला आहे. याविषयीं कांहीं संदेह नाहीं. हे विप्रहो, हा मायावी आहे. पापाचा नाश करण्याविषयीं यत्न करा १५. हे विप्रश्रेष्ठहो, ज्या रीतीनें तुमची अखिल बुद्धि शुद्ध होईल व मोठ्या यत्नानें तो देव प्रसन्न होईल असें करा १६. वैशंपायनः— हे राजा, त्यानंतर याप्रमाणें बोलले गेलेले ते सर्व पुण्यशीलवान् मुनि तें यथार्थ आहे, असें समजून आपल्या संशयाचें निरसन करते झाले १७. नंतर ते ब्राह्मण हात जोडून हराला ह्मणाले. खरें आहे, आमचा सर्व संशय नष्ट झाला. तुझें ह्मणणें आह्मांला समजलें १८. एवढ्यासाठींच आह्मीं सर्व आज तुझ्या आलयास आलों. तुम्हां उभयतांच्या समागमानें आमचा आज सर्व व फार मोठा मोह नष्ट झाला १९. हे देवेशा, तूं जसें सांगत आहेस तें तसेंच असून तेंच आमच्या परम कल्याणाला कारण होणार आहे. भगवान् रुद्र जसें सांगत आहे त्याचप्रमाणें आह्मी हराविषयीं सतत प्रयत्न करूं " असें बोलून अतिशय संतुष्ट झालेले ते मुनि केशव हरीस प्रणाम करते झाले २०. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलासयात्रेंतील एकूणनव्वदावा अध्याय समाप्त झाला ॥ ८९. ॥

वैशंपायनः— त्यानंतर तो भगवान् रुद्र स्तुतीच्या योगानें सर्वांस विस्मित करीतच जणुं काय अर्थपूर्ण वाणीनें सर्व मुनि ऐकत असतांना विश्वेश्वर हरि विष्णूची स्तुति करूं लागला १. महेश्वरः— तुज धीमान् वासुदेवाला नमस्कार असो. हे अच्युत, तुझ्या प्रकाशानेंच हें सर्व जग प्रकाशमान होतें २. हे देवा, तुज भगवानाला नमस्कार असो. सूर्यात्मा असा जो तूं त्या तुला नमस्कार असो. जो विभु शीतांशु ( चंद्रमा ) या सर्व लोकांस शीतळ करतो त्या तुज चंद्रात्म्यास मी नित्य प्रणाम करितों. हे देव, जो एकटा विश्वात्मा भूतभावन प्रजेला प्रसन्न करतो त्या तुज विष्णूला नमस्कार असो ३, ४. हे देव, सर्वात्मा अशा तुला नमस्कार असो. हे हरे, वाग्रूप अशा तुला मी वंदन करतों. ज्या ह्यानें आपल्या हातानें येथें कुश—चीरवस्त्र इत्यादि सदा धारण केलें आहे; त्यानेंच सर्व वेदांस धारण केलें. यास्तव तुज वेदात्म्यास नमस्कार असो. जो सर्वांचा संहार

ष्मासि विरूपोऽसि तुभ्यं रुद्रात्मने नमः । सृष्टौ स्रष्टा समस्तानां प्राणिनां प्राणदायिने ७
अजाय विष्णवे तुभ्यं स्रष्ट्रे विश्वसृजे नमः । आदौ प्रकृतिमूलाय भूतानां प्रभवाय च ८
नमस्ते देवदेवेश प्रधानाय नमो नमः । पृथिव्यां गंधरूपेण संस्थितः प्राणिनां हरे ९
दृढाय दृढरूपाय तुभ्यं गन्धात्मने नमः । अपां रसाय सर्वत्र प्राणिनां सुखहेतवे १० नमस्ते
विश्वरूपाय रसाय च नमोनमः । तेजसा भास्करोयस्तु घृणी जन्तुहितः सदा ११ तस्मै
देव जगन्नाथ नमो भास्कररूपिणे । वायोः स्पर्शगुणो यत्र शीतोष्णसुखदुःखदः १२ नमस्ते
वायुरूपाय नमः स्पर्शात्मने हरे । आकाशेऽवस्थितः शब्दः सर्वश्रोत्रनिवेशनः १३ नमस्ते
भगवन्विष्णो तुभ्यं सर्वात्मने नमः । यो दधार जगत्सर्वं मायामानुषदेहवान् १४ नमस्तुभ्यं
जगन्नाथ मायिनेऽमायदायिने । नम आद्याय बीजाय निर्गुणाय गुणात्मने १५ अचिं-
त्याय सुचिंत्याय तस्मै चिंत्यात्मने नमः । हराय हरिरूपाय ब्रह्मणे ब्रह्मदायिने १६ नमो
ब्रह्मविदे तुभ्यं ब्रह्मब्रह्मात्मने नमः । नमः सहस्रकिरणे सहस्रकिरणाय च १७ नमः सह-
स्रवक्त्राय सहस्रनयनाय च । विश्वाय विश्वरूपाय विश्वकर्त्रे नमो नमः १८ विश्ववक्त्र
नमो नित्यं भूतावास नमो नमः । इन्द्रियायेन्द्ररूपाय विषयाय सदा हरे १९ नमोऽश्व-
शिरसे तुभ्यं वेदाभरणरूपिणे । अग्नयेऽग्निपते तुभ्यं ज्योतिषां पतये नमः २० सूर्याय

---

करतो, जो संहारसमयीं सदा विश्वदक् होतो, तो क्रोधात्मा तूं आहेस. तूं विरूप आहेस, अशा तुज रुद्रात्म्यास नमस्कार असो. सृष्टिसमयीं तूं सर्वांचा स्रष्टा व समस्त प्राण्यांना प्राण देणारा ५–७, अशा तुज विश्वकर्त्या, स्रष्ट्या, अज विष्णूला नमस्कार असो. आरंभी प्रकृतीचें मूळ व नंतर भूतांचा उद्भव अशा तुज देवदेवास नमस्कार असो. तुज प्रधानास मी वंदन करितों. हे हरे, तूं प्राण्यांच्या पृथ्वीमध्यें गंधरूपानें स्थित आहेस ८,९. यास्तव तुज दृढ व दृढरूप अशा गंधात्म्यास नमस्कार असो. सर्वत्र प्राण्याच्या सुखास कारण होणाऱ्या जलाच्या रसाला, तुज विश्वरूप रसाला नमस्कार असो. तेजानें जो हा प्रकाशमान होत असतो तो किरणवान् सदा प्राण्यांना हितावह आहे १०,११. हे देवा, जगन्नाथा, त्या तुज भास्कररूपी देवास नमस्कार असो. वायूचा शीत–उष्ण–सुख–दुःख देणारा स्पर्शगुण ज्याच्यामध्यें आहे अशा हे हरे, तुज स्पर्शात्म्या वायुरूपास नमस्कार असो. सर्वांच्या श्रोत्रेंद्रियांत प्रवेश करणारा शब्द आकाशामध्यें स्थित आहे १२,१३. हे भगवन् विष्णो, तुज सर्वात्म्यास नमस्कार असो. ज्या माया–मानुष देहवानानें सर्व जगत् धारण केलेलें आहे त्या तुज मायाव्यास नमस्कार असो. हे विष्णो, तूं भक्तांचा मोह घालविणारा आहेस. तुज आद्य बीजास नमस्कार असो. तुज निर्गुण व गुणरूप देवास नमस्कार असो १४.१५. अचिंत्य, सुचिंत्य व चिंत्यरूप, अशा तुला मी वंदन करतों. हराला, हरिरूपाला, ब्रह्माला, ब्रह्म देणाऱ्या देवाला मी प्रणाम करितों १६. तुज ब्रह्मवेत्त्यास नमस्कार असो. तुज वेदयज्ञ रूपास नमस्कार असो. सहस्रकिरणवान् व साक्षात् सहस्ररश्मि सूर्य यांस नमस्कार असो; सहस्रमुख, सहस्रनयन, विश्व, विश्वरूप व विश्वकर्ता अशा देवाला नमस्कार असो; सहस्रशः प्रणाम असो १७. विश्व हेंच ज्याचें मुख आहे अशा तुला हे विश्वाधार देवा, मी नमस्कार करतों. हे हरे, इंद्रियरूप व इंद्ररूप अशा तुला नमस्कार असो. विषयरूप हरीला मी वंदन करितों १८,१९. तुज हयग्रीवास मी प्रणाम करितों. तुज वेदाभरणरूपी देवास मी प्रणाम करितों. हे अग्निपते, तुज अग्नी...व

सूर्यपुत्राय तेजसां पतये नमः । नमः सोमाय सौम्याय नमः शीतात्मने हरे २१ नमो यज्ञाय इज्याय हविषे हव्यसंस्कृते । नमः स्रुवाय पात्राय यज्ञांगाय पराय च २२ नमः प्रणवदेहाय क्षरायाप्यक्षराय च । वेदाय वेदरूपाय शस्त्रिणे शस्त्ररूपिणे २३ गदिने खड्गिने तुभ्यं शंखिने चक्रिणे नमः । शूलिने चर्मिणे नित्यं वरदाय नमो नमः २४ बुधप्रियाय बुद्धाय प्रबुद्धाय सुखाय च । हरये विष्णवे तुभ्यं नमः सर्वात्मने गुरो २५ नमस्ते सर्वलोकेश सर्वकर्त्रे नमो नमः । नमः स्वभावशुद्धाय नमस्ते यज्ञसूकर २६ नमो विष्णो नमो विष्णो नमो विष्णो नमो हरे । नमस्ते वासुदेवाय वासुदेवाय धीमते २७ नमः कृष्णाय कृष्णाय सर्वावास नमो नमः । नमो भूयो नमस्तेऽस्तु पाहि लोकान् जनार्दन २८ इति स्तुत्वा जगन्नाथमुवाच मुनिसत्तमान् । इदं स्तोत्रमधीयाना नित्यं व्रजत केशवम् २९ शरण्यं सर्वभूतानां तत्र श्रेयो विधास्यति । ये चेमं धारयिष्यन्ति स्तवं पापविमोचनम् ३० तेषां प्रीतः प्रसन्नात्मा पठतां शृण्वतां हरिः । श्रेयो दास्यति धर्मात्मा नात्र कार्या विचारणा ३१ अवश्यं मनसा ध्यात केशवं भक्तवत्सलम् । श्रेयः प्राप्तुं यदीच्छन्त भवन्तः शंसितव्रताः ३२ इत्युक्त्वा भगवान्रुद्रस्तत्रैवान्तरधीयत । सगणः शंकरः साक्षादुमया भूतभावनः ३३ नेमुस्तं मुनयः सर्वे परां निर्वृतिमाययुः । तमेव परमं गत्वा मेनिरे स्वकृतार्थ-

---

ज्योतींच्या अधिपतीला मी वंदन करितों २०. हे हरे, सूर्य, सूर्यपुत्र, तेजांचा पति, सोम, सौम्य, शीतात्मा अशा तुला मी नमस्कार करितों २१. यज्ञ, पूज्य, हविर्द्रव्य, हव्यसंस्कृति, स्रुवसंज्ञक होमसाधन, सर्वोत्तम यज्ञांग अशा तुला मी वंदन करितों २२. प्रणव हाच ज्याचा देह आहे अशा तुज क्षर व अक्षर देवास प्रणाम असो. वेद, वेदरूप, शस्त्री, शस्त्ररूपी, गदावान्, खड्गवान्, शंखधर व चक्रवान् अशा तुला नमस्कार असो. शूलधारी, चर्मधर व नित्य वरद अशा तुला नमस्कार असो २३,२४. हे गुरो, ज्याला ज्ञानी सदा प्रिय आहेत व जो बुद्ध, प्रबुद्ध, सुख, हरि, विष्णु व सर्वात्मा आहे अशा तुला मी वंदन करतों २५ सर्वलोकेशा, तुला नमस्कार असो. तुज सर्व कर्त्याला नमस्कार असो. स्वभावतः शुद्ध असणाऱ्या तुला नमस्कार असो. हे यज्ञसूकरा, तुला मी प्रणाम करितों २६. हे विष्णो, तुला नमस्कार असो; हे विष्णो, तुला मी प्रणाम करितों, हे विष्णो, मी तुला वंदन करतों. हे हरे, तुला नमस्कार असो. तुज वासुदेवाला नमस्कार असो. धीमान् वासुदेवाला प्रणाम असो २७. ज्याचें नांव कृष्ण व वर्ण काळा आहे अशा तुला, हे सर्वावास, मी नमस्कार करितों. तुला पुनः नमस्कार असो. हे जनार्दना, लोकांचें रक्षण कर २८. अशी जनार्दनाची स्तुति करून शिव उत्तम मुनींना म्हणाला, " हे विप्रांनो, हें स्तोत्र म्हणत तुह्मी नित्य सर्व भूतांस शरण जाण्यास योग्य असलेल्या केशवाला शरण जा. तो तुमचें कल्याण करील. जे पुण्यवान् हें पापनाशक स्तोत्र तोंडपाठ करतील त्या पाठ करणाऱ्या व ऐकणाऱ्या साधकांवर प्रसन्न झालेला धर्मात्मा हरि त्यांचें कल्याण करील यांत कांहीं संशय नाहीं २९-३१. हे तीक्ष्णव्रतें करणाऱ्या ब्राम्हणांनो, तुम्हांला आपलें कल्याण करून घेण्याची जर इच्छा असेल तर तुह्मी मनानें भक्तवत्सल केशवाचें ध्यान अवश्य करा ३२. गण व उमा यांसह साक्षात् भूतांचें कारण असलेला भगवान् रुद्र शंकर असें बोलून तेथेंच गुप्त झाला ३३. तेव्हां सर्व मुनींनीं त्यास प्रणाम केला. व ते परम सुखी झाले. तोच परम

ताम् ३४ लोकपालास्तदा विष्णुं नमस्कृत्य हरिं मुदा । जग्मुः स्वान्यथ वेश्मानि गणैः सर्वैर्नृपोत्तम ३५ आरुह्य भगवान्विष्णुर्गरुडं पक्षिपुंगवम् । शंखी चक्री गदी खड्गी शार्ङ्गी तूणी तनुत्रवान् ३६ यथागतं जगन्नाथो ययौ बदरिकामनु । सायाह्ने पुण्डरीकाक्षो नित्यं मुनिनिषेविताम् ३७ तत्र गत्वा यथायोगं विनम्य हरिरीश्वरः । अर्चितो मुनिभिः सर्वैर्निषसाद सुखासने ३८ [ ४१८२ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासयात्रायां नवतितमोऽध्यायः ॥ ९० ॥

वैशंपायन उवाच ॥ एतस्मिन्नेव काले तु पौंड्रो नृपवरोत्तमः । बलवान्सत्वसंपन्नो योद्धा विपुलविक्रमः १ वृष्णिशत्रुः सदा राजा कृष्णद्वेषी बलात्तदा । नृपान्सर्वान्समाहूय प्रोवाच नृपसंसदि २ जिता च पृथिवी सर्वा जिताश्च नृपसत्तमाः । वृष्ण यस्ते बलोन्मत्ताः कृष्णमाश्रित्य गर्विताः ३ दास्यन्ति मे करं सर्वे न हि ते कृष्णसंश्रयात् । स तु कृष्णश्चक्रबलान्मामवज्ञाय तिष्ठति ४ अहं चक्रीति गर्वोऽभूत्तस्य गोपस्य सर्वदा । शंखी चक्री गदी शार्ङ्गी शरी तूणीसहायवान् ५ एवमादिर्महागर्वस्तस्य संप्रति वर्तते । लोके च मम यन्नाम वासुदेवेति विश्रुतम् ६ अगृह्णन्मम तन्नाम गोपो मदबलान्वितः । तस्य चक्रस्य यच्चक्रं ममापि निशितं महत् ७ गर्वहंतुंस दातस्यनाम्नाचापिसुदर्शनम् । सहस्रारं महाघोरं तस्य चक्रस्य नाशनम् ८ अनेकमहतं चक्रं गोपजस्य नृपोत्तमाः । ममाप्येतद्धनुर्दिव्यं शार्ङ्गनाम महा-

---

उत्तम आहे, असें जाणून ते आपण कृतार्थ झालों आहों असें समजूं लागले ३४. हे उत्तम राजा, त्यावेळीं लोकपाल आनंदानें हरिसंज्ञक विष्णूला प्रणाम करून सर्व गणांसह आपापल्या स्थानास गेले ३५. त्यानंतर भगवान् विष्णु पक्षिश्रेष्ठ गरुडावर आरूढ होऊन शंख, चक्र, गदा, खड्ग शार्ङ्ग धनुष्य, तूणीर, कवच, इत्यादिकांनीं भूषित झालेला तो देव जगन्नाथ पुंडरीकाक्ष सायंकाळीं मुनिसेवित बदरिकाश्रमास आल्यामार्गानें परत गेला. ३६, ३७. तेथें जाऊन यथासंभव सर्वांस प्रणाम केल्यावर सर्व मुनींनीं ज्याचा सत्कार केला आहे असा तो हरि ईश्वर सुखासनावर बसला ३८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० कैलासयात्रेंतील नव्वदावा अध्याय समाप्त झाला ॥ ९० ॥

वैशंपायनः— इतक्यांत पौंड्र या नांवाचा एक उत्तम राजा सर्व राजांस राजसभेमध्यें बोलावून असें बोलला. तो बलवान्, धैर्यसंपन्न, योद्धा, विपुल पराक्रमी वृष्णिशत्रु, व बलामुळें सदा कृष्णाचा द्वेष करणारा होता १,२. पौंड्र ह्मणतो— मी सर्व पृथ्वी जिंकली आहे. सर्व उत्तम राजांना जिंकलें आहे. पण यादव बलानें उन्मत्त झाले आहेत. कृष्णाचा आश्रय मिळाल्यामुळें ते सर्व गर्वित झाले आहेत ३. मला दुसरे सर्व कर देतात. पण यादव मात्र कृष्णाच्या आश्रयामुळें देत नाहींत. तो कृष्ण चक्राच्या बलावर माझी अवज्ञा करून राहिला आहे. मी चक्रयुक्त आहें असें समजून त्या गोपाला सदा मोठा गर्व वाटतो. मी शंखवान्, चक्रवान्, गदावान्, शार्ङ्ग धनुष्यवान्, शरवान् व तूणीरवान् आहें असें समजून तो हल्लीं मोठा गर्व वाहत असतो. मदबलानें युक्त झालेल्या त्या गवळ्यानें वासुदेव असें लोकामध्यें प्रसिद्ध असलेलें माझें नांवच घेतलें आहे. त्याच्या चक्राचा गर्व नाहींसा करण्यासाठीं त्याच्यासारखें माझेंही मोठें तीक्ष्ण चक्र आहे, त्याचेंही नांव सुदर्शन असेंच आहे. त्याला सहस्र अरे असून महा घोर असलेलें तें कृष्णाच्या चक्राचा नाश करण्यास समर्थ आहे ४–८. हे उत्तम राजांनो, गोपालाचें

रवम् ९ गदा कौमोदकी नाम समेयं बृहती दृढा । कालायससहस्रस्य भारेण सुकृता मया १० खड्गो नन्दक नामासौ ममायं विपुलो दृढः । अन्तकस्यान्तको घोरस्तस्य खड्गस्य नाशकः ११ तत्रायं च गदी खड्गी शंखी चक्री तनुत्रवान् । युधि जेता च कृष्णस्य नात्र कार्या विचारणा १२ मां संब्रूत नृपाश्चैव गदिनं चक्रिणं तथा । शंखिनं शार्ङ्गिणं वीरं ब्रूत नित्यं नृपोत्तमाः १३ वासुदेवेति मां ब्रूत न तु गोपं यदूत्तमम् । एकोऽहं वासुदेवो हि हत्वा तं गोपदारकम् १४ सख्युर्मम बलाद्धन्ता नरकस्य महात्मनः । मां तथा यदि न ब्रूत दण्ड्या भारशतैः शतम् १५ सुवर्णस्य च निष्कस्य गृहीष्ये बहुशस्तदा । तथा ब्रुवति राजेन्द्रे मनसा दुःसहं यथा १६ केचिल्लज्जासमायुक्ता आसंस्ते बलवत्तराः । रसज्ञा बलवीर्यस्य राजानस्ते सदा नृप १७ अपरे तु नृपा राजन्नेवमेवेति चक्रुशुः । अन्ये बलमदोत्सिक्ता जेष्यामः केशवं रणे १८ [ ४२०८ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० पौंड्रकोक्त्यादेकनवति० ॥ ९१ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः कैलासशिखरान्निर्गतो मुनिसत्तमः । नारदः सर्वलोकज्ञः पौंड्रस्य नगरं प्रति १ अवतीर्य नभोभागात्प्रत्यागम्य नरोत्तमम् । द्वारस्थेन च समाज्ञप्तः प्रविवेश गृहोत्तमम् २ अर्घादिसमुदाचारं नृपाल्लब्ध्वा महामुनिः । निषसादासने शुभ्रे छ्चास्तृते शुभवाससा ३ कुशलं पृष्टवान्भूयो नृपः स मुनिसत्तमम् । उवाच नारदं भूयः

---

अनेक प्रकारचें व अकुंठित चक्र जसें आहे तसेंच माझेंही आहे. माझेंही हें शार्ङ्ग नांवाचें मोठा ध्वनि करणारें दिव्य धनुष्य आहे ९. कौमोदकी या नांवाची माझीही फार मोठी व दृढ गदा आहे. दश सहस्रभार पोलादाच्या योगानें मीं ती केली आहे १०. माझें हें नंदक नांवाचें खड्ग अति विपुल व दृढ आहे हें त्याच्या नाशक खड्गाचें नाशक व घोर आहे ११. यास्तव गदी, चक्री, खड्गी, शंखी व कवचवान् असा हा मी युद्धामध्यें कृष्णाला जिंकणारा आहें. या विषयीं तुह्मी मुळींच विचार करूं नका १२. हे राजांनो, तुह्मी मला चक्री, गदी, शंखी, शार्ङ्गी, व वीर, असें नेहमीं म्हणत जा १३. तुह्मी वासुदेव असें मलाच म्हणा. त्या यदूत्तम गोपाला म्हणूं नका. त्या गवळ्याच्या पोराला मारून या जगांत मी एकटाच वासुदेव राहीन १४. त्यानें माझ्या महात्म्या नरकसंज्ञक मित्रास बलात्कारानें मारलें आहे. यास्तव आजपासून तुह्मी मला वर सांगितल्याप्रमाणें जर न बोलाल तर माझ्या शतभार सुवर्णदंडास पात्र व्हाल १५. मीं तुमच्यापासून पुष्कळ सोन्याचीं नाणीं हिरावून घेईन. याप्रमाणें मनाला दुःसह वाटणारें तें भाषण पौंड्र करूं लागला असतां कित्येक अतिशय बलाढ्य राजे लज्जायुक्त होऊन सभेंत बसले. कारण हे राजा, ते सर्व बल व वीर्य यांचें स्वारस्य जाणणारे होते. पण जे दुसरें कित्येक बलमदानें उन्मत्त झाले होते ते सर्व हे जनमेजया, ‘ ठीक आहे, असेंच करूं या, रणांत केशवास जिंकूं या ’ असें ह्मणूं लागले १६-१८. इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० पौंड्रक—उक्तीविषयीं एक्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९१. ॥

वैशंपायनः— त्यानंतर सर्व लोकज्ञ मुनिश्रेष्ठ नारद कैलास शिखरावरून पौंड्राच्या नगरास यावयास निघाला १. इष्ट नगरापाशीं येतांच आकाशांतून खालीं उतरून, त्या नरोत्तमाच्या नगरांत शिरून आणि द्वारपालाच्या द्वारां आंत वर्दी पोचवून तो मुनि उत्तम गृहांत गेला २. राजापासून अर्घादि उपचारांचा स्वीकार करून महामुनि नारद शुभवस्त्रानें आच्छादित केलेल्या शुभ्र आसनावर बसला ३.

पौंड्रको बलगर्वितः ४ भवान्सर्वत्र कुशलः सर्वकार्येषु पंडितः । प्रथितो देवसिद्धेषु गंधर्वेषु महात्मसु ५ सर्वत्रगो निराबाधो गंता सर्वत्र सर्वदा । अगम्यं तव विप्रेंद्र ब्रह्मांडे न हि किंचन ६ नारदेदं वद त्वं हि यत्र यत्र गतो भवान् । तत्र तत्र तपः सिद्धो लोके प्रथितवीर्यवान् ॥ पौंड्र एव च विख्यातो वासुदेवेति शब्दितः ७ शंखी चक्री गदी शार्ङ्गी खड्गी तूणी तनुत्रवान् । विजेता राजसिंहानां दाता सर्वस्य सर्वदा ८ भोक्ता राज्यस्य सर्वस्य शास्ता राजा बलाढ्वली । अजेयः शत्रुसैन्यानां रक्षिता स्वजनस्य ह ९ योऽद्य गोपकनामासौ वासुदेवेति शब्दितः । तस्य वीर्यबले न स्तो नाम्नोऽस्य मम धारणे १० स हि गोपो वृथा बाल्याद्धारयत्येव नाम मे । इदं निश्चिनु विप्रेंद्र एक एव भवाम्यहम् ११ वासुदेवो जगत्यस्मिन्निर्जित्य बलिनं यदुम् । वृष्णीन्सर्वान्बलात्क्षिप्त्वा निहनिष्ये च तांपुरीम् १२ द्वारकां विष्णुनिलयां योद्धा चाहं महामते । एते च बलिनः सर्वे नृपा मम समागताः १३ अश्वाश्च वेगिनः सन्ति रथा वायुजवा मम । उष्ट्रोमत्ताः सहस्रं च गजा नियुतमेव च १४ एतेनाहं बलेनाजौ हनिष्ये केशवं रणे । तस्मादेवं सदा विप्र वद ब्रह्मन्पुरे मम १५ इन्द्रस्यापि सदा विप्र वद नारद सांप्रतम् । प्रार्थनैषा मम विभो नमस्ये त्वां तपोधन १६ नारद उवाच ॥ सर्वत्रगः सदा चास्मि यावद्ब्रह्माण्डसंस्थितिः । अवार्यः सर्वकार्येषु गमने केनचिन्नृप १७ किन्तु वक्तुं तथा राजन्नोत्सहे नृपसत्तम । महीं शासति देवेशे

---

राजानें त्या उत्तम मुनीला वारंवार कुशल प्रश्न केला. आणि नंतर बलानें गर्वित झालेला तो पुनः नारदास ह्मणाला ४. " आपण सर्वत्र कुशल व सर्व कार्यांमध्यें पंडित आहां. देव, महात्मे, सिद्ध, गंधर्व, यांमध्यें आपली प्रख्याति आहे ५. हे विप्रेंद्रा, तूं सर्वत्र सर्वदा निर्बाध गमन करीत असतोस. तुझी गति सर्व ठिकाणीं होते. या ब्रम्हांडांत तुला अगम्य स्थान कोणतेंही नाहीं ६. यास्तव हे नारदा, तूं आतां या पुढें जेथें जेथें जाशील तेथें तेथें असें सांग.—या लोकांत पौंड्र हाच एक तपःसिद्ध, प्रख्यात वीर्यवान्, व विख्यात वासुदेव आहे ७. तो शंखी, चक्री, गदी, शार्ङ्गी, खड्गी, तुणीरवान् व कवचयुक्त आहे. तो सर्व राजसिंहास जिंकणारा, सर्वांस सर्व देणारा, सर्व राज्याचा भोक्ता, शास्ता, राजा, बलाढ्यांहून बली, शत्रुसैन्यास अजिंक्य व स्वजनांचा रक्षक आहे ८, ९. हल्लीं वासुदेव या नांवानें प्रख्यात असलेला जो हा गोपपुत्र आहे त्याच्या अंगांत माझें नांव धारण करण्याचें वीर्य व बल नाहीं १०. तो गोप बालपणापासून व्यर्थ माझें नांव धारण करीत आहे. यास्तव हे विप्रेंद्रा, मी एकच वासुदेव या जगांत राहीन असा निश्चय कर ११. मी बलाढ्य यादवास जिंकून व आपल्या सामर्थ्यानें सर्व वृष्णींचा पराभव करून हे महामते, विष्णूचें वसतिस्थान अशा त्या द्वारकेस जाऊन मोठे युद्ध करीन. माझे हे सर्व बलाढ्य राजे येथें जमले आहेत १२, १३. मजपाशीं वेगवान् अश्व आहेत. वायूप्रमाणें ज्यांचा वेग आहे असे रथ आहेत. सहस्रावधि मत्त उंट आहेत. दशलक्ष गज आहेत १४. या सर्व सैन्याच्या साह्यानें मी संग्रामांत केशवाला मारीन. यास्तव हे ब्राह्मणा, माझ्या या नगरामध्यें तूं माझ्याविषयीं असें सांग १५. हे नारदा, तूं इंद्राच्या नगरांत जाऊनही आतां असें सांग. हे तपोधना, ही माझी प्रार्थना आहे. मी तुला नमस्कार करतों १६. नारदः— जेथपर्यंत ब्रह्मांडाची शेवटची मर्यादा आहे तेथपर्यंत मी सदा सर्वत्र गमन करतों. हे राजा, सर्व कार्यांमध्यें मी गमन करीत

चक्रपाणौ जनार्दने १८ विष्णौ सर्वत्रगे देवे दुष्टान्हत्वा सबान्धवान् । वासुदेवेति को नाम तिष्ठत्यस्मिन्हराविति १९ को नाम वक्तुमेवेदं कृष्णे शासति गोमती । अज्ञानाद्वक्तुमेवं च समर्थाः प्राकृता जनाः २० हरिः सर्वत्रगो विष्णुर्दर्पं ते व्यपनेष्यति । अचिंत्यविभवो विष्णुः शार्ङ्गधन्वा गदाधरः २१ आदिदेवः पुराणात्मा दर्पं ते व्यपनेष्यति । हास्यमेतन्महाराज यच्च वै तत्र संस्थितम् २२ शार्ङ्गं खड्गं तथा राजन्महाघोरं न दाप्यते । अतीव हासकालोऽयं तव संप्रति वर्तते २३ [ ४२२३ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० पौंड्रकनारदसंवादे द्विनवतितमोऽध्यायः ॥ ९२ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः क्रुद्धो महाराज पौंड्रो मदबलान्वितः । नारदं विप्रवर्यं तं प्रोवाच नृपसंसदि १ किमिदं प्राह विप्रर्षे राजाहं च द्विजैः सह । गच्छ त्वं काममथवा मुने शापप्रदः सदा २ भीतस्त्वत्तो महाबुद्धे गच्छ त्वं कामम हि । इत्युक्तो नृपवर्येण तूष्णीमेव स नारदः ३ जगामाकाशगमनो यत्र तिष्ठति केशवः । स गत्वा विष्णुसंकाशं विष्णोः सर्वं शशंस ह ४ तच्छ्रुत्वा भगवान्विष्णुर्यथेष्टं वदतामिति । दर्पं तस्यापनेष्यामि श्वोभूते द्विजसत्तम ५ इत्युक्त्वा विरराम व तस्मिन्बदरिकाश्रमे । ततः पौंड्रो महाबाहुर्बलैर्बहुभिरीश्वरः ६ अश्वैरनेकसाहस्रैर्गजैर्बहुभिरन्वितः । शङ्खकोटिसमायुक्तः स राजा सत्यसं-

---

असलों तरी माझें निवारण कोणाकडूनही होत नाहीं. कारण मी अनिवार्य आहें १७. परंतु, हे राजा, मी तसें सांगण्यास समर्थ नाहीं. देवेश चक्रपाणि जनार्दन पृथ्वीचें अनुशासन करीत असतांना तूं ह्मणतोस तसें सांगण्याची मला इच्छाच होत नाहीं १८. तो सर्वत्र गमन करणारा विष्णुदेव आपल्या शत्रूंना आप्त–इष्टांसह मारून आतां स्वस्थ राहिला असतां त्याचें वासुदेव असें नांव धारण करण्यास कोण समर्थ आहे १९. सूर्याच्या किरणांचा ज्यांना स्पर्श होत असतो अशा भू व स्वर्ग लोकांचें रक्षण तो कृष्ण करीत असतांना असें बोलण्यास कोण समर्थ आहे ? तुझ्यासारखे प्राकृत पुरुष मात्र अज्ञानानें असें बडबडण्यास समर्थ आहेत २०. हे राजा, सर्वव्यापी विष्णु हा तुझा गर्व घालवील. कारण तो शार्ङ्गधन्वा, गदाधर, विष्णु अचिन्त्य ऐश्वर्यवान् आहे २१. तो पुराणात्मा आदिदेव तुझा दर्प घालवील. हे महाराजा, हें तुझें भाषण उपहासास पात्र आहे. विष्णूपाशीं शार्ङ्ग, खड्ग, इत्यादि जें आहे तें तुझ्या या खड्गादिकांनीं कुंठित केलें जाणार नाहीं. सांप्रत कालीं तुझा हा फार मोठा हास्यकाल आहे २२, २३. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० पौंड्र—नारद संवादसंज्ञक ब्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९२ ॥

वैशंपायनः—हे महाराज, नारदाच्या या भाषणानें पौंड्राला मोठा क्रोध आला. मदबलानें युक्त असलेला तो राजांच्या सभेंत विप्रवर्य नारदास ह्मणाला, ' हे विप्रर्षे, हें काय बोलतोस ? मी ब्राह्मणांसह तुमचा राजा आहें. अथवा तुला वाटेल तिकडे तूं जा. तूं शाप देणारा आहेस, ह्मणून मला तुझी सदा भीति वाटते. यास्तव हे महाबुद्धे, तूं आतां येथून वाटेल तेथें निघून जा. ' त्या उत्तम राजाकडून असें बोलला गेलेला तो नारद मुकाट्यानें तेथून निघून आकाशमार्गानें जेथें केशव होता तेथें गेला. तो विष्णूपाशीं जाऊन त्याला सर्व सांगूं लागला १-४. तें ऐकून भगवान् विष्णु ' त्याला वाटेल तसें बडबडूं दे. हे द्विजश्रेष्ठा, मी उद्यांच त्याचा दर्प नाहींसा करतों. ' असें बोलून त्या बदरिकाश्रमामध्यें मुकाट्यानें बसला तों इकडे महापराक्रमी राजा पौंड्र अनेक सहस्र अश्व, असंख्य गज व

गरः ७ अनेकशतसाहस्रैः पत्तिभिश्च समन्वितः । एकलव्यप्रभृतिभी राजभिश्च समंततः ८ अष्टौ रथसहस्राणि नागानामयुतं तथा । अर्बुदं पत्तिसंघानां तद्दलं समपद्यत ९ एतेन च बलेनाजौ प्रस्फुरन्नृपसत्तमः । विरराज महाराज उदयस्थो महारविः १० स ययौ मध्यरात्रेण नगरीं द्वारकामनु । पत्तयो दीपिकाहस्ता रात्रौ तमसि दारुणे ११ ययुर्विविधशस्त्रौघान्संपतन्तो महाबलाः । द्वारकां वीर्यसंपन्ना महाघोरां नृपोत्तमाः १२ रथं महांतमारुह्य शस्त्रौघैश्च समावृतम् । पट्टिशासिसमाकीर्णं गदापरिघसंकुलम् १३ शक्तितोमरसंकीर्णं ध्वजमालासमाचितम् । किंकिणीजालसंयुक्तं शरासिप्राससंयुतम् १४ महाघोरं महारौद्रं युगान्तजलदोपमम् । धनुर्गदासमाकीर्णं महावाद्योपमं महत् १५ अग्न्यर्कसदृशाकारं ययौ द्वारवतीमनु । गृहीतदीपिको राजा वीर्यवान्बलवान्नृप १६ हन्तुमैच्छज्जगन्नाथं वृष्णींश्चैव समंततः । आकर्षन्बलमुख्यांस्तान्राज्ञः सर्वान्महाद्युतिः १७ पुरद्वारं समासाद्य बलं संस्थाप्य यत्नतः । इदं प्रोवाच राजा तु नृपान्सर्वानवस्थितान् १८ ताड्यतामत्र भेरी तु नाम विश्राव्य मामकम् । युध्यतां युध्यतामत्र देयं वा प्रतिदीयताम् १९ आगतः पौंड्रको राजा युद्धार्थी वीरवत्तरः । हंतुकामः समग्रान्वः कृष्णबाहुबलाश्रयान् २० इति ते प्रेषिताः सर्वे समीयुः सूचकायदून् । दीपिकाश्च प्रदीप्यन्ते बह्व्यः शतसहस्रशः २१ इतश्चेतश्च राजानो युद्ध्यन्ते

---

सैन्य यांनीं युक्त होऊन निघाला. कोट्यवधि शस्त्रांनीं संपन्न असलेला सत्यप्रतिज्ञ राजा अनेक लक्ष पायदळांसह एकलव्यप्रभृति राजांकडून समन्ततः परिवेष्टित होत्साता युद्ध करावयास निघाला ५–८. आठ सहस्र रथ, अयुत हत्ती, व अर्बुद पायदळ इतकें सैन्य त्याच्यापाशीं जमलें ९. या एवढ्या सैन्यानें संग्रामांत भूषित होणारा तो उत्तम राजा उदयस्थ महासूर्याप्रमाणें विराजमान झाला १०. त्यादिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास तो द्वारकेपाशीं गेला. रात्रीं गाढ अंधकार पसरलेला असल्यामुळें पायदळांतील लोकांनीं हातांत मशाली घेतल्या. महाबलाढ्य व वीर्यसंपन्न राजे महाघोर द्वारकेस नानाप्रकारचीं शस्त्रें घेऊन निघाले ११,१२. राजा जनमेजया, वीर्यवान् व बलवान् राजा पौंड्र हातांत दीपिका घेऊन व एका मोठ्या रथावर बसून द्वारकेकडे निघाला. त्याचा तो रथ शस्त्रौघांनीं उत्तमप्रकारें परिवेष्टित ( सुरक्षित ) होता. पट्टे व तरवारी यांनीं व्याप्त होता. गदा व परिघ यांनीं त्याला भरून सोडलें होतें. त्या रथांत अनेक शक्ति व तोमर होते. तो वरून ध्वजपंक्तीनें सुशोभित झाला होता. त्याला असंख्य क्षुद्र घंटा लाविल्या होत्या. तो शर, तरवारी व प्रास यांनीं युक्त होता. तो महाघोर, महाभयंकर, व युगांतींच्या मेघासारखा होता. त्याच्यावर धनुष्यें व गदाही पुष्कळ होत्या. तो मोठ्या महावाद्यासारखाच होता. त्याचा आकार अग्नि व सूर्य यांसारखा होता १३—१६. असो; अशा रथानें निघालेला तो जगन्नाथास व समंततः यादवांस मारण्याची इच्छा करीत होता. तो महातेजस्वी सैन्यांतील मुख्य सर्व राजांस आपल्या मागून आकर्षण करीत १७ द्वारकानगरीच्या द्वारापर्यंत येऊन पोंचला. त्यानें मोठ्या प्रयत्नानें आपलें सैन्य स्थापिलें. नंतर तेथें आलेल्या सर्व राजांस तो असें बोलला १८. " माझें नांव सांगून येथें तुह्मी दुंदुभी वाजवा. आतां आमच्याशीं युद्ध करा किंवा देय कर द्या १९. युद्धार्थी व अतिशय वीर्यवान् पौंड्रक राजा कृष्णाच्या बाहुबलाचा आश्रय करून राहिलेल्या तुह्मां सर्वांना मारण्यासाठीं येथें आला आहे २०. असें सांगून तुह्मी

युद्धलालसाः । पुरीं ते पुरतस्तत्र क्षत्रियाः शस्त्रिणस्तथा २२ सिंहनादं प्रकुर्वंतः शस्त्रधारासमाकुलाः । कुतोयं वृष्णिप्रवरः कुतो राजा जगत्पतिः २३ कुतोयं सात्यकिर्वीरः कुतो हार्दिक्य एव च । कुतो नु बलभद्रश्च सर्वयादवसत्तमः ॥ इत्येवं कथयन्तो वै राजानः सर्व एव ते २४ आदाय शस्त्राणि बहूनि सर्वतः शराश्च चापानि बहूनि सर्वे । युद्धाय सन्नाहनिबद्धशोयमुर्हरेः पुरीं द्वारवतीं नृपोत्तमाः २५ [ ४२४८ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि पौंड्रकवधे त्रिनवतितमोऽध्यायः ॥ ९३ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततश्च यादवाः सर्वे दृष्ट्वा सैनिकसंचयम् । रात्रौ च व्यसनं प्राप्तं महाशस्त्रसमाकुलम् १ महावातसमुद्भूतं कल्पान्तसागरोपमम् । सन्नद्धाः समपद्यन्त शस्त्रिणो युद्धलालसाः २ गृहीतदीपिकाः सर्वे यादवाः शस्त्रयोधिनः । सात्याकर्बलभद्रश्च हार्दिक्यो निशठस्तथा ३ उद्धवोऽथ महाबुद्धिरुग्रसेनो महाबलः । अन्ये च यादवाः सर्वे कवचग्रहणे रताः ४ समस्तयुद्धकुशला रात्रौ सन्नाहयोधिनः । शस्त्रिणः खड्गिनश्चैव सर्वे शस्त्रसमाकुलाः ५ युद्धाय समपद्यन्त बहवो बाहुशालिनः । रथिनो गदिनश्चैव सादिनः सायुधास्तथा ६ नित्ययुक्ता महात्मानो धन्विनः पुरुषोत्तमाः । निर्ययुर्नगरात्तूर्णं दीपिकाभिः समंततः ७ कुतः पौंड्रक इत्येवं वदन्तः सर्वसात्वताः । दीपिकादीपितो देशो निस्तमः समपद्यत ८ ततो वितिमिरो देशः समंतात्प्रत्यपद्यत । युद्धं समभवद्धोरं वृष्णिभिः शत्रुभिः सह ९ ततो महा-

---

घोष करा. " राजाच्या या आज्ञेप्रमाणें सर्व राजांनीं तसेंच सांगून पाठविलेले दूत यादवांकडे आले. अनेक सहस्र दीपिका प्रदीप्त केल्या गेल्या २१. युद्धलालसी राजे इतस्ततः युद्ध करूं लागले. शस्त्रधारण करणारे क्षत्रिय त्या पुरीच्या समोर सिंहनाद करीत शस्त्रधारांनीं आकुल झाले. तो वृष्णिप्रवीर कोठें आहे. तो जगत्पति राजा गेला कोठें ? २२,२३. तो वीर सात्यकि कोठें आहे ? हार्दिक्य कोठें दिसत नाहीं ? सर्व यादवांतील उत्तम वीर बलभद्र कोठें आहे ? असें बोलणारे ते सर्व राजे द्वारकेंतील रक्षक क्षत्रियांस भिववूं लागले २४. सारांश, याप्रमाणें ते सर्व उत्तम राजे असंख्य शस्त्रें, बाण, धनुष्यें इत्यादि घेऊन व युद्धाला सज्ज होऊन हरीच्या द्वारकापुरीस येऊन पोंचले २५. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० पौंड्रकवधासंबंधीं त्र्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९३. ॥

वैशंपायनः—- त्यानंतर तो सैन्यसंघ पाहून, रात्रीं महाशस्त्रांनीं व्याकुल झालेलें त महासंकट ओढवलेलें पाहून. महावायूनें क्षुब्ध केलेल्या कल्पांतसागरासारखें भयंकर सैन्य अवलोकन करून युद्धाची लालसा करणारे सर्व यादवही सज्ज झाले. त्यांनीं शस्त्रें उचललीं. हातांत मशाली घेतल्या आणि ते सर्व यादव शस्त्रांनीं युद्ध करूं लागले. सात्यकि, बलभद्र, हार्दिक्य, निशठ, महाबुद्धिमान् उद्धव, महाबलाढ्य उग्रसेन व तसेच दुसरेही मुख्य मुख्य यादव कवचें चढविण्यांत निमग्न झाले १–४. समस्त युद्धांमध्यें कुशल असलेले, रात्रीं सज्ज होऊन लढणारे, शस्त्रसंपन्न, खड्गभूषित व अनेक शस्त्रांनीं युक्त झालेले अनेक बाहुशाली यादव युद्धास सिद्ध झाले. रथी, गदावान्, स्वार व आयुधयुक्तवीर ५,६. नित्ययुक्त महात्मे व धनुर्धर पुरुषोत्तम, दीपिका घेऊन समंततः नगरांतून सत्वर बाहेर पडले. तो दुष्ट पौंड्र कोठें आहे, असें ह्मणतच ते सात्वत पुढें सरसावले. त्यावेळीं मशालींनीं प्रकाशित झालेला प्रदेश अंधकाररहित झाला ७,८. सभोंवतालचा सर्व अंधकार जाऊन लख्ख दिसूं लागलें. नंतर वृष्णींचें शत्रूंशीं मोठें युद्ध झालें ९.

न्समभवत्सन्नादो रोमहर्षणः । हया हयैः समायुक्ता गजाश्च गजयूथपैः १० रथा रथैः
समायुक्ताः सादिभिः सादिनस्तथा । खङ्गिनः खड्गिभिः सार्धं गदिभिर्गदिनस्तथा ११ पर-
स्परव्यतीकारो रण आसीत्सुदारुणः । महाप्रलयसंक्षोभः शब्दस्तेषां महात्मनाम् १२
धावन्तः प्रहरन्त्येतासर्वतो नृप हन्ति नः । अयमेष महाबाहुः खड्गी पतति वीर्यवान् १३
अयमेष शरी घोरो वर्तते तु सुदारुणः । गदी चायं महावीर्यः सर्वान्नो बाधते नृपः १४
अयं रथी शरी चापी गदी तूणी तनुत्रवान् । यादृशः सर्वतो याति कुन्तपाणिरयं बली १५
अयमत्र महाशूली संश्रितः सर्वतो दिशम् । गजोऽयं सविषाणाग्रो वर्तते सर्वतः प्रति १६
अतिसर्वत्रगः शूरो वेगवान्वातसन्निभः । शरान्छरैः समाहन्ति दण्डान्दण्डैर्जगत्पते १७
कुंतान्कुन्तैः समाजघ्नुर्गदाभिश्च गदास्तथा । परिघान्परिघैः सार्धं शूलाञ्छूलैः समंततः १८
एवं तेषां महाराज कुर्वतां रणमुत्तमम् । संग्रामः सुमहानासीच्छब्दश्चापि महानभूत् १९
भूतानि सुबहून्याजौ शब्दवन्ति महान्ति च । प्रादुरासन्सहस्राणि शंखानां भैमनिःस्वनः २०
रात्रौ प्रादुरभूच्छब्दः संग्रामे रोमहर्षणः । वर्तमाने महायुद्धे वृष्णीनां चैव तैः सह २१
केचिद्ग्रस्ताः समापेतुः पृथिव्यां पृथिवीक्षितः । केचित्पतितमाश्लिष्टा विप्रकीर्णशिरो-
धराः २२ पेतुरुर्व्यां महावीर्या राजानः शस्त्रपाणयः । केचित्तु भिन्नवर्माणः समापेतुः सह-
स्रधा २३ परस्परं समाश्रित्य परस्परवधैषिणः । न्यस्तशस्त्रा महात्मानः समंतात्क्षतवि-

---

त्यावेळीं अंगावर कांटा आणणारा भयंकर नाद सुरू झाला. घोडे घोड्यांशीं भिडले. हत्तीवर आरुढ झालेले हत्तीवरील वीरांशीं लढूं लागले १०. रथी रथस्थांवर चालून गेले. स्वारांचें युद्ध स्वारांशीं होऊं लागलें. खड्गवान् खड्गवानांशीं लढूं लागलें. गदावान् गदावानांशीं मारामारी करूं लागले ११. रणांतील तो परस्परसंघर्ष अतिशय रोमहर्षण झाला. त्या महात्म्यांचा ध्वनि महाप्रलयाप्रमाणें भयंकर क्षोभ उत्पन्न करणारा झाला १२. ते धांवून शत्रूंना मारूं लागले. " राजन् हा पहा आह्मांला मारीत सुटला आहे. हा पहा महावीर्यवान्, महाबाहु हातांत खड्ग घेऊन वेगानें धावून येत आहे. हा शरसंपन्न अतिघोर व दारुण आहे. हा महावीर्यवान् गदी आह्मां सर्वांस पीडा देत आहे १३,१४. हा रथी, चापी, शरी, गदी, तूणी, कवची, हातांत भाला घेणारा, व अतिबली कसा सर्वत्र संचार करीत आहे, पहा १५. हा महाशूली सर्व दिशांत शत्रुक्षय करीत चालला आहे. हा महागज दातांचीं अग्रें पुढें करून सर्वांवर धांवत आहे. हे जगत्पते, हा सर्वांचें अतिक्रमण करून जाणारा शूर, वेगवान् व वाततुल्य वीर येत आहे. " इत्यादि बोलणारे योद्धे आपल्या शरांनीं शत्रूंच्या शरांस, दंडांनीं दंडांस १६,१७. भाल्यांनीं भाल्यांस, गदांनीं गदांस, परिघांनीं परिघांस, व शूलांनीं शूलांस समंततः प्रतिबंध करीत होते १८. हे महाराजा जनमेजया, याप्रमाणें उत्तम रण करणाऱ्या त्यांचा तो संग्राम फार मोठा झाला. त्यांचा शब्दही फार घोर झाला १९. भयंकर शब्द करणारीं मोठमोठीं अनेक भूतें प्रकट झालीं. शंखांचा भयंकर ध्वनि उठला २०. रात्रीं वृष्णींचें शत्रूंशीं महायुद्ध सुरू झालें असतां त्या संग्रामांत रोमहर्षण शब्द प्रकट झाला २१. कित्येक मूर्च्छाग्रस्त झालेले राजे पृथ्वीवर पडले. कित्येक महावीर्यवान् व शस्त्रपाणि राजे भूमीवर पडलेल्या आप्तांस आलिंगन देऊन व मान अस्ताव्यस्त टाकून पडले. कित्येकांचीं कवचें फुटून सहस्रधा पतन पावलीं २२,२३. परस्परांशीं भिडून परस्परांस मारण्याची इच्छा करणारे कित्येक महात्मे

ग्रहाः २४ पेतुर्गतासवः केचिद्यमराष्ट्रविवर्धनाः । एवं ते निहता राजन्योधिताः सर्व एव तु २५ एतस्मिन्नन्तरे शूर एकलव्यो निषादपः । धनुर्गृह्य महाघोरं कालान्तकयमोपमः २६ शरैरनेकसाहस्रैरर्दयामास यादवान् । परंशतैः शराणांतुनिशितैर्मर्मभेदिभिः १७ वृष्णीनां च बलं सर्वं पोथयामास सर्वतः । युद्ध्यतः शस्त्रपाणींश्च क्षत्रियान्वीर्यवत्तरान् २८ निशठं पंचविंशत्या शराणां नतपर्वणाम् । सारणं दशभिर्विध्वा हार्दिक्यं पंचभिः शरैः २९ उग्रसेनं नवत्याऽऽशु वसुदेवं च सप्तभिः । उद्धवं दशभिश्चैव ह्यक्रूरं पंचभिः शरैः ३० एवमेकैकशः सर्वे निहता निशितैः शरैः । विद्राव्य यादवीं सेनां नाम विश्राव्य वीर्यवान् ३१ एकलव्यो यदुवृषान्वीर्यवान्बलवानहम् । इदानीं सात्यकिर्वीरः क्व यास्यति महाबलः ३२ मदमत्तो हली साक्षात्क्व यातीह गदाधरः । इत्याह सिंहनादेन सिंहान्विस्मापयन्निव ३३ [ ४२८१ ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० पौंड्रकवधे चतुर्नवतितमोऽध्यायः ॥ ९४ ॥

वैशंपायन उवाच ॥ निवृत्तेष्वथ सैन्येषु वृष्णिवीरेषु चैव हि । भीतेष्वथ महाराजन् हतेषु युधि सर्वतः १ दीपिकासु प्रशांतासु निःशब्दे सति सर्वतः । जितमित्येव यन्मत्वा वृष्णीनां बलमुत्तमम् २ ततः पौण्ड्रो महावीर्यो बभाषे सैनिकान्स्वकान् । शीघ्रं गच्छत राजेंद्रा टंकैः कुन्तैः पुरीमिमाम् ३ कुठारैः कुंतलैश्चैव पाषाणैः सर्वतो दिशम् । कर्षणस्थैः सुपाषाणैः सर्वशो यात भूमिपाः ४ भिद्यन्तां प्राकारचयाः प्रासादाश्च समंततः । गृह्यन्तां

---

शस्त्रांचा त्याग करून शरीरें समंततः क्षतयुक्त झाल्यामुळें भूमीवर पडले २४. कित्येक यमाच्या राष्ट्राची वृद्धि करणारे गतप्राण होऊन पडले. याप्रमाणें हे राजा, जनमेजया, ते बहुतेक योद्धे मारले गेले २५. इतक्यांत शूर कालांतक यमासारखा निषाधपति एकलव्य आपलें धनुष्य घेऊन पुढें आला २६. त्यानें आपल्या अति तीक्ष्ण व मर्मभेदी सहस्रावधि बाणांनीं यादवांचें विदारण केलें २७. त्यानें वृष्णींच्या सर्व सैन्यास हतवीर्य करून सोडलें. हातांत शस्त्रें घेऊन युद्ध करणाऱ्या वीर्यवत्तर क्षत्रियांसही त्यानें व्याकुळ केलें २८. त्यानें ज्यांचीं पेरें नमलीं आहेत अशा पंचवीस बाणांनीं निशठास, व दहा बाणांनीं सारणास वेध करून पांच शरांनीं हार्दिक्यास व्याकुळ केलें २९. उग्रसेनाला त्यानें नव्वद बाण मारले. वसुदेवाला सात बाण मारले. उद्धवाला दहा व अक्रूराला पांच बाणांनीं वेध केला ३०. याप्रमाणें यादवांतील प्रत्येकाला त्यानें तीक्ष्ण बाणांनीं विद्ध केलें. यादवांच्या सेनेला पळावयास लावून व आपलें नांव सांगून वीर्यवान् एकलव्य यदुश्रेष्ठास ह्मणाला, " मी बलाढ्य व वीर्यवान् एकलव्य आहें. आतां महाबल सात्यकि वीर कोठें जाणार आहे ? ३१,३२. गदा धारण करणारा मदोन्मत्त साक्षात् हलधर तरी कोठें जातो, तें मी पाहतों " असें तो त्या सिंहांस विस्मय उत्पन्न करीत सिंहनादानें बोलला ३३. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० पौंड्रकवधाविषयीं चवऱ्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९४. ॥

वैशंपायनः—हे महाराज, याप्रमाणें एकलव्याच्या वीर्यास भिऊन सर्व सैन्य परतलें असतां, वृष्णिवीर भयभीत झाले असतां, सर्व सर्व बाजूंनीं मारले गेले असतां १, मशाली विझल्या असतां व चोहोंकडचा गलबला शांत झाला असतां यादवांच्या उत्तम सैन्याला आह्मी जिंकलेंच आहे, असें मानून २, महावीर्यवान् पौंड्र आपल्या सैनिकांस ह्मणाला, ' हे राजेंद्रहो, टांक्या, भाले, कुऱ्हाडी, कुंतल, पाषाण, ओढावयाचे मोठाले पाषाण,

कन्यकाः सर्वा दास्यश्चैव समंततः ५ गृह्णंतां वसुमुख्यानि धनानि सुबहून्यथ । ते तथेति महात्मानो राजानः सर्व एव तु ६ कुठारैः सर्वतश्चैव चिच्छिदुः पौंड्रकाज्ञया । प्राकारांश्चैव सर्वत्र प्रासादान्वरसंचयान् ७ अथ तत्र महाशब्दः प्रादुरासीत्समंततः । टंकेषु पात्यमानेषु प्राकारेषु महाबलैः ८ पूर्वद्वारे महाराज भिन्नाः प्राकारसंचयाः । श्रुत्वा शब्दं महाघोरं सात्यकिः क्रोधमूर्च्छितः ९ मयि सर्वं समारोप्य केशवो यादवेश्वरः । गतः कैलासशिखरं द्रष्टुं शंकरमव्ययम् १० अवश्यं हि मया रक्ष्या पुरी द्वारवती त्वियम् । इति संचिन्त्य मनसा धनुरादाय सत्वरम् ११ रथं महांतमारुह्य दारुकस्य महात्मनः । पुत्रेण संस्कृतं घोरं यंता च स्वयमेव हि १२ धनुर्महत्तदाऽऽदाय शरांश्चाशीविषोपमान् । आमुच्य कवचं घोरं शस्त्र-संपातदुःसहम् १३ अंगदी कुंडली तूणी शरी चापगदासिमान् । ययौ युद्धाय शैनेयः संस्मरन्कैशवं वचः १४ दीपिकादीपिते देशे ययौ सात्यकिरुत्तमः । तथैव बलदेवोपि रथ-मारुह्य भास्वरम् १५ गदी शरी महावीर्यः प्रायाद्रणचिकीर्षया । सिंहनादंप्रकुर्वन्वैमुञ्चन्वै भैरवं वरम् १६ उद्धवोऽपि बली साक्षाद्गजमारुह्य सत्वरम् । मत्तं महारवं घोरं संग्रामे नीतिमत्तरम् १७ ययौ नीतिं विचिन्वानः परां प्रीतिं महाबलः । अन्ये च वृष्णयः सर्वे ययुः संग्रामलालसाः १८ रथान्गजान्समारुह्य हार्दिक्यप्रमुखास्तथा । दीपिकाभिश्च सर्वत्र पुरोवृत्ताभिरीश्वराः १९ सिंहनादं प्रकुर्वन्तः स्मरन्तः कैशवं वचः । पूर्वद्वारं समागम्य

---

इत्यादि घेऊन या नगरीच्या सर्व बाजूंस शीघ्र जा ३,४. तिचा कोट व प्रासाद सभोंवार खोदा. सर्व कन्यांना व दासींना सर्वतः कैद करा ५. मुख्य मुख्य धनें ग्रहण करा. विपुल धन लुटा, ' पौंड्राची ही आज्ञा ऐकून व बरें आहे, असें ह्मणून सर्वच महात्मे राजे द्वारकेपाशीं गेले ६. पौंड्राच्या आज्ञेनें त्यांनीं सर्वतः कुऱ्हाडी चालवून तट तोडले व ज्यांत उत्तम संचय आहेत असे प्रासाद फोडण्यास आरंभ केला ७. तेव्हां महाबलाढ्य वीर प्राकारावर टाक्यांचें घांव घालूं लागले असतां समंततः मोठा शब्द झाला ८. हे महाराज, पूर्व द्वारावरील तट त्यांनीं फोडला. पण तो महाघोर शब्द ऐकून क्रोधानें विवश झालेला सात्यकि ह्मणतो ९, " यादवेश्वर केशव सर्वभार मजवर टाकून कैलास शिखरावर अव्यय शंकरास पाहावयास गेला आहे १०. यास्तव मला ही पुरी अवश्य राखली पाहिजे. " असा मनानें विचार करून व सत्वर धनुष्य घेऊन ११ तो महात्म्या दारुकाच्या महारथावर बसला. पुत्रानें ज्याला क्षालनादि संस्कार केला आहे अशा त्या घोर रथावर तो सारथिही स्वतः बसला असतां १२, लागलेंच मोठें धनुष्य व सर्पांसारखे बाण घेऊन, शरवृष्टीस सहन करणारें घोर कवच अंगांत चढवून १३, अंगदी, कुंडली, तूणी, शरी, गदी व असिमान् होऊन केशवाचें आज्ञावचन आठवीत तो शिनीपुत्र युद्धास निघाला १४. मशालींनीं जेथील प्रदेश प्रकाशित केला होता तेथें उत्तम सात्यकि गेला. त्याचप्रमाणें बलदेवही भास्वर रथावर आरूढ होऊन १५, गदा, शर, इत्यादिकांसह रण करण्याच्या इच्छेनें सिंहनाद करीत व भयंकर आवाज करीत निघाला १६. साक्षात् बलाढ्य उद्धवही मत्त, महा ध्वनि करणाऱ्या व संग्रामांत अतिशय निपुण असलेल्या गजावर सत्वर आरूढ होऊन नीतीचा विचार करणारा तो महाबल फार प्रसन्न झाला. दुसरेही संग्रामलालसी हार्दिक्यप्रभृति वृष्णि रथ व गज यांवर आरूढ होऊन रणांत निघाले. त्या ईश्वरांच्या अग्रभागीं सर्वत्र दीपिका होत्या १७–१९. ते सिंहनाद करणारे व केशवाचें वचन आठविणारे

वृष्णयो युद्धलालसाः २० ते समेत्य यथायोगं स्थितास्तत्र महाबलाः । स्थिते सैन्ये महाघोरे दीपिकादीपिते पथि २१ शिनिर्वीरः शरी चापी गदी तूणी रथाग्विभो । वायव्यास्त्रं समादाय योजयित्वा महाशरम् २२ आकर्णपूर्णमाकृष्य धनुः प्रवरमुत्तमम् । मुमोच परसैन्येषु शिनिर्वीरः प्रतापवान् २३ वायव्यास्त्रेण ते सर्वे तत्रस्था नरसत्तमाः । विजिता ह्यस्त्रवीर्येण यत्र तिष्ठति पौण्ड्रकः २४ तत्र गत्वा स्थिताः सर्वे निर्धूता वातरंहसा । यत्र पूर्वं स्थिताः सर्वे विद्रुता राजसत्तमाः २५ तत्र स्थित्वा च शैनेयः शरमादाय सत्वरम् । निशितं सर्पभोगाभं बभाषे सात्यकिस्तदा २६ क्क इदानीं महाबुद्धिः पौंड्रको राजसत्तमः । स्थितोऽस्मि व्यवसायेन शरी चापी महाबलः २७ यदि दृष्टा दुरात्मानं ततो हंता नृपाधमम् । भृत्योऽस्मि केशवस्याहं जिघांसुः पौण्ड्रकं स्थितः २८ छित्वा शिरस्तु तस्यास्य सर्वक्षत्रस्य पश्यतः । बलिं दास्यामि गृध्रेभ्यः श्वभ्यश्चैव दुरात्मनः २९ को नाम ईदृशं कर्म चौरवच्च समाचरेत् । सुप्तेषु निशि सर्वत्र यादवेषु महात्मसु ३० चौरोऽयं सर्वथा राजा न हि राजा बलान्वितः । यदि शक्तो न कुर्याच्च चौर्यमेवं नृपाधमः ३१ अहोऽस्य बलिनो राज्ञश्चौरकार्यं प्रकुर्वतः । सर्वथा गमनं तस्य न हि पश्यामि सांप्रतम् ३२ इत्युक्त्वा सात्यकिर्वीरः प्रजहास महाबलः । विस्फार्य स दृढं चापं संदधे कार्मुके शरम् ३३ आकर्ण्य वचनं वीरः सात्यकेस्तस्य धीमतः । क्क नु कृष्णः क्क गोपालः कुतः सोऽथ प्रवर्तते ३४ स्त्रीहन्ता पशुहन्ता च क्क च स्वामीति सेवितः । स इदानीं क्क वर्तेत गृहीत्वा मम नाम

---

युद्धलालसी वृष्णि पूर्व द्वारावर येऊन व तेथें ते महाबल यथायोग्यरीतीनें एकत्र स्थित होऊन राहिले. मशालींनीं प्रकाशित झालेल्या मार्गांमध्यें महाघोर सैन्य उभें राहिलें असतां हे विभो, शर, चाप, गदा व तूणीर यांनीं युक्त झालेला प्रतापवान् शिनिवीर ( सात्यकि ) वायव्यास्त्र घेऊन, महाशराचें संधान करून, उत्तम धनुष्य आकर्ण ओढून, शत्रुसैन्यावर त्याचा प्रयोग करता झाला २०-२३. तेव्हां तेथें असलेले सर्व नरसत्तम वायव्यास्त्रानें पराभूत झाले. अस्त्रवीर्यानें विजित झालेले ते पौंड्रक जेथें होता तेथें जाऊन उभे राहिले. वायूच्या वेगानें त्या सर्वांना उडवून नेलें. तेव्हां पळून गेलेले सर्व उत्तम राजे पूर्वीं जेथें स्थित होते तेथें उभा राहून व लागलाच सर्पाच्या शरीरासारखा तीक्ष्ण बाण घेऊन शैनेय सात्यकि ह्मणाला २४-२६, " आतां तो महाबुद्धि उत्तमराजा पौंड्रक कोठें आहे ? मी शरचाप घेऊन निश्चयानें उभा आहें २७. त्या दुरात्म्याला मी जर पाहिलें तर जिवंत सोडणार नाहीं. मी केशवाचा भृत्य आहें व पौंड्रकाला मारण्याची इच्छा करतों २८. सर्व क्षत्रिय पाहत असतांना त्याचें शिर तोडून मी कुत्रे व गृध्र यांस त्या दुरात्म्याच्या मांसाचा बलि देईन २९. सर्व महात्मे यादव रात्रीं निजले असतांना त्यांच्या नगरीस येऊन वेढा देण्याचें हें चोरासारखें काम दुसरा कोण करील ? ३०. हा राजा सर्वथा चोर आहे. तो बलाढ्य नाहीं. तो जर खरोखरच शक्तिमान् असता तर त्या अधम राजानें असें चौर्य केलें नसतें ३१. अहो, चोराचें कर्म करणाऱ्या या बलाढ्य राजाचें येथून जीव घेऊन परत जाणें मला सर्वथा शक्य दिसत नाहीं. " असें बोलून महाबल सात्यकि हंसला. त्यानें आपलें धनुष्य सज्ज करून त्यावर बाण चढविला ३२, ३३. इतक्यांत बुद्धिमान् सात्यकीचें तें भाषण ऐकून वीर पौंड्रक " कृष्ण कोठें आहे, तो गोपाळ कोठें आहे ? स्वामी असें ह्मणून सेवा केला गेलेला तो स्त्रीहंता, पशुहंता कोठें आहे ? माझें नांव धारण करून तो आतां

तत् ३५ हंता सख्युर्महावीर्यो नरकस्य महात्मनः । ममैव तात युद्धेऽस्मिन्हते तस्मिन्दुरात्मनि ३६ गच्छ त्वं कामतो वीर योद्धुं न क्षमते भवान् । अथवा तिष्ठ किंचित्तु ततो द्रष्टासि मे बलम् ३७ शिरस्ते पातयिष्यामि शरैर्घोरैर्दुरासदैः । हतस्य तव वीरेह भूमिः पास्यति शोणितम् ३८ श्रोष्यते सतथा गोपो हतः सात्यकिरित्यपि । यो गर्वस्तस्य गोपस्य सर्वदा वर्तते महान् ३९ विनश्यति स तु क्षिप्रं हते त्वयि यदूत्तम । त्वयि रक्षां समादिश्य गोपः कैलासपर्वतम् ४० गत इत्येवमस्माभिः श्रुतं पूर्वं महामते । शरं गृहाण निशितं यदि शक्तोऽसि सात्यके । इत्युक्त्वा बाणमादाय ययौ योद्धुं व्यवस्थितः ४१ [ ४३२० ] इति श्रीम० खि० हरि० भवि० पौण्ड्रवधे सात्यकिपौण्ड्रभाषणं नाम पंचनवतितमोऽध्यायः ॥९५॥

वैशंपायन उवाच ॥ ततः क्रुद्धो महाराज सात्यकिर्वृष्णिपुंगवः । उवाच वचनं राजन्वासुदेवं स्मरन्निव १ अवोचदीदृशं वाक्यं वासुदेवं नृपाधमः । को नाम जगतां नाथमित्थं ब्रूयाज्जिजीविषुः २ मृत्युस्त्वां सर्वथा याति वदन्तं तादृशं वचः । जिह्वा ते शतधा दीर्याद्वदतस्तादृशं वचः ३ एष ते पातयिष्यामि शिरः कायाच्च पौण्ड्रक । यन्नाम वासुदेवेति तव संप्रति वर्तते ४ यावत्पतति कायात्ते शिरस्तावत्प्रवर्तते । स एव श्वो नु भगवान्वासुदेवो भविष्यति ५ एक एव जगन्नाथः कर्ता सर्वस्य सर्वगः । दुरात्मन्सर्वथा देवो भविष्यति न संशयः ६ एष तेऽहं शिरः कायात्पातयिष्यामि राजक । यदसौ भगवान्विष्णुर्नागमिष्यंति

---

कोठें व कसा राहील ? माझ्या महात्म्या नरक मित्राचा हंता असा तो महावीर्यवान् कोठें आहे ? माझ्या या युद्धामध्यें तो दुरात्मा मेला असतां मग तूं वाटेल तिकडे जा. तूं युद्ध करण्यास समर्थ नाहींस. अथवा जरा उभा रहा ह्मणजे माझें बल तुला कळेल ३४–३७. घोर व असह्य बाणांनीं मी तुझें शिर तोडून पाडीन. येथें मारलेल्या तुझें रक्त हें वीरा, भूमि प्राशन करील ३८. ह्मणजे तो गोपही सात्यकि मारला गेला, असें ऐकेल. त्या गोपाचा जो फार दिवसांचा मोठा गर्व आहे तो हे यदूत्तमा, मी तुला मारलें ह्मणजे तत्काल नष्ट होईल. तुला या नगरीचें रक्षण करावयास सांगून तो गोप कैलासपर्वतास गेला आहे; इतकेंच मागें आह्मी ऐकलें होतें. असो, हे महामते सात्यके, माझ्याशीं युद्ध करण्यास समर्थ असलास तर तीक्ष्ण बाण घे. ” असें बोलून व बाण घेऊन तो व्यवस्थित पौंड्र युद्ध करावयास पुढें सरसावला ३९–४१. इति श्रीमहा. खि. हरि भवि० पौंड्रवधांतील सात्यकिपौंड्रभाषणनामक पंचाण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९५ ॥

वैशंपायनः—हे महाराज, त्यानंतर रागावलेला वृष्णिपुंगवसात्यकि जणुं काय वासुदेवाचें स्मरण करीत असें वचन बोलला १. “ हा अधम राजा वासुदेवाला असें अभद्र बोलत आहे. पण जिवंत राहण्याची इच्छा करणारा कोण बरें त्या जगन्नाथाला असें बोलणार आहे ? २. तसें रूक्ष भाषण करणाऱ्या तुला सर्वथा मृत्यु येईल. तसलें अभद्र बोलणाऱ्या तुझी जिव्हा शतधा विदीर्ण होईल ३. हे पौंड्रका, हा मी तुझ्या धडापासून शिर वेगळें करतों. वासुदेव असें जें तुझें नांव हल्लीं प्रसिद्ध आहे तें तुझें शिर शरीरापासून वेगळें झालें नाहीं तोंच प्रवृत्त होणार आहे. उद्यां तो भगवान् वासुदेवच एकच राहील. तो जगन्नाथ सर्वांचा कर्ता व सर्वगामी आहे. हे दुरात्मन्, तुला मी मारलें ह्मणजे तो देवच एक वासुदेव होईल, यांत संशय नाहीं ४ – ६. हे क्षुद्र राजा, हा पहा मी आतां तुझें मस्तक धडापासून वेगळें करून पाडतों. कारण आतांच भगवान्

सांप्रतम् ७ अस्त्रवीर्यं बलं चैव सर्वं दर्शय सांप्रतम् । नातः परतरं राजन्वीर्यं च तव वर्तते ८ सर्वं दर्शय यत्नेन स्थितोऽस्मि व्यवसायवान् । शरी चापी गदी खड्गी सर्वथाहमुपस्थितः ९ नैतन्नगरमायासीः सत्येनैतद्ब्रवीम्यहम् । सर्वथा कृतकृत्योऽस्मि दृष्ट्वा त्वां वासुदेवकम् १० तवांगं तिलशः कृत्वा श्वभ्यो दास्यामि राजक । इत्युक्त्वा बाणमादाय वासुदेवं महाबलः ११ आकर्णपूर्णमाकृष्य विव्याध निशितं शरम् । स तेन विद्धो यदुना वासुदेवः प्रतापवान् १२ वमच्छोणितमत्युष्णमंगान्नेत्रान्नृपोत्तम । ततश्चुक्रोध नृपतिर्वासुदेवः प्रतापवान् १३ नवभिर्दशभिश्चैव शरैः सन्नतपर्वभिः । विव्याध सात्यकिं राजा नदंश्चबहुधा किल १४ ततो नाराचमादाय निशितं यमसंनिभम् । धनुराकृष्य भगवान्वासुदेवो नृपोत्तम १५ विव्याध सात्यकिं भूयो निशिमह्लादयन्स्वकान् । नाराचेन समाविद्धः सात्यकिः सत्यसंगरः १६ ललाटे सुदृढं वीरो वृष्णीनामग्रणीस्तदा । निषसाद रथोपस्थे निश्चेष्ट इव सत्तमः १७ ततः स पौंड्रको राजा विध्वा दशभिराशुगैः । सारथिं पंचविंशत्या हयांश्च चतुरो नृपः १८ ते हयारुधिराक्तांगाः सारथिश्च समंततः । विह्वलाः समपद्यन्त वासुदेवस्य पश्यतः १९ वासुदेवो रथे चापि सिंहनादं समाददे । तेन नादेन तत्राभूद्विबुद्धः सात्यकिर्नृप २० विद्धान्हयांस्तथा दृष्ट्वा सारथिं च तथागतम् । शैनेयोऽथ महावीर्यो रुषितो नृपसत्तम २१ अलं द्रक्ष्यामिते वीर्यमित्युक्त्वा बाणमाददे । विव्याध तेन बाणेन

---

विष्णु येणार नाहीं ७. यावेळीं मला सर्व अस्त्रवीर्य व बल दाखीव. यापुढें तुझें बल व वीर्य राहणार नाहीं ८. यास्तव, तें आजच मला दाखीव. मी तें पाहण्यासाठीं सप्रयत्न होऊन राहिलों आहें. मी शरी, चापी, गदी व खड्गी होऊन सर्वथा उपस्थित झालों आहें. तूं या नगरीला आला नाहींस, तर साक्षात् यमपुरीलाच प्राप्त झाला आहेस, असें समज. मी हें सत्य सांगत आहें. तुज क्षुद्र वासुदेवाला पाहून मी कृतकृत्य झालों आहे ९,१०. हे राजा, तुझ्या अंगाचे तिलशः तुकडे करून मी कुत्र्यांना खाऊं घालीन. असें बोलून, बाण जोडून व धनुष्य आकर्ण ओढून महाबल सात्यकि वासुदेवराजास तीक्ष्ण वेध करता झाला. तेव्हां त्या यादवानें याप्रमाणें वेध केला असतां प्रतापवान् वासुदेव, हे राजन्, अंगांतून व नेत्रांतून अतिशय उष्ण रक्ताचा स्राव करूं लागला. त्यानंतर त्या प्रतापवानाला मोठा क्रोध आला. त्यानें ज्यांचीं अग्रें नमविलीं आहेत अशा नऊ दहा बाणांनीं सात्यकीस वेध केला व मोठा सिंहनाद केला. नंतर हे उत्तम राजा, तो वासुदेव यमासारखा पाजळलेला बाण घेऊन व धनुष्य आकर्ण ओढून रात्रीं आपल्या अनुयायांस आल्हाद देत सात्यकीला पुनः वेध करता झाला. तेव्हां नाराचबाणानें अतिशय विद्ध झालेला सत्यप्रतिज्ञ सात्यकि, वृष्णींचा अग्रणी वीर, ललाटावर दृढ प्रहार झाला असतां निश्चेष्टसा होऊन रथाच्या मागच्या बाजूस जाऊन बसला ११-१७. तेव्हां तो पौंड्रक राजा दहा आशुग बाणांनीं सारथ्यास वेध करून पंचवीस बाणांनीं चारी घोड्यांस प्रहार करता झाला १८. त्यामुळें ज्यांचीं अंगें रक्तानें भरलीं आहेत असे घोडे व सारथि वासुदेव राजाच्या डोळ्यादेखत विह्वल झाले १९. तें पाहून रथस्थ पौंड्रानें भयंकर सिंहनाद केला. पण हे राजा, त्याच्या त्या घोर नादानें इकडे सात्यकि देहभानावर आला २०. घोडे व सारथि विद्ध व त्यामुळेंच व्याकुळ झाले आहेत, असें पाहून, हे जनमेजया, महावीर्यवान् शैनेय अतिशय क्रुद्ध झाला २१. व 'बरें आहे, मी आतां तुझें पुरतेंच बळ

वक्षस्येनं महाबलः २२ ततश्चचाल तेनाजौ वासुदेवः शरेण ह । सुस्राव रुधिरं घोरमत्युष्णं वक्षसो नृप २३ रथोपस्थे पपाताशु निश्वसन्नुरगो यथा । कृत्यं चापि न जानाति केवलं निषसाद ह २४ सात्यकिस्तु रथं विध्वा दशभिः सायकैस्तथा । ध्वजं चिच्छेद भल्लेन वासुदेवस्य वृष्णिपः २५ हयांश्च चतुरो हत्वा बाणैः सारथिमेव च । युयुधानोऽथराजेंद्र बाणैः सारथिमेव च २६ सारथेश्च शिरः कायादाहरत्स रथात्तदा । रथग्रंथिं च चिच्छेद हयाश्च व्यसवोऽभवन् २७ चक्रं च तिलशः कृत्वा बाणैर्दशभिरंहसा । जहास विपुलं राजन्वासुदेवं महाबलः २८ ततः परं महत्कायं सात्यकिर्वृष्णिनन्दनः । शब्दं कृत्वा बली साक्षात्सर्वक्षत्रस्य पश्यतः २९ शरैः सप्ततिसंख्याकैरर्दयामास सत्वरम् । ते शराः शलभाकारा निपेतुः सर्वशस्तदा ३० शिरस्तः पार्श्वतश्चैव पृष्ठतः पुरतस्तथा । केवलं धैर्यनिचयस्तृषार्तः शरवान्यथा ३१ यथा मनस्वी रिक्तश्च तथा तिष्टति पौंड्रकः । ततश्चुक्रोध बलवान्वासुदेवः प्रतापवान् ३२ अर्धचन्द्रं समादाय विव्याध युधि सात्यकिम् । विध्वा सप्तभिरायांतं क्रोधेन प्रस्फुरन्निव ३३ विद्धोऽथसात्यकिस्तेन शरैः पंचभिराशुगैः । चाप चिच्छेद पौंड्रस्य सिंहनादं व्यनीनदन् ३४ वासुदेवो गदां गृह्य भ्रामयित्वा पदात्पदम् । त्वरितं पातयामास सात्यकेर्वक्षसि प्रभो ३५ सव्येन तां समाकृष्य करेण यदुनन्दनः । शरं प्रगृह्य

---

पाहतों ' असें म्हणून सात्यकीनें बाण घेतला आणि त्याच्या योगानें त्या महाबलवानानें त्याला वक्षःस्थलीं वेध केला २२. त्या बाणाच्या प्रहारानें वासुदेव रणांत चंचल झाला. हे राजा, त्यानें घोर व अत्युष्ण रक्ताचा स्राव केला २३. सर्पाप्रमाणें श्वास सोडीत तो रथाच्या उपस्थ भागीं तत्काल पडला. काय करावें हेंही न कळल्यामुळें तो केवळ खालीं बसला २४. इतक्यांत सात्यकीनें दहा बाणांनीं त्याच्या रथाला वेध केला. त्या वृष्णिपालकानें बाणानें वासुदेवाचा ध्वज तोडला २५. बाणांनीं चारी घोड्यांस व सारथ्याला मारलें. हे राजेंद्रा, युयुधानानें बाणांच्या योगानें सारथ्यास मारून त्याचें शिर धडापासून वेगळें केलें व तत्काल तें रथांतून खालीं पाडविलें. त्यानें त्या पौंड्राच्या रथाची ग्रंथि तोडली. घोडे गतप्राण झाले. दहाबाणांनीं मोठ्या वेगानें त्याच्या चक्राचे तिळा एवढाले तुकडे करून हे राजन्, महाबल शिनिपुत्र वासुदेवाला पुष्कळ हंसला २६–२८. त्यानंतर बलाढ्य वृष्णिनंदन सात्यकि मोठा सिंहनाद करून साक्षात् सर्व क्षत्रियांच्या समोर ( डोळ्या देखत ) त्या महाशरीरानें संपन्न असलेल्या पौंड्राला सत्तर बाणांनीं सत्वर विदीर्ण करता झाला. तेव्हां ते शलभाकार बाण सर्वशः त्याच्यावर येऊन पडले २९,३०. डोकें, कुशी, पाठ व पुढचा भाग या सर्व प्रदेशीं ते जाऊन शिरले. तेव्हां तो राजा केवल धैर्याचा आश्रय करून तृषार्त शरवानाप्रमाणें स्थिर राहिला ३१. जसा एकादा मानी दरिद्री कोणाच्या दारापुढें न जातां क्लेश भोगीत राहतो त्याप्रमाणें पौंड्रक उभा राहिला. नंतर तो बलवान् व प्रतापवान् वासुदेव अतिशय क्रुद्ध झाला ३२. त्यानें अर्धचंद्र बाण घेऊन युद्धांत सात्यकीला वेध केला. तरी पुढेंच चालून येत असलेल्या त्याला क्रोधानें स्फुरणच पावत असल्याप्रमाणें आणखी सात बाणांनीं वेध करून तो पुनः धनुष्यास बाण जोडूं लागला ३३. पण त्याच्या बाणांनीं विद्ध झालेल्या सात्यकीनें पांच वेगवान् बाणांनीं पौंड्राचें धनुष्य तोंडलें व मोठा सिंहनाद केला ३४. त्या बरोबर वासुदेव राजा गदा घेऊन व ती गरगर फिरवून, हे प्रभो, सात्यकीच्या अगदीं

विव्याध सात्यकिर्युधि पौण्ड्रकम् ३६ तमन्तरे गृहीत्वाशु वासुदेवः प्रतापवान् । शक्तिभिर्दशभिश्चैव सात्यकिं निजघान ह ३७ ताभिर्विद्धो रणे वीरः सात्यकिः सत्यसंगरः । अपास्य धनुरन्यत्तद्धनुरादाय सत्वरम् । आजघान तदा वीरो वृष्णीनामग्रणीर्नृप ३८ [ ४३६० ]
इति श्रीम० खि० हरि० भवि० कैलासयात्रायां पौण्ड्रकवधे षण्णवतितमोऽध्यायः ॥ ९६ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः क्रुद्धो गदापाणिः सात्यकिर्वृष्णिनन्दनः । वासुदेवं जघानाशु गदया तीक्ष्णया नृप १ सात्यकिं वासुदेवस्तु गदयाभ्यहनद्बली । तावुद्यतगदौ वीरौ शुशुभाते सुदारुणौ २ दृप्तौ वने यथा सिंहौ परस्परवधैषिणौ । ततः स सात्यकिः क्रुद्धः सव्यं मण्डलमागमत् ३ दक्षिणं वासुदेवस्तु तं जघानस्तनान्तरे । युयुधानोऽथ वीरस्तु बाह्वोर्मध्यमताडयत् ४ दृढं स ताडितो वीरो जानुभ्यामपतद्भुवि । तत उत्थाय वीरस्तु ललाटेऽभ्यहनद्गदाम् ५ विषण्णः किंचिदास्थाय तत उत्थाय सत्वरम् । गदयाभ्यहनद्वीरः सात्यकिः पौण्ड्रसत्तमम् ६ वासुदेवो बलिर्वीरः साक्षान्मृत्युरिवापरः । जघान गदया वृष्णिं निर्दहन्निव चक्षुषा ७ स तया ताडितो वृष्णिर्गदयाबाहुमुक्तया । आलंब्य भूमिं सहसा मृत्योरंकगतो यथा ८ संज्ञां पुनः समालंब्य पाणिभ्यां दृढमेव च । गदां तस्य महाराज गृहीत्वा प्रग्रहेण ह ९ द्विधा कृत्वा महागुर्वीं गदां कालायसीं शुभाम् । उत्सृज्य सहसा वीरः सिंह—

---

जवळ जाऊन त्याच्या वक्षःस्थलावर मारता झाला; पण यदुनंदनानें डाव्या हातानें तिला त्याच्या हातांतून ओढून घेऊन व बाण उचलून त्याच्या योगानें पौंड्रकाला युद्धांत वेध केला ३५. तेव्हां प्रतापवान् वासुदेव राजानेंही मध्येंच त्या बाणाला धरून दहा शक्ति सात्यकीवर टाकल्या ३६,३७. त्या शक्तींच्या योगानें रणांत विद्ध झालेला वीर सत्यप्रतिज्ञ सात्यकि पूर्वीचें निरुपयोगी झालेलें धनुष्य टाकून व दुसरें घेऊन हे राजा, त्या वृष्णींच्या वीर अग्रणीनें सत्वर त्या शत्रूवर शरप्रहार केला ३८. इति श्रीमहा० खिल० हरि० भविष्य० कैलास पौंड्रकवधासंबंधीं शाण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९६. ॥

वैशंपायनः— हे राजा जनमेजया, त्यानंतर अतिशय क्रुद्ध झालेला गदापाणि वृष्णिनंदन सात्यकि आपल्या तीक्ष्ण गदेनें सत्वर वासुदेवास मारूं लागला १. बलवान् वासुदेवानेंही सात्यकीस गदेचे प्रहार केले. ज्यांनीं आपल्या गदा वर उचलल्या आहेत असे ते दोघे अतिभयंकर वीर वनांतील एकमेकांच्या वधाची इच्छा करणाऱ्या मत्त सिंहांप्रमाणें शोभले. त्यानंतर क्रुद्ध झालेला सात्यकि सव्य मंडलास आला व वासुदेव उजव्या पवित्र्यावर उभा राहिला. त्यानें त्याला स्तनांच्या मध्यभागीं गदेचा प्रहार केला. तेव्हां वीर सात्यकीनेंही पौंड्राला दोन्ही बाहूंच्या मध्यें ताडण केलें २—४. तेव्हां मोठ्या जोराचा आघात झाल्यामुळें तो वीर राजा गुडघ्यावर पडला. पण तो लागलाच भूमीवरून उठून सात्यकीच्या ललाटावर घोर गदाप्रहार करता झाला ५. त्यामुळें शिनिनंदन कांहींवेळ खिन्न होऊन राहिला. पण नंतर लागलीच तेथून सत्वर उठून ( धैर्य धरून ) त्यानें पौंड्रास गदेनें उलट प्रहार केला ६. पण तो चुकवून साक्षात् दुसऱ्या मृत्यूप्रमाणेंच बलि वीर वासुदेवानें नेत्रानें जणुंकाय जाळीतच वृष्णीवर गदा मारली ७. तेव्हां दोन्ही हातांनीं फेंकलेल्या तिचा भयंकर प्रहार झाला असतां मृत्यूच्या समीप गेल्याप्रमाणेंच सात्यकि साहसा भूमीचा आश्रय करून राहिला ८. कांहीं वेळानें तो पुनः सावध झाला. त्यानें जवळच पडलेली वासुदेवाची पोलादी शुभ व अति जड गदा दोन्ही हातांनीं घट्ट धरली.

नादं व्यनीनदत् १० तत उत्सृज्य राजा तु वासुदेवो महाबलः । सव्येन सात्यकिं गृह्य दक्षिणेन करेण ह ११ मुष्टिं कृत्वा महाघोरां वासुदेवः प्रतापवान् । ताडयामास मध्येतुस्तनयोः सात्यकेर्नृप १२ शैनेयो वृष्णिवीरस्तु गदामुत्सृज्य सत्वरम् । तलेनाभ्यहनद्वीरो वासुदेवं रणाजिरे १३ तलेन वासुदेवोऽपि सात्यकिं सत्यसंगरम् । तयोरेवं महाघोरं तलयुद्धं प्रवर्तत १४ जानुभ्यांमुष्टिभिश्चैवबाहुभ्यांशिरसातदा । उरसोरः समाहत्य जानुभ्यां जानुनी तथा १५ कराभ्यां करमाहत्य तौ युद्धं संप्रचक्रतुः । तालयोस्तत्र राजेन्द्र वृक्षयोः संनिकर्षयोः १६ वने यथाग्निरुत्पन्नस्तथैवाभून्महास्वनः । तावाजौ प्रथितौ वीरावुभौ पौण्ड्रकसात्यकी १७ निशि स्तिमितमूकायां शस्त्रं त्यक्त्वा महाबलौ । युयुधाते महारंगे मल्लौ द्वाविव विश्रुतौ १८ उभे सेने महाराज्ञोः संशयं जग्मतुस्तदा । किंनु स्यात्सात्यकिर्वीरो हतस्तेन भविष्यति १९ आहोस्विद्वासुदेवस्तु हतस्तेन महात्मना । अथ वै तौ महावीरौ परस्परवधैषिणौ २० युध्यमानौ महावीरौ नरौ स्वर्गं गमिष्यतः । अन्यथा नोपरम्येतां युद्धाद्वीरौ सुनिश्चितौ २१ अहो वीर्यमहो धैर्यमेतयोर्बलशालिनोः । एतौ महाबलौ लोके एतौ प्रकृतिसत्तमौ २२ नैव युद्धं महाघोरमासीद्देवासुरेष्वपि । न श्रुतो न च वा दृष्टः संग्रामोऽयं कदाचन २३ एते वै सैनिका ब्रूयुः सेनयोरुभयोरपि । रात्रौ निशीथे मेघौघे दृष्ट्वा युद्धं सुदारुणम् २४ अथ तौ बाहुभिर्वीरौ संनिपेततुरंजसा । दशभिर्मुष्टिभिर्जघ्न

---

आणि हे राजा, त्या वीरानें तिचे दोन तुकडे करून अकस्मात् भूमीवर टाकले आणि मोठा सिंहनाद केला ९,१०. तेव्हां गदेचा नाद सोडून महाबल राजा वासुदेवानें डाव्या हातानें सात्यकीला धरलें. आणि उजव्या हाताची अति घोर मुष्टि वळून तिचा प्रहार त्या प्रतापवान् वासुदेवानें सात्यकीच्या वक्षःस्थलावर केला ११,१२. त्याबरोबर वृष्णिवीर शैनेयानेंही सत्वर गदा टाकून त्या वासुदेवास रणांगणांत तळहातानें प्रहार केला १३. वासुदेवही उलट त्या सत्यप्रतिज्ञ सात्यकीस तलप्रहार करूं लागला. याप्रमाणें त्यांचें महाघोर तलयुद्ध दोन्ही गुडघ्यांनीं, मुष्टींनीं, दोन्ही बाहूंनीं व मस्तकानें प्रवृत्त झालें. उरावर उरःस्थल मारून, तसेच गुडघ्यांवर गुडघे मारून १४,१५, व हातांनीं हातावर प्रहार करून ते दोघे युद्ध करते झाले. हे राजेंद्रा, वनांत जवळ जवळ असलेले दोन तालवृक्ष एकमेकांवर घांसून जसा अग्नि उद्भवतो त्याप्रमाणें त्यांचा महाध्वनि उठला. पौंड्रक व सात्यकि या नांवाचे ते दोघेही वीर युद्धांत प्रख्यात होते १६,१७. स्तिमित व मूक ( निःशब्द ) रात्रीं शस्त्रत्याग करून ते दोघे महाबल आखाड्यांतील दोघां प्रसिद्ध मल्लांप्रमाणें युद्ध करूं लागले १८. त्यावेळीं त्या दोन्ही राजांच्या सेना मोठ्या संशयांत पडल्या. हा सात्यकि वीर त्याच्याकडून मारला तर जाणार नाहीं. कीं तो महात्मा या वासुदेवाला मारणार ? ( कांहीं कळत नाहीं. ) ते दोघेही वीर आज परस्परांच्या वधाची इच्छा करीत आहेत. यास्तव कदाचित् युद्ध करणारे ते दोघेही महावीर एकमेकांच्या हातून मरून स्वर्गास जातील. कारण अतिशय निश्चित असलेले ते दोघे त्यावाचून युद्धापासून परतणार नाहींत १९-२१. या बलशाली पुरुषांचें केवढें हो हें वीर्य ! यांच्या धैर्याची प्रशंसा किती करावी ? या लोकीं हेच खरे महाबलवान् आहेत. हेच स्वभावतः श्रेष्ठ होत २२. असें महाघोर युद्ध पूर्वीं देवासुरांमध्येंही झालें नाहीं. असला संग्राम आह्मी पूर्वीं कधीं पाहिला अथवा ऐकलाही नाहीं २३. मध्यरात्रीं मेघौघ पसरला असतां

सात्यकिः पौण्ड्रकं तदा २५ पंचभिः सात्यकिं पौण्ड्रः समाजघ्ने महाबलः । तयोश्चटचटाशब्दो ब्रह्माण्डक्षोभणो महान् । प्रादुरासीत्तु सर्वत्र सर्वान्विस्मापयन्निव २६ [ ४३८६ ] इति श्रीम० खिले हरि० भवि० पौण्ड्रकवधे सप्तनवतितमोऽध्यायः ॥ ९७ ॥

वैशंपायन उवाच ॥ एतस्मिन्नन्तरे क्रुद्ध एकलव्यो निषादपः । बलभद्रमभिक्षिप्रं धनुरादाय सत्वरम् १ नाराचैर्दशभिर्विध्वा बाणैश्च दशभिः परैः । चिच्छेद धनुरर्धं तत्सर्वक्षत्रस्य पश्यतः २ सूतं दशभिराहत्य रथं त्रिंशद्भिरेव च । ध्वजं चिच्छेद भल्लेन निषादस्य जगत्पतिः ३ ततः परं महच्चापं निषादो वीर्यसंमतः । दृढमौर्व्या समायुक्तं दशतालप्रमाणतः ४ कामपालं शरेणाशु जघान जनमध्यतः । बलदेवो महावीर्यः सर्पः शेष इव श्वसन् ५ दशभिस्तद्धनुर्दिव्यं शरैः सर्पसमैर्बलः । चिच्छेद मुष्टिदेशे तु माधवो माधवाग्रजः ६ एकलव्यो निषादेशः खड्गमादाय सत्वरः । प्राहिणोद्बलमादाय निशितं घोरविग्रहम् ७ तमन्तरे पटुर्वीरो वृष्णिवीरः प्रतापवान् । तिलशः पंचभिर्बाणैश्चकार यदुनन्दनः ८ ततोऽपरं महत्खड्गं सर्वकालायसं शुभम् । प्राहिणोत्सारथेः कायमालोक्याथ निषादजः ९ तं चापि दशभिर्वीरो माधवो यदुनन्दनः । बाह्वोरन्तरयोश्चैव निर्बिभेद महारणे १० ततः शक्तिं समादाय घंटामालाकुलां नृपः । निषादो बलदेवाय प्रेषयित्वा महाबलः ११ सिंहनादं महा

---

तें अतिदारुण युद्ध पाहून दोन्ही सैन्यांतील लोक असें बोलूं लागले २४. तिकडे ते दोघे वीर एकमेकांशीं भिडून वेगानें बाहुयुद्ध करूं लागले. सात्यकीनें पौंड्रकाला दहामुष्टींनीं प्रहार केला २५. महाबल पौंड्रानेंही सात्यकीस पांच ठोंसे लगावले. त्यांचा चट् चट् खट् खट् असा ब्रह्मांडांत क्षोभ उत्पन्न करणारा मोठा ध्वनि सर्वांस जणुं काय विस्मितच करीत प्रादुर्भूत झाला २६. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० पौंड्रकवधाविषयीं सत्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९७. ॥

वैशंपायनः— इतक्यांत तिकडे रागावलेला निषादपति एकलव्य धनुष्य घेऊन सत्वर बलभद्रावर चालून गेला १. पण हलधरानें दहा नाराचांनीं त्याला वेध करून दुसऱ्या दहा बाणांनीं सर्व क्षत्रियांच्यासमक्ष त्याचें धनुष्य मधोमध तोडलें २. सूताला दहा बाणांनीं वेध करून, त्यानें तीस बाण त्याच्या रथावर मारले. त्या जगत्पतीनें भल्लानें निषादाचा ध्वज तोडला ३. त्याबरोबर वीर्यसंमत निषादानें दुसरें मोठें धनुष्य घेतलें. तें दृढ मौर्वीनें युक्त असून दहा टिची लांब होतें ४. एकलव्यानें त्या धनुष्याला बाण जोडून सर्व लोकांसमक्ष कामपालावर सोडला. तेव्हां महावीर्यवान् बलदेव शेष—सर्पाप्रमाणें श्वास सोडीत कांहीं वेळ उभा राहिला ५. नंतर त्या मधुवंशज माधवाग्रज बलरामानें सर्पासारख्या दहा बाणांनीं त्याचें धनुष्य मुष्टिप्रदेशीं तोडलें ६. तेव्हां लागलीच तो वेगवान् निषादेश तीक्ष्ण व घोर आकाराचें खड्ग घेऊन मोठ्या बलानें बलदेवावर फेकता झाला ७. पण पटु व प्रतापवान् वृष्णिवीरानें, त्या यदुनंदन बलरामानें, पांच बाणांच्या योगानें मध्येंच त्याचे तिळाएवढाले तुकडे केले ८. तेव्हां कोळ्याच्या पुत्रानें दुसरें सर्व पोलादी शुभ व मोठें खड्ग घेऊन व बलरामाच्या सारथ्याच्या अंगावर नेम धरून फेंकलें ९. त्यालाही वीर यदुनंदन मधुवंशजानें दहा बाणांनीं तोडलें. नंतर लागलीच त्यानें एकलव्याच्या उभयबाहूंच्या मध्यप्रदेशीं त्या महारणांत वेध केला १०. त्यानंतर महाबलाढ्य निषादराजानें घंटांच्या मालांनीं आकुल झालेली शक्ति घेऊन ती बलदेवावर

घोरमकरोत्स निषादपः । सा शक्तिः सर्वकल्याणी बलदेवमुपागमत् १२ उत्पतन्तीं महाघोरां बलभद्रः प्रतापवान् । आदायाथ निषादेशं सर्वान्विस्मापयन्निव १३ तयैव तं जघानाशु वक्षोदेशे स माधवः । स तया ताडितो वीरः स्वशक्त्याथनिषादपः १४ विह्वलः सर्वगात्रेषु निपपात महीतले । प्राणसंशयमापन्नो निषादो रामताडितः १५ निषादास्तस्य राजेन्द्र शतशोऽथ सहस्रशः । अष्टाशीतिसहस्राणि निषादास्तस्य योधिनः १६ गदिनः खड्गिनश्चैव महेष्वासा महाबलाः । शरैरनेकसाहस्रैः शक्तिभिश्चपरश्वधैः १७ गदाभिः पाट्टिशैः शूलैः परिघैः प्रासतोमरैः । कुन्तैरथ कुठारैश्च यादवानां महौजसाम् १८ शलभा इव राजेंद्र दीप्यमानं हुताशनम् । ते शरं पातयांचक्रु रामं राममिवापरम् १९ केचित्कुठारैराजघ्नुः केचित्कुन्तैः परश्वधैः । गदाभिः केचिदाघ्नन्ति शक्तिभिश्च तथापरे २० निजघ्नुः सहसा रामं स्फुरन्तं पावकं यथा । ततः क्रुद्धो हली साक्षाद्धलमुद्यम्य सत्वरम् २१ सर्वानाकर्षयामास मुशलेन हि पीडयन् । ते हन्यमाना राजेन्द्र निषादाः पर्वताश्रयाः २२ निपेतुर्धरणीपृष्ठे शतशोऽथ सहस्रशः । क्षणेन तन्महाराज हत्वा सर्वान्महाबलान् २३ सिंहवन्ननर्दं स्तत्र तस्थौ रामो महाबलः । ततो रात्रौ महाघोराः पिशाचाः पिशिताशनाः २४ आकृष्य मांसयूथानि भक्षयन्तः समासते । पिबन्तः शोणितं कोष्ठात्संछिद्य च शवं बहु २५ [४४११]
इति श्रीम० खिले० हरि० भवि० एकलव्यसैन्यवधो नामाष्टनवतितमोऽध्यायः ॥ ९८ ॥

---

सोडली. आणि त्या निषादपतीनें महाघोर सिंहनादही केला. ती सर्व कल्याणी शक्ति बलदेवापाशीं आली १२. पण वेगानें पक्ष्याप्रमाणें उडतच येत असलेल्या त्या घोर शक्तीला प्रतापवान् बलरामानें मध्येंच धरिलें आणि सर्व लोकांस विस्मित करीत त्या मधुवंशजानें तिचाच त्या निषादेशाच्या वक्षःस्थलावर प्रहार केला. तेव्हां त्या आपल्याच शक्तीनें सर्व अंगभर ताडित झालेला तो वीर निषादपति १३, १४, विह्वल होऊन सपशेल भूमीवर पडला. रामानें ज्याला ताडण केलें आहे असा तो निषाद प्राणसंशयास प्राप्त झाला १५. तेव्हां हे राजेंद्रा, त्याचे शेकडों व हजारों भिल्ल रामावर धावले. त्या योद्ध्याचें अठ्यायशीं सहस्र भिल्ल होते १६. ते सर्व महाबलवान्, गदावान्, खड्गसंपन्न, व महाधनुर्धर कोळी अनेक सहस्र शर, शक्ति, परशु, गदा, पट्टे, शूल, परिघ, प्रास, तोमर, कुन्त, व कुठारी यांस उचलून महा ओजस्वी यादवांवर चालून आले १७,१८. हे राजेंद्रा, द्दीप्त अग्नीवर पतंग जसे पडतात त्याप्रमाणें ते सर्व साक्षात् जामदग्न्य रामाप्रमाणेंच असलेल्या बलरामावर शरवर्षाव करते झाले १९. दुसऱ्या कित्येकांनीं त्यास कुठारांनीं प्रहार केले. कित्येक कुंत व परशु यांचा त्याच्यावर प्रयोग करूं लागले. कित्येकांनीं गदाप्रहार केले. दुसऱ्या कित्येकांनीं शक्तींनीं त्याला मारण्याचा प्रयत्न केला. स्फुरण पावणाऱ्या अग्नीप्रमाणें त्यांनीं रामावर आघात केले. पण त्यामुळें साक्षात् हलधर रागावला. त्यानें लागलीच आपला हल उचलून २०,२१, सर्वांस आकर्षण करून घेतलें व मुसळानें पीडलें. हे राजेंद्रा, याप्रमाणें हलधराकडून मारले जाणारे ते पर्वतांचा आश्रय करून राहणारे निषाद शतशः व सहस्रशः भूपृष्ठावर पडले. हे महाराजा जनमेजया, एका क्षणांत त्या सर्व महाबलाढ्यांस मारून महाबलवान् राम तेथें सिंहाप्रमाणें गर्जना करीत उभा राहिला. त्यानंतर त्या रात्रीं मांसभक्षक महाघोर पिशाच मांससमूह आकर्षण करून ते भक्षण करीत राहिले. अनेक शवांस तोडून त्यांच्या कोठ्यांतील रक्त ते पिऊं लागले २२-२५. इति

वैशंपायन उवाच ॥ क्रव्यादाः सर्व एवाशु भक्षयन्तस्तदा शवम् । हसन्तो विविधं घोरं नादयन्तो वसुन्धराम् १ राक्षसाश्च पिशाचाश्च पिबन्तः शोणितं बहु । आशिखं भुंजते राजञ्छवस्य पिशिताशनाः २ नृत्यन्ति स्म तदा राजन्नगर्यां रणतोषिताः । काका बलाका गृध्राश्च श्येना गोमायवस्तथा ३ भक्षयन्तः प्रवर्तन्ते राक्षसाश्चैव दारुणाः । एतस्मिन्नन्तरे वीरो निषादो लब्धसंज्ञकः ४ हतान्सर्वान्समालोक्य निषादान्नगचारिणः । गदामादाय कुपितो राममेव जगाम ह ५ जघान गदया राजञ्छत्रदेशे निषादपः । ततो रामो गदी राजान्निषादं बाहुशालिनम् ६ आजघ्ने गदया क्रूरं मदमत्तो हलायुधः । तयोश्च तुमुलं युद्धं गदाभ्यां समवर्तत ७ आकाशे शब्द आसीत्तु तयोर्युद्धे महाभुज । समुद्राणां यथा घोषः सर्वेषां सन्निगच्छताम् ८ कल्पक्षये महाराज शब्दः सुतुमुलोऽभवत् । क्षोभितो नागराजश्च नागाः क्षोभं समाययुः ९ पृथिवी चान्तरिक्षं च सर्वं शब्दमयं बभौ । ततः सपौण्ड्रको राजा सात्यकिं वृष्णिनन्दनम् १० गदयैव जघानाशु सत्वरं रणकोविदः । युयुधानो बली राजन्वासुदेवं जघान ह ११ तयोश्च तुमुलः शब्दः प्रादुरासीन्महारणे । चतुर्णां युध्यतां राजन्परस्परवधैषिणाम् १२ ब्रह्माण्डक्षोभणो राजञ्छब्द आसीत्सुदारुणः । ततो राजा प्रादुरभूत्तस्मिन्संग्राममूर्धनि १३ तारकानिष्प्रभा राजंस्तमस्येवं क्षयं गते । उषसि प्रतिबुद्धायां ततो निःशेषतां ययौ १४ उदितो भगवान्सूर्यश्चन्द्रश्च क्षयमाययौ । तयोर्युद्धं प्रादु-

---

श्रीमहा. खि. हरि. भविष्य. एकलव्यसैन्यवध नामक अठ्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥९८॥

वैशंपायनः—हे राजा, तेव्हां सर्वच क्रव्याद शवांस भक्षण करीत असतांना वसुधेस विविध व घोर नादानें नादित करून हसूं लागले. पुष्कळ रक्तप्राशन करणारे पिशाच व राक्षस शवांचीं अंगें शिखेपर्यंत भक्षण करूं लागले. हे राजन्, मांसभक्षण करणाऱ्या राक्षसादिकांप्रमाणेंच रणानें संतुष्ट झालेले दारुण काक, बलाका, गृध्र, श्येन, गोमायु ( कोल्हे ) इत्यादि सर्व त्या नगरींत जणुं काय थै थै नाचूं लागले व यथेच्छ मांसभक्षण करूं लागले. इतक्यांत त्या वीर निषादाची मूर्च्छा उतरली. तो देहभानावर आला १–४. पर्वतांत संचार करणाऱ्या आपल्या सर्व अनुयायींस मारलें आहे, असें पाहून रागावलेला तो गदा घेऊन रामावरच गेला ५. हे जनमेजया, त्यानें आपल्या गदेनें बळरामाच्या छत्रप्रदेशीं ( मस्तकावर ) प्रहार केला. तेव्हां मदमत्त हलायुध गदी रामानेंही बाहुशाली क्रूर निषादास गदेनें प्रतिप्रहार केला. त्यांचे तुमुल गदायुद्ध प्रवृत्त झालें ६, ७. हे महाभुज राजा, त्या दोघांच्या युद्धामध्यें आकाशांत मोठा शब्द झाला. हे महाराज, कल्पक्षयाचे वेळीं एकत्र होणाऱ्या सर्व समुद्रांचा जसा घोष होतो तसा तो त्यांचा ध्वनि अतिशय तुमुल होता. त्यामुळें नागराज क्षुब्ध झाला. सर्व नाग घाबरले. पृथ्वी व अंतरिक्ष असें सर्व शब्दमय झालें. इतक्यांत तिकडे रणपंडित पौंड्रक राजा वृष्णिनंदन सात्यकीस गदेनें सत्वर मारूं लागला. बलाढ्य सात्यकीनेंही वासुदेवावर प्रतिप्रहार केले. हे राजन्, परस्परांच्या वधाची इच्छा करून लढणाऱ्या त्या चौघांचाही महारणांत तुमुल, अति दारुण व ब्रह्मांडास क्षुब्ध करणारा शब्द झाला. त्यानंतर त्या संग्रामप्रदेशीं अतिशय धूळ उडूं लागली ८–१३. पण हे राजा, इतक्यांत उषःकाल होऊन नक्षत्रें फिक्कीं पडलीं. त्यामुळें अंधकारही क्षीण झाला. उषःकाल होतांच तर तो निःशेष नाहींसा झाला १४. कांहींवेळानें भगवान् सूर्य उदय पावला. चंद्र क्षय पावला. आणि हे राजन्,

रभूच्चतुर्णां बाहुशालिनाम् ॥ देवासुरसमं राजन्नुदिते भास्करे महत् १५ [ ४४२६ ] इति श्रीमहा० खिले० हरि० भवि० पौण्ड्रकयुद्धे नवनवतितमोऽध्यायः ॥ ९९ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः प्रभाते विमले भगवान्देवकीसुतः । गंतुमैच्छज्जगन्नाथः पुरं बदरिकाश्रमात् १ नमस्कृत्य मुनीन्सर्वान्ययौ द्वारवतीं नृप । आरुह्य गरुडं विष्णुर्वेगेन महता प्रभुः २ सुमहान्छुश्रुवे शब्दस्तेषां युद्धं प्रकुर्वताम् । गच्छता देवदेवेन पुरीं द्वारवतीं नृप ३ अचिन्तयज्जगन्नाथः कोन्वयं शब्द उत्थितः । संग्रामसंभवो घोर आर्यशैनेयसंयुतः ४ व्यक्तमागतवान्पौण्ड्रो नगरीं द्वारकामनु । तेन युद्धं समभवत्पौण्ड्रकेन दुरात्मना ५ यदूनां वृष्णिवीराणां युद्धतामितरेतरम् । शब्दोऽयं सुमहान्व्यक्तो नात्र कार्या विचारणा ६ इत्येवं चिन्तयित्वा तु दध्मौ शंखं महारवम् । पाञ्चजन्यं हरिः साक्षात्प्रीणयन्वृष्णिपुंगवान् ७ रोदसी पूरयामास तेन शब्देन केशवः । यादवा वृष्णयश्चैव श्रुत्वा शंखस्य ते रवम् ८ व्यक्तमायाति भगवान्पांचजन्यरवो ह्ययम् । इति ते मेनिरे राजन्वृष्णयो यादवास्तथा ९ निर्भयाः समपद्यन्त वृष्णयो यादवाश्च ते । तस्मिन्नेव क्षणे दृष्टस्तार्क्ष्यश्च पततां वरः १० ततश्च देवकीसूनुर्दृष्टस्तैर्यादवेश्वरः । सूताश्च मागधाश्चैव पुरो यान्ति जगत्पतेः ११ स्तुत्या स्तुतं हरिं विष्णुमीश्वरं कमलेक्षणम् । गताश्च यादवाः सर्वे परिवव्रुर्जनार्दनम् १२ कृष्णस्तु गरुडं भूयो गच्छ त्वं नाकमुत्तमम् । इत्युक्त्वा गरुडं विष्णुर्विसृज्य यदुनन्दनः १३ दारुकं

---

तो भास्कर उदय पावला असतां त्या चारी बाहुशाली पुरुषांचें, देव व दैत्य यांच्यासारखें, फार मोठें युद्ध सुरू झालें १५. इति श्रीमहा. खि. हरि० भवि० पौंड्रकयुद्धांतील नव्याण्णववा अध्याय समाप्त झाला ॥ ९९ ॥

वैशंपायनः—त्यानंतर चांगलें स्वस्थ उजाडलें असतां भगवान् देवकीनंदन जगन्नाथ बदरिकाश्रमाहून निघून आपल्या पुरास जाण्याची इच्छा करता झाला १. हे राजा, सर्व मुनींस नमस्कार करून व गरुडावर आरूढ होऊन प्रभु विष्णु मोठ्या वेगानें द्वारवतीस आला २. हे राजा, आपल्या द्वारवतीपुरीस जात असलेल्या त्या देवदेवानें त्या नगरीपाशीं युद्ध करणाऱ्या त्यांचा फार मोठा शब्द ऐकला ३. तेव्हां जगन्नाथ मनांत म्हणाला, ' हा शब्द कोठून व कशाचा बरें ऐकूं येत आहे ? आमचे दादा व शैनेय यांचाही संग्रामप्रसंगीं होणारा घोर शब्द माझ्या कानीं पडत आहे ४. यास्तव खचित पौंड्रराजा द्वारकेवर चाल करून आला असावा व त्यामुळें त्या दुरात्म्या पौंड्रकाशीं त्यांचें युद्ध होत असावें ५. शत्रूंशीं भिडून लढणाऱ्या वृष्णिवीर यदूंचा हा अति मोठा शब्द आहे, यांत कांहीं संशय नाहीं. असा विचार करून साक्षात् हरीनें वृष्णिवीरांस आनंदित करण्यासाठीं ज्याचा ध्वनि फार मोठा आहे, असा पांचजन्य वाजविला ६,७. केशवानें त्या शब्दानें द्यावापृथ्वीस भरून सोडलें. तेव्हां राजन्, तो शंखाचा ध्वनि ऐकून यादव व व वृष्णि ' खचित भगवान् येत आहे. कारण हा पांचजन्याचा ध्वनि आहे. ' असें, म्हणूं लागले. भगवान् येत आहे, असें कळतांच यादव व वृष्णि निर्भय झाले. इतक्यांत पक्ष्यांतील श्रेष्ठ गरुड त्यांच्या दृष्टीं पडला. कांहींवेळानें त्याच्यावर बसलेला देवकीसूनु यादवेश्वरही त्यांच्या दृष्टिगोचर झाला. त्याबरोबर सूत व मागध त्या जगत्पतीच्या पुढें गेले ८-११. त्यांनीं त्या कमलनयन ईश्वर, विष्णु, हरीची स्तोत्रांनीं पुष्कळ स्तुति केली. सर्व यादव त्याच्यापाशीं गेले व त्यांनीं भूमीवर उतरलेल्या जनार्दनाला परिवेष्टित केलें १२.

पुनराहेदं रथमानय मे प्रभो । स तथेति प्रतिज्ञाय रथमादाय सत्वरम् १४ रथोऽयं भगवन्देव किमतः कृत्यमस्ति मे । इत्युक्त्वा रथमादाय प्रणम्याग्रे स्थितो हरेः १५ गतेऽथ गरुडे विष्णू रथमारुह्य सत्वरम् । यत्र युद्धं समभवत्तत्र याति स्म केशवः १६ तत्र गत्वा महाराज युध्यतां च महात्मनाम् । पांचजन्यं महाशंखं दध्मौ यदुवृषोत्तमः १७ पौण्ड्रोऽथ वासुदेवस्तु कृष्णं दृष्ट्वा रणोत्सुकम् । सात्यकिं पृष्ठतः कृत्वा वासुदेवमुपागमत् १८ क्रुद्धोऽथ सात्यकी राजन्वारयामास पौण्ड्रकम् । न गन्तव्यमितो राजन्नैष धर्मः सनातनः १९ जित्वा मां गच्छ राजेन्द्र परं योद्धुं महारणे । क्षत्रियोऽसि महावीर स्थिते मयि रणोत्सुके २० एष ते गर्वमखिलं नाशयिष्यामि संयुगे । इत्युक्त्वा चाग्रतस्तस्थौ गच्छतो यादवेश्वरः २१ पौण्ड्रस्य शिनिनप्ता तु पश्यतः केशवस्य ह । अवज्ञाय शिनेः पौत्रं कृष्णमेव जगाम ह २२ निर्भर्त्स्य सहसा भूयः सात्यकिः क्रोधमूर्च्छितः । गदया प्राहरत्पौण्ड्रं वासुदेवस्य पश्यतः २३ यथाप्राणं यथायोगं सात्यकिः सत्यविक्रमः । दृष्ट्वाथ भगवानेवं सात्यकिं प्रशशंस ह २४ निवार्य सात्यकिं कृष्णो यथेष्टं क्रियतामसौ । उपारमद्यथायोगं सात्यकिः कृष्णवारितः २५ स ततः पौण्ड्रको राजा वासुदेवमुवाच ह । भो भो यादव गोपाल इदानीं क्व गतो भवान् २६ त्वां द्रष्टुमथ संप्राप्तो वासुदेवोऽस्मि सांप्रतम् । हत्वा त्वां सबलं कृष्ण बलैर्बहु-

---

नंतर गरुडास 'तूं उत्तम स्वर्गास जा.' असें वारंवार आग्रहानें सांगून व त्याचें विसर्जन करून यदुनंदन कृष्ण विष्णु १३ पुनः दारुकाला 'हे प्रभो, माझा रथ आण.' असें ह्मणाला. त्याबरोबर बरें आहे, असें बोलून तो सारथि सत्वर रथ घेऊन आला १४. आणि ह्मणाला, 'हे देवा, हा रथ आणला आहे. आतां मला आणखी कोणतें काम आहे?' असें बोलून व प्रणाम करून दारुक रथ घेऊन हरीच्या पुढें उभा राहिला १५. नंतर गरुड गेला असतां विष्णु सत्वर रथावर आरूढ होऊन जेथें मोठें युद्ध चाललें होतें तेथें गेला. आणि हे महाराज जनमेजया, युद्ध करणाऱ्या महात्म्यांना आपलें आगमन कळावें ह्मणून यदूत्तमानें पांचजन्य महाशंख वाजविला १६,१७. तेव्हां पौंड्र वासुदेव रणोत्सुक कृष्णाला पाहून, सात्यकीला मागें सोडून पुढें कृष्णापाशीं येऊं लागला १८. पण हे राजन्, क्रुद्ध झालेल्या सात्यकीनें त्या पौंड्रकाला अडविलें. तो ह्मणाला, "राजन्, येथून जाऊं नकोस. हा सनातन धर्म नव्हे १९. हे राजेंद्रा, मला जिंकून मग या महा रणांत दुसऱ्याशीं लढावयास जा. हे महावीरा, तूं क्षत्रिय आहेस. मग मी रणाविषयीं उत्सुक असतांना मला सोडून कसा जातोस? २०. हा पहा मी तुझा सर्व गर्व या संग्रामांत नाहींसा करतों." असें बोलून तो यादवेश्वर शैनेय कृष्णाकडे जाणाऱ्या वासुदेवाच्या पुढें कृष्णाच्या समक्ष उभा राहिला. पण तो राजा शिनीच्या त्या पौत्राची अवज्ञा करून कृष्णाकडेच गेला २१,२२. तेव्हां क्रोधानें मूर्च्छित झालेल्या (सर्व भानरहित झालेल्या) सात्यकीनें पुनः पुष्कळ निर्भर्त्सना करून, वासुदेव पाहत असतांना, अकस्मात् पौंड्राला गदेनें मारलें. सत्यपराक्रमी सात्यकीनें आपली सर्व शक्ति खर्चून यथायोग्यरीतीनें त्याला गदा मारली आहे, असें पाहून भगवानानें त्याची पुष्कळ प्रशंसा केली २३,२४. आणि त्याचें निवारण करून 'याच्या इच्छेप्रमाणें त्याला करूं दे' असें सात्यकीस ह्मटलें. तेव्हां कृष्णानें ज्याचें निवारण केलें आहे, असा सात्यकि मुकाट्यानें बसला २५. नंतर पौंड्रक राजा वासुदेवास ह्मणाला, "अरेरे यादवा, गोपाळा, एवढा वेळ तूं कोठें गेला होतास? २६. तुला पहावयास मी आलों

भिरन्वितः २७ अहमेको भविष्यामि वासुदेवो महीतले । यच्चक्रं तव गोविन्द प्रथितं सुप्रभं महत् २८ अनेन तव चक्रेण पीडितोऽस्मि च तद्रणे । चक्रमस्तीति तद्वीर्यं तव माधव सांप्रतम् २९ नाशयिष्यामि तत्सर्वं सर्वक्षत्रस्य पश्यतः । शार्ङ्गीति मां विजानीहि न त्वं शार्ङ्गीति शिष्यसे ३० शंखमस्तीति तद्वीर्यं तव माधव सांप्रतम् । नाशयित्वाहवे चाहं गदी चाहं जनार्दन ३१ मामेव हि सदा ब्रूयुर्जानन्तो वीर्यशालिनः । आदौ त्वं बलवद्वृद्धान्हत्वा-स्त्रीबालकान्वृषम् ३२ गाश्च हत्वा महागर्वस्तव संप्रति वर्तते । तत्तेऽहं व्यपनेष्यामि यदि तिष्ठसि मत्पुरः ३३ शस्त्रं गृहाण गोविन्द यदि योद्धुं व्यवस्थितः । इत्युक्त्वा बाणमादाय तस्थौ पार्श्वे जगत्पतेः ३४ एतद्वचनमाकर्ण्य वासुदेवेन भाषितम् । स्मितं कृत्वा हरिः कृष्णो बभाषे पौण्ड्रकं नृपम् ३५ कामं वद नृप त्वं हि पातक्यस्मि सदानृप । गोघाती बालघाती च स्त्रीहंता सर्वथा नृप ३६ चक्री भव गदी राजञ्छार्ङ्गी च सततं भव । नामधेयं वृथा मह्यं वासुदेवेति च प्रभो ३७ शार्ङ्गी चक्री गदी शंखीत्येवमादि वृथा मम । किं तु वक्ष्यामि किंचित्तु शृणुष्व यदि मन्यते । क्षत्रिया बलिनो ये तु स्थिते मयि जगत्पतौ ३८ तथानुब्रुवते त्वां हि जीवत्येव मयि प्रभो । यत्ते चक्रं महाघोरमसुरान्तकरं महत् ३९ तत्तुल्यं मम चक्रं तु वृत्ततो न तु वीर्यतः । आयुधेष्वथ सर्वत्र शब्दसादृश्यमस्ति ते ४० गोपोऽहं सर्वदा

---

आहे. मी वासुदेव आहें. हे कृष्णा, पुष्कळ सैन्यानें युक्त असलेला हा मी आतां तुला सैन्यासह मारून या भूलोकीं एकटाच वासुदेव राहीन. हे गोविंदा, तुझें जें प्रख्यात, अतिप्रभासंपन्न व मोठें चक्र आहे त्याच्या योगानें रणामध्यें मी पीडित झालों होतों. पण हे माधवा, माझें चक्र आहे, या विश्वासावर तुझें जें वीर्य आहे, तें सर्व मी आतां या सर्व क्षत्रियांच्या समक्ष नाहींसें करून सोडीन. मी शार्ङ्गी आहें असें समज. तूंच शार्ङ्गी आहेस, हें ह्मणणें मुळींच योग्य नाहीं २७–३०. मजजवळ शंख आहे, असा जो तुझा गर्व आहे तोही हे माधवा, मी आतां संग्रामांत घालवून हे जनार्दना, गदावान् मीच एकटा राहीन ३१. आजपासून ज्ञानी वीर्यशाली मलाच सदा गदी ह्मणतील. मागें बलाढ्य वृद्ध व स्त्री, बालक व वृषभासुर यांस मारून तुला मोठा गर्व झाला आहे; पण मजपुढें जर आतां उभा राहशील तर मी तुझा गर्व घालवीन. गोविंदा, युद्ध करण्याचा जर तुझा निश्चय झालेला असला तर हातांत शस्त्र घे. " असें बोलून व हातांत बाण घेऊन तो जगत्पतीच्या बाजूस उभा राहिला ३२–३४. वासुदेवानें बोललेलें हें वचन ऐकून व थोडेंसें स्मित करून कृष्ण हरि पौंड्रक राजास ह्मणाला, ३५. "राजा, मी सर्वथा पातकी, गोघाती, बालघाती, स्त्रीहंता, इत्यादि आहें, असें तूं खुशाल ह्मण ३६. हे राजन्, तूं सतत चक्री हो, गदी हो कीं, शार्ङ्गी हो. हे प्रभो, वासुदेव असें माझें नांव वृथा आहे, असेंही तूं खुशाल ह्मण ३७. माझी शार्ङ्गी, चक्री ,गदी, शंखी,—इत्यादि नांवें व्यर्थ आहेत, असेंही तुला वाटत असलें तर वाटूं दे. पण मी तुला थोडेंसें सांगून ठेवतों तेवढें ऐकावयाचें असल्यास ऐक. मी जगत्पति स्थित असतांना जे बलाढ्य क्षत्रिय आहेत ते तुला वासुदेव असें थट्टेनें ह्मणत असतात. कारण हे प्रभो, मी जिवंत असतांना तुला तसें ह्मणतात यावरूनच तें सिद्ध आहे. तुझें जें असुरनाशक महा घोर चक्र आहे ह्मणून तूं ह्मणतोस तें माझ्या चक्रासारखें वर्तुलाकार आहे एवढेंच. वीर्यानें तें याच्यासारखें मुळींच नाहीं. तुझ्या सर्व आयुधांस माझ्या आयुधांचीं नांवें आहेत २८—४०. हे राजन्, मी प्राण्यांस सदा

राजन्प्राणिनां प्राणदः सदा । गोप्ता सर्वेषु लोकेषु शास्ता दुष्टस्य सर्वदा ४१ कत्थनं सर्वदाकार्यं जित्वा शत्रून्नृपाधम । अजित्वा किं भवान्ब्रूते स्थिते मयि च शस्त्रिणि ४२ हत्वा मां ब्रूहि राजेन्द्र यदि शक्तोऽसि पौण्ड्रक । स्थितोऽहं चक्रमाश्रित्य रथी चापी गदासिमान् ४३ रथमारुह्य युद्धाय सन्नद्धो भव मानद । इत्युक्त्वा भगवान्विष्णुः सिंहनादं व्यनीनदत् ४४ [ ४४७० ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० कृ० कृष्णपौण्ड्रकयुद्धं नाम शततमो०॥१००॥

वैशंपायन उवाच ॥ ततः शरं समादाय वासुदेवः प्रतापवान् । पौण्ड्रं जघान सहसा निशितेन शरेण ह १ पौण्ड्रोऽथ वासुदेवस्तु शरैर्दशभिराशुगैः । वासुदेवं जघानाशु वार्ष्णेयं वृष्णिनन्दनम् २ दारुकं पंचविंशत्या हयान्दशभिरेव च । सप्तत्या वासुदेवं तु यादवं वासुदेवकः ३ ततः प्रहस्य सुचिरं केशवः केशिसूदनः । हृष्टोऽसाविति मनसा संपूज्य यदुनन्दनः ४ आकृष्य शार्ङ्गं बलवान्संधाय रिपुसूदनः । नाराचेन सुतीक्ष्णेन ध्वजं चिच्छेद केशवः ५ सारथेश्च शिरः कायाद्व्याहृत्य यदुनन्दनः । अश्वांश्च चतुरो हत्वा चतुर्भिः सायकोत्तमैः ६ रथं शरैः समाहत्य तदोभौ पार्ष्णिसारथी । चक्रं च तिलशः कृत्वा हसन्किंचिदिवस्थितः ७ पौण्ड्रको वासुदेवस्तु रथादुत्प्लुत्य सत्वरः । आदाय निशितं खड्गं प्राहिणोत्केशवाय सः ८ स खड्गं शतधा कृत्वा तूष्णीमासीच्च केशवः । ततः परं महाघोरं परिघं कालसंमितम् ९ गृहीत्वा वासुदेवाय वासुदेवः प्रतापवान् । प्राहिणोद्वृष्णिवीराय सर्वक्षत्रस्य पश्यतः १०

---

प्राण देणारा गोप आहें. मी सर्व लोकांमध्यें गोप्ता ( रक्षक ) व दुष्टांचा सदा शास्ता आहें ४१. पण हे अधम राजा, शत्रूंस जिंकून नंतर आत्मश्लाघा करावी हें चांगलें. पण मी हातांत शस्त्र धारण करून उभा असतांना मला न जिंकता व्यर्थ बडबड कशाला करतोस ? ४२. हे पौंड्रका, जर समर्थ असशील तर मला मारून नंतर तुला काय बोलावयाचें असेल तें बोल. मी चक्राचा, गदेचा, रथाचा, चापाचा व खड्गाचा आश्रय करून स्थित आहें. हे मान देणाऱ्या, रथावर चढून युद्धास सज्ज हो. " इतकें बोलून भगवान् विष्णूनें सिंहनाद केला ४३,४४. इति श्रीम० खि० हरि० भवि० कृष्णपौंड्रकयुद्धनामक शंभरावा अध्याय समाप्त झाला ॥ १००. ॥

वैशंपायनः — त्यानंतर प्रतापवान् वासुदेव शर घेऊन, त्या तीक्ष्ण बाणानें अकस्मात् पौंड्राला वेध करितां झाला १. तेव्हां पौंड्र वासुदेवानेंही वृष्णिनंदन वार्ष्णेय वासुदेवाला सत्वर दहा बाणांनीं वेध केला २. दारुकाला पंचवीस बाण व घोड्यांना दहा बाण मारले. त्यानें यादव वासुदेवाला सत्तर बाण पुनः मारले ३. तेव्हां केशिनिषूदन यदुनंदन केशव बराच वेळ हंसून व या मूर्खाला आतां बराच आनंद झाला आहे, असें पाहून मनानें त्याचा गौरव करता झाला ३,४. नंतर शार्ङ्ग धनुष्य आकर्ण ओढून त्या बलवान् शत्रुनाशक केशवानें अतितीक्ष्ण नाराच बाणानें त्याचा ध्वज तोडला ५. सारथ्याचें शिर तोडून धडापासून वेगळें करून पाडलें. चार उत्तम बाणांनीं चार घोड्यांस मारलें. रथाचा चूर उडविला. पार्ष्णि-सारथि या दोघां रक्षकांस मारलें व त्याच्या चक्राचे तिळा एवढाले तुकडे करून तो देव हंसत उभा राहिला ६,७. तेव्हां पौंड्रक वासुदेव सत्वर रथांतून उडी टाकून व तीक्ष्ण खड्ग घेऊन तें वासुदेवावर फेकता झाला ८. पण त्याचे शतशः तुकडे करून केशव गप्प बसला. तेव्हां पौंड्रक वासुदेवानें काळासारखा महाघोर परिघ घेऊन सर्व क्षत्रियांसमक्ष वृष्णिवीर वासुदेवावर फेकला ९,१०. पण जगन्नाथ यदुनंदनानें त्याचे दोन

तद्विधा जगतां नाथश्चकार यदुनन्दनः । ततश्चक्रं महाघोरं सहस्रारं महाप्रभम् ११
त्रिंशद्भारसमायुक्तमायसास्यममित्रहा । आदायाथ महाराज केशवं वाक्यमब्रवीत् १२
पश्येदं निशितं घोरं तव चक्रविनाशनम् । अनेन तव गोविन्द दर्पं दर्पवतां वर १३ अपने-
ष्यामि वार्ष्णेय सर्वक्षत्रस्य पश्यतः । त्वामुद्दिश्य महाघोरं कृतमन्यद्दुरासदम् १४ यदि
शक्तो हरे कृष्णदारयेदं महास्पदम् । इत्युक्त्वा तच्छतगुणं भ्रामयित्वा महाबलः १५ चिक्षे-
पाथ महावीर्यः पौण्ड्रको नृपसत्तमः । अवप्लुत्य ततो देशात्समुत्सृज्य महाबलः १६ सिंह-
नादं महाघोरं व्यनदद्वीर्यवांस्तदा । ततो विस्मयमापन्नो भगवान्देवकीसुतः १७ अहो वीर्य-
महो धैर्यमस्य पौण्ड्रस्य दुःसहम् । इति मत्वा जगन्नाथ उत्थितश्च रथोत्तमात् १८ ततः शिलां
समादाय प्रेषयामास केशवम् । तां शिलां प्रेषयामास तस्मै यदुकुलोद्वहः १९ पौण्ड्रेण सुचिरं
कालं विक्रीड्य भगवान् हरिः । ततश्चक्रं समादाय निशितं रक्तभोजनम् २० दैत्यमांसप्रदि-
ग्धाङ्गं नारीगर्भविमोचनम् । शातकुंभमयं घोरं दैत्यदानवनाशनम् २१ सहस्रारं शतारं
तदद्भुतं दैत्यभीषणम् । ऐश्वर्यवर्मपरमं नित्यं सुरगणार्चितम् २२ विष्णुः कृष्णस्तथा शार्ङ्गी
नित्ययुक्तः सदा हरिः । जघान तेन गोविन्दः पौण्ड्रकं नृपसत्तमम् २३ तस्य देहं विदार्याशु
चक्रं विशितभोजनम् । कृष्णस्याथकरं भूयः प्राप सर्वेश्वरस्य ह २४ ततः स पौण्ड्रको राजा
गतासुः प्रापतद्भुवि । निहत्य भगवान्विष्णुर्दुर्विज्ञेयगतिः प्रभुः । प्रतिपेदे सुधर्मां तु यादवैः
पूजितो हरिः २५ [ ४४९५] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि कैलासया-
त्रायां पौण्ड्रकवासुदेववधो नामैकाधिकशततमोऽध्यायः ॥ १०१ ॥

---

तुकडे केले. त्यानंतर महाघोर, सहस्र अरसंपन्न, महाप्रभ, तीसभारयुक्त व ज्याचें तोंड लोखंडी आहे, असें चक्र घेऊन तो शत्रुनाशक राजा केशवास ह्मणाला ११,१२, ‘ हे दर्पवानांतील श्रेष्ठ गोविंदा, हें तुझ्या चक्राचा विनाश करणारें तीक्ष्ण व घोर चक्र पहा. हे वार्ष्णेया, याच्या योगानें मी तुझा दर्प सर्व क्षत्रिय पहात असतांना घालवीन. तुला उद्देशून मीं हें दुसरें असह्य चक्र केलें आहे. हे हरे, हे कृष्णा, तूं जर समर्थ असलास तर या महास्पद चक्राला मोडून टाक. ’ असें बोलून व तें शंभरदा फिरवून, त्या महावीर्यवान् पौंड्रक राजानें आपल्या स्थानावरून उडी मारून कृष्णावर फेंकलें १३-१६. आणि त्या वीर्यवानानें महाघोर सिंहनादही केला. त्यामुळें भगवान् देवकीपुत्र विस्मित झाला १७. तो ह्मणाला, ‘ काय हो हें या पौंड्राचें दुःसह धैर्य व वीर्य ? ’ असें बोलून जगन्नाथ उत्तम रथांतून उठला १८. नंतर पौंड्रानें शिला घेऊन केशवावर टाकली. पण यदुकुलोद्वहानें तीच शिला त्याच्यावर उलट टाकली १९. याप्रमाणें भगवान् हरि पौंड्राशीं फार वेळ क्रीडा करून शेवटीं तीक्ष्ण व रक्ताचें भोजन करणारें चक्र घेता झाला २०. त्याचें अंग दैत्याच्या मांसानें अनेकदां भरलेलें होतें. तें स्त्रियांचें गर्भपात करणारें होतें. तें घोर चक्र सोन्याचें असून दैत्य व दानव यांचा नाश करणारें होतें २१. त्याला प्रसंगोपात शंभर अर, व सहस्र अर होत असून तें अद्भुत चक्र दैत्यांस भयंकर वाटत असे. तें ऐश्वर्याचें परम कवच होतें. सुरगण त्याची नित्य पूजा करीत होते. असो, असें तें घोर चक्र घेऊन विष्णु कृष्ण, तसाच शार्ङ्गी, नित्ययुक्त हरि, गोविंद त्याच्या योगानें पौंड्रक नांवाच्या उत्तम राजास मारता झाला २२,२३. मांस भक्षण करणारें तें चक्र त्याचा देह विदीर्ण करून पुनः सर्वेश्वर कृष्णाच्या हातांत आलें २४. नंतर तो गतप्राण झालेला

वैशंपायन उवाच ॥ निषादेशं ततो रामः शक्त्या वीर्यततां वरः । आजघानस्तनद्वंद्वे सिंहनादं व्यनीनदत् १ ततः क्रुद्धो निषादेशो रामं मत्तं महाबलम् । गदया लोकविख्यातो जघान स्तनवक्षसि २ आहतः स तु तेनाशु बलभद्रो महाबलः । उभाभ्यां चैव रामस्तु कराभ्यां वृष्णिपुंगवः ३ गदां गृह्य महाघोरामाधावीं प्राणहारिणीम् । दुद्रावाथ निषादेशः समुद्रं मकरालयम् ४ धावत्येवं तदा राज्ञि एकलव्ये निषादपे । धावत्येवं च रामोऽपि यत्र यातो निषादपः ५ सागरं स प्रविश्याशु गत्वा योजनपंचकम् । भीत एव तदा राजन्नेकलव्यो निषादपः ६ कंचिद्द्वीपान्तरं राजन्प्रविश्य न्यवसत्तदा । ततो रामो निषादेशं जिगाय यदुनन्दनः ७ तां सभां मणिरत्नाढ्यां प्रविवेश हलायुधः । सात्यकिर्युद्धसंसक्तस्तां सभां प्रविवेश ह ८ अन्ये च यादवा राजन्यथायोगमुपस्थिताः । आसीनेषु च सर्वेषु वृष्णिवीरेषु सर्वतः ९ अभिवाद्य यथायोगं वृष्णीन्सर्वांश्च केशवः । उवाच वचनं काले भगवान्देवकीसुतः १० दृष्टं कैलासशिखरं शंकरो नीललोहितः । स तु मह्यं यदुवराः प्रीतिमांश्च ददौ वरम् ११ तत्र देवाः समायाता मुनयश्च तपोधनाः । दृष्ट्वा मां शंकरश्चैव प्रीतः स्तुत्वा समाययौ १२ अत्यद्भुतं मया दृष्टं रात्रौ यादवसत्तमाः । पिशाचौ द्वौ महाघोरौ वदन्तौ मामिकां कथाम् १३ मृगयां चक्रतुस्तौ तु चिन्तयन्तौ तु मां सदा । दृष्ट्वा मां तौ

---

पौंड्रक राजा भूमीवर पडला. ज्याची गति दुर्ज्ञेय आहे असा भगवान् प्रभु विष्णु सुधर्मेस प्राप्त झाला. यादवांनीं त्या हरीचें पूजन केलें २५. इति श्रीमहा. खि. हरि. भ. पौंड्रकवधनामक एकशें पहिला अध्याय समाप्त झाला ॥ १०१ ॥

वैशंपायनः—इकडे इतकें होत आहे तों तिकडे वीर्यवानांतील श्रेष्ठ रामानें शक्तीनें निषादेशाच्या दोन्ही स्तनांच्या मध्यभागीं प्रहार केला आणि मोठा सिंहनाद केला १. पण तितक्यांत लोकप्रसिद्ध निषादेशानेंही मत्त महाबल रामाला गदेनें वक्षःस्थलावर उलट प्रतिप्रहार केला २. पण ती महाघोर प्राणहारिणी गदा येत असतांना मध्येंच महाबल बलभद्रानें सत्वर तिला दोन्ही हातांनीं धरलें व तो वृष्णिपुंगव तीच उठवून निषादेशाच्या अंगावर धांवून जाऊं लागला. तेव्हां भ्यालेला निषादाधिपति मकरालय समुद्रांत शिरून पळून जाऊं लागला ३,४. याप्रमाणें निषादपति एकलव्य राजा धांवत सुटला असतां रामही त्याच्या मागें लागला. जेथें भिल्लराजा होता तेथेंच समुद्रांत प्रवेश करून तो त्याला मारावयास धांवला. तें पाहून हे राजन्, भ्यालेला एकलव्य पांच योजनें दूर पळून गेला आणि एका लहानशा बेटावर चढून तेथें राहिला. पण रामानें त्याच्या मागोमाग जाऊन त्याचा तेथें पराभव केला ५-७. नंतर तो हलायुध तेथून परतून रत्नें व माणि यांनीं संपन्न असलेल्या सुधर्मा सभेंत गेला. युद्धामध्यें संसक्त असलेला सात्यकिही त्या सभेंत प्रविष्ट झाला ८. हे राजन्, दुसरे यादवही यथायोग्यरीतीनें सभेंत जाऊन बसले. नंतर सर्व वीर सर्वतः बसले असतां यथाक्रम सर्व वृष्णींस अभिवादन करून भगवान् देवकीपुत्र केशव त्या कालाला उचित असें भाषण करूं लागला ९-१०. " हे यदुवीरांनो, मी कैलासशिखर पाहिलें. नीललोहित शंकराचें दर्शन घेतलें. त्या प्रीतिमान देवानें मला वर दिला आहे ११. तेथें देव व तपोधन मुनिही आले. मला पाहून शंकर अतिशय प्रसन्न झाला. व स्तुति करून निघून गेला १२. अहो उत्तम यादवांनो, मीं रात्रीं तेथें एक मोठें अति आश्चर्य पाहिलें. माझ्याविषयीं गोष्टी बोलणारे दोन महा घोर पिशाच मृगया करीत

तु राजेन्द्राः प्रीतिमन्तौ तपस्विनौ १४ भक्तिनम्रौ महात्मानौ प्रणामं चक्रतुस्तदा । ततोऽहं सर्वथा प्रीतस्तौ नीतौ स्वर्गमुत्तमम् १५ तोषयित्वा महादेवं मया चाद्य समागतम् । वैशंपायन उवाच ॥ ततस्ते वृष्णयः सर्वे देवदेवं शशंसिरे १६ सर्वथा कृतकृत्यास्ते वृष्णयः केशवाश्रयाः । यादवाः सर्व एवैते स्वं स्वं जग्मुर्यथालयम् १७ अभ्यन्तरे जगन्नाथःप्रविश्यहरिरीश्वरः । रुक्मिणीसत्यभामाभ्यामा चचक्षे यथाभवत् १८ ते प्रीते प्रीतियुक्तेन केशवेन समन्विते । एतत्ते सर्वमाख्यातं केशवस्य विचेष्टितम् १९ शशास पृथिवीं कृत्स्नां दुष्टान् हत्वा महाबलान् । नरकं घोरकर्माणं पौंड्रकं नृपसत्तमम् २० हयग्रीवं निशुंभं च तथा सुन्दोपसुन्दकौ । ररक्ष विप्रान्देवेशो मुनीन्मुनिवरार्चितः २१ विप्रेभ्यश्च ददौ वित्तं गाश्च दत्वा स केशवः । अग्निहोत्रं प्रयुंजानो ब्राह्मणांश्च सुतर्पयन् २२ मुनींश्चब्रह्मचर्येणदेवान्यज्ञैरनेकधा । स्वधयाचापितृन्सर्वान्प्रीणयन्नेवसर्वदा २३ तस्मिञ्छासति देवेशे राज्यं निष्कंटकं प्रभो । सुखमेवप्रजाः सर्वाजीवंतिब्राह्मणादयः २४ [ ४५१९ ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० कैलासयात्रायां पौण्ड्रकवधसमाप्तौ द्व्यधिकशततमोऽध्यायः ॥ १०२ ॥

जनमेजय उवाच ॥ भूय एव द्विजश्रेष्ठ शंखचक्रगदाभृतः। चरितं श्रोतुमिच्छामि विस्तरेण तपोधन १ न हि मे तृप्तिरस्तीह शृण्वतः कैशवीं कथाम् । को नु नाम हरेर्विष्णोर्देवदेवस्य चक्रिणः २ शृण्वंस्तथारमन्वापि तृप्तिं याति दिवानिशम् । पुरुषार्थोऽयमेवैको यत्क-

---

मजपाशीं आले. ते आनंदानें सदा माझें चिंतन करीत होते. हे राजेंद्रांनो, मला पाहून ते तपस्वी फार प्रसन्न झाले. भक्तीनें नम्र झालेल्या त्या महात्म्यांनीं त्यावेळीं मला प्रणाम केला. त्यानंतर सर्वथा प्रसन्न झालेल्या मीं त्यांना उत्तम स्वर्गास नेलें (पाठविलें). आणि महादेवाला सुप्रसन्न करून मी आज येथें आलों. वैशंपायनः—त्यानंतर सर्व वृष्णि देवदेवांची प्रशंसा करूं लागले. केशवाचा आश्रय करून राहणारे सर्व वृष्णि सर्वप्रकारें कृतकृत्य झाले. नंतर ते सर्व आपापल्या घरास गेले १३—१७. ईश्वर जगन्नाथ हरिही अंतःपुरांत जाऊन रुक्मिणी व सत्यभामा यांना घडलेलें वृत्त सांगता झाला १८. प्रीतियुक्त केशवानें युक्त झालेल्या त्या दोघीही तें ऐकून अतिशय आनंदित झाल्या. हे राजन्, मी हें तुला सर्व केशवाचें विशेष चेष्टित सांगितलें आहे १९. महाबलाढ्य दुष्टांना मारून त्यानें सर्व पृथ्वीचें अनुशासन केलें. घोर कर्मे करणाऱ्या नरकास, उत्तम राजा पौंड्रकास २०, हयग्रीवास, निशुंभास, व त्याचप्रमाणें सुंदोपसुंदास मारून त्या मुनिवराकडून पूजिला जाणाऱ्या देवेशानें मुनि व विप्र यांचें रक्षण केलें २१. तो केशव विप्रांस वित्त देऊन व गाई समर्पण करून अग्निहोत्राचें हवन करीत सर्व ब्राह्मणांस अतिशय तृप्त करता झाला २२. ब्रह्मचर्याच्या योगानें मुनींना, अनेकप्रकारच्या यज्ञांच्या योगानें देवांस व स्वधेच्या योगानें पितरांस सदा संतुष्ट करीत तो देवेश निष्कंटक राज्याचें शासन करूं लागला असतांना हे प्रभो, ब्राह्मणादि सर्व प्रजा सुखानें कालक्षेप करीत राहिल्या २३,२४. इति श्रीम० खि० हरि० भवि० कैलासयात्रेंतील पौंड्रकवधसंबंधीं एकशें दुसरा अध्याय समाप्त झाला ॥ १०२ ॥

जनमेजयः— हे द्विजश्रेष्ठ तपोधना, शंख-चक्र-गदाधराचें चरित्र मी पुनः सविस्तर ऐकण्याची इच्छा करतों १. केशवाची कथा ऐकतांना माझी तृप्ति होत नाहीं. देवाधिदेव चक्री विष्णूची कथा अहोरात्र ऐकत राहिलें तरी कोणाला ती पुरेशी वाटणार

थाश्रवणं हरेः ३ कथमासीज्जगद्धेतोर्हंसस्य डिंभकस्य च । समितिः सर्वभूतानां सदा विस्मयदायिनी ४ विचक्रस्य कथं युद्धं दानवस्य महात्मनः । स तयोर्मित्रतां यात इत्येवमनुशुश्रुमः ५ तौ सुतौ वीर्यसंपन्नौ शिष्यौ भृगुसुतस्य ह । सर्वास्त्रकुशलौ वीरौ हरेर्लब्धवरौ किल ६ संग्रामः स महानासीदित्युक्तं भवता पुरा । तयोश्च नृपयोर्विप्र केशवस्य जगत्पतेः ७ कस्य पुत्रौ समुत्पन्नौ यथाभूद्विग्रहो महान् । अष्टाशीति सहस्राणि दानवानां तरस्विनाम् ८ बलान्यथ विचक्रस्य शितशूलधराणि च । आसन्युद्धे महाराज दानवस्य महात्मनः ९ यदूनामन्तरं प्रेप्सुर्यदूनां युद्धकांक्षया । देवासुरे महायुद्धे देवाञ्जयति दुर्धरः । तद्वधार्थं सदा यत्नमकरोच्चैव केशवः १० [ ४५२९ ] इति श्रीमहा० खिले० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्याने त्र्यधिकशततमोऽध्यायः ॥ १०३ ॥

वैशंपायन उवाच ॥ आसीच्छाल्वेषु राजेन्द्र ब्रह्मदत्तो नृपोत्तमः । नाम्ना राजन्स पूतात्मा सर्वभूतदयापरः १ पंचयज्ञपरो नित्यं जितात्मा विजितेन्द्रियः । ब्रह्मविद्वेदविच्चैव सदा यज्ञमयः शिवः २ तस्य भार्ये महीपाल रूपौदार्यगुणान्विते । बभूवतुः सुसंपन्ने अनपत्ये नृपोत्तम ३ स ताभ्यां मुमुदे राजा शच्या शक्र इवावरे । नाम्ना मित्रसहो नाम सखा चासीद्द्विजोत्तमः ४ तस्य राज्ञो महायोगी वेदवेदांगतत्परः । अनपत्यः स विप्रेन्द्रो यथा राजा बभूव ह ५ स राजा सहितस्ताभ्यामर्चयामास शंकरम् । पुत्रार्थं शूलिनं शर्वं दशवर्षाण्यनन्यधीः ६ स विप्रो वैष्णवं सत्रं पुत्रार्थे समयोजयत् । अर्चितस्तेन राजेन्द्र शंकरो नील-

---

आहे ? हरीच्या कथेचें श्रवण करणें हाच एक पुरुषार्थ आहे २, ३. सर्व भूतांस सदा विस्मय देणारा हंस व डिंभक यांचा संग्राम जगाच्या कल्याणासाठीं कसा झाला ? ४. महात्म्या विचक्र दानवाचें युद्ध कसें झालें. तो त्या दोघांच्या मित्रतेस प्राप्त झाला, असें आह्मी ऐकलें आहे ५. ते दोघेही वीर्यसंपन्न सुत भृगुपुत्राचे शिष्य होते. ते सर्व अस्त्रांमध्यें कुशल, वीर व हरीपासून वर मिळविलेले होत. त्यां दोघां राजांचा व जगत्पति केशवाचा फार मोठा संग्राम झाला असें तूं पूर्वी सांगितलें होतेंस ६,७. पण ते कोणाचे पुत्र व त्यांचा संग्राम कसा झाला. विचक्राच्या सैन्यांत अठ्यायशीं सहस्र अतिवेगवान् दानव होते. त्या सर्वांनीं आपापल्या हातांत तीक्ष्ण शूल धारण केले होते. त्या महात्म्या दानवाचें असलें भयंकर सैन्य यादवांचें छिद्र पाहण्याची इच्छा करीत त्याच्याशीं युद्ध करण्याच्या उद्देशानें समरांगणांत येऊन उभें राहिलें. तो दुर्धर दानव देवासुरांच्या महायुद्धांत देवांना सदा जिंकीत असे. ह्मणून त्याला मारण्यासाठीं केशव सदा यत्न करूं लागला ८--१०. इति श्रीमहा० भा० खिले० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्यानांतील एकशें तिसरा अध्याय समाप्त झाला ॥ १०३. ॥

वैशंपायनः— हे राजेंद्रा, शाल्वदेशांत ब्रह्मदत्त नांवाचा उत्तम राजा होता. तो पवित्रात्मा सर्व भूतदयापरायण होता १. तो नित्य पंचयज्ञपरायण, जितचित्त, जितेंद्रिय, ब्रह्मवेत्ता, वेदवेत्ता, सदा यज्ञमय व शिवस्वरूप होता २. हे राजा, रूप व औदार्य यांनीं युक्त अशा त्याच्या दोन सुसंपन्न भार्या होत्या. पण हे जनमेजया, त्यांतील एकीलाही अपत्य नव्हतें ३. स्वर्गांत शचीच्या योगानें जसा इंद्र तसा तो राजा त्या दोन्ही भार्यांच्या योगानें मुदित होत असे. त्या राजाचा मित्रसह या नांवाचा एक द्विजोत्तम सखा होता. तो विप्रेंद्र महायोगी वेदवेदांगतत्पर, व राजाप्रमाणेंच अनपत्य होता ४,५. असो, तो

लोहितः ७ आत्मानं दर्शयामास स्वप्ने राजानमब्रवीत् । प्रीतोऽस्मि तव भद्रं ते वरं वरय सुव्रत ८ अथ राजा जगन्नाथमुवाचेदं स्मयन्निव । पुत्रौ मम भवेतां हि तथेत्युक्त्वा वृषध्वजः ९ अन्तर्धानं गतः शंभुः प्रतिबुद्धस्ततो नृपः । सोऽपि मित्रसहो विद्वान्देवं केशवमव्ययम् १० पंचवर्षं जगन्नाथमर्चयामास भक्तितः । अर्चितस्तेन विप्रेण देवदेवो जनार्दनः ११ पुत्रमेकं ददौ तस्मै स्वात्मना सदृशं हरिः । ते भार्ये गर्भमाधत्तां तेजसा शंकरस्य ह १२ विप्रभार्या महाराज वैष्णवं तेज आदधत् । महिष्ये ते महावीर्ये पुत्रौ शंकरनिर्मितौ १३ असूयेतां महीपाल क्रमेणैव नृपस्य ह । स तयोश्च महाराज नाम कर्मादिकाः क्रियाः १४ चकार विधिवत्कर्ता विप्रेभ्योऽदान्महद्धनम् । स च विप्रो विनीतात्मा पुत्रमेकं हि लब्धवान् १५ साक्षादिव जगन्नाथं स्थितं पुत्रात्मना नृप । जातकर्मादिकं सर्वं ब्राह्मणः स चकार ह १६ तौ कुमारावयं चैव त्रयः सवयसोऽभवन् । वेदानधीत्य ते सर्वाञ्छ्रुत्वा चान्वीक्षिकीं तथा १७ धनुर्वेदेतथास्त्रेचनिपुणास्तेभवंस्तदा । हंसो ज्येष्ठो नृपसुतो डिंभकोऽनन्तरोऽभवत् १८ स च विप्रसुतो राजञ्जनार्दन इति स्मृतः । अन्योन्यं मित्रतां याताः सर्वे चैव कुमारकाः १९ [४५४८] इति श्रीम०खिले०हरि०भवि० हंसडिंभकोत्पत्तौचतुरधिकशततमोऽध्यायः ॥ १०४ ॥

वैशंपायन उवाच ॥ हंसश्चैव तपश्चर्तुं तथा डिंभो महामतिः । मनश्चक्रतुरात्मांशौ शंकरस्य नृपोत्तम १ गत्वा तु हिमवत्पार्श्वे तपश्चक्रतुरंजसा । उद्दिश्य शंकरं शर्वं नीलग्रीव-

---

राजा दोघी राण्यांसह पुत्राकरितां दहा वर्षें अनन्य चित्तानें शूलवान् शर्व शंकराचें पूजन करता झाला ६. त्या ब्राह्मणानें पुत्राकारितां वैष्णव सत्र आरंभिलें. राजानें नीललोहित शंकराचें पूजन केलें असतां त्या देवानें राजाला स्वप्नांत दर्शन दिलें. व ह्मटलें, " राजन् मी तुजवर प्रसंन्न झालों आहें. हे सुव्रता, तूं वर माग " ७,८. नंतर राजा जगन्नाथाला हंसतसें असें बोलला, " देवा, मला दोन पुत्र व्हावे. " त्यावर वृषध्वज शंभु ठीक आहे, असें बोलून अंतर्धान पावला. त्यानंतर नृप जागा झाला. मित्रसह विद्वान् ब्राह्मणानेंही अव्यय केशव देवास पांच वर्षें मोठ्या भक्तीनें पूजलें. त्या विप्रानें याप्रमाणें अनन्यभावानें पूजलेला देवाधिदेव जनार्दन हरि त्याला आपल्यासारखा एक पुत्र देता झाला. शंकराच्या तेजानें त्या राजभार्यांनीं गर्भ धारण केले. ब्राह्मणाच्या भार्येनें वैष्णवतेज आपल्या गर्भाशयांत धारण केलें. हे राजन्, कांहीं दिवसांनीं राजाच्या त्या दोन्ही महावीर्यसंपन्न भार्यांना शंकरनिर्मित पुत्र झाले. तेव्हां राजानें त्यांच्या नामकर्मादि सर्व क्रिया यथाशास्त्र केल्या. ब्राह्मणांस पुष्कळ धन दिलें. त्या शिक्षित ब्राह्मणाला एक पुत्र झाला ९–१५. हे राजन्, साक्षात् जगन्नाथच त्याच्या पुत्ररूपानें त्याच्या येथें आला असतां ब्राह्मणानें त्याचें जातकर्मादि सर्व केलें १६. राजाचे दोघे कुमार व हा ब्राह्मणपुत्र असे तिघे मित्र झाले. सर्व वेदांचें अध्ययन करून, तर्कविद्या शिकून १७, ते तिघेही धनुर्वेद व अस्त्रशास्त्र यांत निपुण झाले. ज्येष्ठ राजपुत्राचें नांव हंस, कनिष्ठाचें डिंभक व हे राजन्, तो ब्राह्मणपुत्र जनार्दन या नांवानें प्रसिद्ध झाला. ते सर्व कुमार परस्पर मित्रतेस प्राप्त झाले १८,१९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिंभकोत्पत्तीविषयीं एकशें चवथा अध्याय समाप्त झाला ॥ १०४. ॥

वैशंपायनः—हे नृपोत्तमा, शंकराचे आत्मांश असे ते हंस व महामति डिंभ तप करण्याचा निश्चय करते झाले १. हिमालयाच्या पार्श्वभागीं जाऊन त्यांनीं शंकर, शिव,

सुमापतिम् २ वीर्यास्त्रे चैव नौ स्यातामित्याधाय तु मानसे । एकाग्रौ प्रयतौ भूत्वा वाय्वंबु-
प्राशिनौ नृप ३ नमस्ते देवदेवेति शंकरेति दिवानिशम् । हर शर्व शिवानंद नीलग्रीव उमा-
पते ४ वृषध्वज विरूपाक्ष हर्यक्ष जगतां पते । भक्तप्रिय गिरीशेश वासुदेव शिवाच्युत ५
सद्योजात महादेव देवदेव गुहाशय । भूतभावन देवेश प्रणवात्मन्सदाशिव ६ इत्यादिनाम-
भिर्नित्यं स्तुवंतौ शंकरं भवम् । हृदि कृत्वा विरूपाक्षं तपस्तेपतुरंजसा ७ निर्ममौ निरहंकारौ
मौनव्रतसमास्थितौ । वर्षाणीह तदा राजन्पंच चक्रतुरोजसा ८ ततः प्रीतोऽभवच्छर्वस्ताभ्यां
संयमनेन च । स ददौ दर्शनं नैजं व्याघ्रचर्मांबरो हरः ९ त्रियक्षः शंकरः शर्वः शूलपाणिरुमा-
पतिः । अग्रतः संस्थितं शर्वं चन्द्रार्धकृतशेखरम् । तौ दृष्ट्वा प्रीतमनसौ नमश्चक्रतुरंजसा १०
श्रीभगवानुवाच ॥ वरं वरय भद्रं वां यथेच्छा वां तथास्तु वै । तावूचतुस्तदा राजन्प्रीतस्त्वं
भगवन्यदि ११ देवासुरचमूमुख्यैर्यक्षैर्गन्धर्वदानवैः । आवामजय्यौ सर्वात्मन्नेष नौ प्रथमो वरः १२
द्वितीयो नौ विरूपाक्ष रौद्रास्त्राणां च संग्रहः । माहेश्वरं तथा रौद्रमस्त्रं ब्रह्मशिरोमहत् १३
अभेद्यं कवचं दिव्यमच्छेद्यं चापि कार्मुकम् । परशुं च तथा शर्व सदा रक्षार्थमेव च १४
सहायौ द्वौ महादेव भूतौ युद्धे हि गच्छताम् । एवमस्त्विति देवेश आह भृंगिरिटी हरः १५
कुंडोदरं विरूपाक्षं सर्वप्राणिहिते रतम् । युवामथ च भूतेशौ सहायौ सततं रणे १६ संग्रामं

---

नीललोहित उमापतीस उद्देशून तप केलें २. आह्मांला वीर्य व अस्त्रें असावीत, असा हेतु मनांत ठेऊन हे राजा, ते एकाग्रचित्त, पवित्र व वायु आणि जलभक्षक होऊन तेथें राहिले ३. ते अहोरात्र, हे देवदेव, हे शंकर, हे हर, हे शर्व, हे शिव, आनंद, नीलग्रीव, उमापते. वृषध्वज, विरूपाक्ष, हर्यक्ष, जगत्पते, भक्तप्रिय, गिरिश, ईश, वासुदेव, शिव, अच्युत, तुला नमस्कार असो ४-५. हे सद्याजाते, हे महादेव, हे देवदेव, गुहाशय, हे भूतभावन, हे देवेश, हे प्रणवात्मन्, हे सदाशिव, इत्यादि नांवांनीं ते शंकराची नित्य स्तुति करीत असत. विरूपाक्षास हृदयकमलांत धारण करून त्यांनीं निग्रहानें मोठें तप केलें ६,७. ज्यांना शरीराचीही ममता नाहीं, ज्यांनीं अहंकारास सर्वथा सोडलें आहे व ज्यांनीं मौनव्रत धरलें आहे अशा त्या दोघां राजपुत्रांनीं पांच वर्षें धैर्यानें तप केलें ८. त्यांच्या संयमनानें शर्व अतिशय संतुष्ट झाला. व्याघ्रचर्म हेंच ज्याचें वस्त्र आहे असा हर त्यांस आपलें दर्शन देता झाला ९. ज्याला तीन नेत्र आहेत, असा शंकर, शर्व, शूलपाणि, उमापति त्यांच्या दृष्टीं पडला. तेव्हां अर्धचंद्राला ज्यानें आपला मस्तकमणि केला आहे, असा शर्व अग्रभागीं स्थित आहे असें पाहून ते दोघेही राजपुत्र संतुष्टचित्त झाले. त्यांनीं लागलाच त्याला प्रणाम केला १०. श्रीभगवान्:—वर मागा. तुमचें कल्याण होवो. जशी तुमची इच्छा असेल तसें होवो तें ऐकून, हे राजन् ते दोघे राजपुत्र ह्मणाले "भगवन्, तूं जर आह्मांवर प्रसन्न झाला असशील तर ११, देव व असुर यांच्या चमूंतील मुख्य, यक्ष, गंधर्व, दानव यांस आह्मी अजिंक्य व्हावें हा, हे सर्वात्मन्, आह्मांला प्रथम वर दे १२. हे विरूपाक्षा, आतां आमचा दुसरा इष्ट वर ऐक. रौद्रास्त्रांचा संग्रह, माहेश्वर. तसेंच रौद्र, व मोठें ब्रह्मशिरोस्त्र, अभेद्य दिव्य कवच, अच्छेद्य कार्मुक, परशु व त्याचप्रमाणें हे शर्व महादेव, युद्धामध्यें सदां रक्षणाकरितां दोन भूत आमचे सहायकर्ते होवोत. " तेव्हां ' तथास्तु ' असें त्या दोघांस म्हणून देवेश हर--कुंडोदर, विरूपाक्ष व सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रत अशा भृंगी व रटी या नांवाच्या गणांस ह्मणाला, " तुह्मी भूतेश यांना रणांत सतत साह्य करा १३-१६. संग्रामांत जाणाऱ्या या बलशाली व अति-

गच्छतां घोरमेतयोर्बलशालिनोः । इत्युक्त्वा भगवाञ्छर्वस्तत्रैवान्तरधीयत १७ ततस्तौ वीर्यसंपन्नौ हंसो डिंभक एव च । कृतास्त्रौ शस्त्रसंपन्नौ चापिनौ वीर्यवत्तरौ १ : आमुक्तकवचौ वीरावजय्यौ देवदानवैः । अत्यन्तभक्तौ देवेशे शंकरे नीललोहिते १९ नित्योत्सवकरौ देवे भस्मोद्धूलनशोभिनौ । कृतत्रिपुंड्रकौ नित्यं जटायुक्तशिरोधरौ २० रुद्राक्षार्पितसर्वांगौ व्याघ्रचर्मांबरावृतौ । नमः शिवाय शान्ताय महादेवाय धीमते २१ इत्यादिभिर्महादेवं स्तुवन्तौ नामभिः शिवम् । साक्षादिव महादेवौ रेजतुर्जलधारिणौ २२ ततः स्वभवनं गत्वा पितुः पादावगृह्णताम् । पितुश्च सख्युर्बलिनौ मातुश्च चरणौ तदा २३ जनार्दनोपि धर्मात्मा कालेन महता नृप । विद्यापारं महाबुद्धियुक्तेनासावुपेयिवान् २४ स च विष्णुं हृषीकेशं पीतकौशेयवाससम् । ब्रह्मतत्त्वपरो नित्यमुपास्ते विजितेन्द्रियः २५ हंसश्च डिंभकश्चैव कृतदारौ बभूवतुः । जनार्दनोऽपि धर्मात्मा कृतदारो बभूव ह २६ सर्वेतेय ज्ञानिरताः पंचयज्ञपरास्तथा । स्वदारनिरताः सर्वे गुरुशुश्रूषणे रताः । धर्म एव परं श्रेय इति ते मेनिरे नृप २७ [ ४५७५ ]

इति श्रीम० खि० हरि० भवि० कैला० हंसडिंभकोपाख्याने पंचाधिकशततमोऽध्यायः ॥१०५॥

वैशंपायन उवाच ॥ ततः कदाचित्तौ वीरौ मृगयामटतुः किल । जनार्दनेन सहितौ रथैरश्वैर्गजैरपि १ वनं गत्वा तु तौ वीरौ सिंहव्याघ्रांश्च जघ्नतुः । शितैर्बाणैर्महाराज वराहानथ सर्वशः २ व्यालानन्यान्मृगान्हिंस्राञ्छ्वभिश्च सहितौ नृप । एष आयाति विपुलो वराहो दीर्घलोचनः ३ एनं बाणेन संछिंधि याति चायं मृगाधिपः । अयमन्योऽथमहिषः श्रृंगप्रोत-

---

घोर वीरांना तुमचें सदा साह्य होवो. ” असें बोलून भगवान् शर्व तेथेंच गुप्त झाला १७. त्यानंतर हंस व डिंभक असे ते दोघे वीर्यसंपन्न, कृतास्त्र, शस्त्रसंपन्न, चापवान्, अतिशय वीर्यवान् १८, ज्यांनीं अंगांत कवचें घातलीं आहेत असे, वीर, देव–दानवांस अजय्य, देवेश शंकर–नीललोहिताचे ठायीं अतिशय भक्ति ठेवणारे १९, देवाचा नित्य उत्सव करणारे, अंगांस भस्माचा लेप करून अतिशय शोभणारे, नित्य त्रिपुंड्र लावणारे, जटायुक्त मस्तकांनीं भूषित होणारे २०, ज्यांनीं सर्वांगावर रुद्राक्ष घातले आहेत असे, व्याघ्रचर्म परिधान करणारे, ‘ नमः शिवाय शान्ताय महादेवाय धीमते ’ इत्यादि नाममंत्रांनीं महादेव शिवाची स्तुति करणारे, आणि मस्तकावर जल धारण करणारे ते दोघे साक्षात् महादेवासारखे शोभले २१,२२. त्यानंतर आपल्या घरीं जाऊन त्यांनीं पित्याचें चरण धरलें. पित्याचा मित्र व दोघी माता यांचेही चरण त्यांनीं धरलें २३. हे राजा, महामति धर्मात्मा जनार्दनही पुष्कळ काल लोटला असतां महाबुद्धियोगानें विद्यापारंगत झाला २४. तो ब्रह्मतत्त्वपरायण व जितेंद्रिय जनार्दन हृषीकेश, पीतांबरधारी विष्णूची नित्य उपासना करीत असे २५. हंस व डिंभक यांचें विवाह झाले. धर्मात्म्या जनार्दनाचाही विवाह झाला २५. ते सर्व यज्ञामध्यें निरत, पंचमहायज्ञपरायण, स्वस्त्रीपरायण, व गुरुशुश्रूषेमध्यें निमग्न होऊन राहिले. हे राजा, धर्मच परम श्रेय आहे, असें तें मानूं लागले २६. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० हंसडिंभकोपाख्यानांतील एकशें पांचवा अध्याय समाप्त झाला ॥ १०५. ॥

वैशंपायनः— त्यानंतर एकदा ते दोघे वीर जनार्दनमित्र रथ, गज, अश्व यांसह मृगया करीत वनांतून फिरूं लागले १. हे महाराज, तीक्ष्ण बाणांनीं त्यांनीं पुष्कळ व्याघ्र, सिंह व वराह यांस सर्वतः मारलें २. हे राजन्, कुत्र्यांना बरोबर घेऊन गेलेल्या त्यांनीं लांडगे व इतर हरिणादि पशु यांनाही मारून पाडलें. हा पहा दीर्घनेत्रांचा धिप्पाड वराह

सरीसृपः ४ एते खलु मृगाः सार्धं शावैर्धावन्ति सर्वशः । एतद्भ्रमति सर्वत्र भीतं शशकुलं महत् ५ शावैस्तनं पिबत्साधु न हंतव्यमिदं शुभम् । गृहीतव्यमिदं सर्वं निरुध्यश्वगणैरिह ६ इत्यादिशब्दः सुमहान्मृगयां कुर्वतां नृप । क्षत्रियाणां नृपश्रेष्ठ व्याधानां चैव धावताम् ७ हत्वा मृगान्सुबहुशो व्याघ्रान्सिंहान्नृपोत्तमौ । श्रमंचजग्मतुर्वीरौ मध्यंयाते दिवाकरे ८ अलं हि मृगयास्माकं श्रमः समुपजायते । इत्यूचतुर्महाराज पुष्करं जग्मतुः सरः ९ सरः समीपमागम्य मुनिसिद्धनिषेवितम् । वीजन्माहतसानूपं श्रमात्तत्र सुखस्थितौ १० ततो जनाः सरः सर्वे विगाह्य श्रमकर्शिताः । बिसान्प्रवालान्पद्मानां भक्षयामासुरार्तवत् ११ जनार्दनेन सहितौ हंसो डिंभक एव च । सरः क्वचित्समाश्रित्य श्रमं संत्यज्य तिष्ठतः १२ विश्रम्य सरसस्तीरे तदासाते सुखं नृपौ । अशृण्वतां परं ब्रह्म मुनिमुख्यैः समीरितम् १३ मध्यं दिनं तथा सर्वैः सवनं सस्वरं नृपौ । ततः प्रीतौ नृपौ भूत्वा श्रुत्वा वेदध्वनिं तदा १४ ऐच्छेतां तौ तदा द्रष्टुं यज्ञं मुनिकृतं तदा । स्थापयित्वा ततः सेनां सर्वां मृगसमन्विताम् १५ आदाय च महाचापे शरान्कतिचिदेव च । जनार्दनस्तदा वीरो हंसा डिंभक एव च १६ पदातिनौ महाराज जग्मतुश्चाश्रमं किल । महर्षेः काश्यपस्याथ सत्रं वैष्णवसंज्ञिकम् । यजतो मुनिभिः सार्धं जपहोमपरायणैः १७ [ ४५९२ ] इति श्रीम- खि० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्याने मृगयावर्णनं नाम षडधिकशततमोऽध्यायः ॥ १०६ ॥

---

येत आहे. याला बाणानें तोड. हा पहा सिंह जीव घेऊन निसटून जात आहे. हा पहा दुसरा रानरेडा आपल्या शिंगावर सापाला टोंचून घेऊन पळत आहे ३, ४. खरोखर हीं पहा हरणें आपल्या पोरांसह वाट फुटेल तिकडे पळत आहेत. हा भयभीत झालेला सशांचा मोठा कळप इतस्ततः पळत आहे ५. त्यांतील पोरें आपापल्या आयांचें स्तनपान करीत आहेत. यास्तव या शुभ जीवांच्या संघाला मारूं नका. तर कुत्र्यांच्या संघाकडून त्या सर्वांना अडवून जिवंत धरा ६. हे राजा, मृगया करणाऱ्या त्यांचा इत्यादि प्रकारचा मोठा शब्द तेथें झाला. हे जनमेजया, क्षत्रियांचा व धावणाऱ्या व्याधांचा तेथें फार मोठा कोलाहल झाला ७. ते दोघे वीर राजपुत्र पुष्कळ पशूंना, व्याघ्रांना व सिंहांना मारून सूर्य मध्यावर आला असतां अतिशय श्रांत झाले ८. आणि "आह्मांला मृगया पुरे झाली. कारण तिच्या योगानें फार श्रम होतात." असें ते ह्मणाले. नंतर ते दोघेही हे महाराज, पुष्कर सरोवरावर गेले. मुनि व सिद्ध यांनीं ज्याचें सेवन केलें आहे, वाहणारा वायु व जलमय प्रदेश यांनीं जें मनोरम झालें आहे अशा त्या सरोवरापाशीं जाऊन श्रांत झालेले ते सुखानें राहिले ९, १०. त्यानंतर मृगयाश्रमानें थकलेले सर्व लोक त्या सरोवरांत स्नान करून क्षुधेनें पीडलेल्या भिकाऱ्याप्रमाणें कमलाचीं बिसें व कोमल पल्लव खात सुटले ११. जनार्दनासह हंस व डिंभक त्या सरोवराच्या एका बाजूस बसून श्रमपरिहार करूं लागले १२. त्यावेळीं त्या दोघां राजपुत्रांनीं सरोवराच्या तीरावर सुखानें बसून मुनिमुख्यांनीं ह्मटलेलें परब्रह्मस्तोत्र ऐकलें १३. त्याचप्रमाणें सस्वर ह्मटलेलें मध्यंदिन सवन त्यांच्या कानीं आलें. त्यावेळीं तो वेदध्वनि ऐकून दोघेही राजपुत्र अतिशय संतुष्ट झाले १४. मुनींनीं केलेला यज्ञ आपण पहावा, असें त्यांना वाटलें. त्यानंतर हे महाराज, मारलेल्या पशूंसह सर्व सेना तेथेंच ठेवून दोन महा धनुष्यें व कांहीं थोडेसेच बाण घेऊन जनार्दन, वीर हंस व डिंभक पायांनींच महर्षि काश्यपाच्या आश्रमास गेले. तो महर्षि जप–होमपरायण मुनींसह वैष्णवसंज्ञक सत्र करीत होता १५-१७. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडि० मृगयावर्णनंनाम एकशें सहावा अध्याय समाप्त झाला॥१०६॥

वैशंपायन उवाच ॥ जनार्दनश्च धर्मात्मा हंसो डिंभक एव च । सदः प्रविश्य सत्रस्य नमश्चक्रुर्मुनीश्वरान् १ तानागतान्महात्मानो मुनयः शिष्यसंयुताः । अर्घ्यपाद्यासनादीनि चक्रुः पूजां च यत्नतः २ तौ नृपौ स च विप्रेन्द्रः सपर्यां प्रतिगृह्य च । प्रीतात्मानो महात्मान आसते ससुखं नृप ३ ततो हंसो बभाषे तान्मुनीन्संयतवाङ्नृप । पिता हि नौ मुनिश्रेष्ठा यष्टुमिच्छत्ससाधनम् ४ गंतव्यं तत्र युष्माभिः सत्रान्तेमुनिसत्तमाः । राजसूयेन यज्ञेन कृत्वा दिग्विजयं वयम् ५ याजयिष्यामहे विप्राः पितरं धार्मिकं नृपम् । आयान्तु तत्र विप्रेन्द्राः सशिष्याः सपरिच्छदाः ६ वयमद्यैव सहितौ दिशो जेष्यामहे वयम् । शक्ता वयमिहैवैतत्कर्तुं सैनिकसंचयैः ७ आवयोः पुरतः स्थातुं न शक्ता देवदानवाः । कैलासनिलयाद्देवाद्वरं लब्धाः स्म यत्नतः ८ अजय्यौ शत्रुसंघानामस्त्राणि विविधानि च । इत्युक्त्वा विररामैव हंसो मदबलान्वितः ९ मुनय ऊचुः ॥ यदि स्यात्तत्र गच्छामो वयं शिष्यैर्नृपोत्तम । आस्महे वान्यथा राजन्नित्यूचुः किल तापसाः १० वैशंपायन उवाच ॥ ततो देशान्महाराज गंतुं निश्चितमानसौ । पुष्करस्योत्तरं तीरं दुर्वासा यत्र तिष्ठति ११ यतयो नियता भूत्वा मंत्रब्रह्मनिषेविणः । ब्रह्मसूत्रपदे सक्तास्तदर्थालोकतत्पराः १२ निर्ममा निरहंकाराः कौपीनाच्छादनव्रताः । तमात्मानं जगद्योनिं विष्णुं विश्वेश्वरं विभुम् १३ ब्रह्म-

---

वैशंपायनः— धर्मात्मा जनार्दन, हंस व डिंभक असे ते तिघे सत्राच्या मंडपांत जाऊन मुनींना नमस्कार करते झाले १. शिष्ययुक्त महात्मे मुनि सत्रशाळेंत आलेल्या त्या महात्म्यांना पाहून अर्घ्यपाद्यासनादि उपचार समर्पण करून मोठ्या यत्नानें पूजा करते झाले २. हे राजा, तेव्हां ते दोघे राजपुत्र व एक ब्राह्मणश्रेष्ठ असे ते तिघे महात्मे त्यांच्या सत्काराचा स्वीकार करून संतुष्ट झाले आणि सुखानें बसले ३. कांहीं वेळ स्वस्थ बसून संयमी हंस त्या मुनींस ह्मणाला, “ हे मुनिश्रेष्ठहो, माझ्या पित्याच्या मनांत असा साधनसंपन्न यज्ञ करावयाचा आहे ४. यास्तव उत्तम मुनींनो, हें सत्र संपलें ह्मणजे तुह्मी तेथें चला. ह्मणजे आह्मी दिग्विजय करून राजसूययज्ञानें आपल्या धार्मिक पित्याकडून होम–हवन करवूं. यास्तव अहो उत्तम द्विजांनो, शिष्य व सर्व सामग्री यांसह तुह्मी तेथें या ५,६. आह्मी दोघे मिळून आजच सर्व दिशांस जिंकूं. आह्मी सैनिकांच्या समूहांनीं युक्त आहों. यास्तव येथूनच दिग्विजयास आरंभ करूं शकूं ७. आह्मां दोघांपुढें देवदानवही उभे राहण्यास समर्थ नाहींत. कैलासावर ज्याचें वसतिस्थान आहे अशा देवापासून मोठ्या यत्नानें वर मिळवून आह्मी शत्रुसंघांस अजय्य झालों आहों. आह्मांला विविध अस्त्रेंही प्राप्त झालेलीं आहेत. असें बोलून मद व बल यांनीं युक्त असलेला हंस मुकाट्यानें बसला ८, ९. मुनिः– हे उत्तम राजपुत्रा, तुमच्या येथें राजसूय जर झाला तर आह्मी शिष्यांसह तेथें जाऊं. नाहींतर येथेंच राहूं. हे उत्तमराजा जनमेजया, सर्व तापस असें बोलले १०. वैशंपायनः— हे महाराज, याप्रमाणें त्या कर्मठ ब्राह्मणांशीं संकेत करून व नैष्कर्म्ययुक्तांचा उच्छेद करण्याचा निश्चय करून ते तेथून निघाले. आणि पुष्कराच्या उत्तर तीरावर जेथें दुर्वास रहात होता तेथें गेले ११. त्या पवित्रप्रदेशीं अनेक यति नियतचित्त होऊन मंत्रमय वेदाचें ( अथवा प्रणवाचें ) सेवन करीत राहिले होते. ते सर्व ‘ ब्रह्मविदाप्नोतिपरं ’ या ब्रह्मसूत्रामध्यें ज्याचा निर्देश केला आहे अशा वस्तूमध्यें आसक्त झाले होते. ते त्या ब्रह्मपदाचा अर्थ साक्षात् जाणण्यास उद्युक्त झाले होते १२.

रूपं शुभं शान्तमक्षरं सर्वतोमुखम् । वेदान्तमूर्तिमव्यक्तमनन्तं शाश्वतं शिवम् १४ नित्ययुक्तं विरूपाक्षं भूताधारमनामयम् । ध्यायन्तं सर्वदा देवं मनसा सर्वतो मुखम् १५ दुर्वाससं सदोपास्य वेदान्तैकरसं गुरुम् । तर्कनिश्चिततत्त्वार्था ज्ञाननिर्मलचेतसः १६ हंसाः परमहंसाश्च शिष्या दुर्वाससः प्रभो । गत्वा तत्र महात्मानौ तौ दृष्ट्वा तूर्ध्वरेतसम् १७ दुर्वाससं महाबुद्धिं विचिन्वानं परं पदम् । क्रुद्धो यदि स दुर्वासा दग्धुं लोकानिमान्क्षमः १८ देवा अपि च यं द्रष्टुं क्रुद्धं वै न क्षमाः सदा । रोषमूर्तिः सदा यस्तु रुद्रात्मा विश्वरूपधृक् १९ रक्तकौपीनवसनो हंसः परम एव च । दृष्ट्वैनं च तयोरेवं बुद्धिरासीन्महामते २० को नामासौ महाभूतः काषायी वर्णवित्तमः । कश्चायमाश्रमो नाम विहाय च गृहाश्रमम् २१ गृहस्थ एव धर्मात्मा गृहस्थो धर्मवित्तमः । गृहस्थो धर्मरूपस्तु गृहस्थो वर्ण एव च २२ गृहस्थश्च सदा माता प्राणिनां जीवनं सदा । तं विनान्येन रूपेण वर्तते योऽतिमूर्खवत् २३ उन्मत्तोऽयं विरूपोयमथवा मूर्ख एव च । ध्यायन्निव सदाचायमास्ते वंचयितापि वा २४ किमेते प्राकृतज्ञाना ध्यायन्त इति किंचन । वयमेतान्दुरारोहानाश्रमान्तरकल्पकान् २५ स्थापयिष्यामहे सर्वान्मिंदबुद्धीनिमान्गृहे । बलादेव द्विजानेतान्गूढविज्ञानतत्प-

---

ममताशून्य, अहंकाररहित आणि कौपीन व एक आच्छादन अशीं दोनच वस्त्रें जवळ बाळगण्याचें ज्यांचें व्रत आहे असें अनेक महात्मे तेथें होते. ते सर्व त्या आत्मरूप, जगद्योनि, विष्णु, विश्वेश्वर, विभु, ब्रह्मरूप, शुभ, शांत, अक्षर, सर्वतोमुख, वेदांतमूर्ति, अव्यक्त, अनंत शाश्वत, शिव, नित्ययुक्त, विरूपाक्ष, भूताधार व अनामय, अशा देवाचें सदां ध्यान करणाऱ्या, सदां उपास्य व वेदांत-एकरस अशा दुर्वास गुरूची सेवा करीत होते. तर्कानें तत्त्वार्थाचा ज्यांनीं निश्चय केला आहे अशा त्यांचें चित्त ज्ञानाच्या योगानें अतिशय निर्मळ झालें होतें १३–१६. हे प्रभो, दुर्वासमुनीचे ते शिष्य हंस व परमहंस होते. तेथें जाऊन त्या राजपुत्रांनीं महाबुद्धिमान् व नैष्ठिक ब्रह्मचारी दुर्वासास पाहिलें. तो परमपदाचें ध्यान करीत होता. तो दुर्वास मुनि क्रुद्ध झाल्यास या सर्व लोकांस जाळण्यास समर्थ होता १७,१८. त्या क्रुद्ध मुनीकडे पाहण्यास देवही सदां समर्थ नव्हते. तो सदां क्रोधमूर्ति, रुद्रात्मा व विश्वरूप धारण करणारा होता १९. लाल रंगाची लंगोटी हेंच त्याचें वस्त्र होतें. तो परमहंसच होता. अशा त्या ज्ञानी महात्म्याला पाहून, हे महामते जनमेजया, त्या दोघांच्या मनांत असा विचार आला २०. हा कोण महाभूत आहे. हा काषायवस्त्र परिधान करणारा कोणी वर्णविभागवेत्त्यांचा महा गुरुच दिसतो ! ( हें वाक्य उपहास करण्याकरितां उच्चारलेलें असल्यामुळें वर्णविभागवेत्त्यांतील श्रेष्ठ ह्मणजे सर्व वर्ण बहिष्कृत असें जाणावें ) गृहाश्रम सोडून यानें धरलेला हा कोणता विचित्र आश्रम आहे ? २१. गृहस्थच धर्मात्मा आहे. गृहस्थच धर्मवेत्ता आहे. गृहस्थ धर्मरूप आहे. गृहस्थ हाच खरा वर्ण आहे २२. गृहस्थ ही सर्व प्राण्यांची माता व जीवन आहे. यास्तव त्यावाचून ( त्याला सोडून ) जो अति मूर्खासारखा अन्य मार्गानें वागतो २३, तो खचित उन्मत्त, विरूप, अथवा मूर्खच आहे. हा सदां ध्यानसें करीत असतो. पण हा बकाप्रमाणें प्राण्यांना फसविणाराही असेल २४. हे सर्व प्राकृत ज्ञानसंपन्न यति ध्यान कशाचें करीत आहेत, कांहीं कळत नाहीं. आह्मी आतां या अति आग्रही व अन्य आश्रमाची कल्पना करणाऱ्या सर्व मतिमंदांना गृहस्थाश्रमामध्यें स्थापूं या. गूढ विज्ञानामध्यें

रान् २६ असद्ग्राहगृहीतांश्च बालिशान्दुर्मतीनिमान्। एषां शास्ता च को मूढो न विप्रो वयमत्र ह २७ धर्मे वर्त्मनि संस्थाप्य पुनर्यास्याव निर्वृतौ। इति संचिन्त्य तौ वीरौ विप्रेणसहितौ नृप २८ जनार्दनेन राजानौ मोहाद्भाग्यक्षयान्नृप। समीपं तस्य राजेन्द्र यतेः संयतचेतसः २९ गत्वा च प्रोचतुरुभौ दुर्वाससमतीन्द्रियम्। यतींश्च नियतान्क्रुद्धौ राजानौ राजसत्तम ३० [४६२२] इति श्रीम० खिल० हरि० हंसडिं० सप्ताधिकशततमोऽध्यायः॥ १०७॥

हंसडिंभकावूचतुः॥ ज्ञानलेशाद्विहीनात्मन् किं ते व्यवसितं द्विज। कश्चायमाश्रमो विप्र भवता यः समाश्रितः १ गृहमेधं परित्यज्य किं त्वया साधितं पदम्। दंभ एव भवान्क्व शके नास्त्यत्र कारणम् २ लोकांश्चेमान्सदा मूढ नाशयिष्यसि निर्वृतः। एतान्सर्वान्विनेतासि नरके पातयिष्यसि ३ स्वयं नष्टः परान्मूर्ख नाशयिष्यासि यत्नतः। अहो शास्ता कथं नास्ति तव मन्दमतेर्द्विज ४ सर्वथा त्वद्विनेता च पापो नास्त्यत्र संशयः। त्यक्त्वेममाश्रमं विप्र गृही भव यतात्मवान् ५ पंचयज्ञान्सदा विप्र कुरु यत्नपरो भव। ततः स्वर्गं परं गत्वा स्वर्गे हि सुमहत्सुखम् ६ एष श्रेयः पथो विप्र जीविते चेत्स्पृहा तव। इत्युक्तवन्तौ धर्मात्मा श्रुत्वा विप्रो जनार्दनः ७ उवाच च यतिं दृष्ट्वा प्रणम्यासौ सुनीतवत्। माब्रूतामीदृशं वाक्यं राजानौ मन्दतेजसौ ८ अश्राव्यमीदृशं घोरं लोकयोरुभयोरपि। को वक्तु-

---

तत्पर असलेल्या या द्विजांना आपण बलात्कारानें गृहस्थ करूं या. कारण यांचा मिथ्या ग्रह झाला आहे हे बालिश व दुर्बुद्धि आहेत. यांचा हा शास्ता गुरु कोणी मूर्ख आहे. हा कांहीं विप्र नव्हे. यास्तव आह्मी यांना धर्ममार्गामध्यें स्थापून व सुखी होऊन पुढें जाऊं. हे राजा, जनार्दन ब्राम्हणासह त्या दोघां वीरांनीं असें चिंतन करून, मोहानें व भाग्यक्षीण झाल्यामुळें त्या नियतचित्त ब्राह्मणापाशीं जाऊन, जितेंद्रिय दुर्वासास व दुसऱ्या नियमवान् मुनींस क्रोधानें असें ह्मटलें २५–३०. इति श्रीमहा० खि० हरि भविष्य० हंसडिंभकोपाख्यानाचा एकशें सातवा अध्याय समाप्त झाला ॥ १०७. ॥

हंसडिंभक ह्मणतातः—ज्याचें चित्त ज्ञानलेश शून्य आहे अशा हे द्विजा, हा काय तुझा व्यवसाय चालला आहे? तूं ज्याचा आश्रय केला आहेस हा कोणता आश्रम? १. गृहमेधाचा परित्याग करून तूं कोणतें पद साधलेंस? निःसंशय तूं दंभमूर्ति आहेस. या तुझ्या अनुष्ठानांत दुसरें कांहीं कारण असेल अशाविषयीं मला शंकाही येत नाहीं २. हे मूढा, तूं स्वतः सुखित होऊन सतत या लोकांचा नाश मात्र करशील. यांचा तूं शिक्षक झाला आहेस खरा. पण यांना नरकांत पाडशील ३. अरे मुर्खा, स्वतः नष्ट होऊन तूं मोठ्या यत्नानें यांना नाहींसें करणार आहेस. अरे द्विजा, तुला शासन करणारा आजवर कोणीच कसा निपजला नाहीं, याचें आह्मांला मोठें आश्चर्य वाटत आहे. सर्वथा तुझा शिक्षकही कोणी पापी पुरुषच असावा, यांत संशय नाहीं. अरे विप्रा, हा आश्रम सोडून गृहस्थ व यतचित्तवान् हो ४,५. हे विप्रा, सदा पंचयज्ञ कर. यत्नवान् हो. ह्मणजे मरणोत्तर तूं सर्वोत्तम स्वर्गास जाशील. स्वर्गांतच फार मोठें सुख आहे ६. हे विप्र, तुला जीविताची जर स्पृहा असेल तर हा श्रेयस्कर मार्ग आहे. पण त्या दोघांचें हें भाषण ऐकून धर्मात्मा जनार्दन ब्राह्मण यतीस पाहून व सुशिक्षिताप्रमाणें प्रणाम करून त्या दोघांस ह्मणाला, "हे मंदतेजस्वी राजांनो, यांना असें बोलूं नका. दोन्ही लोकांमध्यें कल्याण न करणारें हें घोर वाक्य अश्राव्य आहे. ज्याला बांधवांसह जिवंत रहावयाचें आहे,

मीशो मन्दात्मा यदि जीवेत्सबान्धवः ९ सर्वथा काल एवायंयुवयोर्मंदचेतसोः । समाप्त आयुषः शेषो ब्रह्मदण्डहतौ युवाम् १० एते हि यतयः शुद्धा ज्ञानदीपितचेतसः । ज्ञानाग्निदग्धकर्माणः प्राणान्प्राणेषु जुह्वति ११ ऋते वामीदृशं वाक्यं कः समर्थो ह्यनुब्रुवन् । सर्वथा ज्ञातमस्माभिः समाप्तमिह जीवितम् १२ चत्वार आश्रमाः पूर्वमृषिभिर्विहिता नृपौ । ब्रह्मचारी गृहस्थश्च वानप्रस्थश्च भिक्षुकः १३ तेषामग्र्यश्चतुर्थोयमाश्रमो भिक्षुकः स्मृतः । आस्ते तस्मिन्महाबुद्धिः स हि पुण्यतरः स्मृतः १४ नोपासिता भवद्भ्यां च वृद्धाः सम्यग्विनीतवत् । ज्ञानं नामंततस्तेभ्यस्तथा चैवं वदेत कः १५ अश्राव्यमीदृशं घोरं मया प्राणभृतानृप । किं करिष्यामि मन्दात्मन्मित्रत्वाद्भवतो नृप १६ ज्ञानं यदाप्तं भवता गुरुभ्यस्तदत्र दुःखाय हि केवलं नृप। ज्ञानं हि धर्मप्रभवं यथेष्टं बलाद्विपापस्य विधातृरूपम् १७युवां विहाय यास्ये वा पतेयं वा शिलातलम् । पिबेयं वा विषं घोरं पतेयं वा महोर्मिषु १८ आत्मानं वात्र संत्यक्ष्ये पश्यतां शृण्वतां पुनः । इत्युक्त्वा विललापैवं मा भूतमिति तौ वदन् १९[४६४१]
इति श्रीम० खिले० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्यानेऽष्टाधिकशततमोऽध्यायः ॥ १०८ ॥

वैशंपायन उवाच ।। ततः क्रुद्धोऽथ दुर्वासा धक्षन्निव तयोरसून् । एकेना क्षणाथ दुर्वासा रौद्रेणाग्नियुजा सदा १ पश्यंस्तौ च दुरात्मानौ रोषव्याकुलितेन्द्रियः । कुर्वन्निव तदा लोकान्भस्मभूतानिमान्नृप २ ब्राह्मणं चक्षुषा पश्यन्सौम्येनान्येन केवलम् । उवाच वचनं राज-

---

असा कोण मंदात्मा असें बोलण्यास समर्थ आहे ? ९. सर्वथा तुह्मां मंदमतींचा हा कालच आला आहे, तुमच्या आयुष्याचा शेष संपला आहे. तुह्मी दोघेही ब्रह्मदंडानें मारले गेले आहां १०. कारण हे यति फार शुद्ध आहेत. त्यांचीं चित्तें ज्ञानानें दीपित झालीं आहेत. त्यांचीं कर्मैं ज्ञानाग्नीनें दग्ध झालीं आहेत. ते आपल्या इंद्रियांचा प्राणांच्या वृत्तींमध्यें होम करीत असतात ११. तुह्मां दोघां उन्मत्तांवाचून असें भाषण करण्यास कोण समर्थ आहे ? तुमचें येथील जीवित सर्वथा समाप्त झालें आहे, हें आह्मांस कळलें १२. अहो राजपुत्रांनो, ऋषींनीं पूर्वीं चार आश्रम केले. ब्रह्मचारी, गृहस्थ, वानप्रस्थ व भिक्षुक १३. त्यांतील भिक्षुक हा चवथा आश्रम सर्वांत मुख्य ह्मणून सांगितला आहे. महाबुद्धिमान् पुरुषच त्यांत राहतो. तो अतिशय पुण्यवान् ह्मणून ह्मटलेलें आहे १४. तुह्मी दोघांनीं नम्रभावानें वृद्धांची सेवा केलेली नाहीं. तसेंच त्यांच्यापासून ज्ञानसंपादन केलेलें नाहीं. नाहींतर असें कोण बोलता ? १५ हे राजा, प्राणधारण करणाऱ्या मला हें असलें घोर वचन अश्राव्य आहे; पण काय करूं ? हे मंदात्मन् राजा, तुझ्या मित्रत्वामुळें मला तें ऐकावें लागत आहे १६,१७. आतां मी तुह्मां दोघांना सोडून जाईन किंवा शिलातलावर पडेन. अथवा घोर विष पिईन. किंवा महा उर्मीमध्यें पडेन. अथवा हे सर्व ऐकत व पाहत असतांना आत्मत्याग करीन. असें बोलून त्या मुनींना असें ह्मणूं नका असें वारंवार सांगणारा तो जनार्दन विलाप करूं लागला १८,१९. इति श्रीमहाभा० खि० हरि० भविष्य० हंसडिंभकोपाख्यानांतील एकशें आठवा अध्याय समाप्त झाला. ।। १०८ ।।

वैशंपायनः— त्यानंतर क्रुद्ध झालेला दुर्वास त्या दोघांच्या प्राणांस जाळीत असल्याप्रमाणें एका भयंकर अग्नियुक्त नेत्रानें त्या दोघां दुरात्म्याकडे पाहूं लागला. हे राजा जनमेजया, रोषानें ज्याचीं इंद्रियें व्याकुळ झालीं आहेत असा तो या सर्व लोकांस जणुं काय भस्मीभूतच करीत आहे, असें भासलें १,२. तो महात्मा दुसऱ्या सौम्य नेत्रानें केवळ

न्ध्वंसत ध्वंसतेति च ३ इतो गच्छथ राजानौ किं विलंबित मा चिरम् । न वां वचनसंभूतं रोषं धारयितुं क्षमे ४ अन्यथा वो महीपालान्सर्वान्दग्धुमहं क्षमः । किमतः साहसं वक्तुं कश्च शक्नोति मत्पुरः ५ दर्पं वां लोकविख्यातः शंखचक्रगदाधरः । व्यपनेष्यति मन्दज्ञौ किं वो वक्ष्यामि सांप्रतम् ६ ततउत्थाय धर्मात्मा गन्तुमैच्छयतीश्वरः । ततो निषेद्धुं हंसस्तं यतते स्म यतीश्वरम् ७ तस्य बाहुं समादाय हंसो नृपवरोत्तमः । कौपीनं चिच्छिदे क्रूरः कृतान्त इव सत्तम ८ यतयोऽन्ये पलायन्ति दिशो दश विचेतसः । कष्टं हेति वदन्विप्रो मित्रभावाज्जनार्दनः ९ न्यवारयद्यथाशक्ति किमिदं साहसं त्विति । दुर्वासाः सत्यधर्मस्तु हंतुमीशोऽपि तं ततः १० मन्द मन्दमुवाचेदं हंसं डिंभकमेव च । शापेनाहं समर्थोपि हंतुं राजकुलाधमौ ११ तथापि न करोम्यन्तं यतयो ह्यत्र ते वयम् । यो हि देवो जगन्नाथः केशवो यादवेश्वरः १२ शंखचक्रगदापाणिर्गर्वं वां व्यपनेष्यति । लोके तस्मिन्यदुश्रेष्ठे रक्षत्येवं जगत्पतौ १३ युवयोः सर्वथा जीवः सज्जीव इति मे मतिः । जरासन्धोपि वां बन्धुः स च वक्तुं न चेच्छति १४ ईदृशं लोकविद्दिष्टं सहि धर्मपथे सदा । एतावता स वां बन्धुर्न हि भूयो भविष्यति १५ विद्वेषो ह्यस्तु वां तस्य मागधस्य महीपतेः । श्रुत्वेदं घोररूपं तु स हि बन्धुः सहेत चेत् १६ धर्मनाशो भवेत्तस्य नात्र कार्या विचारणा । इत्युक्त्वा गच्छ गच्छेति हंसं प्राह पुनः पुनः १७ जनार्दनमुवाचेदं दुर्वासा यतिसत्तमः । स्वस्त्यस्तु तव विप्रेन्द्र

---

त्या जनार्दन ब्राह्मणाकडे पहात आपल्या इतर शिष्यांस 'हे सत्वर येथून निघून जावात, सत्वर आपलें तोंड काळें करोत' असें बोलला ३. राजांनो, येथून चालते व्हा. विलंब कां लावितां. उशीर लावूं नका. तुमच्या भाषणापासून उत्पन्न झालेला रोष धारण करण्यास मी समर्थ नाहीं ४. नाहींतर तुमच्यासारख्या अनेक राजांनाही मी जाळण्यास समर्थ आहे. यापेक्षां साहस तें कोणतें ? माझ्यापुढें नुसतें बोलण्यास तरी कोण समर्थ आहे ? ५. हे मंद पुरुषांनो, तुमचा दर्प लोकविख्यात शंखचक्रगदाधर नाहींसा करील. आतांच मी तुह्मांला काय सांगूं ? ६. इतकें बोलून तो धर्मात्मा यतीश्वर तेथून उठून जाण्याची इच्छा करता झाला. पण हंस त्या यतीश्वराला निषेध करूं लागला. त्याचा हात धरून नृपश्रेष्ठ हंस कृतांताप्रमाणें त्याचीं कौपीन तोडता झाला ७,८. तेव्हां दुसरें यति भयभीत होऊन तेथून दशदिशेस पळून गेले. पण 'अरेरे फार कष्ट, हाय हाय' असें मित्रभावामुळें ह्मणणारा जनार्दन ब्राह्मण 'कोण हें साहस' असें ह्मणत त्याचें यथाशक्ति निवारण करूं लागला. सत्यधर्मवान् दुर्वास मुनि त्याला मारून टाकावयास समर्थ होता; पण तो हंस व डिंभक यांस हळु हळु ह्मणतो. अरे अधम राजपुत्रांनो मी शापानें तुह्मांला मारण्यास समर्थ आहे, पण मी तें करीत नाहीं. कारण आह्मी प्रख्यात यति आहों. जो प्रख्यात देव केशव यादवेश्वर शंख–चक्र–गदापाणि तो तुमचा गर्व घालवील. तो यदुश्रेष्ठ जगत्पति अशा रीतीनें या लोकांचें रक्षण करीत असतांना तुमचा जीव हा सर्वथा सज्जीव आहे असें मला वाटतें. जरासंधही तुमचा बांधव आहे. पण तो असे लोकांच्या द्वेषास कारण होणारें अयोग्य वचन बोलण्याची इच्छा करीत नाहीं. तो सदां धर्ममार्गामध्यें रत आहे. पण असल्या संन्यासिद्रोहानें तोही तुमचा बंधु होणार नाहीं ९–१५. त्या मागध राजाचा तुमच्याशीं मोठा द्वेष होवो. हें तुमचें घोररूप कृत्य ऐकून तो जर तें सहन करील तर त्याचा धर्मनाश होईल, याविषयीं कांहीं विचारच करावयास नको. असें बोलून तो मुनि हंसला.

भक्तिरस्तु जनार्दने १८ संगतिस्तव तस्यास्तु शंखचक्रगदाभृतः । अद्यश्वो वा परश्वो वा साधुरेव सदा भवान् १९ न हि साधोर्विनाशोऽस्ति लोकयोरुभयोरपि । गच्छ सर्वं पितुर्ब्रूहि ज्ञात्वा वृत्तं यथाखिलम् २० [ ४६६१ ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्याने दुर्वासोभाषणे नवाधिकशततमोऽध्यायः ॥ १०९ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततस्तौ हंसडिंभकौ क्रुद्धौ कालेन चोदितौ । शिक्यं कमंडलुं चैव द्विदलं दारुमेव च १ दंडान्पात्रविशेषांश्च छित्वा भित्वा च सर्वशः । तस्मिन्देशे महाराज व्याधैर्मांसान्यदीदहन् २ भक्षयित्वा ततो देशात्स्वपुरीं तौ प्रजग्मतुः । जनार्दनश्च धर्मात्मा स्नेहादनुययौ तयोः ३ नष्टाविमाविति तदा स मेने दुःखितः परम् । गतेषु तेषु सर्वेषु दुर्वासा यतिसत्तमः ४ पलायनपरान्सर्वानिदं प्राह यतीश्वरान् । इतोदेशाद्विनिर्गत्य पुष्करात्पुण्यसंयुतात् ५ मन्दमन्दसमाश्वास्य विश्रम्य च ततस्ततः । प्रविश्य द्वारकां देवं शंखचक्रगदाधरम् ६ दृष्ट्वा च तस्मै प्रभवे वक्ष्यामो यतिसत्तमाः । स हि रक्षञ्जगदिदं धर्मवर्त्मनि संस्थितः ७ आद्यो लोकगुरुर्विष्णुर्यतात्मा तत्त्ववित्प्रियः । उद्धृत्य कंटकान्सर्वाञ्छशास पृथिवीमिमाम् ८ स च पापान्महाघोरान्सर्वान्पापकृतान्प्रभुः । रक्षेन्नः सकलान्सर्वाञ्ज्ञानेषु नियतात्मनः ९ इदमद्य क्षमं विप्रा यानमद्य विधीयताम् । साहसं यत्कृतं ताभ्यां पात्रभेदादि सत्तमाः १० एतत्सर्वमशेषेण दर्शयाम जनार्दनम् । तथेति ते प्रतिज्ञाय यतयो ज्ञानचक्षुषः ११ छिन्नं

---

' जा जा ' असें वारंवार बोलला १६, १७. नंतर उत्तम यति दुर्वास जनार्दनाला ह्मणाला, " हे विप्रेंद्रा, तुझें कल्याण होवो. तुझी जनार्दनावर मोठी भक्ति असो १८. त्या शंख–चक्र–गदाधराशीं तुझी संगति आज, उद्यां किंवा परवां ( ह्मणजे लवकरच ) होवो. कारण तूं सदां साधुच आहेस १९. दोन्ही लोकांमध्यें साधूचा विनाश होत नसतो. तूं जा व हें सर्व वृत्त समजून घेऊन पित्याला सांग २०. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्यानांतील एकशें नववा अध्याय समाप्त झाला ॥ १०९. ॥

वैशंपायनः— त्यानंतर कालानेंच ज्यांस प्रेरणा केली आहे असे रागावलेले ते दोघे हंस–डिंभकशिक्य, कमंडलु, वेळूचें भोजनपात्र, दंड, व यतींचीं आणखी पात्रादि विशेष सामग्री सर्वशः तोडून व फोडून टाकते झाले. हे महाराज, त्यांनीं त्याप्रदेशीं व्याधांकडून मांस जाळविलें १, २. आणि तें तेथेंच बसून खाऊन ते दोघे आपल्या नगरीस परत गेले. धर्मात्मा जनार्दन स्नेहानें त्यांच्या मागून गेला ३. अतिशय दुःखित झालेला तो त्यावेळीं हे दोघे मेले आहेत, नष्ट झाले आहेत, असें मनांत समजता झाला. नंतर ते सर्व निघून गेले असतां उत्तम यति दुर्वास पळत सुटलेल्या सर्व यतींस असें ह्मणाला, " या पुण्ययुक्त पुष्करप्रदेशांतून निघून मंद मंद गतीनें विश्रांति घेत द्वारकेस जाऊं या, चला. हे उत्तम यतींनो, तेथें शंख–चक्र–गदाधरास भेटून त्या प्रभूला आपलें दुःख सांगूं या. कारण या जगाचें रक्षण करणारा तो धर्ममार्गामध्यें स्थित आहे ४–७. तो आद्य लोकगुरु, यतात्मा, व तत्त्ववेत्त्यांस प्रिय असलेला विष्णु सर्व कंटकांस उपटून टाकून या पृथ्वीचें शासन करीत आहे ८. तो प्रभु या सर्व महाघोर प्राण्यांस मारून ज्ञानामध्यें नियतचित्त झालेल्या आह्मां सर्वांचें रक्षण करील ९. सांप्रतकाळीं हेंच करणें योग्य आहे. यास्तव हे विप्रांनो, आज त्याच्याकडे जाऊं या. हे उत्तमांनो, त्या दोघांनीं पात्रें फोडणें इत्यादि जें साहस केलें आहे तें सर्व आपण जनार्दनाच्या निदर्शनास आणूं या. "

ताभ्यां समादाय शिक्यं दारुमयं तथा । द्विदलं कर्पटं चैव कौपीनमथ वल्कलम् १२ कमंडलुं तथा राजन्नर्धप्रोतकपालकम् । एतानन्यान्समादाय द्रष्टुं केशवमाययुः १३ पंच चैव सहस्राणि पुरस्कृत्य महामुनीम् । दुर्वाससं तपोयोनिमीश्वरस्यात्मसंभवम् १४ अहोरात्रेण ते सर्वे द्वारकां कृष्णपालिताम् । ययुर्दान्ता महात्मानो लोमशाः केशवर्जिताः १५ प्रातः प्रविश्य राजेंद्र वापिकायां यतीश्वराः । स्नात्वोपस्पृश्य ते सर्वे यत्नेन महता तदा १६ द्रष्टुमभ्युद्यता विष्णुंकण्टकोद्धृतितत्परम् । एकरूपं समास्थाय सुधर्मायामवस्थितम् १७[४६७८] इति श्री० खिले० हरि० भवि० हंसडिं० यतीनां द्वारकागमनं नाम दशाधिकशततमोऽध्यायः ॥ ११० ॥

वैशंपायन उवाच ॥ अथ सर्वेश्वरो विष्णुः पद्मकिंजल्कलोचनः । श्यामः पीतांबरः श्रीमान्प्रलंबांबरभूषणः १ किरीटी श्रीपतिः कृष्णो नीलकुंचितमूर्धजः । अव्यक्तः शाश्वतो देवः सकलो निष्कलः शिवः २ क्रीडाविहारोपगतः कदाचिद्भवद्धरिः । कुमारैरपरैः सार्धं सात्यकिप्रमुखैर्नृप ३ गोलक्रीडां सुधर्माया मध्ये यादवसत्तमः । चकार प्रियकृत्कृष्णो युयुधानेन केशवः ४ ममायं प्रथमो गोलस्तव पश्चाद्भविष्यति । इति ब्रुवंस्तदा विष्णुः सात्यकिं कमलेक्षणः ५ पार्श्वस्था यादवास्तस्य वसुदेवपुरोगमाः । उद्धवप्रमुखा राजन्नासेदुः क्वचिदत्र वै ६ अन्यव्यापाररहितो भूतात्मा भूतभावनः । विजहार यथा रामः सुग्रीवेण पुरा नृप ७ मध्यं दिने महाविष्णुः शैनेयेन सहाच्युतः । विक्रीड्य सुचिरं कृष्ण उपारंसीत्स यादवः ८

---

तेव्हां ' बरें आहे, ' असें ह्मणून ते ज्ञानदृष्टि यति त्या दोघां उन्मत्तांनीं तोडले–फोडलेलें शिक्य, काष्ठमयपात्रादि, वेणूचें पात्र, कर्पट, कौपीन, वल्कल, कमंडलु, त्याचप्रमाणें हे जनमेजया, अर्धीं फुटकीं कपालें इत्यादि अनेक पदार्थ घेऊन ते केशवाचें दर्शन घ्यावयास आले १०-१३. ईश्वराचा पुत्र असा जो तपोयोनि दुर्वास महामुनि त्याला पुढें घालून पांच हजार मुनि तेथून निघाले १४. अहोरात्र मार्ग चालून ते सर्व कृष्णपालित द्वारकेस पोंचले. ते सर्व महात्मे दान्त, लोमश व केशरहित ( ह्म. जटावान् व मुंडन केलेले ) मुनीश्वर प्रातःकाळीं तेथें जाऊन पोचले. त्या नगरींत प्रवेश करून व हे राजेंद्रा, तेथील वापींत स्नान करून मोठ्या श्रद्धेनें आचमनादि करून ते सर्व कंटकांचा उद्धार करण्यास तत्पर असलेल्या व एकरूप धारण करून सुधर्मा सभेंत स्थित झालेल्या विष्णूस भेटावयास तयार झाले १५-१७. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिं० यतींचें द्वारकेस गमन याविषयीं एकशें दहावा अध्याय समाप्त झाला ॥ ११०. ॥

वैशंपायनः— नंतर कमलामधील किंजल्काप्रमाणें ज्याचे नेत्र आहेत असा, सर्वेश्वर, श्यामवर्ण, पीतांबरधारी, श्रीमान्, दोन्ही खांद्यावरून खालीं सोडलेलें उत्तरीय हेंच ज्याचें भूषण आहे असा, किरीटी, श्रीपति, कृष्ण, ज्याचे काळे व कुरळे केंस आहेत, असा अव्यक्त, शाश्वत, देव, कलावान्, निष्कल, व शिवरूप असा हरि, हे राजा, सात्यकिप्रभृति दुसऱ्या यादव कुमारांसह क्रीडा विहार करीत बसला होता. तो सर्वांचें प्रिय करणारा यादवोत्तम केशव कृष्ण सुधर्मा सभेंत बसून त्यावेळीं सात्यकीशीं अक्षक्रीडा करीत होता १–४. कमलनयन विष्णु तेव्हां सात्यकीस ' माझा हा प्रथम गोल आहे. तुझा मागून होईल. ' असें ह्मणत होता ५. हे राजन्, त्या सभेंतच त्याच्या बाजूस वसुदेवादि व उद्धवादि यादव बसले होते ६. जनमेजया, पूर्वीं सुग्रीवाबरोबर रामानें जसा विहार केला त्याप्रमाणें तो भूतात्मा व भूतभावन महाविष्णु सात्य-

द्वाःस्थेन वारिताः पूर्वं द्वार्येव च समास्थिताः। इदमन्तरमित्येवविविशुस्तां सभां नृप ; यतयो दीर्घतपसः पुरस्कृत्य तपोधनम् । दुर्वाससं सुमनसो ददृशुर्यादवेश्वरम् १० गोलक्रीडासमासक्तं करसंस्थितगोलकम् । पद्मपत्रविशालाक्षं विष्णुं तं सात्यकिं हरिम् ११ एकेनाक्ष्णाह्लादयन्तं परेणान्येन गोलकम् । यतयश्च महाराज प्रत्यदृश्यन्त तत्पुरः १२ वृष्णिपः पुण्डरीकाक्षः सात्यकिर्बलभद्रकः । वसुदेवस्तथाक्रूर उग्रसेनस्तथा नृप १३ अन्ये च यादवाः सर्वे संभ्रमं प्रतिपेदिरे । इदं किमिदमित्येवं व्याशंकमनसोऽभवन् १४ पृष्ठतोऽप्यनुगच्छन्तं दिधक्षन्तं जगत्त्रयम् । अर्धकौपीनवसनं स्मरन्तं कमपि द्विजम् १५ अंतस्तापसमायुक्तं छिन्नदंडधरं यतिम् । अन्तर्ज्वलन्तंरोषेणहंसासादितकल्मषम् १६ नेत्रोत्थितमहावह्निं प्रेक्षन्तं यादवेश्वरम् । दुर्वाससं ते ददृशुर्भीता यादवसत्तमाः १७ किं करिष्यत्यसौ क्रुद्धः किं वा वक्ष्यति नः प्रभुः । इति प्रांजलयः सर्वे यादवाः प्रतिपेदिरे १८ इदमासनमित्येवं किंचिदूचुश्च वृष्णयः । ततः कृष्णो हृषीकेशः किंचिदुत्प्लुत्य तत्पुरः १९ इदमासनमित्येवं स्थीयतामिह निर्वृतः । अहमद्य स्थितो विप्र किंकरोऽस्मीति चाब्रवीत् २० ततः किंचिदिवासीन आसने यतिविग्रहः । आसने संस्थिते तस्मिन्यतयो वीतमत्सराः २१ आसनानि यथायोगं भेजिरे निर्वृताः किल । अर्घादिसमुदाचारं चक्रे कृष्णः किरीटभृत् २२

---

कीशीं अन्य व्यापाररहित होऊन मध्यान्ह समयीं क्रीडा करीत होता. याप्रमाणें पुष्कळ वेळ क्रीडा करून नंतर तो यादव कृष्ण ती समाप्त करता झाला ७,८. तोंपर्यंत द्वारपालानें निवारण केल्यामुळें मुनि द्वारावरच उभे होते. ते हे राजा, हाच उचित काल आहे, असें जाणून सभेंत शिरले ९. ते दीर्घतपस्वी व शुभ मनानें युक्त असलेले यति तपोधन दुर्वास मुनीला पुढें करून यादवेश्वरास पाहते झाले १०. गोल क्रीडेमध्यें अत्यंत आसक्त झालेल्या ज्याच्या हातांत गोल ( गोलाकार फांसा ) आहे व कमलपत्राप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आहेत अशा सात्यकियुक्त हरीस त्यांनीं पाहिलें ११. त्यावेळीं एका नेत्रानें मुनींना आल्हादित करीत दुसऱ्या नेत्रानें गोलास पाहणाऱ्या त्या हरीपुढें ते सर्व यति गेले १२. हे महाराज जनमेजया, वृष्णिपाल पुंडरीकाक्ष, सात्यकि, बलभद्र, वसुदेव, अक्रूर, उग्रसेन, व दुसरे यादव यांची ते मुनि दृष्टीं पडतांच मोठी गडबड उडाली. हें काय, हें काय, असें ह्मणून ते साशंक झाले १३ १४. मागून येणाऱ्या, जगत्त्रयास जाळण्याची इच्छा करणाऱ्या, अर्धकौपीन हेंच ज्याचें वस्त्र आहे व स्मरण करीत असलेल्या एका द्विजाला त्यांनीं पाहिलें १५. तो यति त्यावेळीं आंतल्या आंत अतिशय संतप्त झाला होता. त्यानें तुटका दंड हातांत धारण केला होता. हंसानें ज्याला दुःख दिलें आहे असा तो रोषानें मनांत जळत होता १६. ज्याच्या नेत्रापासून महाअग्नि निघाला आहे व जो यादवेश्वराकडे पहात आहे. अशा त्या दुर्वास मुनीला भयभीत झालेल्या उत्तम यादवांनीं पाहिलं १७. हा रागावलेला मुनि आतां काय करील ? हा प्रभु आह्मांला काय ह्मणेल ? असें मनांत बाळून सर्व यादव हात जोडून बसले १८. ' हें आसन ' असें वृष्णिवीर त्याला हळूच ह्मणाले. नंतर हृषीकेश कृष्ण कांहींसा वेगानें त्याच्यापुढें जाऊन १९, ' मुनिवर्य, हें आसन आहे, यावर आपण सुखानें बसावें. हे विप्रवर्य, मी आपला किंकर आहें. व काय सांगाल तें करण्यास तयार आहें ' असें ह्मणाला २०. त्यानंतर ते यतीचें शरीर कांहींसें आसनावर स्थिर झालें. तो अग्रेसर मुनि आसनावर बसतांच दुसरे मत्सररहित मुनि मोठ्या संतोषानें

आह भूयो हृषीकेशो यतिं दुर्वाससं प्रभुम् । किमर्थं ब्रूहि विप्रेंद्र अस्मिन्प्रत्यागमो हि वः २३ दृष्टं वा ह्यथवा किंचित्कारणं चास्ति वो महत् । संन्यासिनो द्विजश्रेष्ठा यूयं विगतकल्मषाः २४ निःस्पृहाश्च सदा यूयमस्मत्तोद्विजपुंगवाः । प्रार्थ्यं नाम न चैवास्ति स्पृहा नैवास्ति वो यतः २५ स्पृहाप्रेरितकर्माणः क्षत्रियान् यान्ति सुव्रताः । निरूप्यमाणमस्माभिर्विप्र किंचिन्न दृश्यते २६ न जाने कारणं ब्रह्मन्युष्मदागमनं प्रति । एतावता चानुमेयं किंचित्कारणमस्ति वै २७ तद्ब्रूहि यदि विद्येत त्वत्तो ज्ञास्यामहे वयम् । इत्युक्तवति देवेशे चक्रपाणौ जनार्दने २८ तस्यापि राजन्विप्रस्य भूयः कोपो महानभूत् । तस्मादभ्यधिकः पूर्वात्कोपः संजायते महान् २९ दिधक्षन्निव लोकांस्त्रीन्भक्षयन्निव पश्यतः । रोषरक्तेक्षणः क्रुद्धो हसन्निव दहन्निव ३० उवाच वचनं विष्णुं दुर्वासाः क्रोधमूर्च्छितः । न जाने इति कस्मात्त्वं ब्रूषे नो यादवेश्वर ३१ जानामि त्वां महादेवं वंचयन्निव भाषसे । पुरातना वयं विष्णो पूर्ववृत्तान्तवेदिनः ३२ तथाहि देवदेवोऽसि मायामानुषदेहवान् । निगूहसे प्रभुरतः कस्मान्नो जगतीपते ३३ सोऽसि ब्रह्मविदां मूर्तिस्तदेतत्परमं पदम् । यदभ्यर्च्य पुरा ब्रह्मा यच्च ज्ञाना वयं पुरा ३४ यतो विश्वमिदं भूतं तदेतत्परमं पदम् । यच्च स्थूलं विजानन्ति

---

यथायोग्य रीतीनें आसनावर बसले. नंतर किरीट धारण करणाऱ्या कृष्णानें अर्घ्यादि उपचारांनीं त्यांचा सत्कार केला २१,२२. नंतर हृषीकेश पुनरपि प्रभु दुर्वासयतीस ह्मणाला, " हे विप्रेंद्रा, तुमचें आगमन येथें कोणत्या हेतूनें झालें आहे ? २३. आपण कांहीं कारण पाहिलें किंवा ऐकलें असेल. व त्या मोठ्या कारणानेंच येथें आला असाल ! कारण तुम्ही द्विजश्रेष्ठ, संन्यासी, निष्पाप, व सदा निःस्पृह आहां. तुम्हांला स्पृहा कशी ती मुळींच नसल्यामुळें हे द्विजश्रेष्ठांनो, तुम्हांला आमच्यापाशीं मागण्यासारखें असें कांहींच नाहीं २४,२५. ज्यांना स्पृहेनें प्रेरणा केली आहे, असे उद्यमी सुव्रत द्विजच क्षत्रियांकडे जात असतात. आपल्या येण्याचें कारण काय असावें. म्हणून पुष्कळ विचार करूनही तें आमच्या लक्ष्यांत येत नाहीं २६. हे ब्रम्हन्, तुमच्या आगमनाचें कारण मला कळत नाहीं. कांहीं तरी कारण असावें एवढें मात्र अनुमान होत आहे २७. यास्तव, कांहीं कारण असल्यास सांगावें. म्हणजे तुमच्या शब्दावरूनच तें व्यक्त होईल. " असें देवेश चक्रपाणि जनार्दन ह्मणाला असतां त्या विप्राचाही कोप आणखी अधिक वाढला. प्रथम जो रोष होता त्याच्याहून तो आणखी कितीतरी वाढला २८,२९. तीन लोकांस जाळण्याची इच्छा करीत असल्याप्रमाणें व पाहणारांस भक्षण करीत असल्याप्रमाणें क्रोधानें ज्याचे नेत्र लाल झाले आहेत असा रागावलेला व देहभानही विसरलेला दुर्वास हसत व जाळीतचसा विष्णूला असें वचन बोलला, " हे यादवेश्वरा, तूं आह्मांला असें कशासाठीं बोलत आहेस, तें कांहीं कळत नाहीं ३०,३१. मी तुज महादेवास ओळखतों. आह्मांला ठकविण्यासाठीं असें भाषण करीत आहेस. हे विष्णो, आह्मी पुरातन व पूर्ववृत्तान्त जाणणारे आहों ३२. कशावरून ह्मणून म्हणशील तर सांगतों— तूं देवाधिदेव आहेस. मायेच्या आश्रयानें मानुषदेहवान् झाला आहेस. हें आह्मांला ठाऊक असतांना हे जगतीपते, आह्मांपासून आपलें तत्त्व लपवितोस कशाला ? ३३. तो तूं ईश्वर ब्रह्मवेत्त्यांची मूर्ति आहेस. हेंच तें परमपद आहे. ज्याची अर्चा करूनच ब्रह्मापूर्वी सृष्टिकर्ता झाला व आह्मी ज्ञानवान् झालों ३४. ज्याच्यापासून हें विश्व निर्माण झालें तेंच हें पर-

पुरातत्त्वेन चेतसा ३५ पुराविदोऽथ विश्वेश तदेतत्परमं वपुः । कर्मणा प्राप्यते यत्तु यत्स्मृत्वा निर्वृता वयम् ३६ प्रत्यक्षमपि यद्रूपं नैव जानन्ति मानुषाः । न हि मूढधियो देव न वयं तादृशा हरे ३७ न जाने इति यद्ब्रूषे किमतः साहसं वचः । ये हि मूलं विजानन्ति तेषां तु प्रविवेचनम् ३८ कुर्वतः किं फलं देव तव केशिनिषूदन । वेदान्ते प्रथिततेजस्तव चेदं विचार्यते । ३९ ये च विज्ञानतृप्तास्तु योगिनो वीतकल्मषाः । पश्यन्ति हृत्सरोजेऽपि तदेवेदं वपुः प्रभो ४० वेदैर्यद्गीयते तेजो ब्रह्मेति प्रस्तिपाद्य वै । तदेवेदं विजानेऽहं रूपमैश्वरमेव च ४१ वैष्णवं परमं तेज इति वेदेषु पठ्यते । अवगच्छाम्यहं विष्णो तदेवेदं वपुस्तव ४२ य ओमित्युच्यते शब्दो यस्य वागिति गीयते । स एवासि प्रभो विष्णो न जाने इति मा वद ४३ परोक्षं यदि किंचित्स्यात्तव वक्तुं प्रयुज्यते । न जाने इति गोविंद मा वादीः साहसं हरे ४४ विश्वं यदा प्रादुरासीद्यस्मिँल्लीनं क्षये सति । इदं तदैश्वरं तेजस्त्ववगच्छामि केशव ४५ कर्ता त्वं भूतभव्येश प्रतिभासि सदा हृदि । यद्यद्रूपं स्मरेन्नित्यं तत्तदेवासि मे हृदि ४६ वायुरेव यदा विष्णुरिति मे धीयते मतिः । तदा तद्रूपमेवासि हृन्मध्ये संस्थितो विभो ४७ आकाशो विष्णुरित्येव कदाचिद्धीयते मतिः । तदा तद्रूपमेवासि हृन्मध्ये संस्थितो विभो ४ पृथिवीविष्णुरित्येतत्कदाचिद्धीयते मतिः । तदा पार्थिवरूपस्त्वं प्रतिभासि सदा मम ४९ रसोऽयं

---

मपद आहे. हें जें स्थूल दिसत आहे तेंही प्राचीनतत्त्वच आहे असें ज्ञानी सूक्ष्मदृष्टीनें जाणतात ३५. हे विश्वेशा, पुराणवेत्ते ज्याला जाणतात तेंच हें परम शरीर आहे. तें कर्मानें प्राप्त होतें. त्याचें स्मरण करूनच आह्मी सुखी झालों आहों ३६. हे देवा, तें रूप प्रत्यक्ष असूनही मूढबुद्धि मानुष त्याला जाणत नाहींत. पण हरे, आह्मी तसे नाहीं ३७. असें असतांना 'तुमच्या येण्याचें कारण मी जाणत नाहीं' असें म्हणणें यांहून अधिक साहस तें कोणतें ? ज्यांना मूळ ठाऊक असतें त्यांचें विस्तृत विवेचन, हे देवा केशिनाशका, काय कामाचें ? कारण त्यांनीं तें कितीही जरी केलें तरी व्यर्थच होय. वेदान्तामध्यें तुझ्या या तेजाचाच विचार केला जातो ३८,३९. जे विज्ञानानें तृप्त झालेले असतात ते निष्पाप योगी, हे प्रभो, हेंच तुझें स्वरूप हृदयकमलांत पाहतात ४०. ब्रह्म असें प्रतिपादन करून वेदामध्यें जें तेज गायलें जातें तें हें ईश्वरसंबंधीच रूप आहे, असें मी जाणतों ४१. हे विष्णो, वेदांमध्यें वैष्णवपरमतेज म्हणून जें गायलें जातें तेंच हें तुझें शरीर आहे, हें मी जाणतों ४२. ॐ असा जो शब्द उच्चारला जातो, ऋग्वेदादिलक्षणवाणी ज्याची आहे म्हणून वेद ह्मणतात. हे विष्णो, हे प्रभो, तोच तूं आहेस. यास्तव मी जाणत नाहीं असें ह्मणूं नकोस ४३. तुला जर कांहीं परोक्ष असतें तर तसें ह्मणणें शोभतें. पण हे हरे, तसें नसतांना मी जाणत नाहीं, असें साहसवचन, बा गोविंदा, तूं बोलूं नको ४४. हे केशवा, हें विश्व ज्याच्यापासून प्रादुर्भूत झालें व प्रलय झाला असतां ज्याच्यामध्यें लीन होऊन राहणार आहे तेंच हे ईश्वराचें तेज आहे, हें मी जाणतों ४५. हे भूतभव्येशा, तूं कर्ता असून सदा हृदयांत भासतोस. नित्य ज्या ज्या रूपाचें स्मरण करावें तें तेंच माझ्या हृदयांत तूं होऊन राहतोस ४६. वायुच विष्णु आहे, अशी भावना माझी मति जेव्हां करते तेव्हां हे विभो, माझ्या हृदयामध्यें तूं त्या रूपानेंच अवस्थित होतोस ४७. जेव्हां एकादेवेळीं मति आकाशच विष्णु आहे, असा निश्चय करते तेव्हां हे विभो, तूं माझ्या हृदयांत आकाशरूपानेंच संस्थित होतोस ४८. एकादेप्रसंगीं पृथि-

देव इत्येव कदाचिच्चिन्त्यते मया । तदा रसात्मना विष्णो हृन्मध्ये संस्थितो विभो ५०
यदा त्वं तेज इत्येवं स्मर्ता स्यां पुरुषोत्तम । तदा तद्रूपसंपन्नः प्रतिभासि सदा हृदि ५१
चंद्रमा हरिरित्येवं तदा चांद्रमसं वपुः। निरीक्ष्य चक्षुषा देव ततः प्रीतोऽस्मि केशव ५२ यदा
सौरं वपुरिति स्मर्ता स्यां जगतीपते । तदा तद्भावनायोगात्सूर्य एव विराजसे ५३ तस्मात्सर्वं
त्वमेवासि निश्चिता मतिरीदृशी । अतो न जानेऽहमिति वक्तुं नेशोजनार्दन ५४ इत्यर्थं
संस्थितो विष्णो पीडां नोनैव चिन्त्यसे । अत्यन्तदुःखिता विष्णो वयं त्वामनुसंस्थिताः ५५
ईदृशीयमवस्था नो नैतां स्मरसि केशव । एतत्पुनर्भाग्यमतो नष्टमित्येव चिन्तये ५६ मन्द-
भाग्या वयं विष्णो यतो नो नः स्मरेः प्रभो । कौचित्क्षत्रियदायादौ गिरीशवरगर्वितौ ५७
नाम्ना हंसडिंभकौ च बाधेते नोजनार्दन । गार्हस्थ्यं हि सदा श्रेयो वदन्ताविति केशव ५८
इतस्ततश्च धावन्तौ वदन्तौ बहुकिल्बिषम् । अयुक्तं बहुभाषन्तौ धर्षयन्तौ च नः सदा ५९
इदमन्यत्कृतंदेवअसह्यंपापमुच्यते । पश्येदं बहुधा देव भिन्नं भिन्नं सहस्रशः ६० शिक्यं
च दारवं पात्रं द्विदलान्वेणुकान्बहून् । इदमप्यपरं पश्य तयोः साहसचेष्टितम् ६१ कौपीनं
बहुधा च्छिन्नं तदस्माकं महद्धनम् । कृतं कपालमात्रेण कमण्डलुजचत्प्रभो ६२ त्वं तु नो
रक्षसे नित्य क्षात्रं वै व्रतमास्थितः । चित्रं चित्रमिदं देव रक्षस्यासि सदा निशम ६३ किं

---

वीच विष्णु आहे, असें माझ्या मतीला भासतें. त्यावेळीं हे देवा, तूं मला सदां पार्थिवरूप भासतोस ४९. हा देव रस आहे, असें मी एकादेवेळीं चिंतन करतों. तेव्हां हे विभो, विष्णो, तूं रसरूपानें माझ्या हृदयांत स्थित होतोस ५०. हे पुरुषोत्तमा, तूं तेज आहेस असें जेव्हां मी तुझें स्मरण करतों तेव्हां तूं तेजोरूप होऊन सदां माझ्या हृदयांत व्यक्त होतोस ५१. मी जेव्हां हरि चंद्रमा आहे, असें समजतों तेव्हां हे देव, हे केशव, या नेत्रानें तुला पाहून मी संतुष्ट होतों ५२. हे जगतीपते, जेव्हां मी ‘ हा देव सूर्यरूप आहे, ’ असें स्मरण करतों तेव्हां त्या भावनेच्या योगानें तूं सूर्य होऊनच विराजमान होतोस ५३. तस्मात् सर्व तूंच आहेस, अशी माझी निश्चित मति आहे. यास्तव हे जनार्दना, मी जाणत नाहीं, असें म्हण-ण्यास तूं समर्थ नाहींस, असें मी स्वतः जाणून राहिलों आहे. पण हे विष्णो, तूं आमच्या पीडेविषयीं मुळींच चिंता करीत नाहींस. हे भगवन्, अत्यंत दुःखित झालेले आह्मी तुला शरण आलों आहों ५४,५५. आमची ही अशी दशा झालेली असूनही केशवा, तूं तिचें स्मरण करीत नाहींस. त्याअर्थीं आमचें भाग्यच नष्ट झालें आहे, असें मी समजतों ५६. हे विष्णो, आह्मी मंदभाग्यवान् आहों. ह्मणूनच तुला आमची आठवण होत नाहीं. शंकराच्या वरानें गर्वित झालेले कोणी हंस व डिंभक नांवाचे क्षत्रियपुत्र आह्मांला दुःख देतात. हे केशवा, गृहस्थाश्रमच सदां श्रेयस्कर आहे, असा ते आह्मांला उपदेश करितात ५७,५८. ते कालच आमच्या आश्रमांत येऊन इतस्ततः धावत, पुष्कळ पाप बोलत, अयोग्य भाषण करीत व आह्मांला भिववीत सुटले ५९. हे देवा, त्यांनीं केलेलें हें आणखी एक असह्य पाप मी सागतों. हे ईश्वरा, त्यांनीं सर्व यतींचीं सहस्रावधि शिंकीं, काष्ठपात्रें व वेळूच्या कामट्यांचीं पात्रें, तोडून फोडून टाकलीं आहेत तीं पहा. हेंही आणखीं त्यांचें साहसाचें कृत्य पहा ६०,६१. आह्मां यतींचें कौपीनच कायतें महाधन; पण त्याचेही त्या दुष्टांनीं तुकडे तुकडे करून टाकले आहेत. हे जगत्प्रभो, आमच्या कमंडलूंचीं त्यांनीं खापरें करून सोडलीं ६२. क्षात्रव्रत धरून तूं तर आमचें सतत रक्षण करीत असतोस. पण हे

करिष्यामि मंदात्मा मन्दभाग्या वयं विभो । किं नः शरणमद्यैव तद्ब्रूहि जगतांपते ६४ जीवन्तौ तौ यदि स्यातां नष्टा लोका इमे त्रयः । न विप्रा न च राजानो न वैश्या न च पादजाः ६५ अत्यन्तबलिनौ मत्तौ तीक्ष्णदण्डधरौ नृप । न तयोः पुरतः स्थातुं शक्ता देवाः सवासवाः ६६ न च भीष्मो न वा राजा बाह्लीको भीमविक्रमः । यो हि वीरो जरासन्धः क्षत्रियाणां भयंकरः ६७ नैव च प्रायशः स्यातुं गिरीशवरदर्पिणोः । तयोः कृष्ण हरे शक्तो नित्यमप्रतिसंगिनोः ६८ तस्मात्त्वं जहि तौ वीरो रक्ष लोकानिमान्प्रभो । अन्यथा रक्षसीत्येवं व्यर्थः शब्दोऽत्र जायते ६९ बहुनात्र किमुक्तेन रक्ष रक्ष जगत्त्रयम् । इत्युक्त्वा विररामैव दुर्वासाः क्रोधमूर्छितः ७० [ ४७४८ ] इति श्रीम० खिलं० हरि० हंसडिं० दुर्वासः कृष्णसमागमो नामैकादशाधिकशततमोऽध्यायः ॥ १११ ॥

वैशंपायन उवाच ॥ यतेर्वचनमाकर्ण्य मंदमुच्छ्वस्य केशवः । दुर्वाससं समालोक्य बभाषे यादवेश्वरः १ क्षंतव्यं भवता पूर्वं दोष एव ममैव हि । शृणुवाक्यं ममैतत्तु श्रुत्वा शान्तिपरो भव २ जेष्यामि तौ रणे विप्र हंसं डिंभकमेव च । गिरीशो वा वरं दद्याच्छक्रो वा धनदोपि वा ३ यमो वा वरुणो वापि ब्रह्मा वाथ चतुर्मुखः । सबलौ सानुजौ हत्वा पुनर्दास्यामि वो रतिम् ४ सत्येनैव शपाम्यद्य मा रोषवशगो भव । रक्षां वोऽहं करिष्यामि हत्वा तौ च नृपाधमौ ५ जानामि तौ दुरात्मानौ युष्मद्दोषकरौ हि तौ । श्रुतं च पूर्वमस्माभिस्तीक्ष्णदण्डधराविति ६ अत्यन्तबलिनौ मत्तौ गिरीशवरदर्पितौ । नाल्पप्रयत्नसंसाध्यौ

---

देवा, तूं असतांना व अहोरात्र रक्षण करीत असतांनाही आमची अशी दशा व्हावी हें मोठें, फारच मोठें आश्चर्य आहे ६३. आतां म्या मंदात्म्यानें काय करावें ? हे विभो, आह्मी मंदभाग्यवान् आहों. हे जगत्पते, आम्ही आतां शरण कोणाला जावें तेवढें सांग, म्हणजे झालें ६४. पण ते दोघे जर जिवंत राहिले तर हे तिन्ही लोक नष्ट झाले म्हणून समज. हे राजन्, त्या अत्यंत बलाढ्य, मत्त व तीक्ष्ण दंडधर अशा राजपुत्रांपुढें उभे राहण्यास ब्राम्हण, राजे, वैश्य, शूद्र व फार काय पण इंद्रासह देवही समर्थ नाहींत ६५. महापराक्रमी भीष्म, राजा बाल्हीक व क्षत्रियांस भयंकर वाटणारा वीर जरासंध यांतीलही कोणी शंकराच्या वरानें दृप्त झालेल्या व नित्य अप्रतिद्वंद्वी अशा त्या दोघांपुढें उभा राहण्यास प्रायः समर्थ नाहीं. यास्तव, हे कृष्णा, हरे, हे प्रभो, तूं त्या दोघा वीरांना मार. आणि या लोकांचें रक्षण कर. नाहींपेक्षां तूं रक्षण करतोस हें म्हणणें व्यर्थ होईल ६६–६९. याविषयीं पुष्कळ सांगून काय करावयाचें आहे ? प्रभो, त्रिभुवनाचें रक्षण कर, रक्षण कर." इतकें बोलून क्रोधमूर्छित दुर्वासमुनि गप बसला ७०. इति श्रीम० खि० हरि० भविष्य० हंसडिंभको० दुर्वासकृष्णसमागमनामक एकशें अकरावा अध्याय समाप्त झाला ॥ १११. ॥

वैशंपायनः—यतीचें हें भाषण ऐकून, मंद उच्छ्वास सोडून आणि दुर्वासमुनीकडे पाहून यादवेश्वर ह्मणाला १, स्वामिन्, अगोदर आपण मला क्षमा करा. यांत माझाच अपराध आहे. हें माझें वचन ऐकून शांतिपरायण व्हा २. मी हंस व डिंभक यांना रणांत जिंकीन. त्यांना शंकर वर देऊं दे, कीं इंद्र, कुबेर, यम, वरुण, व चतुर्मुख ब्रम्हा वर देऊं दे. मी त्या दोघांना त्यांचें सैन्य व अनुज यांसह मारून तुह्मांला संतोष देईन ३,४. मी सत्याची शपथ घेऊन हें तुह्मांला सांगत आहे. रोषवश होऊं नका. त्या अधम राजपुत्रांना मारून तुमचें संरक्षण करीन ५. तुमचा अपराध करणाऱ्या त्या दुरात्म्यांना

जरासन्धहितैषिणौ ७ प्राणानपि तयोराजा दास्यत्येव न संशयः । जरासन्धो महीपालो विनातेनयतेमहि ८ जये तयोर्विप्रवर्य तत्रश्रेयो भवेत्तुनः । यत्र यत्र तु तौ गत्वा स्थिताविस्यनुशुश्रुमः ९ तत्र तत्र च हन्ताहं नात्र कार्या विचारणा । गच्छध्वं यतयः स्वैरं निजकार्यपरायणाः १० अचिरेणैव कालेन जेष्यामि रणपुंगवौ । ततः प्रीतः प्रसन्नात्मा यादवेश्वरमाह सः ११ स्वस्त्यस्तु भवते कृष्ण जगतां स्वस्तिकुर्वते । किं नु नाम जगन्नाथ दुःसाध्यं तव केशव १२ त्रिलोकेश त्रिधामासि सर्वसंहारकारकः । देवानामपि देवेश सर्वत्र समदर्शनः १३ विष्णो देव हरे कृष्ण नमस्ते चक्रपाणये । नमः स्वभावशुद्धाय शुद्धायनियताय च १४ शब्दगोचर देवेश नमस्ते भक्तवत्सल । अज्ञानादथवाज्ञानाद्यन्मयोक्तं क्षमस्व तत् १५ त्वमेवाहं जगन्नाथ नावयोरन्तरं पृथक् । अतः क्षमस्व भगवन्क्षमासारा हि साधवः १६ श्रीभगवानुवाच ॥ क्षंतव्यं भवता विप्र क्षमासारा वयं सदा । संन्यासिनः क्षमासाराः क्षमा तेषां परं बलम् १७ क्षमा मोक्षकरी नित्यं तत्वज्ञानमिव द्विज । क्षमा धर्मः क्षमा सत्यं क्षमा दानं क्षमा यशः १८ क्षमा स्वर्गस्य सोपानमिति वेदविदो विदुः । तस्मात्सर्वप्रयत्नेन क्षमां पालयत स्वकाम् १९ प्रत्यक्षज्ञानसंयुक्ता यूयं सर्वे यतीश्वराः । य एते यतयो विप्राः

---

मी जाणतों. ते तीक्ष्ण दंड धारण करणारे आहेत, अत्यंत बलाढ्य आहेत, मत्त व शंकराच्या वरानें दृप्त झाले आहेत, अल्प प्रयत्नानें साध्य होण्यासारखे नाहींत, जरासंधाच्या हिताची इच्छा करणारे आहेत इत्यादि आह्मी पूर्वीच ऐकलें आहे ६,७. त्यांच्यासाठीं तो जरासन्ध राजा प्राणही देईल, यांत कांहीं संशय नाहीं. यास्तव आह्मी त्याच्यावाचूनच त्यां दोघांना गाठून मारण्याचा प्रयत्न करूं ८. हे विप्रवर्य, त्या दोघांना जिंकल्यानें त्यांत आमचें कल्याणच होणार आहे. जेथें जेथें ते जाऊन राहिले आहेत असें आह्मी ऐकूं तेथें तेथें मी जाऊन त्यांना मारीन; याविषयीं तुह्मी तिळभरही चिंता करूं नका. अहो यतींनो, तुह्मीं आतां आपल्या कार्यामध्यें परायण होऊन स्वस्थानीं खुशाल जा. थोडक्याच कालांत मी त्या रणपुंगवांना जिंकीन. श्रीकृष्णाचें हें भाषण ऐकून ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे, असा तो मुनि यादवेश्वरास ह्मणाला, " हे कृष्णा, जगाचें कल्याण करणाऱ्या तुझें कल्याण होवो. हे जगन्नाथा केशवा, तुला दुःसाध्य काय आहे ? ९–१२. हे त्रिलोकेशा, तूं त्रिधामा व सर्वसंहारकारक आहेस. तूं देवांचाही देवेश आहेस. सर्वत्र समदृष्टि ठेवणारा आहेस १३. हे विष्णो, हे हरे, हे देव, हे कृष्ण, तुज चक्रपाणीला नमस्कार असो. स्वभावशुद्ध, शुद्ध, व नियत अशा तुला नमस्कार असो १४. हे शब्दगोचर, हे देवेश, हे भक्तवत्सल, तुला मी प्रणाम करतों. मी ज्ञानानें ( बुद्धि पुरःसर ) अथवा अज्ञानानें जें कांहीं तुला बोललों आहें त्याची क्षमा कर १५. हे जगन्नाथ, तूंच मी आहें. आमच्यामध्यें भेदभाव मुळींच नाहीं. यास्तव हे भगवन्, क्षमा कर. कारण साधूंचें क्षमा हेंच बल आहे १६. श्रीभगवान्:– हे विप्रवर्य, आपण क्षमा करा. आह्मी सदां क्षमाप्रधानच आहों. संन्याशांचें सारही क्षमाच असते. क्षमा हेंच त्यांचें उत्कृष्ट बल आहे १७. हे द्विज, तत्त्वज्ञानाप्रमाणेंच क्षमा ही नित्य मोक्ष देणारी आहे. क्षमाच धर्म, क्षमाच सत्य, क्षमा हेंच दान, व क्षमा हेंच यश होय १८. क्षमा स्वर्गाची शिडी आहे, असें वेदवेत्ते समजतात. यास्तव सर्व प्रयत्नानें तुह्मी आपल्या क्षमेचें परिपालन करा १९. तुह्मी सर्व यतीश्वर प्रत्यक्ष ज्ञानसंपन्न आहां. हे जे विप्र यति आहेत

पूजनीया मयाद्य वै २० भोक्तव्या यतयो विप्रा भिक्षुकाः सर्व एव हि । तथेति ते प्रतिज्ञाय भोक्तुमैच्छन्हरेर्गृहे २१ ततः स्वभवनं विष्णुः प्राविश्य हरिरीश्वरः । चतुर्विधं तथाहारं कारयित्वा यथाविधि २२ भोजयामास तान्सर्वान्यतीन्यतिवरार्चितः । छित्त्वा छित्त्वा च देवेशो दुकूलानि मृदूनि सः २३ ददौ तेभ्यस्तदा विष्णुः सर्वेभ्यो जनमेजय । ते च प्रीता यथायोगं यथापूर्वं ततो गताः २४ [ ४७७२ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्याने यतिभोजननाम द्वादशाधिकशततमोऽध्यायः ॥ ११२ ॥

वैशंपायन उवाच ॥ दुर्वासास्त्वथ तत्रैव नारदेन महात्मना । चिंतयन् ब्रह्मणस्तत्त्वं विजहार यथासुखम् १ भगवानपि गोविन्दस्तयोर्वासममन्यत । ततस्तौ हंसडिंभकौ तस्मिन्काले महीपतिम् २ ब्रह्मदत्तं महीपालं पितरं वीर्यशालिनम् । प्रावोचतामिदं वाक्यं समेताज्जनसंसदि ३ राजसूयं महायज्ञं पितः कुरु सुयत्नतः । अस्मिन्मासि नृपश्रेष्ठ यतावो यज्ञसिद्धये ४ आवां तस्य महाराज दिशां विजयतत्परौ । यतिष्यावो बलैः सार्धं गजैरश्वै रथैरपि ५ संभारा यज्ञसिद्ध्यर्थमानेतव्या नृपोत्तम । तथेति स महाबाहो ब्रह्मदत्तोऽब्रवीत्तदा ६ जनार्दनस्तु विप्रेन्द्रो दृष्ट्वा साहसतत्परौ । अशक्यमिति मन्वानो वयस्यं हंसमब्रवीत् ७ शृणु हंस वचो मह्यं श्रुत्वा निश्चित्य वीर्यवान् । आयुष्मन्साहसं कर्तुमुद्यतोऽसि नृपोत्तम ८ स्थिते भीष्मे जरासन्धे बाह्लीके च नृपोत्तमे । किं च वीरेषु सर्वेषु यादवेषु

---

ते सर्व मला आज पूजनीय आहेत. यास्तव सर्व भिक्षुक, यति व ब्राह्मण यांनीं आज आमच्या येथें भोजन करावें. कृष्णाच्या या प्रार्थनेस आपली संमति देऊन ते हरीच्या घरीं भोजन करण्याची इच्छा करते झाले २०,२१. तेव्हां विष्णु, हरि, ईश्वर आपल्या घरीं जाऊन यथाशास्त्र चतुर्विध आहार करविता झाला. यतिश्रेष्ठांकडून पूजला गेलेला तो त्या सर्व यतींना भोजन घालता झाला. त्या देवेशानें मृदु रेशमी वस्त्रें तोडतोडून हे जनमेजया, त्या सर्वांस कौपीनीं करण्याकरितां वाटून दिलीं. त्यामुळें अतिशय संतुष्ट झालेले ते सर्व आल्यामार्गानें स्वस्थानीं गेले २२–२४. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिंभ० यतिभोजननामक एकशें बारावा अध्याय समाप्त झाला ॥ ११२. ॥

वैशंपायनः— त्यांतील एक दुर्वासमुनि मात्र महात्म्या नारदाशीं ब्रह्मतत्त्वाचा विचार करीत मोठ्या आनंदानें तेथेंच विहार करीत राहिला १. भगवान् गोविंदानेंही त्यांचा तेथील निवास मान्य केला. इतक्यांत तिकडे हंस व डिंभक आपल्या राजा ब्रह्मदत्त नांवाच्या वीर्यशाली पित्यापाशीं जाऊन जनसभेंत असें वचन बोलले २,३. “ बाबा, तुह्मी मोठ्या प्रयत्नानें राजसूय महायज्ञ करा. हे श्रेष्ठ राजा, याच महिन्यांत त्याच्या सिद्धीकरितां आह्मी यत्न करूं ४. हे महाराज, आह्मी आजच दिशांचा विजय करण्यास तयार आहों. गज, अश्व व रथ यांसह आह्मीं सैन्यांच्या योगानें यत्न करणार आहों ५. हे उत्तम राजा, यज्ञसिद्ध्यर्थ संभार आणावे. ” पुत्रांचें हें ह्मणणें ब्रह्मदत्तराजास मान्य झालें. हे महाबाहो, त्यानें ‘ बरें आहे, ’ असें ह्मटलें ६. पण विप्रेंद्र जनार्दन त्या दोघां मित्रांस साहसतत्पर पाहून त्यांचा उद्देश सिद्ध होणें अशक्य आहे असें जाणणारा तो हंस मित्रास ह्मणाला ७, “ हंसा, माझें वचन ऐक. तें ऐकून त्याचा चांगला निश्चय कर; नंतर कार्याला आरंभ कर. बा आयुष्मन् नृपोत्तमा, तूं साहस करावयास प्रवृत्त झाला आहेस ८. भीष्म, जरासंध, नृपोत्तम बाल्हीक तसेच

नृपोत्तम ९ भीष्मो हि बलवान्वृद्धः सत्यसंधो जितेन्द्रियः । त्रिःसमकृत्वः पृथिवीं यो जिगाय भृगूत्तमः १० तं युद्धे जितवान्भीष्मः सर्वक्षत्रस्य पश्यतः । जरासन्धस्य यद्वीर्यं तद्भवान्वेत्ति संयुगे ११ वृष्णिवीरास्तु ते सर्वे कृतास्त्रा युद्धदुर्मदाः । तत्र कृष्णो हृषीकेशो जितशत्रुः कृती सदा १२ जरासन्धेन सहितः सदा युद्धे जितश्रमः । प्रमुखे तस्य न स्थातुं शक्तो जीवन्नृपोत्तमः १३ बलभद्रस्तथा मत्तः क्रुद्धो यदि भवेद्बली । लोकानिमान्समाहर्तुं शक्नोतीति मतिर्मम १४ तथा च सात्यकिर्वीरः शक्तो जेतुं रणे रिपून् । तथान्ये यादवाः सर्वे कृष्णमाश्रित्य दंशिताः १५ अस्माभिश्च कृतः पूर्वं विरोधो यतिभिः सह । दुर्वासा यतिभिः सार्धं गतो द्रष्टुं स केशवम् १६ इति श्रुतं नृपश्रेष्ठ ब्राह्मणाद्धौकुमागतात् । तथा सति यथासिद्ध्येत्तथा चिन्त्य च मंत्रिभिः १७ ततः पश्चाद्विधास्यामो राजसूयं महाक्रतुम्। हंस उवाच ॥ को नाम भीष्मो मन्दात्मा वृद्धो हीनबलः सदा १८ आवयोः पुरतः स्थातुं शक्तः स किल वृद्धकः । यादवा इति चित्रं नः शक्ताः स्थातुं रणे द्विज १९ कश्च कृष्णः पुरः स्थातुं बलदेवश्च मत्तकः । शैनेयश्चापि विप्रेन्द्र स्थातुं न इति चिन्तय २० जरासन्धस्तु धर्मात्मा बन्धुरेव सदा मम । गच्छ विप्र यदुश्रेष्ठं ब्रूहि मद्वचनात्त्वरन् २१ दीयतां करसर्वस्वं यज्ञार्थं सुंदरं बहु । लवणानि बहून्यद्य गृह्य केशव मा चिरम् २२ आगच्छ त्वरितं कृष्ण न ते कार्यं विलंबनम् । इति ब्रूहि यदुश्रेष्ठं याहि त्वरितविक्रमः २३ न ब्रूया-

---

सर्व यादववीर इत्यादि स्थित असतांना तुझा हेतु तडीस कसा जाणार? ९. कारण भीष्म जरी वृद्ध असला तरी महाबलाढ्य व जितेंद्रिय आहे. ज्या भार्गवरामानें एकवीस वेळां पृथ्वीला जिंकलें १०, त्याला या भीष्मानें युद्धांत सर्व क्षत्रियांसमक्ष पराभूत केलें. जरासंधाचें वीर्य समरांगणांत किती असतें तें तुला माहीत आहेच ११. सर्व यादववीर कृतास्त्र व युद्धदुर्मद आहेत. त्यांतही हृषीकेश कृष्ण शत्रूंना जिंकून सोडणारा व कुशल आहे १२. जरासंधाशीं सतत युद्ध करीत असतांनाही तो श्रांत झाला नाहीं. ( अर्थात् तो जितश्रम आहे. ) तो उत्तम राजा, त्याच्यापुढें जिवंत उभा राहूं शकत नाहीं १३. त्याचप्रमाणें मत्त व बलाढ्य बलभद्र जर क्रुद्ध होईल तर तो या सर्व लोकांचा संहार करूं शकेल, असें माझ्या मनाला वाटतें १४. तसाच वीर सात्यकि रणामध्यें शत्रूंना जिंकावयास समर्थ आहे. दुसरे सर्व यादवही कृष्णाचा आश्रय करून सज्ज झालेले आहेत १५. आह्मी पूर्वी यतींसह विरोध केला आहे. दुर्वासमुनि त्या सर्व संन्याशांना बरोबर घेऊन कृष्णाला भेटावयास गेला आहे, असें आमच्या येथें जेवावयास आलेल्या एका ब्राह्मणाच्या तोंडून मीं ऐकलें आहे. यास्तव, अशा अडचणी असतांना तुमचें इष्ट कार्य कसें सिद्ध होईल याचा मन्त्र्यांबरोबर चांगला विचार करा १६, १७. नंतर आपण राजसूय महायज्ञ करूं. हंसः—तो मतिमंद भीष्म आहे कोण? तो वृद्ध व सदां बलहीन आहे १८. तो म्हातारा आमच्यापुढें काय उभा रहाणार? यादव हें तर आह्मांला मोठें आश्चर्यच वाटतें. ब्राह्मणा, ते आमच्यापुढें उभे राहण्यास कसे समर्थ असणार? १९. कृष्ण हा आमच्या समोर येणारही नाहीं. मत्त बलदेव तरी कसा उभा रहाणार? हे विप्रेंद्रा, शैनेयही आमच्या पुढें उभा राहण्यास समर्थ नाहीं, असें तूं समज २० जरासंध तर धर्मात्मा व माझा सदां बंधु आहे. ब्राह्मणा, तूं माझ्या सांगण्यावरून त्वरेनें यदुश्रेष्ठाकडे जा. व त्याला सांग कीं २१, यज्ञाकरितां सुंदर व पुष्कळ कर सर्वस्व दे. हे केशवा, आतां पुष्कळ लवण घेऊन ये. उशीर लावूं

श्वोत्तरं विप्र शपेयं त्वां प्रियोऽसि मे । मित्रभावादिदं ब्रूहि शपामि त्वां पुनः पुनः २४ इति संचोदितो विप्रो नोत्तरं प्रत्यभाषत । मित्रभावात्तथा राजन्स्नेहाच्च जनमेजय २५ जनार्दनस्तु धर्मात्मा नित्यं गंतुं समुद्यतः । अद्य श्वो वा परश्वो वा गच्छामीति यतेत सः २६ देवं द्रष्टुं जगद्योनिं शंखचक्रगदाधरम् । एक एव च धर्मात्मा हयमारुह्य सत्वरम् २७ प्रातरेव जगामाशु द्रष्टुं द्वारवतीं द्विजः । हरिं कृष्णं हृषीकेशं मनसा संस्मरन् द्विजः २८ [ ४८०० ] इति श्रीम० खिले० हरि० भवि० हंसडिंभको० त्रयोदशाधिकशततमोऽध्यायः ॥ ११३ ॥

वैशंपायन उवाच ॥ ततः प्रायाद्धरिं विष्णुं ब्राह्मणो ब्रह्मवित्तमः । हयेनैकेन राजेन्द्र त्वरितं स ययौ नृप १ यथा निदाघसमये सूर्यांशुपरिपीडितः । पान्थो याति जलं दृष्ट्वा त्वरितं तत्पिपासया २ धावत्येव तथा विप्रो हरिं द्रष्टुं जनार्दनः । गच्छन्स चिन्तयामास चोदयन्हयमुत्तमम् ३ हंस एव प्रियो मह्यं कुर्यात्प्रियहितं मम । तथाहि प्रेषितस्तेन हरिं पश्याम्यहं प्रभुम् ४ अहमेव सदा धन्यो मत्तो ह्यभ्यधिको न हि । यतो द्रक्ष्याम्यहं विष्णुं वसन्तं द्वारकापुरे ५ सा हि मे जननी धन्या हरिं दृष्ट्वा पुनर्गतम् । कृतार्थं सर्वदा देवी द्रक्षत्येषा मनस्विनी ६ मुखमुच्चिद्रहेमाब्जकिंजल्कसदृशप्रभम् । द्रक्ष्यामि देवदेवस्य चक्रिणः शार्ङ्गधन्वनः ७ वपुर्द्रक्ष्याम्यहं विष्णोर्नीलोत्पलदलच्छविम् । शंखचक्रगदाशार्ङ्गवनमाला- विभूषितम् ८ नेत्रे ते देवदेवस्य पद्मकिंजल्कसप्रभे । पश्याम्यहमदीनात्मा नष्टदुःखोऽस्मि

---

नको २२. हे कृष्णा, सत्वर ये. उशीर लावूं नको. असें जाऊन तूं त्या यदुवीराला सांग २३. ब्राह्मणा, यावर एक अक्षरही बोलूं नकोस. तुला शपथ आहे. मित्रत्वामुळें तूं हें त्यांना जाऊन सांग. मी तुला पुनः पुनः शपथपूर्वक हें सांगत आहें २४. हे राजा जनमेजया, असें बोलून प्रेरणा केला गेलेला तो विप्र कांहीं एक उत्तर बोलला नाहीं २५. तो धर्मात्मा जनार्दन, कृष्णाच्या दर्शनाकरितां जावयास नित्य उद्युक्तच होता. मी आज, किंवा उद्यां, अथवा परवां त्याच्याकडे जाईन, असें ह्मणून तो सतत यत्नच करीत होता २६. यास्तव तो धर्मात्मा एकटाच घोड्यावर बसून मोठ्या त्वरेनें जगद्योनि शंखचक्रगदाधर देवास पाहण्या-साठीं दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळींच निघाला. तो द्विज हरि, कृष्ण व हृषीकेश या नांवाच्या देवाचें मनानें स्मरण करीत केवळ त्याचें दर्शन घेण्याच्याच उद्देशानें द्वारवतीस गेला २७,२८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिं० एकशें तेरावा अध्याय समाप्त झाला ॥ ११३. ॥

वैशंपायनः— हे राजेंद्रा, त्यानंतर तो वेदवेत्ता ब्राह्मण एका घोड्यानिशी तेथून निघून हरीला भेटावयास गेला. ज्याप्रमाणें ग्रीष्मसमयीं सूर्यकिरणांनीं अतिशय पीडलेला एकादा पान्थ जल पाहून तें पिण्याच्या इच्छेनें सत्वर त्याच्याकडे जातो त्याप्रमाणें तो विप्र जनार्दन हरीला पाहण्यासाठीं धावत चालला. जातांना उत्तम घोड्याला प्रेरणा करून तो मार्गांत असा विचार करूं लागला १–३. हंसच माझा अति प्रिय आहे. तोच माझें प्रिय व हित करणार ! कारण त्यानें पाठविल्यामुळेंच मी आज प्रभु हरीला पाहणार ४. मीच सदां धन्य आहे. मजहून अधिक धन्य दुसरा कोणी नाहीं. कारण मी आतां द्वारकापुरांत रहाणाऱ्या विष्णूस पाहीन ५. ती माझी जननी धन्य आहे. कारण हरीला पाहून व कृतार्थ होऊन परत आलेल्या मला ती मनस्विनी देवी सर्वदा पाहील ६. मी त्या शार्ङ्गधनुर्धर चक्रवान् देवदेवाच्या फुललेल्या कमलाच्या पत्राप्रमाणें ज्याची प्रभा आहे, अशा मुखाला पाहीन ७, मी आतां त्या विष्णूचें नीलकमलदलाप्रमाणें ज्याची छवि आहे व

निर्वृतः ९ अपि द्रक्ष्यति योगात्मा सौम्येनैव स्वचक्षुषा । अपि वा मत्प्रियं ब्रूयात्स्वस्ति चेति
च वा वदेत् १० द्रक्ष्यामि चक्रिणो वर्ष्म ततस्त्रैलोक्यसंनिभम् । पादाब्जं चक्रिणो द्रष्टुं त्वर-
त्येव च मे मनः ११ वक्षःस्थलं सदा विष्णोः स्फुरद्रत्नप्रभायुतम् । पश्यन्निव च गच्छामि स्मरं-
श्चानिशमीश्वरम् १२ पीतकौशेयवसनं लंबहारविभूषितम् । ईषत्स्मिताधरं विष्णुं पश्यामि च
पुनः पुनः १३ स्मरतश्च हरे रूपं रोमहर्षोऽयमीदृशः । गच्छतश्च पुरो भाति शंखचक्रगदासि-
मान् १४ यातीव च पुरो भाति महान् देवो जगद्गुरुः । एषोऽयमिति मे वक्तुं जिह्वा प्रस्फुरतीव-
तम् १५ इदं दुःखतरं मन्ये करं देहीति मद्वचः । इदं तत्साहसं मन्ये यद्वचस्तस्य भूपतेः १६
हंसस्य करदो विष्णुस्तदाज्ञापरिचारकः । तस्य सर्वं पुरो गत्वा वक्ताहं किल निर्दयः १७ मूढा-
नामग्रणीरस्मि निर्लज्जश्च तथा वदन् । करं देहि हरे विष्णो हंसस्य यदुपुंगव १८ लवणानि
बहून्याशु दातव्यानि करात्मना । इति वक्तुं न मे युक्तं परतस्तस्य शार्ङ्गिणः १९ तथापि
मित्रभावात्तु वक्तव्यं घोरमीदृशम् । कष्टो ह्ययं मित्रभावो मनुष्याणां कृतात्मनाम् २०
अथवा सर्वविद्विष्णुः सर्वस्य हृदि संस्थितम् । जानात्येव सदा भावं प्राणिनां शोभने
रतः २१ तथा सति न मे दोषो मित्रभावो यतो ह्ययम् । सर्वथा रक्षतां विष्णुर्घोरं वक्तुं

---

जें शंख, चक्र, गदा, शार्ङ्ग व वनमाला यांनीं विभूषित झालें आहे असें शरीर पाहीन ८. कमळाच्या किंजल्काप्रमाणें ज्याची प्रभा आहे असे देवदेवाचे दोन्ही नेत्र मी अदीनात्मा आज पाहीन. व त्यामुळें आज दुःखरहित होईन ९. तो योगात्मा मजकडे आपल्या सौम्य दृष्टीनेंच पाहील का ? तो मला प्रिय असेंच भाषण करील काय ? ' स्वस्ति ' असें ह्मणेल काय ? १०. त्या चक्रधारी देवाचें त्रैलोक्यतुल्य शरीर मी पाहीन. आणि त्याच आशेनें त्या ईश्वराचें चरणकमल पाहण्यास माझें मन त्वरायुक्त झालें आहे ११. विष्णूचें वक्षःस्थल सदां स्फुरण पावणाऱ्या रत्नप्रभेनें युक्त आहे. जणुं काय तें पहात असल्याप्रमाणेंच मी त्या ईश्वराचें सतत स्मरण करीत जात आहें १२. ज्याचें पिवळें वस्त्र रेशमी आहे, जो लांब हारानें अतिभूषित आहे व ज्याच्या अधरोष्ठावर किंचित् स्मित चमकत आहे अशा विष्णूला मी पुनः पुनः पाहतों १३. त्या हरीच्या रूपाचें स्मरण करणाऱ्या माझ्या अंगावर हा पहा कसा रोमहर्ष ( कांटा ) उठत आहे. तो शंख–चक्र–गदाधर जात असलेल्या माझ्यापुढें भासत आहे १४. तो देव जगद्गुरु माझ्यापुढें जात आहे असा भास होतो. ' हा पहा तो ' असें त्याविषयीं ह्मणावयास जणुं काय माझी जिव्हा स्फुरण पावते १५. पण त्याला कर दे, असें मी ह्मणणें हें मला अतिशय दुःखकर वाटतें. त्या भूपतीचें तें वचन ह्मणजे मोठें साहसच आहे, असें मला वाटतें. विष्णु हंसाला कर देणारा व त्याची आज्ञा मानणारा होईल अशी अशा करणें हें मोठेंच साहस आहे. म्या निर्दयानें त्याच्यापुढं जाऊन हें सर्व कसें सांगावें १६,१७. तसें बोलणारा मी मूढांचा अग्रणी व निर्लज्ज आहे, असेंच उघड होणार ! ' हे हरे, विष्णो, हे यदुश्रेष्ठा, हंसाला कर दे १८. तूं पुष्कळप्रकारचें लवण ( मीठ ) त्याला कररूपानें द्यावेंस, ' असें त्या शार्ङ्गीच्या पुढें बोलणें मला योग्य नाहीं १९. तथापि मित्रभावामुळें मला तसलें घोर वचनही बोलणें भाग पडलें आहे. कृतबुद्धि मनुष्यांचा हा मित्रभाव फार कष्टकर आहे २०. अथवा सर्वज्ञ विष्णु सर्वांच्या हृदयांत स्थित आहे. प्राण्यांचें कल्याण करण्यांत रत असलेला तो त्यांचे अभिप्राय सदां जाणतोच २१. त्यामुळें मजकडे कांहीं दोष येण्यासारखा

यतस्य मे २२ द्रक्ष्याम्यहं जगन्नाथं नीलकुंचितमूर्धजम् । कंबुग्रीवाधरं विष्णुं श्रीवत्साच्छादितोरसम् २३ स्फुरत्पद्ममहाबाहुं रत्नच्छायाविराजितम् । द्रक्ष्यामि केशवं विष्णुं चक्रिणं यादवेश्वरम् २४ अचिन्त्यविभवं देवं भूतभव्यभवत्प्रभुम् । आत्मेच्छया जगद्रक्षं द्रक्ष्यामि जलशायिनम् २५ कृतार्थः सर्वथा चाहं भवामि विगतज्वरः । अद्य मे सफलं जन्म साक्षाद्दृष्टवतो हरिम् २६ अद्य मे सफला यज्ञाः साक्षात्कृतवतो हरिम् । नेत्रे मे सफले विष्णुं पश्यतश्च जगन्मयम् २७ प्रीतिमानस्तु मे विष्णुर्वक्तुर्घोरस्य कर्मणः । उन्मिषन्नेत्रयुग्मेन द्रक्ष्यामि सकृदीश्वरम् २८ आमूलमसकृद्विष्णुं पश्यामि च पुनः पुनः । पिबामि नेत्रयुग्मेन वपुः कृष्णस्य केवलम् २९ धारयिष्याम्यहं पांसुं तत्पादप्रभवं शिवम् । ततः कृतार्थतां यास्ये स्वर्गमार्गो हि तद्रजः ३० मेघगंभीरनिर्घोषं श्रोष्यामि च हरेः स्वरम् । पादाब्जं चक्रिणो विष्णोः पश्यामि च जगत्पतेः ३१ पश्यामि च हरेर्वक्त्रं पूर्णेंदुसदृशप्रभम् । हरेरिदं जगद्रूपं पश्यामीव च सर्वतः ३२ प्रसीदतु सदा विष्णुरयुक्तं वक्तुमिच्छतः । आलोलकुण्डलयुतं हरिचंदनचर्चितम् ३३ स्फुरत्केयूररत्नार्चिर्बाहुद्वयविराजितम् । सव्ये द्योतन्महाशंखं रश्मिजालविराजितम् ३४ प्रोद्यद्भास्करवर्णाभं चक्रज्वालाविराजितम् । प्रोज्ज्वलत्कंकणयुतं तप्तजांबूनदांगदम् ३५ पीतकौशेयवसनं विस्तीर्णोरस्कमच्युतम् । कदा द्रक्ष्यामि देवेशमिदानी-

---

नाहीं. कारण हा मित्रभाव असाच आहे. घोर वचन बोलण्याचा यत्न करणाऱ्या माझें रक्षण सर्वथा तो भगवान् करो २२. काळे भोर व कुरळे केंस धारण करणाऱ्या जगन्नाथास मी पाहीन. ज्याची मान शंखाप्रमाणें तीन आवर्तांनीं युक्त आहे, उरःस्थल श्रीवत्सलांछनानें आच्छादित झालें आहे २३. हात कमलाच्या योगानें शोभत आहे, जो रत्नछायेनें विराजमान होत आहे, अशा चक्रधारी यादवेश्वर केशव विष्णूस मी आज पाहीन २४. ज्याचें वैभव अचिंत्य आहे, जो भूत, भव्य व वर्तमान सृष्टींचा प्रभु आहे, जो आत्मेच्छेनें जगाचें रक्षण करीत असतो त्या जलशायी नारायणास मी पाहीन २५. मी सर्वथा कृतार्थ व संतापशून्य होईन. आज हरीला साक्षात् पाहणाऱ्या माझें जन्म सफल आहे २६. आज हरीला साक्षात् करणाऱ्या माझे यज्ञ सफल होणार. जगन्मय विष्णूला पाहणाऱ्या माझे दोन्हीं नेत्र सफल आहेत २७. घोर कर्म करण्याविषयीं सांगणाऱ्या मजवर विष्णु प्रीतिमान् असो. विकास पावणाऱ्या नेत्रयुग्मानें मी त्या ईश्वराला एकदां पाहीन २८. नंतर मी त्या भगवानाला नखशिखान्त वारंवार अवलोकन करीन. मी आपल्या नेत्रयुग्मानें त्याचें मुख केवल पिऊन सोडीन २९. त्याच्या चरणकमलावरील शुभ रेणु मी आपल्या मस्तकावर धारण करीन. त्यामुळें मी कृतार्थ होईन कारण त्याचें चरणरज म्हणजे स्वर्गमार्गच आहे ३०. हरीचा मेघाप्रमाणें गंभीर ध्वनि करणारा स्वर मी ऐकेन. त्या जगत्पति चक्रवान् विष्णूचें पादकमल मी पाहतों ३१. पूर्णचंद्राप्रमाणें ज्याची प्रभा आहे असें हरीचें मुख अवलोकन करतों. मी जणुं काय सर्वतः हें हरीचेंच जगद्रूप पहात आहें ३२. अयुक्त भाषण करण्याची इच्छा करणाऱ्या मजवर विष्णु सदां प्रसन्न होवो. चंचल कुंडलांनीं युक्त असलेल्या, हरिचंदनाची उटी लावलेल्या, ज्याचे दोन्ही बाहु स्फुरण पावणाऱ्या बाहुभूषणांतील रत्नांच्या ज्योतीनें विराजमान झाले आहेत, ज्याच्या डाव्या हातांत महाशंख चमकत आहे, जो किरणजालांनीं विराजमान आहे ३३,३४, उदय पावणाऱ्या सूर्याच्या कांतीप्रमाणें ज्याची प्रभा आहे, चक्राच्या ज्वालांनीं जो विराजमान होत आहे, दीप्तकंक-

मथवान्यदा ३६ सर्वथा कृतकृत्योऽहं यद्वपुर्द्रष्टुमुद्यतः । नमो मह्यं नमो मह्यं यतो द्रष्टुमहं हरिम् ७ उद्यतोऽस्मि जगन्नाथं बलभद्रकृतास्पदम् । द्रक्ष्याम्यवश्यमद्यैव जिष्णुं विष्णुं जगद्गुरुम् ३८ श्रीकौस्तुभोद्भवरुचिं स्फुरितोरुवक्षः पीतांबरं मकरकुण्डलपंकजाक्षम् । कृष्णं किरिटवरचक्रगदोर्ध्वहस्तं तेजोमयं मम हरेर्वपुरस्तु भूत्यै ३९ वेदोदधौ विशदशास्त्रमहाहियोगे निष्णातशुद्धमतिमन्दरमथ्यमाने । उद्योतमानममरैरनिशं निषेव्यं नारायणाख्यममृतं प्रपिबामि चाद्य ४० ध्येयं मुमुक्षुभिरमेयमनाद्यनन्तं स्थूलं सुसूक्ष्मतरमेकमनेकमाद्यम् । ज्योतिस्त्रिलोकजनकं त्रिदशैकवन्द्यमक्ष्णोर्ममास्तु सततं हृदयेऽच्युताख्यम् ४१ चिंतयन्निति विप्रेंद्रो ययौ द्वारवतीं पुरीम् । मत्वा कृतार्थमात्मानं वाहयन्हयमुत्तमम् ४२ [ ४८४२ ] इति श्रीम० खि० हरि० भवि- हंस० विप्रस्य द्वारवतीगमने चतुर्दशाधिकशततमोऽध्यायः॥११४॥

वैशंपायन उवाच ॥ स निवेदितसर्वस्वो द्वास्थेन हि जनार्दनः । अथ प्रविश्य धर्मात्मा सुधर्मां वै द्विजोत्तमः १ अपश्यद्देवदेवेशं सुधर्माकृतिसंस्थितम् । बलभद्रेण संयुक्तमध्यासितमहासनम् २ अग्रतः स्थितशैनेयं पार्श्वतः स्थितनारदम् । दुर्वाससाकृतकथमुग्रसेनपुरस्कृतम् ३ गायद्गंधर्वमुख्यैश्च नृत्यदप्सरसां गणैः । सेव्यमानं महाराज सूतमागधबन्दिभिः ४

---

णांनीं जो युक्त आहे, ज्याचीं बाहुभूषणें उंचीं सोन्याचीं आहेत ३५, ज्याचें पिवळें रेशमी वस्त्र आहे व ज्याचें उरःस्थल विस्तीर्ण आहे, अशा देवेश अच्युताला मी केव्हां पाहीन ? आज कीं आणखी केव्हां ? ३६. सर्वथा मी कृतकृत्य आहें. कारण मी त्या परमेश्वराचें शरीर पाहण्यास उद्यत झालों आहें. मला नमस्कार असो; नमस्कार असो. कारण मी त्या हरीला जगन्नाथाला पाहण्यास उद्यत झालों आहे. बलभद्राला ज्यानें आपला ज्येष्ठ भ्राता केला आहे अशा त्या जयनशील व व्यापी जगद्गुरूला मी आजच अवश्य पाहीन ३७३८. श्रीकौस्तुभामुळें ज्याला उत्तम शोभा प्राप्त झाली आहे, व त्यामुळें ज्याचें मोठें वक्षःस्थल स्फुरण पावत आहे, ज्याचें वस्त्र पिवळें आहे, ज्याच्या कानांत मकराकार कुंडलें आहेत, ज्याचे नेत्र कमलाप्रमाणें आहेत, ज्याच्या मस्तकावर उत्तम किरीट आहे व ज्यानें आपल्या हातानें चक्र व गदा उचलली आहे अशा तेजोमय हरीचें रूप माझ्या कल्याणास कारण होवो ३९. विशदशास्त्ररूपी महासर्पाची दोरी गुंडाळून शुद्ध मतिरूपी मंदराच्या रवीनें वेदसागराचें मंथन केलें असतां त्यांत निघणारें व देवांकडून सतत सेवन केलें जाणारें नारायणाख्य अमृत मी आज प्राशन करतों ( मोठ्या आदरानें पाहतों ) ४०. मुमुक्षूंना ध्येय असलेलें, अमेय, अनाद्यनन्त, स्थूल, अतिशय सूक्ष्म, एक, अनेक, आद्य, ज्योतिःस्वरूप, त्रिलोकजनक व देवांचें एक वंद्य, असें अच्युताख्यतत्त्व माझ्या दृष्टीस गोचर होवो व सतत हृदयांत राहो ४१. याप्रमाणें चिंतन करणारा तो विप्रेंद्र आपल्याला कृतार्थ समजून उत्तम घोड्याला हाकीत द्वारवती पुरीस गेला ४२. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० हंसडिभकोपा० ब्राह्मणाच्या द्वारवतीगमनाविषयीं एकशें चवदावा अध्याय समाप्त झाला ॥ ११४ ॥

वैशंपायनः— ज्यानें आपलें सर्वस्व जगन्नाथाला अर्पण केलें आहे, असा तो जनार्दन नांवाचा उत्तम द्विज द्वारपालाच्या द्वारां प्रवेश करून सुधर्मा सभेस पाहता झाला १. त्यांत साक्षात् योगधर्माकार होऊन राहिलेल्या, बलभद्रानें युक्त असलेल्या, महा आसनावर बसलेल्या, ज्याच्या अग्रभागीं सात्यकि बसला आहे, पार्श्वतः ( बाजूला )

उद्गीयमानयशसं माधवं मधुसूदनम् । उद्गीयमानं विप्रैश्च सामभिः सामगैर्हरिम् ॥ दृष्ट्वा प्रीतमना विष्णुं प्रोद्भूतपुलकच्छविः ५ नाम्ना जनार्दनोऽस्मीति ननाम चरणौ हरेः । बलभद्रं ततो देवं ववन्दे शिरसा द्विजः ६ दूतोऽस्मि देवदेवेश हंसस्य डिंभकस्य च । इति ब्रुवाणं विप्रेन्द्रमिदमाह स माधवः ७ आस्वेदं विष्टरं पूर्वं पश्चाद्ब्रूहि प्रयोजनम् । तथेति चाब्रवीद्विप्रो महदासनमास्थितः ८ वाचा संपूज्य विप्रेन्द्रमपृच्छत्कुशलं हरिः । ब्रह्मदत्तस्य राजेंद्र हंसस्य डिंभकस्य च ९ श्रुतं चापि तयोर्वीर्यं प्रयोजनमतो द्विज । अपि वा कुशलं विप्र पितुस्तव जनार्दन १० जनार्दन उवाच ॥ कुशलं ब्रह्मदत्तस्य पितुश्च मम केशव । तयोरेव जगन्नाथ हंहस्य डिंभकस्य च ११ श्रीभगवानुवाच ॥ किमाहतुर्महीपालौ तौ हंसडिंभकौ नृपौ । ब्रूहि सर्वमशेषेण नात्र शंका द्विजोत्तम १२ वाच्यं वाप्यथवावाच्यं कर्तव्यमथ चेतरत् । श्रुत्वा तस्य विधास्यामो युक्तरूपं द्विजोत्तम १३ दूतोऽसि सर्वथा विप्र न वाच्यावाच्यकल्पना । यत्कर्मकारनिर्दिष्टं तद्वाच्यं दूतजन्मना १४ नात्र शंका त्वया कार्या वक्तव्यस्येतरस्य च । अतो वद यथा प्रोक्तं ताभ्यामिह जनार्दन १५ केशवेनैवमुक्तस्तु प्रोवाच स जनार्दनः । अजानन्निव किं ब्रूषे सर्वं प्रत्यक्षदर्शिवान् १६ न

---

उग्रसेनाला पुढें बसवून दुर्वासाशीं कथा सांगत नारद मुनि स्थित आहे २,३. गाणारे मुख्य गंधर्व, नाचणाऱ्या अप्सरांचे संघ व सूत–मागध–बंदी यांच्याकडून जो सेवा केला जात आहे, भाट ज्याचें यश उंच स्वरानें गात आहेत, व सामवेदी विप्र सामाच्या योगानें ज्याची मोठ्यानें स्तुति करीत आहेत अशा पापनाशक विष्णूला पाहून ज्याचें मन संतुष्ट झालें आहे व ज्याच्या अंगावर रोमांच उठले आहेत असा तो ब्राह्मण ‘ मी नांवानें जनार्दन आहे ’ असें बोलून हरीच्या चरणांवर मस्तक ठेविता झाला. त्यानंतर त्या द्विजानें मस्तकानें बलभद्र देवास वंदन केलें ६. नंतर “ हे देवदेवेशा, मी हंस व डिंभक यांचा दूत आहे, ” असें बोलणाऱ्या त्या विप्रेंद्रास माधव म्हणाला, “ ब्राह्मणा, अगोदर या आसनावर बैस व मग येण्याचें कारण सांग. ” तेव्हां ‘ बरें आहे, ’ असें म्हणून तो विप्र मोठ्या आसनावर बसला ७,८. हे राजेंद्रा, हरीनें मधुर वाणीनें ब्राह्मणश्रेष्ठाची पूजा करून त्याला ब्रह्मदत्त, हंस व डिंभक यांचें कुशल विचारलें ९. त्या दोघां राजपुत्रांचें शास्त्राध्ययन व वीर्य यांविषयीं प्रश्न केला. नंतर--हे जनार्दन द्विजा, तुझ्या प्रयोजनवान् पित्याचें कुशल आहेना--असा प्रश्न विचारला १०. तेव्हां जनार्दन म्हणतो–हे केशवा, ब्रह्मदत्त राजा व माझा पिता यांचें कुशल आहे. हे जगन्नाथा, हंस व डिंभक यांचेंही कुशल आहे ११. श्रीभगवान्:—त्या हंस–डिंभक राजांनीं, त्या महीपालांनीं काय सांगितलें आहे ? हे द्विजोत्तमा, सर्व पूर्णपणें सांग. कांहीं शंका धरूं नकोस १२. वाच्य किंवा अवाच्य, कर्तव्य अथवा अकर्तव्य, जें त्यांचें म्हणणें असेल तें अगोदर ऐकून घेऊन नंतर आम्ही युक्तरूप असेल तें करूं १३. हे विप्रा, तूं कांहीं झालें तरी दूत आहेस. यास्तव वाच्य व अवाच्य याचा विचार करूं नकोस. कारण, दूत होऊन आलेल्या पुरुषानें स्वामीनें जें सांगितलें असेल तेंच बोलावें १४. ( अशी नीति आहे. ) हें वक्तव्य ( बोलण्यास योग्य ) आहे व हें अवाच्य आहे, अशी शंका तुला करण्याचें कारण नाहीं. यास्तव बा जनार्दना, त्यांनीं तुला जसें सांगितलें असेल तसेंच तूं येथें सांग १५. केशवानें असें सांगितलें असतां जनार्दन त्याला म्हणाला, “ देवा, सर्व साक्षात् जाणणारा तूं न जाण-

चास्ति ते परोक्षं तु जगद्वृत्तान्तमच्युत । सर्वं हि मनसा पश्यन् किं त्वमात्थ वदेति माम् १७
विद्वद्भिर्गीयसे विष्णो त्वमेव जगतीपते । इच्छया सर्वमाप्नोषि दृष्टादृष्टविवेचनम् १८ त्वमे-
वेदं जगत्सर्वं जगच्च त्वयि तिष्ठति । न त्वया रहितो लोकः पदार्थः सचराचरः १९ नास्ति
किंचिदवेद्यं ते सर्वगोऽसि जगत्पते । त्वमिंद्रः सर्वभूतानां रुद्रः संहारकर्मकृत् २० रक्षितासि
सदा विष्णुः सर्वलोकस्य माधव । संसारस्य भवान्स्रष्टा किं त्वमात्थ वदेति माम् २१ विद्व-
द्भिर्गीयते नित्यं ज्ञानात्मेति च माधव । प्राणं प्राणविदः प्राहुस्त्वामेव पुरुषोत्तम २२
शब्दं शब्दविदः प्राहुस्त्वामेव पुरुषोत्तम । तथा सति हृषीकेश किं त्वमात्थ वदेति माम् २३
तथापि शृणु देवेश चोदितोऽस्मि यतस्त्वया । वदेत्यसकृदेवैतत्तस्माद्वक्ष्यामि माधव २४
राजसूयेन यज्ञेन ब्रह्मदत्तोऽद्य यक्ष्यते । तदर्थं प्रेषितस्ताभ्यां हंसेन डिंभकेन च २५
करार्थं यदुमुख्येभ्यस्तव चामंत्रणाय हि । लवणं बहुदेयं ते यज्ञार्थं तस्य केशव २६ इत्यर्थं
प्रेषितस्ताभ्यां करं देहित तदाज्ञया । इदं त्वमपरं ताभ्यामुक्तं शृणु जगत्पते २७ लवणानि
बहून्याशु प्रगृह्य त्वरितं भवान् । आगच्छतु तयो राज्ञोः सेयं केशव वाग्विभो २८ इत्यु-
क्तवति विप्रेन्द्रे दूते तत्र तयोर्नृप । प्रहस्य सुचिरं कृष्णो बभाषे दूतमीश्वरः २९ शृणु दूत
वचो मह्यं युक्तमुक्तं द्विजोत्तम । करं ददामि ताभ्यां तु करदोऽस्मि यतो नृप ३० धाष्टर्य-
मेतत्तयोर्विप्र मत्तो यस्तु करग्रहः । अहो धाष्टर्यमहो धाष्टर्यं तयोः क्षत्रियबीजयोः ३१

---

णाऱ्यासारखें काय बोलतोस ? हे अच्युता, तुला कोणताही जगद्वृत्तान्त परोक्ष नाहीं. मनानें सर्व पहात असतांना, मला सांग ह्मणून काय सांगतोस ? १६, १७. हे विष्णो, जगतीपते विद्वानांकडून तूंच गायला जातोस. इच्छेनें तूं सर्व दृष्टादृष्ट विवेचन करूं शकतोस १८. तूंच हें सर्व जगत् आहेस. सर्व जग तुझ्या ठिकाणीं राहतें. चराचर पदार्थांतील एकही पदार्थ तुजवाचून नाहीं १९. हे जगत्पते, तुला अवेद्य कांहीं नाहीं. कारण तूं सर्वगामी आहेस. तूं सर्व भूतांचा इंद्र आहेस. सर्वांचा संहार करणारा रुद्र आहेस २०. हे माधवा, तूंच सर्व लोकांचा सदा रक्षणकर्ता विष्णु आहेस. या सर्व संसाराचा स्रष्टा तूंच आहेस. मग मला ' सांग ' ह्मणून काय ह्मणतो ? २१. हे माधवा, विद्वानांकडून तूं नित्य ज्ञानात्मा ह्मणून गायिला जातोस. हे पुरुषोत्तमा, प्राणोपासक तुलाच प्राण ह्मणतात. हे भगवन्, शब्दवेत्ते तुलाच शब्द ह्मणतात. मग असें असतांना हे हृषीकेशा, तूं मला सांग ह्मणून काय सांगतोस २२,२३. तथापि हे देवेशा, ज्याअर्थी मी तुजकडून प्रेरणा केली गेलों आहें त्याअर्थी मी सांगतों; ऐक. तूं वारंवार सांग सांग, असें ह्मणतोस ह्मणून सांगतों २४. ब्रह्मदत्त आतां राजसूय यज्ञ करणार आहे. त्याकरितां हंस व डिंभक यांच्याकडून मीं पाठविला गेलों आहे २५. मुख्य यादवांकडून कर घेण्याकरितां व तुला आमंत्रण करण्याकरितां मी आलों आहें. हे केशवा, यज्ञाकरितां तुला त्याला पुष्कळ लवण दिलें पाहिजे २६. एवढ्याकरितां त्यांनीं मला पाठविलें आहे. त्यांच्या आज्ञेनें तूं मला कर दे. हे जगत्पते, त्या दोघांनीं सांगितलेलें हें आणखी दुसरें तूं ऐक २७. 'पुष्कळ प्रकारचीं लवणें घेऊन तूं तेथें सत्वर यावेस ? ' अशी त्या राजांची तुला आज्ञा आहे २८. त्या दूत विप्रेंद्रानें असें सांगितलें असतां हे राजा जनमेजया, कृष्ण पुष्कळ वेळ हसतच राहिला, व नंतर तो ईश्वर त्या दूताला ह्मणाला, " दूता, आतां माझें वचन ऐक. तूं सांगितलेंस तें योग्य आहे. मी त्यांचा करद आहे असें ठरल्यास त्यांना कर देईन. पण हे ब्राह्मणा, मजपासून

इदमश्रुतपूर्वं मे मत्तो यस्तु करग्रहः । इत्युक्त्वा केशवो दूतमिदमाह स्म यादवः ३२ हास्य मेतद्यदुश्रेष्ठा मत्तो यस्तु करग्रहः । यष्टासौ राजसूयस्य ब्रह्मदत्तो महीपतिः ३३ तौ तु याजयितारौ हि हंसो डिंभक एव च । वोढा किल यदुश्रेष्ठो लवणस्य दुरात्मनः ३४ करदो वासुदेवो हि जितोऽस्मि यदुसत्तमाः । हास्यं हास्यमिदं भूयः शृणुध्वं यादवा वचः ३५ इत्युक्तवति देवेशे बलभद्रपुरोगमाः । यादवाः सर्व एवैते हासाय समवस्थिताः ३६ करदः कृष्ण इत्येवं ब्रुवन्तः सर्वसात्वताः । हासं मुमुचुरत्यर्थं तलं दत्वा परस्परम् ३७ तलशब्दो हासशब्दो रोदसी पर्यपूरयत् । स च विप्रो नृपश्रेष्ठ निन्दयन्मित्रमात्मनः ३८ अहो कष्ट-महो कष्टं दौत्यं यत्कृतवानहम् । इति लज्जासमाविष्टस्तूष्णीमासीदवाङ्मुखः ३९ [ ४८८१ ]
इति श्रीम० खिले० हरि० भवि० हंसडिं० वासुदेववाक्यं नाम पंचदशाधिकश० ॥ ११५ ॥

वैशंपायन उवाच ॥ हासंकुर्वत्सु तेष्वेवं केशवः केशिसूदनः । उवाच वचनं दूतं गच्छ मद्वचनाद्द्विज १ तावित्थं हंसडिंभकौ ब्रूहि त्वरितविक्रमः । बाणैर्दास्यामि निशितैः शार्ङ्ग-मुक्तैः शिलाशितैः २ असिना वाथ दास्यामि निशितेन महात्मनोः । शिरो वा छेत्स्यते चक्रं मत्करप्रहितं बलिम् ३ यो वरं दत्तवान्रुद्रो युवयोर्धाष्टर्यकारणम् । स एव रक्षिता वां स्यात्तं जित्वा वां निहन्स्यहम् ४ देशोऽयं संविधातव्यो यत्र नः संगतिर्भवेत् । तत्र गंता तथा चास्मि सबलः सहवाहनः ५ भवन्तौ निर्भयौ भूत्वा गच्छेतां सबलौ नृपौ । पुष्करे

---

कर घ्यावयास तयार होणें हें मोठेंच धाष्टर्य आहे. त्या दोघां क्षत्रियपुत्रांचें केवढें धाष्टर्य हें ? केवढें साहस हें ? २९-३१. मजपासून कर घेणें हें मला अश्रुतपूर्व आहे. दूताला इतकें बोलून तो यादव कृष्ण सभेंतील लोकांना ह्मणतो ३२. यदुश्रेष्ठांनो, मजपासून कर घेणें हें हास्यकारक कृत्य आहे. हा ब्रह्मदत्त राजा राजसूययज्ञ करणारा आहे. हंस व डिंभक हे त्याच्याकडून तो करविणारे आहेत. यदुश्रेष्ठ त्या दुरात्म्याला लवण नेऊन पोंचविणारा आहे ३३,३४. व मी वासुदेव त्यांचा करद आहें. हे उत्तम यादवांनो याप्रमाणें माझा पराभव केला गेला आहे. यादवांनो, हें हास्यकर, अतिशय हास्यकर वचन ऐका ३५. त्या देवेशानें असें ह्मटलें असतां बलभद्रप्रभृति ते सर्व यादव हसूं लागले ३६. कृष्ण करद आहे, करद आहे, असें बोलून सर्व सात्वत एकमेकांच्या हातावर हात मारून मोठ्यानें हंसत सुटले. त्यांच्या टाळ्यांच्या व हंसण्याच्या शब्दानें अंतरिक्ष भरून गेलें हे श्रेष्ठराजा, तो विप्र आपल्या मित्राची याप्रमाणें निंदा करवीत अतिशय लज्जित झाला. ' अरेरे मी दूतकर्म केलें ही फार कष्टकर, अतिशय दुःखकर गोष्ट घडली. ' असें बोलून व तोंड खालीं घालून तो मुकाट्यानें बसला ३७,३९. इति श्री० खि० हरि० भवि० हंसडिंभको० वासुदेववाक्यनामक एकशें पंधरावा अध्याय समाप्त झाला ॥११५॥

वैशंपायनः— याप्रमाणें ते सर्व यादव हसूं लागले असतां केशिनाशक केशव दूतास ह्मणाला, " तूं माझ्या सांगण्यावरून सत्वर परत जा. आणि त्या हंस-डिंभकांना असें सांग. दगडावर पाजळलेल्या व शार्ङ्ग धनुष्यापासून सोडलेल्या तीक्ष्ण बाणांनीं अथवा अतिशय तीक्ष्ण तरवारीनें मी त्या दोघां महात्म्यांना कर देईन. अथवा माझ्या हातांतून सुटलेलें चक्र त्यांचें मस्तक कापील १-३. तुमच्या या धाष्टर्याला कारण होणारा वर ज्या रुद्रानें दिला तोच तुमचा रक्षक होईल. पण मी त्यालाही जिंकून तुह्मांला मारीन ४. आमचा समागम होण्यास योग्य प्रदेश तयार करा. ह्मणजे मी सैन्य व वाहनें यांसह तेथें जाईन ५. अहो राजांनो, तुह्मी आपल्या सैन्यासह निर्भय होऊन पुष्कर, प्रयाग अथवा

वा प्रयागे वा मथुरायामथापि वा ६ तत्राहं सबलो याता नात्र कार्या विचारणा । अथवा मित्रभावाच्च वक्तुमेवं न ते क्षमम् ७ न शक्यं यत्त्वया वक्तुं तच्च वक्ष्यति सात्यकिः । त्वया सह ततो गत्वा साक्षिभूतो भव द्विज ८ इदं च जाने विप्रेन्द्र स्नेहो मम सदा त्वयि । नेन त्वं विजयी भूत्वा संसारे दुःखसंकुले ॥ मत्कथापरमो नित्यं सदा भव जनार्दन ९ [४८९०]
इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभकोपाख्याने षोडशाधिकशततमोऽध्यायः ॥ ११६ ॥

वैशंपायन उवाच ॥ इत्युक्त्वा ब्राह्मणं कृष्णः सात्यकिं पुनराह सः । गत्वा शैनेय विप्रेण ब्रूहि मद्वचनात्तयोः १ यन्मयोक्तमशेषेण वद गत्वा तयोः पुरः । यथा नः संगतिर्युद्धे तथा वद बलात्तदा २ धनुरादाय गच्छ त्वं बद्धगोधांगुलित्रवान् । एकेनाश्वेन गच्छ त्वमसहायो यदूत्तम ३ सात्यकिस्तं तथेत्युक्त्वा हयमारुह्य शीघ्रगम् । गन्तुमैच्छत्ततो राजन्नसहायः स सात्यकिः ४ जनार्दनं विसृज्याशु दूतं तं यादवेश्वरः । अहो धाष्टर्यमहो धाष्टर्यमित्युवाच जनार्दनः ५ नमस्कृत्य तदा दूतो माधवं माधवेश्वरम् । स ययौ शाल्वनगरं शैनेयेनसमन्वितः ६ ततः प्राविश्य धर्मात्मा ब्राह्मणो ब्रह्मवित्तमः । आसनं महदास्थाय विसृज्य यादवेपुनः ७ आस्ते सुखं यदा विप्रः शैनेयेन समन्वितः । अथ तं हंसडिंभयोर्दर्शयामास सात्यकिम् ८ दूतोऽयं सात्यकिः प्राप्तः सव्यो बाहुरयं हरेः । तस्य तद्वचनं श्रुत्वा हंसः प्राह वचस्तदा ९ श्रुतः समागतः पूर्वमय दृष्टो मया त्वसौ । धनुर्वेदे च वेदे च शास्त्रे शास्त्रे

---

मथुरा यांतील कोणत्यातरी एका ठिकाणीं चला. मीही आपल्या सैन्यासह तेथें येईन. याविषयीं शंका मुळींच धरूं नका. अथवा हे ब्राह्मणा, मित्रभावामुळें तुला असें सांगणें योग्य नव्हे ६, ७. यास्तव यांतील तुला जें सांगतां येण्यासारखें नसेल तें हा आमचा सात्यकि सांगेल. हा तुझ्या बरोबरच त्यांच्याकडे येईल. तूं नुस्ता साक्षी होऊन रहा म्हणजे झालें ८. हे विप्रेंद्रा, तुझें चित्त मी जाणतों. माझा तुजवर मोठा स्नेह आहे. यास्तव तूं या दुःखांनीं भरलेल्या संसारांत विजयी होऊन हे द्विज जनार्दना, मत्कथापरायण हो ९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिं० कृष्णवाक्यनामक एकशेंसोळावा अध्याय समाप्त झाला॥११६॥

वैशंपायनः—कृष्ण ब्राह्मणाला असें बोलून पुनः सात्यकीस म्हणाला, ‘ हे शैनेया, तूं या ब्राह्मणाबरोबर जाऊन मी आतां जें बोललों तें सर्व त्या दोघांना सांग. त्यांचा व आमचा युद्धांत सामना होईल असें जोरदार भाषण करून तूं त्यांना सांग. हे यदूत्तमा, तूं धनुष्य घेऊन जा. गोधांगुलित्र बांधून, एका अश्वानिशी आणखी दुसऱ्या कोणालाही बरोबर न घेतां एकटाच जा १–३. हे राजन्, तेव्हां सात्यकि त्याला ‘ बरें आहे, ’ असें म्हणून व शीघ्रगामी घोड्यावर आरूढ होऊन एकटाच जाण्याची इच्छा करूं लागला ४. यादवेश्वर जनार्दन त्या दूत जनार्दनाचें तत्काल विसर्जन करून अहो धाष्टर्य ! अहो धाष्टर्य ! ( वाहवारे यांचें साहस ) ! असें म्हणूं लागला ५. तेव्हां तो दूत यादवेश्वर माधवास नमस्कार करून सात्यकीसहवर्तमान शाल्व नगरास गेला ६. नंतर तो धर्मात्मा वेदवेत्ता ब्राह्मण आपल्या येथें जाऊन स्वतः मोठ्या आसनावर बसून सात्यकीलाही उत्तम आसन देऊन ७, त्या यादवासह कांहीं वेळ सुखानें विश्रांति घेत बसला. नंतर त्यानें हंस व डिंभक यांची व सात्यकीची भेट करविली ८. तो त्यांस म्हणाला, “ हा सात्यकि दूत आला आहे. हा हरीचा डावा हात आहे. ” हें त्याचें वचन ऐकून हंस त्यावेळीं म्हणाला, “ मी याचें नांव पूर्वीं ऐकलें होतें. व आज येथें आलेल्या

तथैव च १० निपुणोऽयं सदा धीर इत्येवमनुशुश्रुमः । अथो दृष्टिपथं प्राप्तः प्रीतिं नौ विदधात्यसौ ११ कुशलं वासुदेवस्य बलभद्रस्य वा पुनः । कुशलाः सात्वताः सर्वे उग्रसेनपुरोगमाः १२ तथेति सात्यकिः प्राह मन्दमुन्मथिताननः । ततो जनार्दनं प्राह हंसो वाक्यविशारदः १३ अपि दृष्टस्त्वया चक्री सिद्धं नः कार्यमीहितम् । वद सर्वमशेषेण मा वृथा कालमत्यगाः १४ [ ४९०४ ] इति श्री० खि० ह० भ० हंसडिंभ० सप्तदशाधिकशततमोऽध्यायः ॥ ११७ ॥

वैशंपायन उवाच ॥ इत्युक्तवति हंसे च धर्मात्माथ जनार्दनः । उवाच प्रहसन्वीरः स्तुवन्नारायणं सदा १ अद्राक्षमद्राक्षमहं जनार्दनं हस्तस्थशंखं वरचक्रधारिणम् । आतप्तजांबूनदभूषितांगदं स्फुरत्प्रभाद्योतितरत्नधारिणम् २ अद्राक्षमेनं यमिभिः पुरातनैः संसेव्यमानं मुनिवृन्दमुख्यैः । संस्तूयमानं वरवन्दिमागधैः स्मितप्रवालाधरपल्लवारुणम् ३ अद्राक्षमेनं कविभिः पुरातनैर्विविच्य वेद्यं विधिवत्सहामरैः । प्रफुल्लनीलोत्पलशोभितं श्रिया विनिद्रहेमाब्जविराजितोदरम् ४ भूयोऽहमद्राक्षमजं जगद्गुरुं प्रमोदयन्तं वचनेन यादवान् । निरूपयन्तं विधिवन्मुनीश्वरैः प्रवृद्धवेदार्थनिधिं पुरातनैः ५ अद्राक्षमद्राक्षमहं पुनः पुनः समस्तलोकैकहितैषिणं हरिम् । वसन्तमस्मिन् जगतो हिताय जगन्मयं तान्परिभूय शत्रून् ६ भूयोप्यपश्यं सह यादवेश्वरैर्विक्रीड्यमानं च विहारकाले । रमन्तमीड्यं रमयतमीश्वरान्यदूत्त-

---

याला मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. हा धनुर्वेद, वेद, शास्त्र व शस्त्र यांमध्यें सदा निपुण आहे, व मोठा धीर आहे असें आह्मी ऐकलें आहे. आज दृष्टीसमोर आलेला हा आह्माला फार संतोष देत आहे ९–११. बा सात्यके, वासुदेव व बलभद्र यांचें कुशल आहे ना ? उग्रसेनप्रभृति सर्व यादव आनंदांत आहेत कीं नाहींत ? ” १२. त्यावर होय, सर्व कुशल आहेत, असें सात्यकीनें आपलें मुख किंचित् उघडून हळूच सांगितलें. त्यानंतर वाक्यविशारद हंस जनार्दनास ह्मणाला, “ तूं चक्रधराला पाहिलेंस कां ? आमचें इष्ट कार्य सिद्ध झालें कीं नाहीं. काय असेल तें सर्व सांग. व्यर्थ काल घालवूं नकोस १३.१४. इति श्री० खि० हरि० भवि० हंसडिंभको० हंसवाक्यनामक एकशेंसतरावा अध्याय समाप्त झाला ॥ ११७ ॥

वैशंपायनः— हंसानें असा प्रश्न केला असतां धर्मात्मा जनार्दन वीर हंसत व सदां नारायणाची स्तुति करीत ह्मणाला, “ मी जनार्दनाला पाहिलें. ज्याच्या हातांत शंख आहे, ज्यानें उत्तम चक्र धारण केलें आहे, उंची सोन्याच्या बाहुभूषणांनीं ज्याचे बाहु भूषित झाले आहेत, ज्यानें प्रभेच्या योगानें स्फुरण पावणाऱ्या रत्नांना धारण केलें आहे, अशा हरीला मी पाहिलें १,२. मी पुरातन व यमवान् मुनिवृंदमुख्यांकडून सेवा केल्या जाणाऱ्या व मागधांसह श्रेष्ठ भाटांकडून स्तुति केल्या जाणाऱ्या त्या देवाला पाहिलें. त्याचा प्रवाल व पल्लव याप्रमाणें लाल असलेला अधर थोड्याशा हास्याच्या योगानें अतिशय शोभत होता ३. पुरातन कवींकडून देवांसह यथाविधि विवेचन करून जाणला जाणाऱ्या त्याला मीं अवलोकन केलें. श्रीच्या योगानें तो देव फुललेल्या नीलकमलाप्रमाणें शोभत होता. त्याचें उदर उमललेल्या सुवर्णकमलानें विराजमान झालें होतें ४. आपल्या भाषणानें यादवांस प्रमोद देणाऱ्या त्या अज जगद्गुरूस मीं पुनः पुनः पाहिलें. पुरातन मुनीश्वरांकडून यथाशास्त्र निरूपण केल्या जाणाऱ्या त्या फार पुरातन वेदार्थनिधीस मीं पाहिलें ५. समस्त लोकांच्या हिताची इच्छा करणाऱ्या व जगाच्या हिताकरितां या लोकीं शत्रूंचा पराभव करून राहणाऱ्या जगन्मय हरीला मीं पुनः पुनः डोळे भरून पाहिलें ६. विहारसमयीं

मान्यादवमुख्यमीश्वरम् ७ भूयोऽप्यपश्यं सरसीरुहेक्षणं समेतया भीष्मतनूजया हरिम्। वसन्तमम्भोनिधिशायिनं विभुं भक्तप्रियं भक्तजनास्पदं शिवम् ८ अद्राक्षमद्राक्षमहं सनिर्वृतः पिबन्पिबंस्तस्य वपुः पुरातनम्। नेत्रेण मीलद्विवरेण केवलं धन्योहमस्मीति तदा ह्यचिन्तयम् ९ अद्राक्षमंभोजयुगं दधानं प्रभुं विभुं भूतमयं विभावनम्। आद्यं ककुद्मानसुरुं विभावसुं संस्मृत्य संस्मृत्य तमेव निर्वृतः १० अद्राक्षं जगतामीशं वक्षोराजितकौस्तुभम्। वीज्यमानं हरिं कृष्णं चामराणां शतैः सदा ११ युवां विद्वेषयुक्तेन चेतसा यादवेश्वरम्। स्मरन्तं सर्वदा विष्णुं क्व चैवं क्व च वेति कः १२ क्व च द्रक्ष्यामि तौ मन्दौ कुतो वामत्पुरो गतौ। ध्यायंतमित्थं देवेशं करे शंखवहं सदा १३ हसन्तमेनमद्राक्षं करदं हास्यतत्परम्। वदन्तं नारदे वाचं दुर्वाससि यतीश्वरे १४ ब्रह्मद्रवपदां वाणीं दापयंतं मुनीश्वरम्। दृष्ट्वाहंतं हरिं देवं पुनः पुनरचिंतयम् १५ असाध्यमिदमारब्धं ताभ्यामिति नृपोत्तम। नारब्धव्यमिदं कार्यमितः प्रभृति भूमिप १६ निवृत्ता साकथा हंसाचिन्तयदग्रहणं तव। तद्वृत्तमखिलं सर्वं वदिष्यति हि सात्यकिः। एतद्वचनमाकर्ण्य हंसः क्रुद्धोऽब्रवीद्वचः १७ हंस उवाच॥ अरे ब्राह्मणदायाद का नाम तव वागियम्। आवयोः पुरतो वक्तुं त्रैलोक्यं जेतुमिच्छतोः १८ मायया त्वां भ्रमयति कृष्णो लीलाविधानवित्। तं दृष्ट्वा भ्रम एवैष तव संजायते

---

यादवेश्वरांशीं क्रीडा करणाऱ्या, रममाण होणाऱ्या, स्तुत्य, व यदूत्तम ईश्वरांस रममाण करणाऱ्या त्या यादवमुख्य ईश्वरास मीं पाहिलें ७. भीष्मकराजाच्या रुक्मिणी कन्येसह असलेल्या, जलशायी, कमलनयन, विभु, भक्तवत्सल, भक्तप्रिय, भक्तजनाधार व शिवरूप हरीला मीं पाहिलें ८. पाहिलें, पाहिलें; मीं त्याच्या पुरातन शरीराचें जणुं काय आनंदानें संकोच पावणाऱ्या नेत्रांनीं प्राशन केलें व सुखी झालों आणि त्यावेळीं मीं मात्र धन्य आहें, असें मनांत ह्मटलें ९. दोन कमलें धारण करणाऱ्या त्याला मीं पाहिलें. त्या प्रभूला, विभूला, भूतमय कारणाला, आद्य महात्म्यवानाला, व अतिशय भास्कराला मीं वारंवार मनांत आठवून आतिशय सुखी झालों आहे १०. ज्याचें वक्षःस्थल कौस्तुभानें विराजमान झालें आहे, व शंभर चामरांनीं ज्याच्यावर वारा घालीत आहेत अशा जगदीश हरीला मीं पाहिलें ११. द्वेषयुक्त चित्तानें तुमचें सदां स्मरण करीत असलेल्या त्या यादवेश्वर विष्णूला मीं पाहिलें. ‘ त्यांतील कोण कोठें, कसा व केव्हां भेटेल १२. माझ्या समोर आलेल्या त्या दोघां मंदांना मी कोणत्या उपायानें पाहूं शकेन, ’ असें तो देवेश तुमच्याविषयीं सदां ध्यान ( चिंतन ) करीत असतो. असो; असें चिंतन करीत व सदां हातांत शंख वहात असलेल्या त्याला मीं अवलोकन केलें १३. हसत असलेल्या, ‘ कर दे ’ असें ऐकून अधिकच हसूं लागलेल्या आणि दुर्वास यतीश्वर व नारद यांस ती वाणी सांगणाऱ्या कृष्णाला मीं पाहिलें १४. ब्रह्मसूचकपदयुक्त वाणी शिष्यांस शिकवा, असें दुर्वासमुनीश्वराला सांगणाऱ्या त्या हरिसंज्ञक देवाला पाहून मी पुनः पुनः त्या दोघां मित्रांनीं असाध्य कृत्याला आरंभ केला आहे असें चिंतन केलें. यास्तव हे नृपोत्तमा, हे भूमिपा, आजपासून तसलें कृत्य आरंभूं नका. हंसा, तुझी करग्रहण करण्याची कथा होऊन गेली आहे. ती त्यानें ऐकल्यावर काय झालें तें सर्व हा सात्यकि सांगेल. जनार्दन द्विजाचें हें भाषण ऐकून रागावलेला हंस असें वचन बोलला १५-१७. हंसः—अरे ब्राह्मणदायादा, हें काय तूं बोलतोस ? त्रैलोक्यास जिंकण्याची इच्छा करणाऱ्या आह्मां दोघांपुढें हीं

महान् १९ शंखचक्रगदाशार्ङ्गवनमालाविभूषितम्। वृष्णिवीरं सभावेशे समुच्छ्रितयशोधनम् २० सूतमागधसंस्तावप्रकटद्वीरबाहुकम्। अत्यद्भुतयशोराशिं विक्रमाल्लोकमण्डनम् २१ चतुर्भुजं बलाक्रांतं वृष्णियादवसंमतम्। अहोऽद्य भ्रम एवैष दर्शनात्तस्य चक्रिणः २२ इदानीं च महात्मासौ भ्रामयत्येव केशवः। त्वामेव विप्र मंदात्मन्निन्द्रजालकता हि या २३ यद्बाल्यमिदमेवैतत्तव विप्र भ्रमोद्भवम्। अहो हि खलु सादृश्यं वक्तव्यं भवता मम २४ अहमेव त्वया विप्रमर्षये प्रोदितं वचः। सखिभावाद्द्विजश्रेष्ठ अन्यथा कः सहेदिदम् २५ गच्छ मन्दमते विप्र यथेष्टं सांप्रतं तव। गच्छ गच्छ यथेष्टं त्वं पृथिवीं पृथिवीं तव २६ जित्वा गोपालदायादं हत्वा यादवकान्बहून्। एष नः प्रथमः कल्पो जेष्यामः इति यादवान् २७ गच्छ गच्छेति विप्र त्वं धृष्टं परुषवाक्खलम्। शत्रुपक्षस्तुतिपरं सह भुक्त्वा सदा मया २ न मे विप्रवधः कार्यः कष्टादपि हि सर्वतः। इत्युक्त्वा ब्राह्मणं भूयो हंसः सात्यकिमब्रवीत् २९ भोभो यादवदायाद किमर्थं प्राप्तवानिह। किमब्रवीन्नन्दसुतः किंवासौ मे दिशत्करम् ३० सात्यकिरुवाच ॥ इदं सत्यं वचो हंस शंखचक्रगदाभृतः। शरैर्निशितधाराग्रैः शार्ङ्गमुक्तैः शिलाशितैः ३१ दास्यामि करसर्वस्वमसिना निशितेन ते। शिरश्छेत्स्यामि ते हंस करदानस्य संग्रहम् ३२ धाष्ट्यं हि तव मन्दात्मन्किमतोऽपि

---

तुझी वाणी योग्य आहे का ? १८. लीलाविधानवेत्ता कृष्ण मायेनें तुला भ्रमण करावयास लावीत आहे. त्याला पाहून हा तुला मोठा भ्रम झाला आहे १९. शंख, चक्र गदा, शार्ङ्ग व वनमाला यांनीं अतिशय भूषित झालेल्या, सभास्थानीं बसलेल्या, उच्च यशोधनसंपन्न, सूत व मागध यांच्या स्तुतीवरून ज्याचें बाहुबल प्रकट होत आहे, ज्याची यशोराशि अति अद्भुत आहे, पराक्रमानें जो लोकमंडन झाला आहे, ज्याला चार हात आहेत, जो बलानें आक्रान्त झाला आहे, वृष्णि व यादव यांस जो संमत आहे अशा त्या यादव वीराला पाहून तुला भ्रम पडला आहे. त्या चक्रवानाला पाहिल्यामुळें आज तुला केवढा भ्रम झाला आहे हा ? २०–२२. तो महात्मा केशव तुला आतां भ्रम पाडीत आहे खरा; पण हे विप्रा, बा मंदात्म्या, त्याची ती इंद्रजालिकता तुझ्यासारख्यांनाच मोह पाडणार ! २३. हे विप्रा, तुझें भ्रमजन्य मूर्खत्व तें हेंच; काय सांगावें, अरे ब्राह्मणा, तूं आपल्याशीं माझी तुलना करूं पाहतोस ! २४. पण अरे विप्रा, मी ह्मणूनच तुझें हें बोललेलें अयोग्य वचन मित्रभावामुळें सहन करतों. नाहींतर असलें भाषण दुसऱ्या कोणाला सहन होणार ? २५. असो; हे मंदमते ब्राह्मणा, आतां तुला वाटेल तिकडे खुशाल जा. जा, जा, येथून नीव. सर्व पृथ्वीभर भटकत रहा. ती आतां तुझी आहे २६. त्या गोपपुत्राला जिंकून, अनेक यादवांस मारून नंतर आह्मी दुसऱ्या कामास हात लावणार. आह्मी यादवांस जिंकणार. हा आमचा मुख्य उपाय आहे २७. ब्राम्हणा, जा येथून सत्वर निघून जा. तूं मोठा धृष्ट व कर्कश भाषण करणारा आहेस. सदा माझ्याबरोबर अन्नादि भोग भोगून माझ्या शत्रुपक्षाची स्तुति करणाऱ्या तुला मी मारलेंही असतें २८. पण कितीही कष्ट झाले तरी मला विप्रवध करावयाचा नाहीं. असें त्या ब्राह्मणाला बोलून हंस सात्यकीला पुनः ह्मणाला २९ " अरे अरे, यादवदायादा, तूं येथें कशाकरितां आला आहेस ? नंदपुत्रानें काय सांगितलें आहे ? त्यानें मला कर देण्याचें मान्य केलें आहे कीं नाहीं ३०. सात्यकिः— अरे हंसा, हें शंख–चक्र–गदाधराचें सत्यवचन मी तुला सांगतों ऐक. अरे

नृपाधम । देवदेवाज्जगन्नाथात्करमिच्छति यो नृपः ३३ तस्यैष करसंक्षेपो जिह्वाछेदो नराधम । तस्य शार्ङ्गरवं श्रुत्वा शखस्य च हरेः पुनः ३४ को नाम जीवितं कांक्षेत्तिष्ठेदानीं त्वमय वै । गिरिशवरदर्पेण ब्रूयादसदृशं वचः ३५ सहाया वयमेवैते बलभद्रपुरोगमाः । प्रथमो बलभद्रो मे द्वितीयोऽहं च सात्यकिः ३६ कृतवर्मा तृतीयस्तु चतुर्थो निशठो बली । पंचमोऽथ च बभ्रुस्तु षष्ठश्चैवोत्कलः स्मृतः ३७ सप्तमस्तारणो धीमानस्त्रशस्त्रविशारदः । अष्टमस्त्वथ सारंगो नवमो विपृथुस्तथा ३८ दशमश्चोद्धवोधीमान्वयमेते बलान्विताः । त एते पुरतो गोप्तुः शंखचक्रगदाभृतः ३९ देवदेवस्य युद्धेषु तिष्ठंत्येव दिवानिशम् । यौ हि वीरौ सुतौ तस्य नासत्यसदृशौ बले ४० तावेव वां क्षमौ युद्धे हन्तुं बलमदान्वितौ । यो गिरीशो गिरा देवो वरं दत्वा स तिष्ठति ४१ युवां हि किंबलौ युद्धे तिष्ठतः सशरं धनुः । गृहीत्वा शत्रुभिः सार्धं युद्धं कर्तुं समुद्यतौ ४२ ईदृशेष्वथ भृत्येषु युद्धं कुर्वत्सु शत्रुभिः । त्रैलोक्यं रक्षतस्तस्मात्करमिच्छन्व्रजेत कः ४३ हनिष्यत्येव वां युद्धे त्रैलोक्यं यो हि रक्षति । शरेण निशितेनाजौ शार्ङ्गमुक्तेन केवलम् ४४ क्व नः संग्राम इत्येवं पुनराह जगत्पतिः । पुष्करे पुण्यदे नित्यमुत गोवर्धने गिरौ ४५ मथुरायां प्रयागे वा दर्शयन्तो बलानि मे । शंखचक्रधरे देवे जगत्पालनतत्परे ४६ राजसूयं महायज्ञं कर्तुमिच्छति कः स्वयम् । बदन्वा स्वस्तिमान्मर्त्यस्त्वां विना को व्रजेत्सुखम् ४७ इदमिच्छसि चेन्मूढ

---

हंसा, साणेवर पाजळलेल्या व शार्ङ्गधनुष्यापासून सोडलेल्या तीक्ष्ण बाणांनीं किंवा पाजळलेल्या तरवारीनें मी तुला करसर्वस्व देईन. मी तुझें करदानाचें संग्रहभूत शिर तोडीन ३१,३२. अरे अधम नृपा, अर मंदात्म्या, याहून तुझें आणखी धाष्टर्च तें कोणतें ? जो राजा देवाधिदेव जगन्नाथापासून कराची इच्छा करतो त्याचा जिह्वाछेद करणें हाच करसंक्षेप आहे. हरीच्या शार्ङ्गधनुष्याचा व शंखाचा रव ऐकून कोणता मर्त्य जीविताची आकांक्षा करणार आहे ? आतां तूं सावध होऊन रहा. शंकराच्या वराच्या दर्पानें तूं असें अनुचित भाषण करीत आहेस ३३–३५. हे आह्मी बलभद्रप्रभृति वीर सहाय करावयास तयार आहों. पहिला तो बलभद्र, दुसरा मी सात्यकि ३६, तिसरा कृतवर्मा, चवथा बलाढ्य निशठ, पांचवा बभ्रु, सहावा उत्कल, सातवा धीमान् व अस्त्र-शस्त्रविशारद तारण, आठवा सारंग, नववा विपृथु ३७,३८. दहावा बुद्धिमान् उद्धव हे आह्मी सर्व बलयुक्त आहों. हे आह्मी सर्व युद्धामध्यें त्या रक्षक शंख-चक्र-गदाधर देवाधिदेवापुढें अहोरात्र उभे असतों. बलामध्यें अश्विनीकुमारासारखे असलेले जे त्या देवाचे दोघे वीर पुत्र आहेत तेंही मद व बल यांनीं युक्त असल्यामुळें तुह्मांला युद्धांत मारण्यास समर्थ आहेत. गिरीश शंकर देव तुह्मांला वाणीनें वर देऊन एकीकडे बसला आहे. तुमचें बळ अगदींच निंद्य आहे. यास्तव सशर धनुष्य घेऊन तुह्मी उभे राहतां व शत्रूंशीं युद्ध करावयास सज्ज झाला आहां ३९–४२. पण शत्रूंशीं युद्ध करणारे असले भृत्य असतांना त्रैलोक्य रक्षण करणाऱ्या त्याच्यापासून कराची इच्छा कोण करील ? ४३. जो त्रैलोक्याचें रक्षण करतो तो संग्रामांत शार्ङ्गधनुष्यापासून सोडलेल्या केवळ एकाच तीक्ष्ण बाणानें तुह्मांला मारील ४४. आमचा संग्राम कोठें होणार ह्मणून जगत्पतीनें तुह्मांला विचारलें आहे. नित्य पुण्यद पुष्करावर कीं गोवर्धन पर्वतावर ? ४५. मथुरेमध्यें कीं प्रयागीं तुह्मी आपलें बल मला दाखविणार ? शंख-चक्र-गदाधर देव जगत्पालन करण्यांत तयार असतांना स्वयं

हास्यतां यासि भूतले । इत्युक्त्वा सात्यकिर्वीरो हसन्निव भुवि स्थितः ४८ [४९५२] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिं० सात्यकिवाक्यं नामाष्टादशाधिकशततमोऽध्यायः॥११८॥

वैशंपायन उवाच ॥ ततः क्रुद्धौ महाराज हंसो डिंभक एव च । इदं वै प्रोचतुर्वाक्यं रोषव्याकुलितेक्षणौ १ दिधक्षन्तौ दिशः सर्वाः सर्वान्वीक्ष्य नृपोत्तमान् । करेण निष्पीड्य करं स्मरंतौ तद्वचो महत् २ क्व नु क्व वा नंदसूनुः क्व वा रामो बलोत्कटः । इति ब्रुवाणौ साक्षेपौ सात्यकिं सत्यसंगरम् ३ अरे यादवदायाद किं ब्रूषे नः पुरोगतः । इतो निर्गच्छ मन्दात्मन्दूतस्त्वमसि सांप्रतम् ४ अन्यथा वध्य एव त्वं प्रलपन्परुषं वचः । सत्यं निर्लज्ज एवासि यद्ब्रूयादीदृशं वचः ५ आवामिदं जगत्सर्वं शासितुं संयतौ नृपौ । को नाम मानुषे लोके करदो नैव जीवति ६ हत्वा गोपालकान्सर्वान्बध्वा यादवकान्बहून् । गृह्णीमः करसर्वस्वं ततो गच्छ नराधम ७ अवध्यो दूततां प्राप्तो बह्वबद्धं प्रभाषसे । ईश्वरो नौ वरं दाता ह्यस्त्राणामपि च प्रभुः ८ रक्षितारौ महाभूतौ संग्रामं गच्छतोश्च नौ । पितरं राजयिष्यावो जित्वा गोपालकं रणे ९ एतेप्रोक्ताभृशंयुद्धेकातराःसर्वएवते । हत्वा तान्सबलान्युद्धे पुनर्जेष्यामि केशवम् १० संहर्तव्या महासेना प्रगृहीतशरासना । गृहीतप्रासमुशला गृहीतकवचा सदा ११ आरूढा रथसाहस्रा गदापरिघसंकुला । सुप्रभूतेन्धनवती प्रभूतबलसाधना १२

---

राजसूय महायज्ञ करण्याची इच्छा कोण करणार ? अथवा असें नुस्तें बोलणारा तुजवाचून दुसरा कोणता स्वस्तिमान् मर्त्य सुखी होईल ? ४७. पण हे मूढा, असें असतां-नाहीं जर तूं त्याची इच्छा करशील तर या भूतलीं हास्यतेस प्राप्त होशील. असें बोलून सात्यकि वीर हंसतचसा भूमीवर उभा राहिला ४८. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिंभको-पाख्यानांतील सात्यकिवाक्यनामक एकशें आठरावा अध्याय समाप्त झाला ॥ ११८. ॥

वैशंपायनः— हे महाराज जनमेजया, त्यानंतर हंस व डिंभक रागावले. रोषानें ज्यांचें नेत्र व्याकुळ झाले आहेत असे ते हें वाक्य बोलले १. सर्व नृपोत्तमांस पाहून सर्व दिशांस जणुं काय जाळण्याची इच्छा करणारे ते हातावर हात चोळून कृष्णाच्या त्या मोठ्या निरोपाचें स्मरण करीत २ ' कोठें कोठें आहे तो नंदाचा पोर ? अथवा तो बलोत्कट राम कोठें आहे ? ' असें मोठ्या निंदाव्यंजक स्वरानें सत्यप्रतिज्ञ सात्यकीस ह्मणून पुनः बोलले ३, ' अरे यादवदायदा, आमच्यापुढें हें काय बोलत आहेस ? अरे मंदात्म्या, येथून निघून जा. तूं सांप्रतकाळीं दूत आहेस ४. नाहींतर असें कठोर भाषण करणारा तूं आह्माला वध्यच झाला असतास. असें भाषण बोलणारा तूं खरोखर निर्लज्जच आहेस ५. आह्मी दोघे या सर्व जगाचें शासन करण्यास सज्ज झालेले राजे आहोंत. या मानुषलोकीं कर देणारा कोण जिवंत रहात नाहीं ? ६. सर्व गवळ्यांस मारून व अनेक यादवांस बांधून आह्मी करसर्वस्व घेऊं. तस्मात् हे नराधमा, तूं जा ७. दूत झालेला पुरुष अवध्य असतो ह्मणून तूं पुष्कळ असंबद्ध भाषण करीत आहेस. ईश्वर आमचा वरदाता आहे. तो अस्त्रांचाही प्रभु आहे ८. आह्मी संग्रामांत गेलों असतां दोघे महाभूत आमचें रक्षण करीत असतात. यास्तव त्या गोपालकास रणांत जिंकून आह्मी पित्याकडून यज्ञ करवूं ९. तूं सांगितलेले बलरामादि हे सर्व युद्धांमध्यें भितरे आहेत. त्या सर्वांस सैन्यासह युद्धामध्यें जिंकून मी पुनः केशवास जिंकीन १०. जिनें महा धनुष्यें धारण केलीं आहेत, प्रास व मुसळें घेतलीं आहेत, सदा कवचें घातलीं आहेत, जिच्यामध्यें सहस्रावधि

चाल्यतां वाहिनी घोरा बलाध्यक्षा समंततः । अवध्य एव गच्छ त्वं न ते मरणतो भयम् १३ संग्रामः पुष्करेऽस्माकं श्वः परश्वोऽपि वा नृप । ततो ज्ञास्यामहे वीर्यं केशवस्य बलस्य च । ये त्वयोक्ता नृपाः संख्ये तेषामपि च यद्बलम् १४ सात्यकिरुवाच ॥ हंस गच्छामि वां हंतुं श्वः परश्वोपि वा नृप । अद्यैव हि मया वध्यौ न चेद्दूतो भवाम्यहम् १५ न हि श्वो वापरश्वो वा युवां कटुकभाषिणौ । दौत्ये हि दुःखमतुलं वहाम्येव सदा नृणाम् १६ अन्यथाहं युवां हत्वा ततो यास्यामि निर्वृतिम् । स्ववीर्यं बाहुदर्पं च दर्शयन्वां नृपाधमौ १७ शंखचक्रगदापाणिः शार्ङ्गधन्वा किरीटभृत् । नीलकुंचितकेशाढ्यो लंबबाहुः श्रिया वृतः १८ स सर्वलोकप्रभवो विश्वरूपः सुरूपवान् । दैत्यदानवहंतासौ योगिध्येयः पुरातनः १९ पद्मकिंजल्कनयनः श्यामलः सिंहविक्रमः । सृष्टिस्थितिलयेष्वेकः कर्ता त्रिजगतो गुरुः २० शरेण निशितेनाजौ दर्पं वां व्यपनेष्यति । इत्युक्त्वा रथमारुह्य प्रययौ सात्यकिः किल २१ [ ४९७३ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिं० एकोनविंशाधिकशततमो० ॥ ११९ ॥

वैशंपायन उवाच ॥ प्रविश्य स पुरं विष्णोः सात्यकिः शिनिपुंगवः । आचचक्षेऽथ कृष्णाय यथावृत्तं तयोस्तथा १ ततः प्रभाते विमले केशवः केशिसूदनः । बलाध्यक्षानुवाचेदं चक्रपाणिर्गदाधरः २ संनह्यतां बलं सर्वं रथकुंजरवाजिमत् । अनेकभेरीपणवं प्रासासिपरिघाकुलम् ३ सध्वजं सपताकं च सालंकारपरिच्छदम् । ते तथेति प्रतिज्ञाय सर्वं

---

वीर रथारूढ झाले आहेत, जी गदा व परिघ यांनीं संकुल झाली आहे, जिच्यापाशीं पुष्कळ इंधन आहे, व पुष्कळ सैन्यसाधन आहे अशी महासेना जमवा ११,१२. घोरसेनेला हालचाल करावयास लावा. सेनाध्यक्ष समंततः सज्ज होवोत. सात्यके, तूं अवध्य आहेस. यास्तव जा. तुला मरणाचें भय नाहीं. हे राजा, आमचा संग्राम पुष्करतीर्थावर उद्यां किंवा परवां होईल. नंतर आह्मी केशव व बलदेव यांचें वीर्य पाहूं. त्याचप्रमाणें तूं जे आणखी वीर सांगितलें आहेस त्यांचेंही बल किती आहे तें आह्मी संग्रामांत पाहूं १३.१४. सात्यकिः– बरें आहे, हंसा, मी आतां तुम्हांला उद्यां किंवा परवां मारण्यासाठीं जातों. मी जर दूत होऊन आलों नसतो तर तुह्मी मला आजच वध्य झालां असता. कारण असें कडु भाषण करणाऱ्या तुह्मांला मी उद्यां किंवा परवांपर्यंत जिवंतच ठेवलें नसतें. मनुष्यांचें दूतभावांतील अतुल दुःख मी यावेळीं सहन करीत आहे १५,१६. नाहीं पेक्षां मी तुह्मांला मारून सुखी झालों असतों. हे अधम नृपांनो, मी तुह्मांला आपलें वीर्य व बाहुदर्प दाखविला असता १७. असो; आतां तो शंख–चक्र–गदापाणि, शार्ङ्गधन्वा, किरीटधारी, काळ्या-कुरळ्या केसांनीं युक्त असलेला अजानुबाहु, श्रीसंपन्न १८, सर्व लोकांचा उद्भव, विश्वरूप, सुरूपवान्, दैत्य-दानवहंता, योगिध्येय, पुरातन १९, कमलनयन, श्यामसुंदर, सिंहाप्रमाणें पराक्रमी, सृष्टि, स्थिति व लय यांचा एक कर्ता व त्रिभुवनांचा गुरु संग्रामांत तुमचा गर्व तीक्ष्णशरानें घालवील. असें बोलून व रथावर बसून सात्यकि तेथून निघून गेला २०,२१. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० हंसडिंभ० सात्यकीच्या प्रत्यागमनाविषयीं एकशें एकोणीसावा अध्याय समाप्त झाला ।। ११९. ॥

वैशंपायनः– द्वारकेपाशीं आल्यावर तो शिनिपुंगव सात्यकि विष्णूच्या त्या पुरांत प्रवेश करून कृष्णाला हंस-डिंभकाचें वर्तमान सांगता झाला १. त्यानंतर दुसरा दिवस उजाडून चांगलें दिसूं लागलें असतां चक्रपाणि, गदाधर, केशिनाशन, केशव, सेनाध्यक्षास असें ह्मणाला.

चक्रुरधीनगाः ४ आदाय सुदृढं चापं रथमारुह्य दंशिताः । अग्रतो जग्मुरत्यर्थं सेनायाः पुरुषोत्तमाः ५ सात्यकिश्च तथा राजन्प्रगृहीतशरासनः । बभौ क्रोधसमायुक्तो जगामाग्रे महाबलः ६ अन्ये च यादवाः शूराः प्रगृहीतमहायुधाः । सिंहनादं प्रकुर्वन्तो जग्मुरत्यर्थमुत्तमाः ७ हरिस्तु रथमारुह्य संस्कृतं दारुकेण ह । शार्ङ्गं भारसहं घोरं गृहीत्वा सशरं धनुः ८ चक्रपाणिस्तथा शंखी गदाशरवरासिमान् । बद्धगोधांगुलित्राणः पीतवासा जनार्दनः ९ पद्ममालावृतोरस्को नवजीमूतसन्निभः । ययौ रथगतो विप्रैः स्तूयमानो मुदान्वितैः १० सूतैर्मागधपुत्रैश्च गीयमानस्ततस्ततः । आनीय सेनां सकलां ययौ काष्ठामथोत्तराम् ११ पांचजन्यं मुखे न्यस्य सर्वप्राणेन केशवः । दध्मौ महारवं कुर्वञ्छत्रूणां भयवर्धनः १२ आध्मातस्तेन हरिणा स चक्रे शंखराट् भुवम् । खं सरोदसीराजन्पूरयामास सर्वतः १३ तस्मिंश्छंखे तथाध्माते दध्मुः शंखाः सहस्रशः । भेर्यश्चापि समाध्माता मृदंगा बहवो नृप १४ नेदुरत्यर्थमतुलं घर्मान्ते जलदा यथा । अथाययुर्महाराज पुष्करं पुण्यवर्धनम् १५ सरसस्तस्य राजेंद्र पुष्करस्य नृपोत्तमाः । प्रतीक्ष्य हंसडिंभकौ युद्धाय समवस्थिताः १६ निवेशं कारयामासुर्यादवाः सर्व एव हि । स्वं स्वं ययुः सुखं राजन्प्रगृहीतकुटीमठम् १७ भगवानपि गोविन्दः

---

"रथ, हत्ती व घोडे यांनीं युक्त असलेलें, अनेक भेरी व पणव यांनीं संपन्न झालेलें, प्रास, असि व परिघ यांनीं आकुल असलेलें, ध्वजा, पताका, अलंकार व उपकरणें यांनीं भूषित झालेलें आपलें सैन्य सज्ज करा. तेव्हां 'ठीक आहे,' असें बोलून त्याच्या अधीन असलेले ते सर्व तसेंच करते झाले २–४. सुदृढ चाप घेऊन व रथावर बसून सज्ज झालेलें उत्तम वीर पुरुष सेनेच्या अग्रभागीं जाऊं लागलें ५. त्याचप्रमाणें हे राजन्, ज्यानें शरासन घेतलें आहे असा सात्यकि अतिशय क्रोधयुक्त झाला. तो महाबलवान् अग्रभागीं चालला ६. अत्यंत उत्तम व शूर यादव महा आयुधें घेऊन सिंहनाद करीत पुढें चालले ७. पीतांबर जनार्दन हरि दारुकानें ज्याचा उत्तम संस्कार केला आहे अशा रथावर आरूढ होऊन भार सहन करणारें व घोर सशर धनुष्य घेऊन हातांत चक्र, शंख, गदा, उत्तम शर व तरवार, यांस धारण करून गोधांगुलित्राण बांधून निघाला ८,९. ज्याचा उर पद्ममालेनें आच्छादित झाला आहे व नव्या मेघाप्रमाणें ज्याची कांति आहे, असा आनंदयुक्त विप्रांकडून स्तविला जाणारा तो रथावर बसून चालला १०. त्यावेळीं सूत व मागधपुत्र जागजागीं उभे राहून त्याचें यश गात होते. सर्व सेना एकत्र आणून तो उत्तर दिशेकडे चालला ११. शत्रूंचें भय वाढविणाऱ्या केशवानें पांचजन्य तोंडावर ठेवून सर्व बलानें महारव करीत तो (जोरानें) वाजविला १२. त्या हरीनें ज्याला वाजविले आहे, अशा त्या श्रेष्ठ शंखानें मोठा ध्वनि करून, हे राजन्, भूमि व अंतरिक्ष यांना सर्वतः भरून सोडलें १३. त्यानें तो आपला शंख तसा वाजविला असतां दुसरें सहस्रावधि शंख वाजूं लागले. हे राजा, अनेक मृदंग व भेरीही वाजूं लागल्या १४. वर्षासमयीं मेघ जसे गर्जना करितात त्याप्रमाणें त्यांचा मोठा ध्वनि झाला. नंतर हे राजा जनमेजया, तें सैन्य पुण्यवर्धन पुष्कराकडे चाललें १५. योग्य वेळीं तेथें पोंचल्यावर हे राजेंद्रा, सर्व उत्तम क्षत्रिय वीर त्या पुष्कर सरोवराच्या तीरीं हंस व डिंभक यांची वाट पहात युद्धास सिद्ध होऊन राहिले १६. सर्वच यादवांनीं तेथें सेनानिवेश करविला. नंतर त्यांतील मुख्य वीर आपापल्या कुटीमठास आनंदानें गेले १७. भगवान्

सरो दृष्ट्वा सुशोभनम्। उपस्पृश्य जले तस्मिन्प्रणम्य यतिपुंगवान् १८ तयोरागमनं लिप्सुरास्ते तीरे यथासुखम्। शृण्वन्वेदध्वनिं विष्णुर्ब्राह्मणानां समंततः १९ [४९९१] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभ० कृष्णपुष्करप्रवेशो नाम विंशत्यधिकशततमोऽध्यायः॥ १२०॥

वैशंपायन उवाच ॥ अथ तौ हंसडिंभकौ जग्मतुः पुष्करं प्रति। प्रगृहीतमहाचापौ सरथौ सध्वजौ नृप १ पुरःसरमहाभूतौ संहरन्ताविवोल्बणौ। प्रकुर्वन्तौ सिंहरवं भस्मना परिलेपितौ २ त्रिपुण्ड्रकललाटान्तौ रुद्राक्षपरिशोभितौ। अन्यौ द्वाविव रुद्रौ तौ लोकसंहारकारकौ ३ ततोऽनुजग्मुः शतशः सैन्यानि नृपसत्तम। अक्षौहिण्यो दशैवासंस्तयोरथ समागताः ४ विचक्रस्तु महाराज दानवो नगसन्निभः। तयोरेव सखापूर्वमासीच्च बलशालिनोः ५ शक्रो यस्य पुरस्सरः स्थातुं शक्तो न वज्रभृत्। यो हि वीरो महाराज देवदैत्यसमागमे ६ देवा निघ्नंस्तथा राजन्देवेंद्रमज यन्महान्। अकरोच्च पुरा युद्धं विष्णुना प्रभविष्णुना ७ यो हि द्वारवतीं प्राप्य बबाधे यदुपुंगवान्। स तदानीं महाराज श्रुत्वा युद्धमुपस्थितम् ८ अनेकशतसाहस्रैर्दानवैः परिघायुधैः। वृतः समभवद्दैत्यो वृष्णिद्वेषान्नृपोत्तम ९ हंसस्य डिंभकस्याथ साहाय्यं कर्तुमुद्यतः। विचक्रस्याथ दैत्यस्य हिडिंबो राक्षसेश्वरः १० अतीवमित्रतां यातो दद्यात्प्राणांश्च संयति। राक्षसैरपरैः सार्धं शिलाशूलासिपाणिभिः ११ ययौ तस्य सहायार्थं हिडिंबः पुरुषादपः। अष्टाशीति सहस्राणि राक्षसास्तस्य चाभवन् १२ अनुयाता महाराज शिलापरिघबाहवः। तयोस्तत्र महासैन्यं गच्छतोः केशवं प्रति १३ मिश्रितं दैत्य-

---

विष्णु गोविंदही तें अतिशय शोभिवंत सरोवर पाहून त्याच्या जलांत स्नानादि करून व यतिश्रेष्ठांस प्रणाम करून ब्राह्मणांचा वेदध्वनि समंततः श्रवण करीत त्या शत्रूंच्या आगमनाची वाट पहात त्याच्या तीरीं सुखानें राहिला १८, १९. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिंभक० कृष्ण पुष्कर प्रवेशनामक एकशेंविसावा अध्याय समाप्त झाला ॥१२०॥

वैशंपायनः— राजा, नंतर ते हंस, डिंभकही महाचापें घेऊन पताका, ध्वज व रथ यांसह पुष्कराकडे चालले १. त्यांच्या अग्रभागीं दोन महा भूत होते. जणुं काय संहार करीत असल्याप्रमाणेंच ते अति भयंकर होते. सिंहनाद करणारे ते दोघे भस्मानें सर्वतः लिप्त झाले होते २. त्यांनीं आपल्या ललाटप्रदेशीं त्रिपुण्ड्र लावले होते. ते दोघे रुद्राक्षांच्या योगानें अतिशय सुशोभित झाले होते. ते जणु काय लोकसंहार करणारे दुसरे दोन रुद्रच होते ३. हे उत्तम राजा, त्यांच्या मागून शतशः सैन्य चाललें होतें. त्यांच्यामागें दहा अक्षौहिणी सैन्य जमलें ४. हे महाराज, पर्वतासारखा विचक्र दानव त्या दोघां बलशाली राजपुत्रांचा पूर्वीचा सखा होता ५. त्याच्यापुढें उभा राहण्यास वज्रधर इंद्रही समर्थ नव्हता. हे महाराजा, देव व दैत्य यांच्या समागमांत त्या महावीरानें देवांस मारून देवेंद्रास जिंकलें. पूर्वीं त्यानें प्रभु होण्याची इच्छा करणाऱ्या विष्णूशीं युद्ध केलें ६,७. त्यानें द्वारवतीस येऊन यदुश्रेष्ठांस बाधा केली. हे महाराजा, युद्ध उपस्थित झालें आहे असें ऐकून लागलीच परिघ हींच ज्याचीं आयुधें आहेत अशा शेंकडों सहस्रावधि दानवांनीं परिवेष्टित होऊन वृष्णींच्या द्वेषामुळें, हे राजा, तो त्या क्षत्रियांस येऊन मिळाला ८,९. तो दैत्य हंस व डिंभक यांस सहाय्य करावयास सज्ज झाला, त्या विचक्र दैत्याचा हिडिंब राक्षसेश्वर अतिशय मित्र झाला होता. तो त्याच्यासाठीं रणांत प्राणही द्यावयास तयार होता १०,११. तो मनुष्यभक्षकांचा पालक हिडिंब त्याच्या सहायार्थ आला. त्याचे अनुयायी राक्षस अठ्यायशीं सहस्र होते १२. हे महाराज, ज्यांच्या हातांत शिळा व परिघ आहेत

संघश्चै राक्षसैश्च समंततः । अत्यद्भुतं महाघोरं त्रैलोक्यभयदायकम् १४ दैत्यैन सहितौ तौ हि जग्मतुः पुष्करं प्रति । तावेतौ हंसडिंभकौ हन्तुं केशवमंजसा १५ ततः श्रुत्वा जरासन्धो विग्रहं यदुभिः सह । नाकरोन्नृप साहाय्यं पापं मे भवितेति ह १६ गच्छतोः सामितिं राजन्हंसस्य डिंभकस्य च । अतित्वरितविक्रान्तास्ते ययुः पुष्करं प्रति १७ सिंहनादं विमुंचन्तः कथयन्तः परस्परम् । अहमेव नृपा युद्धं करोमि प्रथमं हरेः १८ इत्यब्रुवन्नृपा राजञ्छतशः केशवं प्रति । संप्राप्तास्ते नृपश्रेष्ठाः पुष्करं पुण्यवर्धनम् १९ मुनिजुष्टं तपोवृद्धैर्ऋषिभिश्च निषेवितम् । अत्यन्तभद्रं लोकेषु पुष्करं प्रथमं नृप २० पुष्करं पुंडरीकाक्षो द्वावेव जगतीपते । दर्शनात्स्पर्शनाच्चैव किल्बिषच्छेदिनौ नृप २१ पुष्करं पुण्डरीकाक्षो द्वावेव नृपसत्तम । सेव्यमानौ मुनिश्रेष्ठैरमरौघैर्महात्मभिः २२ द्वावेव हि नृपश्रेष्ठ सर्वपापप्रणाशकौ । तावुभौ यत्र सहितौ तत्र ते संस्थिता नृपाः २३ ददृशवन्तौ हरिं विष्णुं विष्टरश्रवसं परम् । पुष्करं पुण्यनिलयं तीर्थं ब्रह्मनिषेवितम् २४ ताभ्यां कुरु नमस्कारं मनसा नृपसत्तम । अहो निःशेषमभवत्तत्र नृपा न संशयः २५ सैन्यं तत्र च संप्राप्तं दैत्यरक्षःसमाकुलम् । अनेकभेरीपणवझझंरीडिंडिमाकुलम् २६ नानापणवसंमिश्रं रक्षोनादविनादितम् । प्रविश्य सरसस्तीरं पुष्क-

---

असे ते सर्व त्याच्या मागोमाग येत होते. केशवावर चाल करून जात असलेल्या त्या दोघां राजपुत्रांच्या महासैन्यास समंततः दैत्यसंघ व राक्षस येऊन मिळाले. त्यामुळें तें अति अद्भुत महाघोर व त्रैलोक्यास भय देणारें झालें १३,१४. दैत्यांसहवर्तमान ते हंस-डिंभक स्वबलानें केशवास मारण्यासाठीं पुष्करास गेले १५. जनमेजया, यादवांसह त्यांचा संग्राम उपस्थित झाला आहे, असें जरासंधानें ऐकलें. पण मला पाप लागेल असें जाणून युद्धास जाणाऱ्या हंस व डिंभक यांना त्यानें साहाय्य केलें नाहीं. अति त्वरेनें गमन करणारे ते सिंहनाद करीत व परस्परांशीं बोलत पुष्करास गेले. अहो राजांनो, मीच पूर्वी केशवाशीं युद्ध करीन असें, हे राजा, शेकडों क्षत्रियांनीं त्या राजपुत्रांस सांगून ठेवलें होतें. शेवटीं ते सर्व क्षत्रियश्रेष्ठ पुण्यवर्धन पुष्करास येऊन पोंचले. मुनि त्याचें सेवन करीत होते. तपोवृद्ध ऋषि त्याच्या तीरावर वास करीत होते. हे राजा, सर्व लोकांत पुष्कर हें पहिलें व अतिशय कल्याणकर तीर्थ आहे १६-२०. जगतीपते राजन्, दर्शन व स्पर्शन यांच्या योगानें पापाचा उच्छेद करणारें एक पुष्कर व दुसरा पुंडरीकाक्ष अशा दोनच वस्तु आहेत २१. हे उत्तम राजा, पुष्कर व पुंडरीकाक्ष या दोघांचेंच मुनिश्रेष्ठ, देवसंघ व महात्मे सेवन करीत असतात २२. ते दोनच पदार्थ सर्व पापप्रणाशक आहेत. ते दोघे जेथें एकत्र जमले होते तेथें ते सर्व राजे येऊन राहिले २३. स्वर्गलोकामध्यें ज्याची कीर्ति पसरली आहे अशा त्या सर्व श्रेष्ठ हरि विष्णूला त्या दोघांनीं पाहिलें. त्याचप्रमाणें पुण्याचें स्थान व ब्रह्मनिषेवित अशा पुष्कर तीर्थाचें त्यांनीं दर्शन घेतलें २४. हे उत्तम राजा जनमेजया, तूं मनानें पुष्कर व पुंडरीकाक्ष यांस नमस्कार कर. हे राजन्, तुझें पाप निःशेष झालें आहे, यांत कांहीं संशय नाहीं २५. असो; वर वर्णन केल्याप्रमाणें दैत्य व राक्षस यांनीं भरलेलें तें सैन्य तेथें येऊन पोंचलें. अनेक नगारे, पणव, झांझा व ढोल यांच्या नादांनीं तें आकुल झालें होतें २६. अनेक पणवांचा नाद त्यांत मिसळून गेला होता. राक्षसांच्या आक्रोशानें तें नादित झालें होतें. हे राजा, त्या पुष्कर तीर्थाच्या तीरावर जाऊन तें सैन्य युद्ध करावयास आलेल्या देवेशास पाहते झाले २७

रस्य विशांपते । दर्शयामास देवेशं युद्धाय समुपस्थितम् २७ [ ५०१९ ] इति श्रीमहाभारते खि० हरि० भविष्यपर्वणि हंसडिंभकोपाख्याने एकविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥१२१॥

वैशंपायन उवाच ॥ द्वे सेने संगते राजन्सध्वजे सपरिच्छदे । महापरिघसंकीर्णे गदाशक्तिसमाकुले १ भेरीझर्झरसंपूर्णे डिण्डिमारावसंकुले । प्रगृहीतमहाशस्त्रे शूलासिवरकार्मुके २ परस्परकृतोत्साहे चक्राते युद्धमुल्बणम् । ते शराः कार्मुकोत्सृष्टा निर्भिद्याथ शरीरिणाम् ३ शरीराणि महाराज जग्मुर्दूरं सहस्रशः । भटबाहुविनिर्मुक्ताः खड्गा निर्भिद्य वक्षसि ४ स्फुरंतश्च तथा राजञ्छिरांस्याहृत्य खं ययुः । परिघाश्च तथा राज्ञां बाहुभिः परिचोदिताः ५ तिलशश्चक्रुरतुलं शरीरं नृपरक्षसाम् । दैत्यानां कुर्वतां नादमन्योन्यवधकांक्षिणाम् ६ दैत्या रक्षांसि राजेन्द्र राजानश्च समंततः । अन्योन्यं परिघैर्जघ्नुश्चापमुक्तैः शिलाशितैः ७ शरैश्च भोगिभोगाभैस्तीक्ष्णमन्ये महाबलाः । राक्षसा दानवाश्चान्ये मत्तमातंगविक्रमाः ८ अन्योन्यं जघ्निरे राजंश्चापमुक्तैर्महाशरैः । नागा नागैर्महाराज हया अश्वैः समंततः ९ रथा रथैः समाजग्मुः सादिनः सादिभिस्तथा । पट्टिशासिशरव्रातैः कुन्तैः सायककर्षणैः १० सशक्तिपरिघप्रासपरश्वधसमाकुलैः । भिंडिपालैर्महारौद्रैर्जघ्नुरन्योन्यमाहवे ११ अन्योन्यं जघ्निरे राजंश्चापमुक्तैः शिलाशितैः । राक्षसा दानवा राजन्क्षत्रियाश्च समंततः । इतश्चेतश्च धावन्तः कुर्वन्तो विस्वरं रवम् १२ हताः केचिन्महा-

---

इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंस–डिंभकोपाख्यानांतील सेनानिवेशाविषयीं एकशेंएकविसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२१. ॥

वैशंपायनः— राजन्, ध्वज व उपकरणें यांसह त्या दोन्ही सेना संगत झाल्या. त्या महापरिघांनीं व्याप्त झाल्या होत्या. गदा व शक्ति यांनीं व्याकुल झाल्या होत्या ? नगारे व झांझा यांनीं त्या परिपूर्ण होत्या. ढोलांच्या आवाजांनीं त्या संकुल झाल्या होत्या. त्यांतील लोकांनीं महाशस्त्रें हातांत घेतलीं होतीं. शूल, तरवारी व श्रेष्ठ धनुष्यें त्यांनीं हातांत घेतलीं होतीं १,२. त्यांनीं एकमेकांचा उत्साह वाढविला. नंतर त्यांनीं भयंकर युद्ध केलें. त्यांच्या शरीरापासून सुटलेले सहस्रावधि बाण देहवानांच्या शरीरांस फोडून, हे महाराज, दूर निघून गेले. योद्ध्यांच्या बाहूपासून सुटलेलीं खड्गें वक्षःस्थलांवर प्रहार करून व त्याचप्रमाणें शिरें तोडून चमकत वर उडूं लागलीं. त्याचप्रमाणें राजांचे हातांतून फेंकलेले परिघ क्षत्रिय व राक्षस यांच्या अतुल शरीरांचें तिला एवढाले तुकडे करिते झाले. भयंकर नाद करणाऱ्या व परस्परांचा वध इच्छिणाऱ्या दैत्यांच्या शरीरांचा चूर उडाला ३–६. हे राजेंद्रा, दैत्य, राक्षस व क्षत्रिय यांनीं एकमेकांस समन्ततः परिघांनीं मारलें. साणेवर घांसलेल्या व धनुष्यापासून सोडलेल्या सर्पशरीराकार बाणांनीं ते परस्परांस जर्जर करूं लागले. दुसरे जे महाबल राक्षस व दानव मत्त हत्तीप्रमाणें पराक्रमी होते ते हे राजा, चापापासून सोडलेल्या महाशरांनीं एकमेकांस मारते झाले. हे महाराज, हत्ती हत्तींशीं भिडले, घोडे घोड्यांशीं भिडले ७-९. रथ रथांशीं जाऊन भिडले. स्वार स्वारांशीं हातघाईवर आले. त्या वीरांनीं पट्टे, तरवारी, बाणसमूह, भाले, धनुष्यें, शक्ति, परिघ, प्रास, परशु, भयंकर दगड फेंकणाऱ्या गोफिणी, इत्यादिकांच्या योगानें एकमेकांचीं शरीरें छिन्न-भिन्न करून सोडलीं १०,११. हे राजन्, राक्षस, दानव व क्षत्रिय यांनीं समंततः तीक्ष्ण बाण सोडून शत्रूंस मारलें. ते त्यावेळीं इतस्ततः धांवत

राज पेतुरुर्व्यां महासिभिः । केचिन्मथितमस्तिष्का गदाभिर्वीर्यवत्तमाः १३ भिन्नग्रीवा महाराज परिघैः परिघायुधैः । यमराष्ट्रं गताः केचित्केचित्स्वर्गं समाययुः १४ अप्सरोभिः समासेदुः पश्यन्तः स्वकलेवरम् । केचित्स्वांश्च परांश्चैव हत्वा भ्रान्ता इवाभवन् १५ एतस्मिन्नन्तरे राजन् शंखा भेर्यः सहस्रशः । सस्वनुः सर्वतः सैन्ये मृदंगा बहवस्तथा १६ मध्यंदिनगते सूर्ये तापं दधति घोरवत् । ततः पिशाचा विकृताः करालविततोदराः १७ राक्षसाश्च महाघोराः पिशितं केशशाड्वलम् । मुदिता भक्षयामासुः पिबन्तः शोणितं बहु १८ संचितानि शवान्यासन्कबन्धाः खड्गपातिताः । विभज्य देशं बहुशो युद्धभूमौ शवाशिनः १९ अथ श्येना मृगाश्चैव कंका गृध्रास्तथा परे । तुण्डैः शवान्विनिष्कृष्य भक्षयन्ति ततस्ततः २० सप्ताशीतिसहस्राणि हता नागा नृपोत्तम । त्रिंशत्सहस्रमयुतं निहता हयसत्तमाः २१ हतं लक्षं महाराज रथानां रथिभिः सह । त्रिंशत्कोट्यो हतास्तत्र सादिनः सायुधा भृशम् २२ मध्यंदिनगते सूर्ये हताः केचन निर्गताः । केचिच्च तृषिता राजन्विविशुः पुष्करं सरः २३ केचिद्भूमिं समालिंग्य भीता इत्यब्रुवन्रणे । मुक्तकेशाः पतन्ति स्म रथान्संत्यज्य केचन २४ संदष्टौष्ठपुटाः केचित्सादिनः पुरतो हताः । अत्यद्भुतं महायुद्धमासीत्पुष्करतीर्थके ॥ यथा देवासुरं युद्धमासीत्पूर्वं नृपोत्तम २५ [ ५०४४ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिं० द्वाविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥ १२२ ॥

---

होते व कर्कश स्वर करीत होते १२, राजा जनमेजया, कित्येक महाखड्गांनीं मारले गेलेले वीर भूमीवर पडले. कित्येक अतिशय वीर्यवान् वीरांचे मस्तिष्क गदांच्या आघातांनीं फोडले गेले १३. परिघ हींच ज्यांचीं आयुधें आहेत अशा वीरांनीं परिघांच्या योगानें कित्येकांच्या माना मोडल्या. त्यामुळें त्यांतील कित्येक पापी यमराष्ट्रास गेले व कित्येक पुण्यवान् स्वर्गास जाऊन पोंचले १४, आणि अप्सरांशीं मिळून युद्धभूमींत पडलेलें आपलें शरीर पाहते झाले. कित्येक आपल्या व शत्रूंच्याही लोकांस मारून भ्रांतसे झाले १५. इतक्यांत हे राजा, त्या सैन्यांत सर्वतः सहस्रावधि शंख, दुंदुभी, व अनेक मृदंग वाजूं लागले १६. सूर्य मध्यभागीं येऊन घोर ताप देऊं लागला असतां विक्राळ व ज्यांचीं उदरें भयंकर व विस्तृत आहेत असे पिशाच व महा घोर राक्षस केंसांनीं युक्त असलेलें मांस मोठ्या आनंदित चित्तानें भक्षण करूं लागले व त्यांनीं पुष्कळ रक्त प्राशन केलें १७,१८. शवांचे ढीग पडले. खड्गांच्या योगानें पाडलेले कबंध भूमीवर तडफडूं लागले. युद्धभूमींतील प्रदेश वाटून घेऊन शवांस भक्षण करणारे पशु, कंक, गृध्र व श्येन आपल्या तोंडांनीं शवांस फाडून व सोलून खाऊं लागले १९,२०. हे उत्तम राजा, सत्यायशीं सहस्र हत्ती मरून पडले. चाळीस सहस्र उत्तम घोडे मेले २१. हे महाराज, रथ्यांसह एक लक्ष रथ ध्वंस पावले. त्या युद्धांत तीस कोटी घोडेस्वार आयुधांसह छिन्न-भिन्न होऊन पडले २२. हे राजा, सूर्य मध्यान्हीं आला असतां कित्येक मारले गेले. कित्येक तेथून निघालें व कित्येक तृषित होऊन पुष्कर सरोवरांत प्रविष्ट झाले २३. कित्येक भूमीला आलिंगन देऊन ( म्ह. दंडवत घालून ) आह्मी भ्यालों आहों असें ह्मणाले. व ज्यांचे केस मोकळे सुटले आहेत असे कित्येक रथांचा त्याग करून शत्रूंवर धावूं लागले. ज्यांनीं दांत व ओठ खाल्ले आहेत असे कित्येक घोडेस्वार सन्मुख मारले गेले. सारांश हे राजन्, पूर्वीं देवासुरांचें युद्ध जसें झालें होतें तसेंच तें पुष्करतीर्थावरील

वैशंपायन उवाच ॥ एतस्मिन्नन्तरे राजन्द्वंद्वयुद्धमवर्तत । विचक्रं योधयामास शार्ङ्गधन्वा गदाधरः १ बलभद्रोऽथहंसेन डिंभकेन च सात्यकिः । वसुदेवोग्रसेनाभ्यां हिडिंबः पुरुषादकः २ शेषाश्च शेषै राजेन्द्र चक्रुर्युद्धमदीनगाः । वासुदेवस्त्रिसप्तत्या दैत्यं वक्षस्यताडयत् ३ शरैर्निशितधाराग्रैर्विस्मयं दर्शयन्रणे । दानवो देवदेवेशं दृढेन निशितेन च ४ शरेणाकर्णमाकृष्य धनुः प्रवरमीश्वरम् । जघानस्तनमध्ये तु पश्यतस्तु शचीपतेः ५ तेन विद्धोऽथभगवान्वक्षोदेशे जनार्दनः । अस्रवच्छोणितं विष्णुरादिकाले यथा प्रजाः ६ ततः क्रुद्धो हृषीकेशः क्षुरप्रेणाहनद्ध्वजम् । अश्वांश्च चतुरो हत्वा सारथिं च शरैस्त्रिभिः ७ ततो दध्मौ महाशंखं यथा तारामये रणे । रथादुत्प्लुत्य सहसा दानवः क्रोधमूर्छितः ८ गदां गृह्य महाघोरां दुःसहां वीर्यशालिनीम् । तया जघान दैत्येंद्रः किरीटे केशवस्य ह ९ ललाटे च पुनर्विष्णुं सिंहनादं व्यनीनदत् । ततः शिलां च महतीं प्रगृह्य दनुजः किल १० भ्रामयित्वा दशगुणं प्राहरत्केशवोरसि । तामापतन्तीं संप्रेक्ष्य हस्तेनादाय केशवः ११ जघान च तया दैत्यं स पपातार्दितः क्षितौ । गतासुरिव संजज्ञे श्वसन्निव पपात ह १२ प्राप्य संज्ञां ततो दैत्यः क्रोधाद्द्विगुणमाबभौ । आदाय परिघं घोरमिदमाह जनार्दनम् १३ अनेन तव गोविन्द दर्पजातं निहन्म्यहम् । विक्रमज्ञस्तदा चास्ति मम देवासुरे रणे १४ तावेव विपुलौ

---

महायुद्ध अति अद्भुत झालें २४,२५. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० हंसडिं० युद्धाविषयीं एकशें बाविसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२२. ॥

वैशंपायनः— हे जनमेजया त्यानंतर द्वंद्वयुद्धें सुरू झालीं. शार्ङ्गधन्वा गदाधर विचक्राशीं युद्ध करूं लागला १. बलभद्र हंसाशीं, सात्यकि डिंभकाशीं, व पुरुषभक्षक हिडिंब वसुदेव-उग्रसेनाशीं लढूं लागला २. बाकीचे शूर बाकीच्यांशीं लढूं लागले. वासुदेवानें रणांत मोठा चमत्कार दाखवीत तीक्ष्ण धार व अग्रें यांनीं युक्त असलेल्या त्र्याहात्तर बाणांनीं दैत्याच्या उरावर प्रहार केला. दानवानेंही देवदेवेशास, त्या ईश्वरास, आपलें श्रेष्ठ धनुष्य आकर्ण ओढून तीक्ष्ण व पाजळलेल्या शरानें, इंद्र अंतरिक्षांतून पाहत असतांना, नेमका उरावर प्रहार केला ३-५. त्या बाणानें वक्षःप्रदेशीं प्रहार केला गेलेला भगवान् जनार्दन सृष्टीच्या आरंभीं विष्णु जशा विविध प्रजा उत्पन्न करितो, त्याप्रमाणें रक्तस्राव करूं लागला ६. त्यानंतर हृषीकेश क्रुद्ध झाला. त्यानें तीक्ष्ण शरानें राक्षसाचा ध्वज तोडला. चारी अश्वांना मारलें. तीन बाणांनीं सारथ्यास मारलें व ज्याप्रमाणें तारामय रणामध्यें, त्याप्रमाणें त्यानें आपला महाशंख वाजविला. पण इतक्यांत क्रोधानें मूर्च्छित झालेला दानव एकाएकीं महाघोर दुःसह व वीर्यशालिनी गदा घेऊन रथांतून उडी मारून खालीं उतरला व त्या दैत्येंद्रानें केशवाच्या किरीटावर त्या गदेचा प्रहार केला ७-९. त्यानें पुनः विष्णूच्या ललाटावर ताडण केलें व मोठा सिंहनाद केला. त्यानंतर दनुजानें मोठी शिला घेऊन व ती दहावेळ फिरवून केशवाच्या उरावर फेंकली. पण केशवानें ती येत असतांना पाहून व तिला आपल्या हातानें धरून तिचाच दैत्यावर प्रतिप्रहार केला. त्यामुळें तो अतिशय व्याकुळ होऊन भूमीवर पडला. तो मेल्यासारखाच झाला. श्वास सोडीतसा पडला १०-१२. कांहीं वेळानें तो देहभानावर आला. व क्रोधानें दुप्पट शोभूं लागला. तो घोर परिघ घेऊन जनार्दनाला असें ह्मणाला, १३. "अरे गोविंदा, या परिघानें मी तुझा सर्व दर्प

बाहू स एवास्मि जनार्दन । तथापि युध्यसे वीर ज्ञात्वा त्वं मामकं बलम् १५ वारयैनं महाबाहो परिघं बाहुनि:सृतम् । इत्युक्त्वा देवदेवेशे शंखचक्रगदाधरे ॥ चिक्षेप दैत्यो लोकेशे सर्वलोकस्य पश्यतः १६ तं गृह्य बाहुना कृष्णो हतोसीति वदन् हरिः । खंडशः कारयामास खड्गेन निशितेन ह १७ उत्पाट्य वृक्षं दैत्येशः शतशाखं महाशिखम् । तेन संयोधयामास विष्टरश्रवसं विभुम् १८ छित्वा तं चापि खड्गेन तिलशश्च चकार ह । विक्रीड्य सुचिरं विष्णुस्तेन दैत्येन माधवः १९ हंतुमैच्छत्तदा दैत्यमादाय निशितं शरम् । आग्नेयास्त्रेण संयोज्य जघानैनं महान् हरिः २० संदह्य स शरो दैत्यं सर्वलोकस्य पश्यतः । यथापूर्वं जगामाशु करं भगवतः पुनः २१ हताशिष्टास्ततो दैत्याः पलायन्तो दिशो दश । अद्यापि न निवर्तन्ते गच्छन्तो वै महोदधिम् २२ [ ५०६६ ] इति श्रीम० खिलेषु हरिवंशे भवि० हंसडिंभको० कृष्णस्योत्कर्षवर्णनं नाम त्रयोविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥ १२३ ॥

वैशंपायन उवाच ॥ बलदेवस्तु धर्मात्मा धनुरादाय सत्वरम् । जघान हंसं दशभिर्बाणैर्बाणभृतां वरः १ तं प्रत्यविध्यन्नाराचैर्हंसः पंचभिराशुगैः । तानन्तरे हली छित्वा नाराचैर्दशभिः पुनः २ नाराचेनाशु विव्याध ललाटे हंसमोजसा । दृढं पतन्स नाराचस्तस्य संज्ञां समादधे ॥ रथोपस्थे चिरं स्थित्वा तूणाद्बाणं समाददे ३ लब्ध्वा हंसः स संज्ञां तु विध्वा तेन यदूत्तमम् । सिंहवद्व्यनदद्धंसो देवान्विस्मापयन्रणे ४ ततः क्रुद्धो हली विद्धस्तेन बाणेन

---

घालवितों. पूर्वी देवासुररणांत माझा पराक्रम तुला कळलाच आहे. हे जनार्दना, तोच हा मी आहें व तेच हे माझे विपुल बाहु आहेत. तथापि हे वीरा, माझें बळ जाणत असूनही तूं युद्ध करितोस ! १४,१५. बरें आहे, महाबाहो, माझ्या हातांतून सुटलेल्या या परिघाचें निवारण कर. " असें बोलून दैत्यानें सर्व लोक पहात असतांना लोकेश शंख–चक्र–गदाधर देवदेवेशावर तो फेकला १६. पण कृष्णानें त्याला आपल्या हातानें धरिलें व आतां मेलास म्हणून समज, असें तोंडानें बोलत तीक्ष्ण खड्गानें त्याचे तुकडे केले १७. तेव्हां ज्याला शंभर शाखा आहेत असा एक मोठा वृक्ष उपटून घेऊन दैत्येशानें त्याच्या योगानें विष्टरश्रवा-विभूस मारण्याचा निश्चय केला १८. पण कृष्णानें त्या वृक्षालाही तोडून त्याचे तिळा–एवढाले तुकडे केले. याप्रमाणें तो माधव विष्णु दैत्याशीं पुष्कळ वेळ क्रीडा करून १९ शेवटीं त्याला मारण्याची इच्छा करता झाला. तीक्ष्ण शर घेऊन व त्याच्यावर आग्नेयास्त्राची योजना करून हरीनें त्याच्यावर तो फेकला. तेव्हां सर्व लोक पहात असतांना तो शर दैत्यास जाळून पुनः पूर्वीप्रमाणें तत्काल भगवानाच्या हातांत आला २०,२१. तेव्हां मरून वांचलेले दैत्य दशदिशांकडे पळून गेले. महासागराकडे जाणारे ते अद्यापि परत फिरत नाहींत २२. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० हंसडिंभ० कृष्णोत्कर्षवर्णननामक एकशेंतेविसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२३. ॥

वैशंपायनः—बाणधारण करणारांतील श्रेष्ठ धर्मात्मा बलदेव सत्वर धनुष्य घेऊन दहा बाणांनीं हंसास मारता झाला १. हंसानेंही त्याला पांच बाणांनीं प्रतिवेध केला. पण दहा बाणांनीं त्यांस मध्येंच तोडून हलधरानें एका नाराचानें हंसाच्या ललाटावर जोरानें प्रहार केला. मर्माला झोंबणाऱ्या त्या बाणानें त्याला मूर्च्छित केलें. त्यामुळें रथाच्या मागच्या बाजूस बराच वेळ बसून हंसानें तूणीरांतून बाण काढला २,३. तो हंस देहभानावर येऊन रणांत देवांस विस्मय उत्पन्न करीत त्या बाणानें यदूत्तमाला वेध

माधवः । वमञ्छोणितमत्युष्णं निश्वसंश्च रणाजिरे ५ लोहिताविष्टगात्रस्तु कुंकुमार्द्र इवाभवत् । नाराचैः शतसाहस्रैरर्दयामास माधवः ६ हंसं हंसगतिं वीरं नीलवासा हलायुधः । ते मुक्ता निशिता घोरा नाराचाश्च सुवाजिनः ७ रथे ध्वजे तथाचापे चक्रे तूणीद्वये नृप । पतिताः सर्वतो राजन् व्यथां चैव तथा ददुः ८ ततः क्रुद्धो महाराज हंसो वीर्यमदान्वितः । शरेण हलिनं विध्वा ध्वजं चिच्छेद कालवित् ९ शरैश्चतुर्भिरश्वांश्च सूतं प्रेताधिपं ददौ । ततः क्रुद्धो हली तस्मै गदां गृह्य महारणे १० आपपात महाबाहुर्हंसं शेष इव श्वसन् । तया रथं ध्वजं चक्रमश्वान्सूतं हलायुधः । बभंज तिलशः सर्वं ननाद च पुनः पुनः ११ भूयश्च गदया हंसं चिक्षेप च बली किल । सोऽपि हंसो गदां गृह्य रथात्तस्मादवापतत् १२ ततस्तौ हंसहलिनौ युयुधाते महारणे । महारथौ महाबाहू लोके प्रथिततेजसौ १३ अत्यद्भुतं सुविक्रान्तौ परस्परवधैषिणौ । कृतश्रमौ महायुद्धे हंसविक्रान्तगामिनौ १४ यथा देवासुरे युद्धे शक्रवृत्रौ पुरांवरे । उभौ संरक्तसर्वांगौ शोणितेन महारणे१५ अत्यन्तखेदिनौ युद्धे परस्परबलेन ह । ततश्च दक्षिणं मार्गं बलभद्रो ह्यगृह्णत १६ सव्यं तु हंसो राजेन्द्रो व्यगृह्णात्स्वयमेव हि । पोथयांचक्रतुर्युद्धे गदाभ्यां गजविक्रमौ १७ यथाप्राणं महाबाहू जघ्नतुर्मरणाय तौ । अतिप्रवृद्धं संग्रामं देवासुररणोपमम् १८ विदधाते महारंगे पश्यतां त्रिदिवौकसाम् ।

---

करिता झाला व त्यानें सिंहाप्रमाणें घोर गर्जना केली. त्या बाणानें विद्ध झालेला हलधर माधव अतिशय रागावला. रणांगणांत रक्त ओकणारा तो दीर्घ श्वास सोडूं लागला. ज्याचें सर्व शरीर रक्तानें भरलें आहे असा तो कुंकुमानें माखल्याप्रमाणें दिसूं लागला. मधुवंशज, नीलांबर हलायुधानें हंसाप्रमाणें मंद गमन करणाऱ्या वीर हंसास शेकडों नाराचांनीं पीडलें. हे राजा, त्यानें सोडलेले ते घोर तीक्ष्ण व अति वेगवान् नाराच हंसाच्या रथावर, ध्वजावर, चापावर, चक्रावर व दोन्ही तूणीरावर सर्वतः जाऊन पडले व त्यांनीं त्याला अतिशय व्यथा दिली ४-८. त्यामुळें हे महाराज, हंस अतिशय रागावला. त्या कालज्ञ व मदबलयुक्त वीरानें बाणानें हलीला वेध करून त्याचा ध्वज तोडला ९. चार बाणांनीं चार घोड्यांस व सारथ्यास त्यानें यमसदनीं धाडलें. तेव्हां शेषाप्रमाणें दीर्घश्वास सोडणारा महाबाहु राम त्या महारणांत अतिशय चिडून व गदा घेऊन त्याच्यावर धावला. हलायुधानें तिच्या योगानें हंसाचा रथ, ध्वज, चक्र, अश्व, व सारथि या सर्वांचे तिळा एवढे तुकडे उडवून पुनः पुनः सिंहनाद केला १०.११. त्या बलाढ्यानें गदेच्या योगानें हंसालाही रथावरून खालीं पाडविलें. तेव्हां हंसही गदा घेऊनच रथांतुन खालीं आला १२. त्यानंतर ते दोघे महारथ, महाबाहू व लोकामध्यें प्रथित तेजस्वी महावीर त्या महारणांत युद्ध करूं लागले १३. परस्परांच्या वधाची इच्छा करणारे ते अतिशय अद्भुत पराक्रम करूं लागले. हंसाप्रमाणें पावलें टाकीत जाणारे ते दोघेही महायुद्धांमध्यें श्रम केलेले होते १४. पूर्वीं स्वर्गांतील देवासुरयुद्धांत जसे शक्र व वृत्र त्याप्रमाणें त्या महारणांत ज्यांचें सर्व अंग रक्तानें माखलें आहे असे ते दोघे शोभले १५. एकमेकांच्या बलानें ते युद्धांत अतिशय खिन्न झाले. त्यानंतर बलभद्रानें दक्षिणमार्ग घेतला. हे राजेंद्रा, हंसानें आपणच होऊन डावी बाजु स्वीकारली. नंतर हत्तींप्रमाणें ज्यांचा विक्रम आहे अशा त्या दोघांनीं एकमेकांवर गदांनीं प्रहार केले १६,१७. त्या दोघां महाबाहूंनीं अंगांत जितकी शक्ति होती

देवाश्च मुनयश्चैव विस्मयं परिजग्मिरे १९ अहो खल्वीदृशं युद्धं दृष्टं पूर्वं न च श्रुतम् । इत्यूचुर्विस्मयवशाद्देवगन्धर्वकिंनराः २० परस्परकृतोत्साहौ चक्रतुर्युद्धमुत्तमम् । अथ हंसो महारंगे दक्षिणं दक्षिणोत्तमः २१ व्यचरन्मार्गमत्यर्थं सव्यं तु बलवान्बलः । निकुंच्य जानुनी पूर्वं चक्रतुर्गदया भृशम् । रणे रणविदां श्रेष्ठौ पश्यतां त्रिदिवौकसाम् २२ [ ५०८८ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभ० हंसबलभद्रयुद्धे चतुर्विंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥१२४॥

वैशंपायन उवाच ॥ युद्धं चक्रतुरत्यर्थं ततो डिंभकसात्यकी । तावुभौ बलिनौ वीरौ विख्यातौ क्षत्रियेषु च १ कृतश्रमौ महायुद्धे सततं वृद्धसेविनौ । सात्यकिर्दशभिर्वीरो डिंभकं वेदपारगम् २ अविध्यन्निशितैर्बाणैस्तनमध्ये तथोरसि । स तेन विद्धो बलिना डिंभकः क्षत्रियोत्तमः ३ नाराचैः पंचसाहस्रैर्विव्याध युद्धगर्वितः । तानन्तरे वृष्णिवीरो निषिद्धवान्नदन्मुहुः ४ अथ क्रुद्धो नृपवरो विद्धः सप्तभिराशुगैः । पुनः शतसहस्रेण प्रत्यविध्यत सात्यकिम् ५ सात्यकिस्तथ विक्रान्तो धनुश्चिच्छेद तस्य तत् । अर्धचन्द्रेण तीक्ष्णेन डिंभकस्य स यादवः ६ आजघ्ने डिम्भको वीरश्चापमादाय चापरम् । क्षुरप्रेणाथ रौद्रेण तैलधौतेन विक्रमी ७ स तेन विद्धो बाणेन वमञ्छोणितकं नृप । अतीव शुशुभे राजन्वसंते किंशुको यथा ८ धनुश्चिच्छेद भूयस्तु गृहीतं यत्पुरा धनुः । ततोऽन्यद्धनुरादाय डिंभको

---

तितकीं सर्व खर्चून एकमेकांस मारण्यासाठीं प्रहार केले. देव व असुर यांच्या रणाचीच ज्याला उपमा आहे असें रण अति भयंकर वाढलें १८. देव पहात असतांना महारंगांत त्यांनीं तें घोर रण केलें. तें पाहून देव व मुनि अतिशय विस्मित झाले १९. " खरेंच असलें युद्ध आम्ही पूर्वीं पाहिलें किंवा ऐकलेंही नाहीं. " असें देव, गंधर्व व किन्नर विस्मयवशात् बोलले २०. परस्परांचा उत्साह ज्यांनीं वाढविला आहे अशा त्या दोघांनीं उत्तम युद्ध केलें. दक्षिणोत्तम हंस महारंगांत दक्षिण मार्गानें जाऊं लागला. २१. व बलवान् बलरामानें सव्य मार्ग धरला. पुढचे गुडघे संकुचित करून ते दोघे रणपंडित देवांसमक्ष रणांत गदेनें भयंकर युद्ध करूं लागले २२. इति श्री० खिल० हरि० भविष्य० हंसडिं० हंस-बलभद्रयुद्धाविषयीं एकशें चोवीसावा अध्याय समाप्त झाला ॥१२४.॥

वैशंपायनः— त्या रणांगणांत दुसऱ्या स्थानीं डिंभक व सात्यकि यांचा घोर संग्राम चालला होता. ते दोघेही बलाढ्य, वीर व क्षत्रियांमध्यें विख्यात होते १. त्या दोघांनींही महायुद्धाविषयीं पुष्कळ श्रम केले होते. ते सतत वृद्धांची सेवा करणारे होते. वीर सात्यकीनें दहा तीक्ष्ण बाणांनीं वेदपारग डिंभकास उरावर व मस्तकावर वेध केला. तेव्हां त्या बलाढ्याकडून वेध केला गेलेला क्षत्रियोत्तम युद्धगर्वित डिंभक सात्यकीवर पांच सहस्र बाण फेकता झाला. पण वृष्णिवीरानें केवल गर्जनेनेंच त्यांचा मध्येंच निषेध केला २-४. इतक्यांत त्यानें सात बाण टाकून वेध केल्यामुळें डिंभकास फारच क्रोध आला. त्यानें पुनः शेंकडों बाणांनीं सात्यकीस उलट वेध केला ५. पण पराक्रमी यादव सात्यकीनें त्याचें तें धनुष्यच तीक्ष्ण अर्धचंद्र बाणानें तोडून टाकलें ६. पण वीर डिंभकानें लागलेंच दुसरें धनुष्य घेऊन तीक्ष्ण, भयंकर व तेलपाणि दिलेल्या बाणानें सात्यकीस पुनः वेध केला ७. तेव्हां त्या बाणानें विद्ध झालेला सात्यकि रक्त ओकूं लागला असतां वसंतऋतूंतील किंशुक वृक्षाप्रमाणें अतिशय शोभला ८. त्यानें पुनः तें दुसरें धनुष्य तोडलें. तेव्हां डिंभकानें तिसरें धनुष्य घेऊन सर्व क्षत्रियांच्या समक्ष तीक्ष्ण

यादवेश्वरम् ९ जघान निशितैर्बाणैः सर्वक्षत्रस्य पश्यतः । स धनुः पुनरत्युग्रं चिच्छेद युधि सात्यकिः १० शरेण तीक्ष्णपुंखेन डिंभकस्य दुरात्मनः । ततोऽन्यद्धनुरादाय सत्वरं स नृपोत्तमः ११ धनुषा तेन राजेन्द्र सात्यकिं विव्यधे पुनः । एवं धनूंषि राजेन्द्र शतं पंच च पंच च १२ छित्वा ननाद शैनेयः सर्वक्षत्रस्य पश्यतः । धनुषी तौ परित्यज्य वीरौ डिंभकसात्यकी १३ खड्गौ प्रगृह्य चात्युग्रौ युद्धाय समुपस्थितौ । तौ हि खड्गविदां श्रेष्ठौ वीरौ डिंभकसात्यकी १४ दौःशासनिर्महाभाग सौमदत्तिस्तथैव च । अभिमन्युश्च विक्रान्तो नकुलश्च तथैव च १५ एते खड्गविदां श्रेष्ठाः कीर्तिता युधि सत्तमाः । एधेतां हि नृपश्रेष्ठौ खड्गाभ्यां नृपसत्तम १६ तावेतावसिना युद्धं चक्रतुर्युद्धलालसा । भ्रान्तमुद्भ्रान्तमाविद्धं प्रविद्धं बाहुनिःसृतम् १७ आकरं विष्करं मित्रं निर्मर्यादममानुषम् । संकोचितं कुलचितं सव्यजानु विजानु च १८ अहितं चक्रकं क्षिप्तं कुसुंबं लंबनं धृतम् । सव्यबाहुर्विनिर्बाहुः सव्येतरमथोत्तरम् १९ त्रिबाहुस्तुंगबाहुश्च सव्योन्नतमुदासि च । पृष्ठतः प्रहरं चैव योधिकं प्रथितं तथा २० इति प्रकारान्द्वात्रिंशच्चक्रतुः खड्गयोधिनौ । पुनः पुनः प्रहरन्तौ न च श्रममुपेयतुः २१ पुष्करस्थौ महाराज युद्धाय कृतनिश्चयौ । ततो देवाः सगन्धर्वाः सिद्धाश्च परमर्षयः २२ तुष्टुवुस्तौ महाराज जये कृतपरिश्रमौ । अहो वीर्यमहो धैर्यमनयोर्बाहुशालिनोः २३ एतावेव रणे शक्तौ खड्गे धनुषि पारगौ । एकः शिष्यो गिरीशस्य द्रोणस्यान्यो हि धीमतः २४ अर्जुनः सात्यकिश्चैव वासुदेवो जगत्पतिः । त्रय एते महाराज प्रथिताः संगरे सदा २५ डिंभकः शक्तिभृच्छर्वस्त्रय एते महारथाः । प्रसिद्धाः सर्व एवैते वीर्येषु च बलेषु च २६

---

बाणांनीं यादवेश्वरास प्रहार केले ९. पण सात्यकीनें युद्धामध्यें पुनः त्या दुरात्म्या डिंभकाचें धनुष्य तीक्ष्ण शरानें तोडलें. त्या उत्तम क्षत्रियानें सात्यकीस पुनः सत्वर वेध केला. हे राजेंद्रा, याप्रमाणें सर्व क्षत्रिय पहात असतां शैनेयानें त्या शत्रूचीं एकशें दहा धनुष्यें तोडलीं व मोठा नाद केला. नंतर धनुष्यें सोडून व अति उग्र खड्ग घेऊन वीर डिंभक व सात्यकि युद्धास सज्ज झाले. ते दोघे डिंभक व सात्यकि वीर खड्गवेत्त्यांतील श्रेष्ठ होते १०-१४. हे राजेंद्रा, महाभाग दौःशासनि, तसाच सौमदत्ति, पराक्रमी अभिमन्यु व नकुल हे खड्गवेत्त्यांतील श्रेष्ठ व युद्धांतील उत्तम वीर ह्मणून वर्णिलेले आहेत. हे उत्तम राजा, खड्गांच्या योगानें ते दोघे फार वृद्धि पावले १५,१६. ते दोघे युद्धलालसी वीर खड्गांनीं भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध, प्रविद्ध, बाहुनिःसृत १७, आकर, विष्कर, मित्र, निर्मर्याद, अमानुष, संकोचित, कुलचित, सव्यजानु, विजानु १८, अहित, चक्रक, क्षिप्त, कुसुंब, लंबन, धृत, सव्यबाहु, विबाहु, सव्येतर, उत्तर १९, त्रिबाहु, तुरंगबाहु, सव्योन्नत, उदासि, पृष्ठतः प्रहर, योधिक, प्राथित २०, असे बत्तीस प्रकार ते खड्गयोद्धे करते झाले. एकमेकांवर पुनः पुनः प्रहार करीत असतांनाही ते श्रांत झाले नाहींत २१. हे महाराज, पुष्कराच्या तीरावर असलेले ते युद्धाविषयीं कृतनिश्चय करते झाले. त्यामुळें हे महाराज, जयाकरितां ज्यांनीं परिश्रम केले आहेत अशा त्या दोघांची स्तुति गंधर्वांसह देव, सिद्ध व परम मुनि अशी करूं लागले. वाहवारे धैर्य, वाहवारे या दोघां बाहुशाली वीरांचें वीर्य २२,२३. हेंच रणांस समर्थ आहेत, हेच खड्ग व धनुष्य यांत पारंगत आहेत. यांतील एक शंकराचा शिष्य व दुसरा धीमान् द्रोणाचा शिष्य आहे २४. अर्जुन, सात्यकि व जगत्पति वासुदेव हे तिघे, हे महाराजा, सदा युद्धामध्यें

इति ते देवगन्धर्वाः सिद्धा यक्षा महोरगाः । दिवि स्थिताः समं ब्रूयुर्युद्धदर्शनलालसाः २७
[ ५११५ ] इति श्रीम० खि० ह० भवि० हंस० पंचविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥ १२५ ॥

वैशंपायन उवाच ॥ वसुदेवोग्रसेनौ च वृद्धो युद्धे सुनिर्वृतौ । जराजरितसर्वांगौ पलितांगशिरोरुहौ १ ज्ञानविज्ञानसंपन्नौ राजमार्गविशारदौ । युयुधाते महारंगे राक्षसेन दुरात्मना २ शरैरनेकसाहस्रैरर्दयामासतू रणे । राक्षसेंद्रं दुरात्मानं हिडिंबं पुरुषादकम् ३ हिडिंबो राक्षसेंद्रस्तु भक्षयन्सर्वतो नरान् । अतिवृद्धो दुष्टात्मा लंबबाहुर्महाहनुः ४ लंबोदरो विरूपाक्षः पिंगकेशो विलोचनः । श्येननासो महारौद्र ऊर्ध्वरोमा महाभुजः ५ पर्वताकारवर्ष्मा च दीर्घदंष्ट्रः शिवाननः । लंबोदरो दीर्घदन्तो जगद्ग्रासपरस्तथा ६ उत्तुंगांसो महोरस्को दीर्घग्रीवो गजोपमः । भक्षयन्मांसपिंडकं पिबञ्शोणितसंचयम् ७ गजान्नागैः समाहत्य हयैरश्वान्नृपोत्तम । रथान्रथैः समाहत्य सादिनः सादिभिस्तथा ८ मनुष्यान्स पुरो दृष्ट्वा नास्यग्रासं चकार सः । कांश्चिद्धृत्वा महाराज वृष्णिपालान्समंततः ९ भक्षयामास सहसा हिडिंबः पुरुषादकः । यान्पश्यन्पुरतो रक्षस्तांस्तान् विरूपधृक् १० भक्षयन्नपरान्वृष्णीन्यादवान्राक्षसेश्वरः । चिक्षेप सहसा कांश्चिद्धिडिंबः पुरुषादकः ११ अन्तकाले यथा क्रुद्धो

---

प्रख्यात आहेत २५. डिंभक, कार्तिकेय व शंकर हे तिघे महारथ आहेत. हे सर्व वीर्य व बल यांमध्यें प्रसिद्ध आहेत २६. याप्रमाणें स्वर्गांत स्थित असलेले व युद्ध पाहण्याची लालसा करणारे देव, गंधर्व, सिद्ध, यक्ष व महोरग एकाचवेळीं बोलूं लागले २७. इति श्रीम० खि० हरि० भविष्य० हंस–डिंभको० एकशें पंचविसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२५ ॥

वैशंपायनः—वसुदेव व उग्रसेन हे दोघे वृद्ध असून त्यांचीं अंगें जरेनें जर्जरित झालीं होतीं. अंगावरील व डोक्यावरील केंस पिकले होते. युद्धाविषयीं ते फारसे लालसी नव्हते १. ते दोघे शास्त्रीयज्ञान व साक्षात्कार यांनीं संपन्न होते. तथापि ते क्षत्रियांच्या युद्धाख्य मार्गामध्यें विशारद होते. ते महारणांत त्या दुरात्म्या राक्षसाशीं युद्ध करूं लागले २. अनेक सहस्र शरांनीं त्यांनीं रणांत मनुष्यभक्षक, दुरात्म्या, राक्षसेंद्र हिडिंबाला पीडलें ३. परंतु तो हिडिंब राक्षसेंद्र, सर्वतः मनुष्यांस खात अतिशय वृद्धि पावला. त्या दुष्टाचे बाहु लांब होते. हनुवटी मोठी होती ४. उदर लांब होतें. नेत्र विद्रूप होते. केंस व डोळेही पिंगट होते. त्याचें नाक श्येन पक्ष्यासारखें होतें. तो अतिशय भयंकर होता. त्याचे रोम वर उचललेले होते. भुजा मोठ्या होत्या ५. शरीर पर्वताकार होतें. त्याच्या दाढा लांब होत्या. मुख कोल्हीसारखें होतें. दांत लांब होते. त्यामुळें तो जगाला हसण्यामध्येंच तत्पर झाला आहे, असें वाटलें ६. त्याचे खांदे उंच होते. उर फार मोठा होता. मान लांब होती. त्याला गजाचीच उपमा होती. मांसाचे गोळे खाणारा व रक्तसंचय पिणारा तो ७ हे नृपोत्तमा, हत्तींच्या योगानें हत्तींस मारून, घोड्यांनीं घोड्यांस मारून, रथांनीं रथांचा चूर उडवून व स्वारांच्या योगानें स्वारांस गतप्राण करता झाला ८. तो मनुष्यांस पुढें पाहून नाकाच्या श्वासानेंच आपल्या पोटांत ओढून घेत असे. हे महाराज, कित्येक वृष्णिपालांस समंततः धरून पुरुषभक्षक हिडिंब अकस्मात् भक्षण करता झाला. विरूप धारण करणाऱ्या त्यानें ज्यांना ज्यांना समोर पाहिलें त्यांना त्यांना मारलें ९,१०. तो राक्षसेश्वर दुसऱ्या वृष्णि–राक्षसांस खात कित्येकांस अकस्मात् फेकून देता झाला ११. हे राजा, अंतकाळीं क्रुद्ध झालेला रुद्र सर्व

रुद्रः प्राणभृतो नृप । क्षणेनैकेन सर्वांस्तान्भक्षयामास राक्षसः १२ केचिद्भीता दिशः प्रापुर्वृष्णयो वीर्यशालिनः । केचित्तु भक्षितास्तेन रक्षसा वृष्णिपुंगवाः १३ कुंभकर्णो यथा राजन्भक्षयामास वानरान् । निःशेषं वृष्णिसैन्यं तु चकार पुरुषादकः १४ निश्चेष्टं वृष्णिसैन्यं तु स्थितं चित्रपटे यथा । एतस्मिन्नन्तरे क्रुद्धौ वृद्धौ यादवपुंगवौ । धनुर्गृह्य महाघोरं राक्षसस्य पुरःस्थितौ १५ यथा क्रुद्धस्य सिंहस्य मृगौ वृद्धतमाविव । व्यादायास्यं महाराज तौ वृद्धावभ्यधावत १६ चिखादिषुर्विरूपाक्षःपातालतलसन्निभः । ततो रथः पर्यधावत्खादन्खादन्कलेवरम् १७ पूरयामासतुर्वीरौ शरैर्यदुवृषौ नृप । हिडिंबस्य महाघोरं व्यादितास्यमिवान्तकम् १८ सर्वांस्तान्वारयामास देवशत्रुर्विरूपधृक् । धावतिस्म ततो रक्षो व्यादितास्यं भयानकम् १९ तयोर्गृहीत्वा धनुषी बभंज युधि सत्वरम् । बाहू प्रसार्य दुष्टात्मा राक्षसो विकृताननः २० वसुदेवं महीपालं राजानं वृद्धसेविनम् । गृहीतुं राक्षसश्रेष्ठो यतते नृप संसदि २१ हिडिंब उवाच ॥ एष वां भक्षयिष्यामि वसुदेव नराधम । उग्रसेन किमर्थं त्वं तिष्ठसे मत्पुरोगमः २२ आगच्छ प्रविशास्यं मे ग्रासभूतौ युवां मम । विधिना निर्मितो वृद्धो वसुदेवो हरेः पिता २३ बुभुक्षितः श्रमार्तश्च युद्धे त्वरितविक्रमः । मन्मुखान्नैव गच्छेतां प्रविशेतां त्वरान्वितौ २४ युवयोः शोणितं पीत्वा तृप्तिं यास्यामि निर्वृतः ॥ खादामि च पुनर्मांसं वृद्धयोर्युवयोः सुखम् २५ इति ब्रुवंस्तथा रक्षो व्यादितास्यं महाहनु ।

---

प्राण्यांचा तत्काल जसा संहार करतो त्याप्रमाणें तो राक्षस सर्वांना एका क्षणांत मारून टाकिता झाला १२. तेव्हां कित्येक भ्यालेले वीर्यशाली वृष्णिवीर भयभीत होऊन दश-दिशांकडे पळून जाऊं लागले. कित्येक वृष्णिश्रेष्ठांस त्या राक्षसानें खाल्लें १३. हे राजा, मागें कुंभकर्णानें ज्याप्रमाणें वानरांस भक्षण केलें त्याप्रमाणें पुरुषभक्षक राक्षसानें वृष्णि-सैन्य निःशेष करून सोडलें १४. चित्रपटांतील सैन्याप्रमाणें वृष्णिसैन्य निश्चिष्ट होऊन राहिले. इतक्यांत ते दोघे वृद्ध यादवश्रेष्ठ अतिशय रागावले. क्रुद्ध सिंहापुढें दोन अतिवृद्ध हरण जसे उभे रहातात त्याप्रमाणें ते दोघे महाघोर धनुष्य घेऊन त्या राक्षसाच्या पुढें राहिले. तेव्हां हे महाराज, पातालतळासारखा तो काळाकुट्ट विरूपाक्ष तोंड पसरून त्यांना खाण्याच्या इच्छेनें त्यांच्या अंगावर धांवला. तो कलेवरांस खात खात त्यांच्या रथावर चालून आला १५-१७. तेव्हां ज्यानें आपलें यमासारखें तोंड उघडलें आहे अशा हिडिंबाच्या पसरलेल्या महा घोर तोंडांत त्या वीर यदुवरांनीं बाण मारले व तें भरून सोडलें १८; पण विरूप धारण करणाऱ्या त्या देवशत्रूनें त्या सर्वांचें निवारण केलें. तो भयानक तोंड पसरून त्यांच्याकडेच धावत चालला १९. त्यानें त्या दोघांचींही धनुष्यें हिसकावून घेऊन युद्धांत सत्वर तोडून टाकलीं. नंतर ज्याचें तोंड विकाळ आहे असा तो दुरात्मा राक्षस दोन्ही हात पसरून युद्धांत वसुदेव व वृद्धांची सेवा करणारा राजा उग्रसेन यांस धर-ण्याचा प्रयत्न करूं लागला २०,२१. हिडिंबः—हा मी आतां तुम्हां दोघांना खाऊन टाकतों. हे नराधम वसुदेवा, व हे उग्रसेना, तूं माझ्यापुढें येऊन उभा कशाला राहिला आहेस २२. तर आतां ये, माझ्या तोंडांत शिर. तुम्ही दोघे माझे ग्रास झालां आहां. विधीनें वृद्ध वसुदेवाला हरीचा पिता निर्माण केलें आहे २३. युद्धामध्यें त्वरित विक्रम करणारा मी बुभुक्षित व श्रमार्त झालों आहे. आतां माझ्या तोंडांतून तुम्ही निसटून जाऊं शकणार नाहीं. यास्तव मोठ्या त्वरेनें आंत प्रवेश करा २४. तुम्हां दोघांचें रक्त पिऊन मी तृप्त

धावति स्म तदा क्षिप्रं हिडिंबो राक्षसेश्वरः २६ वसुदेवोग्रसेनौ च भीतौ विप्रेक्ष्य सर्वतः । दिशोऽभ्यभजतां राजन्निःशस्त्रौ वृष्णिपुंगवौ २७ एतस्मिनन्तरे दृष्ट्वा बलभद्रः प्रतापवान् । दृष्ट्वा च तौ तथाभूतौ वसुदेवोग्रसेनकौ २८ वासुदेवे समादिश्य हंसं युध्यन्तमीश्वरम् । निर्गत्य चान्तरं तस्य राक्षसस्य दुरात्मनः २९ मा कृथाः साहसं रक्षो मुंचेतौ राजसत्तमौ । स्थितोऽस्मि युध्यतां रक्षो मया शत्रूञ्जिघांसता ३० अहमेव हनिष्ये त्वां का चेयं तव भीषिका । इति ब्रुवाणं हलिनं तौ विसृज्य महारणे ३१ महानयमसौ दुष्टो भक्षयाम्येनमग्रतः । विदार्य पूर्ववद्वक्त्रं बलभद्रमुपाद्रवत् ३२ विसृज्य सशरं चापं राक्षसस्य पुरः स्थितः । मुष्टिं प्रगृह्य बलवान्स्फोटयन्बाहुमुत्तमम् ३३ हिडिंबस्त्वथ दुष्टात्मा मुष्टिं कृत्वा भयानकाम् । जघानवक्षो रामस्य व्यादितास्य इवांतकः ३४ क्रुद्धोऽथ बलभद्रस्तु मुष्टिना तेन ताडितः । जघान मुष्टिना तेन राक्षसेशमनिन्दितः ३५ मुष्टियुद्धं समभवन्नरराक्षसवीरयोः । युद्ध्यतोर्युद्धरंगेऽथ नरराक्षससिंहयोः ३६ तयोश्चटचटाशब्दःप्रादुरासीद्भयानकः । अथ राक्षसराजस्तु मुष्टिना राममाहवे ३७ जघान वक्षोदेशे तु वज्रेणेव पुरंदरः । अथ रामो बली साक्षान्मुष्टिं संवर्त्य यत्नतः ३८ हिडिंबं ताडयामास वक्षस्यमरविद्विषम् । तलाभ्यामथ रामस्तु वक्त्रे हत्वा स राक्षसम् ३९ आहतस्तलघातेन हिडिंबो राक्षसेश्वरः । जानुभ्यामपतद्भूमौ गतासुर्वीरराक्षसः ४० तत उत्थाप्य रामस्तु दोर्भ्यां संगृह्य राक्षसम् । आदाय बाहुवेगेन भ्रामयित्वा पदा-

---

होईन. सुखी होईन. तुझ्या वृद्धांचें मांस मी मोठ्या सुखानें खाईन. असें बोलणारा तो मोठ्या हनुवटीचा राक्षसेश्वर हिडिंब तोंड पसरून सत्वर धावूं लागला २६. तेव्हां त्याला पाहून भयभीत झालेले ते दोघे वसुदेव-उग्रसेन चारी दिशांकडे पळत जाऊं लागले. हे राजन्, त्या दोघां वृष्णिपुंगवांनीं हातांतलीं शस्त्रेंही टाकलीं २७. इतक्यांत प्रतापवान् बलरामानें हें पाहिलें. वसुदेव व उग्रसेन पलायनपरायण झाले आहेत असें पाहून आणि युद्ध करणाऱ्या ईश्वर हंसाला वासुदेवाच्या स्वाधीन करून, तेथून निघून तो वीर दुरात्म्या राक्षसाच्या मार्गामध्यें आडवा आला २८,२९. आणि ह्मणाला, "साहस करूं नको. अरे राक्षसा, या दोघां उत्तम राजांना सोड. हा मी तुझ्या समोर उभा आहें. शत्रूंस मारणाऱ्या माझ्याशीं युद्ध कर ३०. मीच तुला मारीन. तुझी एवढी भीति कसली ?" असें बोलणाऱ्या बलरामाच्याच अंगावर तो राक्षस त्यांना सोडून परतला ३१. 'हा मोठा दुष्ट आहे, मी अगोदर यालाच खातों.' असें बोलून व पूर्वीप्रमाणें तोंड उघडून तो बलरामावर धांवला ३२. तेव्हां शरासह धनुष्य सोडून बलाढ्य बलराम राक्षसापुढें मूठ वळून, दंड ठोकीत उभा राहिला ३३. दुष्टात्मा हिडिंबही भयानक मूठ वळून तोंड पसरलेल्या अंतकाप्रमाणें रामाच्या उरावर प्रहार करता झाला ३४. तेव्हां त्या मुष्टीनें ताडित झालेला राम अतिशय रागावला व त्या अनिंदित वीरानें आपल्या मुष्टीनें राक्षसेशास मारलें ३५. त्यानंतर त्या दोघां नर-राक्षसवीरांचें मुष्टियुद्ध सुरू झालें. युद्ध-रंगभूमीमध्यें लढणाऱ्या त्या नर-राक्षससिंहांच्या अंगापासून भयानक चटचटा शब्द निघाला. इंद्र जसा वज्राचा प्रहार करतो त्याप्रमाणें राक्षसानें रामाच्या उरावर दृढ प्रहार केला. रामानेंही संग्रामांत घट्ट मूठ मिटून त्या देवशत्रु राक्षसाच्या उरावर ठोसा लगावला. नंतर पुनः बलरामानें दोन्ही तळहातांच्या थपडा राक्षसाच्या तोंडावर मारून त्याला जर्जर केलें ३६-३९. रामानें तळहातानें मारलें असतां राक्षसेश्वर हिडिंब गुडघे टेकून गतप्राण झाल्याप्रमाणेंच भूमीवर

त्पदम् ४१ व्याविध्यत्सुचिरं रामो दर्शयन्नात्मनो बलम् । उत्क्षिप्य राक्षसेन्द्रं तं सर्वलोकस्यपश्यतः४२ गव्यूतिमात्रं चिक्षेप ततो देशाद्धलायुधः। गतासू राक्षसश्रेष्ठस्ततो देशान्निराक्रमत् ४३ ये केचिद्राक्षसास्तत्र हतशेषा महारणे। बलभद्रात्ततो भीता जग्मुश्चैवं दिशो दश ४४ अथांशुमाली भगवान्दिनेशः संहृत्य तेजांसि सहस्ररश्मिः । अस्तं ययौ चक्षुरपि प्रजानामीषत्तमश्चापि समाविवेश ४५ तस्मिन्प्रविष्टेऽथ समुद्रतोयं प्रजापतौ विश्वमुखे जगद्गुरौ । नक्षत्रनाथः समुपाजगाम सन्ध्यातमोपि व्यनशत्पूर्वोसम ४६ प्रभातकाले नृप सत्तमो रणे गोवर्धने किन्नरगीतनादिते । इति ब्रुवन्तो नृपसत्तमास्तदा व्युपारमंस्तत्र रणोत्सवे नृप ४७ [ ५१६२ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभ० हिडिंबपराभवो नाम षड्विंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥ १२६ ॥

वैशंपायन उवाच ॥ उभौ तौ हंसडिंभकौ रात्रावेव महागिरिम् । जग्मतुः सहितौ राजन् गोवर्धनमथो नृप १ अथ प्रभाते विमले सूर्ये चाभ्युदिते सति । गोवर्धनं जगामाशु केशवः केशिसूदनः २ शैनेयो बलभद्रश्च यादवाः सारणादयः । गंधर्वैरप्सरोभिश्च नादितं बहुधा गिरिम् ३ जग्मतुः सहितौ राजन् गोवर्धनमथो गिरिम् । गोधनैरथ सैन्यैश्च नादितं बहुधा गिरिम् ४ तस्योत्तरं नृपश्रेष्ठ पार्श्वं संप्राप्य यादवाः । निकषा यमुनां राजंस्ततो युद्धमवर्तत ५ विव्याध हंसडिंभकौ वसुदेवश्च सप्तभिः। सारणः पंचविंशत्या दशभिः कंक एव च ६

---

पडला ४०. पण त्या यादववीरानें त्याला तेथून उचलून व दोन्ही हातांनीं धरून बाहुवेगानें तेथल्या तेथेंच फार वेळ फिरवून, सर्व लोकांस आपलें बल दाखवीत खालीं हापटिलें. सर्व लोक पहात असतांना त्यानें त्या राक्षसाला पुनः वर उडवून ४१,४२. तेथून दोन कोस दूर फेंकलें. तेव्हां बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन तो राक्षसश्रेष्ठ तेथून निघाला ४३. त्या महारणामध्यें जे कांहीं राक्षस मारून राहिले होते ते बलरामास भिऊन तेथून दशदिशांकडे पळून गेले ४४. इतक्यांत भगवान् सहस्रकिरण अंशुमाली दिनेश आपल्या तेजांचा उपसंहार करून अस्त पावला. तो प्रजांचा नेत्र डोळ्याआड जातांच थोडासा अंधकार पसरला ४५. हे उत्तम राजा, तो विश्वमुख, जगद्गुरु, प्रजापति समुद्रजलामध्यें प्रविष्ट झाला असतां नक्षत्रनाथ ( चंद्र ) उगवला व संध्यासंबंधीं अंधकारही नाहींसा झाला ४६. हे राजा, दुसऱ्या दिवशीं सकाळीं किन्नरांच्या गानानें नादित झालेल्या गोवर्धनावर संग्राम करणें चांगलें, असें ह्मणणारे उत्तम राजे तेथील रणोत्सव सोडून गोवर्धनाकडे वेगानें निघाले ४७. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० हंसडिं० हिडिंभपराभवनामक एकशें सव्विसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२६. ॥

वैशंपायनः— हे राजा जनमेजया, ते दोघे हंस–डिंभक, मिळून रातोरात गोवर्धन महापर्वतावर गेले १. नंतर दुसऱ्या दिवशीं सकाळीं चांगलें उजाडून सूर्य उदय झाला असतां केशिनाशक केशव सत्वर गोवर्धन पर्वतावर गेला २. शैनेय बलभद्र व सारणादि यादव, गंधर्व व अप्सरा यांनीं बहुत प्रकारें नादित केलेल्या पर्वतावर गेले ३. गोधन व सैन्य यांनीं नादित करून सोडलेल्या पर्वतावर ते सर्व मिळून गेले ४. हे राजा, त्या पर्वताच्या उत्तर बाजूस प्राप्त होऊन यादव तळ देऊन राहिले. नंतर हे राजन्, यमुनेच्या समीप युद्ध चाललें ५. हंस व डिंभक यांस वसुदेवानें सात बाणांनीं, सारणानें पंचवीस बाणांनीं, कंकानें दहा बाणांनीं वेध केले ६. उलट हंस व डिंभक यांनीं यादवांस समंततः

हंसेन डिंभकेनाथ यादवैश्च समंततः। उग्रसेनस्त्रिसप्तत्या शराणां नतपर्वणाम् ७
विराटस्त्रिंशता राजन्सात्यकिश्चापि सप्तभिः। अशीत्या विपृथू राजन्नुद्धवो दशभिः शरैः ८
प्रद्युम्नस्त्रिंशता राजन्सांबश्चापि च सप्तभिः। अनाधृष्टिस्त्वेकषष्ट्या शराणां नतपर्वणाम् ९
एवं ते सहिता राजंश्चक्रुर्युद्धमदीनवत्। अत्यद्भुतं महाघोरं यादवाः सर्व एव हि १० चक्रु-
स्ताभ्यां महायुद्धं वासुदेवस्य पश्यतः। सर्वानपि महाराज यादवान्बलदर्पितान् ११ तावुभौ
हंसडिंभकौ नृपांस्तान्प्रत्यविध्यताम्। प्रत्येकं दशभिर्विध्वा बाणैर्निशितकोमलैः १२ जघ्न-
तुश्च शरैस्तीक्ष्णैरत्यर्थं यादवेश्वरान्। व्यथिताः सर्व एवैते स्रवन्तः शोणितं बहु १३ माधवे
किंशुका राजन्पुष्पिता इव ते बभुः। भीताश्च यादवा राजन्पलायनपरायणाः १४ एतस्मि-
न्नन्तरे राजन्वसुदेवात्मजौ नृपैं। वासुदेवो हली युद्धे प्रमुखे धन्विनौ तयोः १५ चक्रतुर्यु-
द्धमतुलं स्कन्दशक्राविवांबरे। तयोरेव सगन्धर्वाः सिद्धा यक्षा महर्षयः १६ विमानस्थाश्च
ददृशुर्युद्धं देवासुरोपमम्। ततः प्रादुरभूतां तौ दूतौ भूतेश्वरौ नृप १७ शूलिना प्रेषितौ युद्धे
रक्षार्थं बलिनोस्तयोः। हंसोऽथ वासुदेवश्च युद्धं चक्रतुरीश्वरौ १८ रामश्च डिंभकश्चैव
संयुक्तौ युद्धकांक्षया। विक्रान्ताः सर्व एवैते ह्यस्त्रे शस्त्रे तथा बले १९ शंखान्दध्मुः पृथक्-
ह्रादं स्वे स्वे सर्वे रथे स्थिताः। अथ कृष्णो हृषीकेशः पांचजन्यं महारवम् २० दध्मौ
पद्मपलाशाक्षः सर्वान्विस्मापयन्निव। अथ भूतौ महाघोरौ लंबोदरशरीरिणौ २१ दुद्रुवतुर्म-

---

तसेच वेध केले. उग्रसेनानें ज्याचीं पर्वें नमविलीं आहेत अशा त्र्याहात्तर बाणांनीं त्यास वेध केला ७. राजन्, विराटानें तीस बाणांनीं, सात्यकीनें सात बाणांनीं, विपृथूनें ऐशीं बाणांनीं व उद्धवानें दहा शरांनीं वेध केले ८. राजन्, प्रद्युम्नानें तीस बाणांनीं, सांबानें सात बाणांनीं, व अनाधृष्टीनें ज्याचीं पेरें नमविलीं आहेत अशा एकसष्ट बाणांनीं शत्रूंस वेध केले ९. हे राजा, याप्रमाणें ते सर्व परस्परांशीं भिडून अदीनासारखे युद्ध करूं लागले. ते सर्व यादव अत्यद्भुत व महाघोर संग्राम करते झाले १०. वासुदेवासमक्ष ते त्या दोघांशीं झुंजत होते. हे महाराजा, त्या सर्वही बलदर्पित यादवांस हंसडिंभकांनीं प्रतिप्रहार केले. आपल्यावर बाण टाकणाऱ्या सर्वांस त्यांनीं दहा तीक्ष्ण बाणांनीं वेध केले ११,१२. तीक्ष्ण शरांनीं त्यांनीं यादवांस अत्यर्थ पीडलें. त्यामुळें ते सर्व अतिशय व्यथित झाले. पुष्कळ रक्त ओकूं लागले १३. हे राजन्, वसंत ऋतूंतील फुललेल्या किंशुकांप्रमाणें ते शोभले. हे पृथ्वीपते, भ्यालेले यादव पलायन करूं लागले १४. पण हे राजन्, इतक्यांत वसुदेवांचे बलाढ्य पुत्र वासुदेव व हली धनुष्यें घेऊन युद्धामध्यें त्या दोघांच्या सन्मुख झाले १५. स्वर्गांतील स्कंद व इंद्र यांप्रमाणें त्यांनीं अतुल युद्ध केलें. त्या दोघांचेंच युद्ध विमानामध्यें बसलेल्या-गंधर्वांसह देव, सिद्ध, यक्ष, महर्षि, इत्यादिकांनीं पाहिलें. कारण ते देवासुरांच्या युद्धासारखें होतें. हे राजा, त्यानंतर दोघे भूत महेश्वरदूत त्यांच्यापुढें प्रकट झाले १६,१७. शंकरानें युद्धामध्यें त्या दोघां बलाढ्यांच्या रक्षणाकरितां त्या दोघां गणांना पाठविलें होतें. हंस व वासुदेव हे दोघे ईश्वर युद्ध करूं लागले १८. राम व डिंभक हे दोघे युद्धाच्या आकांक्षेनें परस्पराशीं भिडले. ते सर्वही शस्त्र, अस्त्र तसेंच बल यांमध्यें विक्रान्त होते १९. आपापल्या रथावर स्थित असलेल्या त्या सर्वांनीं भिन्न भिन्न नादांनीं शंख वाजविले. हृषीकेश कृष्णानें ज्याचा रव फार मोठा आहे अशा पांचजन्य शंखास वाजविलें २०. त्या कमल-

हाराज शूलमादाय केशवम् । शूलेन पोथयांचक्रतू राजन् यादवेश्वरम् २२ ताभ्यां समाहतो विष्णुर्देवगन्धर्वसंनिधौ । ईषत्स्मिताधरो देवः किंचिदुत्प्लुत्य सत्वरम् २३ रथाद्रथिवरश्रेष्ठस्तौ प्रगृह्य जनार्दनः । भ्रामयित्वा शतगुणमलातमिव केशवः २४ कैलासं च समुद्दिश्य प्रचिक्षेप ततो हरिः । ता उपेत्य गिरेः शृंगं कैलासस्य महामते २५ दृष्ट्वा तत्कर्म देवस्य विस्मयं जग्मतुः परम् । हंसश्च दृष्ट्वा तत्कर्म रोषताम्रायतेक्षणः २६ उवाच वचनं हंसः शृण्वतां त्रिदिवौकसाम् । किमर्थं राजसूयस्य विघ्नं च रासि केशव २७ ब्रह्मदत्तो महीपालो यष्टा तस्य महाक्रतोः । कुरं दिश यथायोगं यदि प्राणान् हि रक्षसि २८ अथवा त्वं क्षणं तिष्ट ततो ज्ञात्वा परं बहु । ददासि त्वं नन्दपुत्र ततो यष्टा स मे गुरुः २९ ईश्वरोऽहं सदा राज्ञां देवानामिव शूलभृत् । एष ते वीर्यमतुलं नाशयिष्यामि संयुगे ३० इत्युक्त्वा सशरं चापं शालतालोपमं नृप । आकृष्य च यथाप्राणं नाराचेन च केशवम् ३१ ललाटे चिक्षिपे हंसो ललाम इव सोऽभवत् । उवाच सात्यकिं कृष्णो रथं वाहय मे प्रभो ३२ दारुकं पृष्ठवाहं तं कृत्वा केशवईश्वरः । अथ तेन समादिष्टः सात्यकिर्वाहयन्रथम् ३३ मंडलानि बहून्याजौ दर्शयामास सत्वरम् । अथ विद्धो दृढं तेन शरेण हरिरीश्वरः ३४ आग्नेयमस्त्रं संयोज्य शरे कस्मिंश्चिदव्ययः । उवाच हंसं राजेन्द्रसात्यकिं प्रेरयन्रणे ३५ अनेन त्वां दहे पाप यदि शक्तोऽसि वारय । अलं ते बह्ववद्धेन क्षत्रियोऽसि सदा शठ ३६

---

नयनानें सर्वांस जणुं काय विस्मित करीतच तो वाजविला. नंतर ज्यांचें उदर व शरीरही लांब आहे असे ते दोघे अतिघोर भूत, हे महाराज, शूल घेऊन केशवावर धांवले. हे राजन्, त्यांनीं शूलानें यादवेश्वरास प्रहार केले २१,२२. तेव्हां देव–गंधर्वांसमक्ष त्यांच्याकडून मारला गेलेला विष्णु थोडेसें स्मित करून व सत्वर किंचित् उडी मारून रथांतूनच त्या दोघांना धरता झाला. नंतर त्या रथिश्रेष्ठ जनार्दनानें त्यांना एकाद्या कोलिताप्रमाणें शंभरवेळां गरगर फिरवून कैलासाकडे फेकून दिलें. तेव्हां हे महामते, कैलासाच्या शिखरावर येऊन पोंचलेल्या त्या दोघां भूतांना त्या देवाचें हें अद्भुत कर्म पाहून अतिशय विस्मय वाटला; पण तें त्याचें कर्म पाहून हंसाला अतिशय रोष आला. त्याचे गरगरीत डोळे लाल झाले. तो देव ऐकत असतांना हरीला ह्मणाला, ' केशवा, राजसूयाला विघ्न कां करतोस ? २३-२७. ब्रह्मदत्त राजा त्या महाक्रतूचा यष्टा ( कर्ता ) आहे. यास्तव प्राण वांचावे अशी इच्छा असल्यास योग्य कर दे २८. अथवा युद्धामध्यें क्षणभर असाच स्थिर रहा. ह्मणजे बलाबल जाणून, हे नंदपुत्रा, तूं मग पुष्कळ धन देशील आणि त्यानंतर माझा तो पिता यज्ञ करील २९. देवांचा जसा शूलधारी ईश्वर तसा मी राजांचा ईश्वर आहें. हा मी तुझें संग्रामांतील अतुल वीर्य नाहींसें करतों ' ३०. असें बोलून हे राजा, ताल व सालवृक्षाप्रमाणें उंच धनुष्य सर्व शक्तीनें आकर्षण करून हंसानें केशवावर नाराच बाण सोडला. ललाटावर येऊन रुतलेला तो बाण त्या देवाच्या अलंकारासारखा झाला. तेव्हां कृष्ण सात्यकीस ह्मणाला, ' प्रभो, माझा रथ तूं हाक ' नंतर दारुकाला त्यानें रथाचा पृष्ठरक्षक केलें. केशवाची आज्ञा होतांच सात्यकि रथ चालवूं लागला ३१-३३. त्यानें संग्रामांत पुष्कळ मंडलें घेतलीं. इतक्यांत हंसाच्या शरानें ज्याला दृढ वेध केला आहे असा ईश्वर हरि अव्यय एका बाणावर आग्नेय अस्त्र योजून व सात्यकीस रणांत प्रेरणा करून हंसास ह्मणाला, ३४,३५, ' अरे पापा, यानें मी तुला जाळतों. जर समर्थ असलास तर याचें

मनश्चेत्करामिच्छेस्त्वं दर्शयाद्य पराक्रमम् । यतयो बाधिता हंस पुष्करे संस्थिता त्वया ३७
शास्ता त्वं खलु विप्राणां स्थिते मयि नराधम । स्थिते मयि जगन्नाथे हत्वा क्षत्रियकण्टकान् ३८
शास्तास्म्यथोऽसतां लोके दुष्टानां ब्रह्मविद्विषाम् । शापेन यतिमुख्यानां हत एव नृपाधम ३९
मृत्यवे त्वां निवेद्याद्य रक्षिता ब्राह्मणानहम् । इति ब्रुवंस्तदस्त्रं तु मुमोच युधि केशवः ४०
तदस्त्रं वारुणेनाथ हंसोऽपि प्रत्यषेधयत् । वायव्यमथ गोविंदो मुमोच युधि हंसके ४१ तदस्त्रं
वारयामास माहेंद्रेण नृपोत्तमः । अथ माहेश्वरं कृष्णो मुमोचात्युग्रमाहवे ४२ रौद्रेण तत्ततो
हंसो वारयामास तत्क्षणात् । गांधर्वं राक्षसं चैव पैशाचमथ केशवः ४३ ब्रह्मास्त्रमथ कौबे-
रमासुरं याम्यमेव च । चत्वार्येतानि हंसस्तु मुमोच युधि सत्वरम् ४४ वारणार्थं तदस्त्राणां
चतुर्णां माधवस्य ह । अस्त्रं ब्रह्मशिरो घोरमस्त्रं शत्रुविनाशकम् ४५ मुमोच हंसमुद्दिश्य
देवदेवो जनार्दनः । अस्त्रं वैष्णवमादाय शरे सन्निहिते हरिः ४६ योजयामास तद्धंसं महा-
घोरपराक्रमम् । अथ भीतो महारौद्रमस्त्रं दृष्ट्वा नृपोत्तमः ४७ हंसोऽपि तेन राजेन्द्र वार-
यामास तं शरम् । यमुनाप उपस्पृश्य देवदेवो जनार्दनः ४८ अस्त्रं वैष्णवमादाय शरे सन्नि-
हिते हरिः । योजयामास भूतात्मा भूतभावनभावनः ४९ येन देवा रणे हत्वा राज्यमापुः
पुरासुरान् । तदस्त्रं योजयामास वधार्थं तस्य भूपते ५० [ ५२१२ ] इति श्रीम० खि०
हरि० भवि० हंसडिंभ० हंसकेशवयुद्धे सप्तविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥ १२७ ॥

---

निवारण कर. तुझें पुष्कळ असंबद्ध भाषण पुरे झालें. अरे शठा, तूं सदां क्षत्रिय आहेस ३६. माझ्यापासून जर तुला कराची इच्छा करावयाची असेल तर आतां मला पराक्रम दाखीव. अरे हंसा, पुष्करावर राहणाऱ्या यतींना तूं पुष्कळ पीडलेंस ३७. पण अरे नराधमा, मी स्थित असतांना तूं ब्राह्मणांना असें शासन करणार काय ? मी सर्व क्षत्रिय-कंटकास मारून जगाचा नाथ होऊन राहिलों आहे ३८. या लोकांतील असाधूंचा मी शास्ता आहें. दुष्ट व ब्रह्मद्वेष्ट्या लोकांचा मी संहार करीत असतो. अरे नराधमा, तूं मुख्य यतींच्या शापानें अगोदरच मेला आहेस ३९. आज तुला मृत्यूच्या हवालीं करून मी ब्राह्मणांचें रक्षण करीन. असें बोलून केशवानें युद्धांत तें अस्त्र सोडलें ४०. पण हंसानें वारुणास्त्रानें त्या अस्त्राचा प्रतिषेध केला. तेव्हां गोविंदानें युद्धामध्यें हंसावर वायव्य अस्त्र सोडलें ४१. नृपोत्तमानें माहेंद्रास्त्रानें त्याचें निवारण केलें. नंतर कृष्णानें रणांगणांत अत्युग्र माहेश्वर अस्त्र सोडलें ४२. पण हंसानें तत्काल रौद्रास्त्रानें त्याचें निवारण केलें. केशव गांधर्व, राक्षस पैशाच व ब्राह्म अस्त्र सोडता झाला. हंसानेंही युद्धांत आसुर व याम्य अस्त्रांचा सत्वर उपयोग करून माधवाच्या चारी अस्त्रांचें निवारण केलें. नंतर देवाधिदेव जनार्दनानें हंसास उद्देशून शत्रुविनाशक ब्रह्मशिर नांवाचें घोर अस्त्र सोडलें. जवळ असलेल्या शरावर वैष्णव अस्त्राची योजना करून त्यानें तें महा घोर पराक्रमी अस्त्र हंसावर सोडलें. तें तेव्हां महा भयंकर अस्त्र पाहून नृपोत्तम भ्याला ४३-४७ हे राजेंद्रा, हंसानेंही त्याच अस्त्रानें त्याचें निवारण केलें. पण देवदेव जनार्दनानें यमुनेच्या जलानें आचमन करून व वैष्णव अस्त्र घेऊन त्या हरिसंज्ञक भूतात्म्या भूतकारणाच्या कारणानें जवळच्या एका शरावर योजलें. ४८, ४९ ज्या अस्त्राच्या योगानें देव पूर्वी असुरांस रणांत मारून राज्य मिळविते झाले, तेंच अस्त्र हे भूपते, हरीनें हंसाच्या वधाकरितां योजलें ५०. इति श्री० खि० हरि० भवि० हंसडिं० हंसकेशव युद्धाविषयीं एकशें सत्ताविसावा अध्याय समाप्त झाला. ॥१२७॥

वैशंपायन उवाच ॥ अथ भीतो महारौद्रमस्त्रं दृष्ट्वा नृपोत्तम । हंसो राजा महाराज निश्चेष्ट इव संभ्रमी १ उत्प्लुत्य स रथात्तस्माद्यमुनामभ्यधावत । यत्र कृष्णो हृषीकेशः कालियाहिं ममर्द ह २ महाह्रदं महारौद्रं यावत्पातालसंस्थितम् । तावद्दीर्घं महानीलं कालांजननिभं हि यत् ३ तस्मिन् ह्रदे महाघोरे पपाताथ स हंसकः । हंसे पतति तस्मिंस्तु महान् रावो बभूव ह ४ गिरीणां पात्यमानानां समुद्र इव वज्रिणा । रथादुत्प्लुत्य कृष्णोऽपि तस्योपरि पपात ह ५ देवदेवो जगन्नाथो जगद्विस्मापयन्निव । प्राहरत्तं महाबाहुः पादाभ्यामथ केशवः ६ पादक्षेपं नृपस्तस्माल्लब्ध्वा हंसो नृपोत्तम । ममार च नृपश्रेष्ठ केचिदेवं वदन्ति हि ७ अन्ये पातालमायातो भक्षितः पन्नगैरिति । अद्यापि नैव राजेंद्र दृष्ट इत्यनुशुश्रुम ८ यथापूर्वं जगन्नाथो रथं समुपजग्मिवान् । हते तस्मिन्महाराज धर्मपुत्रो युधिष्ठिरः ९ अकरोद्राजसूयं च तव पूर्वपितामहः । यदि जीवेदसौ हंसः को नमस्यति तं क्रतुम् १० स च सर्वास्त्रवित्रित्यं रुद्राल्लब्धवरः प्रभो । क्षणादेव महाराज वार्तेयं गामगाहत ११ हतो हंसो हतो हंसः कृष्णेन रिपुमर्दिना । जगुर्गन्धर्वपतयो देवलोके दिवानिशम् १२ कृष्णेन लोकनाथेन विष्णुना प्रभविष्णुना । यमुनाया ह्रदे घोरे हंसो निहत इत्यपि १३ [५२२५] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभ० हंसवधो नामाष्टाविंशत्यधिकशततमोऽध्यायः ॥१२८॥

वैशंपायन उवाच ॥ श्रुत्वा निहतमत्युग्रं भ्रातरं वीर्यशालिनम् । बलदेवं परित्यज्य युध्यमानं महारणे १ डिंभको वीर्यसंपन्नो यमुनामनुजग्मिवान् । तमन्वधावद्वेगेन बलभद्रो-

---

वैशंपायनः—हे नृपोत्तमा, हे महाराजा, हंस राजा ते महा घोर अस्त्र पाहून भ्याला व निश्चेष्टसा झाला १. तो आपल्या रथांतून उडी टाकून जिच्यामध्यें हृषीकेश कृष्णानें कालीय सर्पाचें मर्दन केलें होतें त्या यमुनेकडे धांवला २. तो महा भयंकर महा डोह पाताळापर्यंत खोल, तितकाच दीर्घ, व कालांजनासारखा अति नीलवर्ण होता ३. त्या महा घोर ह्रदामध्यें हंसक जाऊन पडला. इंद्र वज्रानें पर्वतांना समुद्रांत पाडवूं लागला असतां त्यांचा जसा ध्वनि होतो तसा हंस त्यांत पडतांच फार मोठा आवाज झाला. त्याबरोबर कृष्णही रथांतून उडी टाकून जगास जणुं काय विस्मय उत्पन्न करीतच त्याच्या अंगावर जाऊन पडला. नंतर त्या महाबाहु देवदेव जगन्नाथ केशवानें दोन्ही पायांनीं त्याला प्रहार केला ४–६. हे उत्तमराजा, केशवाची लाथ लागली असतां तो राजा हंस मेला असें कित्येक ह्मणतात ७. दुसरे लोक तो पाताळांत गेला व त्याला नागांनीं खाल्लें असें सांगतात. पण राजा, तो पुनः कोणाच्या दृष्टीं पडला नाहीं, असें आह्मी ऐकलें आहे ८. नंतर पूर्वीप्रमाणेंच जगन्नाथ रथावर येऊन बसला. हे महाराज, याप्रमाणें तो दुष्ट मेला असतां तुझा पूर्वपितामह जो धर्मपुत्र युधिष्ठिर त्यानें राजसूय यज्ञ केला. हंस जर जिवंत असतां तर त्या क्रतूचा आदर कोणी केला असता ? ( कोणीही नाहीं. ) ९,१०.कारण हे प्रभो, तो नित्य सर्वास्त्रवेत्ता व रुद्रापासून वर मिळविलेला होता. हे महाराज, ती वार्ता एका क्षणांत सर्व पृथ्वीभर पसरली ११. रिपूंचें मर्दन करणाऱ्या कृष्णानें हंसाला मारलें, हंसाला मारलें, असें ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें. स्वर्गलोकांत गंधर्वपति अहोरात्र—लोकनाथ, प्रभविष्णु, विष्णु कृष्णानें यमुनेच्या घोर डोहामध्यें हंसाला मारलें—असेंही गावूं लागले ११-१३. इति श्री० खि० हरि० भवि० हंस० हंसवधनामक एकशें अठ्ठाविसावा अध्याय समाप्त झाला ॥१२८॥

वैशंपायनः—आपला वीर्यशाली व अत्युग्रभ्राता मारला गेला आहे, असें ऐकून

हलायुधः २ हंसो हि यत्र पतितस्तत्रासौ निपपात ह । यमुनायां महाराज विलोड्य जलसंचयम् ३ अथ क्रुद्धः सडिंभको भ्रामयित्वा जलं बहु । उन्मज्ज्योन्मज्ज्य सहसा निमज्ज्य च पुनः पुनः ४ न ददर्श तदा राजन् भ्रातरं वीर्यशालिनम् । उन्मज्ज्याथ महाबाहुर्वासुदेवं विलोक्य च ५ उवाच वचनं राजन् डिंभको वीर्यवत्तमः । अरे गोपकदायाद क्वाऽसौ हंस इति स्थितः ६ वासुदेवोऽपि धर्मात्मा यमुनां पृच्छ राजक । इत्यब्रवीत्प्रसन्नात्मा वासुदेवः प्रतापवान् ७ तच्छ्रुत्वा यमुनां भूयः प्रविश्य डिंभकः किल । बहुप्रकारमुद्वीक्ष्य भ्रातरं भ्रातृवत्सलः ८ विललाप ततो राजा डिंभको भ्रान्तमानसः । क्व नु गच्छसि राजेन्द्र विहायैनमबान्धवम् ९ कुतो भ्रातरितो गच्छेः परित्यज्यैव मामिह । विलप्यैवं नृपश्रेष्ठ डिंभको भ्रातृवत्सलः १० आत्मत्यागे मनः कुर्वन्यमुनाया महाह्रदे । निमज्ज्योन्मज्ज्य सहसा मरणे कृतनिश्चयः ११ हस्तेन जिह्वामाकृष्य भूयो भूयो विलप्य च । ततः समूलामाकृष्य जिह्वां साहसकृत्स्वयम् १२ ममारान्तर्जले राजन् डिंभको नरकाय वै । एवं तु निहते हंसे डिंभके वीर्यशालिनि १३ आगमत्पुण्डरीकाक्षो भूतान्विस्मापयन्निव । ततः प्रीतः प्रसन्नात्मा वासुदेवः प्रतापवान् १४ गोवर्धनेऽथ विश्रम्य बलभद्रसहायवान् । कंचित्कालं महाराज पूर्वभुक्तमुवास ह १५ [ ५१४० ] इति श्रीम० खि० हरि० भवि० हंसडिंभकवधो नामैकोनत्रिंशदधिकशततमोऽध्यायः ॥ १२९ ॥

---

वीर्यसंपन्न डिंभक महारणांत युद्ध करणाऱ्या बलरामास सोडून यमुनेकडे गेला. हलायुध बलभद्रही वेगानें त्याच्या मागून धावला १,२. हंस जलांत जेथें पडला होता तेथेंच त्यानेंही उडी घेतली. हे महाराज, त्यानें यमुनेच्या जलाचें विलोडन केलें ३. पण त्याला हंस दिसला नाहीं. ह्मणून तो अतिशय रागावला. त्यानें नदीचें जल हालवून व खळबळून सोडलें. तो पुनः पुनः पाण्यांत बुडून पुनः पुनः वर येऊं लागला ४. पण राजा, त्याला वीर्यशाली भ्राता आढळला नाहीं. पाण्यांत तळापर्यंत शोधून तो पुनः वर निघाला. तों त्याला वासुदेव दिसला ५. तेव्हां हे राजन्, तो अतिवीर्यवान् डिंभक त्यास ह्मणतो, हे गवळ्याच्या मुला, माझा हंस कोठें आहे ? तेव्हां धर्मात्मा वासुदेवही त्यास ह्मणाला, " अरे नीच क्षत्रिया, यमुनेला विचार " प्रतापवान् प्रसन्नचित्त वासुदेवाचें हें भाषण ऐकून भ्रातृवत्सल डिंभक पुनः यमुनेंत शिरून व पुष्कळ प्रकारें भ्रात्याला शोधून नंतर ज्याचें चित्त भ्रांत झालें आहे असा तो डिंभक भावाकरितां फार शोक करूं लागला. हे राजेंद्रा, मज बंधुहीनाला सोडून तूं कोठें जातोस. हे बंधो, मला येथेंच सोडून तूं एकटाच कोठें गेलास ? हे राजा जनमेजया, असा विलाप करून भ्रातृवत्सल डिंभक यमुनेच्या त्याच डोहांत देहत्याग करण्याचें मनांत आणून एकाएकीं आंत बुडून व वर निघून मरणाविषयीं निश्चय करता झाला ६-११. आपल्या हातानें आपलीच जिह्वा वारंवार ओढून व पुष्कळ विलाप करून शेवटीं स्वतःच साहस करणाऱ्या त्यानें तिला मुळापासून ओढून काढलें १२. व हे राजा, डिंभक जलामध्येंच नरकास जाण्यासाठीं, याप्रमाणें आत्महत्या करून मेला. अशा रीतीनें वीर्यशाली हंस व डिंभक मेले असतां जणुं काय सर्व भूतांस विस्मयच उत्पन्न करीत कृष्ण आपल्या रथापाशीं परत आला. त्यानंतर प्रतापवान् वासुदेव प्रसन्नचित्त झाला. बलरामाचें ज्याला साहाय्य आहे असा तो संतुष्ट झालेला देव गोवर्धनावर विश्रांति घेऊन हे महाराज, पूर्वी ज्याचा उपभोग घेतला होता

वैशंपायन उवाच ॥ यशोदा नन्दगोपश्च कृष्णदर्शनलालसौ । गोवर्धनगतं श्रुत्वा वासुदेवं सहाग्रजम् १ नवनीतं च दधि च पायसं कृसरं तथा । वन्यं पुष्पं महाराज मयूरांगदमेव च २ बल्लवैरपरैः सार्धं गोपीभिश्च समंततः । जग्मतुः सहसा प्रीतौ गोवर्धनमथो नृप ३ क्वचिद्वृक्षेसमासक्तंकृष्णंकृष्णमृगेक्षणम् । ददर्शतुर्महाबाहुंवासुदेवंसहाग्रजम् ४ प्रणेमतुःसुसंहृष्टौतत्रदृष्ट्वामहा बलौ । दर्शयामासतुर्देवौ पायसानि महान्ति च ५ तातमातर्व्रजे गोष्ठे कुशलं वा स्वगोधनम् । अपि गावः क्षीरवत्यो वत्सा वत्सतराः पितः ६ अपिवासुशुभंक्षीरमापिगावःसुशोभनाः । अपि वा दारकामातर्वत्सपालाः पिबंति च ७ बहूनि चापि दामानि कीलका अपि वा बहु । तृणानि बहुरूपाणि किं वा संन्ति पितः सदा ८ शकटानि सुगंधीनि किं वा सन्ति पितर्ध्रुवम् । अपि गोप्यः पुत्रवत्यो दारकान्किमजीजनन् ९ घटाः किं बहवो मातराभिन्नाः सर्वतो व्रजे । किं गावः क्षीरमतुलं स्रवन्त्यहरहः पितः १० हय्यंगवीनं क्षीराणि दधि वा किमजीजनन् । गोधनं सर्वमेवेदं नीरोगं प्रतिपद्यते ११ नंद उवाच ॥ सर्वमेतद्यदुश्रेष्ठ नीरोगं बहुशः प्रभो । कुशलं गोधनस्यैव सर्वकालेषु केशव १२ रक्षणात्तव देवेश सदा कुशलिनो वयम् । सगोधनाः सवत्साश्च निरोगा इव केशव १३ एकमेव सदा दुःखं न त्वां द्रक्ष्यामि केशव । यदेतत्केवलं दुःखमिति धीःशीर्यते सदा १४ वैशंपायन उवाच ॥ एवमादि विलप्यन्तं गच्छेत्याह स केशवः । यशोदां पुनराहेदं मातर्गच्छ गृहं

---

अशा त्या पर्वतावर कांहींकाळ सुखानें राहिला १३—१५. इति श्रीमहा० खि० हरि० भावि० हंसडिंभकवधनामक एकशें एकूणतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १२९ ॥

वैशंपायनः— कृष्णाच्या दर्शनाची लालसा करणारी यशोदा व नंदगोप वासुदेव आपल्या अग्रजासह गोवर्धनावर आला आहे असें ऐकून १, लोणी, दहीं, क्षीर, खिचडी, वन्य पुष्पें, मोरांच्या पिसांचीं बाहुभूषणें, इत्यादि घेऊन गोपी व दुसरे गवळी यांसह अकस्मात् संतुष्ट होऊन गोवर्धनावर आले २,३. तेथें कोठें एकावृक्षाखालीं अग्रजासह आनंदानें बसलेल्या महाबाहु, कृष्णवर्ण वासुदेवास त्यांनीं पाहिलें. त्याचे नेत्र काळविटाच्या नेत्राप्रमाणें होते ४. त्यांना पाहतांच त्या दोघांही महाबलवानांनीं मोठ्या हर्षानें प्रणाम केले. त्यांनींही गोपालाला पुष्कळप्रकारचीं पायसें दाखविलीं ५ “ बाबा, आई, गोकुळांत सर्व कुशल आहेतना ? आपलें गोधन स्वस्थ आहे कीं नाहीं ? बाबा, गायी पुष्कळ दूध देतात ना ? त्यांचीं वत्सें सुखानें नांदतात कीं नाहीं ? दूध चांगलें असतें ? गायी देखण्या आहेत कीं नाहींत ? आई, वत्सांना राखणारीं पोरें दूध पितात कीं नाहीं ? ६,७ बाबा, पुष्कळ दावीं, पुष्कळ खिळे, व नानाप्रकारचीं गवतें तुमच्यापाशीं आहेत कीं नाहींत ? ८. बाबा सुगंधि शकट आहेत ना ? गोपी पुत्रवती आहेत ना ? त्यांना संतति होतेना ? आई, गोकुळांत सर्वत्र अनेक धड घट आहेत कीं नाहींत ? बाबा, गायीं रोज रोज पुष्कळ दूध देतात ना ? ताजें तूप, दूध व दहीं पुष्कळ होते कीं नाहीं ? सर्व गोधन नीरोग आहे ना ? ” ९-११. असें कृष्णानें विचारलें असतां, नंदः— हे प्रभो महाबाहो, तें सर्व रोगरहित आहे. हे केशवा, सर्व कालीं गोधनाचें कुशल आहे. हे देवेशा, तुझ्या संरक्षणामुळें आह्मी सदा कुशलसंपन्न आहों. हे केशवा, आह्मी गोधन व वत्सें यांसह कोणत्याही प्रकारच्या उपद्रवावांचून आहों १२,१३. पण केशवा, तुला पहात नाहीं, एवढें एकच दुःख आह्मांला येथें आहे. याच एका दुःखानें माझें मन सदा कष्टी होत

प्रति १५ ये च त्वां कीर्तयिष्यन्ति ते च स्वर्गमवाप्नुयुः । ये केचित्त्वां नमस्यन्ति ते मे प्रियतराः सदा १६ मद्भक्ताः सर्वदा सन्तु गच्छेत्याह च तां हरिः । इत्युक्त्वा पितरौ देवो वासुदेवः सनातनः १७ गाढमालिंग्य तौ प्रीतौ प्रेषयामास केशवः । यशोदा नन्दगोपश्च जग्मतुः स्वगृहं प्रति १८ ततः कृष्णो हृषीकेशो यादवैः सह वृष्णिभिः । गंतुमैच्छत्तदा विष्णुः पुरीं द्वारवतीं किल १९ य एतच्छृणुयान्नित्यं पठेद्वापि समाहितः । पुत्रवान्धनवांश्चैव अन्ते मोक्षं च गच्छति २० [ ५२६० ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि यशोदानन्दगोपबलभद्रकृष्णसमागमो नामत्रिंशदधिकशततमोऽध्यायः ।। १३० ।।

वैशंपायन उवाच ॥ गच्छन्नथ महाविष्णुः पुष्करं प्राप्य यादवैः । अपश्यन्मुनिमुख्यांस्तु पुष्करस्थान्नृपोत्तम १ ते समेत्य महादेवमृषयो वीतमत्सराः । अर्घादिसमुदाचारं कृत्वैनं यादवोत्तमम् २ प्रोचुर्विश्वेश्वरं विष्णु भूतभव्यभवत्प्रभुम् । अत्यद्भुतमिदं विष्णो तव वीर्यं जनार्दन ३ येन तौ निहतौ युद्धे हंसो डिंभक एव च । यो विचक्रो दुराधर्षो देवैरपि सुदुःसहः ४ संगरे निहतो देव दुःसाध्य इति नो मतिः । क्षेमो नः सर्वकार्येषु चरतां तप उत्तमम् ५ निष्कल्मषा भविष्यामस्तव संस्मरणाद्धरे । त्वं हि सर्वस्य दुःखस्य हर्ता त्वां ध्यायतां सदा ६ त्वदनुस्मरणं जंतोः सदा पुण्यप्रदं प्रभो । त्वं हि नः सततं धाता विधाता तपसो हरे ७ त्वमोंकारो वषट्कारस्त्वं यज्ञस्त्वं पितामहः । त्वं ज्योतिर्ब्रह्मणोमूर्तिस्त्वं ब्रह्मा रुद्र एवच ८

---

असतें १४. वैशंपायनः--इत्यादि बोलून विलाप करणाऱ्या नंदाला केशव ' बरें आतां आपल्या घरीं जा. ' असें ह्मणाला. तो पुनः आपल्या यशोदा मातेला ह्मणाला " आई, तूं सुद्धां स्वगृहीं जा. जे कोणी नर तुझें नामसंकीर्तन करतील ते स्वर्गास जातील. जे तुला नमस्कार करतील ते नर मला सदां अतिशय प्रिय होतील. आतां तूं जा. " असें बोलून सनातन वासुदेवानें त्या दोघां पालक मातापितरांस दृढ आलिंगन दिलें. त्यामुळें त्या दोघांनाही मोठी धन्यता वाटली. नंतर केशवानें मोठ्या आदरानें निरोप दिला असतां, यशोदा व नंदगोप आपल्या घरास गेलीं १५-१८. त्यानंतर हृषीकेश कृष्ण यादव व वृष्णि यांसह लागलाच द्वारवतीपुरीस जाण्याची इच्छा करूं लागला १९. जो हें आख्यान नित्य शांत मनानें ऐकेल अथवा वाचील तो पुत्रवान् व धनवान् होईल आणि शेवटीं मुक्त होईल २०. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० यशोदा-नंद-गोपाल-कृष्ण-बलरामसमागम नामक एकशेंतिसावा अध्याय समाप्त झाला ।। १३० ।।

वैशंपायनः--हे उत्तम राजा यादवांसह जाणारा तो महा विष्णु पुष्करास येऊन पुष्करस्थ मुख्य मुनींचें दर्शन घेता झाला १. तेव्हां ते सर्व मत्सररहित ऋषि महादेवापाशीं येऊन त्या यदूत्तमास अर्घ्यादि समुदाचार देते झाले २. नंतर ते विश्वेश्वर भूत-भव्य-भवत्प्रभु विष्णूस ह्मणाले, " हे विष्णो, हे जनार्दना, तुझें हें वीर्य अति अद्भुत आहे ३. कारण, तूं त्या वीर्यानें युद्धांत हंस व डिंभक यांस मारलेंस. जो देवांनाही अति दुःसह वाटणारा दुराधर्ष विचक्र त्यालाही हे देवा, तूं मारलेंस. खरोखर तो दुःसाध्य होता अशी आमची मति आहे. उत्तम तपश्चरण करणाऱ्या आमचें सर्व कार्यांमध्यें क्षेम आहे ४,५. हे हरे, तुझ्या उत्तम स्मरणानेंच आह्मी निष्पाप होऊं. तुझें सदां ध्यान करणाऱ्या लोकांच्या सर्व दुःखांचा हर्ता तूं आहेस ६. हे प्रभो, तुझें अनुस्मरण प्राण्याला सदा पुण्यप्रद आहे. हे हरे, तूंच आमच्या तपांचा सदां प्रेरक व फलदाता आहेस ७. तूं ओंकार, वषट्कार, यज्ञ व

प्राणस्त्वं सर्वभूतानामन्तरात्मेति कथ्यते । उपास्यः सर्वभूतानां यज्ञैर्दानैर्जगत्पते ९ नमो विश्वसृजे देव नमस्ते विश्वमूर्तये । पाहि लोकमिमं देव हत्वा ब्रह्मद्विषः सदा १० स तथेति हरिर्विष्णुर्ययौ द्वारवतीं पुरीम् । अवसद्वृष्णिभिः सार्धं स्तूयमानः स मागधैः ११ इयं च देवदेवस्य चेष्टा हि जनमेजय । प्रोक्ता ते पृच्छते राजन् किमन्यच्छ्रोतुमिच्छसि १२ [ ५२७२ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० द्वारकायां कृष्णप्रत्यागमनं नामैकत्रिंशद० तमोऽध्यायः ॥ १३१ ॥

जनमेजय उवाच ॥ भगवन्केन विधिना श्रोतव्यं भारतं बुधैः । फलं किं के च देवाश्च पूज्या वै पारणेष्विह १ देयं समाप्ते भगवन् किं च पर्वणि पर्वणि । वाचकः कीदृशश्चात्र एष्टव्यस्तद्ब्रवीहि मे २ वैशंपायन उवाच ॥ शृणु राजन्विधिमिमं फलं यच्चापि भारतात् । श्रुताद्भवति राजेन्द्र यत्त्वं मामनुपृच्छसि ३ दिवि देवा महीपाल क्रीडार्थमवनिं गताः । कृत्वा कार्यमिदं चैव ततश्च दिवमागताः ४ हंत यत्ते प्रवक्ष्यामि तच्छृणुष्व समाहितः । ऋषीणां देवतानां च संभवं वसुधातले ५ अत्र रुद्रास्तथा साध्या विश्वेदेवाश्च शाश्वताः । आदित्याश्चाश्विनौ देवौ लोकपाला महर्षयः ६ गुह्यकाश्च सगन्धर्वा नागा विद्याधरास्तथा । सिद्धा धर्मः स्वयंभूश्च मुनिःकात्यायनो वरः ७ गिरयः सागरा नद्यस्तथैवाप्सरसां गणाः । ग्रहाः संवत्सराश्चैव अयनान्यृतवस्तथा ८ स्थावरं जंगमं चैव जगत्सर्वं सुरासुरम् । भारते भरतश्रेष्ठ एकस्थमिह दृश्यते ९ तेषां श्रुत्वाप्रतिष्ठानं नामकर्मानुकीर्तनात् । कृत्वापि पातकं घोरं

---

पितामह आहेस. तूं ज्योति, ब्रह्माची मूर्ति, ब्रह्मा व रुद्र आहेस ८. तूं सर्व भूतांचा प्राण आहेस. तुलाच अंतरात्मा असें ह्मणतात. हे जगत्पते, यज्ञ व दान यांच्या योगानें सर्व भूतांचा तूंच उपास्य आहेस ९. हे देवा, तुज विश्वोत्पादकाला नमस्कार असो. तुज विश्वमूर्तीला नमस्कार असो. हे देवा, ब्रह्मद्वेष्ट्यांस सदा मारून या लोकाचें पालन कर १०. त्यावर "बरें आहे" असें ह्मणून विष्णु द्वारवतीपुरीस गेला. मागधांकडून स्तुति केला जाणारा तो वृष्णींसह तेथें सुखानें राहिला ११. हे जनमेजया, ही देवाधिदेवाची चेष्टा प्रश्न करणाऱ्या तुला मी सांगितली आहे. आतां आणखी काय ऐकण्याची तुझी इच्छा आहे ? १२. इति श्रीमहा० खि० हरि० भविष्य० कृष्णाच्या द्वारकाप्रत्यागमनाविषयीं एकशेंएकतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १३१ ॥

जनमेजयः—भगवन्, सुज्ञांनीं कोणत्या विधीनें भारत ऐकावें ? त्याचें फल काय ? पारण्यामध्यें ( समाप्तीचेवेळीं ) कोणत्या देवांचें पूजन करावें १. भगवन्, प्रत्येक पर्व समाप्त झालें असतां काय द्यावें ? याप्रसंगीं वाचक कशाप्रकारचा असावा ? तें मला सांग २. वैशंपायनः—राजा, हा विधि ऐक. भारत श्रवण केल्यानें फल काय मिळतें तेंही ऐक. राजा, तूं जें विचारीत आहेस तेंच मी सांगतों ३. हे राजन्, स्वर्गांतील देव क्रीडा करण्याकरितां पृथ्वीवर आले व हें इष्ट कार्य केल्यावर पुनः स्वर्गास गेले ४. बा भूपाला ऋषि व देवता यांचा संभव भूलोकीं कसा झाला तें मीं तुला सांगतों. शांत मनानें ऐक ५. यालोकीं रुद्र, साध्य, शाश्वत विश्वेदेव, आदित्य, अश्विनीकुमार, लोकपाल, महर्षि ६, गंधर्वांसह गुह्यक, गंधर्व, नाग, विद्याधर, सिद्ध, स्वयंभू, धर्म, श्रेष्ठ मुनि कात्यायन ७, पर्वत, सागर, नद्या, तसेच अप्सरांचे गण, ग्रह, संवत्सर, अयन, ऋतु, स्थावर, जंगम व सुरासुरयुक्त सर्व जगत् या भारतामध्यें एकत्र स्थित असल्यासारखें दिसतें ८,९. त्या देवादिकांचें येथील प्रतिष्ठान ऐकून नाम व कर्म यांचें अनुकीर्तन केलें असतां घोर पातक करूनही मानव त्या–

सद्यो मुच्येत मानवः १० इतिहासमिमं श्रुत्वा यथावदनुपूर्वशः। संयतात्मा शुचिर्भूत्वा पारं गत्वा च भारते ११ तेषां शृणुत्व श्राद्धानि श्रुत्वा भारत भारतम्। ब्राह्मणेभ्यो यथाशक्त्या भक्त्या च भरतर्षभ १२ महादानानि देयानि रत्नानि विविधानि च। गावः कांस्योपदोहाश्च कन्याश्चैव स्वलंकृताः १३ सर्वकामगुणोपेता यानानि विविधानि च। भाजनानि विचित्राणि भूमिर्वासांसि काञ्चनम् १४ वाहनानि च देयानि हया मत्ताश्च वारणाः। शयनं शिबिकाश्चैव स्यन्दनाश्च स्वलंकृताः १५ यद्यद्गृहे वरं किंचिद्यद्यदस्ति महद्वसु। तत्तद्देयं द्विजातिभ्य आत्मा दाराश्च सूनवः १६ श्रद्धया परया दत्तं क्रमशस्तस्य पारगः। शक्तितः सुमना हृष्टः शुश्रूषुरविकंपनः १७ सत्यार्जवरतो यत्तः शुचिः शौचपरायणः। श्रद्दधानो जितक्रोधो यथा सिद्ध्यति तच्छृणु १८ शुचिः शीलान्विताचारः शुक्लवासा जितेन्द्रियः। संस्कृतः सर्वशास्त्रज्ञः श्रद्दधानोऽनसूयकः १९ रूपवाक्सुभगो दान्तः सत्यवादी जितेन्द्रियः। दानमानगृहीता च कार्यो भवति वाचकः २० अविलंबमनायस्तमद्रुतं धीरमूर्जितम्। असंसक्ताक्षरपदं नवभावसमन्वितम् २१ त्रिषष्टिवर्णसंयुक्तमष्टस्थानसमीरितम्। वाचयेद्वाचकः स्वस्थः स्वाधीनः सुसमाहितः २२ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम्। देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् २३ ईदृशाद्वाचकाद्राजञ्छ्रुत्वा भारत भारतम्। नियमस्थः शुचिः

---

पासून तत्काल मुक्त होतो १०. हा इतिहास अगदीं क्रमानें पूर्वीपासून शुचि व संयतचित्त होऊन ऐकावा. नंतर या भारताच्या पार जाऊन त्यांत मेलेल्या भीष्मादिकांचीं श्राद्धें करावीं. हे भारता, भारत ऐकून तीं कशीं करावीं तें मी सांगतों; ऐक. हे भरतश्रेष्ठा, ब्राह्मणांना यथाशक्ति भक्तीनें महादानें व विविध रत्नें द्यावीं. चरवीभर—भरून दूध देणाऱ्या गाथी द्याव्या. उत्तमप्रकारें भूषित केलेल्या व सर्व कामगुणांनीं युक्त असलेल्या कन्या द्याव्या. विविध यानें ( वाहनें ) द्यावीं. विचित्र पात्रें, भूमि, वस्त्रें, सोनें व वाहनें अर्पण करावीं. मत्त हत्ती, घोडे, शय्या, शिबिका, उत्तमप्रकारें अलंकृत केलेले रथ ११-१५, सारांश आपल्या घरांत जें जें कांहीं उत्तम असेल व जें जें मोठें धन असेल तें तें सर्व ब्राह्मणांस द्यावें. फार काय पण आपला देह, भार्या व पुत्र यांचाही परार्थ विनियोग करावा. सारांश परमश्रद्धेनें दिलेलें सर्व कांहीं परमफल देतें. क्रमानें त्या महाभारताच्या पार गेलेल्या पुरुषानें संतुष्ट चित्तानें यथाशक्ति व यथासंभव दान द्यावें. श्रवण करण्याची इच्छा करणारा, मनांत निश्चल १६,१७, सत्य व आर्जव यांमध्यें रत, नियत, शुचि, शौचपरायण, श्रद्धाळु व जितक्रोध पुरुष कसा सिद्धिमान् होतो तें ऐक १८. शुचि, शीलयुक्त, आचारवान्, शुक्लवस्त्रें नेसणारा, जितेंद्रिय, संस्कारसंपन्न, सर्व शास्त्रज्ञ, श्रद्धाळु, असूयाशून्य १९, ज्याची वाणी व रूपही सुंदर आहे, बाह्य इंद्रियांचा निग्रह करणारा, सत्यवचनी, शांत, आणि दान व मान यांचें ग्रहण करणारा असा वाचक योजावा २०. जो वाचतांना अक्षरोच्चारास विलंब लावीत नाहीं, कर्कश उच्चार करीत नाहीं, गडबडीनें वाचीत नाहीं, धीर व उत्कृष्ट स्वरानेंच पाठ करितो, जो वाचतांना अक्षरें व पदें खात नाहीं ( गाळीत नाहीं. ) व ज्याचें वाचन रसादि नूतन भावानें युक्त आहे, चकार, वकार, श, ष, स इत्यादि त्रेसष्ट वर्णांनीं युक्त, कंठ, तालु इत्यादि आठ स्थानांतून उच्चारलेलें अशा रीतीनें स्वाधीन व सुशांत वाचकानें भारत वाचावें २१,२२. नारायणास, नरोत्तम नरास, व देवी सरस्व-

श्रोता शृण्वन्फलमश्नुते २४ पारणं प्रथमं प्राप्य द्विजानन्नैश्च तर्पयेत् । अग्निष्टोमस्य यागस्य फलं वै लभते नरः २५ अप्सरोगणसंकीर्णं विमानं लभते महत् । प्रहृष्टः स तु देवैश्च दिवं याति समाहितः २६ द्वितीयं पारणं प्राप्य अतिरात्रफलं लभेत् । सर्वरत्नमयं दिव्यं विमानमधिरोहति २७ दिव्यमाल्यांबरधरो दिव्यगन्धविभूषितः । दिव्यांगदधरो नित्यं देवलोके महीयते २८ तृतीयं पारणं प्राप्य द्वादशाहफलं लभेत् । वसत्यमरसंकाशो वर्षाण्ययुतशो दिवि २९ चतुर्थे वाजपेयस्य पंचमे द्विगुणं फलम् । उदितादित्यसंकाशं ज्वलन्तमनलोपमम् ३० विमानं विबुधैः सार्धमारुह्य दिवि गच्छति । वर्षायुतानि भवने शक्रस्य दिवि मोदते ३१ षष्ठे द्विगुणमस्तीति सप्तमे त्रिगुणं फलम् । कैलासशिखराकारं वैडूर्यमणिवेदिकम् ३२ परिक्षिप्तं च बहुधा मणिविद्रुमभूषितम् । विमानं समधिष्ठाय कामगं साप्सरोगणम् ३३ सर्वाँल्लोकान्विचरते द्वितीय इव भास्करः । अष्टमे राजसूयस्य पारणे लभते फलम् ३४ चंद्रोदयनिभंरम्यंविमानमधिरोहति । चंद्ररश्मिप्रतीकाशैर्हयैर्युक्तं मनोजवैः ३५ सेव्यमानो वरस्त्रीणां चन्द्रकान्ततरैर्मुखैः । मेखलानां निनादेन नूपुराणां च निःस्वनैः ३६ अंके परमनारीणां सुखं सुप्तो विबुध्यते । नवमे क्रतुराजस्य वाजिमेधस्य भारत ३७

---

तीस नमस्कार करून त्यानंतर महाभारताचा उच्चार करावा २३. हे भारत राजा, असल्या वाचकापासून भारत ऐकून नियमस्थ शुचि श्रोता फलभाग् होतो २४. प्रथम पारण झालें असतां ब्राह्मणास अन्नांनीं तृप्त करावें. ह्मणजे त्या पुरुषाला अग्निष्टोम यज्ञाचें फल मिळतें २५. त्याला अप्सरागणांनीं व्याप्त असलेलें मोठें विमान् मिळतें. अतिशय हृष्ट झालेला तो समाहित पुरुष देवांसह स्वर्गास जातो २६. दुसऱ्या पारणास प्राप्त होऊन त्याला अतिरात्राचें फल मिळतें. तो सर्व रत्नमय दिव्य विमानावर आरूढ होतो २७. दिव्य पुष्पमाळा धारण करणारा, दिव्य गंधानें भूषित झालेला व दिव्य बाहु भूषणें घातलेला तो देवलोकीं नित्य पूजला जातो २८. तिसरें पारण झालें असतां द्वादशाह क्रतूचें फल श्रोत्याला मिळतें. तो अनेक सहस्र वर्षें देवलोकीं देवाप्रमाणें रहातो २९. चवथ्या पारण्यानें वाजपेयाचें व पांचव्या पारण्यानें त्याच्याही दुप्पट फल त्याला प्राप्त होतें. उगवलेल्या सूर्याप्रमाणें चमकणाऱ्या व अग्नीप्रमाणें दीप्त विमानांत देवांसहवर्तमान बसून तो स्वर्गास जातो. तो श्रोता दशसहस्र वर्षें स्वर्गांत इंद्राच्या घरीं आनंद भोगतो ३०.३१. सहाव्या पारणाचे वेळीं त्याला चार वाजिमेधांचें फल मिळतें. सातव्याचे प्रसंगीं बारा अश्वमेधांचें फल प्राप्त होतें. कैलास शिखराप्रमाणें ज्याचा आकार आहे, ज्यामध्यें वैडूर्यरत्नांची वेदि आहे, ज्याला रत्नरसाचा गिलावा केला आहे, व जें रत्नें आणि पोवळीं यांनीं भूषित झालें आहे अशा इच्छेप्रमाणें गमन करणाऱ्या व अप्सरांच्या समूहानें युक्त असलेल्या विमानांत बसून ३२,३३, साक्षात् दुसऱ्या भास्कराप्रमाणेंच सर्व लोकांतून संचार करतो. आठव्या पारण्याचेवेळीं राजसूयाचें फळ मिळतें ३४. श्रोता चंद्रोदयतुल्य रम्य विमानांत बसतो. त्या विमानास वनाप्रमाणें वेगवान् व चंद्रकिरणांसारखे शुभ्र घोडे जोडलेले असतात ३४,३५. श्रेष्ठ स्त्रियांच्या चंद्राहून अधिक सुंदर मुखांकडून त्याची सेवा केली जाते. ( ह्म. सुंदर स्त्रिया त्याच्या परिचारिका होतात. ) मेखलांच्या नादानें व नूपुरांच्या मंजुळ ध्वनीनें त्याच्या मनाला आनंद होतो ३६. सर्वोत्तम स्त्रियांच्या मांडीवर सुखानें शयन करणारा तो झोंप पुरी झाल्यावर सुखानें जागा होतो. हे भारता,

कांचनस्तंभनिर्व्यूहं वैडूर्यकृतवेदिकम् । जांबूनदमयैर्दिव्यैर्गवाक्षैः सर्वतो वृतम् ३८ सेवितं चाप्सरःसंघैर्गंधर्वैर्दिवि चारिभिः । विमानं समधिष्ठाय श्रिया परमया ज्वलन् ३९ दिव्यमाल्यांबरधरो दिव्यचन्दनभूषितः । मोदते देवतैः सार्धं दिवि देव इवापरः ४० दशमे पारणं प्राप्य द्विजातीनभिवन्द्य च । किंकिणीजालनिर्घोषं पताकाध्वजशोभितम् ४१ रत्नवेदिकसंकाशं वैडूर्यमणितोरणम् । हेमजालपरिक्षिप्तं प्रवालवलभीमुखम् ४२ गन्धर्वैर्गीतकुशलैरप्सरोभिर्निषेवितम् । विमानं सुकृतावासं सुखेनैवोपपद्यते ४३ मुकुटेनार्कवर्णेन जांबूनदविभूषणः । दिव्यचन्दनदिग्धांगो दिव्यमाल्यविभूषितः ४४ दिव्याँल्लोकान्प्रचरति दिव्यैर्भोगैः समन्वितः । विबुधानां प्रसादेन श्रिया परमया युतः ४५ अथ वर्षगणानेवं स्वर्गलोके महीयते । ततो गन्धर्वसहितः सहस्राण्येकविंशतिः ४६ पुरंदरपुरे रम्ये शक्रेण सह मोदते । दिव्ययानविमानेषु लोकेषु विविधेषु च ४७ दिव्यनारीगणाकीर्णो निवसत्यमरो यथा । ततः सूर्यस्य भवने चन्द्रस्य भवने तथा ४८ शिवस्य भवने राजन्विष्णोर्याति सलोकताम् । एवमेतन्महाराज नात्र कार्या विचारणा ४९ श्रद्धधानेन वै भाव्यमेवमाह गुरुर्मम । वाचकस्य तु दातव्यं मनसा यदिच्छति ५० हस्त्यश्वरथयानानि वाहनं च विशेषतः । कटकं कुण्डले चैव ब्रह्मसूत्रं तथापरम् ५१ वस्त्रं चैव विचित्रं च गन्धं चैव विशेषतः । देववत्पूजयेत्तं तु विष्णुलोकमवाप्नुयात् ५२

---

नवव्या पारायणाच्यावेळीं अश्वमेध क्रतुराजाचें फळ मिळतें ३७. सोन्याच्या स्तंभाचे समूह ज्यामध्यें आहेत, वैडूर्यमण्याच्या वेदिका ज्यांत आहेत, जें सुवर्णमय दिव्य गवाक्षांनीं सर्वतः आवृत आहे, स्वर्गांत संचार करणारे गंधर्व व अप्सरांचे संघ यांच्याकडून जे सेवन केलें गेलें आहे व जें परम शोभेनें भूषित आहे अशा विमानांत बसून, दिव्यमाला धारण करणारा व दिव्य चंदनानें भूषित झालेला असा तो श्रोता दुसऱ्या देवाप्रमाणेंच देवांसह देवलोकीं आनंदित होतो ३८–४०. दहावें पारण प्राप्त झालें असतां द्विजांस अभिवंदन करून ज्याच्यावर क्षुद्र घंटांच्या समूहाचा नाद होत आहे, जें पताका व ध्वज यांनीं सुशोभित आहे ४१, रत्नांच्या वेदींनीं जें युक्त आहे, ज्याला वैडूर्यमणींचें तोरण आहे, ज्याला सभोंवार सोन्याच्या जाळ्या आहेत, ज्याला प्रवालाचें छत आहे ४२, गायनकुशल गंधर्व आणि अप्सरा यांनीं जें सेविलेलें आहे व ज्यांत उत्तम वासस्थान केलें आहे अशा विमानास अनायासानें प्राप्त होतो ४३. सूर्याप्रमाणें ज्याचा वर्ण आहे अशा मुकुटानें सोन्याचीं भूषणें ज्यानें घातलीं आहेत असा तो फार शोभतो. ज्याच्या सर्वांगास दिव्य चंदनाच्या उट्या लावल्या आहेत व जो दिव्यमालानें भूषित झाला आहे असा तो दिव्य भोगांनीं युक्त होऊन दिव्य लोकांत प्रचार करतो. देवांच्या प्रसादानें तो परम श्रीनें युक्त होतो ४४, ४५. याप्रमाणें तो असंख्य वर्षें स्वर्गलोकांत पूजला जातो. त्यानंतर एकवीस सहस्र वर्षें गंधर्वांसह पुरंदराच्या रम्य नगरांत इंद्रासहवर्तमान आनंद भोगतो. दिव्य यानें व विमानें यांतून नानाप्रकारच्या लोकांमध्यें तो सुखानें संचार करतो ४६,४७. दिव्य स्त्रियांनीं व्याप्त होऊन अमराप्रमाणें राहतो. त्यानंतर हे राजा, तो सूर्याच्या भवनांत, चंद्राच्या भवनांत व शिवाच्या भवनांत वास करून विष्णूच्या सलोकतेस प्राप्त होतो. हे महाराज, मी सांगतों हें असेंच आहे. याविषयीं कांहीं विचार करूं नये ४८, ४९. श्रद्धावान् होऊन रहावें असें माझ्या गुरूनें सांगितलें आहे. मनापासून जें जें हवेंसें वाटत असेल तें तें वाचकास द्यावें ५०. हत्ति, अश्व, रथ,

अतःपरं प्रवक्ष्यामि यानि देयानि भारते । वाच्यमानेऽथ विप्रेभ्यो राजन्पर्वणि पर्वणि ५३
जातिं देशं च सत्यं च माहात्म्यं भरतर्षभ । धर्मवृत्तिं च विज्ञाय क्षत्रियाणां नराधिप ५४
स्वस्ति वाच्य द्विजानादौ ततः कार्यं प्रवर्तयेत् । समाप्ते पर्वणि ततः स्वशक्त्या तर्पयेद्द्वि-
जान् ५५ आदौ तु वाचकं चैव वस्त्रगन्धसमन्वितम् । विधिवद्भोजयेद्राजन्मधुपायससंयु-
तम् ५६ ततो मूलफलप्रायं पायसं मधुसर्पिषा । आस्तिके भोजयेद्राजन्दद्याच्चैव गुडौद-
नम् ५७ अपूपैश्चैव पूपैश्च मोदकैश्च समन्वितम् । सभापर्वणि राजेन्द्र हविष्यं भोजयेद्द्वि-
जान् ५८ अरण्यके मूलफलैस्तर्पयेच्च द्विजोत्तमान् । अरणीपर्व आसाद्य जलकुंभान्प्रदाप-
येत् ५९ तर्पणानि च मुख्यानि वन्यमूलफलानि च । सर्वकामगुणोपेतं विप्रेभ्योऽन्नं प्रदाप-
येत् ६० विराटपर्वणि तथा वासांसि विविधानि च । उद्योगे भरतश्रेष्ठ सर्वकामगुणान्वि-
तम् ६१ भोजनं भोजयेद्विप्रान्गन्धमाल्यैरलंकृतान् । भीष्मपर्वणि राजेन्द्र दत्वा यानमनुत्त-
मम् । ततः सर्वगुणोपेतमन्नं दद्यात्सुसंस्कृतम् ६२ द्रोणपर्वणि विप्रेभ्यो भोजनं परमार्चितम् ।
शराश्च देया राजेन्द्र चापान्यसिवरास्तथा ६३ कर्णपर्वण्यपि तथा भोजनं सार्वकामिकम् ।
विप्रेभ्यः संस्कृतं सम्यग्दद्यात्संयतमानसः ६४ शल्यपर्वणि राजेन्द्र मोदकैः सगुडौदनैः ।
अपूपैस्तर्पयेच्चैव सर्वमन्नं प्रदापयेत् ६५ गदापर्वण्यपि तथा मुद्गमिश्रं प्रदापयेत् । स्त्रीपर्वणि
तथा रत्नैस्तर्पयेत्तु द्विजोत्तमान् ६६ घृतौदनं पुरस्ताच्च ऐषिके दापयेत्पुनः । ततः सर्वगुणोपे-

---

यानादि वाहनें, कडें, दोन कुंडलें तसेंच उत्तम यज्ञोपवीत, विचित्र वस्त्र, विशेषतः सुगंध, इत्यादिकांच्या योगानें वाचकाला देवाप्रमाणें पूजावें; ह्मणजे श्रोत्याला विष्णुलोक प्राप्त होतो ५१,५२. हे राजन्, आतां यापुढें भारताचें वाचन चाललें असतां प्रत्येक पर्वाच्या समाप्तीचे वेळीं ब्राह्मणांना काय द्यावें तें मी सांगतों ५३. हे भरतश्रेष्ठा क्षत्रियांची जाति, देश, सत्य, महात्म्य व धर्मवृत्ति जाणून ब्राह्मणांकडून स्वस्तिवाचन आरंभीं करवून नंतर कार्यास आरंभ करावा. पर्व संपलें असतां यथाशक्ति ब्राह्मणांस तृप्त करावें ५४,५५. हे राजा, वाचकास प्रथमतः वस्त्र—गंधादिकांनीं पूजून मधु पायसयुक्त भोजन घालावें ५६. त्यानंतर मूल व फल यांचें ज्यांत प्राचुर्य आहे अशा मध व घृत यांनीं युक्त असलेल्या पायसाचें भोजन आस्तिक ब्राह्मणास द्यावें ५७. आनरसे, घावन, मोदक यांसह हविष्यान्नाचें भोजन हे राजा, सभापर्वाच्या समाप्तीच्या वेळीं ब्राह्मणांस द्यावें ५८. अरण्यपर्वाचे वेळीं मूळें, फळें यांच्या योगानें द्विजांस तृप्त करावें. त्यांतील शेवटचें अरणीपर्व आलें असतां ब्राह्मणांस जलकुंभ द्यावे ५९. वनांतील मूळें व फळें यांनीं तृप्ति करणें हा मुख्य कल्प आहे. सर्व इष्ट गुणांनीं युक्त असें अन्न ब्राह्मणांस द्यावें ६०. विराट पर्वाच्या शेवटीं नाना प्रकारचीं वस्त्रें द्यावीं. हे भरतश्रेष्ठा, उद्योगपर्वाची समाप्ति करतांना गंधमाल्यांनीं भूषित केलेल्या ब्राह्मणांस सर्व कामयुक्त भोजन घालावें. हे राजन्, भीष्मपर्वाचे वेळीं अगोदर अत्युत्तम वाहन देऊन नंतर सर्वगुणसंपन्न व सुसंस्कृत अन्न द्यावें ६१, ६२. हे राजेंद्रा, द्रोणपर्वामध्यें ब्राह्मणांस अत्युत्तम भोजन, शर, चाप, व तशाच उत्कृष्ट तरवारी द्याव्या ६३. कर्णपर्वांतही तसेंच सर्व कामनायुक्त व संस्कृत भोजन नियतचित्तानें ब्राह्मणांस द्यावें ६४. हे राजेंद्रा, शल्यपर्वामध्यें गुडौदनासह मोदक, व अपूप यांनीं ब्राह्मणांस तृप्त करावें. सर्वप्रकारचें अन्न द्यावें ६५. त्याचप्रमाणें गदापर्वामध्यें मूग मिसळलेला भात ( खिचडी ) खावूं घालावा. स्त्रीपर्वामध्यें रत्नांच्या योगानें उत्तम ब्राह्मणांस तृप्त करावें ६६.

तमन्नं दद्यात्सुसंस्कृतम् ६७ शांतिपर्वण्यपि गते हविष्यं भोजयेद्द्विजान् । आश्वमेधिकमासाद्य भोजनं सार्वकामिकम् ६८ तथाश्रमनिवासे तु हविष्यं भोजयेद्द्विजान् । मौसले सार्वगुणिकं गन्धमाल्यानुलेपनम् ६९ महाप्रस्थानिके तद्वत्सर्वकामगुणान्वितम् । स्वर्गपर्वण्यपि तथा हविष्यं भोजयेद्द्विजान् ७० हरिवंशसमाप्तौ तु सहस्रं भोजयेद्द्विजान् । गामेकां निष्कसंयुक्तां ब्राह्मणाय निवेदयेत् ७१ तदर्धेनापि दातव्या दरिद्रेणापि पार्थिव । प्रतिपर्वसमाप्तौ तु पुस्तकं वै विचक्षणः ७२ सुवर्णेन च संयुक्तं वाचकाय निवेदयेत् । हरिवंशे पर्वणि च पायसं तत्र भोजयेत् ७३ श्लोकं वा श्लोकपादं वा अक्षरं वा नृपात्मज । शृणुयादेकचित्तस्तु स विष्णुदयितो भवेत् ७४ व्यासं चैव सपत्नीकं पूजयेच्च यथाविधि । लक्ष्मीनारायणं देवं पूजितं तच्च पूजयेत् ७५ वाचकं पूजयेयस्तु भूमिवस्त्रसुधेनुभिः । विष्णुः संपूजितस्तेन ससाक्षाद्देवकीसुतः ७६ पारणे पारणे राजन्यथावद्भरतर्षभ । समाप्य सर्वाः प्रयतः संहिताः शास्त्रकोविदः ७७ शुभे देशे निवेश्याथ क्षौमवस्त्राभिसंवृतः । शुक्लांबरधरः श्रीमाञ्छुचिर्भूत्वास्वलंकृतः ७८ अर्चयेत्तं यथान्यायं गन्धमाल्यैः पृथक्पृथक् । संहितापुस्तकान्राजन्प्रयतः शिष्टसंमतः ७९ भक्ष्यैर्मांसैश्च पेयैश्च कामैश्च विविधैः शुभैः । हिरण्यं गाश्च वस्त्रश्च दक्षिणामथ दापयेत् ८० सर्वत्र त्रिपलं स्वर्णं दातव्यं प्रणतात्मना । तदर्धं पादशेषं वा वित्तशाठ्यविवर्जितम् ८१ यद्यदेवात्मनोऽभीष्टं तत्तद्देयं द्विजातये । सर्वथा तोषये-

---

ऐषिक पर्वांत प्रथम घृतौदन द्यावें; नंतर सर्व गुणयुक्त सुसंस्कृत अन्न अर्पण करावें ६७. शांतिपर्व वाचावयास आरंभ करतांना व शेवटीं ब्राह्मणांस हविष्य भोजन द्यावें. आश्वमेधिक पर्वाचेवेळीं सार्वकामिक ( सर्वांच्या इच्छेप्रमाणें ) भोजन द्यावें ६८. त्याचप्रमाणें आश्रमनिवास पर्वाच्या वेळीं ब्राह्मणांस हविष्य भोजन घालावें. मौसल पर्वाच्या वेळीं सर्वगुणसंपन्न गंधमाल्यानुलेपन द्यावें ६९. त्याचप्रमाणें महाप्रस्थानिक पर्वाच्या वाचनप्रसंगीं सर्व कामगुणयुक्त भोजन द्यावें. स्वर्गपर्वाचे वेळींही द्विजांस हविष्यान्न भोजन घालावें ७०. हरिवंशाची समाप्ति झाली असतां सहस्र ब्राह्मणांस भोजन घालावें. सुवर्णमुद्रायुक्त एक गाय ब्राह्मणाला अर्पण करावी ७१. हे राजा, दरिद्र्यानें याच्या अर्धप्रमाणानें तरी दानादि द्यावें. प्रत्येक पर्वाच्या समाप्तीच्या वेळीं विचक्षण पुरुषानें सुवर्णयुक्त पुस्तक वाचकास निवेदन करावें. हरिवंश पर्वाचे वेळीं पायस भोजन घालावें ७२, ७३. हे राजतनया, जो एक श्लोक, अथवा श्लोकाचा एक पाद, अथवा एक अक्षर एकचित्तानें ऐकतो तो विष्णूला प्रिय होतो ७४. सपत्नीक व्यासाचें यथाविधि पूजन करावें. कारण पूजा केलेलें तें दांपत्य लक्ष्मीनारायण देवाचें पूजन करतें ७५. भूमि, वस्त्र व उत्तम गाय यांच्या योगानें वाचकाची जो पूजा करतो त्यानें साक्षात् देवकीपुत्र विष्णूचेंच पूजन केलें आहे, असें होतें ७६. हे राजन्, प्रत्येक पारणाचेवेळीं शास्त्रपंडित व पवित्र ब्राह्मणानें सर्व संहिता यथावत् समाप्त करून ७७, शुभ प्रदेशीं बसावें. यजमानानें रेशमी वस्त्रानें त्याला आच्छादित करावें. नंतर स्वतः शुक्लवस्त्र धारण करणाऱ्या, श्रीमान्, पवित्र व स्वलंकृत झालेल्या त्यानें ब्राह्मणाची यथान्याय गंध–माल्यादिकांनीं पृथक् पृथक् पूजा करावी. शिष्टांस संमत असलेल्या शुद्ध श्रोत्यानें संहितापुस्तकाचेंही पूजन करावें ७८, ७९. भक्ष्य, मांस, पेय, नानाप्रकारचे शुभ काम यांच्या योगानें द्विजांस तृप्त करावें सुवर्ण, गाय, वस्त्र व दक्षिणा द्यावी ८०. नम्रचित्त पुरुषानें सर्वत्र त्रिपलप्रमाण सुवर्ण द्यावें. त्याच्या

द्भक्त्या वाचकं गुरुमात्मनः । देवताः कीर्तयेत्सर्वा नरनारायणौ तथा ८२ ततो गंधैश्च माल्यैश्च स्वलंकृतान्द्विजोत्तमान् । तर्पयेद्विविधैः कामैर्दानैश्चोच्चावचैस्तथा ८३ अतिरात्रस्य यज्ञस्य फलं प्राप्नोति मानवः । प्राप्नुयाच्च क्रतुफलं तथा पर्वणि पर्वणि ८४ वाचको भरतश्रेष्ठ व्यक्ताक्षरपदस्वरः । भविष्यं श्रावयेद्विप्रान्भारतं भरतर्षभ ८५ भुक्तवत्सु द्विजेंद्रेषु यथावत्संप्रदापयेत् । वाचकं भरतश्रेष्ठ भोजयित्वा स्वलंकृतम् ८६ वाचके परितुष्टे तु शुभा प्रीतिरनुत्तमा । ब्राह्मणेषु च तुष्टेषु प्रसन्नाः सर्वदेवताः ८७ ततो हि भरणं कार्यं द्विजानां भरतर्षभ । सर्वकामैर्यथान्यायं साधुभिश्च यथाक्रमम् ८८ इत्येष विधिरुद्दिष्टो मया ते द्विपदां वर । श्रद्दधानेन वै भाव्यं यन्मां त्वं परिपृच्छसि ८९ भारतश्रवणे राजन्पारणे च नृपोत्तम । सदा यत्नवता भाव्यं श्रेयस्तु परमिच्छता ९० भारतं शृणुयान्नित्यं भारतं परिकीर्तयेत् । भारतं भवने यस्य तस्य हस्तगतो जयः ९१ भारतं परमं पुण्यं भारते विविधाः कथाः । भारतं सेव्यते देवैर्भारतं परिकीर्तयेत् ९२ भारतं सर्वशास्त्राणामुत्तमं भरतर्षभ । भारतात्प्राप्यते मोक्षस्तत्त्वमेतद्ब्रवीमि ते ९३ महाभारतमाख्यानं क्षितिं गां च सरस्वतीम् । ब्राह्मणं केशवं चापि कीर्तयन्नावसीदति ९४ वेदे रामायणे पुण्ये भारते भरतर्षभ । आदौ चान्ते च मध्ये च हरिः सर्वत्र गीयते ९५ यत्र विष्णुकथा दिव्याः श्रुतयश्च सनातनाः । तच्छ्रोतव्यं मनुष्येण परं पद-

---

अर्धप्रमाण अथवा पादप्रमाण सुवर्ण तरी वित्तशाठ्य न करितां अवश्य द्यावें. आपणाला जें जें अभीष्ट वाटत असेल तें तें ब्राह्मणास द्यावें. आपला गुरु जो वाचक त्याला भक्तीनें सर्वथा तुष्ट करावें. सर्व देवतांचें व नरनारायणांचें अनुकीर्तन करावें ८१.८२. त्यानंतर उत्तम प्रकारें अलंकृत केलेल्या उत्तम द्विजांस गंध, माल्यें, विविध काम व उच्चनीच दानें यांच्या योगानें तृप्त करावें ८३. असें केल्यानें मानवास अति रात्राचें फल प्राप्त होतें. प्रत्येक पर्वाच्यावेळीं त्याला यज्ञफल मिळतें ८४. हे भरतश्रेष्ठा, ज्याचीं अक्षरें, पदें व स्वर व्यक्त आहेत अशा वाचकानें भविष्यासह भारत ब्राह्मणास ऐकवावें ८५. ब्राह्मण भोजन करीत असतांना यथाशास्त्र त्यांना सर्व द्यावें. हे भरतश्रेष्ठा, वाचकाला भोजन घालून उत्तमप्रकारें अलंकृत करावें ८६. वाचक आतिशय तुष्ट झाला असतां शुभ व अत्युतम प्रीति उत्पन्न होते. ब्राह्मण संतुष्ट झाले असतां सर्व देवता तुष्ट होतात ८७. यास्तव हे भरतश्रेष्ठा, ब्राह्मणांचें पोषण करावें. क्रमानें सर्व उत्तम काम त्यांना यथान्याय समर्पण करावे ८८. हे मनुष्यांतील श्रेष्ठा, हा विधि मीं तुला सांगितला आहे. ज्याअर्थीं तूं मला विचारीत आहेस त्याअर्थीं श्रद्धावान् होऊन राहावें ८९. परमकल्याणाची इच्छा करणारानें, हे उत्तम राजा, भारतश्रवण व पारणा याविषयीं सदा यत्नवान् व्हावें ९०. नित्य भारताचें श्रवण करावें. भारताचें कीर्तन करावें. ज्याच्या घरामध्यें भारत असतें त्याच्या हातांत सदा जय असतो ९१. भारत परम पुण्यकारक आहे. भारतांत विविध कथा आहेत. देवांकडून भारताचें सेवन केलें जातें. यास्तव भारताचें कीर्तन करावें ९२. हे भरतश्रेष्ठा, भारत हें शास्त्रांत उत्तम आहे. भारतापासून मोक्ष मिळतो. मी हें तुला तत्त्व सांगत आहें ९३. महाभारत आख्यान, क्षिति, गाय, सरस्वती, ब्राह्मण व केशव यांचें कीर्तन करणारा कधीं क्लेश भोगीत नाहीं ९४. वेद, रामायण व पुण्यकारक भारत, यांमध्यें हे भरतश्रेष्ठा, आदि, मध्यें व अंतीं सर्वत्र हरीचें वर्णन केलें आहे ९५. परमपदाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें ज्यात सनातन श्रुति व दिव्य विष्णुकथा आहेत असें हें

मिहेच्छता ९६ एतत्पवित्रं परममेतद्धर्मनिदर्शनम्। एतत्सर्वगुणोपेतं श्रोतव्यं भूतिमिच्छता९७ क्रियतेऽसारसंसारे वांछितस्यैव कारणम्। हरिवंशस्य श्रवणमिति द्वैपायनोऽब्रवीत् ९८ अश्वमेधसहस्रेण वाजपेयशतैस्तथा। यत्फलं प्राप्यते पुंभिस्तद्धरिवंशपारणात् ९९ अजरममरमेकं ध्येयमाद्यंतशून्यं सगुणमगुणमाद्यं स्थूलमत्यन्तसूक्ष्मम्। निरुपममनुमेयं योगिनां ज्ञानगम्यं त्रिभुवनगुरुमीशं त्वां प्रपन्नोऽस्मि विष्णो १०० सर्वस्तरतु दुर्गाणि सर्वो भद्राणि पश्यतु। सर्वेषां वांछिताअर्था भवंत्वस्य च पारणात् १०१ [ ५३७३ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० श्रवणफलकथनं नाम द्वात्रिंशदधिकशततमोऽध्यायः ॥ १३२ ॥

जनमेजय उवाच ॥ त्र्यक्षाद्वधमहं ब्रह्मन् श्रोतुमिच्छामि तत्त्वतः। त्रयाणांपुरसंज्ञानां खेचराणांसमासतः १ वैशंपायन उवाच ॥ शृणु विस्तरतः सर्वं यन्मां पृच्छसि नैधनम्। दैत्यानां बाहुबलिनां सर्वप्राणिविरोधिनाम् २ शंकरेण वधं राजन् शूलैस्त्रिभिरजिह्मगैः। कृतं पुरासुरेन्द्राणां सर्वभूतवधैषिणाम् ३ त्रिपुरं पुरुषव्याघ्र बृहद्धातुसमीरितम्। विक्रामति नभोमध्ये मेघवृन्दमिवोत्थितम् ४ प्राकारेण प्रवृद्धेन कांचनेन विराजता। मणिभिश्च प्रकाशाद्भिः सर्वरत्नैश्च तोरणैः ५ बभासे नभसो मध्ये श्रिया परमया ज्वलत्। गंधर्वाणामिवोदग्रं कर्मणा

---

महाभारत वाचावें ९६. हें परम पवित्र आहे. हें धर्मनिदर्शन आहे. ऐश्वर्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें सर्व गुणांनीं युक्त असलेलें हें ऐकावें ९७. हरिवंशाचें श्रवण या असार संसारांत शिष्टांकडून वांछिताचेंच कारण केलें जातें, असें व्यासानें सांगितलें आहे ९८. सहस्र अश्वमेध व शत वाजपेय यांच्या योगानें जें फल पुरुष प्राप्त करून घेतात तें हरिवंशाच्या पारणानें मिळतें ९९. हे विष्णो, अजर, अमर, एक, ध्येय, अद्यन्तशून्य, सगुण, अगुण, आद्य, स्थूल, अत्यन्त सूक्ष्म, उपमाशून्य, योग्यांना ज्ञानगम्य, त्रिभुवनगुरु, ईश अशा तुला मी शरण आहें १००. या हरिवंशाच्या पारणानें सर्व संकटांतून पार पडोत. सर्व कल्याण पाहोत. व सर्वांचे इष्टमनोरथ परिपूर्ण होवोत १०१. इति श्रीमहा० खि० हरि० भवि० श्रवणफलकथननामक एकशेंबत्तिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १३२. ॥

जनमेजयः—हे ब्रह्मन्, मी त्रिनयनापासून* आकाशांतून संचार करणाऱ्या तीन पुरसंज्ञकांचा नाश कसा झाला तें तत्त्वतः व थोडक्यांत ऐकण्याची मी इच्छा करतों १. वैशंपायनः—राजन्, सर्व प्राण्यांशीं विरोध करणाऱ्या बाहुशाली दैत्यांच्या मरणाविषयीं तूं जें मला विचारीत आहेस तें सर्व विस्तारपूर्वक ऐक २. हे राजन्, शंकरानें पूर्वी सरळ जाणाऱ्या तीन शूलांनीं सर्व भूतांचा वध करण्याची इच्छा करणाऱ्या असुरेंद्राचा वध केला ३. हे पुरुषश्रेष्ठा, फार मोठ्या धातूंनीं निर्माण केलेलें त्रिपुर उठलेल्या मेघसमूहाप्रमाणें आकाशामध्यें गमन करीत होतें ४. सोन्यानें चमकणारे, रत्नांनीं प्रकाशमान होणारे, व सर्व रत्नसंपन्न तोरणांनीं युक्त असणारे फार मोठे प्राकार त्याच्यावर होते.

---

* टीकाकार नीलकंठांनीं हरिवंशाची फलश्रुतिही झाल्यावर पुनः येथें कथेविषयीं प्रश्न करणें अनुपपन्न आहे, असें समजून हा सर्व अध्याय अध्यात्मपर लाविला आहे; पण आह्मी येथें अध्यायाचा वाच्य अर्थच केला आहे. कारण पुराणांतल्या सर्वच गोष्टी अध्यात्मपर लावतां येणें शक्य असल्यामुळें ह्याच एका गोष्टीचा लाक्षणिक अर्थ करण्याचें विशेष प्रयोजन दिसत नाहीं.

साधितं परम् ६ वाजिनः पक्षसंयुक्ता वहन्ति बलदर्पिताः । पुरं प्रभाकरश्रेष्ठं मनोभिः कामबृंहणैः ७ धावन्ति ह्रेषमाणास्ते विक्रमैः प्राणसंभृतैः । आह्वयन्त इवाकाशं खुरैः श्यामदलप्रभैः ८ वायुवेगसमैर्वेगैः कालयन्त इवांबरम् । असुराः समदृश्यन्त चतुर्भिर्विदितात्मभिः ९ ऋषिभिर्ज्वलनप्रख्यैस्तपसा दग्धकिल्बिषैः । गीतवादित्रबहुलं गंधर्वनगरोपमम् १० चित्रायुधसमाकीर्णैः प्रततकनकप्रभैः । भवनैर्बहुभिश्चैव प्रांशुभिः समलंकृतैः ११ देवेंद्रभवनाकारैः शुशुभे तन्महाद्युति । प्रासादाग्रैः प्रवृद्धैश्च कैलासशिखरप्रभैः १२ शुशुभे दैत्यनगरं बहुसूर्यमिवांबरम् । वराट्टालकसंपन्नं तप्तकांचनसप्रभम् १३ प्रदीप्तमिव तेजोभी रराजाथ महाप्रभो । क्ष्वेडितोत्कृष्टबहुलं सिंहनादविनादितम् १४ बभौ वल्गुजनाकीर्णं वनं चैत्ररथं यथा । समुच्छ्रितपताकं तदसिभिश्च विराजितम् १५ रराज त्रिपुरं राजन्महाविद्युदिवांबरे । सूर्यनाभश्च दैत्येन्द्रश्चन्द्रनाभश्च भारत १६ तथान्ये च महावीर्या दानवा बलदर्पिताः । ममृदुश्च बभंजुश्च मोहिताः परमेष्ठिना १७ पंथानं देवगमनं पितृयानं च भारत । तैरेवमसुराग्रैश्च प्रगृहीतशरासनैः १८ दानवैर्नरशार्दूल देवयाने महापथे । पितृवह्निबलोपेते हृते भरतसत्तम १९ ब्रह्माणमभ्यधावन्त सर्वे सुरगणास्तथा । विवर्णवदना दीनाश्छिन्ने चाग्निकर्मणि २० अब्रुवंश्च गताः स्थित्वा स्वरेणार्तनिनादिना । हन्यामहे शत्रुगणैर्भागोच्छेदेन

---

त्यामुळें तें आकाशांत परमशोभेनें दीप्त होऊन अतिशय चमकत होतें. तें गंधर्वांच्या कर्मानेंच जणुं काय निर्माण केलेलें सर्वोत्तम पुर होतें ५,६. बलानें मत्त झालेले व पक्षसंयुक्त घोडे त्याला वाहात होते. सूर्याप्रमाणें श्रेष्ठ असलेलें तें पुर मनोरथांनीं पुष्ट झालेल्या मनांनींच जणुं काय वाहिलें जात असे ७. ते अश्व श्यामदलांची ज्यांना प्रभा आहे अशा खुरांनीं मोठ्या सामर्थ्यानें पाय टाकीत व खिंकाळत जणुं काय आकाशाला बोलावीतच होते. वायूच्या वेगासारख्या वेगांनीं जणुं काय आकाशाचें परिमाणच करीत असलेले ते असुर, आत्मज्ञ, अग्नीसारख्या तेजस्वी व तपानें ज्यांचें पाप दग्ध झालें आहे अशा चार ऋषींकडून पाहिले गेले. त्यांत गीत व वादित्र पुष्कळ होत होतें. तें त्रिपुर गंधर्वनगरासारखें होतें ८-१०. तें महातेजस्वी पुर विचित्र आयुधांनीं व्यापलेल्या, तप्त सोन्याच्या प्रभेनें युक्त असलेल्या, अतिशय उंच, अतिशय अलंकृत, व ज्यांचा आकार इंद्राच्या आकारासारखा आहे अशा भवनांनीं फार शोभलें. कैलासशिखराप्रमाणें ज्यांची प्रभा आहे अशा अतिशय वाढलेल्या प्रासादाग्रांनीं तें दैत्याचें नगर अनेक सूर्यांनीं युक्त असलेल्या आकाशाप्रमाणें शोभलें. त्यांत सर्वोत्तम ओटे होते. लाल केलेल्या सोन्याप्रमाणें त्याची प्रभा होती. हे प्रभो तें तेजाच्या योगानें प्रदीप्त असल्यासारखें दिसत होतें. त्यांत मोठमोठ्या गर्जना पुष्कळ होत होत्या. वीरांच्या सिंहनादांनीं तें नादित झालें होतें. चैत्ररथवनाप्रमाणें सुंदर जनांनीं व्याप्त असलेलें तें अतिशय शोभलें. त्यांत उंच पताका लाविल्या होत्या. तें तरवारींनीं विराजमान होत होतें. हे राजा, तें त्रिपुर आकाशांत महाविद्युत्प्रमाणें दिसत असे. हे भारता, सूर्यनाभ, दैत्येंद्र चंद्रनाभ, व तसेच आणखी दुसरेही महावीर्यवान् व बलदर्पित दानव परमेष्ठीकडून मोहित होत्साते देवयान व पितृयान मार्ग नाहींसे करते झाले. ( कर्म व उपासना यांचा त्यांनीं विध्वंस केला. ) हे भरतश्रेष्ठा, ज्यांनीं हातांत शरासनें घेतलीं आहेत अशा त्या असुरश्रेष्ठ दानवांनीं याप्रमाणें पितृबल व अग्निबल यांनीं युक्त असलेल्या पितृयान व देवयान महा मार्गांचा विध्वंस केला असतां सर्व

आगद् २१ तेषां चैव वधोपायं वदस्व वदतां वर । यं ज्ञात्वा बाहुबलिनो बाधेम समरे परान् २२ सांत्वयित्वा तु वरदो ब्रह्मा प्रोवाच देवताः । शृणुध्वं देवताः सर्वाः शत्रुप्रतिकृतिं पराम् २३ अवध्या दानवाः सर्वे ऋते शंकरमव्ययम् । प्रतिगृह्य च तद्वाक्यं मनोभिर्वाग्भिरेव च २४ भूमौ प्रपेदिरे सर्वे सह रुद्रैश्च भारत । विन्ध्यपादे च मेरौ च मध्ये च पृथिवीतले २५ तपसोग्रेण योगज्ञाः सर्वे ते मुनयोऽभवन् । काश्यपेया हरं प्राप्ता जपन्तो ब्रह्मसंहिताम् २६ तेषां परमना रीणामभवद्वन्ध्यता जने । विन्यस्तदर्भनिचये ताम्रलोहं च भूषणम् २७ परिधानानि चर्माणि मृदूनि च शुभानि च । स्वयं मृतानां कृष्णानां मृगाणां कुरुसत्तम २८ गृहीतानि विमुक्तानि देहेभ्यो वनचारिणाम् । अन्तरिक्षमथोपेत्य विविशुर्मायया वृताः २९ हरालयंसुराःसर्वेव्याघ्रचर्मनिवासिनः । प्रणिपत्याथ ते दीना भगवंतं जगत्पतिम् ३० सुव्यक्तेनाभिधानेन प्रभाषन्त हरं ततः । हविर्दत्तमविज्ञानाद्भस्मच्छन्नेषु वह्निषु ३१ वरदानं वृथास्मासु भगवन्विमुखे त्वयि । यथादेशं यथाकालं क्रियतां ब्रह्मणो वचः ३२ यदुक्तं देवदेवेन खेचराणां समीपतः । एवं देववचोभिश्च भाविनोर्थस्य वै भवात् ३३ समनह्यन्महादेवो देवैः सह सवासवैः । आदित्यपथमास्थाय सन्नद्धाः समलंकृताः ३४ सर्वे कांचनवर्णाभा बभुर्दीप्ताइवाग्नयः । रुद्रेण सहिता रुद्रा दहन्त इव तेजसा ३५

---

देवगण ब्रह्मदेवाकडे धावले. गातिकर्म छिन्न झाले असतां ते विवर्णमुख व दीन झाले २०. तेथें जाऊन व उभे राहून ते आर्तस्वरानें ह्मणाले, " हे भाग देणाऱ्या देवा, भागांचा उच्छेद करून आह्मी शत्रुगणांकडून मारले जात आहों. यास्तव हे वक्त्यांतील श्रेष्ठा, त्यांच्या वधाचा उपाय आह्मांला सांग ह्मणजे तो जाणून आह्मी बाहुबलवान् होऊं व समरांत शत्रूला पीडा करूं " २१, २२. तेव्हां वरद ब्रह्मदेव देवांचें सात्वन करून ह्मणाला, " अहो, सर्व देवांनो, तुह्मी सर्व शत्रूंचा उत्तम प्रतीकार कसा करावा तें ऐका २३. अव्यय शंकरावाचून बाकी सर्वांना ते दानव अवध्य आहेत. " मनांनीं व वाणीनेंही त्यांचें तें वाक्य ग्रहण करून २४ हे भारता, रुद्रासह ते सर्व भूमीवर आले. पृथ्वीतलाच्या मध्यभागीं मेरु व विंध्यपाद यांवर उग्र तपानें ते सर्व योगज्ञ मुनि झाले. ब्रह्मसंहितेचा जप करणारे ते सर्व काश्यपपुत्र हरास शरण गेले २५,२६. जनामध्यें त्यांच्या परम स्त्रियांची वंध्यता झाली. हांतरलेल्या दर्भसंचयावर ते शयन करूं लागले. तांबें व लोखंड यांचींच भूषणें त्यांनीं घातलीं ( सोनें व रत्नें यांचीं नाहीं. ) २७. हे कुरुश्रेष्ठा, आपोआप मेलेल्या कृष्णमृगांचीं शुभ व मृदु चामडीं ते नेसले २८. वनांतून फिरणाऱ्या हरणांच्या देहापासून त्यांनीं तीं काढून घेतलीं होतीं. याप्रमाणें अत्यंत कष्टकर दशेंत असलेले ते मायेनें आवृत होऊन अंतरिक्षांत उडून गेले २९. ते सर्व देव व्याघ्रचर्म परिधान करणाऱ्या शंकराच्या आलयास गेले. त्या दीनांनीं जगत्पति भगवानास नमस्कार केला ३०. नंतर ते अतिव्यक्त वाणीनें हराला असें सांगूं लागले. " हे भगवन्, तूं आमच्याविषयीं विमुख झाल्यामुळें यजमानाकडून अज्ञानानें भस्माच्छादित अग्नीमध्यें दिलेला हवि व्यर्थ होतो. व त्यामुळें आह्मांला दिलेलें वरदानही व्यर्थ होतें. यास्तव देश व काल यांस अनुरूप असें ब्रह्मदेवाचें वचन मान्य कर. देवदेवानें आकाशचरांच्या समीप जें सांगितलें तें तूं कर. " अशाप्रकारच्या देववचनांनीं, भावी अर्थ सिद्ध व्हावयाचाच असल्याळें, महादेव वासवादि देवांसह सज्ज झाला. आदित्य मार्गाचा आश्रय करून सज्ज व उत्तमप्रकारें अलंकृत झालेले सर्व देव

सन्नद्धाः कुशलाः सर्वे प्रांशवः पर्वता इव । विश्वे विश्वेन वपुषा बलिनः कामरूपिणः ३६
समनह्यन्महात्मानो दानवान्तं विधित्सवः । एभिः सह धनाध्यक्षैः समंतात्परिवारितः ३७
त्रिपुरं योधयत्र्यक्षः प्रगृह्य सशरं धनुः । अथ दैत्या भिन्नदेहाः पुराट्टाल गता इव ३८
न्यपतन्त विदेहास्ते विशीर्णा इव पर्वताः । अतिविद्धाः सुविद्धाश्च रणमध्यगता नृप ३९
न्यपतन्दैत्यसंघाता वज्रेणेव हता नगाः असिभिश्च हता देवैः शक्तिचक्रपरश्वधैः ४० बाणैश्च
भिन्नमर्माणो दैत्येन्द्रा युद्धगोचरे । प्रपेतुः सहिता उर्व्यां छिन्नपक्षा इवाचला ४१ तत्र संज्ञां
विमुञ्चन्ति दीप्यमानेन तेजसा । एवं तेऽन्योन्यसंबाधे क्षीयन्ते क्षयकर्मणा ४२ नोपलभ्यन्त
चक्षुर्भ्यामपि दिव्येन चक्षुषा । अस्तं प्राप्ते दिनकरे सुरेन्द्रास्ते निशामुखे । छिन्नभिन्नक्षत-
मुखा निपेतुर्वसुधातले ४३ अथ दैत्या जयं प्राप्ताः निशायां निशितैः शरैः । विनेदुर्विपुलै-
र्नादैर्मेघा इव महारयाः ४४ जयप्राप्त्यसुराश्चैव तेऽन्योन्यमभिजल्पिरे । त्रासितास्त्रिदशाः
सर्वे संग्रामजयकांक्षिणः ४५ अस्माभिर्बलसंपन्नैः सह प्रासासितोमरैः । विरेजुश्च जयं प्राप्ता
उशनोहव्यबोधिताः ४६ समरे बलसपन्नाः सायुधा दैत्यसत्तमाः । सुरैश्च सहितः सर्वैः रथमा-
स्थाय शंकरः ४७ दर्पितान्निनदन्दैत्यान् प्रदहन्निव तेजसा । युगान्तकाले वितते रश्मिवानिव

---

दीप्त अग्नीप्रमाणें भासले. कारण त्यांची अंगकांति सुवर्णासारखी होती. रुद्रासहवर्तमान इतर रुद्र आपल्या तेजानें जाळीत असल्याप्रमाणें सज्ज होऊन निघाले ३१–३५. ते सर्व युद्धकुशल व पर्वताप्रमाणें उंच होते. ते सर्व सर्वरूपानें युक्त, बलाढ्य व कामरूपी होते. ३६. दानवाचा अंत करण्याची इच्छा करणारे ते महात्मे कवचादि घालून सज्ज झाले होते. या सर्व धनाध्यक्षांकडून समंतात् परिवेष्टित झालेला त्र्यंबक सशर धनुष्य घेऊन त्रिपुराशीं युद्ध करता झाला. नगराच्या कट्ट्यांवर निजल्याप्रमाणें शंकराच्या शरांनीं क्षतशरीर झालेले दैत्य भराभर भूमीवर पडले ३७–३८. विशीर्ण झालेल्या ( उललेल्या ) पर्वतांप्रमाणें ते देहरहित होऊन पडले. रणामध्यें आलेल्या त्यांना अति भयंकर व असह्य वेध झाले होते ३९. वज्रानें तोडलेल्या पर्वताप्रमाणें देवांनीं खड्गें, शक्ति, चक्र, परशु इत्यादिकांच्या योगानें तोडलेले दानव भूमीवर पडले ४०. युद्धामध्यें सन्मुख आलेल्या दैत्येंद्रांचीं मर्मस्थानें बाणांनीं छिन्न–भिन्न केलीं गेलीं. ज्यांचें पंख तुटले आहेत अशा पर्वताप्रमाणें ते सर्व मिळून पृथ्वीवर पडले ४१. दीप्यमान तेजानें दग्ध झालेले ते तेथें जीविताचा त्याग करीत होते. याप्रमाणें एकमेकाशीं भिडून परस्परास पीडा देणारे ते क्षय पावणाऱ्या कर्मानेंच क्षीण झाले ४२. दिनकर अस्त पावून रात्र पडली असतां चर्मचक्षुंनीं तर राहूं देच पण ज्ञानचक्षूनेंही त्यांना कांहीं दिसेनासें झालें. ज्यांचीं मुखें छिन्न, भिन्न व क्षतयुक्त झालीं आहेत असे श्रेष्ठदेव पृथ्वीतलीं पडले ४३. रात्रीं दैत्याचें बल वाढलें. तीक्ष्ण बाणांनीं त्यांनीं जय मिळविला. महावेगवान् मेघांप्रमाणें विपुल नादांनीं ते आक्रोश करूं लागले ४४. जय मिळाल्यामुळें असुर आनंदानें एकमेकाशीं अशा गोष्टी बोलूं लागले:—संग्राम जयाची आकांक्षा करणारे सर्व देव आतां भ्याले आहेत ४५. प्रास, खड्गें व तोमर यांनीं युक्त असलेल्या आम्हां बलाढ्याशीं लढण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें नाहीं. शुक्राचार्यांच्या हव्यानें जागृत झालेले दैत्य विजयास प्राप्त होऊन फार शोभूं लागले ४६. उत्तम दैत्य समरांत बलसंपन्न व आयुधयुक्त होते. नंतर शंकर सर्व देवांसह रथांत बसून सिंहनाद करीत व दर्पयुक्त दैत्यांस आपल्या

निर्दहन् ४८ सर्वभूतानि भूताग्र्यः प्रलये समुपस्थिते । स रथो वाजिभिः शीघ्रैरुह्यमानो मनोजवैः ४९ विबभौ नभसो मध्ये सविद्युदिव तोयदः । वृषभेण ध्वजाग्रेण गर्जमानेन भारत ५० भाति स्म स रथो राजन्सेन्द्रायुध इवांबुदः । ततोंबरगताः सिद्धास्तुष्टुवुर्वृषभध्वजम् ५१ कर्मभिः पूर्वजं पूर्वैः शुचिभिस्त्र्यंबकं तदा । ऋषयश्च तपःशान्ताः सत्यव्रतपरायणाः ५२ अमृतप्राशिनश्चैव सुरसंघास्तथैव च । गंधर्वाप्सरसश्चैव गन्धर्वेण स्वरेण वै ५३ प्रहृष्टवदनाः सौम्याः पैऽये स्थानांतरे नृप । चयाट्टालकसंपन्ने शतघ्नीशतसंकुले ५४ तस्मिंस्तु दैत्यनगरे सर्वभूतभयावहे । ततस्तु शरवर्षाणि मुमुचुर्दैत्यदानवाः ५५ सुराणामरयो-मध्ये तीक्ष्णाग्राणि समंततः । शतघ्नीभिश्च निघ्नन्तो भल्लैः शूलैश्च भारत ५६ ते चक्रिरे महत्कर्म दानवा युद्धकोविदाः । गदाभिश्च गदांजघ्नुर्भल्लैर्भल्लांश्च चिच्छिदुः ५७ अस्त्रैरस्त्राण्यबाधन्त मायां मायाभिरेव च । ततोऽपरे समुद्यम्य शरशक्तिपरश्वधान् ५८ अशनींश्च महाघोरान्मुक्तान् शतसहस्रशः । असिभिर्मायाविहितैर्मृत्योर्विषयगोचरे ५९ ते वध्यमाना विबुधाः शरवर्षैरवस्थिताः । गन्धर्वनगराकारः सोऽसीदत्सहरो रथः ६० हन्यमानोऽसुरगणैः प्रासासिशरतोमरैः । तैश्च दैत्यप्रहरणैर्गुरुभिर्भारसाहिभिः । चित्रैश्च बहुभिः शस्त्रैरतिष्ठत शचीपतिः ६१ ततो मध्ये दिव्यशब्दः प्रादुरासीन्महीपते । ऋषीणां ब्रह्मपुत्राणां मह-

---

तेजानें, युगांतसमय आला असतां सर्वभूतांस जाळणाऱ्या सूर्याप्रमाणें, जणुं काय जाळीत तो भूतपति निघाला. त्यावेळीं प्रलयकाल आला आहे असा भास झाला. मनाप्रमाणें ज्यांचा वेग आहे अशा शीघ्र घोड्यांनीं तो रथ वाहिला जात होता ४९. आकाशामध्यें तो विद्युद्युक्त मेघाप्रमाणें शोभला. हे भारता, त्याच्या ध्वजाग्रावर बसलेला वृषभ गर्जना करीत होता ५०. हे राजा, तो रथ इंद्रधनुष्ययुक्त मेघाप्रमाणें भासत होता. तेव्हां आकाशांत स्थित असलेले सिद्ध त्या पूर्वज त्र्यंबक वृषभध्वजाची स्तुति पूर्वींच्या त्याच्या पवित्र कर्मांनीं करूं लागले. तपानें शांत झालेले व सत्यव्रतपरायण ऋषि ५१, ५२, त्याचप्रमाणें अमृतप्राशन करणारे देवसंघ, गंधर्व व अप्सरा हृष्ट मुखानें, सौम्य वृत्तीनें व गंधर्व स्वरानें ईश्वरनिर्मित दुसऱ्या स्थानांत स्तुति करूं लागले. मोठाल्या टेंकड्या व कट्टे यांनीं संपन्न असलेल्या, शेंकडों शतघ्नींनीं व्यापलेल्या व सर्व भूतांस भयावह असलेल्या त्या दैत्यनगरांत राहणाऱ्या दैत्यदानवांनीं तेथूनच देवांवर बाणवर्षाव सोडले ५३–५५. हे भारता, देवांचे शत्रु मध्यभागीं स्थित होऊन समंततः ज्यांना तीक्ष्ण अग्रें आहेत अशा शतघ्नींनीं, भाल्यांनीं, व शूलांनीं शत्रूंना मारीत सुटले ५६. युद्धामध्यें पंडित असलेले ते महत्कर्म करते झाले. त्यांनीं आपल्या गदांनीं शत्रूंच्या हातांतील गदांवर प्रहार केला. आपल्या भाल्यांनीं शत्रूंचे भाले तोडले ५७. अस्त्रांनीं अस्त्रांस बाधा केली. मायांनीं माया कुंठित केल्या. दुसरे कित्येक शर, शक्ति, परशु इत्यादिकांस उचलून शत्रूंवर चालले ५८. त्यांनीं हजारों महाघोर अशनि देवांवर सोडले. मायेनें निर्माण केलेल्या तरवारींनीं त्यांना मृत्यूच्या स्वाधीन केलें ५९. शरवृष्टीनें जर्जर झालेले देव त्या रथांत मोठ्या कष्टानें राहिले. गंधर्वनगराप्रमाणें ज्याचा आकार आहे असा तो रथ हरासह क्लिष्ट झाला. कारण असुरगण प्रास, तरवारी, तोमर, व तशींच दुसरींही अनेक, विचित्र, भार सहन करणारीं व जड दैत्यशस्त्रें यांनीं त्याच्यावर सतत प्रहार करीत होते. हे राजा, अशा अनेक शस्त्रांनीं प्रहार केला जाणारा शचीपति इंद्र मध्यभागीं स्थिर उभा

तामपि भारत ६२ स एव शंकरस्याग्रे रथो भूमिं प्रतिष्ठितः। अजेयो जय्यतां प्राप्तः सर्वलोकस्य पश्यतः ६३ तस्मिन्निपतिते राजन्रथानां प्रवरे रथे। निपेतुः सर्वभूतानि भूतलेव सुधाधिप ६४ विचेलुः पर्वताग्राणि चेलुश्चैव महाद्रुमाः। विचुक्षुभुः समुद्राश्च न रेजुश्च दिशो दश ६५ वृद्धाश्च ब्राह्मणास्तत्र जेपुश्च परमं जपम्। यत्तद्ब्रह्ममयं तेजः सर्वत्र विजयैषिणाम् ६६ शान्त्यर्थं सर्वभूतानामिह लोके परत्र च। समाधायात्मनात्मानं योगप्राप्तेन हेतुना ६७ रथन्तरेण साम्नाथ ब्रह्मभूतेन भारत। तेजसा ज्वलयन्विष्णोस्त्र्यक्षस्य च महात्मनः ६८ सर्वेषां चैव देवानां बलिनां कामरूपिणाम्। ऋषीणां तपसाढ्यानां वसतां विजने वने ६९ अथ विष्णुर्महायोगी सर्वतो दृश्य तत्वतः। वृषरूपं समास्थाय प्रोज्जहार रथोत्तमम् ७० समाक्रान्तं देवगणैः समग्रबलपौरुषैः। बलवांस्तोलयित्वा तु विषाणाभ्यां महाबलः ॥ ननाद प्राणयोगेन मथ्यमान इवार्णवः ७१ तृतीयं वायुविषयं समाक्रम्य विषाणवान्। ननाद बलवान्नादं समुद्र इव पर्वणि ७२ ततो नादेन वित्रस्ता दैतेया युद्धदुर्मदाः। पुनस्ते कृतसन्नाहा युयुधुः सुमहाबलाः ७३ सर्वे वै बाहुबलिनः समर्थबलपौरुषाः। सुरसैन्यं प्रमर्दन्तः प्रगृहीतशरासनाः ७४ अग्निं संधाय धनुषि शितं बाणं सुपत्रितम्। ब्रह्मास्त्रेणाभिसंयोज्य ब्रह्मदण्डं शिवोऽव्ययः। मुमोच दैत्यनगरे त्रिधामात्रानुसंज्ञितम् ७५ तं बाणं त्रिविधं वीर्यात्संधाय मनसा प्रभुः। सत्येन ब्रह्मयोगेन तपसोग्रेण भारत ७६ मुमोच दैत्यनगरे सर्वप्राणहराञ्छ-

---

होता ६०,६१. इतक्यांत ऋषि व महात्मे ब्रह्मपुत्र यांच्या मध्यभागीं असा दिव्य शब्द व्यक्त झाला ६२. शंकराच्या समोर हा रथ भूमीकडे निघाला. अजेय असलेलाही तो सर्व लोकांसमक्ष जय्यतेस प्राप्त झाला ६३. हे राजा, तो रथांतील उत्तम रथ भूमीवर पडला असतां सर्व भूतें भूमीवर पडलीं; पर्वतांचीं अग्रें डोलूं लागलीं; महावृक्ष हालूं लागले; समुद्र क्षुब्ध झाले व दशदिशा शोभेनातशा झाल्या ६४,६५. वृद्ध ब्राह्मण त्यावेळीं परम जप करूं लागले. सर्वत्र विजयाची इच्छा करणाऱ्या साधकांचें जें ब्रह्ममय तेज—तेंच उत्तम उपास्य होय ६६. यास्तव यालोकीं व परलोकीं सर्व भूतांना शांति मिळावी ह्मणून योगप्राप्त बलानें, संस्कृत चित्तानेंच विक्षेप पावणाऱ्या मनाचा निरोध करून, त्या तेजाचा ते वृद्ध जप करूं लागले ६७. हे भारता, त्यांनीं रथंतर ब्रह्मभूत सामानें महात्म्या त्रिनेत्र विष्णूचें बलाढ्य व कामरूपी सर्व देवांचें, तपानें संपन्न असलेल्या व निर्जन वनांत रहाणाऱ्या ऋषींचें तेज वाढविलें ६८,६९. नंतर तो महायोगी विष्णु ( व्यापी देव ) तत्त्वतः चोहोंकडे पाहून व वृषरूप धारण करून उत्तम रथ उठविता झाला ७०. समग्र बल व पौरुष यांनीं युक्त असलेल्या देवगणांनीं व्याप्त झालेल्या त्या रथास दोन्ही शिंगावर उचलून घेऊन तो महाबलवान् बैल अंगांत जेवढी शक्ति होती तेवढी सर्व खर्च करून मंथन केल्या जाणाऱ्या समुद्राप्रमाणें मोठ्यानें ओरडला ७१. नंतर त्या शिंगानें युक्त असलेल्या बैलानें तिसऱ्या वायूच्या प्रदेशांत जाऊन पर्वकाळच्या समुद्राप्रमाणें मोठी गर्जना केली ७२. त्या नादानें युद्धदुर्मद दैतेय भयभीत झाले. पण ते अतिशय महाबलाढ्य वीर सज्ज होऊन युद्ध करूं लागले ७३. ते सर्व बाहुशाली, समर्थ, बल व पौरुष यांनीं युक्त दैत्य शरासनें घेऊन देवसैन्याचें मर्दन करूं लागले ७४. पण इतक्यांत अव्यय शिवानें धनुष्यावर अग्नीचें संधान करून तीक्ष्ण व सुपत्रयुक्त ब्रह्मदंडासारखा बाण ब्रह्मास्त्रानें संयुक्त करून त्या त्रिधामात्रासंज्ञक शरास दैत्याच्या नगरावर सोडलें ७५.

रान् । दीप्तान्कनकवर्णाभान्सुवर्णांश्च सुनिर्मलान् ७७ मुक्त्वा वरशरान्घोरान्सविषानिव पन्नगान् । सुप्रदीप्तैस्त्रिभिर्बाणैर्वेगिभिस्तद्विदारितम् ७८ शरघातप्रदीप्तानि विन्ध्याग्राणीव भारत । गोपुराणि पुरैः सार्धं व्यशीर्यन्त नराधिप ७९ अग्निना संप्रदीप्तानि वह्निगर्भाणि भारत । धरण्यां संप्रपद्यन्त पुराणि वसुधाधिप ८० तानि वैडूर्यवर्णानि शिखराणि गिरेरिव । शंकरेण प्रदग्धानि ब्रह्मास्त्रेणापतन्नृप ८१ हते च त्रिपुरे देवैर्वाचो हर्षात्किलेरिताः । सर्वान् जहीति शत्रूंस्त्वं प्रवृद्धान्पुरुषोत्तम ८२ विष्णुरेव महायोगी योगेन प्रस्मयन्निव । स्तूयते ब्रह्मसदृशैर्ऋषिभिः शंकरेण च ॥ ब्रह्मणा सहितैर्देवैः संपन्नबलपौरुषैः ८३ [ ७४५६ ] इति श्रीम० खि० हरि० भवि० त्रिपुरवधो नाम त्रयस्त्रिंशदधिकशततमोऽध्यायः ॥ १३३ ॥

वैशंपायन उवाच ॥ हरिवंशेऽत्र वृत्तान्ताः प्रकीर्त्यन्ते क्रमोदिताः । तत्राद्यमादिसर्गस्तु भूतसर्गस्ततः परः १ पृथोर्वैन्यस्य चाख्यानं मनूनां कीर्तनं तथा । वैवस्वतकुलोत्पत्तिर्धुंधुमारकथा तथा २ गालवोत्पत्तिरिक्ष्वाकुवंशस्याप्यनुकीर्तनम् । पितृकल्पस्तथोत्पत्तिः सोमस्य च बुधस्य च ३ अमावसोरन्वयस्यकीर्तनंकीर्तिवर्धनम् । च्युतिप्रतिष्ठे शक्रस्य प्रसवः क्षत्रवृद्धजः ४ दिवोदासप्रतिष्ठा च त्रिशंकोः क्षत्रियस्य च । ययातिचरितं चैव पुरुवंशस्य कीर्तनम् ५ कीर्तनं कृष्णसंभूतेः स्यमन्तकमणेस्तथा । संक्षेपात्कीर्तिता विष्णोः प्रादुर्भावास्ततः परम् ६ तारकामययुद्धं च ब्रह्मलोकस्य वर्णनम् । योगनिद्रासमुत्थानं विष्णोर्वाक्यं च

---

हे भारता, प्रभूनें सत्य, ब्रह्मयोग व उग्र तप यांच्या योगानें त्रिविध वीर्ययुक्त झालेल्या बाणाचें मनानें संधान करून तो दैत्यनगरावर सोडला. त्याच्या मागोमाग विषारी सर्पासारखे भयंकर दीप्त सुवर्ण-वर्ण, अति चकचकीत, सुंदर व सर्वांचे प्राण हरण करणारे घोर बाण त्यानें सोडले व त्या भवानें अति वेगवान् व अतिशय प्रदीप्त अशा तीन बाणांनीं त्या त्रिपुराचें विदारण केलें ७६-७८. त्यामुळें हे नराधिपा, शरघातानें प्रदीप्त झालेल्या विंध्याग्रांसारख्या गोपुरांचा, त्यांतील पुरांसह, ध्वंस झाला ७९. हे वसुधाधिपा, अग्नीनें अतिशय प्रदीप्त झालेलीं व त्यामुळेंच ज्यांच्या आंत अग्नि आहे अशीं तीं तीन पुरें पृथ्वीवर कोसळलीं ८०. हे राजा, पर्वताच्या वैडूर्यवर्ण शिखरांसारखीं तीं पुरें शंकरानें ब्रह्मास्त्रानें जाळलीं असतां खालीं पडलीं ८१. याप्रमाणें त्रिपुरांचा नाश झाला असतां देवांनीं हर्षानें अशा वाणी उच्चारल्या " हे पुरुषोत्तमा, अतिशय वृद्धि पावलेल्या या सर्व शत्रूंना तूं मार. " ८२ असो; महायोगी विष्णुच योगानें जणु काय अतिशय हंसत असतो. व ब्रह्मतुल्य ऋषि आणि शंकर यांच्याकडून स्तुविला जातो. बल व पौरुष यांनीं युक्त असलेले देवही ब्रह्मदेवासह त्याची अनन्यमनानें स्तुति करितात ८३. इति श्रीमहा० खिल० हरि० भवि० त्रिपुरवधनामक एकशे तेतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १३३. ॥

वैशंपायनः— या हरिवंशामध्यें क्रमानें वर्णन केलेले वृत्तान्त सांगतों. त्यांत पहिला आदि सर्ग, नंतर भूतसर्ग १, त्यानंतर वेनपुत्रपृथूचें आख्यान, मनूंचें कीर्तन, वैवस्वतकुलाची उत्पत्ति, धुंधुमारकथा २, गालवाची उत्पत्ति, इक्ष्वाकुवंशाचेंही अनुवर्णन, पितृकल्प, तशीच सोमाची व बुधाची उत्पत्ति ३, कीर्ति वाढविणारें अमावसूच्या वंशाचें अनुकीर्तन, इंद्राची स्थानच्युति व प्रतिष्ठा, क्षत्रवृद्धजन्य उद्भव, दिवोदासाची प्रतिष्ठा, क्षत्रिय त्रिशंकूची प्रतिष्ठा, ययातिचरित्र, पुरुवंशाचें अनुकीर्तन ४, ५, कृष्णोत्पत्तीचें वर्णन, स्यमंतकमणीचें वर्णन, व त्यानंतर विष्णूचे अवतार संक्षेपतः वर्णिले आहेत ६.

वेधसः ७ पृथ्वीवाक्यं च देवानामंशावतरणं तथा । ततो नारदवाक्यं च स्वप्नगर्भविधिस्तथा ८ आर्यास्तवः पुनः कृष्णोत्समुत्पत्तिः प्रपंचतः । गोव्रजे गमनं विष्णोः शकटस्य निवर्तनम् ९ पूतनाया वधो भंगो यमलार्जुनयोरपि । वृकसंदर्शनं चैव वृन्दावननिवेशनम् १० प्रावृषोवर्णनं चापि यमुनाह्रददर्शनम् । कालीयस्यापि दमनं धेनुकस्य च भंजनम् ११ प्रलंबनिधनं चैव शरद्वर्णनमेव च । गिरियज्ञप्रवृत्तिश्च गोवर्धनविधारणम् १२ गोविन्दस्याभिषेकं च गोपीसंक्रीडनं तथा । रिष्टासुरस्य निधनमक्रूरप्रेषणं तथा १३ अन्धकस्य च वाक्यानि केशिनो निधनं तथा । अक्रूरागमनं चैव नागलोकस्य दर्शनम् १४ धनुर्भंगस्य कथनं कंसवाक्यमतः परम् । कुवलयापीडवधश्चाणूरांध्रवधस्तथा १५ कंसस्य निधनं चापि विलापः कंसयोषिताम् । उग्रसेनाभिषेकश्च यादवाश्वासनं तथा १६ प्रत्यागतिर्गुरुकुलाद्योक्ता रामकृष्णयोः । मथुरायाश्चोपरोधो जरासन्धनिवर्तनम् १७ विकद्रुवाक्यं रामस्य दर्शनं भाषणं तथा । गोमन्तारोहणं चापि जरासन्धगतिस्तथा १८ गोमन्तस्य गिरेर्दाहः करवीरपुरे गतिः । शृगालस्य वधस्तत्र मथुरागमनं ततः १९ यमुनाकर्षणं चैव मथुरापक्रमस्तथा । उपायेन वधः कालयवनस्य प्रकीर्तितः २० निर्माणं द्वारवत्यास्तु रुक्मिणीहरणं तथा । विवाहश्चैव रुक्मिण्या रुक्मिणो निधनं तथा २१ बलदेवाह्निकं पुण्यं बलमाहात्म्यमेव च । नरकस्य वधः पारिजातस्य हरणं तथा २२ द्वारवत्या विशेषेण पुनर्निर्माणकीर्तनम् । द्वारकायां प्रवेशश्च सभायांच प्रवेशनम् २३ नारदस्य च वाक्यानि वृष्णिवंशानुकीर्तनम् । षट्पुरस्य वधाख्यानं मेध्यकस्य निबर्हणम् २४ समुद्रयात्रा कृष्णस्य जलक्रीडाकुतूहलम् । तथा भैमप्रवीराणां मधुपानप्रवर्तकम् २५ ततश्छालिक्यगान्धर्वसमुदाहरणं हरेः ।

---

तारकामय युद्ध, ब्रह्मलोकाचें वर्णन, योगनिद्रेपासून उठणें, विष्णूचें ब्रह्मदेवास उद्देशून केलेलें भाषण ७, पृथ्वीचें वाक्य, देवांचे अंशावतार. त्यानंतर नारदाचें वाक्य, स्वप्नगर्भ विधि ८, आर्यास्तव, कृष्णाची विस्तारपूर्वक उत्पत्ति, विष्णूचें गोकुळांत गमन, शकटाचें निवर्तन ९, पूतनेचा वध, यमलार्जुनाचा वध, वृकसंदर्शन, वृंदावन निवेशन १०, वर्षाकाळचें वर्णन, यमुनाह्रददर्शन, कालीयाचें दमन, धेनुकाचें भंजन ११, प्रलंबाचें निधन, शरत्काळाचें वर्णन, गिरियज्ञप्रवृत्ति, गोवर्धनधारण १२, गोविंदाचा अभिषेक, गोपीक्रीडन, रिष्टासुराचें निधन, अक्रूराचें प्रेषण १३, अंधकांचीं वचनें, केशीचें निधन, अक्रूराचें आगमन, नागलोकाचें दर्शन १४, धनुर्भंग कथन. त्यानंतर कंसवाक्य, कुवलयापीडवध, चाणूर व आंध्र यांचा वध १५, कंसाचें निधन, कंसस्त्रियांचा विलाप, उग्रसेनाचा अभिषेक, यादवांचें आश्वासन १६, आणि नंतर राम व कृष्ण यांचें गुरुकुलांतून परत फिरणें यांचें वर्णन केलें आहे. मथुरेचा उपरोध, जरासन्धास परतविणें १७, विकद्रुवाक्य, रामाचें दर्शन व भाषण, गोमंतावर चढणें, जरासंधाचें आगमन १८, गोमंतपर्वताचा दाह, करवीरपुरांत जाणें, तेथें शृगालवध, तेथून मथुरेस जाणें १९, यमुनेचें आकर्षण, मथुरेचा अपक्रम, व कालयवनाचा उपायानें केलेला वध सांगितला आहे २०. द्वारवतीचें निर्माण, रुक्मीणीचें हरण, विवाह, रुक्मीचें निधन २१, बलदेवाचें आन्हिक पुण्य, बलमाहात्म्य, नरकाचा वध, पारिजातहरण २२, विशेषें करून द्वारवतीचें पुनः निर्माणकीर्तन, द्वारकेंत प्रवेश, सभाप्रवेश, नारदाचीं वाक्यें, वृष्णिवंशाचें अनुकीर्तन, षट्पुराच्या वधाचें आख्यान, मेध्यकाचा नाश २३, २४, कृष्णाची

भानोश्च दुहितुर्भानुमत्या हरणकीर्तनम् २६ शंबरस्य वधश्चैव धन्योपाख्यानमेव च । वासुदेवस्य माहात्म्यं बाणयुद्धं प्रपंचितम् २७ भविष्यं पुष्करं चैव प्रपंचेनैव कीर्तितम् । वराहं नारसिंहं च वामनं बहुविस्तरम् २८ कैलासयात्राकृष्णस्य पौण्ड्रकस्य वधस्ततः । हंसस्य डिंभकस्यैव वधश्चैव प्रकीर्तितः २९ पुरञ्जयस्य संहारइति वृत्तान्तसंग्रहः । कथितोनृपशार्दूल सर्वपापप्रणाशनः ३० वृत्तान्तं शृणुयाद्यस्तु सायं प्रातः समाहितः । स याति वैष्णवं धाम लब्धकामः कुरूद्वह । धन्यं यशस्यमायुष्यं भक्तिमुक्तिफलप्रदम् ३१ [ ५४८७ ] [ १६५९५ ] इति श्रीमहाभारते खिलेषु हरिवंशे भविष्यपर्वणि वृत्तान्तसंग्रहो नामचतुस्त्रिंशदधिकशततमोऽध्यायः ॥ १३४ ॥

॥ समाप्तोयं हरिवंशः ॥

अथश्रवणफलकथनम् ॥ जनमेजय उवाच ॥ हरिवंशे पुराणे तु श्रुते मुनिवरोत्तम । किं फलं किं च देयं वै तद्ब्रूहि त्वं ममाग्रतः १ वैशंपायन उवाच ॥ हरिवंशे पुराणे तु श्रुते च भरतोत्तम । कायिकं वाचिकं चैनो मनसा समुपार्जितम् २ तत्सर्वं नाशमायाति हिमं सूर्योदये यथा । अष्टादशपुराणानां श्रवणाद्यत्फलं भवेत् ३ तत्फलं समवाप्नोति वैष्णवो नात्र संशयः । श्लोकार्धं श्लोकपादं वा हरिवंशसमुद्भवम् ४ शृण्वन्ति श्रद्धया युक्ता वैष्णवं पदमाप्नुयुः । जंबुद्वीपं समाश्रित्य श्रोतारो दुर्लभाः कलौ ५ भविष्यन्ति नरा राजन् सत्यं सत्यं वदाम्यहम् । स्त्रीभिश्च पुत्रकामाभिः श्रोतव्यं वैष्णवं

---

समुद्रयात्रा, जलक्रीडा कौतुक, त्याचप्रमाणें भैमवीरांचें मद्यपानप्रवर्तन २५. तदनंतर हरीच्या छालिक्य गांधर्वांचें वर्णन, भानूची कन्या जी भानुमती तिचें हरण २६, शंबराचा, वध, धन्योपाख्यान, वासुदेवाचें माहात्म्य व बाणयुद्ध यांचा प्रपंच केला आहे २७. भविष्य व पुष्कर यांचें सविस्तर वर्णन केलें आहे. वाराह, नरसिंह, व वामन यांचें सविस्तर आख्यान २८, कृष्णाची कैलासयात्रा, पौंड्रकाचा वध आणि शेवटीं हंस व डिंभक यांचा वध वर्णिला आहे २९. अगदीं शेवटीं त्रिपुरसंहार सांगितला आहे. हे उत्तम राजा, असा या ग्रंथाचा वृत्तांतसंग्रह सांगिला आहे. तो सर्व पापनाशक आहे ३०. जो साधक सायंकाळीं व प्रातःकाळीं शांतचित्तानें हा वृत्तान्त ऐकतो तो हे कुरूद्वह राजा, लब्धकाम होऊन वैष्णवधामास जातो. हा वृत्तान्त धन देणारा, यश पसरविणारा, आयुष्य वाढविणारा आणि भक्ति व मुक्ति हें फल देणारा आहे ३१. इति श्रीमहा० भार० खि० हरि भविष्यवृत्तांतसंग्रहनामक एकशें चवतिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १३४ ॥

## येथें हरिवंश समाप्त झाला.

अथ फलश्रवण कथनः—जनमेजय ह्मणतोः—हे मुनि वरोत्तमा, हरिवंश पुराण ऐकलें असतां फल कोणतें मिळतें, व काय द्यावें तें मला सांग १. वैशंपायनः—हे भरतोत्तमा, हरिवंशपुराण ऐकलें असतां सूर्योदय होताच हिम जसें वितळून जातें त्याप्रमाणें कायिक, वाचिक व मनानें उपार्जित पाप नाहींसें होतें. अठरा पुराणें ऐकल्यानें जे फळ प्राप्त होतें तेंच फल विष्णुभक्ताला या पुराणापासून मिळतें, यांत संशय नाहीं. हरिवंशाचा श्लोकार्ध किंवा श्लोकाचा पाद जे श्रद्धेनें युक्त होऊन ऐकतात ते वैष्णपदास प्राप्त होतात. पण हे राजा, मी खरें खरें सांगतों कीं, कलियुगांत नर जंबूद्वीपाचा आश्रय करून राहिले तरी त्यांतही याचें श्रवण करणारे लोक दुर्लभ होतील. पुत्रांची इच्छा करणाऱ्या स्त्रियांनीं हें

यशः ६ दक्षिणा चात्र देया वै निष्कत्रयसुवर्णकम् । वाचकाय यथाशक्त्या यथोक्तं फल-
मिच्छता ७ स्वर्णशृंगीं च कपिलां सवत्सां वस्त्रसंयुताम् । वाचकाय प्रदद्याद्धि आत्मनः श्रेयः-
कांक्षया ८ अलंकारं प्रदद्याच्च पाण्योर्वै भरतर्षभ । कर्णस्याभरणं दद्याद्यानं च सविशे-
षतः ९ भूमिदानं समादद्याद्ब्राह्मणाय नराधिप । भूमिदानसमं दानं न भूतं न भविष्यति १०
शृणोति श्रावयेद्वापि हरिवंशं तु यो नरः । सर्वथा पापनिर्मुक्तो वैष्णवं पदमाप्नुयात् ११
पितॄनुद्धरते सर्वानेकादशसमुद्भवान् । आत्मानं ससुतं चैव स्त्रियं च भरतर्षभ १२ दशांश-
श्चात्र होमो वै कार्यः श्रोत्रा नराधिप । इदं मया तवाग्रे च सर्वं प्रोक्तं नरर्षभ १३ यस्य
स्मरणमात्रेण सर्वपापैः प्रमुच्यते । अपुत्रः पुत्रमाप्नोति अधनो धनमाप्नुयात् १४ नरमेधा-
श्वमेधाभ्यां यत्फलं प्राप्यते नरैः । तत्फलं लभते नूनं पुराणश्रवणाद्धरेः १५ ब्रह्महा भ्रूणहा
गोघ्नः सुरापो गुरुतल्पगः । सकृत्पुराणश्रवणात्पूतो भवति नान्यथा १६ इदं मया ते परि-
कीर्तितं महच्छ्रीकृष्णमाहात्म्यमपारमद्भुतम् । शृण्वन्पठन्नाशु समाप्नुयात्फलं यच्चापि
लोकेषु सुदुर्लभंमहत् १७ इति श्रीमहाभारते खि० ह० भ० श्रवणफलकथनं नाम पंचत्रिंश-
दधिकशततमोऽध्यायः ॥ १३५ ॥ इति हरिवंशग्रंथः समाप्तः ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

विष्णूचें यश अवश्य ऐकावें २–६. याची दक्षिणा तीन निष्क सुवर्ण आहे; पण यथोक्त फलाची इच्छा करणाऱ्या श्रोत्यानें वाचकाला यथाशक्ति तरी दक्षिणा अवश्य द्यावी ७. सवत्स, वस्त्रयुक्त, स्वर्णशृंगी कपिला गाय आपल्या कल्याणाची इच्छा करणारानें वाचकास द्यावी ८. हे भरतश्रेष्ठा, दोन्ही हातांत अलंकार घालावेत. कर्णाभरण द्यावें, विशेषें करून यान द्यावें ९. हे नराधिपा, ब्राह्मणाला भूमिदान द्यावें. भूमिदानासारखें दान त्रिकालीं नाहीं १०. जो नर हरिवंश ऐकतो व ऐकवितो तो सर्वथा पापमुक्त होऊन वैष्णवपदास पोंचतो. तो अकरा जन्मींच्या सर्व पितरांचा, आपला, पुत्राचा व पत्नीचा उद्धार करतो ११,१२. हे नराधिपा, श्रोत्यानें याप्रसंगीं दशांश होम करावा. हे नरश्रेष्ठा, हें मी तुला सर्व सांगितलें आहे १३. याच्या केवळ स्मरणानेंच पुरुष सर्व पापांसून मुक्त होतो. अपुत्राला पुत्र होतो. निर्धनाला धन मिळतें १४. नरमेध व अश्वमेध यांच्या योगानें मनुष्यांना जें फळ मिळतें, खचित, हरीच्या पुराणश्रवणानेंही तें फळ मिळतें १५. ब्रह्महत्या करणारा, भ्रूणहत्या करणारा, गोवध करणारा व सुरापान करणारा याचें एकदा श्रवण करूनच पवित्र होतो. त्यावाचून मात्र नाहीं १६. अपार व अद्भुत असें हें श्रीकृष्णाचें अति मोठें माहात्म्य मीं तुला सांगितलें. याचें श्रवण व पठण करणाऱ्या पुरुषास या लोकांमध्यें अतिशय दुर्लभ असलेलें मोठें फल सत्वर प्राप्त होतें १७. इति श्रीमहाभारतांतील खिल-पर्व–हरिवंशाच्या भविष्यपर्वांपैकीं श्रवणफलकथननामक एकशें पसातिसावा अध्याय समाप्त झाला ॥ १३५ ॥ इति हरिवंश ग्रंथ समाप्त श्रीकृष्णार्पणमस्तु.

**समाप्त.**